# भाई माधवरावजी बागल

( निवडक लेखसंग्रह )

# भाई माधवरावजी बागल

## ( निवडक लेखसंग्रह )

- संपादक -

प्राचार्य डॉ. मा. गो. माळी (निमंत्रक)
प्राचार्य रा. कृ. कणबरकर (सदस्य)
प्रा. डॉ. निर्मलकुमार फडकुले (सदस्य)
प्रा. डॉ. रमेश जाधव (सदस्य)
श्री. ना. धो. महानोर (सदस्य)
श्री.अर्जुनराव डांगळे (सदस्य)
श्री. बाबूराव धारवाडे (निमंत्रित)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# निवेदन

माणूस किती जगला यापेक्षा तो कसा जगला ह्यालाच महत्त्व असते. स्वत:साठी जगणे तर किड्यामुंग्यांनाही समजते पण इतरांच्यासाठी जगण्यात मानवाचे वेगळेपण उमजते. आपली काया, कला आणि कलम लोककल्याणासाठी झिजवण्यातच जीवनाची सार्थकता मानता येईल. विनोबा म्हणत, "माझ्यासाठी मी जगलो ह्यापेक्षा इतरांसाठी मी झिजलो," ह्याला अधिक मोल आहे. असले अनमोल जगणे ज्या थोड्यांना जमले त्यात कै. माधवराव बागल यांचा क्रम बराच वर लागतो. अन्याय व असमानता यांचे विरुद्ध सातत्याने माधवराव लढले. स्वार्थ व पदलोलुपता न ठेवता केवळ लोकांना सुखात ठेवणे साधावे एवढेच माधवरावांनी जपले. माधवरावांचे चरित्र आजच्या जीवनमूल्यघसरणीच्या कालखंडात उपयुक्त ठरेल ह्यांत संशय नाही.

त्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षात त्यांच्या आत्मचरित्राचे व इतर लेखांचे संग्रहीत पुस्तक प्रकाशित करायचे मंडळाने ठरविले ते ह्याच उपयुक्ततेच्या दृष्टीकोनातून.

संपादक मंडळातील डॉ. मा. गो. माळी, प्राचार्य रा. कृ. कणबरकर, डॉ. निर्मलकुमार फडकुले, डॉ. रमेश जाधव, कविवर्य ना. धों. महानोर, श्री. अर्जुन डांगळे व श्री. बाबूराव धारवाडे ह्या सदस्यांनी परिश्रमपूर्वक माधवरावांचे लिखाण एकत्रित केले व संपादून मंडळाला सोपविले ह्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. ह्यासाठी भाई माधवराव बागल विद्यापीठाने भाईजींचे दुर्मिळ असलेले सर्व ग्रंथ उपलब्ध करुन दिल्याबद्दल मंडळ त्यांचेही आभारी आहे. मंडळाचे सचिव, श्री. चंद्रकांत वडे ह्यांचे अनमोल श्रम कारणी लागले. त्यांचेही मंडळ आभार मानते. मुद्रक "मायक्रोग्राफ" ह्यांनी मुद्रण सुबक व समयशीर संपवले आणि पुस्तक उत्तमप्रकारे सजविले म्हणून मंडळ त्यांच्याप्रती आभार व्यक्त करते.

मुंबई, दिनांक : २१मे, १९९८ मधुकर आष्टीकर,

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

# अनुक्रमणिका



ती. कै. खंडेराव गोपाळराव बागल



भाई माधवराव बागल सक्तमजुरीची शिक्षा भोगताना



प्रभाकरपंत कोरगावकर स्मृतिदिन

१) माधवराव बागल २) शंकरराव देव ३) सहस्त्रबुद्धे ४) आचार्य भागवत ५) भाऊसाहेब खांडेकर ६) ग. प्र. प्रधान



संयुक्त महाराष्ट्र लढ्याचे पंचक

डावीकडून : १) प्रभातकार कोठारी २) अध्यक्ष एस्. एम्. जोशी ३) आचार्य अत्रे ४) माधवराव बागल ५) डॉ. नरवणे.



माधवरावांचे जलरंगातील एक चित्र



मुख्यमंत्री असताना ना. यशवंतरावजी चव्हाण भाईजींच्या वाढदिवशी
हार घालून अभिनंदन करीत असताना



साहित्य संस्कृती मंडळातील सत्कार



बाळ दौलत, सौ. रमाबाई व माधवराव

# संपादकीय

महात्मा गांधींनी महाराष्ट्राला नि:स्वार्थी, त्यागी कार्यकर्त्यांचे मोहोळ म्हटले होते. अशा कार्यकर्त्यांत भाई माधवराव बागल यांचा बराच वरचा नंबर लागेल. स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या आयुष्याची ३०/३५ वर्षे निरपेक्षपणे समाजाची सेवा करणाऱ्या माधवरावांचे अखेरचे दिवस आर्थिक विवंचनेत जावे हा दैवदुर्विलास आहे. खांडेकर म्हणतात, “आपल्या जीवनाची शोकांतिका ही की उग्र तपश्चर्या करून जे लोकांना वर मिळवून देतात ते स्वत: दारिद्र्याच्या शापाने व्याकूळ होऊन जातात.” सर्वव्यापी भ्रष्टाचाराने पोखरलेल्या आजच्या सार्वजनिक जीवनाच्या पार्श्वभूमीवर, स्वत:च्या संसाराची होळी करून समाजसेवेचा एक मानदंड ठरलेल्या भाई माधवराव बागल यांचे जीवन हे केवळ आजच्या नव्हे तर उद्याच्या पिढीलाही प्रेरणादायी ठरेल. म्हणूनच त्यांच्या जीवनकार्याची ओळख करून देणाऱ्या “निवडक माधवराव बागल” या ग्रंथाचे प्रयोजन.

माधवरावांच्या जीवनपटाचे पाच कालखंड पडतात. (१) बालपण व १९२५ ते ३० पर्यंतचा कालखंड, (२) १९३० ते १९४९ ला संस्थान विलीन होईपर्यंतचा, प्रजा परिषदेच्या लढ्याचा कालखंड, (३) १९५० ते १९५९ पर्यंतचा संस्थानाबाहेरील राजकारणाचा, शे. का. पक्ष प्रवेश व संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचा कालखंड, (४) संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेपासून १९७५ पर्यंतचा काँग्रेसशी सहकार्याचा कालखंड, (५) १९७५ नंतर मृत्यूपर्यंत निवृत्त जीवनाचा कालखंड.

माधवरावांचा जन्म २८ मे १८९६ रोजी कोल्हापुरात मामांचे घरी

झाला. वडील खंडेराव बागल संस्थानात अधिकारी व मामा एक सुखवस्तू गृहस्थ, यामुळे भाईजींचे बालपण आरामात गेले. उपजतच निसर्ग सौंदर्याची ओढ असलेल्या माधवरावांनी मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये कलेचा अभ्यासक्रम पूर्ण केला. कलाकार म्हणून स्थिर होण्याचा त्यांचा विचार होता. पण एव्हाना वडील खंडेराव दरबारची नोकरी सोडून वकील म्हणून स्थिर झालेले होते. खंडेराव सामाजिक कार्याची सुरवात म्हणून "हंटर" हे साप्ताहिक चालवित. गांधीजींच्या एका कोल्हापूर भेटीच्या वेळी वडिलांनी माधवरावांची गांधीजींना एक चित्रकार म्हणून ओळख करून दिली. गांधीजी उद्‌गारले, "अशी चित्रे काढा की, ज्यामुळे जनसेवा घडेल." गांधीजींचे उद्‌गार भाईजींच्या कोमल अंत:करणात रुजले. भाईजींनी हळूहळू कुंचला बाजूला सारून लेखणी हातात घेतली. लेखणीनेच प्रभावी जनसेवा घडेल असे वाटू लागले. भाईजींच्या जीवनाला वेगळे वळण लागले. ते वडिलांच्या "हंटर" पत्रात लोकांची गाऱ्हाणी मांडू लागले. स्फुटं लिहू लागले. संस्थानातही गांधीजींच्या स्वातंत्र्य चळवळीचे पडसाद उठू लागले होते. प्रजा परिषदेची स्थापना झाली आणि भाईजींनी तिचे नेतृत्व केले. १९३० पासून १९४७ पर्यंत १८ वर्षे हा लढा चालू होता. त्यात माधवरावांना अनेकदा सक्त मजुरीची शिक्षा, हद्दपारी, घरावर जप्ती, वर्तमानपत्रावर बंदी इत्यादी हालअपेष्टांना तोंड द्यावे लागले. १५ नोव्हेंबर १९४७ ला कोल्हापूर संस्थानचा कारभार लोकप्रतिनिधींच्या हाती आला. माधवरावांचा विजय झाला. पण स्वत: पंतप्रधान न होता ते केवळ मार्गदर्शक म्हणून राहिले. भारतात सर्वच संस्थाने स्वातंत्र्यात विलीन होत होती. कोल्हापूरही १ एप्रिल १९४९ रोजी विलीन झाले आणि भाईजी प्रजापरिषदेचा लढा संपवून 'टू फ्रेश फोल्डस ॲन्ड पाश्चर्स न्यू'कडे, संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याकडे वळले. संघर्षाच्या आणि लढ्याच्या काळातच भाईजींचे व्यक्तिमत्त्व झळाळून निघाले भाईजींचे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतील योगदान हे या संघर्षातील कैलास लेणे होय.

१९६० ला संयुक्त महाराष्ट्र झाला आणि भाईजींचा काँग्रेसकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला. यशवंतराव चव्हाणांना विरोध त्यांच्या निर्मळ मनाला पटेना. त्यांनी बाहेर राहून यशवंतरावांना सहकार्य करावयाचे ठरविले. त्या काळात थोडासा जरी राजकीय मुत्सद्दीपणा भाईजींनी दाखविला असता तर ते मुख्यमंत्रीही होऊ शकले असते. पण सत्तेच्या खुर्चीपासून ते शेवटपर्यंत दूर

राहिले. यामुळे त्यांच्याबद्दल पुढाऱ्यांत, जनतेत अपार आदर होता. हीच भाईजींची आयुष्याची कमाई. १९७५ नंतर मात्र भाईजी राजकारणातून संपूर्णपणे निवृत्त झाले. आयुष्याचे अखेरचे दिवस शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्याप्रमाणे भाईजींना एकाकीपणात घालवावे लागले. राजकारणात, सार्वजनिक जीवनात तुम्ही जोपर्यंत सत्तेच्या घोड्यावर स्वार आहात तोपर्यंतच लोक तुमची दखल घेतात. ६ मार्च १९८६ रोजी वयाच्या ९१ व्या वर्षी भाईजींचे निधन झाले.

१९९६ साल हे भाईजींच्या जन्मशताब्दीचे वर्ष म्हणून "भाई माधवराव बागल" निवडक लेखसंग्रह ही भाईजींना वाहिलेली आदरांजली.

भाईजींच्या वाणीप्रमाणे त्यांची लेखणीही प्रभावी होती. जेव्हा वाणी-स्वस्थ असे तेव्हा लेखणी चाले. भाईजींचे वाचन अफाट होते. वाचलेले रवंथ करून स्वत:च्या सोप्या शैलीत ते वाचकासमोर मांडत. भाईजींची साहित्य संपदा विपुल होती. त्यांनी लहान मोठी ५०-५५ पुस्तके लिहिली. त्यांच्या लेखनाची पाच प्रकारात विभागणी करता येईल.

१) आत्मचरित्रकार माधवराव

२) व्यक्तिचित्रकार माधवराव

३) विचारवंत माधवराव

४) कलावंत माधवराव

५) साहित्यिक माधवराव

१) तसे पाहिले तर माधवरावांचे सर्वच लिखाण आत्मचरित्रपर आहे. त्यांचं साहित्य हे प्रकर्षाने जाणवण्याइतकं व्यक्तिनिष्ठ आहे. तो एक भावनाविष्कार आहे. पण या आविष्कारात माधवरावांचे व्यक्तिगत जीवन कमी दिसते. त्यात त्यांचे सार्वजनिक जीवन म्हणजे त्या काळातील समाजाचे जीवन, माधवरावांच्या चष्म्यातून टिपलेलं आहे. माधवरावांनी आत्मचरित्राचे छोटे मोठे पाच खंड लिहिले आहेत.

पहिले तीन "जीवन प्रवाह" या नावाने प्रसिद्ध झाले. चौथा "सत्याग्रहातून सहकार्याकडे", पाचवा "संघर्ष व सन्मान" या नावाने प्रसिद्ध झाला. या ५ भागातील आत्मचरित्राखेरीज माधवरावांनी आठवणींच्या स्वरूपात आत्मचरित्रपर लिखाण केले आहे. यात "बंधनात", "जीवन संग्राम" अगर

"सिंहावलोकन" व "माझ्या जीवनाच्या प्रेरणा" या ग्रंथांचा समावेश करता येईल.

(२) माधवरावांनी त्यांच्या सहवासात आलेल्या असंख्य लहान-थोर व्यक्तींची चित्रे रेखाटली आहेत. यात काही छोटी व काही मोठी व काही अगदीच छोटी आहेत. यांना चरित्रे म्हणता येणार नाहीत. ही व्यक्तिचित्रे आहेत. त्यापैकी बरीचशी रेखाचित्रेच (थंबनेल स्केचिस) आहेत. (१) माझ्या आवडत्या पाच व्यक्ती (१९६४) यात माधवरावांचे वडील खंडेराव बागल, यशवंतराव चव्हाण, बाळासाहेब देसाई, प्रभाकरपंत कोरगांवकर व मदनमोहन लोहिया यांची छोटी चरित्रे आहेत. "माझी सहधर्मचारिणी" हे माधवरावांची पत्नी रमाबाई हिचे छोटेखानी चरित्र आहे. या सर्व व्यक्ती माधवरावांच्या निकट सांन्निध्यातील व माधवरावांना आदरणीय असलेल्या होत्या. "बहुजन समाजाचे शिल्पकार" (१९६६) प्रथम सत्यावादीत क्रमश: प्रसिद्ध झाले. यात २१ व्यक्तिचित्रे असून त्यातून म. फुले यांच्यापासून पासून जेधे, जवळकर यांच्या कालापर्यंत बहुजन समाजाच्या चळवळीचा इतिहास स्पष्ट होतो. "माझा परिवार" हा व्यक्तिचित्रांचा संग्रह दोन भागात १९६६ व ६७ सालात प्रसिद्ध झाला. यात एकूण २९ व्यक्तिचित्रे असून त्यात आचार्य जावडेकर, आचार्य अत्रे यांच्यापासून यशवंतराव चव्हाण ते रत्नाप्पा कुंभार यांच्यापर्यंतच्या व्यक्तींची चरित्रे रेखाटली आहेत. या ५० ते ६० व्यक्तींशिवाय माधवरावांच्या सहवासात अनेक लहान-थोर कार्यकर्ते, पत्रकार, निकटवर्ती मित्र आले होते. त्या सर्वांना न्याय देण्यासाठी माधवरावांनी "सहवासातून" हा संग्रह १९७० साली ७५ व्या वर्षाची भेट म्हणून प्रसिद्ध केला. यात ४० छोटी चरित्रे आहेत. यशवंतराव चव्हाण हा माधवरावांचा विक पॉईंट होता. त्यांच्या संबंधी माधवरावांनी अनेक ठिकाणी अनेकवेळा लिहिले आहे. पण "माझे यशवंतराव' हे उतारवयात लिहिलेले वैशिष्ट्यपूर्ण, भावनोत्कट असे व्यक्तिचित्र आहे. यशवंतरावांना भक्तिभावाने वाहिलेली ही आदरांजली आहे.

(३) माधवरावांच्या वैचारिक लिखाणाला वडिलांच्या पत्रात स्फुटं लिहिण्यापासून तरुण वयातच सुरुवात झाली. हद्दपारीच्या काळात, पुणे-मुंबईच्या परिसरात जवळकर, काकासाहेब लिमये, इत्यादिंच्या सहवासातून समाजवादावरील वाङ्मयाच्या दालनात माधवरावांनी प्रवेश केला व तेथे ते इतके रमले की, त्यांनी इब्सेन , शॉ, ऑस्कर वाइल्ड, व्हिक्टर ह्युगो, टॅगोर, चेकाव्ह, मोपाँसा, गार्को इत्यादींचे अनेक ग्रंथ अधाशासारखे वाचून

काढले. माधवरावांच्या वैचारिक लिखाणात "नव्या पिढीचे राजकारण" "बेकारी व तीवर उपाय", "समाजसत्ता की भांडवलशाही", "मार्क्सवाद", "सोशॅलिझम", "लेनीन" "स्टॅलीन", "सुलभ समाजवाद-भाग १ व २" इत्यादी समता व समाजवादावरील ग्रंथांचा समावेश करावा लागेल. भाईजींनी मुख्यत्वेकरून बहुजन समाजासाठी लिहिले वाक्ये छोटी व भाषा साधी; पांडित्याचे प्रदर्शन नाही की संदर्भांची गर्दी नाही. त्यांनी "स्वान्तसुखाय" लिहिलं नाही, बहुजन समाजाच्या प्रबोधनासाठी, जागृती व संघर्षासाठी लिहिलं.

(४) कुंचला - लेखणी - कुदळ - फावडे असा माधवरावांच्या जीवनाचा प्रवास होता. ही सर्व साधने माधवरावांनी समर्थपणे हाताळली आहेत. कुंचला कमी पडतो म्हणून लेखणी व तीही कमी पडल्यानंतर कुदळ-फावडे हाती घेतले. कला व क्रांती दोन्ही क्षेत्रात सहज व समर्थपणे संचार करणारे माधवराव क्रांतीकडे वळले नसते तर कलेतील कांचनगंगा व गौरीशंकर ही शिखरे काबीज केली असती; तरी सुद्धा त्यांची कला निर्मिती व कलेवरील लिखाण कमी उंचीचे नाही. त्यांनी करवीरचा रम्य परिसर, रंकाळा, ब्रह्मपुरी, पंचगंगा घाट, पन्हाळा इत्यादींना आपल्या शेकडो निसर्गचित्रात पकडून ठेवले आहे. माधवरावांनी कलेवर चिकित्सक पुस्तके लिहिली आहेत. मराठीत असे ग्रंथ दुर्मिळ आहेत. "कला आणि कलावंत"-भाग १ व २, "कोल्हापूरचे कलावंत", "कला विहार" ही त्यांची कलेवरील कांही मराठी पुस्तके.

(५) माधवरावांचे साहित्य हे स्वान्तसुखाय नव्हते. ते हेतुप्रधान होते. गरजेतून ते लिहू लागले. साहित्य म्हणजे जर सहानुभूती असेल तर माधवरावांच्या जवळ याचा मोठा साठा होता. ते सहानुभूतीचे सागर होते. कलात्मक मांडणी, आकर्षक भाषा वगैरे दडपणाखाली न वावरता त्यांनी सरळ, सोप्या भाषेत आपले विचार व्यक्त केले. त्यांच्या बालबोध भाषाशैलीने प्रभावीत होऊन मामा वरेरकर लिहितात- "अगदी थोड्या अवधीत माधवरावांनी जे निर्माण केले आहे ते पाहिले म्हणजे वाङ्मय प्रपंचात पेन्शनीला आलेल्या माझ्यासारख्या लेखकालासुद्धा लाजेने मान खाली घालावीशी वाटू लागते. अनुभवाच्या अंगारातून निर्माण झालेले हे जिवंत वाङ्मय आहे."

माधवरावांना ललित लेखन करण्याला त्यांचे मित्र नि. गो. पंडितराव कारणीभूत ठरले. ते एकदा माधवरावांना म्हणाले, "तुमचे समाजवादी विचार खालच्या समाजाला समजायचे असतील तर लघुकथेच्या स्वरूपात ते मांडले तर फार लोकप्रिय होईल." भाईजींनी पाश्चात्त्य कादंबरीकारांचे, कथाकारांचे

वाङ्मय खूप वाचले होते. त्यांनी पहिली कथा लिहिली व चित्रमय जगतकडे पाठविली. त्यांनी ती सचित्र छापली. झाले, माधवरावांनी कथा लिहिण्याचा सपाटा सुरू केला. चित्रमय जगत, किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, मौज, सत्यकथा वगैरे नियकालिकात त्या छापून आल्या. त्यांचे संग्रह प्रसिद्ध झाले. "जिव्हाळा", "संसार", "जुलूम", "अशी होती संस्थानी राजवट."; त्यांनी लिहिलेल्या "शाहू महाराजांच्या आठवणी" यासुद्धा लघुत्तम कथाच आहेत.

भाईजी महाराष्ट्रातील एक ख्यातनाम प्रभावी वक्ते होते. त्यांच्या लिखाणाप्रमाणे त्यांचे वक्तृत्वही बहुजन समाजासाठी होते. छोटी छोटी वाक्ये व साधी भाषा, त्यात पांडित्याचे दर्शन नाही. ५/१० वाक्यातच भाईजी श्रोत्यांशी संवाद जुळवीत. श्रोत्यांपर्यंत पोहोचण्याची अत्यंतिक तळमळ हे त्याचे कारण; एकदा का श्रोत्यांची नाडी सापडली की तासन् तास ते हजारोंच्या समुदायाला मंत्रमुग्ध करून डोलायला लावीत. त्यांच्या सुरुवातीपासूनच्या भाषणांचा एक संग्रह "भाई बागलांचा विचार प्रवाह" या नावाने १९६७ व्या वाढदिवशी प्रसिद्ध झाला आहे.

"भाई माधवराव बागल" निवडक लेखसंग्रहमध्ये या पाच प्रकारचे साहित्यातून निवडलेले उतारे समाविष्ट केलेले आहेत. उतारे निवडताना दोन उद्दिष्टे समोर ठेवली आहेत. एक, या उताऱ्यावरून भाईजींच्या जीवनातील प्रमुख घटना वाचकांच्या लक्षात याव्यात व दुसरे, या उताऱ्यावरून भाईजींचे ध्येयवादी व्यक्तिमत्त्व स्पष्ट व्हावे. भ्रष्टाचाराने बरबटलेल्या आजच्या सार्वजनिक जीवनात, सत्तेपासून दूर राहून, निष्ठा, निर्भयता व नि:स्वार्थीपणा जपण्याची प्रेरणा आजच्या तरुण पिढीला देणे अत्यंत गरजेचे आहे. माधवरावांचे जीवन हे आजच्या तरुण पिढीला प्रेरणादायी ठरेल याच एका हेतूने भाईजींच्या जन्मशताब्दीच्या वर्षात "महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ" हा "भाई माधवराव बागल" निवडक लेखसंग्रह त्यांच्या स्मृतीचे जागरण म्हणून वाचकांच्या हाती ठेवीत आहे. माधवराव बागलांच्या जीवनकार्याची ही केवळ एक झलक आहे. ती पाहून संपूर्ण माधवराव मुळापासून वाचण्याची प्रेरणा वाचकांना होईल अशी अपेक्षा आहे.

**संपादक मंडळ**

१) डॉ. मा. गो. माळी (निमंत्रक)  २) श्री. ना. धों. महानोर  ३) डॉ. निर्मलकुमार फडकुले
४) श्री. अर्जुन डांगळे  ५) प्रा. रा. कृ. कणबरकर  ६) डॉ. रमेश जाधव
७) श्री. बाबूराव धारवाडे (निमंत्रक)

# महाराष्ट्राचा उपेक्षित कर्मयोगी

**बाबूराव धारवाडे**

कोल्हापुरात राजर्षी शाहू महाराजांनंतर नाव घ्यावं असं एकमेव व्यक्तिमत्त्व म्हणजे भाई माधवरावजी बागल. भाईजी महाराष्ट्राचे एक थोर नि क्रांतिकारक समाजसुधारक होते. देवावर विश्वास नसलेले भाईजी म. फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना "दैवत" मानीत. परंतु त्यांचे विचार आणि आचार या दैवतांच्या पुढे दोन पावले होते असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. म. फुल्यांचा देव म्हणजे "निर्मिक". त्यांना "निर्मिक". आणि भक्त यात यांच्यामध्ये भटभडजी दलाल नको होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवर हिंदू धर्माने अन्याय केला. त्यांच्या समाजाला शेकडो वर्षे जनावरासारखं जिणं जगावं लागलं. म्हणून "मी हिंदू धर्मात जन्मलो असलो तरी हिंदू धर्मात मरणार नाही" ही प्रतिज्ञा त्यांनी पूर्ण केली. बौद्ध धर्माची त्यांनी दीक्षा घेतली, परंतु भाईजींनी देव आणि धर्मही संकल्पनाच जीवनातून ठोकरून लावली होती. त्यांनी आयुष्यभर देव मानला नाही की धर्म.

## अष्टपैलू व्यक्तिमत्त्व

भाईजी पराक्रमी राजकारणी होते, क्रांतिकारक समाजकारणी होते, प्रतिभावान साहित्यिक होते, कुशल चित्रकार - शिल्पकार होते, नि फर्डे वक्ते होते. राजकीय नेत्यात एवढे सर्व गुण एकत्र असणारा माणूस विरळा. राजकारणात असून ते कधी आमदार, खासदार, मंत्री झाले नाहीत. "किंग मेकर"चीच भूमिका त्यांनी घेतली. अनेक ज्येष्ठ साहित्यिकांनी व आचार्य अत्र्यांनी तर एका प्रस्तावनेत हे मान्य केले आहे की भाई बागल जर राजकारणात

पडले नसते तर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष केव्हाच होऊन गेले असते.

स्वभावाने ते अत्यंत भावनाप्रधान होते. हळव्या मनाचे होते. त्यांचा शत्रू-प्रतिस्पर्धी केव्हा त्यांचा सहकारी-सोबती होईल हे सांगता यायचे नाही. परिवर्तनशील विचार, व्यक्तिगत जिव्हाळा, प्रेम आणि दुसऱ्यावर विश्वास ठेवण्याची उदारता हा त्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव होता.

## प्रजा परिषदेचा लढा

१९२६ साली म. गांधींनी कोल्हापुरास पहिली भेट दिली. भाईजींचे पिताजी कै. खंडेराव बागल यांनी त्यांचे गंगावेशीतील सभेत स्वागत करून गांधींचे भाषण घडवून आणले.

त्या वेळेपासून भाईजी स्वत:चे राहिले नाहीत. देशाच्या स्वातंत्र्य लढ्याने त्यांना पछाडले. १९३७ साली संस्थानी राजवटीविरुद्ध लढा देण्यासाठी त्यांनी प्रजा परिषदेची स्थापना केली. १९३८च्या डिसेंबरात कोल्हापुरात प्रचंड शेतकऱ्यांचा मोर्चा त्यांनी आणला. संस्थानात क्रांतियज्ञ पेटविले. त्यासाठी त्यांना अनेक वर्षे तुरुंगवास भोगावा लागला. सध्यासारखा नव्हे. पायात लोखंडी बेड्या घालून त्यांची रस्त्यातून धिंड काढण्यात येत होती. छत्रपतींच्याकडून जमिनी, प्रांत ऑफिसरच्या (डे. कलेक्टर)च्या नोकऱ्यांची आणि अनेक प्रकारची आलेली प्रलोभने त्यांनी ठोकरून लावली. संस्थानात जबाबदार राज्यपद्धती आणलीच पाहिजे या मागणीसाठी त्यानी रान पेटवले. १९४७ साली शेवटी कोल्हापुरात बागल मंत्रिमंडळ आलेही व गांधी हत्येच्या नंतरच्या झंझावातात ते विरूनही गेले. संस्थान विलीन झाले.

## भाईजी नि यशवंतराव

१९३७ साली कऱ्हाड येथील शेतकरी परिषदेचे भाई बागल अध्यक्ष होते आणि यशवंतराव चव्हाण साधे स्वयंसेवक होते. हे चव्हाणसाहेबांनीच नमूद केले आहे. परंतु संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात भाईजींनी यशवंतरावांची जराही गय केली नाही. भाई संयुक्त महाराष्ट्र समितीचे प्रमुख नेते होते. भाई बागल, आचार्य अत्रे, प्रबोधनकार ठाकरे, प्रभातकार वालचंद कोठारी आणि

सेनापती बापट संयुक्त महाराष्ट्राचे "पंचक" होते. सीमा आंदोलनाचे तर भाई सेनापती होते. बेळगांव सत्याग्रहात त्यांना हिंडलगा जेलमध्ये सहा महिन्याची शिक्षा भोगावी लागली.

परंतु ६० साली संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाल्यावर भाईजींचा काँग्रेस पक्षावरील राग कमी झाला. कारण काँग्रेस पक्षाशीच त्यांची नाळ जोडली होती ना? त्यावेळी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री होतात की नाही अशी परिस्थिती निर्माण झाली होती. चव्हाणांनी भाईजींचे पाय धरले. तुम्हीच महाराष्ट्राचे नि काँग्रेसचे खरे ज्येष्ठ नेते आहात म्हणून. भाईजींनी त्यावेळचे समितीचे आमदार पी. बी. साळुंखे, आणि डी. एस्. खांडेकर यांना चव्हाणाकडे सुपूर्द केले नि चव्हाणसाहेब महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री झाले.

## सच्चा सत्यशोधक व निस्पृह नेता

देव, धर्म नि कर्मकांड यावर त्यांचा बिलकूल विश्वास नव्हता. घरातले देव त्यांनी नदीत टाकून दिले. १९७३ साली सत्यशोधक समाजाचा जन्मशताब्दी समारंभ साजरा झाला. भाईजी अध्यक्ष नि मंत्री बाळासाहेब देसाई व सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष ॲड. रामराव आदिक व्यासपीठावर होते. भाईजी कडाडले, "मंत्री बाळासाहेब देसाई आणि असे खूप सत्यशोधक प्रत्येक वर्षी जोतीबाच्या जत्रेला लवाजमा घेऊन येतात; आदिकांना सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष कोणी केले? ते शिर्डीला साईबाबापुढे नाक घासतात" इतकी निर्भयता, निस्पृहता, निर्भिडता सत्ताधाऱ्यांच्या तोंडावर दाखविणारा हा असामान्य नेता होता.

## कर्मकांड आणि बुवाबाजीवर प्रखर हल्ला

हिंदू धर्मातील कर्मकांडावर ते तुटून पडत. म. गांधी नि विनोबांना ते मानत. परंतु त्यांच्या प्रार्थनेला ते थोतांड म्हणत. समाजातील सत्पुरुष, बुवाबाजी, अंधश्रद्धा या विरुद्ध त्यांनी मोठे बंड केले. रस्त्यावर येऊन त्यांनी लढा दिला. महाद्वार रोडवर एका आरएसएसच्या माणसाने त्यांच्या डोक्यावर लाठीप्रहार केला. बुवाबाजीवर सिद्धार्थ नगरातील सभेत त्यांच्यावर शारीरिक हल्ला झाला. पद्माराजे दत्तक प्रकरणात त्यांनी आंदोलनाविरुद्ध भूमिका घेतली. संस्थान विलीन झाल्यावर कुठल्या गादीवर कुणाला बसवावे यात लोकांना कशाला रस पाहिजे? लोकशाहीच्या काळात असल्या चळवळीने लोकांचे काय

हित होणार आहे? अशी परखड भूमिका घेतल्यावर त्यांच्या घरावर दगडफेक झाली, शिव्यांच्या लाखोल्या वाहिल्या गेल्या आणि त्यांच्या प्रेतयात्रा निघाल्या. परंतु भाईजींनी कशालाही भीक घातली नाही.

## मी कसा जवळ गेलो?

"जनसारथी" साप्ताहिकाद्वारे मी ६५ सालापासून कोल्हापूर शहरात अन्याय, भ्रष्टाचाराविरुद्ध लढत होतो. नगरपालिकेत भयानक भ्रष्टाचार होता. जीवनावश्यक वस्तूंचे भाव कडाडले होते, काळा बाजार जोरात सुरू होता. हॉटेलातला चहासुद्धा सामान्य माणसांना परवडेना. या विरुद्ध बेफाट लेखन करून रान उठविले. पण यश हाती येईना. त्यासाठी शिवसेनेच्या धर्तीवर जनसेना स्थापन केली नि शहरात चौफेर धूमधडाका मी उडवून दिला होता. त्यावेळी भाईजींनी मला बोलावले नि दत्ता बाळ याच्या बुवाबाजीविरुद्ध तुम्ही माझा लेख छापाल काय म्हणून विचारले. कोणी स्थानिक दैनिके तयार नव्हती. मी छापला नि महाराष्ट्रात दत्ताबाळ - बागल प्रचंड वाद सुरू झाला.

तेथून पुढे भाईजींचे आणि माझे संबंध पितापुत्राचे झाले. रोज सकाळी रिक्षाने ते माझ्या घरी यायचे नि माझी गाडी घेऊन गावभर फिरून आपली कामं करून यायचे. आर्थिक अडचणी नि औषधपाणीही मला सांगायचे. शेवटी शेवटी तर त्यांचे घरात जमेना. सारखा त्रास सुरू झाला. शेवटी एकदा या भांडणाचा स्फोट झाला नि भाईजींनी आपले घर सोडले. त्याचे असे झाले, त्यांच्या नातीचे लग्न होते. लग्नपत्रिका छापून आल्या; नेहमीप्रमाणे चार चौघांसारख्याच त्या पत्रिका होत्या. त्यात प्रथम श्री गजानन प्रसन्न, अमका देव, अमकी देवी प्रसन्न असे संबोधन होते आणि खाली त्यांचे नाव होते. ते वाचून भाईजी उखडले, ही देवांची नावे तर लग्नपत्रिकेतून काढा नाही तर त्या खालचे माझे नाव तरी काढा. संघर्ष विकोपाला गेला नि भाईजी शिवाजी विद्यापीठाच्या गेस्ट हाऊसवर राहायला गेले. कुलगुरू कणबरकरांनी त्यांची गेस्ट हाऊसवर सर्व व्यवस्था कायमची केली.

## अकारण प्रेम का?

भाईजी म्हणायचे, " बाबूराव तुम्ही माझ्यावर एवढं प्रेम का करता? माझी एवढी सेवा का करता? मी तुमच्यासाठी काही केले नाही व आजही करू शकत नाही." मी म्हणायचो, "भाईजी तुमच्या पायात बेड्या घालून तुम्हाला कामाला नेताना आम्ही पाहिले. तुम्ही कोल्हापूरच्या लोकांसाठी खूप केले आहे,

आजही सामाजिक परिवर्तनाच्या क्षेत्रात प्रचंड कार्य करीत आहात, मग आम्ही आपल्याशी कृतज्ञ राहायला नको का?"

## डॉ. आंबेडकरांचा देशातला पहिला पुतळा

म. फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचाराने नि कार्याने भाई भारावून वेडे झाले होते. फुले आंबेडकरांपासून तरुणांना या शाहू नगरीत सतत स्फूर्ती मिळाली पाहिजे हा त्यांचा ध्यास होता. यासाठी त्यांनी बिंदु चौकात म. फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे ब्राँझचे पुतळे करून घेतले आणि दि. ९ डिसेंबर १९५० रोजी त्यांचे हजारो लोकांसमोर अनावरण केले. मी त्यावेळी हजर होतो. भाईजींचे स्फुर्तीदायक भाषण झाले आणि या समारंभाचे वैशिष्ट्य म्हणजे पुतळे अनावरणासाठी कोणाही बड्या पाहुण्यास आणण्यात आले नव्हते. भाईजी म्हणाले, "करवीर जनतेच्या हस्तेच हा अनावरणाचा कार्यक्रम होईल" बिंदु चौकाच्या डाव्या-उजव्या बाजूच्या लोकातून भाईजींनी दोन सामान्य माणसांना हाताला धरून नेले नि त्यांच्या हस्ते या पुतळ्यांचे अनावरण केले. खऱ्या अर्थाने जनतेच्या हस्ते होणारा असा हा समारंभ विरळा.

आज देशात सर्वाधिक पुतळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे आहेत. गिनीज बुकात तशी नोंद आहे. परंतु कोल्हापुरचा यात विक्रम आहे. भारतात डॉ. आंबेडकरांचा पहिला पुतळा त्यांच्या हयातीत शाहू महाराजांच्या नगरीत भाई बागलांनी ५७ वर्षापूर्वी बसवून मोठी क्रांती केली आहे.

## भाईजींचा पुतळा

मी १९३८ पासून भाईजींचे कोल्हापुरातील राजकीय नि सामाजिक कार्य पाहात आलो आहे. "स्वराज्य" "स्वातंत्र्य", "काँग्रेस" "जबाबदार राज्यपद्धती" हे शब्द करवीरकरांनी ६०-७० वर्षापूर्वी भाईजींच्या मुखातूनच ऐकले. जुलमी संस्थानिकांविरुद्ध जीवाची पर्वा न करता ते लढले. संस्थानी काळात ते फार मोठे धाडस होते. कुठे तरी मारून टाकले असते तरी काही झाले नसते. अशा माणसाची आठवण आम्हाला कायम राहिली पाहिजे. आम्ही त्यांचे सदैव कृतज्ञ राहिले पाहिजे ही माझी भावना होती म्हणून मी त्यांचा पुतळा त्यांच्या हयातीत कोल्हापुरात उभारायचे ठरविले नि एके दिवशी दुपारी शाहूपुरीतील त्यांच्या घरी जाऊन त्यांना हे सांगितले. दोन मिनिटे ते मुग्धच राहिले. गहिवरून आले. पुढे पी. बी. साळुंखे यांच्या अध्यक्षतेखाली समिती

नेमली. कै. नानासाहेब गद्रे कोषाध्यक्ष नि मी सेक्रेटरी झालो.

शिल्पकार बाळ चव्हाण यांनी भाईजींच्या पुतळ्याचे क्ले मॉडेल तयार केले. पुतळ्यास दहा हजार रुपये खर्च येत होता. ८० साली रक्कम मोठी होती. आम्ही निधी गोळा करण्यास सुरुवात केली. पाच हजार जमले. मग मी पी. बी. साळुंखे व नाना गद्रेंना घेऊन कै. मदनमोहन लोहिया यांच्याकडे गेलो. ते निश्चित पाच हजार रुपये देतील असे वाटत होते. परंतु प्रथम पी. बी. नि नाना याला नाखूषच होते पण गेलो. लोहियांनी आमचा घोर भ्रमनिरास केला. ते म्हणाले, "मी एक रुपयाही भाईजींच्या पुतळ्यासाठी देणार नाही." आम्ही गार झालो. लोहियांच्या नि भाईजींच्या संबंधाबद्दल कोल्हापुरात बरेच गैरसमज होते. पण या प्रकाराने आमचा समज मात्र स्पष्ट झाला. पुढे जिल्हा परिषद समाज कल्याण खात्याकडून मी पाच हजार रुपये मिळवून पुतळा करून घेतला.

२८ मे १९८२ रोजी यशवंतराव चव्हाण आणि वसंतदादा पाटील यांना बोलावून त्यांच्या हस्ते शाहू मिल चौकात मोठा समारंभ केला. "७८ साली दादांच्या पाठीत खंजीर खुपसल्याचा" राजकीय इतिहास गाजत होता. परंतु चव्हाणसाहेब ८१ साली आय काँग्रेसमध्ये आल्यावर त्या दोघांना कोल्हापुरात आम्ही या कार्यक्रमाने प्रथम एका व्यासपीठावर आम्ही आणले.

## शेवटीही देवाचे नाव नाही

८६ च्या सुमारास सुरुवातीपासूनच भाईजींची प्रकृती ढासळत चालली. फेब्रुवारीच्या शेवटच्या आठवड्यात त्यांना आम्ही दवाखान्यात ठेवले. त्यांची प्रकृती गंभीर झाली. महाराष्ट्र शासनास आम्ही कळविले. माजी मंत्री सुशीलकुमार शिंदे मुंबईहून डॉ. गोयल यांना घेऊन विमानाने आले. परंतु प्रकृतीत उतार पडला नाही. त्यांना असह्य वेदना होऊ लागल्या. मलाही ते पहावेना. भाईजी कण्हत, कुथत मला म्हणत, "बाबूराव मला असह्य होतयं. कुठं आहे तुझा ईश्वऱ्या ? असेल तर सोडव म्हणावं मला." असा हा असामान्य माणूस; प्राण सोडतानाही त्यांनी ईश्वराला मानले नाही. आणि मग तासाभराने त्यांची शुद्ध हरपली ती हरपलीच. दि. ६ मार्च १९८६ रोजी रात्री १२ वाजता त्यांचे देहावसान झाले. त्यांची अंत्ययात्राही मोठ्या सन्मान आणि इतमामाने शासनाने काढली. श्री. नंदकुमार त्यावेळी येथे जिल्हाधिकारी होते. माजी मंत्री सुशीलकुमार शिंदे विमानाने कोल्हापुरास आले व त्यांनी शासनाच्या वतीने त्यांना आदरांजली वाहिली. पोलिसांनी त्यांना बंदुकीच्या फैरी झाडून व शोकगीत वाजवून अखेरचा निरोप दिला. हजारो लोक प्रेतयात्रेत सहभागी झाले होते. कोल्हापूर बंद होते.

# आत्मचरित्रकार माधवराव बागल

माधवराव बागल यांची ग्रंथसंपदा विपुल आहे. जवळ जवळ ५० लहान मोठे ग्रंथ त्यांनी लिहिले आहेत. वाचण्याचा आणि लिहिण्याचा त्यांना जणू नादच होता. पण त्यांचे लिखाण "स्वान्त सुखाये" नव्हते. त्यांचे सर्व लिखाण हेतुप्रधान होते. त्यांना कांहीतरी सांगावयाचे होते. या अंतरीच्या उर्मीपोटी माधवरावांनी लिहिले. केवळ लिहावे म्हणून लिहिले नाही.

ही काही तरी सांगण्याची उर्मी विशेष करून त्यांच्या आत्मचरित्रपर लिखाणात प्रकर्षाने जाणवते. म्हणून या लिखाणाला माधवरावांचे मूल्यमापन करताना विशेष स्थान आहे. किंबहुना माधवरावांनी जे जे लिहिले ते ते प्राय: आत्मचरित्रपर होते. असे म्हणतात की शेक्सपियरच्या नाटकात जसे शेक्सपियर या व्यक्तीचे क्वचित दर्शन घडते तर मिल्टनच्या प्रत्येक ओळीतून मिल्टन डोकावतो. माधवराव बागलांचे लिखाण या दुसऱ्या प्रकारात मोडते. माधवरावांचे आत्मचरित्रपर लिखाण हे "ओव्हरफ्लो ऑफ पावरफुल फिलिंग्ज" आहे असे म्हटले तरी अतिशयोक्ति होऊ नये.

माधवरावांनी जवळजवळ दहा एक पुस्तके आत्मचरित्राच्या स्वरुपात लिहिली आहेत. 'जीवन प्रवाह' चे पहिले दोन भाग एकत्र प्रसिद्ध झाले (१९५४). भाग तीन याच नांवाने प्रसिद्ध झाला (१९५७). चौथा भाग 'सत्याग्रहातून सहकार्याकडे' व ५ वा भाग 'संघर्ष व सन्मान' (१९७३) या नावाने प्रसिद्ध झाला. या ५ भागाशिवाय आठवणीच्या स्वरुपात 'बंधनात' (१९३८) 'जीवन संग्राम' अगर 'सिंहावलोकन' (१९७०) ही दोन पुस्तके माधवरावांनी लिहिली आहेत. 'माझ्या जीवनाच्या प्रेरणा' हे व. ह. पिटके यांच्या

'पडसाद' (१९६५) या माधवरावांच्या कार्यकर्तृत्वाचे वृत्तपत्रांनी, पुढाऱ्यांनी, सहकाऱ्यांनी केलेल्या मूल्यमापनात्मक लेखांचे संकलन असलेल्या पुस्तकाला 'उपसंहार' म्हणून माधवरावांनी मुद्दाम लिहिले. हे छोटेखानी पुस्तकही आत्मचरित्रपर आहे.

हे सर्व आत्मचरित्रपर व आत्मचरित्रसदृश्य लिखाण १९३८ पासून १९७० पर्यंतच्या प्रदीर्घ काळात झालेले असल्याने त्यात द्विरूक्ती व कांही ठिकाणी विसंगती आढळते. विशेषत: १९६५ नतंरच्या लिखाणात हे दोष अपरिहार्य ठरतात. कारण माधवराव दैनंदिनी ठेवीत असे दिसत नाही. तसा कुठेही उल्लेख सापडत नाही. साहजिकच माधवराव त्यांच्या स्मरणशक्तीवर अवलंबून राहिलेले दिसतात आणि स्मरणशक्ती विशेषत: उतारवयात, केव्हा केव्हा दगा देते असा अनुभव आहे. म्हणून ही द्विरुक्ती व विसंगती. काही घटनांचा क्रमही पुढेमागे झालेला दिसतो.

केवळ पृष्ठसंख्याच विचारात घेतली तर हे आत्मचरित्रपर लिखाण भाईजींच्या एकूण साहित्यसंपदेच्या १/३ इतके मोठे आहे. पण पृष्ठ संख्येपेक्षा गुणात्मकदृष्ट्या हे लिखाण अधिक मोलाच आहे. या आत्मचरित्रपर लिखाणातूनच खरे व संपूर्ण भाईजी त्यांच्या गुणदोषासहित प्रतिबिंबित होतात. त्या दृष्टिने या ८-१० पुस्तकांना एक वेगळे स्थान आहे. माधवरावांचे जीवन सुरुवातीची तीस वर्ष सोडली तर खाजगी कमी व सार्वजनिक अधिक होते. या लिखाणाचा तोंडवळा जरी आत्मचरित्राचा असला तरी तो त्या काळाच्या राजकारणाचा व समाजकारणाचा इतिहास आहे. बहुजन समाजाच्या आत्मधीराच्या चळवळीचा इतिहास आहे. प्रबोधनकार ठाकरेंच्या शब्दांत, १९२५ ते १९५० पर्यंतचा कोल्हापूर संस्थानाचा जीवंत वाणीने सांगितलेला हा जीवंत इतिहास आहे. 'सत्य घटनांचे सत्यकथन' यात आहे. प्रजापरिषदेच्या लढ्याचा हा इतिहास, या लढ्यात स्वत:ला सर्वार्थाने झोकून देऊन स्वातंत्र्यासाठी सर्वस्वाची राखरांगोळी करुन घेतलेल्या एका लढवय्या सेनानीच्या लेखणीतून उतरलेला हा इतिहास आहे. हे ''कल्पित कथांचे'' भारुड नाही हे सत्यकथन आहे. जिंकलेल्या व हरलेल्या सर्व लढायांचा हा प्रामाणिपणे सांगितलेला इतिहास आहे. इतका मनमोकळेपणा क्वचितच इतरत्र आढळतो.

कांही वेळा माधवराव आत्मसमर्थन करीत आहेत असे वाटते पण ते आत्मसमर्थन नसून माधवराव आपली भूमिका स्पष्ट करीत आहेत. अनेकवेळा या आत्मचरित्रात माधवरावांनी आत्मपरिक्षण केलेले आहे. जीवन प्रवाहाच्या तिसऱ्या भागात सुरुवातीला माधवराव म्हणतात, 'प्रामाणिक आत्मपरिक्षणाखेरीज आत्मचरित्र व्यर्थ आहे.'

या लिखाणात माधवरावांनी बालपणापासून त्यांना आलेले अनुभव, निरनिराळ्या रोचक घटनांच्या स्मृती, त्यांचे व्यक्तिमत्व घडविणाऱ्या व्यक्ती व शक्ती यांचा मागोवा या लिखाणात घेतलेला आहे. म्हणून हे आत्मकथन इतरांनी लिहिलेल्या चरित्रापेक्षा अधिक विश्वासाई वाटते. माधवरावांचे संपूर्ण चिकित्सक चरित्र अजूनपर्यंत लिहिले गेले नाही. तो पर्यंत माधवराव बागल समजून घेण्यासाठी या आत्मचरित्रपर लिखाणावरच अवलंबून राहावे लागेल. भाईजी सार्वजनिक जीवनाकडे कसे आकर्षित झाले, सुरुवातीचे सुखवस्तू जीवन टाकून देवून हे सतीचे वाण भाईजींनी का व कसे स्विकारले, निसर्गाच्या सान्निध्यात राहून निसर्गाची विविध रुपे कुंचल्याने चितारणारा हा अभिजात कलावंत कुंचला टाकून लेखाणी हाती घेतो, संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत व सीमा लढ्यात अग्रेसर राहाणारा हा सेनानी काँग्रेसकडे विशेषत: यशवंतराव चव्हाणांच्याकडे कसा आकर्षित होतो, बहुजन समाजाच्या पायातील बेड्या तोडण्यासाठी स्वत:च्या पायात मणा मणाच्या बेड्या का अडकवून घेतो व प्रदीर्घ लढ्यानतंर मिळालेली सत्ता स्वत: न उपभोगता उपभोगशून्य स्वामीचे आयुष्याच्या उतारवयात कसे एकाकीपणाचे जीवन जगतो हे या आत्मचरित्रातून कळते. वि. स. खांडेकर म्हणतात, 'आपल्या सार्वजनिक जीवनाची शोकांतिका अशी की, 'उग्र तपश्यचर्या करून जे लोकांना वर मिळवून देतात ते स्वत: दारिद्र्याच्या शापाने व्याकूळ होऊन जातात. 'पण दारिद्र्यापेक्षा एकाकीपणाने हा भिष्माचार्य अधिक होरपळून निघाला. एकदा दादासाहेब हळदकरांना भाईजी म्हणाले, "मी सत्तेचा भूकेला नाही, संपत्तीचा भूकेला नाही, मी प्रेमाचा भुकेला आहे. त्याचाही त्याग केला पाहिजे पण अद्याप त्या थराला पोहोचलो नाही." माधवरावांची ध्येय निष्ठा, निर्भयता व नि:स्वार्थता आजच्या पुढाऱ्यांत क्वचितच दिसून येते.

'सर्व ग्रंथात 'जीवन प्रवाह' हे आत्मवृत्त उत्कृष्ठ आहे. प्रभावी, पराक्रमी नि प्रतिभाशाली पुरुषांच्या जीवनाचा तो रसरसीत इतिहास सत्याने, सुविचारानी फुललेला तो ग्रंथ आहे,"

-धनंजय कीर

# जीवन प्रवाह भाग - १

## १) हे आत्मचरित्र का लिहिले ?

हे पुस्तक हाती धरल्यानंतर साहजिकच कोणीतरी एखादा प्रश्न विचारील, हे आत्मचरित्र का लिहिले ? याला मी एवढंच उत्तर देईन, मला लिहावंस वाटलं म्हणून मी लिहिलं. मला त्यात आनंद वाटू लागला, लिहिताना मी आनंद भोगू शकलो, म्हणून मी लिहिलं आणि म्हणूनच मी लिहू शकलो. धंदेवाईक साहित्यिक पोटासाठी लिहितो. मी पोटासाठी लिहीत नाही. मला कोणी सक्ती केली नाही.

कवी, साहित्यिक किंवा चित्रकार हे आपआपल्या कृती का निर्माण करतात ? त्यांना तशी ओढ लागते म्हणून.

त्यात काही उदात्त हेतू असतो का ?

'असला तर तो कलावंत श्रेष्ठ ठरतो. पण हेतू हा असतोच.

माझा हेतू निव्वळ आनंद भोगावा हा नव्हता. त्या आनंदात माझ्या हातून काही जनसेवा घडावी हा होताच होता.

आत्मचरित्र लिहिण्याने जनसेवा कशी घडते ?

अनुभवातून जग शहाणं होत चाललं आहे. मग माझे अनुभव तरी फुकट का जातील ? प्रत्येकाचे अनुभव काही निराळे असतातच. ते मनोरंजक असतात तसे उद्बोधकही असू शकतात. माझ्या जीवनात तसे आढळले. त्याचे साथीदार मी इतराना का करू नये ? सुखाला तसे दु:खाला वाटेकरी मिळाल्याने सुख दुणावते, दु:ख कमी होते, असा प्रत्येकाचा अनुभव नाही काय ?

यात प्रसिद्धीचा हेतू नाही का?

असेल आणि आहे ही. पुस्तक प्रसिद्ध करणारा प्रसिद्धीसाठीच लिहितो. मग प्रसिद्धीचा हेतू नाही असं म्हणता तरी कसे येईल. सत्ता आणि संपत्तीच्या वेडाहून हे वेड पुष्कळ बरं. "ज्ञानप्रकाश"कार कै. पूज्य काकासाहेब लिमये यांनी ते ओळखून त्या वेडाला चालना दिली. पण त्यामुळे माझ्या हातून वाईट गोष्टी घडण्यापेक्षा चांगल्याच पुष्कळ घडल्या. त्यातून प्रचाराचे वेड लागले. आणि कोल्हापूर जागं केले. महाराष्ट्रातही पुष्कळ जागृती करू शकलो. पण आत्मचरित्र लिहिण्याच्या या काली ते वेड कमी झालं आहे. अन् मारलंही आहे.

पण हे तुम्ही प्रामाणिकपणे लिहिलं आहे काय? आणि सर्व सत्य गोष्टी लिहिल्या आहेत का?

हो. मी प्रामाणिकपणे लिहिलं आहे आणि सत्य तेच लिहिलं आहे. असत्य लिहिल्याची बोचणी माझ्या मनाला होईल असं मी काही लिहिलं नाही. मला प्रामाणिकपणे वाटतं तेच लिहिलं आहे.

सत्य जे घडलं तेच लिहिलं आहे? पण किती?

जरूर तेवढं; सकाळपासून संध्याकाळपर्यंत अनेक गोष्टी घडत असतात त्या काही मी लिहित बसलो नाही. सांगाव्याशा वाटल्या त्याच लिहिल्या. त्या सत्य लिहिल्या. प्रामाणिकपणे लिहिल्या. पण माझ्या दृष्टिकोनातून लिहिल्या. त्यामुळे माझे निष्कर्ष बरोबर असतीलच असे मी कसे म्हणू? आत्मसमर्थनाची वृत्ती डोकावणे अगदी अशक्य असे म्हणता येणार नाही. तथापि आत्मपरीक्षण आणि आत्मटीका टाळण्याचाही मी प्रयत्न केलेला नाही.

मी निर्भेळ सत्यच सांगतो हा टेंभा मिरवण्याकरता मिस् मेयोप्रमाणे जीवनांतील सारी गटारे उपसूनही उगाच वाचकांपुढे मांडली नाहीत. पण मनाचं व देहाचं अध:पतन का झालं, कसं झाले हे दाखवताना ती दडवली नाहीत.

सारा अहंभाव मारून हे लिहिलं काय?

नि:पक्षपाती दृष्टी ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. पण अहंभाव सर्वस्वी मेलाच असेल असं नाही. तो मेला आहे असं म्हणण्यातही तो जिवंत राहतोच.

पण मार्क्सवादाचं थोडंस वाचन झाल्यानंतर आणि पक्ष टाळल्यानंतर तो फार कमी झाला आहे. व त्रयस्थाची भूमिका घेणं पूर्वीहून फार सोपं झालं आहे.

आत्मचरित्र लिहिताना साहजिकच आत्मपरीक्षण करता आलं.

ज्यांच्यामुळे माझ्यावर आघात आले, मी संकटात पडलो त्यांच्या परिस्थितीचा मी विचार टाळला नाही. माझ्यावर झालेले आघात जाणून बुजून सद्बुद्धीने त्यांनी केले नसतील पण माझ्यावर होणाऱ्या अनिष्ट परिणामाचा त्यांनी आपल्या स्वार्थापुढे विचार केला नाही यांत मला शंका वाटत नाही. काहींच्या हालचाली तर पूर्वयोजित होत्या असा अनुभव आला तो मी लिहिला आहे.

माझ्या या आत्मचरित्राला वि. स. खांडेकर यांनी 'जीवन प्रवाह' हे नाव सुचवले. ते अगदी समर्पक वाटले. या जीवन प्रवाहात मी प्रवाहपतिताप्रमाणे वागलो नाही. आलेले अडथळे बाजूस सारण्याचा व केंव्हा ओलांडण्याचा व बगल देण्याचा मी प्रयत्न केलाच आहे. हार, माघार आणि यश या तिन्ही अवस्थांतून गेलो आहे.

सरंजामदारी थाटाच्या अंमलदारी जिण्यांतून कलेकडे का झुकलो, ते कमी करून समाजसेवेकडे का लागलो, त्यातून साहित्याकडे का वळलो, आणि राजकारणांत कसा पडलो, मला मित्र कोण कोण लाभले, कोण टिकले, कोण गळले, आणि कोण शत्रू झाले, या परंपरेची कारण साखळी जोडताना मार्क्सवादाचा मला पुष्कळ उपयोग झाला आहे. राजेशाहीच्या वातावरणातून निसटून मी राजेशाहीचा विरोधक कसा झालो, काँग्रेसमधून निघून शेतकरी कामगार पक्षात का गेलो आणि त्यानंतर कम्युनिस्ट विचारसरणीचा राहून पक्षातीत का झालो हा इतिहास कार्यकर्त्यांना विचार करायला लावल्याशिवाय राहणार नाही. आत्मचरित्रानं एवढे काम केले तरी पुरे आहे.

माझ्या या आत्मचरित्राचा कोल्हापूरचा इतिहास लिहिणाऱ्यांना पुष्कळ उपयोगी होईल. पण या लिखाणात इतिहासाचे स्वरूप नाही, म्हणून स्वामी, वारके, इंगळे सारख्या हुतात्म्यांचा उल्लेख यात आला नाही. तसा अनेकांचा आला नाही. केवळ माझ्याशी ज्यांचा विशेष संबंध आला व जे माझ्या

जीवनावर चांगला वाईट परिणाम करू शकले त्यांचाच उल्लेख आला आहे. याचमुळे जगाला सामान्य वाटणारी माणसं मला महत्त्वाची वाटली व प्रसिद्धी पावलेली काही, मानवतेच्या कसोटीला लावताच सामान्याहून खालची वाटली.

आठवणी मी आत्ताच लिहिल्या असे नाही. मला ही बऱ्याच वर्षापासूनची सवय आहे. महाराष्ट्राला ओळख होण्यापूर्वीची आहे. पूर्वी लिहिलेल्या त्या आठवणींपैकी काही आचार्य अत्रे यांनी आपल्या नवयुग साप्ताहिकांत छापल्या होत्या. प्रो. य. गो. नाईक यांच्या कृपेने टिकेकर यांनी चालवलेल्या "महाराष्ट्र शारदा' या मासिकातून काही आल्या होत्या. वडिलांनी चालवलेल्या "हंटर" साप्ताहिकातून व मी चालवलेल्या "अखंड भारत" साप्ताहिकातून काही आल्या होत्या. पण त्या आल्या तशाच या आत्मचरित्रात घेतलेल्या नाहीत. त्या सर्व आत्तापर्यंतच्या आलेल्या अनुभवाला धरून पुन: लिहून काढल्या. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व वि. स. खांडेकर यांनीही तशा लिहून काढण्याबद्दल सुचवले, म्हणून त्या आजच्या स्वरूपात बाहेर पडत आहेत.

आर्थिक दृष्ट्या खर्चाची ही जबाबदारी अंगावर घेण्याला सर्वस्वी असमर्थ असताना मी हे धाडस करीत आहे. खरोखरी हे धाडस आहे. जाणून बुजून मी हे आर्थिक संकट ओढवून घेतले आहे. पण या संकटातून मी बचावून निघेन असा मला विश्वास वाटतो. म्हणूनच मी हे अंगावर घेऊ शकलो. आतापर्यंत अनेक संकटातून मी पार पडलो आहे. यातूनही पार पडेन.

पुस्तकास मुंबईच्या दरात कागद आणून देण्याचं काम "पुढारी"कार गणपतराव जाधव यांनी केले. श्री सिध्देश्वर छापखान्याचे मालक बाळकृष्ण नारायण ठकार यांनी माफक दर दिला. ब्लॉक मेकर डी. डी. बराले यांनी ब्लॉक, मीच ठरवलेल्या दरात दिला व कव्हरचा फोटो बी. पी. पाटील यांनी त्यांचे पेन ॲन्ड इंक आर्टिस्ट म. ना. जाधव (किर्लोस्करवाडी) यांनी मोफतच दिले. आतील बऱ्याच ब्लॉकचे फोटो नामवंत फोटो आर्टिस्ट शुक्ल यांनी मित्र नात्याने काढलेल्या फोटोचे घालता आले.

ज्या आत्मचरित्राला तर्कतीर्थांनी आत्मियतेने प्रस्तावना, खांडेकरांनी परीक्षणाचे "दोन शब्द" व तीर्थरूप केशवरावजी ठाकरे यांनी समालोचन केले त्यांचे मी कोणत्या शब्दाने आभार मानू ?

## २) जन्म व बालपण

*माधवरावांनी आपला जन्म कोठे झाला हे मात्र कोठेच नमुद केले नाही. तो कोल्हापूरात मामा श्री. सावंत यांचे घरी झाला असे मानण्यास पुष्कळ पुरावा सापडतो.*

माझा जन्म १८९६ साली झाला असला तरी त्या दिवसाची आठवण मला कशी असेल ? ती जाणीव उत्पन्न व्हायलाही काही काल जावाच लागतो. पण आईबाप म्हणतात माझा जन्म १८९६ साली मे महिन्यात झाला. तो श्रावण सोमवार म्हणून तुझं नाव माधव ठेवलं. वडील त्यावेळी वकिली करीत होते. त्याच दिवशी त्यांचे खुनाचे काही आरोपी सुटले म्हणून यशवंत असंही एक नाव चिकटलं. आणि पहिला आणि लाडका म्हणून, बाबू, बाबू आणि पुढं बाबुराव म्हणत. पण या काही माझ्या आठवणी नव्हेत. या माझ्याबद्दल दुसऱ्यांनी सांगितलेल्या गोष्टी.

मी वकिलाचा मुलगा होतो याची मला आठवण नाही. मी अंमलदाराचा मुलगा होतो ही मात्र चांगली आठवण आहे. कारण यावेळी पांगुळवणा आणि पांगुळगाडा सुटून माझ्या हाती पाटी दप्तर आले होते. श्रीगणेशा काढता काढता आणि बे दुणे चार हे लक्षात ठेवता ठेवता इतर गोष्टीही आपोआप ध्यानात रहात. मास्तरांच्या छप्पीने त्या डोक्यात जबरीने कोंबल्या नसल्यामुळे सहजी ध्यानात रहात.

मास्तरांची छप्पी म्हटलं खरं, पण तिचा प्रत्यक्ष अनुभव मला फारसा मिळाला नाही. अनुभव दुसऱ्याला मिळालेला पाहण्याचाच. शाळेतल्या इतर मुलात काही माझी गणना होत नसे. तालुक्यातल्या मोठ्यातल्या मोठ्या अधिकाऱ्याचा मुलगा मी.

शाळेला निघालो तर, मी काही दप्तर घेत नसे. सरकारी पट्टेवाला दप्तर घेऊन माझ्यापुढे असे. तो किंवा दुसरे नोकर मला माझ्या नावाने हाक मारीत नसत. "बाबा" किंवा "साहेब" म्हणून बोलावत. अभ्यासात पहिला नंबर नसला तरी वर्गात माझी जागा पहिली असे. इतर पोरे बाकावर बसली तर माझ्या जागेवर मऊ बसकुर असे. मास्तर इतरांना अरे तुरे म्हणत, पण मला अहो जाओ म्हणत. मार तर क्वचितच मिळे. मास्तरही मला वचकून असत.

कारण त्या मास्तरांना खासगी शिकवणीसाठी वडिलांच्याकडून काही

पगार मिळत असे. शाळेत माझा पहिला नंबर रहावा म्हणून शाळेत घातली जाणारी काही उदाहरणे तो अगोदरच करवून घेई. त्यामुळे माझी पाटी सर्वांअगोदर पडायची. घरीच उदाहरण सोडवले असल्यामुळे ते शाळेत बरोबर यायचे. या माझ्या हुशारीमुळे पोरे मात्र आश्चर्यचकित होऊन जात. पण आमच्या हुशारीचं कारण त्यांना कुठं माहीत होतं.

मास्तर शिकवायला घरी येत. पण त्यांना आमचीच मर्जी सांभाळावी लागे. पाठे माझ्या आठवणीत रहावे म्हणून त्यांनाच घोकत बसावे लागे. माझ्यावर मास्तराची हुकूमत आहे असे मला क्वचितच वाटे.

**माझी आजारी आई -** घरी आलो तरी माझ्यावर जरब बसवणारं असं कोणी नव्हतं. आई नेहमी आजारी असायची. आईचं नाव कमळाबाई. अंथरुणाला सतत खिळलेली. पण तिला स्वत:च्या चिंतेपेक्षा माझीच चिंता अधिक. नेहमी म्हणायची, "माझ्यामागं तुमचं काय होणार रे?" आम्ही चौघे भाऊ. मी सर्वात वडील. वडिलांनी दुसरं लग्न केल्यावर सावत्र आई आम्हाला छळेल या कल्पनेनं ती नेहमी अस्वस्थ होत असे. तिनं रागावल्याचं किंवा मला मारल्याचं मला काही आठवत नाही. आमच्या अंगावर हात टाकायला तिचा हात तरी कुठं उचलत होता. ती आम्हाला जवळ बोलावून प्रेमानं कुरवाळल्याची मात्र अद्याप आठवण आहे. "बाबू मोठा हो. चांगलं शिक बरं बाळ. त्यांचं नाव राख" हे शब्द अद्यापही आठवतात. यामुळे आयुष्याला काही वेगळं वळण लागलं असेल असे काही म्हणता येणार नाही. पण ते शब्द मात्र हृदयात कोरले गेले. तीच तिची आठवण.

या परिस्थितीमुळे आईचा धाक असा काही माझ्यावर नव्हता. तिच्या कुरवाळण्याने व प्रेमळ शब्दाने मला नेहमी गहिवरून येई.

**माझे वडील :** वडिलांचा प्रत्यक्ष संबंध फारसा येत नसे. ते ऑफिसात जात. ते मामलेदार होते. मला मारहाण करण्याला त्यांना फारशी फुरसतच मिळत नसे. नव्या संस्कृतीचा परिणाम असेल कदाचित. कारण ते एल. एल. बी. होते, किंवा माझ्यावरच्या प्रेमामुळे असेल, मीच पहिला असल्यामुळे त्यांचा लाडका होतो. त्यामुळे त्यांचीही माझ्यावर तशी करडी नजर नव्हती. आई आणि आबा हीच घरातली वडील माणसे. आई आजारी, बाप आपल्या कामात, त्यामुळे मला बरंच स्वातंत्र्य भोगता येत होते. अंमलदाराच्या मुलाला खूश करण्याचाच नोकर प्रयत्न

करणार. यामुळे माझ्यावर दुसऱ्याची जरब असण्याऐवजी माझीच हुकूमत घरी चालत असे. घरी त्यावेळी सातआठ पट्टेवाले असत. मी वडिलांना त्यांच्याबद्दल चांगलं बोलावं म्हणून ते मलाच खूश करण्याचा प्रयत्न करणार. कामासाठी आलेले खेडचे लोक मी मामलेदारसाहेबांचा मुलगा म्हणून मला नमस्कार करणार. नोकरांचा मुजरा, बाहेरच्यांचा मुजरा, यामुळे लहानपणीही मी मोठा आहे, अशा प्रकारची भावना माझ्यात निर्माण होऊ लागली होती. एखाद्या परक्या माणसाने मला मुजरा किंवा नमस्कार केला नाही की मला माझा अपमान झाल्यासारखे वाटे. यामुळे माझ्या अंगी नम्रता व आज्ञाधारकपणा येऊ शकला नाही. न कळत एक प्रकारचा मोठेपणाचा ताठा आणि हुकूमशाही वृत्तीच अंगी आली. नम्रता व लाघवीपणा आला नाही. सवंगड्यांच्या बरोबर वागताना सुद्धा बरोबरच्या नात्याने वागत नसे. खेळातही माझीच हुकूमत गाजवी.

## ३) शाहू महाराजांची पहिली भेट

**शाहू महाराजांच्या पाया पडलो नाही** - मी यावेळी असेन ९/१० वर्षांचा; वडील शिरोळ पेठ्याचे मामलेदार होते. त्यावेळी शाहू महाराज मोळ्यात डुकराच्या शिकारीला आले होते. त्यांचा कॅम्प पडला होता. मामलेदारांना महाराजांची व कॅम्पची व्यवस्था ठेवावी लागे. महाराजांच्या भेटीला जाताना वडिलांनी मला बरोबर घेतले. पण तिथं मला निराळा अनुभव आला. माझी कल्पना, माझ्या वडिलांहून कुणी मोठं असू शकेल अशी कधीच नव्हती. कारण जो तो त्यांना नमस्कार करी. मुजरा करी. काही लोक तर त्यांच्या पायावर डोकं ठेवीत. पण ज्यावेळी वडिलांनीच शाहू महाराजांच्या पायाला हात लावून नमस्कार केला, त्यावेळी मात्र मी अगदी आश्चर्यचकित झालो. मला वडिलांचाही राग आला. त्यांनी असे दुसऱ्यांच्या पाया का पडावे ? मला वडिलांचाच नव्हे तर त्या दुसऱ्या व्यक्तीचाही राग आला. इतक्या लोकांसमक्ष वडिलांनी पत्करलेला हा कमीपणा मला सहन झाला नाही. मीही तसेच पाया पडावे म्हणून मला वडिलांनी खुणावले, पण मी काही महाराजांच्या पाया पडलो नाही. महाराज ही काय चीज आहे याची त्यावेळेपर्यंत मला काहीच कल्पना नव्हती. राजा म्हणजे काय, त्याची सत्ता म्हणजे काय, याविषयी मी पूर्ण अज्ञानी होतो.

तथापि नमस्कार केला नाही म्हणून महाराज काही रागावल्याचे दिसले नाही. "हा तुमचा मुलगा काय हो?" म्हणून त्यांनी वडिलांना विचारलं. ते समजल्यानंतर त्यांनी मला कडीवर घेऊन विचारलं, "काय रे तुला घोडं पाहिजे काय? घोड्यावर बसायला शिकणार तू?" " हो शिकणार" म्हणून मी उत्तर दिलं. आणि खरोखरीच महाराज परत गेल्यानंतर आमच्यासाठी त्यांनी एक मोठा अरबी घोडा पाठवून दिला.

**महाराजांनी घोडा दिला** - मी एवढासा. घोडा एवढा मोठा. पण तो माझ्यासाठीच पाठवून दिला ही माझी समजूत. त्यामुळे हा माझा घोडा, मला महाराजांनी दिला म्हणून मी सगळ्यांना सांगत सुटलो. वडीलही आमच्या चिरंजिवांचा घोडा म्हणून लोकांना सांगत, त्यामुळे मीही शेफारून गेलो. याचमुळं मला भीती टाकून त्या घोड्यावर बसणं भाग पडलं. त्यासाठी वडिलांनी आमच्या तैनातीस दोन माणसे दिली होती. एकाने मला घोड्यावर बसल्यावर तोल जाऊ नये म्हणून धरायचे, दुसऱ्याने घोड्याला आवरण्याकरिता दोरीने धरायचे. थोडी भीती गेल्यानंतर, घोड्याने माणसाच्या चालीबरोबर हळू गेलेले मला आवडेना म्हणून त्यांना पळायला लावी. व पळाले नाहीत म्हणजे घोड्याचा चाबूक त्यांच्या अंगावर पडे. घोड्याला चाबूक मारला तर दुगाण्या मारण्याची भीती. शिपायाला मारल्याने ती आपत्ती येणारी नव्हती. या घोड्याच्या रोजच्या रपेटीचाही स्वभावावर परिणाम झाला. गावातून आमची स्वारी निघाली की लोक बड्या अंमलदाराचा मुलगा म्हणून वाकून नमस्कार करीत. त्यामुळे आमची उंची आणखी वाढली. चाबूक घोड्यालाही मारता येतो तसा माणसालाही मारता येतो. आणि माणसे तर मुकाट्याने मार खातात. मी घोड्यावर बसत असलो तरी, घोड्यावर बसता येत होतं असा त्याचा अर्थ नव्हे. माणूस बरोबर नसला आणि त्याने धरले नाही की, आमची ऐट संपली.

**घोडे बुजले, आम्ही पटाईत ठरलो :-** आम्ही फिरतीवर होतो. शिरोळ पेठ्यातील उदगांवच्या धर्मशाळेत आमचा मुक्काम पडला होता. सकाळची वेळ. शेत पाहणीस वडील निघाले होते. घोड्यावर जुन्या पद्धतीचे रेशमी खोगीर घालून घोडे तयार ठेवले होते. दरम्यानच्या कालात आम्हाला शिपायाने खोगीरावर बसवले होते. शिपायाने दोरी धरली होती. वडील घोड्यावर बसणार इतक्यात

कारकुनाने सहीसाठी कागद आणला.

बहुदा कारकुनाचे हिताहित कामात गुंतलेले असले म्हणजे धांदलीच्या वेळी काम पुढे करून सही घेणे हे कारकुनी धंद्याचे एक विशेष असते.

कामावर सही करण्याकरता वडिलांनी "अरे दऊत आण" म्हणताच प्रसंगावधान न राहून माझ्या घोड्याची दोरी धरून ठेवलेल्या नोकराने झटकन दोरी टाकून दिली आणि दऊत टाक आणण्यासाठी तो आत धावत गेला. दोरी सुटलेली पाहताच आमच्या वारूने एकदम रस्ता धरला आणि हा हा म्हणता मुख्य ठाण्याची वाट धरली. शाहू महाराजांनी दिलेला मोठा अरबी घोडा. त्याच घोड्यावर आत्ता आमची शंभर वर्षे भरणार. तथापि जिवाच्या आशेने आम्ही खोगीर अगदी घट्ट पकडून ठेवले होते. लगाम अजिबात सोडून दिले होते. वाटेतल्या लोकांनी घोड्याला आवरून धरावे म्हणून मी ओरडत होतो. पण वाऱ्याप्रमाणे सुटलेल्या घोड्यासमोर उभे कोण राहणार ? उगाच हात पुढे करीत व घोडा जवळ येताच मागे घेत. मागाहून काही घोडी मला धरण्यासाठी सोडली होती. पण त्याचा काही उपयोग नाही. घोडं मिनीट दीड मिनिटाला मैल या वेगाने चालले होते. इतक्यात मधल्या एका वाटेने एक मोटर येऊन पुढे चालू लागली. तिलाही घोड्याने मागे टाकले. पोर मेलं मेलं म्हणून ते ओरडले. मी चिकटून बसलोच होतो. अखेर घोड्याने ठाणे गाठले आणि स्वारी तबेल्यात येऊन उभी राहिली. मागची मोटरही थोडक्याच वेळात येऊन दाखल झाली. गाडीत श्रीमंत बापूसाहेब महाराज होते. त्यांनी मला बोलवून पाठीवर थाप मारली व म्हणाले अरे वा! काय छान बसतोस तू."

आपले पोर जगले आणि श्रीमतांनी त्याचे कौतुक केले हे समजताच वडिलांना फार आनंद झाला व मोठ्या प्रेमाने त्यांनी मला जवळ घेतले, धैर्य नसताना धैर्याचे सर्टिफिकेट मिळाले.

या प्रसंगामुळे माझी भीती मात्र गेली आणि मी पुढे शिपायाच्या मदतीशिवाय घोडं फिरवायला नेऊ लागलो. माझ्यात आत्मविश्वास उत्पन्न झाला.

**घोड्यावर प्रेम बसले** - माझेही घोड्यावर प्रेम बसले व त्याला चांगले खायला मिळावे म्हणून मी मुद्दाम त्याला शेतातून नेई. त्यामुळे ताजी जोंधळ्याची व मक्याची कणसे, हरबऱ्याचे डहाळे त्याला खायला मिळत. शेतातून गेल्यामुळे

खाण्यापेक्षा मातेरेच अधिक होई. पण अंमलदाराचा मुलगा म्हणून मला कोणी काहीच बोलत नसत. उलट "आणखी चार कणसे नेता काय साहेब ?" म्हणून पाठी लागत. नासधुसीचे तर मला काहीच वाटत नसे.

इतरांच्या दु:खाचा विचार करण्याची मला दृष्टीच नव्हती. तथापि मी घोड्यावर मात्र प्रेम करू लागलो. त्याला रोट्या व मलिदा घालीत असे. ऊस, हरभरा घरी आलो म्हणजे चारल्याशिवाय मी खात नसे. त्याचेही पण माझ्यावर प्रेम होते. मला पाहिलं की कान टवकारून फुरफुरू लागे. एकदा तो ठेचाळल्यामुळे मी पडलो, तर तो मला टाकून काही गेला नाही. मी उठून वर चढेपर्यंत तो शांत होता.

घोड्याची भीती गेल्यामुळे दुसरे घोडे आले तरीही मी बसण्यास भीत नसे. गांवातून घोडे हळू चालवावे पण लोकांना त्याचे महत्त्व कसे वाटणार म्हणून गांवातूनही भरधाव सोडायचा. ते घोडेच चांगले म्हणून बसण्याची खरी कसोटीच लागली नाही.

## ४) कलेकडे ओढा व शाहू महाराजांचा प्रसाद

*शाहू महाराजांचा माधवरावांच्या व्यक्तिमत्वावर मोठा परिणाम झाला होता. शाहू महाराज हे भाईजींचे एक प्रेरणास्थान होते.*

मॅट्रीकपर्यंत आलो. पण वकील किंवा डॉक्टर होण्याची महत्त्वाकांक्षा मुळीच उत्पन्न झाली नव्हती. मी रद्दड विद्यार्थ्यांपैकी नव्हतो. पण अभ्यासापैकी एखादाही विषय माझ्या आवडीचा असा नव्हता. गणित चांगलं नव्हतं. व्याकरण चांगलं नव्हतं. अमक्या एका विषयात नांव मिळवावं असा विषय शाळेच्या अभ्यासात तरी मला सापडला नाही. ड्रॉईंगमध्ये मात्र मी चांगला होतो. काही बक्षिसे मिळविली होती. थर्ड ग्रेडची परीक्षा झाली होती. या विषयाचा कंटाळा नव्हता. निसर्गाचा तर मी वेडाच होतो. ते रंगवता यावेत ही तळमळ दांडगी होती. हाच कोर्स घ्यावा असं मनापासून वाटे. वडिलांना मी हे बोलून दाखवले. त्यांची इच्छा मी वकील व्हावे, आपला धंदा पुढे चालवावा अशी फार होती. पण माझ्या स्वभावाला ते जमण्यासारखे नव्हते.

याच वेळी कोल्हापूरचे काही विद्यार्थी "आर्ट स्कूल" जॉईन

करण्याकरिता निघाले होते. त्यात मजुमदार, जोशी, देशपांडे, अष्टेकर हे विशेष ओळखीचे. मीही त्यांच्याच बरोबर जातो म्हणून आग्रह धरला. वडील निराश झाले असावेत. पण अखेर त्यांनी संमती दिली व मला म्हणाले, "काहीही शिक पण नाव काढ म्हणजे झाले". श्री. कल्लाप्पा सावर्डेकर हे इटलीहून जाऊन आलेले आर्टिस्ट होते. त्यांनी वडिलांना माझ्याविषयी समजून सांगितले. शाळेतले ड्रॉईंग मास्तर देव यांनीही प्रोत्साहन दिले. व अखेर जे. जे. आर्ट स्कूल मुंबईला जाण्याचे नक्की झाले. आयुष्याला एक अगदी निराळी कलाटणी लागली.

**थप्पड मारून स्कॉलरशिप** - वडील म्हणाले, जाण्यापूर्वी शाहू महाराजांची भेट घेऊन जा.

महाराजांची भेट राजवाड्यात घेण्यापेक्षा वाड्याबाहेरच चांगली पडायची. तिथं कोणाला आडकाठी असायची नाही. म्हणून मी बाहेर घ्यायची ठरवले. आठ नऊच्या सुमारास ते टेक्निकल स्कूलच्या इमारतीत यायचे. त्यावेळी त्यांच्याबरोबर पेंडसे नावाचे दिवाणजी होते. इतर काहींच्या बरोबर बोलणं चालल होतं. माझ्याकडे पाहिल्यानंतर मी पायाला हात लावून नमस्कार केला. तसाच रिवाज होता", "का रे कां आलास ? म्हणून त्यांनी साहजिकच विचारलं, "मी मुंबईला आर्ट स्कूलचा कोर्स पुरा करण्याकरता जातो आहे, त्यापूर्वी आपलं दर्शन घ्यावं म्हणून आलो. "किती रे भाऊ तुम्ही ?", "आम्ही चौघे आहोत महाराज", "मग बापाला, भीक लावायला निघालात वाटतं, मूर्ख कुठला", असं म्हणून महाराजांनी त्या सर्व मंडळीत आमच्या श्रीमुखात भडकावली आणि लागलीच पेंडसे दिवाणजींना महाराज म्हणाले, "खुळं पोर आहे हे. म्हणे आर्ट स्कूलला जातंय, याला स्कॉलरशिप सुरू करा"; आणि माझ्याकडे वळून म्हणाले, "हे पहा मुंबईत जागा मिळत नाही. मिळाली तर फार महाग. तू माझ्या बंगल्यात खाली हॉलमध्ये रहा." अशाप्रकारे थोबाडीत मारून स्कॉलरशिप चालू केली व रहायला जागा दिली.

## ५) कलेकडून समाजसेवेकडे

*माधवराव बागल चित्रकलेचा अभ्यास पुरा करून कोल्हापूरात आल्यानतंर निसर्गचित्रे रंगविण्यात मग्न होते. उदरनिर्वाहासाठी कांही करण्याचीहि आवश्यकता नव्हती. घरची स्थिती चांगली होती. पण केवळ चित्र काढीत फिरण त्या काळात प्रतिष्ठेचे मानले जात नव्हते. माधवराव वडिलांना त्यांच्या 'हंटर'*

*पत्रात मदत करू लागले. समाजिक कार्याकडे हळू हळू प्रवास सुरू झाला. आणि मग ती ऐतिहासिक भेट गांधीजीं बरोबर घडली. माधवरावांनी कुंचला टाकून लेखणी उचलली.*

**एका अधिकाऱ्याच्या वाक्याने कलाटणी :-** मी एका बड्या अधिकाऱ्याकडे विशेष जात असे. मी जरी असा जात होतो तरी आश्रिताप्रमाणे कधीही गेलो नाही. बरोबरीचा दर्जा कधीही सोडला नाही. ते माझ्या बरोबरचे आहेत, ही भावना कधीही टाकली नव्हती. कधीही त्यांचे लांगुलचालन केले नाही. आर्थिकदृष्ट्या मला कोणापासूनही मदत मिळण्याची अपेक्षा मी केली नाही. माझा स्वाभिमान कधीही दुखवू दिला नाही.

माझे स्नेही डॉ. धनवडे, त्यावेळचे दरबार सर्जन, यांचेकडे मी नेहमी जात होतो. त्यांचे स्नेही रा. ब. आचरेकर तसेच बडे अधिकारी होते. फायनान्स व होममिनीस्टर असावेत. त्यांची फटकळ म्हणून फार ख्याती होती. निष्कारण शत्रू उत्पन्न करण्याची त्यांची शैली विलक्षण होती. स्वभावाने निष्कपटी, अंत:करणाने निर्मळ तितकेच तोंडाने वाईट. ते मला "व्हॅग्याबाँड" म्हणून चिडवीत. ते जरी थट्टेने बोलत तरी त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला. अपमान सहन करण्याची मला सवय नव्हती. मला ते बोलणे असह्य होई. रागाने गुदमरून गेल्यासारखे होई. त्या अपमानामुळे मला रात्री झोपही लागत नसे.

एकदा त्यांचा माझा बराच खटका उडाला. माझे वडील अत्यवस्थ होते म्हणून मी डॉक्टरना बोलावण्यासाठी गेलो होतो. तेव्हा हे आचरेकर तेथेच होते. ते म्हणाले, "अहो आता वयच झालंय त्यांचं - उगाच का गडबड." वेळ दुसरी असती तर कदाचित मला राग आला नसता. पण वडिलांची स्थिती खरोखरची काळजी करण्यासारखी असल्याने मला हे शब्द असह्य झाले. ते फार मोठे ऑफिसर आहेत याचा विचार न करता मी म्हणालो, "माझ्या वडिलांच्याऐवजी तुमच्यासारखे शेकडो ऑफिसर मेले तर समाजाचे कांही नुकसान होणार नाही. माझा बाप तुमच्या हजार पटीने श्रेष्ठ आहे".

इतक्या बेमुर्वतपणे आपल्याला जाब मिळेल याची त्यांना कल्पना नव्हती. ते पण चिडून म्हणाले - कोण जाणे थट्टेनेही असेल - "काय समजलात तुम्ही? कोणाला बोलता आहात? बेड्या ठोकीन. पोलीसच्या ताब्यात देईन". मी तितक्याच जोराने उत्तर दिले "पोलिसच्या ताब्यात देईपर्यंत तुम्ही माझेसमोर आहात. तो धावून येईपर्यंत तुमची माझी गांठ आहे." असे म्हणून मीही

अस्तन्या सारून उभा राहिलो. पण ते प्रकरण इतरांच्यामुळे म्हणा किंवा सर्वच एक थट्टेचा प्रकार म्हणून म्हणा तिथेच मिटले.

**समाजसेवेकडे** - पण या प्रसंगाने माझ्या चाललेल्या ध्येयशून्य जीवितावर चांगलाच आघात केला. या दृष्टीने त्यांचे मजवर फार उपकारच झाले. आपण विनाकारण दुसऱ्याचे घरी जातो. निष्कारण हिंडतो. आपली किंमत कमी करून घेतो, म्हणूनच आपला असा अपमान होतो, असे मला आता वाटू लागले. माझे डोळे उघडू लागले. मी आत्मपरीक्षण करू लागलो.

माझ्या जिण्याची मला खरोखरीच लाज वाटू लागली. श्रीमंतांचा स्नेही म्हणून मिरवणे हे काय माझे ध्येय होते. याने काय माझा दर्जा वाढणार होता; तसा सामाजिक दर्जा माझा होताच. कित्येक इनामदारांनी हेवा करावा अशी त्यावेळची आमची स्थिती. वडील अगदी पहिल्या प्रतीचे वकील होते. संस्थानातील पहिले मराठा एल. एल. बी. तेच. जाडे विद्वान, वक्ते, नामांकित वकील, शाहू महाराजांची त्यांच्यावर अखेर अखेर तर केवढी कृपा. मोठमोठ्या महत्त्वाच्या अखेर निकालाच्या कामात ते त्यांचा सल्ला घेत. शाहूमहाराजांवर त्यांच्या शत्रूंनी घातलेल्या खटल्यावेळी वडिलांनी बहुमोल मदत केलेली. या दृष्टीने त्यांचा मुलगा ही कमी मान्यता नव्हती मला. आणि आता तर त्यांनी आपल्या सार्वजनिक आयुष्याला सुरुवात केली होती. हंटर पत्र सुरू केले होते.

सत्यसमाजाचे ते एक आधारस्तंभ होते. मराठा समाजातील एकमेव नि:स्वार्थी, निर्भिड विद्वान असे संस्थानातले ते समाजसेवक होते. त्यांच्या समाजसेवेत भाग घेण्याची प्रवृत्ती माझ्यात या प्रसंगाने वाढली.

मी बड्यांच्या घरी जाण्याचे कमी करू लागलो. ते मला मित्र मानीत असतील काय अशी सबळ शंका मला येऊ लागली. त्यांचे माझ्यावर प्रेम असेल, ते मला बरोबरीचे मानत असतील तर तेही माझी गाठ घ्यायला येतील. पण माझा हा भ्रम लवकरच नाहीसा झाला. कोणी क्वचितच येत असत. काही अंमलदार मात्र येत. इनामदार घरी गेलो म्हणजे "का बरेच दिवस आला नाहीत?" असे म्हणण्यापलीकडे अगत्य दाखवत नसत.

**हंटर पत्र** - यामुळे वडिलांच्या "हंटर" पत्राकडे माझे मन धावू लागले. मी घरी राहून त्यांना करता येईल ती मदत करू लागलो. पुफे तपासणे, वर्तमानपत्र काढणे, दुसऱ्या मॉडर्न रिव्ह्यूसारख्या मासिकातील विचार मराठीत करून देणे व नोकर लोकांवर देखरेख करणे अशी किरकोळ कामे करू लागलो.

मला वाचनाचा तर पूर्वीपासूनच नाद होता. यंग इंडियाचा सुरुवातीपासूनचा वर्गणीदार होतो. त्यामुळे स्फुटे लिहिणे काही अवघड वाटले नाही. यातून मोकळा झालो म्हणजे संध्याकाळी लँडस्केपसाठी जात असे. खिशात राहण्याजोगी पेटी व कागद असल्यामुळे फिरणे व चित्रे काढणे दोन्हीही गोष्टी सहजासहजी होत. कलेची सेवा व निसर्गाची दोस्ती हा निर्भेळ आनंद भोगू लागलो. वर्तमानपत्रामुळे जनसेवेकडे ओढ लागली.

**महात्मा गांधींच्या वाक्याचा परिणाम** - चित्रकलेपासून परावृत्त व्हायला आणखी एक गोष्ट विशेष कारणीभूत झाली. महात्मा गांधींनी कोल्हापुरास भेट दिली, त्यावेळी वडिलांनी बराच पुढाकार घेतला होता. गावात हिंडून फंड जमा केला होता. सत्यशोधक समाजातर्फे त्यांनीच मानपत्र दिले. त्यावेळी महात्माजींच्या मोटारीत शेजारी बसण्याचा मला प्रसंग लाभला. त्यांनी सहजीच माझी विचारपूस केली व चित्रकार म्हणून मी माझी ओळख करून दिली. ते म्हणाले, "चित्रकार आहात तर चित्रे अशी काढा की त्यामुळे जनसेवा घडेल," अशाच अर्थाचे वाक्य होते ते.

त्यावर विचार करू लागलो मी. हा प्रश्न आतापर्यंत कधीच उद्‌भवला नव्हता माझ्यासमोर. मी माझी चित्रे मनरंजनाकरिताच काढीत होतो. जनतेने बोध घेण्याजोगे त्यांना मार्ग दाखविणारे, कांही तरी विशेष सांगणारे, असे काहीच नव्हते त्यांत.

विशिष्ट मतप्रसार करणारी चित्रे काढावीत तर माझा मनुष्य कृतीचा अभ्यास तसा चांगला नव्हता आणि निव्वळ सृष्टीसौंदर्याच्या देखाव्यामुळे मतजागृती कशी होणार? जनसेवा कशी करणार? मनरंजन होईल पण तेही वरच्या वर्गाचे. खालच्या वर्गापुढे जेथे जगणे की मरणे हा प्रश्न उभा आहे तेथे मनरंजनाचा काय उपयोग? यामुळेही चित्रकलेकडे दुर्लक्ष होऊ लागले.

## ६) लोकशिक्षणासाठी व्याख्यान दौरे

*वडील खंडेराव बागल यांच्या तालमीत माधवराव समाजसेवेचे धडे घेत असलेले या उताऱ्यात दिसतात. संस्थानी हद्दीत सभेला परवानगी लागे म्हणून शेजारच्या मलकापूर जहागिरीत, वाळवे तालुक्यात, सांगली, बेळगांव जिल्ह्यात स्वतंत्रपणेहि व्याख्यानाचे दौरे आखीत. खर्चाला पैसे नव्हते तरी पत्नीचे दागिने विकून व्याख्यान, दौरे करीत विषय- खादी प्रचार, परदेशी कापडाची होळी,*

*अस्पृश्यता, असे असत.*

*या दौऱ्यात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व नाना पाटील यांची मैत्री जमली. तर्कतीर्थांच्या विद्वत्तेमुळे व पुरोगामी विचाराने, सामान्यांत मिसळण्याच्या वृत्तीमुळे माधवराव प्रभावी झालेले दिसतात. सर्वोदयवाद्यांचा सोवळेपणा मात्र भाईजीना आवडत नव्हता असे दिसते. हा दौऱ्याचा कार्यक्रम संस्थानाबाहेर १९३५ पर्यंत जोरात चालू होता.*

व्याख्यानाचा दौरा : - पहिले व्याख्यान माझे एका खेड्यात झाले. त्यासाठी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडून अर्जाने परवानगी मागितली होती. खादी हाच विषय दिल्यामुळे व वडीलही त्यात व्याख्याते असल्यामुळे त्यांना परवानगी मिळू शकली. खादी व ग्रामपंचायत या विषयावरच मी बोललो. खालच्या वर्गाला, आपण इतराहून हलके नाही ही जाणीव करून देण्याकरता मी एका शेतकऱ्यालाच अध्यक्ष केले. मी हे पूर्ण श्रद्धेतूने केले. पण तेथल्या प्रतिष्ठाला तो मोठा अपमान वाटला. त्यावेळी त्याला मुकाट्याने बसणेच भाग पडले. माझ्या व्याख्यानाचा परिणाम बरा झाला. त्याच सभेत बऱ्याच रुपयांची खादी खपली व ग्रामपंचायत स्थापण्यालाही लोक कबूल झाले. मात्र तेथील प्रमुख आणि उठाठेवी हेकटखोर म्हणून प्रमुख असलेली चिमासाहेब नावाची व्यक्तीच अध्यक्ष म्हणून निवडून आली. ज्याच्या नावाने लोक मागे जळफळाट करीत व मनातून ज्यांचेबद्दल काडीचाही आदर नव्हता, तो लोकनियुक्त म्हणून निवडून येऊ शकला. संस्थानी प्रजेची ही मनोवृत्ती खेड्यावर. तशीच मोठ्या शहरातही पण अशीच दिसून आली.

**लोकशिक्षण व भाषण बंदी :-** म्हणून लोकांना जबाबदार अशा संस्था स्वतंत्र बाण्याने चालायला लोकशिक्षणाची जरुरी आहे. त्यांच्या हक्काची जाणीव त्यांना करून दिली पाहिजे. नि:स्वार्थी पुढाऱ्यांनी स्वातंत्र्याचे बीजारोपण त्यांच्या मनात केले पाहिजे. याला भाषणस्वातंत्र्याची जरुरी आहे. नुसत्या क्रमिक शिक्षणाने हे लवकर साध्य होणार नाही. अशी माझी खात्री झाली. भाषण स्वातंत्र्य नसल्यामुळे संस्थानी प्रजा निर्बुद्ध आणि गुलाम वृत्तीची झाली होती.

ग्रामपंचायतीचा स्तुत्य हेतू, तो अध्यक्ष निवडून आल्याने साध्य झाला नाही. उलट लोककल्याणाची सबब पुढे करून बहुमताच्या जोरावर त्याला स्वत:चेच हित साधून घेता आले. लोकांना पूर्वीचीच स्थिती बरी असे वाटू लागले.

त्यानंतर लगेच दुसऱ्या गावी गेलो. तेथेही व्याख्यान दिले. तेथेही बरीच खादी खपली. काही अंशी वडिलांच्या बरोबर संस्थानातील गावे केली. त्यामुळे

खेडच्या लोकांपुढे तरी न भिता स्वतंत्र व्याख्यान देता येईल असा विश्वास वाटू लागला. मोठ्या शहरात स्वतंत्र व्याख्यान देण्याचे अद्यापि धाडस झाले नव्हते. पण राजधानीत एका संस्थेने माझे खादीवर व्याख्यान ठरवून ही भीती दूर केली. आतापर्यंत वडिलांच्या बरोबर उपवक्ता म्हणून बोलत असे. पण यापुढे स्वतंत्र दौरा काढण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली.

संस्थानात सभाबंदीचा कायदा होता. त्यामुळे या दौऱ्याच्या कल्पनेला सभाबंदी आड येऊ लागली. प्रत्येक खेपेला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे अर्जाला आठ आण्याचे तिकीट लावून परवानगी मागणे त्रासाचे व अपमानाचे वाटू लागले व दौऱ्याची अशी एकदम परवानगी मिळेना म्हणून तो नाद सोडून द्यावा लागला.

महात्माजी दांडीला निघाले त्याच दिवशी मीही व्याख्यानाला आमच्या हद्दीबाहेर जाण्याचे ठरवले. स्पेशल मोटारीने मलकापूर जहागिरीत गेलो. तेथले महालष्करी गोपाळराव खांडेकर आमचे वडिलांचे बालपणाचे स्नेही होते. त्यांनी आमची उत्कृष्ट व्यवस्था ठेवली व स्वतःही सभेस हजर राहिले. मी सहकुटुंब गेलो होतो. त्यांनी वडिलांना पत्र पाठवून माझ्या व्याख्यानाची बरीच स्तुती केली. त्याने माझा उत्साह वाढला व वडिलांना आनंद झाला.

**वाळवे तालुक्यातला दौरा :** - मी जवळच्या वाळवे तालुक्यात दौरा काढण्याचे ठरवले. संस्थानात भाषणबंदी होती. पण तेथे परवानगीची काही भानगड नव्हती. वाटेल ते बोलावे. राजद्रोही व्याख्यान असल्यास केस होण्याची भीती. पण भाषणाला बंदी नव्हती. चार दिवस गावी, चार दिवस दौऱ्यावर असे सुरू केले.

कऱ्हाडात व्याख्यान दिले व नंतर तेथल्या बटाणे वगैरे पुढाऱ्यांबरोबर त्या तालुक्यातील गावे केली-

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** - : दौऱ्यात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांची गाठ पडली. त्यांचे संबंध आणखी जवळ आले. त्यावेळी त्यांच्या विद्वत्तेची मला काहींच कल्पना नव्हती. एक साधारण कार्यकर्ताच समजलो. सोवळा भटजीच वाटला मला. पण महाराष्ट्रातल्याच नव्हे तर हिंदुस्थानातील विद्वान मंडळीत त्यांची गणना केली जाते. खरा विद्वान नम्र असतो. आपण विद्वान आहोत ही त्याला जाणीव नसते. निदान तो दुसऱ्यांना ही जाणीव करून देत नाही. हे त्यांच्या उदाहरणावरून पटून आले. त्यांच्यात ब्राम्हण्य जराही नाही.

जातीवाद दिसला नाही. उलट बहुजनसमाजाचे ते कैवारी आहेत. फुल्यांच्या विषयी निबंध लिहिण्याने ते आणखी जवळ आले. याचमुळे अ. भा. सत्यशोधक परिषदेचे उद्‌घाटन त्यांचे हस्ते करण्यात आम्हास आनंद वाटला. मिश्र विवाहाचे ते पुरस्कर्ते आहेत. पाटील-पिंगळे या मराठा ब्राह्मण विवाहाचे अभिनंदन करण्यास ते करवीरी आले होते. रोटीबंदी त्यांनी केव्हाच मोडून टाकली आहे. बहुजन समाजाच्या आकांक्षा त्यांना इतरांहून बरोबर कळू शकतात. सर्वोदयी सोवळेपणा व ढोंगी सात्विकता त्यांच्यात नाही. चुका कबूल करण्याचा थोरपणा त्यांचे अंगी आहे. ते माझे घरी उतरले असता, त्यांच्या धोरणांत मला वाटलेली काही विसंगती व मला वाटलेला त्यांचा चुकीचा दृष्टिकोन मी मोकळ्या मनाने त्यांच्यासमोर मांडला. त्यांनी तो खोडून काढण्याचा प्रयत्न न करता काही गोष्टी मान्य केल्या. मराठा परिषदेतील माझ्या दृष्टिकोनाला त्यांनी जातिवादी स्वरूप चिकटवले नाही. मराठा ही लोकसंग्राहक जात आहे हे त्यांनी मान्य केले व माझा हेतू व विचारसरणी कोरगांवकर ट्रस्ट संमेलनात इतरांना समजावून दिली. काही सर्वोदयवाल्यांत स्वत:च्या सात्विकतेचा आणि पावित्र्याचा जो एक टेंभा चढला आहे तो यांच्यात नाही. मोजकं बोलणं, आवरुण लिहीणं ही राजकीय मुत्सद्देगिरी मला तरी आढळली नाही. माझ्याशी केलेल्या पत्रव्यवहारात ते मला दिसून आले. आचार्य जावडेकरांना आधुनिक भारत लिहिताना शाहू महाराजांची आठवण झाली नाही. पण तर्कतीर्थ त्यांची केव्हाही मुक्त कंठाने स्तुती करतात. माझ्या मते त्यांनी पक्षातीत रहायला हवं होतं. काँग्रेसच्या सभासदत्वामुळे त्यांच्या स्वतंत्र विचाराची कुचंबणा झाल्याखेरीज राहणार नाही.

मी अध्यक्ष व ते उद्‌घाटक अशा एका विद्यार्थ्यांच्या सभेप्रसंगी मी म्हणालो, "तर्कतीर्थांनी मुलांच्या पासून मराठी लिहायला शिकले तर ते आम्हाला अधिक जवळचे होतील". त्यावेळी ते म्हणाले, "माधवराव अगदी खरे बोलले. माझे एक मराठी पुस्तक वाचल्यानंतर माझे एक स्नेही मला म्हणाले, "तर्कतीर्थ तुमचे पुस्तक मला फार फार आवडले, पण ते मराठीत लिहिले असते तर बरं झालं असतं" आत एक वागणूक अन् बाहेर एक हे त्यांच्यात नाही. कोरगांवकर ट्रस्ट संमेलनप्रसंगी मी, शंकरराव देव, जावडेकर, भागवत व अप्पासाहेब पटवर्धन जेवायला बसलो होतो. त्यांत काहींचा जेवणाचा खास निराळा प्रकार, --गाईचे दूध, गाईचे लोणी, वगैरे पाहून ते म्हणाले, " हा एक अस्पृश्यतेचाच प्रकार आहे", ही जेवणातली विषमता सुद्धा गेली पाहिजे. जेथे जे

मिळेल आणि जे दिले जाईल ते खाण्याला आपण शिकले पाहिजे. या आमच्या वागणुकीमुळे आम्ही बहुजनसमाजाशी एकरूप होत नाही. मला एखाद्या मराठ्याने त्यांचे ते खाद्य दिले ते ते मी खातो. यावर एक म्हणाले, "असे उघड बोलू नको." त्यावर शास्त्रीबुवा म्हणाले, "चोरून एक व बाहेर एक हे मला साधत नाही."

इस्लामपुरात माझ्या भाषणाचा चांगला परिणाम झाला व भाषण संपल्यानंतर बऱ्याच परदेशी कपड्यांची होळी झाली. काहींनी तर अंगावरचे सदरे होळीत टाकून उघडे झाले. सुरुवातीला मी शाहू महाराजांनी दिलेला भरजरी १००/१२५ चा मंदिल आगीत टाकला. त्याचा लोकांवर फार परिणाम झाला व भराभर कपडे पडू लागले.

वाळवे तालुक्यातील बहुतेक सर्व खेडी मी माझ्या पदरच्या खर्चाने केली प्रथम प्रथम मी बरोबर जेवणही बांधून घेत असे. पण ते कधी सोडावे लागले नाही. कोणत्याही वेळी गेलो तरी माझी जेवणाची गैरसोय कधी झाली नाही. ज्या घरी उतरावे त्या घरी त्या माणसाच्या ऐपतीबाहेर तो जेवण करून घालीत असे. ब्राह्मणांच्या घरी तर अगदी सणाप्रमाणे मेजवान्या मिळत, तर मराठयांच्या घरी कोंबडी अंडी मिळायची. काही ठिकाणी चटणी कांदा भाकरी खावी लागली. पण बदल म्हणून ती सुद्धा चवदार वाटे.

**बायकोचे दागिने विकून दौरा :** वडिलांना त्रास देऊ नये म्हणून खर्चासाठी मी माझ्या बायकोचे दागिने मोडले. माझ्याबरोबर एक दोन माणसे असत. त्यांचा मोटरखर्च बहुदा मीच देई. मला पायी चालण्याची फार सवय नव्हती. पण उत्साहामुळे सात आठ मैल चाललो तरी मी नाउमेद होत नसे. काही गावी आमची थाटाने मिरवणूक निघे. कोणी पुढच्या गावी जाण्यासाठी गाडी देत. कोणी घोडे देई. वाटेने जाताना पाण्याची ओहोळ लागली तर बिचारे मला डोक्यावरून नेत. मी मोठा माणूस समजून माझे पायावर डोके ठेवीत. ही भक्ती व प्रेम पाहून पाहून मला गहिंवरून येई. यामुळे खेड्याचे लोक मला देवाप्रमाणे पूज्य मानू लागले. शिकलेल्या लोकांचा धूर्त व स्वार्थीपणा त्यांच्यात नसे. जणू मोठ्या वयाची निर्मळ मुलेच ती. कोणी सांगतील तसे ऐकतील. त्यांचे थोर अंत:करण आणि केल्या कामाची कृतज्ञता पाहून त्यांच्यासाठी देह टाकावा असे वाटे. ते धैर्य माझ्या अंगी अद्याप आले नव्हते. सर्वस्वाचा त्याग करून देशाला वाहून घ्यावे ही मनाची इच्छा कृतीत आणण्याचा अंगात त्राण नव्हता. तेवढी

तळमळ नव्हती. बाकी तुरुंगात जाण्यासाठी जो-तो धडपडत होता. पण परिस्थिती मागे खेचत होती.

कित्यके पुढारी माझ्याच देखत सभेत गिरफदार झाले होते. माझ्या व्याख्यानप्रसंगी काही ठिकाणी तर सबंध पोलीसपार्टी हजर असे. पण कायदेभंगाला प्रवृत्त करणारी माझी व्याख्याने नसल्यामुळे मला अटक झाली नाही.

व्याख्यानामुळे त्या तालुक्यात माझी बरीच प्रसिद्धी होऊ लागली. आगाऊ जाहीर झाल्यास व्याख्यानास आजूबाजूच्या खेड्यातली माणसे येत.

**नाना पाटील :** त्यावेळी फारसे प्रसिद्ध नव्हते. सामाजिक कार्य करीत. लग्नातील खर्च कमी करण्याची खटपट करीत. ते जवळ जवळ सत्यशोधक होते. ते अचानक रात्री आले. मला नेण्यासाठी घोडं आणलं होतं. सभेची तयारी केली होती. येडे मच्छिंद्र गावी ती सभा झाली. त्यांनी आणखी काही प्रसंगी मला नेले. यावेळी साताऱ्याबाहेर त्यांची विशेष अशी प्रसिद्धी नव्हती. १९४२ च्या चळवळीनंतर मात्र ते महाराष्ट्राचे व बहुजनसमाजाचे पुढारी म्हणून चमकू लागले. शेतकरी-कामगार पक्षात आम्ही दोघं होतो म्हणून त्यामुळे संबंध आणखी जवळ आले. ते कम्युनिस्ट पक्षात आता गेले आहेत, मी पक्षमुक्त आहे. त्यावेळेपासून त्यांची पाऊले त्या रोखाने पडत आहेत. मार्क्सवादाच्या अभ्यासाशिवाय त्यांची पाऊले त्या रोखाने पडत होती. आता तर ते फार मोठ्या जोडीत गेले आहेत. पण स्वभावातील नम्रता कमी झालेली नाही. कार्याने ते माझ्याहून थोर आहेत पण मला आदरानेच वागवतात. खेडुतांवर आपल्या भाषणाची पकड बसविणारा दुसरा पुढारी यावेळी महाराष्ट्रात दुसरा कोणीही नाही. रांगडी भाषा, समजून घेण्याची नम्र वृत्ती, समयसूचकता यामुळे तसं शिक्षण नसूनही ते शेतकऱ्याला जागं करू शकतात.

**माझा आवाज आणि आत्मविश्वास : -** हजारांना ऐकू जाईल असा माझा आवाज होता. पाच दहा हजारांच्या किती तरी सभांत मी बोललो आहे. मला लोकांच्या भावना जागृत करता येऊ लागल्या. किती तरी सभात मी लोकांना परदेशी कपडे जाळण्यास भाग पाडले. रोज तीन चार व्याख्याने अशी मी सारखी देत असे. आणि घसा बसला म्हणजे मी विश्रांती घेई. समाज केवढाही मोठा असला तरी मला त्याची भीती वाटेनाशी झाली. बेळगांव जिल्ह्यातूनही आमंत्रणे येत. सांगलीतही बरीच व्याख्याने दिली.

बहुतेक व्याख्यानांचे रिपोर्ट ज्ञानप्रकाश पत्रातून येत. या प्रसिद्धीमुळे हुरुपही येई व बाहेरची आमंत्रणे याच प्रसिद्धीमुळे येऊ लागली. यावेळी माझा उत्साहही दांडगा असल्यामुळे मी आमंत्रणाला कधी नाही म्हणत नसे.

राजकीय विषयाबाबतची व खादी संबंधीची व्याख्याने लोकांना आवडत. त्याचा परिणामही चांगला होई. अस्पृश्यतानिवारण हाही पण माझा आवडीचा विषय. पण लोकांना अस्पृश्यतेवर व्याख्यान देणे फारसे आवडायचे नाही. अस्पृश्यतानिवारणाला लोक अनुकूल नसत. मी अस्पृश्यांची बाजू घेऊन वरच्या लोकांना पुष्कळ तुटून बोलत असे.

**अस्पृश्यतेवर बोलू नका :** एका गावच्या पुढाऱ्याने त्याबद्दल माझी सभेतच कानउघाडणी केली. ते म्हणाले - " आपण आमच्या तालुक्यात दौरा काढीत आहात त्याबद्दल आम्हांला फार आनंद वाटतो. पण तुम्ही अस्पृश्यतेवर जर बोलू लागला तर तुम्हाला पुढे काम करणेच जड जाईल. लोक तुम्हांला गावात जागाही देणार नाहीत. तरी तूर्त तो विषय सोडून बोलावे अशी आमची विनंती आहे. हे गृहस्थ सत्यशोधकच होते. अस्पृश्यतेविरुद्धचे होते. सद्हेतूनेच त्यांनी ते सांगितले. पण मी त्यांना साफ सांगितले - की 'गावचे लोकांनी टाकले तर मी महारवाड्यातच उतरीन म्हणजे झाले." मग ते काहीच बोलले नाहीत. त्यांनी माझ्यावर बहिष्कार घातला नाही. उलट ते काही गावी माझ्याबरोबर हिंडायला येऊ लागले व त्यांनी व मी बरीच खेडी घेतली.

## ७) हद्दपारी व हद्दपारीतील अनुभव

*माधवराव बागल उच्च विद्याविभूषित नव्हते. तरी त्यांचे वाचन दांडगे होते. हद्दपारीच्या काळात रेवंदंड्यात मुक्काम असताना त्यांनी सोशालिझम वरची त्यावेळी उपलब्ध असलेली सर्व पुस्तके दिनकरराव जवळकरांनी त्याना दिली. माधवरावानी ती सर्व इतर आधाशासारखी वाचून काढली. सत्यशोधक समाजाचे समतेचे तत्त्व व सत्याचा आग्रह सोशालिझमकडेच शेवटी नेणारा आहे अशी त्यांची खात्री झाली. त्यानी 'सत्यशोधकास इशारा' ही लेखमाला "विजयी मराठा"त सुरु केली.*

*हद्दपारीतील अनुभव संस्थानात स्वातंत्र्याचा लढा सुरु करणे किती कठीण होते याची कल्पना वाचकांना यावी. हा अनुभव १०३०-३१ च्या सुमाराचा. मनुष्य स्वभावाचे नमुने व राजाची प्रजेवर दहशत याची कल्पना येते. याच काळात माधवरावांची काकासाहेब लिमये यांचेशी ओळख झाली. ही मैत्री शेवटपर्यंत टिकली.*

**हद्दपारी** - माझ्यावर हद्दपारीचा हुकूम सुटला होता. तो बजावण्यापूर्वी मी बाहेर जावे म्हणून वडिलांनी विनवणी केली, भावांनी पाय धरले. अशाच वेळी मी बाहेर गेल्यामुळे बऱ्याच लोकांचा समज मी भिऊन पळून गेलो असा झाला

व तो दूर करता येणे मलाही त्यावेळी तरी शक्य नव्हते.

तुरुंगात जाण्यासाठी तो आतुर नव्हताही. ती गोष्ट फार भयंकर आहे असे मला वाटत नव्हते. कारण तुरुंगाची हवा पुष्कळांना मानवलेली मी डोळ्यांनी पहात होतो. म्हणून कोल्हापूर सोडण्याचे, भीती हेच कारण नव्हते. विशेषत: वडिलांना या वयात त्रास देऊ नये म्हणून मी बाहेर पडलो. त्यांच्यामुळेच हुकुमाची अंमलबजावणी थांबली होती.

पुण्यात मी एका श्रीमान पाहुण्याकडे उतरलो. माझी बायको मागाहून आली. मी का आलो त्याचे बरोबर कारण अद्याप त्यांना समजले नव्हते. ते मी सरळ सांगितले. ते घराणे पूर्ण राजनिष्ठ. त्यांचे जवळचे आप्त सरकारी अधिकारी, मी किती दिवस राहणार हे नक्की असे काही कळविले नव्हते. कुठेतरी काही दिवस काढायचे हाच एक त्यावेळचा उद्देश होता.

**शनिवार वाड्यासमोरच्या सभेत** - याच सुमारास पुण्यास शनिवार वाड्यासमोर कॉंग्रेसतर्फे सभा भरली होती. ती निव्वळ पहाण्यासाठी म्हणून मी गेलो होतो. दूर एका रस्त्यावरच्या दगडावर बसलो होतो. ती सभा पाहून मलाही बोलावेसे वाटू लागले. मी माझे नाव एका चिठ्ठीवर लिहून बोलण्याची परवानगी मागितली. माझ्या नावाची ओळख ज्ञानप्रकाशने पुण्याच्या लोकांना करून दिलीच होती. माझी तोंडओळख नसली तरी नावाची असल्यामुळे इतर व्याख्यात्यांचे भाषण पुढे ढकलून ताबडतोब मला बोलावले. उभे राहताच मला टाळ्या मिळाल्या. माझे भाषण लोकांना फारच आवडले. त्या सभेत त्यांनी माझी स्तुती केली व त्यांनी माझे दुसरे स्वतंत्र व्याख्यान हे मार्केटच्या आवारात ठेवले.

ज्ञानप्रकाशने माझे भाषण मला मोठा मथळा घालून समग्र छापले. त्यामुळे पुण्यात व्याख्यानासाठी बरेच लोक मागे लागले.

**माझे राजकीय पिताजी काकासाहेब लिमये** - माझी काहीही ओळख नसता माझे भाषण समग्र छापून मला प्रमाणाबाहेर महत्त्व दिल्याबद्दल आभार मानण्यासाठी ज्ञानप्रकाशच्या संपादकाच्या भेटीला गेलो. तीच माझी त्यांची पहिली भेट. ते फार अगत्यपूर्वक माझ्याशी वागले. कळकळीचा उपदेश केला व माझ्यावर वॉरंट सुटल्याची वदंता ऐकून त्यांनी कोल्हापुरात तूर्त जाऊ नका असा सल्ला दिला. त्यांच्या निगर्वी, सरळ, निष्कपटी स्वभावाची माझ्यावर चांगली छाप पडली. त्यांच्याबद्दल माझ्या मनात त्यावेळी जी पूज्यबुद्धी उत्पन्न

झाली ती अखेरपर्यंत कायम राहिली. इतर काही पुढाऱ्यांच्याबद्दल वाटणारा आदर पुढे टिकला नाही. अनुभव निराळे येत गेले. ब्राह्मणेतर ही कल्पनाही त्यांनी मला शिवू दिली नाही. ओळख होण्यापूर्वीच त्यांनी माझी भरपूर प्रसिद्धी केली होती. मोठेपणा आणून दिला होता. आणि तो पूर्ण निरपेक्षबुद्धिने हे विशेष. ब्राह्मण लोक मराठ्यांना पुढे येऊ देत नाहीत, त्यांच्या चांगल्या गोष्टींना प्रसिद्धी देत नाहीत, ह्या त्यांच्यावरच्या आरोपाला मला तरी काकासाहेब लिमये हे अपवाद वाटले.

मी त्यांना माझी खादीविषयी लिहून ठेवलेली एक लेखमाला दाखविली व ती त्यांनी न पहाताच छापण्याचे वचन दिले. प्रचारकार्य करणारा म्हणून त्यांनी मला पुढे आणलेच होते, पण लेखक म्हणूनही ज्ञानप्रकाशच्या असंख्य वर्गणीदारास ओळख करून देण्याचे श्रेय पदरी पाडून घेतले. यामुळे साहित्यक्षेत्रातले पहिले पाऊल लिमयांमुळे पडू शकले.

काकासाहेबांनी मला प्रसिद्धी दिली नसती तर माझ्यातला उत्साह खरोखरीच कमी झाला असता. प्रसिद्धीची हाव माझ्यात फार होती. पैशाची मात्र नव्हती. त्यामुळे पुढील आयुष्यात मला फार त्रास सहन करावा लागला. प्रसिद्धीमुळे कामास हुरूप येई म्हणून माझ्या सार्वजनिक आयुष्यात मी लिमयांना मोठे स्थान देत आहे. पुणे म्हटले की लिमये प्रथम माझ्या दृष्टीसमोर उभे रहात. माझे राजकीय पिताजी असं मी त्यांना यावेळेपर्यंत मानत आलो आहे. काकासाहेब अंतकालपर्यंत मजवर प्रेम करीत होते. ते माझे पूजास्थानच राहिले.

**हद्दपारीतील अनुभव** - पुण्यात नेहमी उतरत असे, त्या हक्काच्या घरी गेलो. ते आप्त होते. गेलो म्हणजे माझ्यासाठी मोटार राखून ठेवीत. आदराने वागवीत. गोडधोड करून घालीत. वडिलांप्रमाणे मान देत. पण ज्या घरी मी उतरलो होतो त्या मालकांच्या सरकारी अधिकारी आप्तांना व त्यांचे हित पाहणारे म्हणवून घेणाऱ्यांना माझे अशा स्थितीत त्या घरी राहणे बरे वाटेना. मालकांच्या मनांत त्यावेळी काय होते ते मला कळण्याजोगे नव्हते. तथापि त्या गृहस्थांनी माझे राहण्याने मालकांना त्रास होण्याचा संभव आहे असे जवळ जवळ स्पष्ट भाषेत बोलून दाखविले. तेव्हा खुद्द मालकांच्याच तोंडून ते ऐकून घेण्यापेक्षा आपण निघावे म्हणून आवरते घेतले.

**कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे** - मी व माझी बायको त्यांच्या प्रेमळ सहवासात काही दिवस राहिलो. पण माझे त्यांचे तितके जवळचे आणि

सलगीचे संबंध नसल्यामुळे दिलेल्या सवलतींचा फार फायदा घेणे मनाला बरे वाटले नाही.

"दीनबंधू"कार नवले यांच्यात राहून सहजी भेटायला म्हणून महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या भेटीस गेलो. त्यांना सारी हकीकत समजताच फार वाईट वाटले व त्यांनी आपल्या घरी राहण्याचा आग्रह केला. त्यांची स्वत:ची स्थिती तशी चांगली नव्हती. त्यातूनही ते वडील. मी एक तरुण कार्यकर्ता. रहायला संकोच वाटू लागला. पण पुन: त्यांच्या भगिनी जनाबाईंनी सौभाग्यवतीस घेऊन येण्याचा आग्रह धरला. तेव्हा काही दिवस त्यांच्या घरी राहिलो. या प्रसंगाने विठ्ठल रामजीचा पवित्र सहवास लाभला. त्यांच्या स्वभावातील योग्यता, उदारपणा, त्याग, सात्विकता, निर्भयता, विद्वत्ता, स्पष्टवक्तेपणा हे गुण प्रत्यक्ष कळून आले. त्यांचे विचार ऐकता आले. बहुजनसमाजविषयीची आणि अस्पृश्यताविषयीची तळमळ अनुभवता आली, या प्रसंगामुळे त्यांचा माझ्यावर लोभ जडला. पुढे ते माझ्या घरी येऊ लागले, उतरू लागले. वाळवे ता. शेतकरी परिषदेचे मी आमंत्रण दिले, ते त्यांनी स्वीकारले. मी स्वागताध्यक्ष होतो. त्यांचे भाषण त्यावेळी समाजवादी विचारसरणीचे झाले. "सत्यशोधकांना इशारा" हे पुस्तक लिहिले. त्याला त्यांनी प्रस्तावना दिली. पुन: पुण्यास गेलो म्हणजे भेट होई. अगदी शेवटच्या काली त्यांनी गहिवरून मला आलिंगन दिले अन् आशीर्वाद दिला. अन्याय दिसला की ते जमदग्नीसारखे तुटून पडत. असा विद्वान, निष्कपटी, प्रभावी वक्ता व पुढारी मला मराठा समाजात दुसरा भेटला नाही. अद्यापही त्यांची बरोबरी करणारा माणूस मला दिसला नाही. म्हणून पुण्यात संकटकाली त्यांनी दिलेल्या आसऱ्याचा मला कधीही विसर पडणे शक्य नाही.

**डॉ. गणपतराव धुरंदर** - मी पुणे सोडून मुंबईस आलो. मी गणपतराव धुरंधर या माझ्या मित्राकडे जाण्याचे ठरवले. त्यांचा बरेच दिवसापासून आपल्याकडे येऊन राहण्याचा आग्रहही होता. पत्रेही तशी आली होती. त्यांच्या वडिलांचे आणि माझे संबंधही प्रेमाचे होते. त्यांनी माझे अगत्यपूर्वक स्वागत केले. अत्यंत निर्मळ मनाचा व प्रेमळ माणूस, अद्यापही माझे त्यांचे संबंध प्रेमाचेच आहेत. पण त्यावेळी वडील घरी नव्हते. ते एक रावबहादूर आणि मान्यता पावलेले अधिकारी होते. त्यांनी चांगले वागवले, मेजवानी दिली. पण बोलून दाखविले की, "तुमच्यावरचे वादळ शांत होऊ द्या, मग खुशाल येऊन

रहा, वाटेल तितके दिवस, घर तुमचेच आहे." गणपतरावांना यामुळे फार वाईट वाटले. त्यांनी तसं बोलूनही दाखवले. पण ते घरचे मालक नसल्यामुळे त्यांना मूग गिळून स्वस्थ बसणे भाग पडले. माझ्या राहण्याने आपल्यावर काही तरी संकट येईल, अशी प्रामाणिकच समजूत होती त्यांच्या वडिलांची. स्वभावाने ते जितके दिलदार आणि प्रेमळ होते तितकेच भित्रे होते. कारण हे वावटळ निघून गेल्यावर त्यांची वागणूक पूर्वीसारखीच अगत्याची आढळून आली. पण मला तेही घर सोडावे लागले.

नंतर दुसऱ्या एका गृहस्थांचे घरी गेलो. तेही रावबहादूर होते. आमचे गुरुजी शिल्पकार म्हात्रे. त्यांचे हवापालटासाठी येऊन रहा असे पूर्वी आमंत्रण आलेले होते. त्यांनी पहिले दोन दिवस जहागिरदाराप्रमाणे थाट ठेवला. संबध फ्लॅट मोकळा करून दिला. पण सगळी हकीकत सांगताच ते स्वत:च परगावी निघून गेले. आणि अशा प्रकारे तेही घर मला सोडावे लागले. ही मंडळी दुष्ट होती असे मी केव्हाही म्हणणार नाही. आपल्या जीवाला भीत होते एवढेच. स्वत: अडचणीत पडून मित्राच्या उपयोगी पडण्याइतकं धैर्य आणि त्याग नव्हता. अन् तितका जिव्हाळ्याचा मी होतो असंही म्हणता येणार नाही.

हा सर्व प्रकार पाहून मी निराश झालो. स्वकीयांचा नावडता, आप्तांनी दूर केलेला, मित्रांनी त्यांचे वडील अधिकारी म्हणून नाइलाज होऊन तर कांहींनी स्वत: अधिकारी म्हणून मला जवळ केले नाही. मी गुन्हेगार नव्हतो. कायदेभंगही केलेला नव्हता. शिक्षा भोगलेली नव्हती. तथापि लोकांची आणि त्यातही खालसा मुलखातील सरकारी संबंध असलेल्या लोकांची ही स्थिती. प्रत्यक्ष त्यांच्यावर कोणतेही संकट येण्याजोगे नव्हते. तथापि भीती दांडगी. मग खुद्द संस्थानातले लोक माझ्यापासून कसे दूर जात होते, साप डसल्याप्रमाणे मला झाडून टाकीत होते. त्यांची कल्पना येईल. यावेळची चळवळ म्हणजे सुळावरची पोळी होती.

**भगिनी शांता आवटी** - आता यापुढे कोणाकडे रहायला म्हणून जायचे नाही. कुठे तरी भाड्याने रहावे हा विचार केला. पण बरोबर बायको असल्यामुळे अडचण वाटू लागली. पण कोठेतरी राहणे भागच होते. म्हणून मी सरदारगृहात उतरलो व उगीच भेटावं म्हणून शांता आवटी (पूर्वीचे आडनांव कमलाकर) या मानीत भगिनीकडे गेलो. कित्येक वर्षे तिचा माझा पत्रव्यवहार नव्हता. लग्न होऊन तिला तीन चार मुलेही झाली होती. नवऱ्याला हजार बाराशे रुपये पगार होता. मी सहकुटुंब आलो आहे व सरदारगृहात उतरलो आहे असे

सांगताच ती माझ्यावर रागावली "आमचे घर असता तुम्ही तिकडे का उतरला ? जा घेऊन या वहिनींना आणि मग बोलत बसा." तिने आग्रह धरला. त्यांत औपचारिकपणा किंवा ढोंगी शिष्टाचार नव्हता. तथापि रहायला यायचे आणि खरी गोष्ट समजली म्हणजे मग अवघड वाटायचे म्हणून प्रथमच सर्व काही कळलेलं बरे म्हणून इत्यंभूत हकीकत कळवली. तेव्हा ती म्हणाली 'सरकारी रोष झाला म्हणजे आप्तसंबंध काही तुटत नसतात. माझ्याच मुलावर किंवा सख्ख्या भावावर हा प्रसंग आला असता तर त्याला काय टाकून यायचे ? मी तुम्हाला भाऊच समजते ना ? जा उगाच काहीतरी मनांत आणू नका. घेऊन या वैनीना. वाटेल तितके दिवस रहा आमच्यात. अगदी कंटाळा येईपर्यंत रहा" मी म्हटलं "ताई तू उगाचच तुझ्यावर संकट कां ओढवून घेतेस ? राजकोपातला माणूस मी. वॉरंटाचा ससेमिरा माझ्या मागं लागलेला. तुझीही माणसं आमच्या संस्थानात आहेत. त्यांच्यावर अवकृपा होईल महाराजांची. मग गळ्यात ही घोरपड का बांधून घेतेस ?

"नको असं काही तरी बोलूस. वॉरंट आलं तर घेऊन जातील. पण तोपर्यंत माझ्या भावाला मी जागा देऊ नये काय ? तुझ्या राजकारणाचा व माझा काही संबंध नाही व मला ते काही समजत नाही. म्हणून भावा-बहिणीचे संबंध मी काय टाकून देऊ ?

ज्यांनी ज्यांनी या ना त्या सबबी सांगून झिडकारलेल्या मला ताईचे शब्द अमृतवर्षावाप्रमाणे वाटल्यास नवल काय ? कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं. "ताई किती ग चांगली आहेस तू. काय ओवाळून टाकू तुझ्यावरून. जिवापेक्षा कोणती गोष्ट मोलाची पण ती ओवाळता येते कुठं ?"

पण हे विचार तोंडावाटे नाही बाहेर पडू शकले. अश्रूंची भाषा मात्र नाही आवरता आली. तिचे पाय अश्रूंनी धुऊन काढावेत असं झालं मला. ती मला मातेप्रमाणं पूज्य वाटू लागली. तिची आठवण काढून अश्रू गाळण्यात किती आनंद वाटतो मला. माझी बहीण. तिच्या गोड आठवणीने या स्वार्थी जगाचा विसर पडतो. तिची आठवण म्हणजे माझ्या आत्म्याची उन्नती. माझ्या पावित्र्याचे स्थान ते, संकटावेळी पावणेपैनी थारा दिला नाही. पाण्याहून रक्त जड म्हणतात. पण तसा अनुभव मला आला नाही. गणगोतांनी जवळ केलं नाही. निखारा अंगावर पडावा त्याप्रमाणं झाडून टाकलं सर्वांनी. माझ्या बहिणीचा नवरा पण तसाच थोर मनाचा. कारण मी रक्ताचा भाऊ नव्हतो. मानलेले संबंध.

दुसऱ्या एखाद्या हलक्या डोक्याच्या माणसानं डोक्यात राख घालून घेतली असती. भाऊ नसलेल्यांच्या बंधुप्रेमावर विश्वास ठेवला नसता. पण त्या थोर हृदयाला कसलेच पापी विचार शिवले नाहीत. बहीण निर्मळ तसा तिचा नवराही निर्मळ. किती उपकार त्यांचे माझ्यावर. दोघांनी आमची केवढी बडदास्त ठेवली. किती मेजवान्या दिल्या. एलेफंटा केव्हस दाखवायला नेले. माझी ताई माझ्यासारख्याला नोकर ठेवण्याजोगी श्रीमंत, पण वेळेस नोकरासारखं राबे.

ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम असेल ती व्यक्ती तर आपल्याला पूज्य असतेच. पण त्या व्यक्तीचे पाहुणेही आपले आणि जवळचे वाटतात. तिथेच अगदी जवळचे नातलग आमच्या गावी राहत होते. वरील प्रसंगानंतर काही दिवसांनी मी मुद्दाम त्यांच्या भेटीस गेलो. पदवीधर होते पण फारशा मोठ्या हुद्द्यावर नव्हते. चांगलं वाईट करण्याचा अधिकार त्यांचेकडे नव्हता. त्यांचे बंगल्यावर गेलो. जुनी ओळखही होती. मला पाहताच म्हणाले, "काय बागल केव्हा आलात दौऱ्यावरून? मीही यावं म्हणतो तुमच्याबरोबर. एक प्रचारक म्हणून" मी म्हटलं "ठीक आहे. जाऊ केव्हा तरी पण ते आयुष्य नाही परवडणार तुम्हाला. आमच्यासारखी तुमची गत होईल. आहे तुमची तयारी वारी करायची?"

"वारी? आता नाही वारी येणार तुमच्यावर. अक्कल होती का त्या शहाण्यांना? खर्डेघाशीवरसुद्धा कोणी ठेवलं नसतं त्यांना भलत्या जागा मिळाल्या. जणू स्वर्गच हाती आला त्यांच्या. मग का नाही डोळे फिरणार? तुम्हाला तुरुंगात टाकायची तरी जरुरी होती का? मागण्या तरी अशा काय भयंकर होत्या. संपलं त्यांचं राज्य" ते पुढे म्हणाले "अधिकार ही एक दारू आहे. सत्तेचा मद चढला की माणुसकीला जागा रहात नाही. मग कसा माणूसपणा राहणार त्यांच्यात. आकाश ठेंगणं झालं होतं त्यांना. ते करतील ती पूर्व दिशा. मग गावचे लोक कुठल्या झाडाचा पाला, आता कोण विचारत आहे त्यांना. आता आहेत का ते तुरुंगात घालायला? मी म्हणालो, "ते गेले दुसरे येतील. राजकीय कार्यकर्त्यांना सगळे सारखेच. एका माळेचे मणी."

या आमच्या भाषणानंतर काही काल गेला. दुसऱ्या राजवटीला सुरुवात झाली. आणि आश्चर्याची गोष्ट, याच ताईच्या नातलगास संस्थानातील श्रेष्ठ अधिकाऱ्याची जागा मिळाली. मी तर आनंदाने बेहोष झालो. या बातमीचं वर्तमानपत्र हातात घेऊन खोलीत उड्या मारू लागलो. बायकोला तेथूनच मोठमोठ्याने हांका मारू लागलो. "अगं ए, अगं ए, आधी इकडे ये पाहू.

सांगताच ती माझ्यावर रागावली "आमचे घर असता तुम्ही तिकडे का उतरला ? जा घेऊन या वहिनींना आणि मग बोलत बसा." तिने आग्रह धरला. त्यांत औपचारिकपणा किंवा ढोंगी शिष्टाचार नव्हता. तथापि रहायला यायचे आणि खरी गोष्ट समजली म्हणजे मग अवघड वाटायचे म्हणून प्रथमच सर्व काही कळलेलं बरे म्हणून इत्यंभूत हकीकत कळवली. तेव्हा ती म्हणाली 'सरकारी रोष झाला म्हणजे आप्तसंबंध काही तुटत नसतात. माझ्याच मुलावर किंवा सख्ख्या भावावर हा प्रसंग आला असता तर त्याला काय टाकून यायचे ? मी तुम्हाला भाऊच समजते ना ? जा उगाच काहीतरी मनांत आणू नका. घेऊन या वैनीना. वाटेल तितके दिवस रहा आमच्यात. अगदी कंटाळा येईपर्यंत रहा" मी म्हटलं "ताई तू उगाचच तुझ्यावर संकट कां ओढवून घेतेस ? राजकोपातला माणूस मी. वॉरंटाचा ससेमिरा माझ्या मागं लागलेला. तुझीही माणसं आमच्या संस्थानात आहेत. त्यांच्यावर अवकृपा होईल महाराजांची. मग गळ्यात ही घोरपड का बांधून घेतेस ?

"नको असं काही तरी बोलूस. वॉरंट आलं तर घेऊन जातील. पण तोपर्यंत माझ्या भावाला मी जागा देऊ नये काय ? तुझ्या राजकारणाचा व माझा काही संबंध नाही व मला ते काही समजत नाही. म्हणून भावा-बहिणीचे संबंध मी काय टाकून देऊ ?

ज्यांनी ज्यांनी या ना त्या सबबी सांगून झिडकारलेल्या मला ताईचे शब्द अमृतवर्षावाप्रमाणे वाटल्यास नवल काय ? कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं. "ताई किती ग चांगली आहेस तू. काय ओवाळून टाकू तुझ्यावरून. जिवापेक्षा कोणती गोष्ट मोलाची पण ती ओवाळता येते कुठं ?"

पण हे विचार तोंडावाटे नाही बाहेर पडू शकले. अश्रूंची भाषा मात्र नाही आवरता आली. तिचे पाय अश्रूंनी धुऊन काढावेत असं झालं मला. ती मला मातेप्रमाणं पूज्य वाटू लागली. तिची आठवण काढून अश्रू गाळण्यात किती आनंद वाटतो मला. माझी बहीण. तिच्या गोड आठवणीने या स्वार्थी जगाचा विसर पडतो. तिची आठवण म्हणजे माझ्या आत्म्याची उन्नती. माझ्या पावित्र्याचे स्थान ते, संकटावेळी पावणेपैनी थारा दिला नाही. पाण्याहून रक्त जड म्हणतात. पण तसा अनुभव मला आला नाही. गणगोतांनी जवळ केलं नाही. निखारा अंगावर पडावा त्याप्रमाणं झाडून टाकलं सर्वांनी. माझ्या बहिणीचा नवरा पण तसाच थोर मनाचा. कारण मी रक्ताचा भाऊ नव्हतो. मानलेले संबंध.

दुसऱ्या एखाद्या हलक्या डोक्याच्या माणसानं डोक्यात राख घालून घेतली असती. भाऊ नसलेल्यांच्या बंधुप्रेमावर विश्वास ठेवला नसता. पण त्या थोर हृदयाला कसलेच पापी विचार शिवले नाहीत. बहीण निर्मळ तसा तिचा नवराही निर्मळ. किती उपकार त्यांचे माझ्यावर. दोघांनी आमची केवढी बडदास्त ठेवली. किती मेजवान्या दिल्या. एलेफंटा केव्हस दाखवायला नेले. माझी ताई माझ्यासारख्याला नोकर ठेवण्याजोगी श्रीमंत, पण वेळेस नोकरासारखं राबे.

ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम असेल ती व्यक्ती तर आपल्याला पूज्य असतेच. पण त्या व्यक्तीचे पाहुणेही आपले आणि जवळचे वाटतात. तिथेच अगदी जवळचे नातलग आमच्या गावी राहत होते. वरील प्रसंगानंतर काही दिवसांनी मी मुद्दाम त्यांच्या भेटीस गेलो. पदवीधर होते पण फारशा मोठ्या हुद्द्यावर नव्हते. चांगलं वाईट करण्याचा अधिकार त्यांचेकडे नव्हता. त्यांचे बंगल्यावर गेलो. जुनी ओळखही होती. मला पाहताच म्हणाले, "काय बागल केव्हा आलात दौऱ्यावरून? मीही यावं म्हणतो तुमच्याबरोबर. एक प्रचारक म्हणून" मी म्हटलं "ठीक आहे. जाऊ केव्हा तरी पण ते आयुष्य नाही परवडणार तुम्हाला. आमच्यासारखी तुमची गत होईल. आहे तुमची तयारी वारी करायची?"

"वारी? आता नाही वारी येणार तुमच्यावर. अक्कल होती का त्या शहाण्यांना? खर्डेघाशीवरसुद्धा कोणी ठेवलं नसतं त्यांना भलत्या जागा मिळाल्या. जणू स्वर्गच हाती आला त्यांच्या. मग का नाही डोळे फिरणार? तुम्हाला तुरुंगात टाकायची तरी जरुरी होती का? मागण्या तरी अशा काय भयंकर होत्या. संपलं त्यांचं राज्य" ते पुढे म्हणाले "अधिकार ही एक दारू आहे. सत्तेचा मद चढला की माणुसकीला जागा रहात नाही. मग कसा माणूसपणा राहणार त्यांच्यात. आकाश ठेंगणं झालं होतं त्यांना. ते करतील ती पूर्व दिशा. मग गावचे लोक कुठल्या झाडाचा पाला, आता कोण विचारत आहे त्यांना. आता आहेत का ते तुरुंगात घालायला? मी म्हणालो, "ते गेले दुसरे येतील. राजकीय कार्यकर्त्यांना सगळे सारखेच. एका माळेचे मणी."

या आमच्या भाषणानंतर काही काल गेला. दुसऱ्या राजवटीला सुरुवात झाली. आणि आश्चर्याची गोष्ट, याच ताईच्या नातलगास संस्थानातील श्रेष्ठ अधिकाऱ्याची जागा मिळाली. मी तर आनंदाने बेहोष झालो. या बातमीचं वर्तमानपत्र हातात घेऊन खोलीत उड्या मारू लागलो. बायकोला तेथूनच मोठमोठ्याने हांका मारू लागलो. "अगं ए, अगं ए, आधी इकडे ये पाहू.

सांगताच ती माझ्यावर रागावली "आमचे घर असता तुम्ही तिकडे का उतरला ? जा घेऊन या वहिनींना आणि मग बोलत बसा." तिने आग्रह धरला. त्यांत औपचारिकपणा किंवा ढोंगी शिष्टाचार नव्हता. तथापि रहायला यायचे आणि खरी गोष्ट समजली म्हणजे मग अवघड वाटायचे म्हणून प्रथमच सर्व काही कळलेलं बरे म्हणून इत्यंभूत हकीकत कळवली. तेव्हा ती म्हणाली 'सरकारी रोष झाला म्हणजे आप्तसंबंध काही तुटत नसतात. माझ्याच मुलावर किंवा सख्ख्या भावावर हा प्रसंग आला असता तर त्याला काय टाकून यायचे ? मी तुम्हाला भाऊच समजते ना ? जा उगाच काहीतरी मनांत आणू नका. घेऊन या वैनीना. वाटेल तितके दिवस रहा आमच्यात. अगदी कंटाळा येईपर्यंत रहा" मी म्हटलं "ताई तू उगाचच तुझ्यावर संकट कां ओढवून घेतेस ? राजकोपातला माणूस मी. वॉरंटाचा ससेमिरा माझ्या मागं लागलेला. तुझीही माणसं आमच्या संस्थानात आहेत. त्यांच्यावर अवकृपा होईल महाराजांची. मग गळ्यात ही घोरपड का बांधून घेतेस ?

"नको असं काही तरी बोलूस. वॉरंट आलं तर घेऊन जातील. पण तोपर्यंत माझ्या भावाला मी जागा देऊ नये काय ? तुझ्या राजकारणाचा व माझा काही संबंध नाही व मला ते काही समजत नाही. म्हणून भावा-बहिणीचे संबंध मी काय टाकून देऊ ?

ज्यांनी ज्यांनी या ना त्या सबबी सांगून झिडकारलेल्या मला ताईचे शब्द अमृतवर्षावाप्रमाणे वाटल्यास नवल काय ? कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं. "ताई किती ग चांगली आहेस तू. काय ओवाळून टाकू तुझ्यावरून. जिवापेक्षा कोणती गोष्ट मोलाची पण ती ओवाळता येते कुठं ?"

पण हे विचार तोंडावाटे नाही बाहेर पडू शकले. अश्रूंची भाषा मात्र नाही आवरता आली. तिचे पाय अश्रूंनी धुऊन काढावेत असं झालं मला. ती मला मातेप्रमाणं पूज्य वाटू लागली. तिची आठवण काढून अश्रू गाळण्यात किती आनंद वाटतो मला. माझी बहीण. तिच्या गोड आठवणीने या स्वार्थी जगाचा विसर पडतो. तिची आठवण म्हणजे माझ्या आत्म्याची उन्नती. माझ्या पावित्र्याचे स्थान ते, संकटावेळी पावणेपैनी थारा दिला नाही. पाण्याहून रक्त जड म्हणतात. पण तसा अनुभव मला आला नाही. गणगोतांनी जवळ केलं नाही. निखारा अंगावर पडावा त्याप्रमाणं झाडून टाकलं सर्वांनी. माझ्या बहिणीचा नवरा पण तसाच थोर मनाचा. कारण मी रक्ताचा भाऊ नव्हतो. मानलेले संबंध.

दुसऱ्या एखाद्या हलक्या डोक्याच्या माणसानं डोक्यात राख घालून घेतली असती. भाऊ नसलेल्यांच्या बंधुप्रेमावर विश्वास ठेवला नसता. पण त्या थोर हृदयाला कसलेच पापी विचार शिवले नाहीत. बहीण निर्मळ तसा तिचा नवराही निर्मळ. किती उपकार त्यांचे माझ्यावर. दोघांनी आमची केवढी बडदास्त ठेवली. किती मेजवान्या दिल्या. एलेफंटा केव्हस दाखवायला नेले. माझी ताई माझ्यासारख्याला नोकर ठेवण्याजोगी श्रीमंत, पण वेळेस नोकरासारखं राबे.

ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम असेल ती व्यक्ती तर आपल्याला पूज्य असतेच. पण त्या व्यक्तीचे पाहुणेही आपले आणि जवळचे वाटतात. तिथेच अगदी जवळचे नातलग आमच्या गावी राहत होते. वरील प्रसंगानंतर काही दिवसांनी मी मुद्दाम त्यांच्या भेटीस गेलो. पदवीधर होते पण फारशा मोठ्या हुद्द्यावर नव्हते. चांगलं वाईट करण्याचा अधिकार त्यांचेकडे नव्हता. त्यांचे बंगल्यावर गेलो. जुनी ओळखही होती. मला पाहताच म्हणाले, "काय बागल केव्हा आलात दौऱ्यावरून? मीही यावं म्हणतो तुमच्याबरोबर. एक प्रचारक म्हणून" मी म्हटलं "ठीक आहे. जाऊ केव्हा तरी पण ते आयुष्य नाही परवडणार तुम्हाला. आमच्यासारखी तुमची गत होईल. आहे तुमची तयारी वारी करायची?"

"वारी? आता नाही वारी येणार तुमच्यावर. अक्कल होती का त्या शहाण्यांना? खर्डेघाशीवरसुद्धा कोणी ठेवलं नसतं त्यांना भलत्या जागा मिळाल्या. जणू स्वर्गच हाती आला त्यांच्या. मग का नाही डोळे फिरणार? तुम्हाला तुरुंगात टाकायची तरी जरुरी होती का? मागण्या तरी अशा काय भयंकर होत्या. संपलं त्यांचं राज्य" ते पुढे म्हणाले "अधिकार ही एक दारू आहे. सत्तेचा मद चढला की माणुसकीला जागा रहात नाही. मग कसा माणूसपणा राहणार त्यांच्यात. आकाश ठेंगणं झालं होतं त्यांना. ते करतील ती पूर्व दिशा. मग गावचे लोक कुठल्या झाडाचा पाला, आता कोण विचारत आहे त्यांना. आता आहेत का ते तुरुंगात घालायला? मी म्हणालो, "ते गेले दुसरे येतील. राजकीय कार्यकर्त्यांना सगळे सारखेच. एका माळेचे मणी."

या आमच्या भाषणानंतर काही काल गेला. दुसऱ्या राजवटीला सुरुवात झाली. आणि आश्चर्याची गोष्ट, याच ताईच्या नातलगास संस्थानातील श्रेष्ठ अधिकाऱ्याची जागा मिळाली. मी तर आनंदाने बेहोष झालो. या बातमीचं वर्तमानपत्र हातात घेऊन खोलीत उड्या मारू लागलो. बायकोला तेथूनच मोठमोठ्याने हांका मारू लागलो. "अगं ए, अगं ए, आधी इकडे ये पाहू.

आलीस का? हे पहा. ताईचा आपला हा.... केवढ्या मोठ्या जागेवर आला माहीत आहे?''

मी नोकराला हाक मारली. ''रामू इकडे ये पाहू. एवढी तार करून ये अगोदर..'' बायको हसू लागली. ''असं काय करताय अगदी खुळ्यासारखं? रामूनं कधी केली आहे का तार आतापर्यंत? त्याला काय समजणार त्यातलं? अन् तार कशाला करायची? ते का परगावी आहेत? माणूसच पाठवा म्हणजे झालं. आमचे गणपतराव दम्मा जातील.''

लगेच मी एक पत्र खरडलं. खूप खूप अभिनंदन केलं. आणि आशा प्रकट केली की आज आमच्या संस्थानाचं भाग्य उदयाला येणार.

आता गं काय, सत्याग्रह आणि तुरुंग संपला. आता त्यांचा हात धरून कामं करून घेईन. तिला पण तार केलीच पाहिजे. ताईपण राहील त्यांच्याकडे''. ही बडबड चालली आहे इतक्यात दारांत पोष्टमन आला. पाकीट पाहतो तो हस्ताक्षर ताईचंच. घाईघाईनं फोडलं. तो काय ''आपण काही दिवस राहण्याकरता म्हणून सगळी मुलंबाळं व मंडळी येणार आहोत.... यांच्याकडे उतरीन. आल्यावर तुझी गाठ घेईन''.

माझ्या आनंदाला पारावार राहिला नाही. दुसऱ्या दिवशी मी तिच्या आता मोठ्या अधिकारावर आलेल्या आप्तांच्या घरी गेलो. त्यांनाही ताई येणार असल्याचे पत्र आले होते. ताईविषयी विचारपूस झाल्यानंतर मी त्यांना म्हणालो, ''आता तुम्ही मोठ्या जागेवर आला आहात. गेल्या अमदानीतील सगळा बदलौकिक आता तुम्ही धुऊन काढला पाहिजे.''

का कोण जाणे पण मला त्यांच्यात एकदम बदल झाल्याचा भास झाला. मी त्यांना त्यांच्या नावानेच हाक मारीत होतो. याही खेपेस नेहमीप्रमाणेच ते घरचे नाव घेऊन बोललो. पण त्याने त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या. ते म्हणाले,

मिस्टर बागल तुम्ही नावांने मला हाक मारीत जाऊ नका. बरं का पूर्वीच्या अमदानीतील घाण काढायची तर खरीच. पण ती एकदम कशी जाणार. होईल अस्ते अस्ते. संस्थान आहे हे. राजकीय हक्क स्वीकारण्याची लोकांत तरी पात्रता कुठे आहे. मला तरी असं वाटते, आज हिंदुस्थानला ''स्ट्राँग रुलरचीच'' खरी आवश्यकता आहे.

मी घरी निघालो. पण माझं मन अस्वस्थ झालं. मी नावानं संबोधणं आता त्यांना अपमानास्पद वाटावं. हे जवळचे नाते त्यांना आता नको झाले. आणि

विचारांत पण किती बदल झाला हा.

ताई आली. ताई, ताईची आई व नवरा माझ्या घरी जेवायला आले. मीपण ताईला भेटायला जाऊ लागलो. आई तर केव्हा केव्हा चालतच येत. त्या एकदा भीत भीत म्हणाल्या, "बाबूराव सांगायला मला दु:ख होतं.... म्हणाले बागलांनी यावेळी माझ्या घरी न येणं बरं. महाराजांना व रेसिडेंट साहेबांना हे आवडणार नाही" (ताईच्यामुळे हा पुढचा प्रसंग आठवला म्हणून येथे दिला पण ही पुढची गोष्ट.)

**शंकरराव पारकर** - ताईच्या घरी राहिल्यावर मुंबईतील माझ्या दुसऱ्या वर्गबंधू शंकरराव पारकर यांना "मी आलो आहे, सहकुटुंब आलो आहे," एवढं कार्ड टाकलं. हाती पडताच तो धावत आला. घरी नेण्यासाठी मोटर घेऊनच आला. त्यांनाही मी माझी परिस्थिती कळविली. "मग मीही त्याचपैकी समजता काय तुम्ही असे म्हणून त्याने माझी चांगलीच कानउघाडणी केली. पण शांताबाई परवानगी देईनात. "आलेत तर काही दिवस आमच्या इथे राहू द्या. मग न्या." म्हणू लागल्या. तेव्हा काही दिवस बहिणीकडे काढून मी शंकरराव पारकर यांचेकडे गेलो. त्यांनी मला रेवदंड्यास नेले. आपला एक सुंदर हवेशीर बंगला मोकळा केला. तैनातीस नोकर दिला व आमची राजासारखी बडदास्त ठेवली.

उत्कृष्ट हवा, स्वादिष्ट जेवण, पापलेट मासे, शाळीचे पाणी, कोवळं कोवळं खोबरं हा रोजचा खुराक. समोर सुंदर देखावा. फिरायला समुद्रकाठी जावे व घरात बसून वाटेल तेवढी पेंटींग्स समोरच्याच देखाव्याची काढत बसावीत. यामुळे आयकोची प्रकृती सुधारली. संध्याकाळची व चांदण्याची कितीतरी चित्रे काढली. अशा गोड पाहुणचारांत अज्ञातवासाचा लोभनीय काल घालवला.

याच विसाव्याच्या कालांत माझी विचारक्रांती घडून आली. मी सोशालिस्ट मताचा बनलो.

दोन वेळ सुखाचे सुग्रास जेवण. सकाळ, दुपार चहा व फराळ आरामखुर्चीत कुमारी सिगरेटच्या चुंबनसौख्याची लूट करीत, ऐषआरामात दुसऱ्याच्या कष्टावर यथेच्छ ताव मारीत, श्रमजीवनकार्याच्या दु:खाचा अभ्यास केला. परोपजीवी तर मी जन्मापासूनचा. आणि अद्यापही आहेच. पण त्या वेळच्या अभ्यासाने माझ्याकडे पहाण्याची माझी दृष्टी मात्र साफ बदलून गेली. आत्मपरीक्षणाची सवय लागली. माझे व माझ्या वर्गाचे दोष, त्यांची पापे मला स्पष्ट दिसू लागली. शेतकऱ्यांच्या जीवनावर निराळा प्रकाश पडला. कामकरी

वर्गाबद्दल मनस्वी आदर उत्पन्न झाला. तितकाच माझा व माझ्या वर्गाचा तिटकारा येऊ लागला.

पुण्यास उतरलो होतो त्यावेळी मला विलायतेस जाऊन आलेल्या दिनकरराव जवळकरांनी "सोशालिझम"च्या पुस्तकांची मोठी यादी दिली होती. मी प्रथम "इंटेलिजंट वुमनस् गाइड टु सोशालिझम" या पुस्तकाने सुरुवात केली. भाषा फार सोपी, मांडणी नवशिक्याला समजण्याजोगी, यामुळे या तत्त्वाची साधारण कल्पना चांगली आली. यापुढे इतर पुस्तके जड गेली नाहीत. "कार्ल मार्क्स" काही ठिकाणी फार क्लिष्ट वाटला. रसेल व वेब यांचे ग्रंथ आवडले. लॅस्को-वेल्स-लेनिन, बुखारिन वगैरेंचे पुष्कळ ग्रंथ वाचले. त्यांची यादी बरीच मोठी होईल. सोशालिझमखेरीज मात्र कोणाचेही दुसरे पुस्तक हातात धरले नाही. बहुधा मी एखाद्या विषयावर लिहायला किंवा वाचायला सुरुवात केली म्हणजे तीच पुस्तके दुसऱ्या विषयाला सुरुवात करीपर्यंत वाचत असे. मग दुसरा विचारही करायचा नाही. डोक्यातही तेच विचार यामुळे स्वतंत्र विचारही पुष्कळ येऊ शकले.

मी स्वत: शेतकऱ्याकडून मिळणाऱ्या खंडावर व कर्जावर जगणारा; यावेळी छापखान्यापुरता मजुरांचा मालक होतो. अधिकाऱ्याचा मुलगा. इनामदारांचा स्नेही. बड्या रावसाहेब रावबहादूरांच्यात नेहमी मिसळून असणारा. यामुळे या लोकांच्या गुणदोषांची, या पुस्तक वाचनाने मला चांगलीच छाननी करता आली. अनुभव तर पूर्वीपासूनच होता. पण दृष्टी मिळाली नव्हती. आता मला नवा चष्मा मिळाला. त्या नव्या विचारांची सत्यता पटू लागली. याने माझ्या श्रीमंती सवयी गेल्या नाहीत. पण मन मात्र बदलले. मी पूर्वीचा राहिलो नाही. अधिक विचार करू लागलो.

माझ्या निषेधाच्या सभेने मला वाणी दिली व अज्ञातवासाने मला नवा दृष्टिकोन दिला. यामुळे ज्या लोकांनी अडचणीच्यावेळी मला थारा दिला नाही त्यांचा मला आता राग येत नाही. त्या ठराविक परिस्थितीचे ते गुलाम होते. त्या ठिकाणी मी असतो तर कदाचित तसेच केले असते.

हिंदुस्थानचे तसे जगाचे दारिद्र्य जायचे असल्यास, बेकारी नाहीशी व्हायची असल्यास, गुलामवृत्ती जायची असल्यास, "सोशालिझम' हाच खरा व प्रामाणिक उपाय आहे. इतर सर्व उपाय निव्वळ काल पुढे ढकलणारे व मूलत: चुकीचे, बऱ्याच वेळी अप्रामाणिक असतात असे माझे मत बनले.

बोलताना, समाजाकडे पाहतांना व व्याख्यान देतांना, तसेच लिहितांना हे विचार आल्याखेरीज रहात नाहीत. या पवित्र धर्मासाठी घरादारावर तुळशीपत्र ठेवून वाहून घ्यावे व हिंदुस्थानचा कोनाकोपरा जागा करावा असे वाटे आणि या विचारसरणीने प्रेरित होऊन मी लिहायला सुरुवात केली.

**सोशालिझम व सत्यसमाज -** सत्यशोधक समाजाची तत्त्वे समतेला अनुकूल अशीच मला वाटली. ब्राह्मणद्वेषाचा आरोप त्यावर काही व्यक्तीमुळे जरी केला जात होता, तरी कोणत्याही वर्गाचा द्वेष करावा असे सत्यशोधक समाजाचे काही ध्येय नव्हते. सत्य आणि समता या आड येणाऱ्या व्यक्तींविरुद्ध सत्यशोधक समाज आहे व तशीच त्याची तत्त्वे आहेत असे पूर्ण विचारांती मला वाटू लागले. तेव्हा याच समाजातर्फे ''सोशालिझम'चे विचार मांडणे मला योग्य आणि सोईचे वाटले. सोशालिझम व रशिया यांची सांगड असल्यामुळे ते काहीतरी भयंकर असंभाव्य मत आहे अशी बऱ्याच लोकांनी आपली त्याविषयी विचार न करता समजूत करून घेतली आहे. व काही जाणून बुजून या तत्त्वाबद्दल गैरसमज करीत आहेत. ''सत्य आणि समता'' या तत्त्वासाठी व ते तत्त्व व्यवहारात आणण्यासाठीच सोशालिस्टांचा प्रयत्न आहे. सत्यसमाज त्यासाठीच अस्तित्वात आहे. यासाठीच मी सत्यशोधकांना ''इशारा'' ही लेखमाला लिहायला सुरुवात केली.

# जीवन प्रवाह भाग -२

## १) राजकीय लढ्यास सुरुवात

*माधवरावानी आता आपल्या संस्थानातील राजकीय लढ्यास सुरुवात केलेली दिसते. एका भाषणाबद्दल त्यांना राजद्रोहाच्या आरोपाची नोटीस मिळाली. माफी मागण्याचा कठीण प्रसंग उभा राहिला. माधवरावांचा स्वाभीमान व सामाजिक कार्याची तळमळ यात द्वंद सुरु झाले. माधवरावानी कार्याची हानी होऊ नये म्हणून माफी मागितली व कार्य सुरु ठेवले. आंतरजातीय विवाह जाहीरपणे घडवून आणून वधुवरांचा तर्कतीर्थांच्या हस्ते सत्कार केला बहुजन समाजाच्या हितासाठी निर्माण केलेले क्षात्र जगद्गुरु पीठ व क्षात्र जगद्गुरु या चा बिंदू चौकात जाहीर निषेध केला.*

**माफी का खटला :-** ती नोटीस राजद्रोहाच्या आरोपाची होती. १८.८.३८ या दिवशी रविवारवेशीसमोरील पटांगणात केलेल्या

भाषणाबद्दलची. दे. भ. शंकरराव देव यांचे व्याख्यान होते. अध्यक्ष मी होतो. समारोपावेळी बोलताना रागाच्या आवेशात थोडे जहाल शब्द गेले.

"आम्ही तक्रारी करतो ते काही महाराजांचा सूड घ्यावा म्हणून नव्हे. पण त्यांना बदसल्ला देणारे, नीच हरामखोर सल्लागार आमचे रडगाणे, त्यांना ऐकू जाऊ देत नाहीत. कोल्हापुरात कायदेभंग न होता स्वराज्याचे हक्क मिळावे व छत्रपतींची कीर्ती वाढावी अशी आमची अंत:करणापासून इच्छा आहे. त्यांच्या लौकिकासाठी मला खडी फोडावयास लागली तरी माझी तयारी आहे.

माझा रोख अधिकृत सल्लागार अधिकाऱ्यांवर नव्हता. पण तो अपशब्द त्यांनी आपल्या अंगावर ओढून घेतला. याचमुळे बत्तीस तासात माफी मागा नाही तर राजद्रोहाच्या आरोपावर केस घातली जाईल अशा अर्थाची ती नोटीस होती.

विचाराचं काहूर उठलेल्या नोटीशीनं मोठा पेचप्रसंग उद्भवला माझ्या सार्वजनिक आयुष्यात. माफी का खटला? मनाची भयंकर ओढाताण चालली. लौकिकासाठी सद्सद्विवेक बुद्धीला मारू की लोकनिंदेची पर्वा न करता सद्सद्विवेक बुद्धी दाखवील तो मार्ग स्वीकारू? मनाची धरसोड होऊ लागली. माफी मागितली तर लोक काय म्हणतील. कुत्सित टीकाकार माझ्याकडे बोट दाखवून हसू लागतील. भ्याड भ्याड म्हणून सहकारी टाकून देतील. आधीच असा आरोप मजवर काही करीत होते. त्यांना आयतेच फावणार. व्यासपीठावरून व्याख्यान देतांना लोक मला हिणवणार. लोकांचा विश्वास जाणार.

भीरू! भीरू! भीरू! कानांत हाच शब्द सारखा घुमू लागला. लोकांची ती भेदक दृष्टी मला बसल्या जागी भेडसावू लागली. पण काय असेल ते असो या बाहेरच्या सर्व उपाधींना फेकून देणारी जोरदार अंत:प्रेरणा मला बजावीत होती. हीच तुझ्या कसोटीची वेळ आहे. सत्याचा मार्ग तू सोडू नकोस. नाहीतरी लोकमत कधी स्थिर राहिले आहे? महात्मा गांधींनी आपली चूक कबूल करण्याचे धैर्य नाही का अनेकवेळा दाखविले. लोकनिंदेची पर्वा त्यांनी कुठे केली. आज निंदा करणारे काही कालाने स्तुती करतील. खरे कारण त्यांना समजले व ते समजून घेण्याजोग्या मन:स्थितीत आले म्हणजे "केले तेच बरे केले" असे म्हणतील.

चूक माझी होती. माफी मागणं योग्य होतं. मी माझ्या सद्सद्विवेकबुद्धीच्या उलट काही वागत नाही, ही माझी पूर्ण खात्री होती.

माझ्या मनाला ती काही बोचणी नव्हती. नव्हे तेच मला समाधान होते.

१८ ऑगस्ट १९३८ चा दिवस. माझ्या हाती राजद्रोहाची नोटीस व त्याच दिवशी जादा गॅझेट काढून कायदे मंडळाची घोषणा, माझ्या अटकेने लोकमत क्षुब्ध होऊ नये म्हणून कायदे मंडळाची घोषणा.

मी माफी मागायचे ठरवले. ते भीतीमुळे मात्र नव्हे. पण तशी इतरांची खात्री पटवणे मला त्यावेळी शक्य नव्हते. माझ्या मनाची तयारी तुरुंगात जाण्याची होती. तसे मी जाहीरही केले होते. "मला खडी फोडावयास लागली तर मी फोडीन" हे जाहीरपणे मी बोललोही होतो. पण त्या प्रसंगासाठी तुरुंगात जाणे मला काही इष्ट वाटेना. निव्वळ त्या अपशब्दाच्या प्रमादासाठी केस घालून तुरुंगात जाणे व निर्भयतेचे सर्टिफिकेट मिळवणे मला कोणत्याही दृष्टीन शहाणपणाचे वाटेना. तुरुंगात जायचे पण कशासाठी? पण अशा प्रश्नावर जाण्याने लोकहित ते काय साधणार. भ्यालो नाही एवढाच लौकिक आणि त्यासाठी शिक्षा. खोट्या लोकप्रियतेला भाळलो तर पुढे काहीच चांगले काम व्हायचे नाही. अखेर सद्सद्विवेकबुद्धीनेच जिंकले. मी दिलगिरी प्रदर्शित केली.

लोकांचा गैरसमज पुढे योग्यवेळी माझ्या कृतीने मी धुऊन काढीन अशी मला खात्री होती. तसा माझा निश्चय होता. या माझ्या कृत्याबद्दल निपाणीस कटकोळ यांनी जाहीर सभेत अभिनंदन केले. माफीमुळे कज्ज्या खटल्याच्या यातायातीतून निसटून नेहमीच्या दिनचर्येस लागलो.

**पाटील - पिंगळे विवाह : -** करवीर व्याख्यान मालेतर्फे आमदार आत्माराम पाटील व पिंगळे या मराठा-ब्राह्मण विवाहाचे अभिनंदन करण्यात आले. अभिनंदनाचे भाषण माझे व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे झाले. मालेच्या अध्यक्ष मीच होतो. विचार करण्याजोगी गोष्ट. मालेच्या कार्यकारी मंडळातील ब्राह्मण सभासदांना ही गोष्ट आवडली नाही. या सभासदांना व्याख्याने फक्त राजकीय स्वरूपाचीच पाहिजे होती. यांचा सरळ अर्थ, राजकीय सुधारणा पाहिजे, सामाजिक सुधारणा नको. पांढरपेशा वर्गातील ही मनोवृत्ती मला अनेकवेळा दिसून आली. वरच्या वर्गाला आवडेल, वरच्या वर्गाचे श्रेष्ठत्व राहील अशी चळवळ चालली तरच त्याला प्रोत्साहन द्यायचे, अशी वृत्ती अद्याप या वरच्या वर्गात नेहमी डोकावते.

खालच्या बहुसंख्य श्रमजीवी वर्गाची स्थिती सुधारावी, त्यांची गुलामगिरी झडावी हाच माझ्या सार्वजनिक चळवळीचा पहिल्यापासूनचा हेतु

होता. देवधर्मविरुद्ध बोलणे लोकांना आवडत नाही हे जाणूनही जगदंबा देवालयांतील रामाच्या पारावर याच विषयावर बोलत असे.

हिंदू सभावाल्यांबद्दल मी नेहमीच उलट बोलत होतो. त्यांची चळवळ धार्मिक आवरणाखाली आपले वर्गिक वर्चस्व ठेवण्याची, परंपरेच्या हक्कांचे रक्षण करणाऱ्या कुब्ध्या मनोवृत्तीचीच होती.

**क्षात्रजगद्‌गुरू :-** हे हिंदुसभावाले क्षात्रजगद्‌गुरुंचा उपयोग स्वार्थासाठी करून घेऊ लागले होते व तो उपयोग जाणूनबुजून करून देत होते. त्यांना खुश करण्याचे पांढरपेशा पत्रांत त्यांचा गौरव व प्रसिद्धी होत होती. त्यांचे वाचन चांगले आहे. अभ्यासू आहेत, वक्तृत्व व भाषाशैली आकर्षक व खोचदार आहे. पण या गुणांचा उपयोग ज्यासाठी शाहू महाराजांनी त्यांना जवळ केलं आणि संस्थानातील मोठ्या योग्यतेच्या जागेवर नेऊन बसवले, त्यासाठी त्यांनी आपल्या जागेचा उपयोग प्रामाणिकपणे केला नाही. त्यांना आखून दिलेल्या ध्येयात व त्यांच्या आचरणात मनस्वी अंतर पडले. राजाराम महाराजांना खुश करण्याकरीता कोल्हापूरच्या स्वराज्याच्या चळवळीस त्यांनी विरोध केला. संस्थान विलीन होताच छत्रपतींशी बेपर्वाईने वागून कॉंग्रेसच्या मागे लागले. पूर्वीचे कपडे टाकून खादी स्वीकारली. धर्मकारण टाकून राजकारणात सोईस्कर मार्गाने शिरले. संन्यस्तवृत्ती टाकून राजविलासी बंगले उठवले. आता ते कौन्सिलात आहेत. पीठाचे उत्पन्न धर्मकार्यासाठी वापरावयाचे असता स्वत:साठीच त्याचा वापर सुरू केला. त्यांच्या या वागणुकीबद्दल ८/७/५० रोजी बिंदु चौकात निषेध करण्यांत आला. "या गादीवर स्थापन झालेल्या गृहस्थाश्रमी पुरुषाच्या कुटुंब संरक्षणार्थ दरसाल रुपये बाराशे हे नक्तीने संस्थानातून दिले जातील, बाल ब्रह्मचारी असल्यास त्याच्या कुटुंबास दरमहा पन्नास रुपये देण्यात यावे" ही सनदेतील वाक्य यांनी पूर्ण धाब्यावर बसविली. याचा सभेत उल्लेख करून क्षात्रजगद्‌गुरुचा निषेध करण्यात आला.

राजाराम महाराजांच्या राजवटीत क्षात्रजगद्‌गुरुंनी भाई लोकांवर निष्कारण टीका केली. ती मला आवडली नाही. त्याला उत्तर म्हणून बेळगांवच्या "आघाडी" पत्रात मी काही मजकूर पाठवला. संपादक डी. एस. जाधव यांनी खास अंक काढून त्यांत तो घेतला. या अंकावर महाराष्ट्रातील बहुतेक मराठी पत्रातून उलट सुलट टीका आली. अद्याप लोकांत निर्भयवृत्ती आली नव्हती. राजशाहीचा दाब भरपूर होता. क्षात्रजगद्‌गुरुबद्दल छत्रपतींनी निर्माण केलेले,

दरबारात खडी ताजीम मिळत होती. मग संस्थानात त्यांच्यावर कोण टीका करणार. जवळ जवळ राजद्रोहच. घरी शिव्या, बाहेर स्तुती. ही जनतेतील सर्वसाधारण मनोवृत्ती. हे पीठ धार्मिक गुलामगिरी काढून टाकण्याला काही उपयोगी नाही. गुलामगिरी शेंडीवाल्या भटाची जाऊन तेथे पटकेवाल्यांची आल्याने खालच्या समाजाचा फारसा काही फायदा होण्याजोगा नव्हता. म्हणून ही सर्वच पीठे नष्ट झाली पाहिजेत. इतर धर्मपीठांचे जसे गुरू सुखासीन झाले तसे हेही झाले आहेत. तेव्हा माझा रोख तात्विकताच जगद्‌गुरुविरुद्ध होता व तसा मी उघड प्रचारही करीत होतो. पण पुढे राजकीय प्रक्षोभक चळवळीमुळे हा प्रश्न मागे पडला.

## २) हवेरीचे लग्न व धार्मिक, सामाजिक चळवळ

**हवेरीचे लग्न** - यावेळी हवेरी लिंगायत व वधू अस्पृश्य यांचे विवाहाचा प्रश्न पुढे आला. हा समारंभ मी शक्य तितका मोठा करण्याचे ठरवले. कारण त्यालाही मतप्रचारांचे स्वरूप होते. आमंत्रण पत्रिका माझ्याच नांवाने वाटल्या होत्या. काहींची इच्छा त्या मुलीला लिंगायत धर्माची दीक्षा द्यावी अशी होती. हवेरीचाही काही निश्चय झाला नव्हता. पण त्यांनी माझ्या म्हणण्याला मान दिला.

अस्पृश्यांना आहे त्या परिस्थितीतच बरेचसे समजून त्यांचे बरोबर सर्व व्यवहार करणे व वागणे हाच मार्ग बरोबर असे मला वाटले. धर्मांतराची कल्पना मला मान्य नव्हती. कारण त्यांतही अमका एक धर्म दुसऱ्या धर्माहून श्रेष्ठ ही भावना आहे. एकाने दुसऱ्यास पावन करून घेणे यात स्वतःच्या श्रेष्ठपणाची भावना आहेच. अस्पृश्यांना शुद्ध करून घेणे किंवा लिंगायत करून घेणे हा त्यांचा अपमानच होय. रजिस्टर पद्धतीने लग्न करणे सर्वात उत्तम. हेतु पटवून दिल्यानंतर हवेरीना ही गोष्ट मान्य झाली. तेव्हा रजिस्टर पद्धतीने लग्न करून मगच लोकजागृती करता समारंभ ठरवला.

लग्न समारंभ ब्राह्मण पुरोहिताने केला काय आणि कोणत्याही जातीच्या पुरोहिताने केला काय, हे संस्कार अंधश्रद्धा व निरर्थक संस्कार कायम ठेवतात. जी बडबड खालच्या वर्गाला समजत नाही व अर्थाअर्थी जिचा वधुवरांच्या कल्याणाशी काही संबंध नाही, ती कशाला चालू ठेवायची? रजिस्टर पद्धतीने लग्ने होऊ लागल्यास निरर्थक खर्चास तर फाटा देता येईल. पण त्याचबरोबर

समाजही एका धार्मिक गुलामगिरीतून मुक्त होईल. म्हणून जाहीर कार्यक्रम रामाचे पारावर करण्याचे ठरवले. माळ घातल्यानंतर धार्मिक बडबड करण्याबद्दल कोणी तरी सुचवेल. मीच त्याला विरोध केला. या सोंगाची मला जरुरी वाटली नाही. देवदर्शनाला जाण्याचे एकाने सुचवले. त्यालाही मी विरोध केला.

हरिजनांना मंदिर प्रवेश मिळावा म्हणून मी चळवळ केली होती. अस्पृश्याचे हातात हात घालून मीच जगदंबा मंदिर प्रवेश केला होता. पण तो अस्पृश्यांचा देवालयांत जाताना अपमान होत होता म्हणून. त्यांना देवालयात मज्जाव होता म्हणून. इतर हिंदुंना जो हक्क भोगता येत होता तो अस्पृश्यांना भोगता येत नव्हता म्हणून. आता तो प्रश्न उभा नव्हता. त्याच देवपूजेत अस्पृश्यांनी घुटमळत राहणे म्हणजे धार्मिक गुलामगिरीत गुरफटून राहणे होय. म्हणून मी देवदर्शन रहित केले.

**डिग्रजकर इनामदार व अस्पृश्य स्त्री -** या दोन लग्नांनंतर कोल्हापूरच्या उच्च मराठ्यांच्यात खळबळ उडवून देणारा माझ्या अध्यक्षतेखाली झालेला विवाह म्हणजे डिग्रजकर इनामदारांचा एका वन्य जातीतील स्त्रीशी झालेला होय. डिग्रजकर ह्यांचा राजघराण्याशी संबंध असल्यामुळे हा संबंध थोर समजले गेलेल्या मराठ्यांना झोंबला. लग्नाला त्यांच्यापैकी कोणीच हजर नव्हते. लग्न होऊ नये म्हणूनही पुष्कळ प्रयत्न झाला. पण गंगावेस मैदानात सत्यशोधक विवाह पद्धतीने हा विधी पार पडला. लग्नाला खर्च असा काहीच आला नाही. परस्परांच्या गळ्यात हार घालण्याकरीता आला असेल तोच.

## ३) राजकीय चळवळीत उडी घेण्यापूर्वी

*माधवरावांचे कार्य केवळ आंतरजातीय विवाह व मंदीर प्रवेशापुरते मर्यादित ठेवावयाचे नव्हते. त्यांना राजकीय लढा तीव्र करावयाचा होता व या लढ्यात स्वत:ला झोकून द्यावयाचे होते. स्वत:ची राखरांगोळी झाली तरी मनाची तयारी होती. पण त्यांना पत्नी होती, लहान मुलगा होता. त्याचे काय? राजकीय लढ्यात उडी घेण्यासाठी पत्नीची परवानगी घेण्याचा हा प्रसंग हृदय हेलावून टाकणारा आहे.*

*आमदार पी. बी. साळुंखे यानी या प्रसंगाची तुलना गौतम बुद्धाच्या जीवनातील पत्नी व मुलगा यांच्या त्यागाच्या प्रसंगाशी केलेली आहे.*

तथापि या निव्वळ धार्मिक आणि सामाजिक चळवळीत गुंतून पडण्यात मला समाधान वाटत नव्हते. मनाची धाव राजकीय चळवळीकडे होती.

**भाषणबंदी व लेखनबंदी** - मल राजकारण थोडेबहुत समजू लागल्यापासून "भाषणबंदी" हा एक दरबाराचा आम्हा प्रजाजनावर मोठा अन्याय वाटे. कारण कसलीही चळवळ हाती घेतली; मग ती सामाजिक असो किंवा धार्मिक असो, तरी ही भाषणबंदी आड येतेच. सर्व प्रचारकार्याला, जागृतीला, लोकांच्या गाऱ्हाण्यांना तोंड फोडायला, संघटनेला अडथळा येतो. भाषणबंदी म्हणजे मानवी प्रगतीला, विचार विनिमयाला, संस्कृतीला खीळ, मानवतेची पिच्छेहाट. एकमेकांच्या अनुभवातून जगाचे पाऊल पुढे पडत असते. अनुभव परस्परांना सांगून, त्यावर चर्चा झाल्याखेरीज, त्यात सुधारणा कशी करता येणार? तेव्हा ही सभाबंदी काढून टाकण्यासाठी अर्ज, विनंत्या,ठराव व भाषण या द्वारा मी सारखा खटपट करीत होतो.

लेखन साधनावर सरकारने यापूर्वीच गदा घातली होती. माझे व माझ्या वडिलांच्या संपादकत्वाखाली चाललेले "हंटर" पत्र ५००० ची जामिनकी लावून बंद पाडले होते. सनदशीर मागण्या प्रसिद्ध करण्यापलीकडे त्या पत्राने काही केले नव्हते. नंतर डी. एस. जाधवांना पुढे करून "आघाडी" काढले. ते बंद केले. नंतर "धडाडी" नावाचे काढले तेही बंद केले. ही मुस्कटदाबी सहन करून स्वस्थ बसणे म्हणजेच गुलामगिरीत आनंद मानणे व ती मुकाट्याने सहन करणेच होय. यातून आता वाट कशी काढावी या विचारात होतो.

संस्थानात असंतोषाचा जोर वाढतच चालला होता. काँग्रेसही संस्थानी राजकारणाकडे थोडी लक्ष देऊ लागली होती. बाहेरच्या चळवळीचाही संस्थानी जनतेवर परिणाम होत होता. खुद्द कोल्हापूर शहरात सभाबंदीमुळे सुशिक्षित वर्गात असंतोष उत्पन्न झाला होता. तो प्रकट करण्याचे धाडस मात्र त्यांच्यात नव्हते.

मी सभा स्वातंत्र्य मिळावे म्हणून सनदशीर मार्गाची पराकाष्ठा करून पाहिली. अर्ज विनंत्याची भेंडोळी पाठवली. शेकडो सह्यांचे अर्ज पाठवले, ठराव पाठवले. २६ ऑगस्ट १९३८ ला मी, शंकरराव जोशी व मुल्ला असे डेप्युटेशन घेऊन गेलो. संस्थानाबाहेरील पत्रांनी आम्हास खूप पाठिंबा दिला. पण दिवाण सुर्वे यांनी सभाबंदी उठवण्यास अनुकुलता दाखवली नाही. उलट ते म्हणाले की, या हट्टामुळे आश्वासन दिलेले कायदे मंडळ दुरावेल. भाषण स्वातंत्र्य हा तर प्रजेचा मूलभूत हक्क. याला अडथळा आणून घटना ती कसली देणार? मला चीड आली. स्वस्थ बसवेना, उलट निश्चय अधिक वाढला. हा प्रश्न धसाला

लावायचे ठरवले. त्यासाठी जे दिव्य करावे लागेल ते करायचे. सर्वस्व पणाला लावायचा प्रसंग आला तरी लावायचा. पण माघार घ्यावयाची नाही असा निश्चय केला. पण याला खाली खेचणारे दुसरे मन होतेच. यावेळी घरचा प्रश्न उभा राही.

**बायको आणि मूल :-** माझी तयारी झाली पण बायको आणि मूल यांची वाट काय ? झोप उडून गेली. या विचारांत कित्येक रात्री मला जागून काढाव्या लागल्या. मन सारखं डळमळू लागले. असं करता करता एका मध्यरात्री निश्चय कायम झाला.

बायको मुलांचा, घरादाराचा, इस्टेटीचा प्रश्न नसतो कोणासमोर ? या मोहात गुंतून राहिलो तर यातून सुटका कशी होणार? त्रास न होता, झीज न सोसता, ऐषआरामाचा त्याग न करता सुखासुखी देशसेवा कशी होईल; कोणत्या देशसेवकाला कष्टाचा मार्ग चुकवता आला आहे. लोकसेवा आणि राजसेवा करणे कसे शक्य आहे.

याच वेळी दुसरा विचार उभा राही. माझ्या मुलाला कोण पाहणार ? माझ्या खेरीज त्याला कोणाचा आधार नव्हता. भाऊ विभक्त होते. बायको क्षयातून उठलेली. अशक्त आणि दुर्बल. इतर आप्तसंबंधी असून नसून सारखे. फार तर तोंडची सहानुभूती. तीही चोरून दाखवणार. त्याचे आईनेच काय करायचे. मुलाला आईच्या ठिकाणी मीच होतो. सर्व काही उसाभार मीच करीत आलो. क्षय पुन: उलटेल ही भीती. अशा स्थितीत मी तुरुंगात गेलो तर मग यांचे काय होणार ? यातून बायकोचा निभाव कसा लागणार ?

याच वेळी माझे स्नेही कृष्णराव मालपेकर यांचे पत्र आले, तुमच्या देशभक्तीसाठी तुम्ही तुमच्या कुटुंबाचा बळी देण्याचा तुम्हाला अधिकार नाही. त्यांच्या पालन पोषणाची पत्करलेली जबाबदारी तुम्हाला टाळता येणार नाही. स्वत:च्या मुलांना दरवेशी बनवून देशकार्य करणे मला पाप वाटते.

याला मीच मनाशी उत्तर देऊ लागलो "तुकाराम महाराजांनी देवापायी सर्व संसारावर लाथ मारली. बायकापोरांकडे पाहिलं नाही. मग ते पापीच का ? जनतेला ईश्वर मानल्यावर त्या देवापायी सर्वसंग परित्याग नको का करायला ? म. गांधींनी नाही का ही बंधने बाजूस सारली. जवाहरलालजींनी नाही का सुखावर लाथ मारली. मग मी कोण सर्व लोकसेवक याच अवस्थेतून गेले असणार. ते चुकले काय ?

माझे मूल, माझी बायको, म्हणजेच का जग आहे ?. असंख्य बायका

पोरे अन्नान्न करीत तडफडत असताना माझ्याच मुलापुरता मी का विचार करावा? ही पण कोतीच बुद्धी नव्हे काय. करवीर राज्यांतल्या दरिद्री मुलांना, माझ्या आत्माहुतीपासून जर एखादा घास मिळेल तर माझ्या बायको मुलातच गुरफटून बसणे बरोबर होईल काय? व्यापक ध्येयासाठी मी माझ्या स्वार्थाला व मोहाला बाजूस टाकायला नको काय?

मुलाला व बायकोला टाकून जाण्याखेरीज आता दुसरा मार्ग उरला नव्हता. लोकांना सांगू काय की मी तुरुंगात जात आहे. माझ्या मुलाचा संभाळ करा म्हणून; छे छे किती मानहानीची गोष्ट ही. लोकांनी तरी ही जबाबदारी का घ्यावी? कोणी सांगितलं आहे मला हा मार्ग पत्कर म्हणून? माझीच इच्छा ना?

**पत्नीचा पाठिंबा** - बायको गाढ झोपली होती. मूल शांतपणे निद्रावश झाले होते. काय यांना टाकून जायचं. अंगावर झर्रकन काटा उभा राहिला. अश्रू प्रवाह आवरेना. तो थांबविल्यानंतर बायकोवरच हा प्रश्न सोपवावा, आपला निश्चय तिला कळवावा व ती अनुमती देते की काय पहावे म्हणून मी तिला उठवले. मध्यान्ह उलटून गेली होती. सर्वत्र सामसूम. पण भावनेचे वादळ उठले होते. ती म्हणाली, "असल्या वेळी, असं काय विचारायचं आहे ते?"

"माझ्यासमोर शांत चित्तानं बैस. अगदी संकोच न धरता काय ते सांग. माझ्या ध्येयाला तू मदत करशील काय? खडतर दिव्यातून जाणे तुला निभवेल काय? मला तुरुंग येणार हे निश्चित. मी तो आनंदाने भोगीन. त्याची आता माझ्या जीवनाला आवश्यकता आहे. सांग तू बबनचा सांभाळ करशील? तुझ्या प्रकृतीची काळजी घेऊ शकशील?"

माझ्या तळमळीची तिला जाणीव होती. ती थोडा वेळ स्तब्ध बसली आणि शांतपणे वीरपत्नीला शोभेसे माझ्या पत्नीने उत्तर दिले, "जा तुम्ही, आमच्या मोहात गुंतून पडू नका. बाबा आणि मी दोघेच आहोत. मी त्याचा सांभाळ करेन. आमची काळजी करू नका. तुमच्या मनाची कुचंबणा करून राहण्याने तुम्हाला स्वास्थ्य लाभणार नाही. तुम्हाला सुख मिळणार नाही. जा तुम्ही".

इतक्या निश्चयाचे, धीराचे व करारीपणाचे उत्तर तिच्याकडून मिळेल असे मला वाटले नाही. ती गांगरून जाईल असे मला वाटले होते. मी गहिवरून आलो. कृतज्ञतेने भरून आलो. मानापमानाचा प्रश्न बाजूस सारून तिचे पाय धरावेत असे मला वाटले.

अद्याप तिच्या शब्दावर विश्वास बसेना. खात्री करून घेण्याकरीता

पुन: विचारले, "खरंच ना सांगतेस हे? माझी भीड म्हणून नव्हे ना? होणारे हाल, भोगण्याचा झाला आहे का निश्चय तुझा ?"

"होय झाला आहे. तुम्ही आमची कसलीही काळजी करू नका. आमचा विचार न करता तुम्ही तुमच्या कामास लागा".

"अगदी खरं ना हे? मग माझी शप्पथ घे पाहू? तुझ्या कुंकवाची घे". कुंकवाची शपथ तिने दिली. एवढ्याने माझे समाधान झाले नाही. तिच्या-माझ्या दोघांच्याही जीवनाहून आम्हाला प्रिय अशा जीवाची मी कठोर होऊन शपथ मागितली. बाबा शांत झोपला होता. सुखनिद्रेत दंग होता. आमचे काय चालले आहे त्याची काय कल्पना त्याला. मी त्याची शपथ मागितली. "घे बाळ दौलतची शपथ घे." "अद्याप विश्वास नाही वाटत? बरं त्याची घ्या". अश्रू आवरून तिने शपथ घेतली. डोळ्यात टिपूसही दिसू दिले नाही. तिने बाबाची शपथ घेतली.

झाले. माझी सर्व भीती गेली. आता मी प्रत्यक्ष काळालाही भिणार नाही. मग तुरुंगाची, नव्हे माझ्या जीवाची ती काय कथा. माझ्या वीर पत्नीने माझे ध्येय निश्चित केले. ती जर कचरती तर कोण जाणे माझा निश्चय एखादेवेळी ढळलाही असता. म्हणून माझ्या जनसेवेचे बरेचसे श्रेय तिच्याच पदरी पडेल. पण जगाला त्याची काय ओळख. नाव माझे, ती जगाआडच. स्त्रीच्या त्यागाची करारीपणाची जगाला काय कल्पना. तिचे सर्व किरकोळ दोष मी विसरलो. ती मला पूज्य वाटू लागली.

## ४) शिरोळ मोर्चा व अटक

*माधवराव बागल यांच्या प्रत्यक्ष लढ्याला सुरुवात शेतकऱ्यांच्या, कष्टकऱ्यांच्या मागण्या घेऊन झालेली दिसते. या विराट शिरोळ मोर्चाचे वर्णन माधवरावांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीत येथे आहे. उतारा खूप बोलका आहे.*

**राजधानीत मोर्चा :-** संस्थानाभोवतालची बहुतेक सर्व खेडी झाल्यावर आता कायदेभंगाच्या तयारीने राजधानीत जाण्याचे ठरवले. लोकांच्या मागण्या निश्चित केल्या. त्या त्यांना चांगल्या समजावून दिल्या. त्या मागण्यांची हजारो पत्रके छापून घेतली. लोकांच्या हातात दिली. कारण आत गेल्यानंतर त्यांच्यात विसंगती निर्माण होऊ नये अशी आगाऊ सर्व तयारी केल्यानंतर मोर्चा जाण्याची नक्की तारीख जाहीर केली, २५ डिसेंबर १९३८ हा मोर्चाचा पहिला दिवस ठरवला.

राजधानीत जाणाऱ्या मोर्चेवाल्यांना पुढील संकटांची पूर्ण जाणीव दिली. मोर्चाच्या लोकांना कोल्हापूरपर्यंत निर्विघ्नपणे पोचण्यासाठी मिरज स्टेशनवरच गाडीत बसवण्यात आले. गाडीत संस्थानी अंमलदारांना काही करता येत नव्हते व स्टेशन आवारांतही काही करता येत नव्हते. याचा आमच्या चळवळीला फार फायदा झाला.

कोल्हापूरच्या आताच्या चळवळीचे वैशिष्ट्य हे होते की, चळवळीचा उगम शेतकऱ्यांच्या पोटापाण्याच्या प्रश्नातून झाला होता. नाराज पांढरपेशाच्या महत्त्वाकांक्षेतून झाला नव्हता. सुशिक्षितांनी, पांढरपेशांनी आणि भांडवलवाल्यांनी किंवा मराठा जमीनदारांनी यात भाग घेतला नव्हता. वरचा नोकरपेशा वर्ग व भावनेने छत्रपतिनिष्ठ असलेला वर्ग यांत सामील नव्हता. ही चळवळ खालच्या कष्टकरी शेतकऱ्यांची होती. ती एक जगण्याची धडपड होती. काँग्रेसचा या चळवळीचा प्रत्यक्ष असा काही संबंध नव्हता. त्यांच्या प्रोत्साहनाने ही चळवळ उभारली ही समजूत चुकीची होती.

सूत्रे आपल्या हाती ठेवण्याचा प्रयत्न त्यांचा झालाच नाही. पण त्यांच्या अपेक्षेप्रमाणे यश त्यांना आले नाही. शिखरे त्यावेळी दक्षिणी लोकसभेचे सेक्रेटरी होते व शंकरराव देव काँग्रेस कार्यकारिणीचे सभासद होते. तेव्हा बाहेरच्या राजकीय संस्थेचा आम्हाला पाठिंबा असावा, सहानुभूती असावी असे आम्हास वाटणे साहजिकच होते. नाहीतर आमचे खून पडूनही बाहेर आवाज उठला नसता. सरकारला आम्हाला चिरडून टाकताना कसलीच भीती वाटली नसावी. तेव्हा बाहेरच्यांच्या चिथावणीने आम्ही चळवळ चालू केली असा काही आरोप करतात तो चूक आहे.

**कायदेभंगाला सुरुवात :-** आतापर्यंत राजकीय मागण्याविषयी विशेषत: सभाबंदी उठविण्यासाठी मी अनेक लेख लिहिले होते. अर्ज, विनंती, ठराव, डेप्युटेशन हे सर्व सनदशीर प्रकार झाले होते. त्याचा सरकारवर काहीही परिणाम झाला नाही. कायदेभंगाखेरीज सरकार वळत नाही हे आता निश्चित झाले होते. यावेळी तुरुंग टाळणे म्हणजे लोकजागृती मारून टाकण्यासारखे होते. माझ्या तुरुंगात जाण्याने आता लोकात विश्वास उत्पन्न होणार होता. धैर्य चढणार होते. संघटना मजबूत होणार होती. म्हणून मला हा काल कायदेभंगाला अत्यंत योग्य असा वाटला. याचमुळे माझी भीती समूळ नाहीशी झाली होती. मी तुरुंगाला हपापलो होतो. कितीतरी वर्षाची माझी मनीषा तृप्त होणार होती.

मिरजेच्या स्टेशनवर येतांच मिरजेच्या लोकांनी सत्कार केला. येथे चार शब्द बोललो. जयसिंगपूर, रुकडी या स्टेशनवर गर्दी असल्याचे समजले म्हणून गाडीस जादा डबे जोडले. ही आमचीच स्पेशल ट्रेन होती असे म्हटले तरी चालेल. नेहमीपेक्षा गाडी किती तरी मोठी होती. माझ्या डब्याच्या दोन्ही बाजूला भगवे झेंडे लावले होते. गाडी अगदी हळूहळू चालली होती. चालत असतानाही लोक आत घुसत. शेतकरी कुतूहलाने गाडीकडे पहात. जयजयकाराचा प्रतिध्वनी त्यांच्या तोंडून सारखा उठत होता. गाडीतून आम्ही त्यांच्यावर पत्रकाचा वर्षाव करीत होतो. आम्हाला लोक मिळू नयेत म्हणून अधिकाऱ्यांचे प्रयत्न सारखे चालले होते. लोकांना अधेमधे रस्त्यात अडवून धरण्यात येत होते. त्यातून कितीतरी निसटून स्टेशनवर पोचले होते. आगगाडीत येतील त्यांना घेत होतो. तिकीटाची हमी आम्ही घेतली होती. प्रत्येक स्टेशनवर जमावात वाढ होत होती. प्रत्येक स्टेशनवर आमचे स्वागत होत होते. गाडी कोल्हापूर स्टेशनवर येऊ लागली. खिडकीतून बाहेर पहातो तो जनसमुदायाचे थवेच्या थवे प्लॅटफॉर्म सोडून गाडीच्या समोर आले होते. उचंबळून आलेल्या लोकांच्या उत्साहाला गाडी थांबवू शकली नाही. पोलीस आवरू शकले नाहीत. मी बरेच दिवसांनी कोल्हापूर हद्दीत पाय टाकला होता. तो आता तुरुंगात जाण्यासाठी. यामुळे लोकांच्या डोळ्यातून प्रेमाचा ऊत आला होता. माझे स्नेही व प्रेम करणारे मोठ्या कष्टाने डब्यात शिरून मला कडकडून भेटले. भाविक लोक पायावर पडण्यासाठी व हार घालण्यासाठी धडपड करू लागले. साहित्यिक प्रो. ना. सी. फडके सरकारी नोकर असूनही भेटण्यास व जमावाचा फोटो घेण्यास आले होते. त्यांना त्याबद्दल पुढे बराच त्रास झाला.

**जनतेचे विराट स्वरूप :-** माझ्या डोळ्यांना व्यक्ती दिसत नव्हत्या. जनतेचे विराट स्वरूप तेवढं दिसत होते. स्त्री-पुरुष, लहान मोठे त्या स्वरूपांत विलीन झाले होते. एवढ्या प्रचंड जनसमुदायासमोर मी पकडला जाणार होतो. या कल्पनेमुळेच आनंदाने व अभिमानाने माझी छाती भरून येत होती. माझ्यावर त्या सर्वांच्या भावना खिळून राहिल्या होत्या. माझ्या जन्माचे आज सार्थक होणार होते. अंगावर रोमांच लहरी उठत होत्या. स्वराज्य मंदिराची घंटाच जणू माझ्या जयजयकाराने वाजत होती. ती माझी कुढी भावना नष्ट झाली होती. तो आमच्या ध्येयाचाच दुदंभिनाद होता. माझे भाषण मी विसरून गेलो होतो. भरल्या पुरासारखा जनसंमर्द जिकडेतिकडे पसरला होता. व त्या महापुराचा सारा ओघ

माझ्याकडे धांव घेऊन फोफावू लागला होता. त्या लोकगंगेच्या प्रवाहात मी वहात चाललो होतो. तो जयजयकार माझा नव्हता. बागल या क्षुल्लक कीटकाचा नव्हता. संस्थानी प्रजेची दबून राहिलेली भावना माझे नाव घेऊन किंचाळ्या फोडून बाहेर पडत होती. बंधनातून मुक्त होत होतो. स्वातंत्र्याची बाहेर पडण्याची ती धडपड होती. गुलामगिरीच्या शृंखला तुटत चालल्या होत्या. त्याच्या आशेचे व शक्तीचे मी एक प्रतिक झालो होतो. माझी पण तीच स्थिती झाली होती. समाज, फक्त समाज, अफाट समाज, मूर्तिमंत ईश्वराचे ते विराट स्वरूप. त्या दिव्य आणि भव्य स्वरूपात मी विलीन झालो होतो. देहाची, मनाची, स्वार्थाची व भीतीची सर्व बंधने तुट्रून पडली होती. यावेळी मनाच्या उच्च पातळीत मी जाऊन बसलो होतो. इतर गोष्टी मला दिसत नव्हत्या. वस्तुस्थितीचे वर्णन माझ्या हातून बरोबर होणे जवळ जवळ अशक्य असल्याने, ''ज्ञानप्रकाश' मधून आलेला मजकूरच मी खाली देत आहे.

''पूर्वी प्रसिद्ध झाल्याप्रमाणे आज भाई माधवराव बागल यांच्या नेतृत्वाखाली सुमारे तीन हजार शेतकरी शिरोळ, जयसिंगपूर, हातकणंगले वगैरे गावाहून येथे कोल्हापूर राजवाड्यावर मोर्चा नेण्यासाठी पावणे बारा वाजता गाडीने पोहोचले. त्यापूर्वीही दोन तीन गाड्यांनी नि मोटारींनी येथे बरेच शेतकरी आले होते. अगदी गरीब असलेले शेतकरी शेकडो असे आपआपल्या गावाहून पायी आले होते. आज या शेतकऱ्यांचे मोर्चाचेवेळी कसलाही गोंधळ उडू नये व शक्य तो लोकांची गर्दी पार व्हावी म्हणून मेजर बाबासाहेब निंबाळकर, चीफ पोलीस ऑफिसर यांनी पोलीस बंदोबस्त शहरात खूपच दांडगा नि कडक ठेवला होता. सर्व पोलीस लाठीबाज असून स्टेशनकडे जाणाऱ्यांवर त्यांनी चांगलेच नियंत्रण ठेवले होते. प्रत्येक नाक्यावर वरिष्ठ अधिकाऱ्यांची टेहळणी होतीच. पोलिसाच्या मदतीस लाल डगला रिसाल्याचे, घोडेस्वारांचे लहानसे दळ कर्नल खानविलकर यांच्या नेतृत्वाखाली सज्ज होते. नाकेबंदी करण्यास घोडेस्वार नि लाठीबाज पोलीस यांचा काही काळ उत्तम उपयोग झाला. पण भाई बागल यांची भगव्या झेंड्याने नटलेली ''मोर्चा ट्रेन'' हजारो लोकांच्या जयजयकारात स्टेशनमध्ये घुसताच त्यांना पहावयास आतुर झालेल्या नागरिकांचा उत्साह अमर्याद होऊन सर्व दिशांनी लोक पोलिसांची फळी फोडून आत गेले व स्टेशन पुढील सर्व गांधी टोप्या, फेटे नि हॅटस् यांनी फुलून गेले. प्लॅटफॉर्मवर गर्दी फार होऊ नये म्हणून प्लॅटफॉर्म तिकिटे बंद करण्यास आली होती. पण त्याचाही

मुळीच उपयोग झाला नाही. सर्व फलाट आणि पलीकडील रेल्वे रस्ताही माणसांनी भरून गेला होता. रुळावरील माणसांची दाटी बाजूस सारून इंजिनला आपला रस्ता काढताना आज खरोखरीच नाकीनऊ आले.

गाडीची वेळ ११-२० होती पण प्रत्यक्ष आगमन ११-४५ नंतर झाले. कोल्हापूर स्टेट वेटिंग रुमसमोर भाई बागलांचा भगवा झेंडा लावलेला तिसऱ्या वर्गाचा डबा उभा राहताच प्रमुख नागरिक, विद्यार्थी नि व्यापारी तिकडे घुसले व त्यांनी अभिवादनपूर्वक भाई बागलांना हारांनी भरून काढले. इतर लोक "शिवछत्रपती महाराज, प्रजा स्वातंत्र्य, भारत-माता नि जवाहर-बागल की जय" असा प्रचंड गजर करून सर्व वातावरण दुमदुमून सोडीत होते. फलाटावरील हे स्वागत आणि फोटो झाल्यावर भाई बागल स्टेशनपुढील पटांगणात बसून राहिलेले शेतकरी विद्यार्थी नि नागरिक यांच्या दहा हजारावरील समुदायापुढे शेतकऱ्यांच्या मोर्चाचा हेतू नि जनतेच्या मागण्या यासंबंधी भाषण करण्यास उभे राहिले. व्याख्यानास टेबल खुर्चीची उणीव होती ती रेल्वे बस सर्व्हिसच्या मोटारीने भरून काढली."

- ज्ञानप्रकाश

"श्री. बागल यांच्या वाणीने काम सुरू केल्याबरोबर सर्वत्र शांतता नांदू लागली. श्री. बागल म्हणाले -

"आज येथे मी व्याख्यान द्यायला आलो नसून शेतकऱ्यांच्या व गरीब रयतांच्या मागण्या मागण्यास आलो आहे. श्री. छत्रपती व भगवा झेंडा यांचा पूर्ण आदर व मान राखून आपली गाऱ्हाणी आपल्या महाराजांच्या कानी घालण्यास आपण आलो आहोत. शेतसारा कमी करावा व शेतकऱ्यांना कायमची भाकर द्या. ही पहिली मागणी आहे. दुसरी मागणी भाषण स्वातंत्र्य मुद्रण स्वातंत्र्य इ. मानवी मूलभूत हक्कांची होय. छत्रपतींची प्रजा म्हणजे जनावरे नसून त्यांना माणुसकी आहे आणि म्हणून माणुसकीचे हक्क आम्हाला द्या. हे मागण्यास आम्ही आलो आहोत. तिसरी मागणी जबाबदार राज्यपद्धतीची. लोकांनी निवडलेल्या व्यक्तींचे बहुमत असलेली, आपले राज्य छत्रपतींच्या नेतृत्वाखाली चालविण्याची मुभा देणारी राज्यपद्धती आम्हाला हवी. व बदलत्या कालमानानुसार आमच्या मागण्या मान्य करा असे आमचे रास्त म्हणणे आहे. श्री. बागल यांचे भाषण झाल्यावर शेतकरी लोकांना चारांच्या रांकेने उभे राहण्याची व्यवस्था सुरू होऊन अदमासे सव्वा वाजता मोर्चास प्रारंभ झाला.

मोर्चाबरोबर पुढे मागे पोलिसांचा गराडा होताच. शिवाय प्रारंभी गर्दी हटविण्यासाठी घोडदळ सज्ज होतेच. या मिरवणुकीचे दृश्य शाहुपूरी पोष्ट ऑफिसपासून ते दाभोळकरांच्या बंगल्यापर्यंत हा जनसंमर्दाचा साचलेला सडा पासून विस्मयाने मानवी मन थक्क झाल्यास नवल नाही.

**अटक :-** "शिरगांवकर यांचे बंगल्याजवळ मिरवणूक थांबल्याचे कळतांच एकच कल्लोळ उडाला. हा कल्लोळ शांत होताच श्री. माधवराव बागल यांना अटक करून नेल्याची बातमी सर्वत्र फैलावली. मोर्चाबरोबर प्रांताधिकारी व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट वगैरे अधिकारी होते".

- "विद्याविलास"

माझ्या अटकेनंतर मोर्चा सुर्वे दिवाणांच्या बंगल्यावर गेला. तेथे त्यांनी आपल्या मागण्या दिवाणांना कळवल्या व त्यांनी त्यांची कशीबशी समजूत केली, वगैरे वृत्तांत मला अटकेत वाचण्यास मिळाला.

दुसरे दिवशी सकाळी माझी पत्नी व बाळ दौलत भेटण्यास आले. बायकोला साहजिकच घुटमळल्यासारखे झाले. तथापि तिने आपल्या डोळ्यातील पाणी मोठ्या कष्टाने आवरल्याचे दिसत होते. पण निश्चय ढळला होता असे मात्र नाही. कारण पुढे तिने माझ्या कल्पनेबाहेर धैर्य दाखवले. मी घरच्या मोहाने कदाचित जामीन देईन म्हणून तिने तसे न करण्याचा निरोप श्री. उत्तमराव शेणोलीकर यांचेकडून पाठवला.

## ५) कोल्हापूर सेंट्रल जेलमधील अनुभव

*कोल्हापूरच्या सेंट्रल जेलमधील हे अंगावर शहारे आणणारे वर्णन भाईजींच्या सोप्या व सुटसुटीत चित्रमय वर्णन शैलीचा उत्कृष्ट नमुना आहे. भाईजी हाडाचे चित्रकार असल्यामुळे शब्दाच्या माध्यमातून, तुरुंगातील परिस्थितीचे हुबेहुब चित्र वाचकांसमोर उभे करतात. भाईजींच्या शैलीला असलेली विनोदाची किनारही या वर्णनातून डोकावते.*

**कोल्हापूर सेंट्रल जेलमध्ये :-** पोलीस हेडक्वार्टरनंतर मला सेंट्रल जेलमध्ये नेण्यात आले. तुरुंग पाहण्याचा हा पहिलाच प्रसंग. तुरुंगाजवळून अनेकवेळा गेलो असेन. पण तुरुंगाच्या आतील प्रकारची काही बरोबर कल्पना नव्हती. गावातून कैदी कामावर जाताना व परतताना तेवढे पाहिलेले. त्यांचे दावणीत मीही केव्हातरी बांधला जाईन असे वाटत होते, तरी प्रत्यक्ष खालच्या

जिण्याची सवय नसल्यामुळे हा अनुभव त्रासाचा व कष्टाचा वाटणे साहजिकच आहे. माझ्या मनाची जरी पूर्ण तयारी झाली होती तरी या अगदी निराळ्या वातावरणात पडल्यामुळे व या नव्या आयुष्याचा कसलाही संबंध नसल्यामुळे माझे धैर्य जरी खचले नव्हते तरी अगदी चमत्कारिक होऊन गेले. वातावरणांत मला गुदमरून गेल्यासारखे झालं.

आतला देखावा भीषणच होता. एखाद्या जुनाट किल्ल्यावरच्या भव्य दरवाजाप्रमाणं हत्तीच्या टकरीनंही उघडला जाणार नाही असा घणगंभीर दरवाजा होता. तो शोभेसाठी, पण आतील हेतू दाखविण्यासाठीच जणू हत्तीचे साखळदंड दारावर लोंबत होते. दरवाज्यावर संगिनी अडकवलेल्या इन्फ्रंटीचा पहारा होता. पाहरेकऱ्यांचा तो लष्करी गणवेष. त्यांचे ते भावनाशून्य चेहरे व दारासमोर चाललेली त्यांची यांत्रिक हाचचाल त्या भेसूरपणात भरच घालीत होती. इकडे मी पहात होतो इतक्यात एका भयसूचक घंटेने नव्या नाटकास सुरुवात झाली. यमाचे दार उघडल्याप्रमाणे लोखंडी बेड्यांचा खणखणाट होता तो. पुराणकालच्या राक्षसांनी शत्रूंचा सूड उगविण्याकरिता मानवांना जड शृंखलांनी बांधलेली चित्रे पाहतो ना आम्ही, अगदी तसेच. राज्ययंत्राचे बळी त्या दारातून बाहेर पडत होते. लोंढाच लागला होता त्यांचा, त्या प्रवाहाचा उगम लोखंडी अरुंद अशा दिंडीतून होता. डोक्यावर विद्रुप टोपी, अंगात एक आखूड बंडी, खाली लंगोटी किंवा चड्डी, खांद्यावर घोंगडे व पायात साखळदंड, चालताना त्या बेड्या एकमेकावर आपटून असंतोषाचा आवाजच जणू काढीत होत्या. आम्ही पण सत्तेचे गुलाम म्हणून त्या रडत असाव्यात. त्यांच्यामागे, त्यांच्यावर हुकूमत चालवणारा, काळा डगला, पिवळी पगडी, हातात दंडुका घेतलेला वार्डर, मागे खांद्यावर बंदूक टाकलेला खाकी कपड्याचा पोलीस.

मला आत आणले त्यावेळी हा चित्रपट चालू होता. हेडक्वार्टर्सच्या पोलिसांनी मला सेंट्रल जेलच्या पोलिसच्या ताब्यात दिले. तेथे जेलच्या एका ऑफिसरसमोर तेथल्या वैद्याने माझ्या अंगावरचे कपडे, जिनसा वगैरेची मोजदाद करून त्यांनी नोंद केली. चेहरेपट्टी, उंची, खाणाखुणा टिपून घेतल्या व वैद्यांच्या नेहमीच्याच खोलीत पाठवून दिले. मी अटकेत म्हणून जरी होतो तरी गुन्हेगार कैद्यांचेच खोलीत कोंडून ठेवले.

कैद्यांचे जेवण आले. एक खोलगट थाळी, भात त्यातच, सांबारेही त्यातच आणि भाकरीही त्यातच. शौचाला नेतो तसले टमरेल पाणी पिण्याला.

सकाळी नुसता झुणका-भाकर. तो भाकरीचा घ्यायचा. भाकरी दोन तीनशे, कैद्यांच्या अर्ध्या तासात बडवून तयार व्हायच्या. मोठ्या, कच्च्या केव्हा जळक्या असायच्या. संध्याकाळी भाताचे होंडके, व पारदर्शक सांबारे, न झेपण्याजोगे तिखट. एवढ्या मोठ्या शिताचा भात जन्मात खाल्ला नसेल. पाहूनच गरगरू लागले. निव्वळ कल्पना आणि अनुभव यात बराच फरक असतो. आता हे जिणे कसे निभावणार. तुरुंगातून बाहेर पडेपर्यंत आम्ही खलास होणार असे वाटू लागले. जेवण पहिल्या दिवशी तर काहीच गेले नाही. तसेच देऊन टाकले. संध्याकाळी सहा वाजता माझ्या खोलीस कुलूप पडले. नंतर डेप्युटी जेलरची फेरी झाली. मला ज्या भागात ठेवले होते त्याला गुमानी म्हणत. दिवाणी आरोपी विशेषत: तेथे कोंडीत तेथेच एका बाजूला अगदी लहान खोल्यात फाशीचे गुन्हेगार कैदी कोंडून ठेवीत. हातापाय मोकळेपणाने झाडता येण्याजोगीही त्या खोलीची लांबी रुंदी नव्हती. माझी खोली मोठी होती. मी राजकीय गुन्हेगार. माझा सहवास दुसऱ्यास लागू नये म्हणून मला अगदी एकटेच ठेवले होते. ती खोली मोठी होती, म्हणजे चांगली होती असे नव्हे. तो भाग आवाराच्या गलिच्छ बाजूस होता. भिंतीपलीकडे सर्व शौचकूपच. हवा खेळायला जागा नव्हती. किल्ल्याच्या खंदकाचा तो एक कोपरा होता. खोली कोंदट होती तशीच दमटही होती. कोपऱ्यात गजाबाहेर चावी होती. तिचा ओलावा आत चढला होता. बाहेरच्या दुसऱ्या बाजूस पलीकडे अगदी अंधारी खोली होती. तिची लोटझाड नव्हती. दिवसाही अंधारच. मध्ये लोखंडी गज. त्या खोलीतून केव्हा कोण प्राणी शिरकाव करील सांगता येणार नाही. रात्री खोलीत दिवा ठेवण्याची परवानगी नव्हती. त्यामुळे खोलीत साप, विंचू, बेडक्या आल्यास स्पष्ट दिसण्याजोगे नव्हते. तसे प्रसंग आलेले काही वेळा. हिरवे किडके साप, विंचू, बेडूक नेहमी आढळत. मारायला काठी नाही. जवळ सोबत नाही. पोलिसाला हाक मारल्यास त्याला कुलूप काढण्याचा अधिकार नाही. त्याला जेलरची परवानगी पाहिजे. ती परवानगी मिळेपर्यंत, प्राचीन युद्धनीती मानून त्या प्राण्यांनी हल्ला करता कामा नये. इतर गुन्हेगारांना दुसऱ्या कैद्यांचा सहवास तरी मिळे, मला तोही नव्हता. या इतर प्राण्यांची मैत्री सहजासहजी जमण्याजोगी नव्हती. खोलीत अंधार, एकांत आणि भयाणता. सर्वाहून मोठा गुन्हेगार होतो मी. म्हणून खास वागणूक मिळाली. शिक्षेपूर्वीची दीक्षा होती. पुढच्या नाटकाची नुसती सुरुवात झाली. कैद्याचे बोलणे बंद झाले. साताचे पुढे बोलायचे नाही. बेड्यांचा आवाज

करायचा नाही अशी ताकीद होती. पोलिसांच्या येरझाराही बंद पडल्या. मी बिछाना पसरला. खाली घोंगडे, उशाला घोंगडे, वर घोंगडे, गादीची व मच्छरदाणीची सवय, घोंगडे अंगाला रुतू लागले. खाली पलंगपोस नव्हता. घोंगड्याचे आत चादर नव्हती. त्यामुळे कूस बोचू लागली. या पहिल्या सलामीनंतर घुंगुरट्यांनी रणशिंग फुंकले. मच्छरदाणीची ढाल नसल्यामुळे त्यांचा हल्ला मुकाट्याने सहन करावा लागला. तोंडावर पांघरुण घ्यावे तर गुदमरल्यासारखे वाटू लागले व तोंडाला बोचू लागले. यावेळी बाहेर कुठे जायचे नसले तरी, आपण कडीकुलपात आहोत, पोलिसांच्या पहाऱ्यात आहोत ही कल्पना असह्य होत होती. गजामधून निळ्या आकाशाचा थोडासा तुकडा दिसे. त्यावर छपरावरचे वाळलेले गवत वाऱ्याने डुलत असे. मला हेवा वाटला त्या गवताच्या झुपक्याचा. त्याच्या स्वातंत्र्याचा. त्या उंचावरून त्यांना भोवतालचा भाग दिसत असेल. ते पाहूनच ते आनंदाने डुलताहेत. आहे कां त्यांचे स्वातंत्र्य मला. निर्जीव वस्तूही माझ्याहून आनंदी आणि स्वतंत्र आहेत नाही ? मनाच्या या भराऱ्या फार उड्या मारू लागल्या म्हणूनच की काय ढेकणांनी चावे घेण्यास सुरुवात केली. खालून वरून आजूबाजूच्या बारमधून त्यांच्या तुकड्या चाल करून येऊ लागल्या. काही पॅराशूटप्रमाणे वरच्या तक्तपोशीतून एकदम खाली उतरत. पूर्वी याच खोलीत १०/१५ कैदी असत. आता मी एकटाच सापडलो त्यांच्या तावडीत. प्रथम माऱ्यासाठी हातपाय आपटले. पुढे अगदी हैराण होऊन हातपाय झाडू लागलो. पुढे थकलो पण कोणी दया केली नाही. शरण आलेल्यास पुन: हैराण करायचे नाही ही युद्धनीती त्यांनी स्वीकारली नाही. माझी ही शोचनीय स्थिती कोणीतरी मित्राच्या कानावर घालावी म्हणून जीव धडपडू लागला. पण जवळ कोणीच नव्हते. मग सहानुभूतीचा शब्द कुठला कानावर पडणार. पण शब्दासाठी भुकेलेल्या कानाला थोडा खाऊ मिळाला. किती पण मनाला आनंद वाटला त्याने. चावीच्या पाण्याचा टप् टप् टप् असा कर्णमधुर आवाज त्या स्थितीतही मनाला रिझवू लागला. कसले गाढे संगीत त्यात साठवले होते कोण जाणे. बाहेरच्या जगात अशा क्षुल्लक गोष्टीकडे कधी तरी लक्ष वेधले असते का ? थकून अगदी सकाळच्या प्रहरी डोळा लागतो इतक्यात उठण्याचा बिगुल झाला.

सकाळच्या बिगुलामुळे खडबडून जागा झालो. पालिसांचे जागा धरण्याचे नंबर झाले. थोड्याच वेळात प्रात:विधीस जाणाऱ्या कैद्यांच्या बेड्यांचा

खणखणाट सुरू झाला. दोनतीनेशे कैदी १०/१५ मिनिटात सर्व आटोपते घ्यायचे. समोर दुसरा कैदी उभा. थोडा उशीर झाला की वार्डर ओढून काढणार. जागा थोड्या, वेळ ठराविक आणि माणसे जास्त. तो सर्व प्रकार अंगावर शहारे आणण्याजोगा होता. लाजलज्जा सोडून सर्वांनी, अंगाला अंग लागून उघड्या जागेत, दुसऱ्या देखत बसायचे. जवळ पाण्याचे टमरेल नाही. त्या तशा गलिच्छ अवस्थेत, लहान मुलासारखे उठून एका हौदावर टमरेल मोकळे होण्याची वाट पहात उभे रहायचे. बाथरूममध्ये दार लावून आंघोळ करणाऱ्याच्या मनावर हे भयंकर दृश्य काय परिणाम करील याची कल्पनाच करावी. हे असले दिव्य करावे लागेल याची अंधुकही कल्पना नव्हती मला, अगदी शुद्ध पाशवी प्रकार. कितीही लाजलो तरी निसर्गाबरोबर कशी टक्कर देणार? अखेर सर्व लज्जा टाकून व स्वत:चे डोळे मिटून कार्यक्रम उरकावा लागे.

## ६) प्रजापरिषदेची स्थापना

**प्रजापरिषदेची स्थापना व पुन: अटक :-** याच रात्री जयसिंगपूरला प्रजापरिषद स्थापनेची पहिली बैठक व्हायची होती. त्या सभेला मला उशीर होऊ लागल्याने, तारा आल्या. माणसंही तेथून आली. तेव्हा जेवण न घेताच मी मोटारीत बसलो व त्याच रात्री शाहुपुरीतच रामराव नागेशकर यांच्या भाड्याच्या पहिल्या घरी जाण्यास बायकोस सांगितले व परत तेथेच उतरण्यास यईन असे सांगून निघालो.

जयसिंगपूर येथील श्रीरामचंद्र ऑईल मिल्समध्ये तारीख ६ फेब्रुवारी १९३९ रोजी रात्री साडे नऊचे सुमारास, सभेस माझ्या अध्यक्षतेखाली सुरुवात झाली. संस्थानातले सुमारे दोन हजार शेलके कार्यकर्ते आले होते. गिरणीच्या बंदोबस्त भागात सभा चालू ठेवणे, उकाड्यामुळे व गर्दीमुळे अशक्य झाले म्हणून आम्ही बाहेरच्या मोकळ्या जागी आलो. सभेला सुरुवात होणार इतक्यात तेथल्या सब-इन्स्पेक्टरनी मला बोलावून वॉरंट हाती दिले. लोक एकदम भांबावून जाऊ नयेत म्हणून मी सर्वांना प्रथम शांत बसण्यास सांगितले. कोणताही प्रसंग आल्यास तुम्ही डगमगून जाता कामा नये, अहिंसावृत्ती सोडता कामा नये असे बजावून, राजद्रोहाचे १२४ अ कलमाखाली पकडण्याचे वॉरंट आले असल्याचं सांगितले.

## ७) अटक, राजद्रोहाचा खटला व शिक्षा

*माधवरावांना झालेली सक्तमजूरीची शिक्षा, त्यांच्या हाता-पायात ठोकलेल्या बेड्या व कैद्याचा ड्रेस या अवतारात माधवरावांना इतर कैद्यांबरोबर गावातील मुख्य रस्त्यावरून रेस कोर्सवर कामासाठी नेण्यात येत असे. पण माधवरावांची लोकप्रियताच इतकी मोठी की, या अनभिषिक्त राजाला, लाडक्या नेत्याला पाहण्यासाठी रस्त्याच्या दुतर्फा लोकांच्या झुंडी जमू लागल्या. लोकांची गर्दी आवरेना म्हणून या कैद्याला बाहेर कामाला नेण्याचे बंद करावे लागले.*

**दडपशाहीस सुरुवात :-** माझ्या अटकेनंतर दरबारचे धोरण निश्चित ठरले. दडपशाहीला सुरुवात झाली. शिवाजी पेठेतील दंग्याचे निमित्त पुढे करून शहराला सभाबंदीचे १४४ कलम सुरू केले. जयसिंगपूर सभेच्या प्रसंगी मला अटक झाली तरी ती सभा बरखास्त न करता मागे राहिलेल्या लोकांनी ती चालू ठेवली. सभेत प्रजापरिषदेचे अधिवेशन भरण्याचे ठरले. काही झाले तरी परिषद ही भरवायची असा लोकांचा निश्चय झाला. माझ्या अटकेच्या निषेधार्थ काही खेड्यावर हरताळ पडून तशी निषेधाची निदर्शने झाली.

**राजद्रोहाचा खटला :-** सहा फेब्रुवारीस मला अटक झाली. २७ मार्च १९३९ ला खटल्याचा निकाल लागला. माझी केस चालविण्याकरिता पुण्याचे ब्राह्मणेतर पुढारी श्री. बागडे वकील हे मुद्दाम येत होते. त्यांना येथील वकील बगाडे, वर्धमाने व कै. जी. डी. पाटील मदत करीत होते. हातकणंगले पेठ्यातील हेर्ले मुक्कामी जे भाषण केले ते राजद्रोही होते असा आरोप करून खटला भरण्यात आला होता. दे. भ. नरीमन यांनी माझ्या बचावाचे भाषण सहा तास तरी केले असावे.

**नरीमन यांचे भाषण - (सारांश)** "भाई बागलांवरील हा खटला असाधारण प्रकारचा आहे. कोल्हापूरचा एक नागरिक, विरुद्ध करवीर दरबार, असे या खटल्यात दोन पक्ष आहेत. सर्वसाधारण खटल्यात सरकार तटस्थ असते. प्रस्तुत खटल्यात मात्र करवीर सरकारचे लक्ष असाधारण आहे. ब्रिटिश हिंदुस्थानात राजद्रोहाचे खटले नेहमी ज्यूरीच्या मदतीने न्यायाधीश चालवित असतात. येथे संस्थानी राज्यात ती नि:पक्षपाती न्यायदानास सहाय्यभूत होण्याची सोय नाही. डि. मॅजिस्ट्रेट या नात्याने संस्थानचा राज्यकारभार चालविणाऱ्या दरबारी यंत्राचे हे एक भाग किंवा अवयव असल्याने, सरकारविरूद्ध समिती उत्पन्न करण्याचा आरोप झालेल्या माणसाचा पूर्वग्रह

नसलेल्या मनाने नि:पक्षपाती चौकशी करू शकणे फारच कठीण आहे. फिर्यादीने आरोपीचे सर्व भाषण विचारात न घेता इकडील तिकडील तुटक वाक्येच निवडून त्यावरच राजद्रोहाच्या खटल्याची इमारत उभारली आहे. भाषण ऐकणाऱ्या हजारो शेतकऱ्यांपैकी एकासही कोर्टात साक्ष देण्यास बोलावले नाही. आरोपीचे भाषण अशिक्षित शेतकऱ्यांच्या मनावर विशेष वाईट परिणाम करणारे होते असा कांगावा करणाऱ्या फिर्यादी पक्षाने आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ त्या वर्गातील एकही साक्षीदार दिलेला नाही. उलट आरोपीच्या बाजूने मात्र हेर्ले गांवचा हजर असलेला साक्षीदार रायगोंडा पाटील याने खरा प्रकार वर्णिला आहे... भाई बागलांनी आपल्या भाषणात शेतकऱ्यांना "संघटना करा, एक व्हा, भीती सोडा आणि शांतपणे पण निश्चयाने व निर्भयपणाने अन्यायाचा प्रतिकार करा." हाच सर्वमान्य होणारा सत्यपूर्ण आणि अहिंसावादी उपदेश केला होता. चीड आणणाऱ्या परिस्थितीतही त्यांनी लोकांस कायदेभंग करण्याचा वा संस्थांनी राज्ययंत्रणेशी असहकारिता पुकारण्याचा उपदेश केव्हाही केलेला नाही. भाषणाचा जो पोलिस रिपोर्ट म्हणून आणलेला आहे तो पक्षपाती माणसांनी बनावट केलेला आहे. पोलिस नाईकाचे नाव साक्षीदारात नमूद केलेले होते. त्यांची साक्ष घेतलेली नाही. साक्षीदार भाट पोलिस रिपोर्ट घेण्यास आलेला नव्हता असे सांगतात. पण मोहिते वकील हा येथील दरबारी नोकरीसाठी धडपड करणारा एक इसम असून सध्या येथे त्याला "पॉपर प्लीडरची" नोकरी सरकारने दिली आहे. दुसरा साक्षीदार कदम ऊर्फ लुगडे हाही निमसरकारी नोकर आहे. बागलांच्या भाषणाचा वृत्तांत जो कोर्टापुढे सादर केला आहे तो सर्वस्वी खरा मानला तरीही तो राजद्रोह होत नाही. शेतकऱ्यांच्या साऱ्यावर सरकारी वाडे नि मोटारी वगैरेंची चैन चालते, यात खोटे काय आहे? बागलांची राजाची कल्पना अगदी सुधारलेली असून तिचे अधिष्ठान जनतेच्या सार्वभौमत्त्वावर केलेले आहे" अशा अर्थाचे बचावाचे भाषण नरीमन यांनी केले.

पण याचा काहीच उपयोग झाला नाही व अपेक्षेप्रमाणे डि. मॅजिस्ट्रेट यांनी मला दोन वर्षे सक्तमजुरी व एक हजार रुपये दंडाची शिक्षा ठोठावली.

शिक्षा सांगितल्याबरोबर सेंट्रल जेलमध्ये नेण्यासाठी, मोटर पोलिस पार्टीसह दारात उभी राहिली. मला पाहण्यासाठी व हार घालण्यासाठी "कोर्टाबाहेर लोकांची बरीच गर्दी जमली होती. बाहेरही पोलिस बंदोबस्त होता. त्यामुळे गर्दी हटवली जात असे. निकाल ऐकताच "बागल की जय" अशी

एकच गर्जना झाली. कोर्ट आवाराबाहेर जमलेल्या करवीर बांधवांनी आणलेले सुताचे व फुलांचे हार भाई बागलांना घालण्याची धडपड केली. पण त्यांचा नाईलाज झाला. भाई बागल पोलिसांच्या पहाऱ्यात मोटारीत येऊन बसताच जयजयकार झाल्यावर स्वत: भाई बागलांनी सर्व करवीर जनतेला प्रणाम करून "शेतकरी-कष्टकरी देवाचा विजय असो" अशी गर्जना केली. त्यानंतर मोटर तुरुंगाकडे जात असतां लोकांकडून पुनश्च जयजयकार होऊन भाईच्या गळ्यात नाहीतरी वर पडो या भावनेने लोकांनी आणलेले सुताचे हार अखेर मोटारीवर उधळले."

- (ज्ञानप्रकाश)

ही शिक्षेची वार्ता हां हां म्हणता सर्व शहरभर पसरली, शाहूपुरी व्यापारी असोसिएशनने तीन दिवस कडकडीत हरताळ पाळण्याचे ठरविले. सराफ असोसिएशन, किराणा-भुसारी असोसिएशन, चोळखण व्यापारी संघ वगैरे सर्व व्यापारी संघांनी हरताळ पाळण्याचे ठरवले.

**सक्तमजुरी व पायात बेड्या :-** शिक्षा सांगितल्यानंतर मला घाईघाईने तुरुंगात आणले. बरोबर फौजदार व पोलिस पार्टी लॉरीत होती. माझ्या दोन्ही बाजूला हत्यारी पोलिस होते. तथापि मोटारीमागून कितीतरी सायकलवाले येत होते. जयजयकार, पोलिस बंद करू शकले नाहीत.

आता कैदी या दृष्टीने मी तुरुंगात इतर कैद्यात जमा झालो. राजसेवा व लोकसेवा दोन्ही एकाचवेळी करणे व दोहोंनाही खूश ठेवणे कसे अशक्य असते त्याचा अनुभव आला. खऱ्या लोकशाहीत या गोष्टी साध्य होऊ शकतील. पण जेथे हितविरोध आहे तेथे राजमान्यता व लोकमान्यता एकाचवेळी मिळू शकणे दुरापास्त आहे.

तुरुंगात आणल्यावर नव्या शिक्षेचा यथासांग विधी उरकून घेण्यात आला. समाजातील माझा शिष्टाचाराचा औपचारिक पेहेराव उतरण्यात आला. मला किती शिक्षा झाली हे ऐकण्याला प्रत्येक जण उत्सुक होता. दोन वर्षे सक्तमजुरी व हजार रुपये दंड म्हणून सांगताच खाणाखुणा, कपडे टिपून घेणारा कारकून थरथर कापू लागला. "त्याला अश्रू दडवता येईनात." "अरेरे केवढी शिक्षा ही" असे शब्द न कळतच त्याच्या तोंडातून बाहेर पडल्याखेरीज राहिले नाहीत. माझे कपडे उतरताना त्याला माझेकडे पहावेना. माझी सीलकॅप जाऊन वानरी टोपी बसली. सुटच्या ठिकाणी गिंटी कापडाची आखूड चड्डी - लंगोटी

आणि बंडी आली. मोठ्या शिक्षेवाल्याला हे कपडे नवे मिळतात पण त्याचा खरखरीतपणा त्यामुळे मला जास्तच भासू लागला. त्यानंतर पुढच्या सौभाग्य लेण्यासाठी लोहाराकडे नेले. त्याने दोन्ही पायांत लोखंडी वाळे कायमचे फुलवून टाकले. त्या वाळ्यांत मण सव्वा मणांची लोखंडी साखळी करदोड्यात अडकावी लागे. बुटालासुद्धा लोखंडी मोळे मारलेले मला खपत नसत. त्यामुळे एवढा जड पदार्थ कायमचा फुलवून बसवलेला माझ्या सुखलालसी देहयष्टीला काही गोड वाटला नाही. हे सर्व घेऊन चालताना त्या एकमेकावर आदळत. रात्री पाय हलले की आवाज होई. उजव्या अंगाला गार गार लागे. चालताना पाय पसरून चालावे लागे. लोखंडी वाळा लागून त्याची हाडावर जखम झाली. ती खूण अद्याप गेलेली नाही. बहुतेक कैद्यांना या जखमा बरेच दिवस त्रास देत. लवकर बऱ्याच होत नसत.

ब्रिटिश मुलखातील तुरुंगात मी अद्याप गेलो नाही पण साध्या गुन्हेगारांनासुद्धा तेथे पायात बेड्या घालीत नाहीत म्हणतात. आणि राजकीय गुन्हेगारांना तर खालसा मुलखातील कोणत्याही तुरुंगात किंवा हिंदुस्थानातील दुसऱ्या कोठल्याही संस्थानात असले साखळदंड घातल्याचे कोणी बोलले नाही. पण हा खास मान करवीर राजबंद्यांना दरबारने राखून ठेवला होता. त्याला धरून माझी बडदास्त ठेवली गेली. राजकीय गुन्हेगार, खुनी, दरोडेखोर, अट्टल चोर, बदमाश समजलेले, एकाच मापात मोजण्यात येत होते.

विद्या विलासचे वृद्ध संपादक त्यावेळी साधी कैद भोगत होते. ते फार प्रेमाने वागत. स्वत: तयार केलेले जिन्नस गजातून आत टाकत. आपली पत्रे वाचायला देत. त्यांचा फार आधार वाटे. चोरून गाठ घेऊन बोलत. तब्येतीची नेहमी विचारपूस करीत.

पण असे काहीतरी खडतर जिणे आपणाला पत्करावे लागणार, आपले हाल होणार, अशी शिकवण मी मनाला सारखी देत असल्यामुळे देहाची नसली तरी मनाची अगदी पूर्ण तयारी झाली होती; नव्हे यासाठी मी हपापलो होतो. जनतेने माझ्या डोक्यावर उपकाराचे एवढे मोठे ऋण करून ठेवले होते की, त्याचा असा काहीतरी मोबदला दिल्याशिवाय माझ्या मनाचे समाधान झाले नसते. याचमुळे पायात बेड्या पडताच माझे मन आनंदाने व अभिमानाने उड्या मारू लागले. तुरुंगाचे वातावरण, त्या पायातल्या बेड्या, या सर्वांचा मला विसर पडला.

"मला तुरुंगात जावंस वाटतं. पण" असं म्हणून वडील दु:खी होत.

त्या वडिलांची आशा मी पुरी केली होती. कर्तव्य केल्याचं समाधान काही और असतं. जनतेशी द्रोह करून झाल्यावर इमले चढवणाऱ्या व उंची मोटारीतून हिंडणाऱ्याहून मी दुखी होतो. कष्टातसुद्धा मनुष्याला एक प्रकारचे सुखी भोगता येते.

जनतेच्या फुलांच्या हारांनी माझी मान लवत असे. ती फुले मला खरोखरी जड वाटत. कारण त्याचबरोबर जबाबदारीचा जो बोजा पडे तो झेपण्याजोगा नव्हता. पण या बेड्या मात्र मनाच्या तयारीमुळे हलक्या वाटत होत्या. जनतेसाठी त्या पायात पडल्या आहेत ही कल्पना माझ्या अंगात ताकद आणीत होती. माझ्या सुखी जीवाला कणखर बनवित होती. मला कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. मी माझ्या कोठडीत आनंदाने ओरडत गेलो. "झाली बोवा दोन वर्षाची सक्तमजुरी झाली" पण इतर कैद्यांची मात्र तोंडे उतरली. ते माझ्यावर प्रेम करीत होते. म्हणून त्यांना दु:ख झाले.

बेड्याने मनावर काही परिणाम झाला नाही हे खरे, पण देहाला अवघड वाटत होते. रात्री तर झोप येईना. पाय हलवायला ते जडजोखड त्रास देई. चालताना कमरेला रग लागे. हाडावर मार बसे. त्या साखळ्या ठेवून चड्डी घालता येईना. ते शिक्षण घ्यावे लागले.

शिक्षा सक्तमजुरीची. तेव्हा आता इतरांच्या बरोबर काम करण्यासाठी मला बाहेर काढले. ज्या रेसच्या नादासाठी मी महाराजांवर टीका करीत होतो त्याच रेसकोर्सवरचे हमाली काम करण्यासाठी मला जुंपले होते. शिक्षेच्या दुसरेच दिवशी मला न्यायचे. पण लोक मला पाहण्याकरीता तुरुंगाच्या दारांत व आसपास जमले होते. तो दिवस चुकवला. तेव्हा आता मला बाहेर काढणार नाहीत अशी लोकांची समजूत झाली होती. दुसरे दिवशी दारात विशेषसे लोक नव्हते. पण कामावर नेल्याची बातमी लगेच गावात समजली. त्यामुळे परतण्याच्या वेळी मात्र मला पाहण्यासाठी लोकांचे थवेच्या थवे जागोजाग उभे होते. जसजसा चालू लागलो तसतसा जमाव वाढू लागला. रस्त्यावर इतकी दाटी होऊ लागली की, त्यामुळे रहदारीला अडथळा होऊ लागला. वाटेत उभे राहणारे लोक हात जोडून अत्यंत भक्तिभावाने व हृदय भरून आलेले नमस्कार करीत. रस्त्यावरील व माडीवरील स्त्रिया मला चड्डीबंडी, बेड्या व अंगावर घोळ केलेले घोंगडे पाहून डोळ्याला पदर लावीत. काहींना तर तो वर्षाव आवरणे अशक्य होई. त्या वाटेला एक प्रकारचे यात्रेचे स्वरूप आले. सुटाबुटात पाहिलेल्या मला, त्यांना

या नव्या स्वरूपात पाहिल्याने धक्का बसला. कितीतरी लोक दारापर्यंत जयघोष करीत आले.

जनतेच्या प्रेमाचे हृदय उचंबळून आणणारे हे दृश्य पाहून माझ्या या नव्या आवरणाचा मला अभिमान वाटू लागला. ज्या कपड्यांमुळे व बेड्यांमुळे लोकांचे हृदय मला मिळू शकले ती बेडी, बंडी आणि चड्डी मला पूज्य वाटू लागली.

काही वाईट कामासाठी हा तुरुंग येता व लोकदूषण लागले असते तर त्या धक्क्यानेच मी मेलो असतो. पण माझा गुन्हा पवित्र होता. जनसेवेचे बक्षीस होते ते. एका परीक्षेत मी उतरलो होतो. त्या पदवीचा परमपवित्र "गाऊन" होता तो. बाहेरच्या लोकांना ज्यामुळे माझी कीव येत होती तेच लेणे मला भाग्याचे वाटू लागले.

हा जनसत्कार पाहून मला बाहेर पाठविण्याचे रहित केले. कारण कामावर जाण्याची वाट गावातूनच होती. शिक्षेमुळे व माझ्या प्रदर्शनामुळे लोकांवर दहशत बसावी हा हेतू पूर्णपणे निष्फळ झाला. उलट लोकजागृतीला माझ्या नेण्याने मदतच झाली. तेव्हा मग मला तुरुंगाचे आवारातच काळे पाण्याचे लोकांबरोबर घोंगड्याचे सूत गुंडाळायचे काम दिले. कैद्यांकडून आत खुर्च्या, जाजमे व घोंगडी तयार करून घेत. पण त्याबद्दल त्यांना मेहनताना मिळत नसे. खालसांत दिला जातो म्हणतात. जेलरच्या ऑफिससमोर अशोकाच्या झाडाखाली मला बसायला जागा करून दिली. मजबरोबर पिवळ्या टोपीचे खुनी व मोठ्या शिक्षेचे गुन्हेगार होते. कामाची माहिती वॉर्डर करून देई. कैदी मजजवळ असत. पण माझ्याबरोबर बोलण्याला त्यांना मनाई होती. त्यांच्यापेक्षा मी मोठा गुन्हेगार. मी राजद्रोही, माझा संसर्ग त्यांना होऊ न देण्याची खबरदारी अधिकारी घेत. अधिकाऱ्यांना जागृती ही फार वावडी. पूर्वी एकांती विचार करणाऱ्यांनासुद्धा तो क्रांतिकारक असावा असे समजून नव्हत्या का शिक्षा होत ? तीच वृत्ती सत्ताधाऱ्यात कमी जास्ती प्रमाणात आढळायचीच. पण या आडकाठीमुळेच त्यांच्यात माझ्याविषयी विशेष आपुलकी निर्माण झाली होती.

## (८) प्रजापरिषदेचे मंत्रीमंडळ

*२५ वर्षे माधवराव ज्यासाठी झगडले तो स्वातंत्र्याचा दिवस उगवला. प्रजा परिषदेचे मंत्रीमंडळ महाराजांच्या अध्यक्षतेखाली अस्तित्वात आले. माधवरावांना अत्यानंद झाला. विजयदिन साजरा झाला पण माधवरावांचे*

*विरोधक रत्नाप्पा व श्रेष्ठीगट यांनी मंत्रीमंडळावर बहिष्कार टाकला. रत्नाप्पांचे प्रजा परिषदेच्या लढ्यातील योगदान मान्य करूनही त्यांचा माधवरावांना मराठा म्हणून पुढारीपण देण्यामागचा मतलबी डाव होता असे माधवरावांना वाटते. हे वितुष्ट वाढत गेले व संस्थान विलीन झाले.*

**माझी मोठी महत्त्वाकांक्षा पुरी झाली** - भरपूर शक्ती असूनही ती न वापरता जवळ जवळ ८० टक्के महत्त्वाकांक्षा तडजोडीने साध्य झाली. नव्या युगाला सुरुवात झाली. जवळ जवळ पंचवीस वर्षे ज्यासाठी झगडलो ती प्रथम केवळ स्वप्नमय वाटणारी गोष्ट प्रत्यक्ष पदरांत पडली. गेल्या पंचवीस वर्षातील कोल्हापूरच्या राजकारणाचा इतिहास हा माझ्या जीवनाशी निगडीत झाला होता. प्रत्येक लढ्यांत मी भाग घेतला होता आणि त्याला चालना दिली होती. तोंड उघडण्याची परवानगी मागण्यापासून तो समाजसत्ताक राज्यपद्धतीचा उघड प्रचार करण्यापर्यंतच्या सर्व अवस्था पाहिल्या. राजकीय गाऱ्हाणी मागणेही राजद्रोहासारखे मानले जात होते. अर्ज करणेही धोक्याचे होते. बोलणे अशक्य होते. मिरवणुकी काढता येत नव्हत्या. राजकीय चळवळ्या म्हणून माझ्या घरच्या रक्तसंबंधींनी, आप्तांनी व पूर्वीच्या अनेक मित्रांनी महारोग्याप्रमाणे वाळीत टाकले होते. माझा संबंध समजल्यास राजाची अवकृपा होईल म्हणून अंत:करणाची ओढ असूनही माझ्यावर फारकत केली होती. अगदी जवळच्या रक्तसंबंधींनी तुरुंगात असतानाही माझी भेट घेतली नाही. घरच्या मंडळींना, बायकोला व मुलालाही भेटण्याचे धारिष्ट्य केले नाही. मला अस्पृश्य समजून दूर केले. हद्दपारी, अटक, बेड्यांची सक्तमजुरी, स्थानबद्धता, दंड हे शिक्षेचे सर्व प्रकार झाले आणि त्याच माझ्या हाती प्रजापरिषदेचा अध्यक्ष या नात्याने संस्थानची राज्यसत्ता पडत आहे.

करवीर जनतेने या पंचवीस वर्षाच्या कालांत राजकीय उत्क्रांतीचे व क्रांतीचे सर्व टप्पे पार पाडले. अर्ज, विनंत्या, ठराव, कायदेभंग, राजद्रोह, राजकीय बंडखोरी, क्रांती आणि जिवाचा बळी या सर्व मार्गातून ही चळवळ गेली आणि जे मिळवले ते आम्ही आमच्या त्यागाच्या आणि संघशक्तीच्या बळावर मिळवले. आमच्या हृदयात इतरांनी कोणी प्रत्यक्ष भाग घेतला नव्हता. दुरून चार हिताच्या गोष्टी सांगण्यापलीकडे व पुढारीपण मिळवण्याच्या प्रयत्नाखेरीज कोणी काही केले नाही.

माझ्यापुरते बोलायचे तर करवीर संस्थानचा कारभार करवीर जनतेच्या

हाती आला पाहिजे हे प्रजापरिषदेचे ध्येय अखेर गाठल्याचे डोळ्यांनी पाहिले. शेतकरी-कामगार राज्य हे जरी अंतिम ध्येय असले तरी त्याकडे जाणारा मोठा टप्पा गाठला.

न्याय, महसूल, फायनान्स, सप्लाय ही खाती लोकमंत्र्याचे हाती देण्याचे निश्चित झाले. हंगामी मंत्रिमंडळात प्रजापरिषदेचे बहुमत राखण्यात आले. लोकमंत्र्यातूनच चीफ मिनिस्टर निवडला जाणार होता.

वस्तुत: माझ्या आयुष्यातला मोठा टप्पा गाठला.

**विरोधी गटाच्या कारवाया :-** मी मंत्रीपद स्वीकारण्याची व मंत्रीपद बनवण्याची लावलेली जबाबदारी स्वीकारली. मंत्र्यांची निवड करताना परस्परांतील वाकुडपणाचा मी विचार केला नाही. डोळ्यापुढे व्यक्तीपेक्षा संस्थाच होती. श्रेष्ठी व कुंभार हे प्रजापरिषदेत पडलेल्या विरोधी गटातले. लिंगायत जात ही संस्थानात अल्पसंख्यांक म्हणजे ८०/९० हजार व मराठा ७/८ लाखापर्यंत. पण मी मराठ्यांतला फक्त एकच मंत्री घेतला. लिंगायत पैकी २ मंत्री घेतले. तेही माझे त्यांचे संबंध त्यावेळी प्रेमाचे नसताना. श्रेष्ठींना कार्यकारी मंडळाच्या बैठकीत त्याची जाणीव दिली. "श्रेष्ठी तुमचे माझे संबंध आज चांगले नाहीत तथापि ते विसरून तुम्हाला मंत्रिमंडळात घेत आहे. मी, श्रेष्ठी, कुंभार व खांडेकर असे मंत्रिमंडळ बनवले. मंत्री झालो तरी मोटार वापरायची नाही असे मनाने ठरवून माझे मित्र प्रभाकरपंत कोरगांवकर यांचेकडून ऑफिसला जाण्याकरता एक सायकल घेतली.

माझा इरादा होता की, इतर कोणत्याही संस्थानापेक्षा मी व माझे सहकारी कोल्हापुरात समाजवादी राजवट लवकर आणू. शेतकरी-कामगार राज्याला लवकर सुरुवात करू. पण धार्मिक आणि मुख्यत: व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षेच्या अतिरेकामुळे, कुंभारांनी होम मिनिस्टरची महत्त्वाची जागा आपल्याच हातात घेण्याचा आग्रह धरला आणि मी मात्र नाममात्र राहावे ही इच्छा. त्यासाठी सर्व नाटकी प्रकार केले. आळवणे, रडणे, त्रागा करणे झाले. अखेर कायमचे संबंध तुटतील म्हूणन धमकी दिली. यावेळेपावेतो माझ्यावर कुरघोडी करण्याचा, खाली ढकलण्याचा, दुखावण्याचा, अनादराने वागवण्याचा, बाजूस करून पुढे सरकण्याचा त्यांनी कधीही प्रयत्न केला नव्हता. मला वडिलाप्रमाणे मान दिला. प्रकट होताच शेकडो मंडळीसमोर पायावर डोके ठेवले. यांत भक्तिहून मुत्सद्देगिरीच होती. आम्ही मनाने एक आहोत ही

कल्पना लोकांत असणे यावेळी अशक्य होते. पुढील व्यूहरचनेला त्याची आवश्यकता होती. तुरुंगात असताना मला जपण्याची काळजी घेतली, मान राखण्याची, बारीक सारीक बाबीत मन घालून खूश करण्याची शिकस्त केली. मीहीपण सख्ख्या भावाहून रत्नाप्पावर प्रेम केलं, मुलालाही हेवा वाटायचा. रुईकरांच्या घरी हे आजारी पडले असता कमीपण समजून ज्या गोष्टी जन्मात केल्या नाहीत त्या कमीपणा पत्करून आजारपणासाठी केल्या. सत्तेच्या अभिलाषेमुळे रत्नाप्पा शत्रू बनेल असं यापूर्वी कोणी सांगितलं असतं तर माझा जराही विश्वास बसला नसता. पण आता विचार करू लागलो म्हणजे हे नम्रतेचे, प्रेमाचे आणि आदराचे नाटक, पुढच्या सत्तेवर दृष्टी ठेवून केले होते हे स्पष्ट समजून येते. स्वत:ला स्थान प्राप्त होईपर्यंत माझा उपयोग करून घ्यावयाचा हा अगदी पूर्व योजित डाव होता. याची जाणीव मला अखेर अखेर झाली. पूर्ण विश्वास टाकल्यामुळे त्यावेळी त्यांचेकडे पाहण्याची ती दृष्टीच नव्हती. सार्वजनिक पैसा जो मिळेल तो सर्व आपल्या हाती ठेवायचा, आर्थिक नाड्या आपल्या हाती राखायच्या. आपण तो खर्च करायचा ही वृत्ती अगदी पूर्वीपासूनची होती. प्रकट झाल्यानंतर रिपोर्टरकडून आपल्याला प्रामुख्य मिळेल असे रिपोर्ट तयार करायचे. दौऱ्यात स्वत:च्या नावाची घोषणा "अरेंज" करायची हे मला स्वच्छ दिसू लागले. रत्नाप्पा व रत्नाप्पाचा गट मला विशिष्ट हेतूनेच पुढारी म्हणून का मानत होता व ढकलत होता याचा आता उलगडा होतो.

रत्नाप्पा अत्यंत परिश्रम करणारे, दांडगे संघटक, त्या गटातली मंडळीही पदवीधर आणि सुशिक्षित. पण कोल्हापुरातल्या राजकीय चळवळीचं पुढारीपण मराठ्यांच्याकडे नसते तर यांच्या कोणत्याही गुणांना वाव मिळाला नसता. मला या मंडळींनी फुलासारखं झेललं होतं. तरी पुढे योग्य काली चिरडून टाकण्याकरता. रत्नाप्पा शिरोळ पेठ्यातले. पण शिरोळ पेठ्यात नानासाहेब जगदाळे, दिनकरराव देसाई, मिणचे ही मराठा मंडळी पुढे झाली नसती तर रत्नाप्पांना संघटना करता आली नसती. चळवळीच्या या अवस्थेत मराठा व्यतिरिक्त पुढाऱ्याला लोकांचे पाठबळ मिळाले नसते म्हणून या वेळेपावेतो माझ्यावर प्रेमाचा आणि मानाचा वर्षाव जो या गटाकडून झाला तो अपरिहार्य म्हणून. सत्तेच्या अभिलाषेमुळे त्यांचे या वेळेपावेतो दडून राहिलेले आणि दाबून टाकलेले धोरण आणि मनोगत बाहेर पडले. सुरुवातीची माझी ही दृष्टी नव्हती. ही अनुभवाने आली. पुण्याच्या पत्रांनी माझा उदोउदो केला पण याचमुळे. पण

सत्तेचा मोका मिळताच रत्नाप्पा आणि त्यांच्या गटाचे वर्गिक आणि जातिवादी स्वरूप उघडे झाले. त्या सर्व गटाने राजीनामे देऊन मला अडचणीत आणले. रत्नाप्पा प्रकट झाल्यापासून त्यांच्या डावपेचाला जो रंग चढत चालला होता तो या मंत्रीपदावेळी उघडा पडला. राजीनामे देण्याने मी एकदम गोंधळून जाईन व आपल्यास जागा मिळेल अशी त्यांची कल्पना होती.

**समझोता संपला :-** राजीनामे दिल्यानंतर हे सर्व एका वकीलाच्या घरी; कर्मधर्मसंयोगाने त्यांच्याच घरामागे द. भा. साळोखे यांचे घरी आम्ही उरलेले कार्यकारी सभासद जमलो होतो. कोरम इतकी संख्या होती. विरोधी गटाची बैठक ज्या घरी जमली होती त्या घराजवळच माधवराव भोसले यांच्या नातेवाईकांचे घर आहे. माधवराव तेथे सहजी पाणी पिण्यास गेले असता त्या बैठकीतील भाषणे त्यांचे कानावर पडली. मला बोलावून त्यांनी ती ऐकवली. यामुळे खरे स्वरूप आणखी स्वच्छ प्रकट झाले. यामुळे समझोत्याचे सर्व विचार बदलले. दुसरे दिवशी उरलेल्या कार्यकारी मंडळाची बैठक घेतली. आनंदाची गोष्ट उरलेल्यांची संख्या "कोरम" इतकी होती. नव्या मंत्र्यांची नावे नक्की केली. मी स्वत: मंत्रिपद स्वीकारायचे नाही असे ठरवले. बैठक संपताच तसाच महाराजांच्याकडे गेलो. सगळी हकीकत कळवून नव्या मंत्र्यांची नावे पुढे ठेवली. त्यात माझे नाव नाही असे दिसताच महाराजांना फार वाईट वाटले पण माझ्याच आग्रहावरून तोंडी मान्यता दिली व घरी परतताच हुजूर चिटणीस मार्फत महाराजांचे पत्र आले. ते खालीलप्रमाणे :-

*प्रिय माधवराव बागल,*

*ठरल्याप्रमाणे हिज हायनेस तुमच्या शिफारशीप्रमाणे चार मंत्र्यांची नेमणूक करतील. म्हणून ज्यांची नेमणूक व्हावयाची त्यांची नावे कळवावी अशी आपल्यास सूचना करावी म्हणून मला आज्ञा झाली आहे. उत्तर सत्वर आल्यास बरे.*

*महाराजांच्या आज्ञेवरून*
*हुजूर चिटणीस*
***आर. वाय. चव्हाण***

महाराजांची मान्यता लगेच मिळाली. ती मिळताच त्याच रात्री मी पुढारी ऑफिसमध्ये जाऊन बातमी दिली. हा सर्व प्रकार चार पाच तासात झाला. विरोधी गटाला आम्ही इतक्या तातडीने हे निर्णय घेऊ अशी कल्पनाही नव्हती.

दुसऱ्या दिवशी सकाळी लोकमंत्र्यांची नावे सर्वांना कळली. वसंतराव बागल चीफ मिनिस्टर, डी. एस. खांडेकर रेव्हेन्यू मिनिस्टर, नारायणराव सरनाईक सप्लाय, कारखानीस फायनान्स असे मंत्रिमंडळ बनवले गेले.

**पूर्वीच्यांची सेवा** - कोणत्याही हेतूने का असेना पण रत्नाप्पा आणि इतर मंडळींचा प्रजापरिषदेच्या सुरुवातीला पुष्कळच उपयोग झाला हे खरं. माझ्या प्रचाराने अनुकूल झालेल्या वातावरणाला रत्नाप्पांनी संघटित केले. हेतू निराळे असले तरी आज विरोधी असलेल्या या व्यक्तींनी तुरुंगवास, कष्ट, त्याग, दंड हे सर्व प्रकार सोसले आहेत. या त्यागाने परिषदेची शक्ती वाढली हे केव्हाही नाकारता येणार नाही. श्रेष्ठी, बगाडे वगैरे मंडळींची कायद्याच्या दृष्टीने परिषदेला मदत झाली आहे. श्रेष्ठींचा थंडपणा, सौजन्य, चिकाटी आणि पार्लमेंटरीवृत्ती काही काही वेळा उपयोगी ठरली. ही राजीनाम्याची घाई त्यांना कदाचित आवडलीही नसेल. पण या गटाचा चळवळीकडे पाहण्याचा दृष्टिकोन बहुजन समाजापासून भिन्न होता म्हणून आम्ही एकजीव होऊ शकलो नाही. यानंतर रत्नाप्पांनी विलिनीकरणाची जी भूमिका घेतली त्यामागे मात्र सात्विक बैठक अशी मुळीच नव्हती. कारण या गृहस्थांना हवे ते मंत्रीपद मिळाले असते तर यांनी विलिनीकरणाची भूमिका खास घेतली नसती. मंत्रिपदासाठी धडपड आणि त्रागा करण्याचे मग कारणच नव्हते. सरळ विलिनीकरणाचीच चळवळ करायला हवी होती. विलिनीकरणाच्यामागे यांच्या व या गटाच्या चळवळीत निव्वळ सूडबुद्धी होती. ध्येयनिष्ठा नव्हती. रत्नाप्पा हे संघटक होते पण त्यांच्या संघटनेचं तंत्र वैचारिक कधीच नव्हतं. बहुतेक सरकारी पेशाने बांधलेले होते. ध्येयाने बांधलेले फार थोडे, वादविवादात कधी वैचारिक उंची अशी आढळली नाही. रत्नाप्पा भूमिगत राहिले. पुढे काहीही आवश्यकता नसता राहिले. ते कोठे होते, काय करत होते याचा मला काडीचाही सुगावा लागू दिला नाही. वर्तमानपत्रातल्या टीकेतून त्यांच्या जीवनाची कल्पना पुढे आली. रत्नाप्पांच्या जीवनाकडे दृष्टी टाकली म्हणजे मला प्रामुख्याने व्यक्तिनिष्ठेखेरीज काही दिसत नाही. ध्येयनिष्ठा कशात आहे ती मला तरी समजू शकत नव्हती. पक्षनिष्ठा नव्हती, मित्रप्रेम नव्हते. कृतज्ञता बुद्धी नव्हती. जातिप्रेम म्हणावे तर तेही मला दिसले नाही. वाकुडपणात तात्त्विक भूमिका नव्हती.

**विजय दिन** - लोकमंत्र्यांचे हाती कारभार येऊन नव्या लोकशाही राजवटीला सुरुवात झाली. म्हणून त्या आनंदाप्रीत्यर्थ करवीर संस्थान विजयदिन

संस्थानभर साजरा करण्याचे ठरवले. ता. ३०.११.४७ ही ठरवली. तशी पत्रके सर्वत्र वाटली.

हा विजयदिन कोणा व्यक्तीच्या हाती राजसत्ता पडली म्हणून नव्हता. तर कोल्हापूर जनतेच्या पदरी जबाबदार राज्यपद्धती पडली म्हणून होता. शहरात सर्वत्र गुढ्या, तोरणे, कमानी, निशाणे उभारली होती. दसरा-दिवाळी प्रमाणे हा सण साजरा झाला. विरोधी गटांना व त्यांच्या अनुयायांना अर्थात हा सण शुभ वाटला नाही. व त्यात त्यांनी भाग घेतला नाही. त्यांच्या हाती सत्ता पडली नाही म्हणून त्यांना या सोहळ्याचे महत्त्व वाटले नाही; जणू काय प्रजापरिषदेचा लढा हा काही व्यक्तींच्या हाती सत्ता देण्यासाठीच होता. मला मात्र आयुष्यातले एक मोठे कार्य तडीस झाल्याचा आनंद झाला होता. इतरांना या आनंदाची कल्पनाही करता येणार नाही.

सकाळी ८.३० वाजता स्टेशनवरून विजयदिनाची मिरवणूक निघाली. आघाडीला तिरंगी नवराष्ट्रध्वज व शिवरायाचा भगवा झेंडा हत्तीवर डौलाने फडकत होता. त्याच्यामागे तालीम संघाचं दल, राजाराम रायफल्सचा बँड, त्यामागे मंत्री व कार्याध्यक्ष, त्यामागे सरकारी लवाजमा, सशस्त्र पोलीस फोर्स व जनता अशी खूप मोठी मिरवणूक चालू होती. आम्हास ठिकठिकाणी हारतुरे घालण्यात येत होते. अनेक कमानी उभारल्या होत्या. मिरवणूक शिवछत्रपतींच्या स्मारकाला वंदन करून गावांतून वळसे घेत खासबागेत आलो. तेथे माझे भाषण झाले. या शुभ दिनाची आठवण म्हणून मी महाराजांच्या कडून महात्मा गांधींच्या पुतळ्यासाठी २५,००० रुपयाची रक्कम सभेत जाहीर केली.

रात्री सर्वत्र रोषणाई करण्यात आली. करवीर निवासींनी जगदंबा, जुना राजवाडा, नवा राजवाडा, पॅलेस थिएटर, नगरपालिका वगैरे सर्व सरकारी व निमसरकारी इमारतीवर रोषणाई, कमानी, पताका उभारल्या होत्या. जनतेच्या चळवळीचा हा विजयदिन थाटाने साजरा झाला. माझ्या आयुष्यातील एक उद्दिष्ट गाठले होते.

## ९) गांधी हत्या व कोल्हापुरातील चळवळ

*माधवरावांच्या जीवनातील त्यांच्या परीक्षेचा प्रसंग म्हणजे गांधीजींचा वध व त्याचे कोल्हापूरात उमटलेले पडसाद. गांधीजीच्या वधाच्या बातमीने माधवराव पुरते एखाद्या महान वृक्षासारखे जमीनदोस्त झालेले दिसतात. हा आघात ते*

*सहन करु शकले नाहीत. पण त्यांच्या खऱ्या कसोटीची वेळ दुसऱ्या दिवशी जेव्हा जाळपोळ सुरु झाली तेव्हा आली. या करवीरच्या अनभिषिक्त राजाने जनतेला आवरण्याचा अटोकाट प्रयत्न केला. स्वत:चा जीव धोक्यात घालून जाळपोळ आवरली. पण तोपर्यंत बरेच नुकसानही झाले होते. जाळपोळीच्या अतिरंजीत बातम्या विरोधी गटाने मुंबईला धाडल्या. गोळीबार का केला नाही असा प्रश्न उपस्थित करून विरोधकांनी माधवरावांच्या मंत्रीमंडळाने जाळपोळीला प्रोत्साहन दिले असा खोटा प्रचार केला. यामुळे माधवराव अत्यंत व्यथित झालेले दिसतात.*

**हिंदराष्ट्राचा महान अशुभ दिवस :-** ३० जानेवारी १९४८ हिंदराष्ट्राचा महान अशुभ दिवस. ॲटम बाँबने एवढा धक्का जगाला बसणार नाही इतका मोठा धक्का हिंदुस्थानला बसला. याच दिवशी प्रजापरिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक भरली होती. संध्याकाळच्या सहाचा सुमार असेल. दार लोटून एक दोन विद्यार्थी एकदम आत आले. त्यांचे चेहरे कावरे बावरे झाले होते. तोंडातून येणारे शब्द गुदमरून येत होते.

बैठक बंद करा. महात्माजींचा खून झाला.

किती भयंकर बातमी. किती अमानुष. किती अशुभ. असे होईल कसं. किडा मुंगी सुद्धा ज्यानं मारली नसेल त्याचा खून. असं होईल कसं. आमचा विश्वास बसेना. मी त्यांच्या तोंडाकडे पहातच राहिलो. जणू सर्व भावना थंडावल्या. रक्तवाहिन्या थंडावल्या. शक्ती नाहीशी झाली. गात्रे लुळी पडली. काही समजेना. विचार करण्याची बुद्धीच नष्ट झाली.

काही वेळाने शुद्धीवर आलो. वाट चालू लागलो. जनसमुदायाचा प्रचंड प्रवाह आपोआपच बिंदु चौकाकडे वहात चालला होता. बटन दाबलं जावं त्याप्रमाणे सर्वच दुकाने कोणी न सांगताच भराभर बंद झाली. सर्वांच्या चेहऱ्यावर जणू प्रेतकळा आली होती. विजेचे दिवेही बंद पडले. त्यांना वाटलं असेल भारताची प्रकाशज्योत मालवली. आता आपला कसा प्रकाश पडणार. लाऊड स्पीकरही काम देईना, भावनेला शब्द अपुरे पडणार; नव्हे शब्दाची शक्ती अपुरी पडणार याची जाणीव लाऊड स्पीकरलाही झाली असावी. जनता अधोमुख अश्रू ढाळीत होती. सर्व जातींना आणि धर्मांना पावन करणारी एक अश्रूगंगा वहात होती. चिकार समाज भरला असूनही बिंदु चौकात शुकशुकाटच भासत होता. जिवाला जडाचं स्वरूप आलं होतं. भारताचा प्राण निघून गेला होता.

सभेत बोलायला उभे राहिलो. शब्द उमटेना.

महात्माजी, महात्माजी, महात्माजी, देवा सोडून गेलास. एवढेच शब्द

तोंडावाटे बाहेर पडले.

महात्माजींचा विषय आला की, तासनतास बोलणारा मी, माझी जिव्हा काम देईना. हृदयाची भाषा जिव्हा काय बोलू शकणार. भावनेचा अतिरेक एकाच वाटे बाहेर पडू शकतो. एकच साधन मजजवळ होतं. अश्रू. हृदय ओथंबून बाहेर पडलेली मालाच तेवढी ती त्यांच्या स्मृती चरणावर वाहू शकलो.

राष्ट्राचा धनी. प्रेमाची माऊली, विश्वाची मोहिनी, अहिंसेची बासरी मोडून पडली. प्रत्येकाच्या हृदय मंदिरातील ती पवित्र मूर्ती नाहीशी झाली. आम्ही सर्व उघडे पडलो. आधार तुटला. हिंदवी रथाला आवरून धरणारा सारथी निघून गेला.

दु:खद अंत:करणाने आम्ही सर्व आपआपल्या घरी गेलो. दु:खे. दु:खापेक्षा दुसरी कसलीच भावना यावेळी कोणाच्या हृदयांत नव्हती. माझी रात्र उघड्या डोळ्यांनी गेली.

महात्माजींची मूर्ती. सारखे त्यांचेच विचार.

**जाळपोळीला सुरुवात :-** महात्माजी गेल्यानंतरचा दुसरा दिवस उजाडला. सकाळचा ८/९ चा सुमार असेल. इतक्यात दोघे-तिघे ब्राह्मण घाबऱ्याने आले, म्हणाले, "माधवराव, आमचे रक्षण करा. आमच्या दुकानांची जाळपोळ चालली आहे" मी तसाच अनवाणी घरच्या सदरा विजारीनिशी पळत सुटलो. कोणाचीशी मोटर रस्त्यावरून जात होती. तिला हाताने थांबवले. बॉनेटवरच गडबडीने उडी घेतली व आग लागली होती त्या ठिकाणी गेलो. लोक खरोखरच महात्माजींच्या खुनामुळे वेडे झाले होते. खून एका हिंदुसभावाल्या ब्राह्मणाने केल्यामुळे त्यांनी त्यांचा सूड घेण्याचे ठरवले होते. समाज खवळला म्हणजे तो भलता अविचारी बनतो. त्याची सारासार बुद्धी नष्ट होते. मी जमावापुढे गाडी नेऊन मोठ्याने ओरडून म्हणालो,

"हा प्रकार महात्माजींना केव्हाही आवडला नसता. ही जाळपोळ घरांची नव्हे. ही महात्माजींच्या ध्येयाची तुम्ही जाळपोळ करीत आहात. त्यांच्या ध्येयाचा असा नाश करू नका. याने तुम्हाला महात्माजींचा आशीर्वाद मिळणार नाही. तुम्ही हे धंदे बंद करा. बंद करा. बंद करा." प्रत्येक ठिकाणी जाऊन मी हे सांगत होतो. त्यांना हात जोडत होतो.

जमावातील काही लोक पुढे आले व म्हणाले, "या हरामखोरांनी पेढे वाटले हो, महात्माजींचा खून झाला म्हणून यांनी पेढे वाटले. यांनी पोळ्यांची

जेवणं खाल्ली."

"असेल कदाचित, पण शत्रूवरही प्रेम करा हा महात्माजींचा उपदेश विसरू नका. महात्माजींना गोळी मारणाऱ्याला "खुळ्या काय केलंस?" असं म्हणून त्यांनी आशीर्वादच दिला असेल. तुम्ही हे बंद केलं पाहिजे. नाहीतर मलाच आगीत ढकला."

माझा उपदेश काही फुकट गेला नाही. लोकांनी माझा अपमान केला नाही. ते म्हणत, "जा, आम्ही काही करू देत नाही." "जा तुम्ही. काही काळजी करू नका" असं म्हणत आणि मी दृष्टिआड झालो की, जाळपोळीला सुरुवात करीत. हा प्रकार पाहून मला असह्य झालं. महात्माजींच्या तपश्चर्येचा आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचा असा चुराडा झालेला पहाण्यापेक्षा मेलेलच बरं म्हणून मी भालजी पेंढारकरांच्या सिनेमाच्या आगीत धाव घेऊ लागलो, पण शाहू मिल मजूर संघाचे पदाधिकारी व गिरणीतल्या काही कामगारांनी कंबरेला विळखा घालून जखडून ठेवलं. इतर सर्व मंत्रीही आग थांबवण्याकरता सारखे फिरत होते. आम्हा सर्वांचे प्रयत्न काही फुकट गेले नाहीत. एक दीडपर्यंत सर्व दंगा शांत झाला. नदीवर जाण्यासाठी मिरवणूक निघाली. एकूण एक सरकारी लवाजमा बाहेर काढला होता. मिरवणुकीचे स्वरूप प्रचंड होते. पंचगंगा नदीवरील पटांगणात टेकडीवर, पुलावर, दोन्ही तीरावर प्रचंड जनसमुदाय जमला होता. कोल्हापूरच्या इतिहासात एवढा प्रचंड जमाव केव्हा जमला नसेल. मी इतका थकलो होतो की मला उभे राहवेना. मी मैदानात मातीवरच झोपून राहिलो. सभेचा लाऊड स्पीकर येताच लोकांना पुन: अहिंसा तत्त्वाची जाणीव करून दिली. जाळपोळ, हिंसा, अत्याचार करणार नाही म्हणून जमावाकडून महात्माजींची शपथ घेतली. लोकांनी शांतता राखण्याचे वचन दिल्यामुळे मनाला थोडा विरंगुळा वाटला. ट्रकमधून पडून घरी आलो. तासभर सुद्धा घरी पडून राहिलो नसेन. पुन: दंगा सुरू झाल्याची बातमी कानावर आली. लगेच शेजारच्यांची मोटर मागून घेतली. गेल्यावर पाहिलं ते दृष्य भयंकर होतं. दंगेखोरांनी हिंदुसभेच्या बापट डॉक्टरांच्या घराला गराडा घातल्यामुळे पोलिसांनी गोळी झाडली. त्यामुळे एक मेला. काहींना मोठ्या जखमा झाल्या.

**माझी तत्त्वनिष्ठा :-** या वेळेपावेतो मी गांधीजींचा कायावाचामने उपासक व अहिंसा तत्त्वज्ञानाचा कट्टर अभिमानी होतो. आमचे मंत्रिमंडळ असताना जनतेवर गोळीबार व्हावा हे मला असह्य झाले. पोलिसांनी केलेल्या

गोळीबारात पडलेले प्रेत पाहून माझ्या हृदयाला अत्यंत वेदना झाल्या. मी अगदी वेडा झालो. मला काही सुचेना. राग आवरेना. जनतेपैकी एक प्रेत ते सरकारच्या आज्ञेमुळे. दंगा शमविण्याकरिता, लोकांना आवरण्याकरिता पुढे होऊन शांत करण्याकरिता मी मरायला तयार झालो होतो. लोकांच्या रागाला मी बळी पडलो तरी माझ्या जन्माचं सार्थक झाले असते. मला गांधीजींचा आशिर्वाद मिळाला असता. एखादा मंत्री कामास आला असता तरी मला अभिमान वाटला असता. पण अधिकारावर असताना जनतेचा बळी.

ज्या जनतेकरितां माझं निम्म आयुष्य खर्चले, प्रजेचे हाल कमी व्हावेत म्हणून दोन वर्षे आनंदात बेड्या सहन केल्या, पाट्या वाहिल्या, जमिनी सारवल्या, हमालाची कामे केली, ज्या जनतेला मी परमेश्वराप्रमाणे मानलं त्यापैकी एकाचा आमच्याकडून बळी.

महात्माजी असते तर त्यांनी अशा स्थितीत गोळीबाराचा हुकूम दिला असता की लोकभावना आवरण्याकरिता स्वत:चा बळी दिला असता. आम्ही ब्रिटिशांप्रमाणे राज्यकारभार करणार की गांधी तत्त्वज्ञानाला अनुसरून करणार. मला आठवलं पूर्वी मोरारजींनी गोळीबाराची ऑर्डर दिली असता गांधीजी खवळले होते.

नाही, मी गोळीबार करून देणार नाही.

दु:ख, निराशा, राग या भावनांचा अतिरेक झाला. त्या तशा अवस्थेत मी पोलीस कचेरीत गेलो आणि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट श्री. माळी यांना खूप बोललो. मी काय बोललो त्यातला मला एकही शब्द आठवत नाही. पण मला न शोभतील अशी वाक्ये माझ्या तोंडून गेली असे मला दुसऱ्याकडून समजले. मला दु:ख झाले. दुसरे दिवशी उठल्याबरोबर मी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटला क्षमेचे पत्र पाठवले. त्यांनेही माझ्या मनाचे समाधान झाले नाही. मी घरी जाऊन त्यांची गाठ घेतली व पुन: क्षमा मागितली. मी क्षमा मागितली नसती तर ते माझं काही वाईट करणार होते अशी परिस्थिती नव्हती. सरकार आमचं होतं. तथापि मी त्याही पुढे जाऊन "हंटर" या पत्रातून जाहीर दिलगिरी व्यक्त केली. गांधीतत्त्वज्ञानाला सुटून ही वागणूक झाली नव्हती. म्हणून यामुळे मला समाधान वाटले.

**पत्रक :-** लोकांनी संयम राखावा म्हणून मी याचवेळी एक पत्रक काढले.

एका माथेफिरूने महात्माजींच्यावर वार करून आत्मनाश करून घेतला. पण भक्तांनीही भावनेच्या अतिरेकामुळे त्यांच्या परमपवित्र, अहिंसा

तत्त्वावरही घाव घातला. महात्माजी खुनी माणसालाही आशीर्वादच देत गेले असतील. पण महात्माजींचे भक्त म्हणवून घेणारे मात्र अत्याचार, जाळपोळ व हिंसा याला प्रवृत्त व्हावेत हे भारताचे केवढे दुर्भाग्य. देशभर झालेला अत्याचार, जाळपोळ, हिंसा पाहून महात्माजींच्या आत्म्याला समाधान वाटेल काय? ते जिवंत असते तर त्यांना काय वाटले असते. त्यांनी अग्निभक्षण केले असते. त्यांनी नुकताच जो उपवास केला तो कशाला केला; याचा विसर आपल्यास पडला काय? हिंसा, अत्याचार, जाळपोळ हीच काय महात्माजींची शिकवण. याचसाठी काय महात्माजींनी आपले आयुष्य घालवले. महात्माजींनी आम्हाला देव बनवण्याचा प्रयत्न केला. आमच्यातील सद्भावना जागा केल्या. आपल्या जीवनातून सत्य, अहिंसा व प्रेम याचा वर्षाव केला. पण महात्माजींचा नश्वर देह जाताक्षणी आमच्यातील पशू जागा व्हावा काय? करवीरस्थानी तुम्ही हिंसा, अत्याचार, जाळपोळ बंद करणार की महात्माजींच्या पवित्र अहिंसा तत्त्वाचीच होळी करणार. याने महात्माजींचा आशीर्वाद मिळणार नाही. हे दृश्य पाहून महात्माजींच्या हृदयातून रक्ताचे पाट वाहतील. बंधूंनो सूडाच्या भावना आवरा, शांती राखा. यानेच महात्माजींच्या आत्म्यास शांती मिळेल. हीच त्यांची खरी सेवा. हीच खरी भक्ती. हेच खरे प्रेम.,

**गोळीबार आणि माझी भूमिका :-** आमच्या सरकारऐवजी त्या ठिकाणी ब्रिटिश धोरणाने चालणारे सरकार असते तर त्यांनी गोळीबार करून दंगा शमवला असता. पण गांधीवादाने चालणाऱ्या राजवटीला त्याने काळीमा लागला असता. माझी अद्याप प्रामाणिक समजूत आहे की, ज्या तत्त्वज्ञानाने मी चालत होतो त्या तत्त्वज्ञानाला सुटून माझी वागणूक झाली असं मला अद्याप वाटत नाही. विनोबा भावे यासारखी मंडळी याबाबत फार तर निकाल देऊ शकतील. मंत्रिमंडळाने गोळीबाराने दंगा शमवला नाही यात्ना मी सर्वस्वी जबाबदार आहे.

पण मला जे दुःख झाले, माझ्या हृदयावर जो अत्यंत मोठा आघात झाला तो माझ्यावर आणि मंत्रिमंडळावर केलेल्या दुष्ट आरोपामुळे; आम्ही मुद्दाम दंगा चेतवला. आम्ही ब्राह्मणांची घरे जाळायला प्रोत्साहन दिले. समोर उभा राहून खुणावले असे ते आरोप होते.

माझी विचारसरणी चुकीची असेल. गांधी तत्त्वज्ञानाचा कदाचित मी चुकीचा अर्थ लावला असेन. पण ज्याचं संरक्षण करण्याकरिता रक्ताचं पाणी केलं, मूर्च्छा येईपर्यंत श्रम घेतले, त्या माझ्यावरच घरे जाळण्याला प्रोत्साहन

देण्याचा आरोप. खरोखरीच माझ्या मनात असे विचार आले असते. आणि "काय पाहता, शिल्लक राखू नका यांना" असे एक वाक्य त्यावेळी उच्चारले असते तर शहरात ब्राह्मणांची घरेच नव्हे तर एक ब्राह्मण शिल्लक राहिला नसता. पण ज्यांना जिवाचं रान करून वाचवलं त्यांच्यापैकी काहींच्याकडून "मी प्रोत्साहन दिलं" असा आरोप व्हावा.

विरोधी गटाने या जाळपोळीचा फायदा घ्यावा यात आश्चर्य नाही. पण ज्यांना वाचवलं त्यांनीही त्यांना साथ दिली. काँग्रेस श्रेष्ठींनाही विलिनीकरणासाठी काहीतरी निमित्त पाहिजेच होते, त्यांना ही संधी मिळाली.

ही जाळपोळ विचारपूर्वक झाली. यात जातीवाद होता, कट होता वगैरे जी विधाने काहींनी केली त्या मागे सत्याचा काहीही आधार नव्हता. या आरोपामागे विरोधी पक्षाची आणि विशिष्ट वर्गाची निव्वळ सूडभावना होती. प्रजापरिषदेतील दुसऱ्या मत्सरग्रस्त गटाचा तो पद्धतशीर प्रचार होता. या निमित्ताने बहुजन समाजाची राजवट दूर करण्याचा तो डाव होता. खोट्या तारा करणे, खोट्या तक्रारी तयार करणे हे काम त्यांनी चालवलं होतं. व त्यातील एक टाईपड् फॉर्म, मिथेलच्या हाताखाली काम केलेल्या त्यांना मराठी शिकविणाऱ्या एका ब्राह्मण गृहस्थानेच मला घरी येऊन दाखवला.

जनसमुदाय चिडला तो पेढे वाटण्याच्या बातमीने. पण ही बातमी सर्व महाराष्ट्रात होती. त्याच बातमीमुळे आर. एस. एस. व हिंदुसभावाले यांच्याविरुद्ध सर्व समाज खवळला होता. जातीवादाचा संबंध सुरुवातीला तर मुळीच नव्हता. कालांतराने त्यात गुंडगिरी शिरली, तसाच परंपरागत जातिद्वेष शिरलाच नसेल असे नाही. त्याला परंपरागत चालत आलेली विषमता आणि गुलामगिरी कारण असू शकेल.

दगडू बाळा भोसले या मराठा पेढेवाल्या दुकानदाराने पेढे वाटणाऱ्यांना पेढे विकले या समजुतीने त्याच्या दुकानाची नासधूस झाली. भालजी पेंढारकर ब्राह्मण नव्हे पण आर. एस. एस. प्रमुख व हिंदुसभावाले म्हणून त्यांच्यावर राग. म्हणून त्यांचा सिनेटोन जाळला. हिंदुसभेचे उपाध्यक्ष श्री. निंबाळकर हे तर राजांचे नातलग होते. यशवंत कंपनी जाळली, याच्यात खुद्द प्राईममिनीस्टर एक पातीदार होते. ही उदाहरणे ब्राह्मणांविरुद्ध कट होता हे दाखवू शकत नाहीत.

खेड्यावरचा प्रकार मात्र निराळा झाला. ब्राह्मणाने महात्माजींना मारले एवढेच ते जाणू शकले. हिंदुसभावाला ब्राह्मण आणि दुसरा ब्राह्मण असा ते

भेद करू शकले नाहीत. काही भागातील ब्राह्मणांची सावकारशाहीही त्यांना भोवली. भावनेची अवस्था ओसरल्यानतंर यात गुंड शिरले व त्यांचा हेतू जाळपोळीतून स्वत:चा फायदा करून घ्यावा असा होता. यात कोणत्याच जातीचा द्वेष नव्हता. मुख्य हेतू स्वत:चे साधले ते साधून घ्यावे या पलिकडे नव्हता. भावनेचा आवेग ओसरल्यानंतर ज्याप्रमाणे त्यात गुंडगिरी शिरली त्याप्रमाणे पुढे कित्येक ठिकाणी जातीद्वेषाने उठाव घेतला. त्याला कारण पूर्व इतिहास. अनेक वर्षापासून खालच्या समाजावर केलेला जुलूम. सामाजिक, धार्मिक व राजकीय दडपणाचा तो परिणाम नव्हता असं म्हणता येणार नाही.

शांतता राखण्यासाठी मी चटकन बाहेरचा दौरा काढला. देवाळे या गावी तेथील लोकांच्या आमंत्रणावरून महात्माजींच्या नावाने एका संस्थेचे उद्‌घाटन करण्याकरता गेलो होतो. मी प्रथम तेथील परिस्थिती समजून घेतली व नंतर गावकऱ्यांना म्हणालो, "जी ब्राह्मणांची घरे जाळली गेली आहेत त्यांना आसरा बांधून द्या. त्यांना प्रेमाने व अगत्याने बोलावून आणा. त्यांच्या सुरक्षिततेची हमी घ्या. हे सर्व डोळ्यांनी पाहिल्यानंतरच मी तुमच्या संस्थेचे उद्‌घाटन करीन. मी आज काही उद्‌धाटन करीत नाही", लोकांनी हे ऐकले व त्यांनी हे सर्व पुरे करण्याचे वचन दिले. हे राहिले बाजूला पण विरोधी गटाने आम्हाला मारण्याकरता या जाळपोळीचा फायदा घेतला.

प्रजापरिषदेच्या या विरोधी गटाने जाळपोळीदिवशी आग विझवण्याचा किंवा लोकांना शांत करण्याचा जराही प्रयत्न केला नव्हता. जमाव शांत करण्याकरता या गटातील एकानेही डोके बाहेर काढले नव्हते. महात्माजींच्या दुखवट्याच्या सभेतही भाग घेतला नव्हता. हे वाढेल तेवढे त्यांना पाहिजे होते. कारण त्यांनी रचलेल्या कटाला या गोष्टी उपयोगी होत्या. त्याचं स्वरूप जेवढं मोठं होईल आणि करून दाखवता येईल तितकं पाहिजे होते. तसं महाराष्ट्रातील आमच्या विरोधी पत्रांनी केलं.

महात्माजींच्या खुनामुळे वेडा झालेला समाज आपण जे कृत्य करतो ते महात्माजींच्या भक्तीमुळे, प्रेमामुळे करतो असे समजून जाळपोळ करीत सुटला होता. आपण करतो हे सत्कृत्यच करतो ही भक्तीने अंध झालेल्या वेड्या समाजाची समजूत. यावेळी मंत्रिमंडळाने जर गोळीबार केला असता तर महात्माजींच्यासाठी आम्ही मरत आहोत या कल्पनेने शेकडो लोकांनी गोळीबारास तोंड दिले असते. महात्माजींच्यासाठी आपण मेलो तर जीवाचे सोनं

होईल या समजुतीने हजारो लोकांनी मृत्यूला कवटाळले असते. अशावेळी मंत्रिमंडळाने संयम राखला. प्रजेची हत्या करू दिली नाही. वेड्यांचे खून पाडले नाहीत. जीव धोक्यात घालून वेड्या झालेल्या समाजाला उपदेशाने आवरण्याचा प्रयत्न केला. अनावर झालेल्या समाजाच्या मध्यभागी जाऊन जाळपोळ, आवरण्याचा प्रयत्न केला. या त्यांच्या प्रयत्नाबद्दल गांधीवादी म्हणून घेणाऱ्या काँग्रेस सरकारने त्यांचे चीज करायला हवे होते. पण गोळीबार केला नाही म्हणून ते दोषी ठरले. करवीर जनतेचे मुडदे पाडले नाहीत म्हणून मंत्रिमंडळ दोषी. गांधी तत्त्वाप्रमाणे वागले म्हणून मंत्रिमंडळ दोषी.

**महात्माजींच्या अस्थी :-** मुंबईस मी महात्माजींच्या अस्थी मिळविण्याकरिता गेलो होतो. गेलो ते ल. म. पाटील मंत्री यांच्याकडे उतरलो. तेथून पं. प्र. खेरांना मी कशासाठी आलो ते फोनवरून कळवले. "आपण पुण्यास एक दिवस जाऊन येणार आहोत, आल्यावर जमल्यास पाहतो." म्हणून त्यांचे उत्तर आले. ती एक रात्र आणि एक दिवस महिन्याप्रमाणे गेली. सवड मिळालेल्या दिवसात तेथील बहुतेक मंत्र्यांच्या गाठी घेतल्या. मोरारजी देसाई यांची गाठ घेतली. त्यावेळी विरोधी गटाची कारवाई प्रत्यक्षच समजून आली. ते म्हणाले - "जाळपोळीबद्दल आजऱ्याच्या फार तारा आल्या आहेत. काय प्रकार आहे ?"

**खोट्या तारा :-** मी आधले दिवशीच खुद्द आजऱ्यास भेट दिली होती. त्यावेळी एकही घर जळले नव्हते. दंगा करण्यासाठी आलेल्या सर्व लोकांना पिटाळून देण्यात आले होते. मी जंगलात गेलेल्या जमावाची गाठ घेऊन त्यांना गांधीजींचा उपदेश काय होता ते सांगितले व त्यांना आपापल्या गावी पाठवून दिले. मला तेथे आढळून आले की त्यांनी ही संधी केवळ सावकाराविरुद्ध उठाव घेण्याकरता घेतली होती. ब्राह्मण सावकारांनी त्या लोकांना लेखणीच्या जोरावर भरडून काढले होते. त्यांचा सूड घेण्याची आलेली संधी ते पदरांत पाडून घेणार होते. ते काही गांधीजींचे अभिमानी होते असे म्हणता आलं नसतं. तथापि मी गेलो होतो त्यावेळी आजरे गावाला कसलाही धक्का पोचलेला नव्हता. तथापि मोरारजींच्या तारांचा वर्षाव झाला होता. या मागे पद्धतशीर कारवाई होती.

विरोधी कंपूने केवळ जाळपोळ थांबवण्यास आम्ही असमर्थ ठरलो एवढीच तक्रार केली नाही, तर जाळपोळीला मंत्र्यांनी उत्तेजन दिले व त्यात त्यांचा हात होता अशा तक्रारी केल्या. त्यावेळी सरकारनियुक्त मंत्र्यांच्या घरी आम्ही बसलो असता त्यांनी सुचवले की, रत्नाप्पा कुंभार या मागे आहे. याला

तुरुंगात टाकल्यास या गोष्टीला आपोआप आळा बसेल. पण मीच याविरुद्ध गेलो. "त्याने व मी पूर्वी खांद्याला खांदा लावून काम केले आहे. माझ्या शब्दाला मान असेल तोपर्यंत मी त्याला तुरुंगात घालायला कारणीभूत होणार नाही" असे सांगून त्यांना थोपवले. पण माझ्या या कृत्याचा परिणाम काही चांगला झाला नाही. राजकीय मुत्सद्देगिरीच्या अभावामुळे मी फार नुकसान करून घेतले असेच मला आता वाटते. गांधीवादी सरळपणा राजकारणात चुकीचा ठरतो असा अनुभव आला.

## १०) लोकराज्यात पुन: अटक

*जाळपोळीसंबंधी अतिरंजीत व खोट्या बातम्यावर विश्वास ठेवून भारत सरकाने करवीर संस्थानचे मंत्रीमंडळ बरखास्त करून कॅ. नंजाप्पा नावाच्या जुलमी कारभाराबद्दल कुप्रसिद्ध असलेल्या अधिकाऱ्याला ॲडमिनीस्ट्रेटर नेमले. कॅ. नंजाप्पाचे मन अगोदरच माधवरावांविरुद्ध कलुषित केले गेले होते आणि २५ वर्षे हालअपेष्टा सोसून जनतेला स्वराज्य मिळवून देणाऱ्या माधवरावांना स्वराज्यातही पुन्हा अपमानास्पद वागणूक देऊन अटक केली गेली. माधवरावांच्या आयुष्यात असे चढउतार सतत आलेल आहेत.*

**लोकराज्यानतंर पुन: कारावास :-** दोन तपाहून अधिक इमाने-इतबारे-करवीर जनतेची सेवा केल्याबद्दल, जनतेच्या हक्कासाठी अनेक वेळा कारावास भोगल्याबद्दल, बायको-मुलाला निराधार टाकून तुरुंगवास पत्करल्याबद्दल हिंद-सरकारच्या प्रतिनिधीने मला ता. ११-३-४८ रोजी मानाची जागा दिली. तुरुंगवास भोगल्याचे बक्षीस पुन: तुरुंगवास हे मिळाले. तेही एक गुंड समजून.

करवीर सरकारचे ॲडमिनिस्ट्रेटर मि. नंजाप्पा यांनी मी कोल्हापूरची शांतता व सुव्यवस्था बिघडवतो व राज्याचा पायाच उखडून काढतो अशा आरोपावरून मला ता. १४-४-४८ रोजी आपल्या ऑफिसमध्ये बोलावून घेऊन, चर्चेच्या शेवटी माझा भरपूर अपमान करून मला तेथेच अटक केली. अटक केल्यावेळी जी कारणे दिली ती मोघम होती म्हणून माझेवर कोणते आरोप आहेत ते मी लागलीच तुरुंगात आल्यावर लिहून विचारले. त्याचे उत्तर ता. ५.५.४८ ला मला मिळाले.

माझ्यावरचे आरोप माझे शत्रूही मजवर करणार नाहीत इतके खोटे होते.

कोल्हापुरातील कोणीही (शत्रू नसलेली) सज्ञान व्यक्ती, मी अत्याचारी चळवळीला प्रोत्साहन देणारा, दडून चळवळ करणारा किंवा हिंसावादी मला म्हणणार नाही. डॉ. पट्टाभिसितारामय्या, शंकरराव देव, न. वि. गाडगीळ, पंतप्रधान खेर वगैरे पुढाऱ्यांना मी गांधी-अनुयायी व अहिंसावादी असल्याचे माहीत होते.

आतापर्यंत मी अनेकवेळा तुरुंगात गेलो आहे. बेड्यापासून ते सर्व प्रकारच्या शिक्षा, राजकीय चळवळ करीत असता भोगल्या. उघड उघड सभेत बोलून सत्याग्रह आणि कायदेभंग करून, जाणून बुजून तुरुंगात गेलो. पण मी केव्हाही आणि कसलीही गुप्त चळवळ केली नाही. १९४२ मधील भूमिगत चळवळीत आमच्यातील काही इतर कार्यकर्ते यांनी भाग घेतला, पण मी सामील झालो नाही. उलट चोरट्या मार्गाचा व अत्याचारी चळवळीचा, अप्रियता निषेध केला. जगात शांतता नांदेल व युद्धे बंद पडतील तर ती महात्माजींच्याच मार्गाने व अहिंसेच्याच उपायाने अशी माझी यावेळेपावेतो समजूत होती. यासाठी मी अनेक व्याख्याने दिली, माझ्या स्वत:च्या व बाहेरच्या वर्तमानपत्रातून शेकडो लेख लिहिले व पुस्तकेही लिहिली. राज्यकारभार चालविणाऱ्यांनीसुद्धा महात्माजींचा आदर्श ठेवूनच राज्यकारभार चालविला पाहिजे, दहशतीच्या मार्गाने शांतता राखण्याचा प्रयत्न करणे घातक आहे असे माझे मत होते. ब्रिटिशांनी कायदा व शिस्त ज्या मार्गाने प्रस्थापित केली तो दहशतवादाचा मार्ग लोक-सरकारने स्वीकारू नये, मत परिवर्तनावरच भर द्यावा असे माझे स्पष्ट मत होते. महाराष्ट्रात शांतता प्रस्थापित होईल व जातीतीत सलोखा निर्माण होईल तर तो केवळ "क्षमा करा आणि विसरा" याच मार्गाने होईल, या दृष्टिकोनातून मी कोल्हापुरातील जाळपोळीकडे पहात आलो व प्रजापरिषदेच्या मंत्रिमंडळानेही याच धोरणाने या चळवळीकडे पहावे अशी माझी अपेक्षा होती.

मी आतापर्यंत सारे राजकीय आयुष्य याच ध्येयाला धरून नेत असता कोणाचे तरी ऐकून व माझ्या आतापर्यंतच्या आयुष्याचा यत्किंचितही विचार न करता खोट्या माहितीवर विश्वास ठेवून श्री. नंजाप्पा यांनी माझ्याबरोबर सभ्यतेची व सर्वसाधारण शिष्टाचाराची मर्यादा सोडून ठग, गुन्हेगार, दरोडेखोर, डाकू समजून वागणूक दिली. मला काही दर्जा आहे, दानत आहे, संस्थानात पत आहे, असं यांना जराही वाटत नव्हते. आतापर्यंत कोणीही युरोपियन किंवा कोल्हापुरातील यापूर्वीचा कोणी मंत्री आणि राजा वागला नसेल, इतक्या

उद्धटपणाने यांनी वागवले. व ज्या अत्याचारी मार्गाचा, चळवळीचा व पद्धतीचा मी सतत निषेध केला व विरोध केला तेच आरोप माझ्यावर बिनदिक्कत केले. हे सर्व आरोप खोटे आहेत, असे आरोप तुम्ही मजवर करू नयेत म्हणून लेखी व तोंडी सांगितले, तरी त्यांनी माझ्या शब्दावर विश्वास ठेवला नाही. मी तुरुंगाला भीत नव्हतो. मी अनेकवेळा तो भोगला आहे. पण खोट्या आणि दुष्ट आरोपांमुळे नंजाप्पानी मजवर फार मोठा अन्याय केला. आयुष्यात भरून न निघणारी अशी जखम केली.

तुरुंगात येताच लोक दंगा करतील तर त्यांनी कसल्याही प्रकारची विरोधी चळवळ करू नये म्हणून पत्र काढण्याची परवानगी मागितली, ती नंजाप्पानी दिली नाही.

ॲडमिनिस्ट्रेटर येण्याअगोदर ॲडमिनिस्ट्रेटर कोल्हापूरवर लादणे हे मला असह्य झाले. २०/२५ वर्षे हाल सोसून कोल्हापूरने आपले उद्दिष्ट गाठले. जबाबदार राज्यपद्धती मिळविली. लोक-सरकार आले. आमच्या प्रजापरिषदेचे मंत्री आले. आणि विरोधी पक्षाच्या तारा, पत्रे, भेटी या प्रचारावरून आमचे लोकमंत्री काढले जावेत, आमची तपश्चर्या फुकट जाणे, आमचा अपमान व्हावा, याने मला अत्यंत दु:ख झाले, चोहोकडे जाळपोळ झाली. सांगली, मिरज, सातारा, बेळगांवला झाली, पण कोल्हापूरचेच मंत्री मात्र आपल्या कामावरून दूर व्हावेत, हा मला अन्याय वाटला. आम्हा सर्व कार्यकर्त्यांना हा अन्याय वाटला. म्हणून आम्ही या नेमणुकीचा निषेध करायचे ठरविले. जाहीर सभेत निषेध केला व एक दिवसाचा हरताळही पाळला. पण यानंतर पुढे काहीही केले नाही. ॲडमिनिस्ट्रेटर हे हिंद सरकार असल्यामुळे लढ्याला हिंद सरकार विरुद्ध स्वरूप येईल म्हणून सर्व विरोध मागे घेतला. "ज्ञानप्रकाश" व माझे "अखंड भारत" पत्रातून तसे पत्रक काढले. वॉरंट काढले असल्यास हजर रहा व न्यायाला सहाय्य करा म्हणून लेखी आदेश दिला. या आदेशानंतरही ॲडमिनिस्ट्रेटरनी मला अटक केली. मी अत्याचाराला प्रोत्साहन देतो, शाहू मिल व सरकारी नोकरांचा संप घडवून आणण्याचा प्रयत्न करतो असा आरोप करून मला अटक केली आणि केव्हा, तर ही चळवळ मागे घ्या, कसलाही विरोध करू नका, वॉरंटे असतील ते हजर व्हा, न्यायाला मदत करा, असे जाहीर केल्यानंतर हे नंजाप्पा मला अटक करतात.

## ११) संस्थानचे अयोग्य मार्गे विलिनीकरण- काँग्रेसबद्दल तिटकारा - शे. का. पक्षात प्रवेश

*कोल्हापूर संस्थान विलीन झाले. जनतेच्या इच्छेविरुद्ध, माधवरावांच्या इच्छेविरुद्ध झाले. माधवरावांचा विलिनीकरणाला विरोध हा अनेकाना बुचकळ्यात टाकणारा व माधवरावांच्या अदूरदर्शीपणाचा नमुना वाटतो. पण माधवरावांची बाजू समजाऊन घेण्यासारखी आहे. संस्थानात लोकशाही कारभार आला होता. या छोट्याशा संस्थानात समाजवादाचे प्रयोग यशस्वी होण्यासाठी अनुकुलता होती. बाहेर त्या मानाने सावकाश पावले पडत होती. विलिनीकरणाबरोबर माधवरावांच्या आयुष्याचे एक पर्व, प्रजा परिषदेच्या लढ्याचे पर्व संपले. आता माधवराव महाराष्ट्राच्या राजकारणात प्रवेश करते झाले. काँग्रेसमध्ये न जाता त्यांनी शे. का. पक्षात प्रवेश केला.*

**अयोग्यमार्गे विलिनीकरण :-** विलिनीकरणाला आम्ही घाई केली नाही. आतुरता दाखविली नाही. याचा अर्थ आम्ही विलिनीकरणाला कायमचे विरोधी होतो असे नाही. आम्हाला आमच्या कल्पनेप्रमाणे येथे शेतकरी-कामगार राज्याचा प्रयोग करून पाहण्याची महत्त्वाकांक्षा होती. विलिनीकरण झाल्यानतंर आमच्या इच्छेप्रमाणे तात्काळ सुधारणा करणे शक्य नव्हते. बाहेर शेतकरी-कामगार राज्याला अनुकूल परिस्थिती नव्हती. समाजवादी राजवट आणण्याचे हिंद सरकारचे धोरण नव्हते. आम्ही, आमच्या मंत्रिमंडळाने सरंजामदारशाही नष्ट करण्याचे बोलून दाखवले होते. यामुळे सरंजामदारही रुष्ट झाले होते. त्यांनाही आमची राजवट संपल्यास दु:ख होणार नव्हते. रा. ब. लट्ठे यांचा सल्ला यावेळी संस्थान विलीन व्हावे असा नव्हता. श्री. लट्ठे या आपल्या मताला अखेरपर्यंत चिकटून राहिले. त्यांची भूमिका घटनेला धरून कायदेशीर अशी होती. यामुळे ते काँग्रेस श्रेष्ठींच्या फार नाराजीत आले. पण महाराजांनी आम्हालाही विचारले नाही. जनतेलाही विश्वासात घेऊन त्यांच्यावर ही बाब सोपवली नाही. व विलिनीकरणाला संमती दिली. व या आधारावर लोकांना बाजूस सारून, लोकमत न घेता काँग्रेस श्रेष्ठींनी संस्थान विलीन केले. महाराजांची भूमिका पुरोगामी होती की इष्टापत्ती म्हणून हा मार्ग स्वीकारला ते, तेच जाणे. सक्तीची खुशी असणेच संभवनीय अधिक. बाकी काँग्रेसचे करणे लोकशाहीला धरून होते असे म्हणता येणार नाही.

**हिरे-चव्हाणांचा प्रयत्न :** ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पाने मला तुरुंगात

टाकले त्यावेळी मला तेथे भेटण्यास व शक्य तर माझी सोडवणूक करता यावी या इराद्याने प्रांताध्यक्ष हिरे व यशवंतराव चव्हाण ही दोन मंडळी आली होती. मी काँग्रेसमध्ये यावे अशी भाऊसाहेबांची फार इच्छा होती. हिरे तसे बोललेही. "माधवराव त्याग आणि कष्टाच्या दृष्टीने केशवराव जेध्यांचे मागे ही जागा वस्तुतः तुमची आहे. तुम्हाला ती मिळण्याजोगी आहे. तुम्ही काँग्रेसमध्ये या" अशा अर्थाचे ते बोलले. त्यांनी मला सोडण्याची खटपट केली असावी. कारण त्यांच्या भेटीनंतर मी लवकर सुटलो.

सुटल्यानंतर मी पुण्यास गेलो. बाबुराव चिपळूणकर यांचे घरी मी उतरलो होतो. तिथे हिरे आले. आम्ही पुष्कळ बोललो. काँग्रेसमध्ये जाण्याबद्दल मी आतुर नव्हतोच. काँग्रेसमध्ये जाण्याची माझी इच्छा नव्हती. मी जिल्हाध्यक्ष रहावं ही त्यावेळी सर्वांची इच्छा दिसून आली. पण मी स्पष्ट नकार दिला. पण बॅ. खर्डेकर, एम. आर. देसाई यांना अध्यक्ष व सेक्रेटरी या जागा देऊन काही थोडे दुसऱ्या गटातले असावेत ही माझी सूचना त्यांनी कबूलही केली. नंजाप्पाच्या कारकीर्दीत मला तुरुंगात जाण्याचा प्रसंग येणार म्हणून प्रजापरिषदेचे कार्य पुढे चालवण्याकरता खर्डेकर व एम. आर. देसाई यांना ते अधिकार देण्यात आले होते. त्यांनी नंजाप्पा असतानाच दौरे काढून बहुजनसमाजात जागृती राखली होती. यामुळे तुरुंगात आम्हाला उत्साह वाटत होता. याच वेळी विलिनीकरणासाठी काढलेल्या रत्नाप्पाच्या दौऱ्यात त्याची होणारी फटफजिती वाचण्यात येत होती. एम. आर. देसाई यांची धडाडी व संघटना चातुर्यही वाखाणण्याजोगे होते. पण हिऱ्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांना या गोष्टी करता आल्या नाहीत असे दिसले. हिऱ्यांना ज्या गोष्टी पाहिजे होत्या त्या दिल्लीतल्या कमेटीतील एक दोन व्यक्तींना नको असाव्यात असे मला वाटते. यामुळेही कल्पना बारगळली.

**मला काँग्रेसमध्ये राहणे नको होते :-** माझी स्वतःची इच्छा मात्र काँग्रेसमध्ये राहण्याची नव्हती. स्थानबद्धतेच्या कालात मला या गोष्टीचा शांतपणे विचार करता आला. भावी आयुष्याची निश्चित अशी रूपरेखा आखता आली. काँग्रेसमध्ये राहण्यात व्यक्तिशः माझा खूप फायदा झाला असता. पण फायद्याचा दृष्टीने मी माझे आत्तापर्यंतचे आयुष्य घालवले नव्हते. नाहीतर लाखो रुपये मी सहजगत्या मिळवू शकलो असतो. तशी हाती सत्ता होती, संधी होती.

काँग्रेस ही देशाला धडाडीने समाजवादाकडे नेईल असे जराही लक्षण

दिसेना. राजशाही नष्ट केली ती मुख्यत: भांडवलवाल्यांच्या स्वार्थासाठी आणि आपल्या हाती सर्व सत्ता केंद्रित करण्यासाठी असेच दिसू लागले. संयुक्त महाराष्ट्र पुढे ढकलण्यात जी वृत्ती आहे तीच संस्थाने नष्ट करण्यात आहे. कारण राजसत्ता नष्ट केली पण भरमसाठ उत्पन्ने शाबूत ठेवलीच आहेत. वल्लभभाई तर भांडवलवाल्यांचे रक्षक आणि कम्युनिझमचे तर उघड उघड शत्रू. गरिबांची पिळवणूक चालूच आहे.

या सर्व गोष्टी उघडकीला आणून समाजवादी राजवटीसाठी श्रमजीवी वर्गाची संघटना करायची तर काँग्रेसमध्ये राहून शक्य नव्हते. काँग्रेसचा सभासद त्या संस्थेच्या शिस्तीला बांधलेला. तो काँग्रेसच्या आणि काँग्रेस सरकारच्या विरुद्ध कसा बोलणार. काँग्रेसमध्ये राहिल्यास ज्या बहुजन समाजाचा माझ्यावर विश्वास ते बुचकळ्यात पडणार. त्यांच्यात जागृती मग ती कशी करणार ? प्रतिकारशक्ती कशी वाढवणार, आणि म्हणून मी तुरुंगात असतानाच पूर्ण विचार करून शेतकरी-कामगार पक्षांत जाण्याचे ठरवले.

# जीवन प्रवाह भाग - ३

## १) आत्मपरीक्षण

*या छोट्याशा उताऱ्यावरून माधवरावांचा या आत्मचरित्राकडे पाहण्याचा दृष्टीकोण समजतो. आत्मचरित्राला प्रामाणिक आत्मपरीक्षणाची गरज असते. असे ते मानतात. थोडेसे आत्मसमर्थन अपरिहार्य ठरते. आत्मचरित्रावरून त्या काळाची सामाजिक परिस्थिती, समजुती, चालीरीती आणि संघर्ष समजून घेणे शक्य होते असे माधवराव मानतात.*

प्रवाह जिवंत आहे तोपर्यंत भर ही पडायचीच, त्यात सुवासिक फुले पडायची. तशी जवळ न घेण्याजोगी घाणही पडायची. पाणी बिघडायचे, तसे अनुभवाच्या उन्हाने तापल्यानंतर शुद्धही व्हायचे. कमळे फुलायची, तशी काटेरी झुडपेही उगवायची. ही झाली पृष्ठभागावरची गोष्ट. पण अंतरंग आत बुडी मारल्याखेरीज कसे दिसणार ? त्याला प्रामाणिक आत्मपरीक्षणाची आवश्यकता असते. त्या खेरीज आत्मचरित्र व्यर्थ असते. पण इतके प्रामाणिकपणे आत्मचरित्र लिहिणारा असेल का कुणी ? माझ्या आत्मचरित्रात असले काही दोष राहणारच. पण हे दोष काढण्याचा प्रामाणिक प्रयत्न केल्यास तो पुष्कळ

यशस्वी होऊ शकेल. पण जीवनातील घाण, समाजाला त्यापासून फायदा असेल तरच उपसून बाहेर काढावी असे मला वाटते.

मनुष्याच्या जीवनात असे कितीतरी कप्पे असतात की ते त्याला उघडताच येत नाहीत. लोकांना संत वाटणारा माणूस अगदी ठग असू शकतो. त्यागी, नि:स्वार्थी, सत्शील म्हणून प्रसिद्ध असलेल्या व्यक्तीने कोणतेही सुख सोडले नाही. अशा गोष्टी दृष्टोत्पतीस येतात. दुसरी एक गोष्ट. आत्मचरित्रकार कितीही नि:पक्षपातीपणाने लिहू लागला तरी त्यातून त्याला नकळत आत्मसमर्थन डोकावत असतंच. यातून मी सर्वस्वी अलिप्त राहिलो असेन असं कसं म्हणू? असं जरी असलं तरी आत्मचरित्रातून त्या कालची सामाजिक परिस्थिती, समजुती, चालीरीती आणि संघर्ष समजून घेणे शक्य होते. हीच दृष्टी ठेवली तर या आठवणी सर्वस्वी टाकाऊ ठरणार नाहीत.

## २) संयुक्त महाराष्ट्र समितीत

*माधवराव बागलांच्या संघर्षमय जीवनाच्या दुसऱ्या पर्वाला सुरुवात झालेली आहे. संयुक्त महाराष्ट्र समितीच्या लढ्याला सुरुवात झाली आहे. यात सर्व पक्षांचे, गटाचे लोक होते. माधवराव कोणत्याच पक्षात नव्हते. पण अनेकांच्या आग्रहावरून या सर्वपक्षीय संयुक्त महाराष्ट्र समितीत ते आले. कोल्हापूर जिल्हा संयुक्त महाराष्ट्र समितीचे ते अध्यक्ष झाले. फाजल अली कमिशनचा अहवाल जाहीर झाला. मराठी भाषिकांचे स्वतंत्र राज्य नाकारण्यात आले. लढ्याला सुरुवात झाली आणि त्याचे नेतृत्व साहजिकच माधवरावांकडे आले. कोणत्याही लढाईत माधवरावांची वाणी, लेखणी व कृती याला धार चढते. मात्र माधवराव कोणताही लढा संयमाने व शांततेने लढवीत.*

मी आज कुठल्याच पक्षात नव्हतो. राजकीय सत्ता संपादन करायची तर त्याला पक्ष आवश्यक असतो. पण व्यक्तिविकासाला आणि व्यक्तिस्वातंत्र्याला त्याने मर्यादा पडते. मला ते नको होते. म्हणूनच मी पक्ष बंधनातून मोकळा झालो होतो.

या अपक्ष भूमिकेमुळेच काँग्रेसची व काँग्रेसला अनुकूल असलेली मंडळी पुढारीचे संपादक गणपतराव जाधव, समाजचे संपादक सर्जेराव पाटील, व कौलवकर बाळासाहेब पाटील यांनी भीड घालून मला संयुक्त महाराष्ट्र परिषदेत गुंतवले. कदाचित त्यांना तशी भाऊसाहेब हिरे रेव्हेन्यू मिनिस्टर यांची

सूचना असेलही.

माझी भूमिका मी स्वच्छ केली. "लिहीन, व्याख्याने देईन, झेपेल तसा दौरा काढीन या पलीकडे मी काहीही करू शकणार नाही. बाकीची सर्व जबाबदारी तुम्हाला घ्यावी लागेल" त्यांनी होकार देऊन, नगरपालिकेत सभा घेतली. व मला अध्यक्षपद देण्यात आले. कार्यकारी मंडळात सर्व मतांचे, सर्व पक्षांचे संयुक्त महाराष्ट्रवादी होते. पूर्वी एका बैठकीवर न बसणारे, एका व्यासपीठावर आले.

पक्षभेद आणि मतभेद राखून जवळ येण्याची व बोलण्याची सवय महाराष्ट्रालाच नव्हे तर भारतीयांना आवश्यक आहे. महाराष्ट्र जातिभेदाने खिळखिळा झालाच होता. आता राजकारणामुळे अनेक राजकीय जाती पडून, वैमनस्यात आणखी भर पडली आहे. भिन्न मतांचे व भिन्न पक्षांचे सभासद एकमेकांची तोंडे पहायला आणि खासगी व्यक्तिविषयक संबंध ठेवायला तयार नसत. म्हणून सर्वांना जवळ आणणाऱ्या संस्थेचं अध्यक्षपद मला फार पवित्र वाटू लागले. हा संयोग टिकविता आला तर केवढी भाग्याची गोष्ट. या संस्थेशी माझा संबंध यावा हेही मला भाग्याचे वाटू लागले.

संयुक्त महाराष्ट्र झाला की समाजवाद लवकर आणणे शक्य होईल. लोकशाहीची बीजे तळापर्यंत पोहोचतील. ही माझी संयुक्त महाराष्ट्राकडे पाहण्याची दृष्टी. महाराष्ट्राच्या अभिमानात आणखी अनेक गोष्टींचा समावेश होतो. आमचा इतिहास, भूगोल, संस्कृती, धर्मवीर पुरुषांचा अभिमान, त्यांची स्मृती, भाषेचा व्यवहारी उपयोग यावर आमचा सर्वांगीण विकास अवलंबून आहे. ही माझी श्रद्धा. हा अभिमान देशाला उपकारच ठरतो अशी माझी खात्री. म्हणून संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाला पाहिजे ही अंतरीची आत्यंतिक तळमळ. त्यासाठी कोणताही त्याग करावा लागला तर करेन हा मनाचा निश्चय मला स्वस्थ बसू देत नसे. ही ऊर्मी, लेखनातून, व्याख्यानातून उसळीने बाहेर पडत असे. हे स्वप्न प्रत्यक्षात येईल तेव्हा येवो पण यासाठी मरण आलं तरी पत्करण्याची मानसिक तयारी झाली होती. ती कृतीला किती उतरेल ते मी काय सांगू ? मनाप्रमाणं पाऊल पडलं तरी क्षुद्र व्यक्तीलासुद्धा पुष्कळ करता येतं. या अशा मानसिक अवस्थेत असतानाच कोल्हापूर जिल्हा महाराष्ट्र एकीकरण परिषदेचे अध्यक्षपद लाभलं.

सेवेला साधन मिळालं. संघटना तयार झाली. भाऊसाहेब हिरे बरेच

स्पष्ट बोलू लागले होते. खासगी बोलण्यात व व्याख्यानात त्यांची तळमळ दिसून येत होती. यामुळे ते काँग्रेसमध्ये असूनही त्यांच्याबद्दल आपुलकी वाटू लागली होती. संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाल्याने महाराष्ट्राचा सर्वांगीण विकास होईल व डोळ्यासमोरच समाजवाद येईल अशी आशा उत्पन्न झाली.

**राज्यपुनर्रचना मंडळाचा अहवाल :-**

**राज्यपुनर्रचना मंडळाचा अहवाल बाहेर पडला -**

अहवाल बाहेर पडताक्षणीच माझे मन विरोधी मत दुसरेच दिवशी प्रकट केले. या प्रश्नावर मुंबईचे मंत्री बाहेर पडतील अशी अपेक्षा प्रकट केली. हे माझे मत टाइम्समध्ये आकर्षक मथळ्यात प्रसिद्ध झाले. यानंतर इतरांनी आपली मते प्रदर्शित केली. लोकशक्तीकारांनी माझ्या या औधत्याबद्दल टीका केली.

या अहवालामुळे माझ्या महाराष्ट्रभिमानाने जोराची उसळी मारली. लढ्याचा प्रसंग आला की, मला नवा जोम चढतो. उत्साह वाढतो. नैराश्य गळून पडते. तारुण्य येते. लेखन, वाचन व एखादे व्याख्यान हे चाललेच होते पण या साऱ्या साधनांना पुन: धार चढली.

यावेळी "शांतिदूत" साप्ताहिकाची फार मदत झाली. मी देईन तो लेख त्यात येत होता. इतर स्थानिक पत्रांचे तसे नव्हते. त्यांच्या त्यावेळच्या धोरणात असेल त्याच लेखाचा स्वीकार व्हायचा. याचमुळे मी शांतिदूत साप्ताहिकात दर अंकात लेख देत आलो. पण हे पत्र फार काळ टिकू शकले नाही. संस्थेत असो नसो, पत्राद्वारे माझी सेवा चालूच होती.

येथील संयुक्त महाराष्ट्र एकीकरण परिषदेचे अध्यक्षपद मला पूर्वीच देण्यात आले होते. पण ती अधिक व्यापक करावी या हेतूने भरलेल्या सभेत जुने मंडळ बरखास्त केले. पण नवीन समिती व्यापक करण्याऐवजी लहानच केली. अध्यक्ष, सेक्रेटरी असे स्वरूप काढून सातांची कृतिसमिती नेमण्यात आली व दोघे निमंत्रक नेमले गेले. त्या सातात मी एक होतो एवढेच. या घटनेमागे काय हेतू होता ते समजण्यास मी असमर्थ होतो.

याचा परिणाम माझ्या स्वत:च्या कार्यावर काहीच झाला नाही. मला बाहेरची आमंत्रणे येत होती. ती काही परिषदेचा अध्यक्ष म्हणून येत नव्हती. व्यक्ती म्हणून येत होती. ती मी स्वीकारत होतो. माझे कार्य काही बंद पडले नाही. मला दौऱ्यावर सारखे जावे लागत होते. याच सुमारास नाशिक, बेळगांव, अकोला, मुंबईची आमंत्रणे आली होती.

**फाजलअल्ली कमिशनच्या जाहीर निषेधाची सभा : १२/१०/५५ :-**

कमिशनचा निर्णय उलट जाणार हे जवळ जवळ ठरलेलेच होते. त्यामुळे वातावरण अगदी तंग झालं होतं. या वातावरणाचा हिंसक स्फोट होऊ नये म्हणून मी निर्णय जाहीर होण्यापूर्वीच दक्षता घेत होतो. २६ सप्टेंबर १९५५ ला एका पत्रकात तसा इषारा दिला होता. तो तसाच देत आहे.

"राज्य पुनर्रचना समितीच्या निर्णयानंतर" या मथळ्याखाली पाचच वाक्ये जाहीर केली ती -- (१) कोल्हापुरात शांतता राखण्याचे काम तालमींनी करावयाचे. (२) ही चळवळ गुजराथी जमातीविरुद्ध नाही. (३) गुजराथी व इतर अल्पसंख्यांक जमाती आपले बंधूच होत. (४) भडक भाषणं करता कामा नयेत. (५) सरकार आपलं आहे हे विसरता कामा नये. पुन: ता. ३ ऑक्टोबरला दुसरा इशारा दिला. "फाजलभाई रिपोर्ट लवकरच बाहेर पडेल. निकाल विरुद्ध लागल्यास गांगरण्याचे कारण नाही. महाराष्ट्र परिषद योग्यकाळी मार्गदर्शन करीलच. सभा, मिरवणुकी, हरताळ याबद्दलचा आदेश कोल्हापूर जिल्हा महाराष्ट्र एकीकरण परिषद घेईल. लोकांनी स्वत:च्या जबाबदारीवर कार्यक्रम अंगावर घेऊ नयेत. संयम म्हणजे भीरुपणा नव्हे. सभा तातडीने घेतली जाईलच. यानंतर रिपोर्ट जाहीर होताच तातडीने सभा बोलावली.

कोल्हापूर शहर हे राजकीयदृष्ट्या नेहमीच जागृत असल्यामुळे सभा नेहमीपेक्षा मोठी झाली. लोकांना बिंदु चौक अपुरा पडला. माझ्या भाषणाचा सारांश : "या अहवालाने आमच्या जिव्हारी घाव घातला आहे. शिवस्मृती नष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. महाराष्ट्राचा मानभंग केला आहे. महाराष्ट्राभिमानी हे कसे खपवून घेईल? देशासाठी व ध्येयासाठी त्याने पूर्वी रक्त सांडले आहे. आज त्याच निष्ठेने तो स्वत:चे रक्त सांडल्याखेरीज राहणार नाही. भारत आमचा देश आहे, पण महाराष्ट्र आमचा प्राण आहे; म्हणूनच महाराष्ट्र मिळविण्यास आम्ही देह अर्पण करण्यास कचरणार नाही. महाराष्ट्रानं गुजराथ्यांचा हेवादेवा केला नाही. ते करूही इच्छित नाहीत. पण आम्हा मराठा बोलीच्या आमजनतेच्या विकासासाठी एका बोलीचा राज्यविभाग आम्हांस हवा आहे.

आमचा इतिहास आणि आमची परंपरा आम्हाला राखावयाची आहे. म्हणूनच महाराष्ट्र मिळविण्यास आम्ही देह अर्पण करण्यास कचरणार नाही. "करेंगे या मरेंगे" याच निश्चयाने आम्ही चळवळ चालवू. मरेंगें, मारेंगे नव्हे.

दे. भ. पूज्य शंकररावजी देव हे प्राणांतिक उपवास अखेरच्या वेळी करण्याची संभवता आहे. या बातमीचा इन्कार त्यांनी केलेला नाही. तशी वेळ आली आणि शंकररावजीनीं प्राणांतिक उपोषण जाहीर केले तर मीही त्यांचे मागोमाग प्राणांतिक उपवास केल्याखेरीज राहणार नाही. आपण संयम राखला आहे. त्याच संयमाने पूर्ण अनत्याचारी राहून कसलाही दंगा करू नका व करून देऊ नका. निश्चय व संयम आपल्याला यश मिळवून देईल".

या सभेनंतर पुन: ता. १४ ला आदेशाप्रमाणे प्रचंड मिरवणूक निघाली. ती सकाळी दसरा चौकातून निघाली. गावात कडकडीत हरताळ पडल्यामुळे नागरिकांनी मोठ्या प्रमाणाने मिरवणुकीत भाग घेतला. दंगा कुठेही झाला नाही. संध्याकाळी खूप मोठी सभा झाली.

## ३) संयुक्त महाराष्ट्र कृती समिती

*संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर जनतेत प्रचंड जागृती झाली होती प्रचंड असंतोष होता. या असंतोषाला वाट करून देण्याला शंकरराव देव यांच्या प्रभावाखाली असलेली संयुक्त महाराष्ट्र परिषद असमर्थ ठरू लागली म्हणून संयुक्त महाराष्ट्रासाठी लढू इच्छिणाऱ्या व्यक्ती व पक्ष यांची एक संयुक्त महाराष्ट्र समिती, एस. एम. जोशी याचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आली व १६ मार्च १९५६ पासून सर्व महाराष्ट्रभर सत्याग्रह करण्याचे ठरविले. कोल्हापूर जिल्ह्याची जबाबदारी भाईजींनी समर्थपणे सांभाळली. या चळवळीतून जी एकोप्याची भावना कधी नव्हती ती महाराष्ट्रात दिसुन आली. याचा उपयोग करून एक संयुक्त आघाडी निर्माण करावी असे भाईजीना सारखे वाटायचे. वालचंद कोठारीने ही कल्पना उचलून धरली कोठारी, एस. एम., अत्रे, ठाकरे व माधवराव यांनी एक संयुक्त पत्रक काढून एक व्यापक लोकशाही पक्ष स्थापन करण्याचे सर्वांना आव्हान करण्यात आले. या पाच जणाना संयुक्त महाराष्ट्र समितीचे पंचप्राण म्हणून संबोधले जायचे. पण असा लोकशाही पक्ष मात्र स्थापन होऊ शकला नाही.*

या सर्व असंतोषाला काबूत आणण्याकरिता नवीन मार्ग दाखवणं अवश्य होतं. संयुक्त महाराष्ट्र परिषद या गोष्टी करू शकली असती. पण दे. भ. शंकरराव देव यांनी सर्वाधिकार घेऊन परिषदेस कामास लावण्याऐवजी त्यांनी त्या अधिकाराचा दुरुपयोग करून ती बरखास्त केली. महाराष्ट्राभिमानी कॉंग्रेस व्यतिरिक्त सर्व पक्षांना व कार्यकर्त्यांना निराश केले. याच सुमारास त्यांनी मुंबइत सुरू केलेला उपवासही लोकांना दुखावणाराच होता. अत्याचार

आततताईपणा जनतेकडून झाला, तसा मोरारजीच्या पोलिसांकडूनही झाला. शंकररावजींनी दोघांविरुद्ध उपवास केला असता तर तो नि:पक्षपाती ठरला असता. पण त्यांनी जनतेलाच दूषणे दिली. काँग्रेस पुढाऱ्यांच्या चुका मात्र दाखवल्या नाहीत. दोन्हीही त्यांना जवळचेच होते. प्रेमाचा व घरोब्याचा संबंध काँग्रेसवाल्यांशीच जास्त होता. त्यांच्या उपवासाने ते लोकांपासून दूरच गेले. अप्रिय झाले. म्हणून या अत्याचाराला व असंतोषाला रुळावर आणण्याकरिता लढाऊ महाराष्ट्रभिमान्यांना "संयुक्त महाराष्ट्र कृती समिती" स्थापन करावी लागली. शंकरराव देवांनी टाकून दिलेली ही जबाबदारी महाराष्ट्रासाठी लढू इच्छिणाऱ्या, त्यागास तयार असणाऱ्या पक्षांना आणि व्यक्तींना उचलावी लागली. यांत सर्व डाव्या पक्षांचा अन् जनसंघाचाही समावेश आहे. काही स्वतंत्र अपक्ष व्यक्तीही आहेत. प्रजासमाजवाद्यांचे महाराष्ट्रातले पक्ष धुरीण साथी एस. एम. जोशी यांच्या नेतृत्वाखाली समितीची स्थापना झाली. प्रत्येक पक्ष प्रमुखांचा व व्यक्तींचा समावेश करून कार्यकारी मंडळ (सेक्रेटरीएट) निवडण्यात आलं. त्या बैठकीस हजर राहू शकलो नाही. पण माझीही त्यात निवड करण्यात आली.

६-२-५६ या समितीच्या नेतृत्वाखाली त्यांच्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरता कोल्हापुरात कोरगांवकर ग्रामसेवाश्रमामध्ये कोल्हापूर जिल्ह्यातील सर्व पक्षीय अशी तीनशे कार्यकर्त्यांची बैठक भरवण्यात आली. या कोल्हापूर जिल्हा स. म. परिषदेचे अध्यक्षपद मला देण्यात आले. पुढील बैठकीत सेक्रेटरीज निवडून घेण्याचा अधिकार मला देण्यात आला. त्याला अनुसरून दिनकरराव यादव जनरल सेक्रेटरी, बळवंतराव बराले व दत्ता शिंदे सहचिटणीस, पक्ष प्रतिनिधी भाऊसाहेब महागांवकर, शे. का. प., संतराम पाटील लाल निशाण गट, शंकरराव सावंत कम्यु. पक्ष, रायबोले शे. का. फे. सांगलीकर जनसंघ, स्वतंत्र एम. आर. देसाई, ऑफिस सेक्रेटरी पानसरे असे निवडण्यात आले. मध्यवर्तीत प्रत्येक तालुक्यात प्रतिनिधित्व देण्यात आलं. या आमच्या परिषदेने पुणे संयुक्त महाराष्ट्र कृती समितीच्या आदेशाप्रमाणे चालायचे होते. त्या व्यतिरिक्त दुसरा कोणताही कार्यक्रम स्वतंत्रपणे घ्यायचा नव्हता. हे बंधन महाराष्ट्रातील सर्वच परिषदांनी व समित्यांनी पाळावयाचे ठरविले होते. १६ मार्च १९५६ पासून महाराष्ट्रात सत्याग्रह चालू करण्याचे पुणे मध्यवर्ती समितीने ठरवून तसा आदेश सर्व समित्यांना देण्यात आला होता.

**सत्याग्रह :** पुणे मध्यवर्ती कृती समितीच्या आदेशानुसार आम्हीही सत्याग्रहास

सुरुवात केली. सत्याग्रहात खंड पडू नये म्हणून मी पाचाच्याच तुकड्या रोज पाठवाव्यात अशी केलेली सूचना कार्यकारी मंडळाने पास केली. या निर्णयामुळे कोल्हापुरात भरपूर जागृती होईपर्यंत नियमित तुकड्या पाठवता आल्या. सत्याग्रही कमी पडत नाहीत अशी खात्री पटल्यानंतर मग अधिक सत्याग्रही पाठवता येऊ लागले. दिवसातून अधिक वेळा अधिक तुकड्या पाठवू शकलो. पहिल्या तुकडीत कोणी तरी आमदार पाठवावेत म्हणजे लोकांवर विशेष परिणाम होईल म्हणून आमदार खांडेकरांची निवड करण्यात आली, पण त्यांना दंडावर सोडून इतरांनाच शिक्षा करण्यात आल्या.

सत्याग्रह ठीक चालला होता. मुंबई बेळगावनंतर कोल्हापूरचाच नंबर लागेल. चुकूनही दंगल झाली नाही. लोकांनी अभिनंदनीय संयम पाळला. कॉंग्रेस आमदारांच्या घरासमोर राजीनामा द्या या घोषणा करण्याकरता तुकड्या पाठवल्या. विशेष आनंदाची गोष्ट नारायणराव सरनाईक यांनी तुकडीस हार घालून निवेदन हाती दिले व डॉ. नरवणे वगैरे मंडळी जे ठरवतील त्याप्रमाणे आपणही करू असे जाहीर केले. पुढे त्यांनी माघार घेतली. शिवजयंतीपर्यंत प्रत्येक सत्याग्रहाच्या वेळी मी जातीने त्या ठिकाणी जाऊन देखरेख करीत होतो. रोज ३/४ तास यासाठी खर्चत होतो. लोकांना पुढे पुढे चांगले वळण लागले. पण जयंतीनंतर जाता येईना. पाय फारच दुखू लागला, म्हणून मोटार आली तरच समारंभाला वा व्याख्यानाला कोणाच्या तरी खांद्यावर हात टाकीत जाऊ लागलो. देहाला शीण आला तरी मनाला आनंद वाटला. कर्तव्यपूर्तीचे समाधान वाटते. पडून राहण्याचा अगदी वैताग आला. पायात जोर यावा म्हणून मेहनतीस सुरुवात केली. सकाळी उठताच तीन उठाबशा काढायच्या. हुश्श् करून धाडकन् पलंगावर अंग टाकायचे. पुढे हे ही टाकून दिले.

ज्यावेळी मी परिषदेचे अध्यक्षपद स्वीकारले त्यावेळी भरलेल्या सेक्रेटरीजच्या बैठकीत मी माझे विचार मांडले होते की, आपण जरी एक ध्येयासाठी जवळ आलो असलो तरी आम्हा सेक्रेटरीएटच्या सभासदात भ्रातृभाव राहिला पाहिजे. आपण हे एकत्र कुटुंब बनवले आहे. ते टिकविण्याची व कौटुंबिक भावना वाढवण्याची शिकस्त केली पाहिजे. ही आघाडी मोडणे म्हणजे संयुक्त महाराष्ट्राचा घात करणे होय. म्हणून पक्षाचा दृष्टिकोन पक्ष प्रतिनिधींनी मांडावा पण सर्वानुमते निर्णय घेतल्यानंतर ते मतभेद विसरून गेले पाहिजेत आणि विशेष म्हणजे अध्यक्षाने व सेक्रेटरीने पूर्णपणे अपक्षवृत्ती राखली

पाहिजे. तरच आघाडी पवित्र राहील व ती टिकेल. माझे सेक्रेटरी जरी मी शे. का. पक्षातले घेतले होते तरी या अटीवरच घेतले होते. याच नि:पक्षपाती वृत्तीनेच ते वागतील अशी आशा मी धरूनच त्यांची नेमणूक केली होती.

सत्याग्रहाच्या चळवळीने वस्तुत: जो उठाव केला होता तो कोणत्याही एका पक्षाच्या हाकेमुळे नव्हे. ती महाराष्ट्राची हाक होती. जनता साथ देत होती. कोणत्याही एका पक्षाने, आपल्या पक्षामुळेच हे चालले आहे ही कल्पना करून घेणे म्हणजे स्वत:ची फसवणूक करून घेण्यासारखे होते. ज्यांचा यावेळेपावेतो राजकारणाशी कसलाही संबंध नव्हता, अशा असंख्य व्यक्ती, पुरुष व स्त्रिया, सत्याग्रहात स्वखुषीने भाग घेत होत्या अशी अपूर्व जागृती यापूर्वी महाराष्ट्राच्या इतिहासात पहायला मिळणार नाही. ती एका पक्षाच्या वजनामुळे नव्हे, कोणा एका व्यक्तीच्या प्रोत्साहनामुळे नव्हे.

याचमुळे संयुक्त आघाडीला हा काल अत्यंत अनुकूल होता. या एकीवरच आता महाराष्ट्राचं भाग्य अवलंबून आहे. दुसऱ्याचे कपाळ फोडण्याऐवजी बेकी झाली, आघाडी फुटली; तर आमचा कपाळमोक्ष आम्हीच करून घेऊ.

ही आपत्ती टाळण्यासाठीच प्रभातकार वालचंद कोठारी यांनी संयुक्त आघाडीची कल्पना सारखी उचलून धरली. माझे सहकार्य त्यांनी मागितले व ते मी लागलीच दिले व सेनापती बापट, अत्रे , ठाकरे व मी अशा पाच जणांनी संयुक्तपत्रक काढून महाराष्ट्रीयांना आवाहन केले ते सारांशाने :- (१ मे १९५६).

"..... आम्हाला असे वाटते की महाराष्ट्रभर ही जी विलक्षण लोकजागृती झाली आहे तिचा उपयोग एक व्यापक लोकशाही पक्ष स्थापण्याच्या कामी करावा. या पक्षात सर्व पुरोगामी गट व पुरोगामी विचारांच्या स्वतंत्र व्यक्ती यांचा समावेश करण्यात यावा. सुस्पष्ट अशा समाजवादी कार्यक्रमावर हा पक्ष उभारण्यात यावा... हा उद्देश मनात धरून लौकरच सर्व डाव्या पक्षांची, गटांची व समाजवादी विचाराच्या स्वतंत्र व्यक्ती यांची एक परिषद बोलावण्याचा आमचा बेत आहे. या आमच्या लोकशाही प्रधान उपक्रमात सर्वांचे सहकार्य मिळेल असा भरवसा आम्हास वाटतो."

असे आम्हा पाच जणांच्या सह्यांचे पत्रक काढण्यात आले होते. याच पत्रकाच्या उद्देशाला धरून कोल्हापुरातील सं. म. जि. परिषदेतून निर्माण झालेली आघाडी महाराष्ट्रात एक आदर्श ठरावी. सर्व पक्ष प्रेमाने, समतेने व एकजुटीने

रहावेत, येथे पक्षकारण घुसडता कामा नये. कोणत्याही पक्षाचे घोडे दामटले जाऊ नये, अल्पसंख्य पक्षाला कमीपणा वाटेल असे काही होऊ नये म्हणून मी अट्टाहास करीत होतो पण माझ्या इच्छेप्रमाणे अंमलबजावणी होत नव्हती. सत्याग्रह तुकडीच्या नेत्याच्या पक्षाचा उल्लेख होऊ नये, त्यामुळे आमच्यात खरी एकी झाली नाही असे वाटेल. सर्वच पक्ष एकत्र आलो आहोत. म्हणून पक्षाच्या अलगपणाचे प्रदर्शन होता कामा नये, असा माझा आग्रह होता. तोंडावर विरोध न करता कृतीत मात्र विसंगती ठेवण्यात येत होती. संकुचित पक्षाभिमान कमी होत नव्हता. उलट आपल्या कृत्याचे समर्थनच एक व्यक्ती सारखी करीत असे. तात्विक भूमिका स्विकारायला ती तयारच नसे. तात्विक विवेचनाचीही तयारी नव्हती. "इतरत्र हे चाललेच आहे, मग आपण का करू नये" ही तत्त्वशून्य विचारसरणी मांडण्यात येत होती. "दुसऱ्याने चोरी केली, मी का करू नये? दुसऱ्याने चुका केल्या, मी का करू नये" हे उत्तर विचारी माणूस कधीही देणार नाही. तेव्हा सेक्रेटरीएटच्या बैठकीसमोरच हा प्रश्न मांडला. सुदैवाने तो एकमताने पास झाला. नेत्याला पक्षाचा शिक्का मारू नये इतकेच नव्हे तर नेतेपणही जाहीर करू नये, त्यानेही तुकडीतील बरोबरच्या इतरांना उगाच कमीपणा येतो, म्हणून तेही गाळावे असे ठरले. सेक्रेटरीएटच्या एकमुखी ठरावाने डोक्यातली कीड साफ निघून गेली. या ठरावानंतर त्या दिवशी मला गाढ झोप लागली.

## ४) कार्यकर्ता निष्कांचन आणि श्रीमंत माधवरावांच्या मनातील अस्वस्थता

*या उताऱ्यात निष्कांचन, गरीब कार्यकर्त्यांच्या सार्वजनिक कार्य करताना जाणवणाऱ्या अडचणींची व मनाच्या व्यथांची कथा सांगितली आहे. श्रीमंत जनतेला करणे सोपे असते, मग अशी सेवा फॅशन म्हणून का केलेली असेना. पण तळमळीच्या गरीब कार्यकर्त्यांना मात्र अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते. खुद्द माधवरावांना अनेक वेळा या अडचणी जाणवल्या आहेत.*

*समाजाला निष्कांचन कार्यकर्त्यापेक्षा श्रीमान कार्यकर्ता आवडतो व झेपतो. त्याला आमंत्रण दिले की तो आपल्या खर्चाने जाऊ शकतो. लहर आली तर देणगीही देऊ शकतो. या दृष्टीने लोकांना असा श्रीमान कार्यकर्ताच नेणे बरे वाटते. श्रीमान माणूस दारी आला म्हणजे त्याच्या आदरातिथ्याची जी घाई होते ती पायी येणाऱ्या कार्यकर्त्याबद्दल होत नाही. मोटारीला आणि पैशाला*

मानण्याची प्रवृत्ती समाजातून गेलेली नाही. सामान्य कार्यकर्तेही पैसेवाल्यांभोवती घोटाळत असतात. त्यांच्या शब्दाला मानतात. सेवेसाठी वाहून घेतलेल्या कार्यकर्त्याला धंदा करून सेवा करणे होत नाही. पण याहीबद्दल त्याचा अपमान होतो ज्याला स्वत:चे पोट चालवता येत नाही तो दुसऱ्याचे काय कल्याण करणार म्हणून टोचणीची बोलणी ऐकावी लागतात. अव्यवहारीं हा शिक्का मारला जातो.

पैशाच्या अभावी माझी जनसेवेची हौस मला सारखी मारावी लागते. संयुक्त महाराष्ट्र समितीच्या बैठकीची आमंत्रणे आली म्हणजे मुख्यत: प्रश्नच उभा राहतो. परगावच्या, विशेषत: मोठ्या समारंभाचं आमंत्रण आलं म्हणजे अशी सोय होते. बाकी दूरच्या लोकांची आमंत्रणे माझी सांपत्तिक स्थिती पाहून केली जात नाहीत. मनात विचार आले. लिहिले. असेच विचार माझ्यासारख्या अनेक कार्यकर्त्यांच्या मनात घोळत नसतील का? त्यांना प्रकट करता येत नाहीत. मी निदान आज लिहू शकलो. माझ्या कार्याची प्रसिद्धी बरीच झाल्यामुळे मला बऱ्याच सवलती मिळू शकतात. इतर कार्यकर्त्यांना याहून कितीतरी त्रास होत असेल. मला त्यांच्या अडचणींची बरोबर कल्पना येऊ शकते. पण याच अडचणीतून टिळक, आगरकर, फुले गेले नाहीत. आधी पैसा भरपूर मिळवावा. पुढच्या पिढीचं जीवन निर्धास्त करावं आणि प्रापंचिक काळजीतून मुक्त झाल्यावर मग जनसेवेला लागावं, हा व्यवहार त्यांनी पाहिला असता तर त्यांच्या हातून एवढं मोठं कार्य झालं असतं का? हा करमणुकीचा आणि फुरसतीचा पुढारीपणाचा धंदा त्यांनी केला असता तर आज त्यांचा गौरव होत आहे तसा झाला नसता. माझ्या मते खऱ्या कार्यकर्त्यांनी आपल्यापुढे हाच आदर्श ठेवून धैर्याने व निश्चयाने पुढे पाऊल टाकले पाहिजे. मग त्या कार्याचे चीज यावेळी होवो अगर न होवो. मला अभिमान वाटतो की माझ्या सहकार्यात अशी आज छोटी दिसणारी मोठी माणसं माझ्या सभोवती आहेत. तो त्यांचा उत्साह व निष्ठा पाहून नव्या पिढीच्या कार्यकर्त्यांबद्दल मला आशा वाटते. आणि ती लहान मंडळी मला किती तरी थोर वाटतात. त्याची जाणीव मला उत्साहवर्धक वाटते.

**मरणाचे विचार :-**

माझ्या आजारीपणामुळे मनात मरणाचे विचार येतात. माझ्या अगदी निकटच्या एका गृहस्थाशी बोलता बोलता मी म्हणालो. "मला मरणाबद्दल तितकंसं वाईट वाटत नाही पण यावेळी महाराष्ट्राच्या सेवेला मी मुकणार

*म्हणून मात्र वाईट वाटते आणि अस्वस्थ होतो'' त्यावर गुरुवर्य गोविंदराव सासने म्हणाले, ''माधवराव तुमची विचारसरणी चुकीची आहे. हाही एक तुमचा दोष आहे. यातही एक प्रकारचा अहंभाव दडलेला आहे. मनुष्य जोपर्यंत जिवंत आहे तोपर्यंत त्यानं कर्तव्य करीत राहिलं म्हणजे झाले. तेवढेच तुमच्या हाती आहे. जे तुमच्या हाती नाही, कधी येणार नाही त्याच्याबद्दल वाईट वाटणं हीही एक मनाची दुर्बलता नव्हे काय ?''*

*किती विचारी बोल आहेत हे. मला काही उत्तर देता आलं नाही. काय उत्तर देणार मी. या उत्तरानं माझ्या मनातील अस्वस्थता किती तरी कमी झाली. माझ्या विचारात एक प्रकारचा अहंभाव होताच, नाहीतर काय ?*

*महाराष्ट्राची ही उसळलेली प्रचंड लाट तू मेलास म्हणून काय ओसरणार आहे ? तू आहेस तोपर्यंत करता येईल ती सेवा कर म्हणजे झालं. जगाचं गाडं काय तुझ्यावाचून अडणार आहे थोडंच.*

## ५) चलो प्रतापगड

*यशवंतराव चव्हाण यांनी पंडीत नेहरु यांची प्रतापगडला भेट ठरविली होती. समितीच्या लोकांनी शांततामय निदर्शने करावयाची ठरविली. साऱ्या महाराष्ट्रातून लोक आले होते. सर्व पुढारीही हजर होते. नेहरु बंद मोटारीतून आले व गेले. संयुक्त महाराष्ट्राच्या जयजयकारांनी सारा गड दुमदुमून गेला. शेवटी झालेल्या सभेचे भाईजीनी त्यांच्या भावनेने ओथंबलेल्या शैलीत वर्णन केले आहे. त्यांना पडलेल्या स्वप्नाच्या उल्लेखाने लोक हेलावून गेले. भाईजीनी एस. एम. प्रमाणे अनेक ब्राह्मण पुढाऱ्यांशी अकृत्रीम मैत्रीचे संबंध ठेवले होते.*

**चलो प्रतापगड एक साथ -**

मी आता ६२ वर्षांचा झालो तरी माझ्या भावनामय स्वभावात फारसा बदल झालेला नाही. कायदे मंडळाचे मला केव्हाच आकर्षण नव्हते. म्हणून मी आमदारीला खासदारीला आग्रह होऊनही उभा राहिलो नाही. हा काही त्याग नव्हता. नको तेच टाकले. पण लढ्याची वेळ आली की, माझ्यात तारुण्य येतं. घरी बसवतच नाही. आता तर माझ्या आजाराचे विचारही मागे पडले आहेत. पूर्वीचा दम नसला तरी उत्साह कमी झालेलाच नाही. याही अवस्थेत मी खूप सभा घेतल्या. जाईन तेथे पाठिंबा मिळवला.

मनाबरोबर देह धाव घेत नसला तरी मन देहाला फरफटत नेत असतं.

हा अनुभव मला वेळोवेळी आला आहे. विरोध असला की नवी शक्ती येते.

मोर्चाच्या मी अग्रभागी असावे. गोळीबार झाला तर तो प्रथम माझ्यावर व्हावा. ही महत्त्वाकांक्षा स्वस्थ बसू देत नाही. याच विचारात मी झोपी जातो. रात्री तोच चित्रपट डोळ्यासमोर उभा राहतो. मी शिवरायांचा व महाराष्ट्राचा जयजयकार करीत चाललो आहे. पोलिसांनी अडवले आहे. एस. एम.च्या हातात हात घालून मी तसाच पुढे चाललो आहे. पोलीसांनी गोळी रोखताच छाती पुढे केली आहे. गोळी लागताच आम्ही दोघंही रक्तबंबाळ झालो आहोत. आमचे रक्त एकमेकात मिसळले आहे. ब्राह्मण-मराठ्याचे रक्त तेथे मिसळून एक झाले आहे. दुजाभाव नाहीसा झाला आहे. मी शिवनामाचा जप करीत प्राण सोडला आहे.

पण अखेर हे स्वप्नच ठरले. असे पुण्यस्मरण लाभण्याचे भाग्य लाभले नाही.

जागा झालो. पुढे लढा दिसू लागला.

**प्रतापगडाला निघालो :-**

ता. २८-११-५७ ला सायंकाळी खांडेकर वकिलांचे गाडीतून रात्री निघालो. परमस्नेही तुळाजीराव राजे भोसले ॲडव्होकेट यांचे घरी साताऱ्यास मुक्काम ठोकला. राजे म्हणजे मूर्तीमंत जिव्हाळा. आमची सोय लावण्याकरिता कोण धडपड. सकाळी ता. २९ ला उठून वाईस गेलो. पोलिसाने तेथे आमची मोटार अडवली. म्हणून चालत जाऊन मोर्चात सामील झालो. आम्ही गेलो त्यावेळी हजारांचा मोर्चा चालला होता. मी घाई करून एस. एम. डांगे वगैरेंना मिळालो. मला चालता येत नव्हतं. याचा त्यावेळी विसरच पडला. दुपारी एका झाडाखाली बिस्तारा पसरला. आणलेले खाऊन गवतावर ताणून दिली.

संध्याकाळच्या सुमारास अत्रे मुंबईहून आले. मला पाहताच त्यांनी मला बोलावून आपल्या गाडीत घेतले. अत्रे गाडीतून उतरताच त्यांच्या मागे लोकांचा घोळका जमू लागला. सभेचं स्वरूप येऊ लागले. ते लोकांना बसवू लागले. जवळच्या प्रचारगाडीत माईक होताच. एक एक पुढारीही जमू लागले. बहुतेक सर्व पुढारी आले. अत्र्यांनी माझंच नाव अध्यक्षपदी सुचवलं. सुरुवातीला मी आदल्या रात्री पडलेल्या स्वप्नाची हकीकत सांगितली. "मी व एस. एम. हातात हात घालून चाललो आहोत. पोलिसांनी अडवले. आज्ञा मानली नाही. गोळी रोखली तरी पुढं चाललो. गोळी झाडली. दोघांचे रक्त एकमेकात मिसळले. मराठा, ब्राह्मण एकरूप झालो. पण हे स्वप्नच ठरलं. मरणाचं भाग्य लाभलं नाही. समितीची आज्ञा म्हणजे शिवछत्रपतींची आज्ञा असं समजून सर्व मोहाला बाजूस सारलंच पाहिजे.

सभेत एस. एम. डांगे, अत्रे, नरवणे, टिळक, नाथ पै, दादासाहेब गायकवाड, नाना पाटील वगैरे सर्व प्रमुख पुढाऱ्यांची भाषणे झाली. सभा रात्री नऊ-दहाचे सुमारास आटोपल्यानंतर मी माझे स्नेही तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे घरी गेलो. त्यांना पूर्वी लिहिलेही होते. त्यांच्या मुलीचे लग्न ता. १ ला असल्यामुळे मी हजर राहणारच होतो. मी त्यांच्यावर खूप टीका केली होती. लेखात व भाषणात गय केली नव्हती. तथापि व्यक्ती म्हणून त्यांच्याबद्दल आदर वाटतच होता. त्यांचे संबंध राजकीय विरोधामुळे काही तोडले नव्हते. त्यांनी जराही परकेपणा दाखवला नाही की जिव्हाळ्याचे खोटे नाटक केले नाही. लग्नप्रसंगामुळे निंबाळकर व कन्नमवार यांची गाठ पडली. तेच आपणहून जवळ आले. कन्नमवारनीच आपली ओळख करून दिली व माझे लिखाण बरीच वर्षे वाचत असल्याचे सांगितले. दोघांच्यातही सौजन्य व नम्रता आढळली. तेथे आलेल्या एका ओळखीच्या जिल्हाध्यक्षाने माझ्या स्वप्नाचा कुत्सित बुद्धीने उल्लेख केला. भावनाप्रधान कलावंताचं हृदय भावनामय अंत:करणच जाणू शकते. मला आनंद आणि अभिमान वाटतो की, एस. एम. हे जरी राजकीय पुढारी असले तरी त्यांचे हृदय प्रेमळ व भावनामय आहे. राजकारणामुळे त्यांच्यात रुक्षता आलेली नाही. म्हणूनच ते लोकसंग्रह करू शकतात. मी करविरी पोचल्यानंतर त्यांचं मला एक पत्र आलं. त्यात ते लिहितात.

"मोर्चानंतर आपण सर्वजण पांगलो आणि आपली भेट होऊ शकली नाही. त्यामुळे मनाला हुरहूर लागून राहिली आहे. माझ्या दृष्टीनं आपला कार्यक्रम यशस्वी झाला. ह्यामुळे आपले सामर्थ्य वाढले आहे. तीस हजार निदर्शकांनी शिस्तीने निदर्शनं केली. एकही अपशब्द अथवा निषेधार्ह घोषणा उच्चारली नाही. समितीच्या नेतृत्वाने दिलेला आदेश अक्षरश: पाळला. यातच सारे आले.... जातीयवादाचे भूत उभे करण्याचा प्रयत्न विरोधकांनी केला, परंतु त्यात त्यांना यश आले नाही. विशेषत: आपण पहिल्यापासून याबाबत अतिशय खंबीर राहिलात. मोठमोठ्यांच्या आग्रहाची चर्चा केली नाही म्हणूनच आमच्या सारख्यांना टिकाव धरता आला. या सर्व गोष्टीमुळे अंत:करण कृतज्ञेने भरुन येते... आता इच्छा इतकीच की हे कार्य करीत असतानाच हा देह पडून जावा. तुम्ही त्या दिवशी ज्या स्वप्नाचा उल्लेख केला तसे घडले तर फारच सुंदर. त्या परता दुसरा मोक्ष कोणता?

आपला

**एस. एम. जोशी.**

मला हे पत्र उद्धृत करण्याचा मोह आवरला नाही. या पत्रातून एस. एम. यांचे व्यक्तिमत्त्व स्पष्ट दिसून येते. ध्येयनिष्ठा, सहकारी मित्राविषयीचा आपलेपणा, मनाचा कोवळेपणा दिसून येतो. म्हणूनच मी एस. एम. कडे ओढला गेलो आहे. अचाट बुद्धिमत्तेपेक्षा प्रेमाची शक्तीच मोठी असते. तीच अधिक लोकसंग्रह करू शकते. हिशोबी भावनाशून्य माणूसच अखेर अपयशी ठरतो.

तर्कतीर्थांच्या घरी दोन दिवस काढता आले. ते लग्नघाईत असल्यामुळे मला खोलीत एकांत मिळाला पण खिडकीतून निसर्ग भेट देत होता. तो तर माझा बालमित्र. माझा विसावा. खिडकीबाहेर रम्य वनश्री डोळ्यापुढे डुलत होती. तिचे प्रतिबिंब खाली संथ वाहणाऱ्या जलप्रवाहात तरंगत होते. शांतपणे आराम घेत होते. दूर, वाईच्या घाटावरची छोटी मोठी देवालये पांथस्थाबरोबर आपणही स्नान करीत होती. एखादा बगळा मध्येच चोच मारून पळ काढीत होता. या शांत समाधिस्त वातावरणामुळे मला "कोरो" या प्रसिद्ध चित्रकाराच्या कलाकृतीची आठवण येऊ लागली. कितीतरी दिवस न पाहिलेल्या जिवलग मित्राची भेट व्हावी ना तसं झालं मला. कितीतरी वेळ मी त्या खिडकीत बसून काढली. हा शुद्ध सात्त्विक आनंद काही आगळाच. रणक्षेत्रावरून परत आल्यावर प्रियकरणीच्या प्रेमपाशात पडावं ना तसा. पण त्याहूनही सात्विक आनंद मी भोगू शकलो. रंगाच्या पेटीची आठवण झाली. जवळ असतीतर हा सौंदर्याचा साठा थोडा तरी पळवून आणता आला असता. ता. ३०.११.५७

ता. ३० ला गर्दी वाढत चालली होती. बेळगावचे ७५ लोक सायकल वरून आले होते. ट्रकस् आम्हाला मिळाल्या नाहीत. सर्व अडचणी उभ्या. कडाक्याची थंडी पडली होती. रात्री दव पडले होते. तथापि लोकांची संख्या १५ हजारापुढे गेली होती. त्यात सारखी भर पडू लागली होती. रहदारीस अडथळा होऊ नये म्हणून आम्ही हिंडत होतो. डांबरी रस्ता सोडून दोन फूट रहा म्हणून मी माझ्या काठीने रेषा मारली. दोन मैल (एक फर्लांग कमी) लोकांची रांग लागली होती. मी त्या दिवशी ५ मैल चाललो. गेल्या दोन वर्षात एवढा विक्रम केला नव्हता. करता येईल असं कधीच वाटलं नाही. पण मन भावनावश झाले म्हणजे देहाकडून काय करवून घेईल सांगता येणार नाही. हजार औषधांनी व इंजेक्शननी जे झालं नाही, जे करता आले नाही ते मनाच्या शक्तीमुळे करता आले. माझा दुखरा पाय आजार हे एक ढोंग आहे असे लोकांना वाटावे असा चमत्कार करू शकलो.

पोलिसांनी व आम्हीही काँग्रेसवाले व समितीवाले असा रस्त्यावर गोंधळ

करू दिला नाही. दोन मैल फक्त समितीचेच निदर्शक होते. सुरुवातीला, मध्ये व अगदी कडेला समितीचे नेते उभे होते. नेहरू बंद मोटारीतूनच आले. येताच आम्ही प्रचंड घोषणा केल्या. "संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे, शिवाजी महाराज की जय व भारत माता की जय" नेहरू निघून गेल्यावर दोन मैल रस्ता शिस्तीने असलेल्या लोकांमुळे फुलून गेला होता. पंचवीस हजार बँजी खपून गेल्या होत्या. त्या अपुऱ्या पडल्या. दु:खाची गोष्ट नेहरू बंद मोटारीतूनच गेले. नेहमी उघड्या जीपमधून जाणाऱ्या लोकप्रिय पुढाऱ्याला अशा रीतीने जावे लागावे. जनतेचीच त्यांना भीती वाटावी. एवढ्या बंदोबस्तात जावे. काय नेहरूंच्यावर लोकांनी हात टाकला असता ? पण समिती द्वेष्ट्यांनी त्यांची तशी समजूत करून न देणे काही अशक्य नव्हतं.

नेहरू गेल्यावर बाजूच्या मोकळ्या मैदानावर प्रचंड सभा झाली. निदर्शनाचे सारे लोक जमले होते. सभेत एस. एम. डांगे, अत्रे, मी व नाना पाटील बोललो.

या प्रसंगी एस. एम. यांचे भाषण नेहमीहून फारच निराळे झाले. त्यात आवेश व भावना उसळून बाहेर पडत होत्या. चीड होती, पण भाषेत संयमही होता. राग होता पण शिष्टाचार सुटला नव्हता. निर्धार होता, निर्भयता होती. ते समाजाशी एकरूप झाले होते. अत्रे जणू रणमर्दाने धुंद झाले होते. प्रखर आणि बोचक त्रस्तांचा मारा करून शत्रूला हैराण करीत होते. कोणाची भीड मुरवत ठेवली जात नव्हती. विरोधी पक्षाच्या महान नेत्यांचा चोळामोळा करीत होते. कोणाची काही शिल्लक ठेवली नाही त्यांनी. आत बाहेर असं काही नव्हतं. धुमसत असलेला राग अंगाऱ्याप्रमाणे बाहेर फेकला जात होता. डांगे यांच्या भाषणात संथपणा होता, खोचकपणा होता, निर्भत्सना होती. खेडुताला समजेल अशी साधीसुधी मराठी बोली होती. विचार मुरवणारी व पटवणारी होती. नाना पाटलांच्या कोट्या हे त्यांचंवैशिष्ट्य होतं. त्यांची नक्कल कुणालाच करता येणार नाही.

मी व्याख्यान असं दिलंच नाही. तो आपला शिवनामाचा गजर केला. सर्व समुदायाकडून करवून घेतला. सर्व आसमंतातील भाग दुमदुमून टाकला. मी शिवनामाची महती वर्णिली.

"बोला जय शिवराय. जय शिवराय. जय शिवराय. जय शिवराय. आकाश कापू द्या शिवरायाच्या जयजयकाराने; दरी खोरी दुमदुमेत नाम गजराने.

शिवनामात सर्व काही आहे. चैतन्य आहे. स्फूर्ती आहे. ती महाराष्ट्राची शक्ती आहे. तिचे ऐक्य आहे. शौर्य आहे. निर्भयता आहे. मुत्सद्देगिरी आहे, खरा महाराष्ट्र धर्म आहे. जातीभेदाचा नि:पात आहे. खरा मानवता वाद आहे. शिवनामात सर्व काही आहे. जय महाराष्ट्र.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोन केवळ राजकीय नाही. त्यांत अधिकारवादाचा अगर पुढारीपणाचा हव्यास नाही. ती माझी जीवननिष्ठा आहे. माझी श्रद्धा आहे. त्यात माझ्या विकासाचा, माझ्या आत्माच्या उन्नतीचा मार्ग आहे. यात माझ्या कुटुंबियांचं अन गणगोत्राचं, बहुजन समाजाचं आणि मराठी भाषिकांचं अन् त्याचबरोबर अखिल भारताचं कल्याण साधणार आहे. म्हणूनच या कार्यासाठी जीवन वहावं असं मला मनापासून वाटतं. म्हणूनच निवृत्तीची कल्पनाही मला शिवत नाही.

प्रतापगडावरील चळवळीचं एक महापर्व संपलं.

# सत्याग्रहातून सहकार्याकडे - ४

## १) संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनतंर

*संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर माधवरावांच्या विचारात बदल झाला. काँग्रेसविरुद्ध त्यांनी आजतागायत सत्याग्रह केला. येथून पुढे सहकार्य करण्याचे त्यानी ठरविले आहे. पण ते कधीही काँग्रेसचे सभासद झाले नाहीत.*

संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाल्यानंतर माझ्या धोरणात व विचारात जो बदल झाला तो पुस्तक रूपाने जनतेसमोर मांडणे मला आवश्यक वाटले. पण साधनाअभावी ते अवघड होऊन बसलं होतं. ती माझी अडचण श्रीयुत मदनमोहन लोहिया यांनी दूर केल्यामुळे मी माझे विचार वाचकांसमोर संगतवार मांडू शकत आहे. माझ्या आभारप्रदर्शनाची त्यांना आवश्कता नाही. पण त्यांचे हे उपकार कधीही विसरता येणार नाहीत. त्यातही ते अगदी योग्य वेळी झाले.

या वैचारिक बदलामुळे समितीतील माझे मित्र व चाहते मजपासून दुरावले आहेत पण सद्सद्विवेक बुध्दीशी प्रतारणा करून औपचारिक देखावा करणं मला जमण्याजोगं नव्हतं. पण मतभेदामुळे त्यांच्याविषयी वाटणारा लोभ व जिव्हाळा माझा तरी कमी झालेला नाही. या पुस्तकात विचारांना अधिकाधिक जागा देणं मला महाग पडलं आहे. एकंदर महाराष्ट्राच्या दृष्टीने ते विचार

अधिक स्पष्ट होणं मला आवश्यक वाटलं म्हणून आतील लिखाणाला आत्मसमर्पणासारखं स्वरुप येणं अपरिहार्य होऊन बसलं. या जीवनप्रवाहात माझ्या खाजगी जीवनाला फारसं स्थान नाही. त्याचं कारण माझं खाजगी जीवन फारसं उरलेलं नाही. माझं जीवन म्हणजे सामाजिक आंदोलनाचा एक भाग होऊन बसला आहे. त्यातही राजकीय आंदोलनाचा विशेष. म्हणून या पुस्तकात स्वागतही निरपेक्षवृत्तीने होणं कठीण आहे हे मी जाणून आहे. पण जे अपक्ष आहेत ते समतोलदृष्टी ठेवून या पुस्तकाचा विचार करतील अशी मी अपेक्षा करतो.

## २) बेळगावचा सत्याग्रह व माधवरावांचे भाषण

*संयुक्त महाराष्ट्राऐवजी द्विभाषिक निर्माण झाले. यशवंतराव द्विभाषिकांचे मुख्यमंत्री झाले. संयुक्त महाराष्ट्र समितीने द्विभाषिका विरुद्ध बेळगांवचा लढा सुरु करण्याचे ठरविले. माधवरावाना स्वस्थ बसवेना. त्यांनी बेळगांवच्या सत्याग्रहात भाग घेण्याचे ठरविले. पहिला सत्याग्रही होण्याची समितीकडे विनंती केली. समितीने ती स्विकारून माधवरावांना या लढ्याचे सेनापती व दाजीबाना लढा समितीचे चिटणीस नेमले. माधवरावांचा मुंबईत सत्कार ठेवला. या सत्काराच्या सभेत भाषण करताना ते सत्याग्रहामागची भूमिका स्पष्ट करताहेत. हा सत्याग्रह कन्नड भाषिकांविरुद्ध नाही. यशवंतराव चव्हाणाना ते द्विभाषिक मोडून स्वतंत्र महाराष्ट्राचे नेतृव करा अशी कळवळीची विनंती करीत आहेत.*

बेळगावच्या लढ्यात पहिला सत्याग्रही म्हणून जाण्याची माझी इच्छा या समितीचे सरचिटणीस एस. एम. जोशी यांना पत्राने कळविली. मध्यवर्ती समितीनेही ठराव करून मान्यता दिली. त्यानंतर 'मराठा'' पत्राने मोठा मथळा देऊन समितीचा ठराव प्रसिद्ध केला.

**''लढ्याचे सेनानी भाई माधवराव बागल, आणि सरचिटणीस दाजिबा देसाई. मुंबई २९-९-५८ - ''मराठा''**

नोव्हेंबरपासून सीमा प्रदेशासाठी सुरू होणारा लढा स्थगित करण्याची मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांची विनंती समितीने अमान्य केली असून या लढ्याचा निर्धार कायम असल्याचे प्रकट केले आहे. भाई माधवराव बागल यांना या लढ्याचे सेनापती करण्यात आले असून श्री. दाजिबा देसाई यांना लढा समितीचे चिटणीस नियुक्त करण्यात आले आहे. लढ्याच्या तयारीला प्रारंभ करण्याचा आदेश समितीच्या नेत्यांनी दिला आहे. या बातमीनंतर मुंबई संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या ज. से. अहिल्याबाई रांगणेकर यांचे माझे सत्कारासाठी व

केशवरावजी ठाकरे यांचे अपक्ष आघाडीचे उद्घाटन समारंभासाठी व सत्कारासाठी म्हणून आमंत्रण आले.

मला मुंबईत जाऊन बरेच महिने झाले होते. तेव्हा तुरुंगात जाण्यापूर्वी मित्रमंडळींचीही भेट घेता यावी व आपले विचारही मांडता यावेत म्हणून आमंत्रण स्विकारले. त्यावेळचे माझे भाषण 'लोकमित्र' च्या १३-१०-५८ च्या अंकात आले ते सारांशाने :-

..... माझ्या आयुष्यातील हा मी अत्यंत भाग्याचा दिवस मानतो. समितीने व महाराष्ट्राने मला हा मोठ्यातला मोठा मान दिला आहे असे मी समजतो. कोल्हापूर संस्थानचे मुख्यमंत्रीपद मला मिळाले होते पण मी ते लगेच टाकून दिले. मला त्यात स्वारस्य वाटले नाही. मंत्रीपदाहून साधा सैनिक म्हणून राहण्यात मी खरा आनंद भोगू शकतो. मानाने जगण्याची आणि मानाने मरण्याची यापेक्षा आणखी विलोभनीय ती गोष्ट कोणती ? जगून सर्वांचा द्वेष पत्करण्यापेक्षा मरून जनतेच्या ह्रदयात प्रेमाचे स्थान मिळवणे हेच मी खरे भाग्य समजतो. ती महत्त्वाकांक्षा मला कार्यप्रवृत्त करीत राहिली आहे. सद्सद्विवेक बुद्धीला मारून मिळवलेल्या सत्तेच्या व संपत्तीच्या ऐश्वर्याहून जनतेच्या प्रेमाचा अन् आशीर्वचनाचा संचय हीच खरी संपत्ती होय. हीच दैवी संपत्ती होय. तिचा विनाश कोणी करू शकत नाही. ....

हा सत्याग्रही लढा आहे. अंत:करण जिंकण्याचा लढा आहे. येथे शत्रू तर कोणीच नाहीत, कन्नडीग नाहीत तसे द्विभाषिक वादही नाहीत. फक्त विरोधी विचारांची मंडळी आहेत. ते सारे आपले देशबांधवच आहेत. अशा व्यक्तींविरुद्ध आज हा लढा द्यावा लागत आहे.

या लढ्यात अधिकारपदाचा हव्यास नाही. आमचे अस्तित्व, आमची परंपरा, संस्कृती आणि लोकशाही आम्हाला टिकवायची आहे. हा लढा आमच्या हितासाठी आहे. महाराष्ट्राच्या हितासाठी आहे. तसा विरोधी पक्षीयांच्या पण हितासाठी आहे. सत्तेचे आणि स्वार्थाचे आवरण पडल्यामुळे त्याचे खरे हित त्यांना समजेनासे झाले आहे. त्यांचे मतपरिवर्तन आम्हांला करावयाचे आहे.

सत्याग्रह हा केवळ परकीयांच्या विरुद्धच करता येतो व करणे योग्य, तो आपल्या राजवटीत विरुद्ध तत्त्वत: करता येत नाही व करणेही चूक आहे असे कोणी जरी म्हटले तरी मला ते मान्य होण्याजोगे नाही. हा उपदेश सदोष व हेतूपुरस्सरच केलेला असतो असे म्हणावे लागेल. सत्याच्या आग्रहाला अशी मर्यादा अशी कधीच घालता येणार नाही. जेथे असत्य दिसेल तेथे सत्याचा

आग्रह धरणे हे सत्याग्रहात असलेच पाहिजे. या विरुद्ध असलेली विचारसरणी हीच मुळी सत्याच्या कक्षेत बसणार नाही. सत्याचा आग्रह आई बापाविरुद्धही धरावा लागेल. मग सरकार आपले असले म्हणून तो टाकावा लागेल असे थोडेच आहे.

हा लढा विरोधी व्यक्तींच्या अन् पक्षांच्या शुद्धीकरता असेल तसा तो आत्मविकासाचा अन् आत्मशुद्धीचाही असेल.

या लढ्यातून मी अधिक निर्मळ व्हावे. माझा रागद्वेष झडावा, माझे जीवन अधिक शुद्ध व्हावे, द्वेषविरहीत बुद्धीने मी विरोधी बाजूशी लढावे असाच माझा प्रयत्न राहील.

मला विश्वास वाटतो या लढ्यातून आम्ही यशवंतरावांना आमच्या बाजूला आणू व जनतेचे मतपरिवर्तन करू. यशवंतराव मला शत्रू वाटत नाहीत.

यशवंतरावजी, तुम्ही, आम्ही, भाऊसाहेब हिरे व आमचे समितीचे सारे पुढारी एकत्र एका बैठकीवर विचाराकरीता बसलो नव्हतो काय? अंत:करणात डोकावून पाहिल्यावर यातल्या एकाला तरी आपण संयुक्त महाराष्ट्रवादी नाही असे म्हणता येईल काय? मुळीच नाही. वरच्या सत्तेने ती तुमची प्रेरणा दाबून टाकली आहे. कोणत्या कारणाने असेना आमचे काही भाऊ द्विभाषिकवादी झाले हे खरे आहे. राणाप्रतापाचा भाऊ सगर्जी अशाच काही कारणांमुळे शत्रूच्या गोटात गेला होता. पण प्रतापची निष्ठा, ध्येयाची सत्यता, त्यासाठी सोसलेले हाल, कष्ट आणि पराकोटीचा त्याग पाहून त्याचे मन वळले व त्याने अखेर भावाकडे धाव घेतलीच ना.

याच बंधुभावाने यशवंतराव, तुम्हांला आणि तुमच्या अनुयायांना मी हाक मारतो, महाराष्ट्राचा अपमान, महाराष्ट्राचे हाल आणि ही हत्या डोळ्यांनी पहात तुम्ही किती दिवस घालवणार? तुमचा अंतरात्मा हे किती दिवस पहात राहणार? द्वैभाषिक चालवण्यात आता काही अर्थ नाही हे नेहरूंना आता स्पष्ट बजावा. सांगा त्यांना की आपल्या हातून महाराष्ट्र तसा गुजराथ जात आहे. ही जाणीव त्यांना द्या. तुम्ही भाऊसाहेब हिरे पुन: हातात हात घाला, समितीच्या बाजूने व्हा. आम्ही पुन: तुमचे प्रेमाने स्वागत करू. हा लढा अधिकारपदासाठी नाही. मंत्रिपदासाठी नाही. केवळ संयुक्त महाराष्ट्रासाठी आहे. यांत तुमचे सहकार्य मिळाल्यास पूर्व इतिहासावर पडदा टाकून, समिती, तुम्हाला जवळ करील. तुमच्या अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा घेईल. यशवंतरावजी तुम्ही तरी

पूर्वी द्वैभाषिक होता. आम्हांला तरी द्वैभाषिक कोठे पाहिजे होते. शंकरराव देवांनीच ते गळ्यात बांधले'' असे खाजगी भेटीत तुम्हीच बोलला होता. आता ते बंधन तुम्ही झुगारून द्या. जागृत महाराष्ट्र व गुजराथ हे द्वैभाषिकाचे जोखड फेकून देतच आहे. त्याला तुम्ही हातभार लावा म्हणजे येणारा काल लवकर येईल.

आता सुरू झालेला लढा थांबणार नाही. द्वैभाषिक गाडून टाकल्याखेरीज तो बंद पडणार नाही. पण आमची इच्छा आहे ही शक्ती राष्ट्राच्या विकासास लागावी. आता लढ्यात खेचली जात आहे. यात देशाचे नुकसान आहे. कॉंग्रेसला जगावयाचे असेल आणि महाराष्ट्राला तुमच्या जन्मभूमीच्या ऋणातून मुक्त व्हावयाचे असेल तर तुम्ही द्वैभाषिक मोडण्यास आम्हांला सहाय्य केले पाहिजे. सत्याग्रहाला जाण्यापूर्वी तुम्हाला आपुलकीची व बंधुभावाची ही विनंती आहे. ही विनंती म्हणजे भीकपणा नव्हे. सत्याग्रहाला कचरतो म्हणून नव्हे. मरणाची पूर्ण तयारी करून हे आवाहन आहे.

## ३) अटक व मंगळूरला रवानगी :-

*बेळगांवच्या सत्याग्रहात माधवरावांना अटक झाली. काही दिवस हिंडलगा जेलमध्ये ठेवून नतंर मंगळूरला नेले. या उताऱ्यात हिंडलगा जेलच्या अधिकाऱ्यानी दिलेली प्रेमाची वागणूक व हुबळी ते मंगळूर पर्यंतच्या जंगलातून घाटातून केलेल्या प्रवासाचे मन वेधून घेणारे वर्णन आहे. माधवरावांच निसर्गप्रेम व निसर्गसौंदर्य वर्णन करण्याची साधी सुटसुटीत पण मनावर ठसणारी भाषा शैली दिसून येते.*

आमची कल्पना होती शिक्षेचे दिवस आम्हांला हिंडलग्याला काढता येतील म्हणून. पण ता. २७ रोजी आम्हांला समजले की, आमची रवानगी याच दिवशी मंगळूरला होणार म्हणून. आमदार खांडेकर यावेळी दवाखान्यात होते. त्यांना यापूर्वी मी भेटून आलो होतो. खांडेकर केवळ पक्षाची ऑर्डर म्हणून आले होते असे नाही. ते सत्याग्रह करण्यास आतुर होते. मी येणार म्हणून त्यांनी पूर्वी मला कळविले होते.

ता. २७-११-५८ या दिवशी रात्री आम्हांला हिंडलगा सोडावा लागला. सहवासामुळे, जागेवर, वॉर्डरवर, पोलिसांवर आणि ऑफिसरवरही एक प्रकारचा लोभ जडला होता. सतत समोर चौरीप्रमाणे ढळणारे तांबड्या गुच्छाचे झाडही आपले वाटू लागले होते. गेटबाहेर एखाद्या मस्त बादशहासारखा उभा

असलेला वळू, भोवतालची सुंदर बाग, जेलच्या भेटीस निघालो म्हणजे हातात रंगीबेरंगी फुलांचे गजरे घेऊन हसत स्वागतासाठी उभी राहिलेली ती फुलझाडांची नाचरी फलटण. या सर्वांना आता आम्ही मुकणार होतो. सुपरिंटेंडेंटच्या गोड स्वभावामुळे व त्यांच्या विद्वत्ताप्रचूर भाषणामुळे मला पुष्कळ फायदा झाला असता. अभ्यासू दृष्टीने ते कैद्याकडे पहात. त्यांनी मानसशास्त्रीयदृष्ट्या अभ्यासातून बरीच प्रगती केली होती. त्यांच्या सहवासामुळे माझ्या कथा संग्रहात बरीच भर पडू शकली असती. शासनवृत्तीहून मला त्यांच्यात भूतदयाच अधिक दिसून आली. जेलर छबलाणी हेही शांतवृत्तीचे व सज्जन गृहस्थ होते. जोशी हे तर पूर्ण महाराष्ट्रीय. डॉ. कुलकर्णी कानडी गृहस्थ पण त्यांनी परकेपणाने वागवलं नाही. वॉर्डर कल्लाप्पा हा तर कुटुंबियांपैकीच वाटत होता. जातांना मी त्याला कडकडून भेटलो. अटकेच्या काळात रोज चार-पाच पत्रे घरी येत व मित्रमंडळींना पाठविता येत. यामुळे हा काळ तुरुंगासारखा वाटला नाही. जाताना मला तर वाईट वाटलेच पण वॉर्डरांचे डोळेही पाणावले. पोलीस देशपांडे चार दिवस दिसले नव्हते. पण जातावेळी माझे गठळं खाकेत मारून पुढे झाले. कोल्हापूर जेलचा जमादार डंगरही तेथे होता. गांवाचा माणूस आप्तासारखा वाटल्यास नवल काय ? घरच्या मंडळींप्रमाणे सर्वांनी निरोप दिला.

पोलीस व्हॅनमध्ये बसलो. बेळगाव स्टेशनवर बसून मंगळूरला जाऊ असे वाटले होते. रात्री बाराची गाडी होती. आम्हाला परगावी नेणार ही बातमी बेळगांवात फुटलीच होती. तेव्हा स्टेशनवर गर्दी होईल या कल्पनेने त्यांनी आम्हास स्टेशनवर नेलेच नाही. कोठे व कसे नेणार याचा सुगावा पोलिसांनी दिला नाही.

पोलीस व्हॅनमध्ये आम्ही तिघे होतो. मी, भातखंडे व बाळासाहेब पाटील, तिघेही "अ" वर्गातले. इतर कोणीही सत्याग्रही आमच्या बरोबर नव्हते. आम्हा तिघांनाच मंगळूरसाठी निवडल्याचे दिसले. ही खास म्हैसूर सरकारची ऑर्डर होती. मंगळूर बेळगांवपासून किती दूर याची अद्याप आम्हाला कल्पना नव्हती.

बेळगाव स्टेशनवर न नेता त्यांनी मोटार एकदम हुबळी स्टेशनवर आणली. अडीच ते तीन तास गाडीत असू. गाडीत झोपेमुळे बसवेना म्हणून खाली कलंडलो. पोलिसाने आपला डगला अंथरायला एक व अंगावर घ्यायला दिला. आमच्याबद्दल द्वेषाचा मागमूसही त्यांच्यात नव्हता. पोलीस इन्स्पेक्टर

हमीद मोहद्दीनही आदराने वागवत. माझं सामान मला जड होतं म्हणून पोलीसच ते काम करीत. हुबळीवर रात्री दीडला आलो. गाडी ४.२० ला जायची म्हणून मोटारीतच पडलो पण झोप एक मिनीटभरही लागली नाही. पण थकव्यामुळे पाय ठेवतात त्या जागी कोटासकट लोळलो. झोप नसली तर लोळण्यानेही थोडा आराम वाटतो. ४.२० ला हुबळी सोडली. स्टेशन बरे आहे. ८-८ ला हरीहरला उतरलो. हरिहरला बस केली. हे सर्व काम इन्स्पेक्टरनाच करावे लागे. येथे मराठी भाषा चुकूनही कानांवर पडली नाही. स्टेशनवर नाही. हॉटेलात नाही. बसमध्ये नाही. साईन बोर्डीवर नाही. इडली-डोसा व कानडी भाषेला सुरुवात झाली. मी एकटाच असतो तर भरल्या जगात मला एकाएकीच वाटले असते. पोलिसांत मात्र मराठी जाणणारे एक दोघे असल्यामुळे आमच्या गरजा वाटेत सांगता आल्या. येथे बुट, पाटलोणी, विजारी, कासोट्याचे धोतर नाहीसे झाले. शर्टाखाली गुंडाळलेले धोतर, ते हातांनी निम्मे वर करीत चाललेल्यांचा भरणा दिसू लागला. केरांचा बुचडा पुरुषी टाळक्यावरही दिसू लागला.

मोटारी सर्व खाजगी कंपन्यांच्याच होत्या. सरकारी बस सर्व्हिस नाही. कोल्हापूर-पुण्याचे आराम नाही. वाटेत काही छोट्या कोंकणी पद्धतीच्या गाड्या लागल्या. शिमोगा हे गांव मात्र मोठे लागले. पण मराठी कोठेही ऐकू येत नव्हते.

**माझ्या जगात :-**

शिमोगा सुटल्यानंतर मी माझ्या प्रांतात आलो. माझ्या प्रांतात म्हणजे सृष्टीसुंदरीच्या. साऱ्या जगाचा प्रांत हा. येथे प्रांतभेद नाहीत. राष्ट्रभेद नाहीत. वंशभेद नाहीत. सारी निसर्गाची मुले. पशुपक्षी, मानवांचा सर्वांचा हक्क या दुनियेवर.

घनदाट वनश्री. उत्तुंग वृक्ष. एकाहून एक उंच आकाशस्थ परमेश्वराला भेटण्यासाठी जो तो वर डोके काढतो आहे. बाहू पसरून कवटाळू इच्छितो आहे. आकाशाने सर्वांवर पांघरुण घातलं आहे तर वडीलधाऱ्या वृक्षांनी छोट्यांना - हृदयाशी कवटाळून धरलं आहे. आसऱ्याला घेतलं आहे.

साग व वेळू एकमेकांची चढाओढ करीत होते. आम्रवृक्ष त्यांना बाजूस सारुन आपले अस्तित्व शाबीत करीत होता. लहान-सहान झाडे-झुडपे कोणाच्यातरी आश्रयाला धरून होती. वृक्षांची सारखी रांग लागून राहिली होती. फट क्वचितच पडे. ३०/४० मैल सारखं जंगल. प्रचंड वृक्षांची खडी फौज वाटेने सारखी उभी. जंगलात जो कोणी शिरेल त्याला बाहेर येणे मुश्कीलीचे. वाट

समजणं अवघड. चारी दिशा आणि वरचीही बंद. शिकाऱ्यांची कोण त्रेधा उडेल. सर्व प्रकारची श्वापदे शिकाऱ्यांना तेथे मिळू शकतील. त्यांचा एकमेकांचा संहार तेथे चाललेलाच असणारा. येथे निसर्ग रहस्यमय आहे. जणू ज्ञानाचा ग्रंथ आत झाकून ठेवला आहे. सौंदर्य गुलदस्त्यात ठेवलं आहे.

झाडी. झाडी. झाडी. दुसरं काही नाही. क्षितीज बंद, आकाशाची कवाडेही बंद. जंगलातून जाणारा रस्ता मात्र माणसाचे जंगलावरचे प्रभुत्व सिद्ध करीत होता.

पुढे घाटमाथ्यावरून खाली अरुंद रस्त्यातून जाण्याकरीता मोठी बस बदलावी लागली. त्याच कंपनीने आपल्या छोट्या गाड्या घाटापुरत्या ठेवल्या होत्या. ओगंबला गाडी बदलावी लागली. वळणे ड्रायव्हरच्या कौशल्याची पारख करणारी होती. गाडी सावरली जावी म्हणून उतरण संपेपर्यंत कठडे बांधले होते.

**झाकली मूठ उघडली :-**

निसर्गाने आत्तापर्यंत झाकलेली मूठ येथे सर्व खुली केली. रहस्य सारे उकलून आम्हांसमोर ठेवले. विराट स्वरूपदर्शन होतं ते. निसर्गाची भयानकता, भव्यता, उदात्तता आणि रमणीयतेचा संगम होता तिथे.

आम्ही विमानातून जणू खालच्या सृष्टीकडे पहात होतो. दृष्टी क्षितिजापर्यंत पोहोचून अखेर विश्वांत एकरूप होत होती. "विश्वचि माझे घर" ही भावना जागृत करीत होती. पर्वतांच्या रांगा लाटेप्रमाणे वहात आकाशांत मिसळल्या होत्या. मध्येच कुठेतरी जलाशय चमकून त्यात आत्मा ओतीत होता. विनोबांची "जय जगत" ही घोषणा हृदयात हुंकारू लागली. येथे मला राजकारणाचा विसर पडला. येथे बडे डिक्टेटर कीटकासारखे वाटू लागले. सर्वांना आत्मसात करणारी निसर्गाची प्रभावी शक्ती ती. आयुष्याच्या अनुभवातून मौलिक भर पडली.

घाट संपल्यावर गाडी पुन: बदलली. मंगळूरला पोहोचेपर्यंत आणखी दोन वेळा गाड्या बदलाव्या लागल्या. जेलमध्ये जाण्याकरीता इन्स्पेक्टरने टॅक्सी केली. रात्रीचा सुमार झाला होता. मंगळूर अगदी ओझरतं पहायला मिळालं. तेही फक्त आल्या वाटेपुरतं. बरंच मोठं शहर ही कल्पना आली. मुंबईच्या धर्तीचं. कोल्हापूर, सातारा, बेळगावपेक्षा मोठं. वरच्या लोकांची राहणी मुंबईसारखीच वाटली.

## ४) यशवंतराव व मी :-

*या उताऱ्यात माधवराव यशवंतरावांकडे कसे व का आकर्षित झाले याचे प्रांजळ व प्रामाणिक स्पष्टीकरण देत आहेत. द्विभाषिक राबविल्याबद्दल चीड पण त्याच वेळी बहुजन समाजातील एक कर्तबगार, विचारी व अभ्यासू तरुण कार्यकर्ता म्हणून अभिमान. अशा काहीशा "हेट लव्ह"च्या द्विधा मनोवृत्तीत माधवराव व यशवंतराव यांची भेट घडून येते व माधवराव यशवंतरावांचे पाठीशी उभे राहण्याचं ठरवितात. या निर्णयामुळे समितीत गहजब उठतो. पण माधवरावांच्या हेतुबद्दल कोणीही शंका घेत नाहीत. खरेच शेवटपर्यंत यशवंतराव हा माधवरावांचा विकनेस होता.*

बाळासाहेबांच्या अगोदर मी यशवंतरावांना जाणत होतो खरा पण दुरून. प्रथम कऱ्हाडचा एक होतकरू तरुण कार्यकर्ता म्हणून. नंतर जिल्ह्याच्या चळवळीतला एक धाडशी ध्येयवादी पुढारी म्हणून. त्याच सुमारास त्यांचं बिंदु चौकात एक भाषण झालं. त्यांच्या त्यावेळच्या वक्तृत्वाचा मजवर परिणाम झाला. पुढे काँग्रेसच्या पुढाऱ्यात त्यांची गणना होऊ लागली. माझे परमस्नेही तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे त्यांचे चहाते. ते रॉयीस्ट. यशवंतरावही एम. एन. रॉय यांचे चाहते होते. त्यामुळे त्यांना खास वैचारिक बैठक प्राप्त झाली असावी. पुढे त्यांचा मुंबई मंत्रिमंडळात समावेश झाला पण खरे पुढे आले ते द्विभाषिकावेळी. यावेळी त्यांनी शत्रूही फार केले आणि दिल्लीत मित्रही जोडले. महाराष्ट्र प्रांतिकाला त्यांनी आपल्या काबूत घेतले. मी त्यांचा विरोधी म्हणण्यापेक्षा यावेळी शत्रूच होतो. पण सारा महाराष्ट्र त्यांच्यावर उलटला असताना न डगमगता त्याला तोंड देण्याची त्यांची हिम्मत असामान्य होती. जनप्रवाहाच्या उलट ते एकटे खडे होते. याचं मला कौतुक वाटल्याखेरीज रहात नसे. शत्रू म्हणूनही त्यांचा मला अभिमान वाटत असे. व्यक्ती म्हणून त्यांच्याबद्दल मला आदर वाटे. मंगळूर जेलमधून मी त्यांच्या वाढदिवसानिमित्त शुभेच्छा पाठवल्या होत्या.

याच यशवंतराव चव्हाण यांनी द्विभाषिक मोडण्याला अनुकूल असे मत दिल्याने या प्रश्नाला कलाटणी मिळाली जे काही कालाने, प्रयासाने व अधिक त्यागाने मिळायचे ते याच साली मिळणार असे दिसू लागले. जी गोष्ट स्वप्नमय वाटत होती, ज्यासाठी मी माझ्या प्राणांची आहुती देण्यास तयार झालो होतो त्यासाठी माझ्या अखेरच्या काळात पुन: ५ महिने महाराष्ट्राबाहेर मंगळूर

जेलमध्ये दिवस काढले ती स्वप्नमय वाटणारी गोष्ट आता सत्यसृष्टीत पाहता येणार.

यशवंतरावजी संयुक्त महाराष्ट्रानुकूल धोरण उघड उघड स्वीकारताच त्यांच्यावरचा माझा राग त्या बातमी बरोबरच निघाला. असा कर्तबगार मंत्री महाराष्ट्राला मिळणार म्हणून आनंद झाला. आपल्या कर्तृत्त्वाची मुत्सद्देगिरीची साक्ष त्यांनी द्विभाषिकावेळीच महाराष्ट्राला आणि भारतीय नेत्यांना पटवली होती. नेहरूंच्या मर्जीत ते गेले होते. दिल्लीवर छाप पाडली होती. व्यक्तिविषयक स्वार्थासाठी मी संयुक्त महाराष्ट्र चळवळीत पडलोच नव्हतो. बहुजन समाजाच्या हाती राज्य यावं म्हणून पडलो होतो. ते साध्य झाल्यानंतर शत्रुत्व कोणाचं?

**पं. नेहरूंची अपेक्षा व यशवंतराव :-**

"द्विभाषिक मुंबई राज्याच्या प्रश्नाचा फेरविचार शांततापूर्ण व सदिच्छेच्या वातावरणात व्हावा" अशी नेहरूनी इच्छा प्रकट केली होती. आपणही त्या सदिच्छेस मान द्यावा असे मला वाटू लागले. यशवंतराव तर आपल्यापरी प्रयत्न करीत होते. म्हणून मी ता. ८ ऑक्टोबर १९५९ च्या 'पुढारी' त जाहीर विनंती केली.

"पं. नेहरूंच्या इच्छेची आम्ही विरोधी पक्षियांनीही हेटाळणी करू नये. पं. नेहरूंच्या अन् यशवंतराव चव्हाणांच्या हातून पूर्वी काहीही चुका झाल्या असतील, त्या उगाळत बसू नयेत. महाराष्ट्र लढाऊ आहे. तसा दिलदार आहे. परस्परांकडे यापुढे द्वेषाने अन् शत्रुत्वाने न पहाता सहकार्याने पुढील प्रश्न सोडविण्याचा प्रामणिकपणे प्रयत्न व्हावा. एकमेकांचे वाभाडे काढत बसू नये. यामुळे ज्या "शांततापूर्ण व सदिच्छेच्या वातावरणाची" आवश्यकता आहे ते निर्माण होणार नाही.

आज जगातील कट्टर विरोधी म्हणून समजल्या गेलेल्या राष्ट्राचे पुढारी श्री. क्रुशेव्ह व प्रे. आयसेनहोअर हे स्नेहाच्या व सदिच्छेच्या वातावरणात भेटू बोलू शकतात. मग पं नेहरू, पंत व यशवंतराव चव्हाण यांच्या समितीचे नेते तितक्याच खेळीमेळीने, प्रेमाने व सदिच्छेने बोलू शकणार नाहीत असे थोडेच आहे. आपण तर एकाच देशाचे नागरिक आहोत. पंडितजींनी मुंबई सरकारच्या कारभाराला दिलेले सर्टिफिकेट म्हणजे यशवंतरावांच्या कारभाराला व कर्तृत्वाला दिलेले सर्टिफिकेट होय. राज्यकारभाराच्या दृष्टीने मुंबई सरकारचे रेकॉर्ड चांगले आहे. आणि या दृष्टीने पाहिल्यास मुंबई राज्य सर्व राज्यात आघाडीवर आहे

आणि यशवंतराव चव्हाण यांच्या नेतृत्वाखाली ते चांगलेच प्रगती करीत आहे.

द्विभाषिक मोडायचे हे काँग्रेस श्रेष्ठींनी ठरवल्यानंतर पूर्वीच्याच निष्ठेने यशवंतराव संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न सोडविण्यास व महाराष्ट्राचा उत्कर्ष घडवून आणण्यास व सलोख्याचे वातावरण निर्माण करण्यात समितीला खुल्या मनाने सहाय्य करतील, असे मानण्यास काहीच हरकत नाही.

**यशवंतरावजींची भेट १६.३.१९६० :-**

यशवंतराव द्विभाषिकाचे मुख्यमंत्री झाल्यामुळे मला त्यांची चीड येई म्हणून त्यांच्यावर मी प्रखर टीका करीत असे. त्या टीकेत माझा तोल जात नव्हता असे म्हणता येणार नाही. राग प्रमाणाबाहेर गेल्यावर माणसाचा तोल सुटतोच. त्यात मी तसा संयमी थोडाच. रागाने भडकणे अन् प्रेमाने गहिवरणे हा माझ्या स्वभावातला दोष जाणीव येऊनही जात नव्हता. आपल्या समाजातला मोठा माणूस हेवा वाटण्याजोग्या पदवीला चढला म्हणून मला अभिमानही वाटायचा. पण त्या गुणांचा महाराष्ट्राला उपयोग व्हावा ही आंतरिक तळमळ. राग आणि चीड यामागे आपलेपणा आणि आदर दडलेला होताच. बहुजनसमाजातला शेतकऱ्याचा मुलगा इतक्या थोरपदाला गेल्याचा अभिमान आणि त्याचवेळी तो आपल्या महत्त्वाकांक्षेआड येतो म्हणून चीड. ती परिस्थिती आता पालटणार. मनुष्य एकच जरी होता तरी द्विभाषिकांचा मंत्री म्हणून पाहताना आणि त्याच व्यक्तीकडे महाराष्ट्राचा, माझ्या महाराष्ट्राचा मुख्यमंत्री म्हणून पाहताना भावना एकच कशा राहतील ? आता बहुजन समाजाचं भाग्य उदयाला आलं. कष्टकरी जनतेचा प्रतिनिधी मुख्यमंत्री झाला. आता मी यशवंतरावजींच्याकडे प्रेमानं, जिव्हाळ्यानं, आपुलकीनं आणि आदराने पाहू लागलो.

महाराष्ट्र निर्माण झालेला पाहणं ही माझ्या भाग्याची गोष्ट वाटे. तसंच एका शेतकऱ्याचा मुलगा महाराष्ट्राचा मुख्यमंत्री झालेला पाहणं हे मला भाग्याचं वाटू लागलं. माझ्या जीवनातल्या या आशा मला मूर्त स्वरूपात पाहता आल्या. म्हणून यशवंतरावांचे हात बळकट करणं हे मला कर्तव्य वाटू लागलं. हे व्यक्तीविषयक लोभामुळे नव्हे. या ठिकाणी अशीच दुसरी व्यक्ती झाली असती तर मी त्याही व्यक्तीचा पाठीराखा झालो असतो.

यशवंतराव कोल्हापूरला येण्याचे जाहीर झाले होते. तेव्हा त्यांची भेट घ्यावी, आपले विचार मांडावेत, आपलं अंत:करण उघडं करावं, कोल्हापूरची परिस्थिती माझ्या दृष्टिकोनातून पुढे ठेवावी म्हणून मी भेटण्याची इच्छा

प्रदर्शित केली. माझ्या अपेक्षेहून अधिक अगत्याने व सहानुभूतीने त्यांनी त्या इच्छेला साथ दिली. येथील अनेक नागरिकांना त्याचा अचंबा वाटला. काही काँग्रेसवाले मत्सराने तडफडले. काही आनंदाने हुरळले. या भेटीने माझ्या राजकीय आयुष्यातल्या एका निराळ्या अंकाला सुरुवात झाली. ही माझी भेट १६.३.१९६० ला दुपारी झाली. जाहीर आगमनाच्या वेळेअगोदर दोन तास यशवंतरावांनी कोल्हापूरात पाय टाकला. मला मोकळ्या मनाने बोलता यावे म्हणून एकटेच आले. जेवण्याची व्यवस्था घरीच केली होती. तास दीड तास अगदी खुल्या मनाने बोलू शकलो. मुख्यमंत्री असल्यामुळे पोलीस खात्याकडून व सी. आय. डी. कडून प्रत्येक जिल्ह्यातील राजकारणाचे धागेदोरे समजले असणारच. तथापि माझा दृष्टिकोन मी त्यांना अगदी स्पष्ट कळवला. त्यांच्या काही वागणुकीवरही टीका केली. मुख्यमंत्री म्हणून मी संकोचाने वागलो नाही की बोललो नाही. त्यांनीही माझ्या आक्षेपाला अगदी खुल्या अंत:करणाने उत्तर दिले. आपल्या अडचणी सांगितल्या. आडपडदा ठेवला असं मला तरी वाटलं नाही. यामुळे या भेटीत यशवंतराव माझ्या जवळ आले. ते म्हणाले, "तुम्ही तुमचे विचार अगदी स्पष्टपणे मला कळवीत जा". त्याप्रमाणे मी त्यांना वेळोवेळी पत्रे लिहू लागलो. मी उत्तराची अपेक्षा करीत नव्हतो किंवा सूचनेप्रमाणे त्यांनी वागलेच पाहिजे असा माझा आग्रहही नव्हता. त्यामुळे राग, रुसवा अन् गैरसमजाचा प्रश्नच उभा राहिला नाही. मी, मला वाटेल ते लिहित होतो, ते त्यांना वाटेल तसे करण्यास समर्थ होते. खासगी हिता न हिताचा संबंध नसल्यामुळे मानापमानाचा प्रश्नच उद्भवत नव्हता. पुष्कळांनी मला सांगितले की ते कधी मोकळ्या मनाने बोलत नाहीत. वर वर गोड बोलतात. आपला थांग लागू देत नाहीत. मला मात्र तसा अनुभव आला नाही. काही गोष्टी मनात असूनही आपल्याला का करता येत नाहीत तेही त्यांनी स्वच्छ सांगितले. काही आडपडदा ठेवला नाही. यानंतर यशवंतराव जवळ येत चालले.

यशवंतरावजींचा पाठीराखा होण्याची दुसरीही कारणे आहेत. एक उत्कृष्ट विचारवंत महाराष्ट्राच्या थोर परंपरेत मुरलेला नेता आम्हांला मिळणार होता. बुद्धिमत्तेला अनुभवाची, परंपरेची, विचारांची आणि अभ्यासाची जोड मिळणार होती. बहुजन समाजाचा विश्वास असेल असे हे नेतृत्व होते. शिवाजी महाराज, शाहू महाराज, म. फुले, विठ्ठल रामजी शिंदे, केशवराव जेधे यांच्या

विचार परंपरेत यशवंतराव वाढले आहेत. बहुजन समाजाची सुख-दु:खे ते स्वत:च गरिबीत वाढल्यामुळे त्यांनी स्वत: भोगली आहेत. खेड्यात जन्मल्यामुळे त्यांच्या जीवनाशी समरस झाले आहेत. देशासाठी कष्ट, त्याग, शिक्षा भोगली आहे. मार्क्सवाद, रॉयवाद, व गांधीवाद याचा अभ्यास झाला आहे. म्हणून त्यांचा समाजवाद एकांगी व आग्रही राहिलेला नाही. ते महाराष्ट्राला जमेल असाच घडवतील व आचरणात आणतील असा विश्वास वाटल्यामुळे मी त्यांना उघड पाठिंबा देण्याचे ठरवून जनतेला आवाहन करण्याचे ठरविले. यामुळे महाराष्ट्रात खूप वादळ उठणार, समितीची सारी पत्रे गहजब उठवणार, माझे समितीतील चाहते व मित्र उलटणार याची मला पूर्ण जाणीव होती. यावेळी जनहितासाठी हा विरोध सहन करणे मला कर्तव्य वाटले.

## ५) माधवरावांचे कॉंग्रेस प्रवेशाबद्दल पत्रक

*माधवरावांनी बहुजन समाजातील नेत्यांनी कॉंग्रेस प्रवेश करावा व यशवंतरावांना साथ करावी असे पत्रक माधवरावांनी काढले होते. त्यावर ही "गावकरी"त आलेली प्रतिक्रिया माधवराव स्वत: मात्र अपक्षच राहिले.*

### श्री. बागल यांचे प्रांजळ विचार (गांवकरी - नाशिक)

कोल्हापूरचे श्री. माधवराव बागल यांच्या अंगी राजकीय नेतृत्वास लागणारे चातुर्यादि गुण कमी आहेत म्हणून त्यांनी राजकीय पुढारीपण घेतल्यामुळे त्यांच्या हातून काही चुका झाल्या. बागल हे स्वभावाने व गुणांनी कलावंत आहेत. उत्तम चित्रकार, उत्कृष्ट वक्ते व उत्कृष्ट लेखक हा त्यांचा गेल्या पस्तीस वर्षातला लौकिक अजून कायम आहे. दक्षिण महाराष्ट्रात संस्थानी स्वराज्याच्या चळवळीत त्यांनी मनस्वी स्वार्थत्याग केला व देहदंड सोसला. दक्षिण महाराष्ट्रात समाजवादी विचारसरणीचा प्रचार करणाऱ्यातही बागल हे पहिले होते. जोतिबा फुले यांची समाज सुधारणाविषयक तत्त्वे माधवराव बागल यांचे वडिलांना आयुष्यभर प्रचारिली. तेच व्रत माधवराव बागल यांनी समाजकारण, अर्थकारण व राजकारण यात पुढे चालविले. ते अतिशय संवेदनाक्षम असून ते महाराष्ट्र जनतेच्या भावनेचा प्रतिध्वनी अगदी अभावितपणे पण अचूकपणे करतात. बागलांच्या नाडीवरबोट ठेवून

महाराष्ट्राचे मन ओळखावे असे अनेकदा घडले आहे. गेल्या सर्व बारा वर्षांत बागल काँग्रेसवर रुसलेले आहेत. खेर-मोरारजी अमदानीचा उल्लेख ते मोठ्या नापसंतीने करतात. आणि महाराष्ट्रात खुद्द काँग्रेसमध्येही या अमदानीबद्दल अशीच भावना आहे. पण आज काळ पालटला आहे. महाराष्ट्राला बरे दिवस आले आहेत असे बागलांनी अलिकडील एका लेखात लिहिले आहे. काँग्रेस व काँग्रेसचे नेते श्री. यशवंतराव चव्हाण यांचेबद्दल एका लेखात लिहिले आहे. काँग्रेस व काँग्रेसचे नेते श्री. यशवंतराव चव्हाण यांचेबद्दल बागलांनी समाधानाचे उद्‌गार त्या लेखात काढले आहेत आणि असे हे सर्व लिहिण्यातही बागल लोकमतच बोलून दाखवित आहेत हे लक्षात घेण्याजोगे आहे.

श्री. बागल संयुक्त महाराष्ट्र समितीतले एक प्रमुख पुढारी असून समितीचे एक आधारस्तंभ आहेत. शिवाय कोठारी, अत्रे, ठाकरे, बापट व बागल अशी संयुक्त महाराष्ट्र समितीतील जी ''जनता आघाडी'' तिचेही बागल प्रमुख आधार आहेत. मनुष्य स्वभावाचे ज्ञान आणि परिस्थिती संबंधीचा अंदाज बांधता येणे याबाबत बागल हे काहीसे कमी पडतात असे जे आम्ही वर म्हटले त्याचा पुरावा बागल हे या आघाडीत आले हा अगदी पुरेसा आहे. संयुक्त महाराष्ट्र समितीतल्या सर्व पक्षांनी स्वत:चे विसर्जन करून ''जनता आघाडी'' हाच पक्ष बनवावा अशी या आघाडीची मुख्य सूचना होती. भाबडा अथवा कुटिल माणूसच ही सूचना करू शकेल. बागल हे भाबडे आहेत. आपली सूचना कोणी ऐकली नाही म्हणून ते दु:खी झाले. व्यासपीठावर एकजूट बोलावी आणि खाली उतरताच एकमेकाला शिव्या द्याव्यात या प्रकारास बागल कंटाळले. स्थानिक स्वराज्य संस्थांत जेथे जेथे समिती अधिकारावर आली तेथे तेथे क्षुद्र पदासाठीही सत्तास्पर्धा सुरू झालेल्या पाहून बागल त्रासले आणि आता ही स्पर्धा शिव्यागाळ व लाथाळी मंत्रिमंडळे बनविण्याबाबत होणे अपरिहार्य असल्यामुळे संयुक्त महाराष्ट्र समितीच्या हाती नव्या महाराष्ट्राची सत्ता येऊ नये असे बागल यांनी स्पष्टपणे लिहिले आहे. बागलांचे हे स्पष्ट व जळजळीत विचार त्यांच्या अनेक सहकाऱ्यांच्या कानांत व डोक्यात असह्य झिणझिण्या आणतील. त्यांना हा धरचा आहेर असह्य होणार आहे.

एवढेच बोलून बागल थांबले नाहीत. खेर-मोरारजींचा कालखंड संपून यशवंतरावांच्या अमदानीत महाराष्ट्रात काँग्रेस लोकप्रिय होऊ लागली याची

दखलही बागलांनी घेतली आहे. "म्हणून बहुजन समाजाने काँग्रेसमध्ये जाऊन सत्तेचे वाटेकरी व्हावे असा उघड उपदेश बागलांनी त्या लेखात केला आहे. असा उपदेश करण्याचे कारण जे त्यांनी दिले आहे ते फार बहारीचे आहे." बागल लिहितात -

"काँग्रेसमधील प्रतिगामी, भांडवलधार्जिणे, स्वार्थी, गटबाज अशा व्यक्तींच्या हाती गेलेली सत्ता बहुसंख्येच्या जोरावर हिसकून घ्यावी. काँग्रेसमध्ये गेलेल्या बहुजन समाजातील कार्यकर्त्यांना आपला हितकर्ता पुढारी कोण हे जाणण्याची पात्रता आली आहे. त्यांनी आपले हितकर्ते निवडून आणल्यास काँग्रेसला समाजवादाकडे खेचून नेण्याचे सामर्थ्य त्यांच्यात आल्यावाचून राहणार नाही. गटबाजी करून जागेला मुंगळ्यांप्रमाणे चिकटणारे आपोआप निष्प्रभ होतील अशा प्रकारे काँग्रेसमध्ये शिरून तिचे शुद्धीकरण करणे शक्य आहे."

खरोखर बागलांचे हे लिहिणे काँग्रेसलाही अनुकूल व हितप्रदच आहे. त्यांना काँग्रेस ही क्रांतीचे हत्यार व्हावे व होईल असे प्रामाणिकपणे वाटते व म्हणूनच जे काँग्रेसमध्ये राहिले आहेत अथवा नव्याने प्रवेश करीत आहेत त्या सर्वांना इतके मार्मिक व कळकळीचे मार्गदर्शन अलीकडे कोणीच केलेले नाही.

विरोधी पक्ष म्हणून जे राहतील त्यांनी सत्ताधारी पक्षावर टीका करून त्याची शुद्धी करावी असा फार समंजस सल्ला बागलांनी डाव्या गटांना दिला असून त्यासाठी डाव्या गटांनी एकजूट व्हावे असेही आपले मत बागलांनी पुन्हा मांडले आहे. डाव्या गटांना हे मत कितपत मानवेल व पटेल हे त्यांचे त्यांनी पहावे. पण काँग्रेसजनांना त्यांनी केलेले मार्गदर्शन काँग्रेसजनांनी समजून घेतले पाहिजे.

**असा टीकाकार हवा :-**

माधवराव बागलांनी हे प्रांजळ विचार कोणत्याही स्वार्थी हेतूने लिहिले नाहीत. सामान्य जनतेला काँग्रेसमध्ये जाण्याला सांगताना आपण स्वतः कोणत्याच पक्षात राहणार नाही असे त्यांनी स्पष्टपणे म्हटले असून सद्सदविवेकबुद्धीला पटेल ते बोलण्या-लिहिण्यासाठी आपण अपक्ष व स्वतंत्र राहणार असे बागलांनी सांगितले आहे. त्यांचे हे धोरण निश्चितपणे योग्य आहे व असा निःस्पृह, निःस्वार्थी आणि तळमळीचा टीकाकार आणि मार्गदर्शक समाजाला व सरकारला हवाच आहे.

# संघर्ष व सन्मान - ५

## १) माधवरावांचे सिंहावलोकन

*या उताऱ्यात ७७ व्या वर्षी माधवराव आपल्या जीवनप्रवाहाकडे वळून पहात आहेत. ज्या मार्गाने ते वाटचाल करीत आले त्या मार्गाचा त्यांना अभिमान वाटतो. तो धोपट मार्ग नव्हता. त्यांना अनेकांना दुखवावे लागले. पण त्यांनी कोणाचा द्वेश केला नाही. माधवराव दीर्घद्वेषी कधीच नव्हते. तत्त्वासाठी भांडतील व भांडण संपल्यानंतर मैत्रीचा हात पुढे करतील.*

माझ्या आत्मचरित्राचा हा पांचवा भाग. पहिले तीन 'जीवन प्रवाह' या मथळ्याखाली छापले गेले. पहिले दोन एकत्र बांधले, चौथा सत्याग्रहातून सहकार्याकडे या शीर्षकाखाली छापला. या पाचव्याला "संघर्ष व सन्मान" असे नाव दिले.

आता २८ मे १९७३ ला ७७ वर्ष पुरे होत आहे. या आठवणी मी आजारातच लिहिल्या आहेत. अगदी या घटकेपर्यंत मी माझ्या ध्येयाशी इमानी राहून आयुष्य कंठलं आहे. मरण जवळ येत आहे याची जाणीव देहाला धक्के देत असल्यामुळे एक प्रकारचा उत्साह वाढला आहे. घटका पळे जी उरली आहेत ती जीवित ध्येयासाठी घालवावीत म्हणून जोम आला आहे.

**"गृहीतं इव केशेषु मृत्यूना धर्ममाचरेत"**

पण माझा धर्म, मानवाला गुलाम बनविणाऱ्या व स्वतंत्रवृत्ती नाहीशी करणाऱ्या धर्मकल्पनांवर आघात करण्यातच खर्चला जाणार आहे. लोकप्रियता अगर लोकनिंदा याचा विचार करण्याच्या अवस्थेपलिकडे मी गेलो आहे.

सद्सद्विवेकबुद्धीशी मी प्रतारणा केली नाही हेच माझे अंतकालीन समाधान.

मी माझ्या वाणीनं, लेखणीनं व कृतीनं अनेकांना दुखावलं आहे. पण मी कोणाचाही व्यक्तिविषयक द्वेष केलेला नाही. त्यांचे आचार व प्रचार सामान्य जनतेला कल्याणकारक नाहीत अशी मनाची खात्री झाली त्यांचा जातपात समाज रक्तसंबंधी व मैत्रीचा विचार न करता लेखणी व वाणी वापरली आहे.

माझे विचार व कृती एकसाचीच राहिली नाही. त्यात अनुभवाने व वाचनाने बदल होत गेला आहे. म्हणून त्या काळी माझे जे विचार बनले त्याच्याशी मी एकनिष्ठ राहिलो म्हणून जात्याभिमानी, धर्माभिमानी, पक्षाभिमानी राहिलोच नाही. फक्त इमानी राहिलो माझ्या सद्सद्विवेकबुद्धीशी.

म्हणूनच या आत्मचरित्र लेखमालिकेत मी अनेकांना दुखावलं आहे. व्यक्तींना, मित्रांना तसं अंधश्रद्धेत सापडलेल्या असंख्यांना. बहुजनसमाजाबद्दल वाटणारं प्रेम हेच यामागील कारण आहे. त्या प्रेमाबद्दल क्षमा का मागावी ?

माझे खाजगी जीवन जवळ जवळ संपल्यामुळे यात साहजिकच सार्वजनिक जीवनाचाच उल्लेख आहे. देह दुर्बलतेमुळे कसलाही संघटनात्मक कार्यक्रम हाती घेणे शक्य झाले नाही. प्रसंगी व्याख्यान व सतत लिखाण मात्र करीत आलो व माझे विचार लोकांना कळावे म्हणून बरीच बुकलेटस्, कॉपीराईटस् राखून न ठेवता विनामूल्य खपवली. तशी ताकद नसताना पैसे घातले. पण त्यामुळे मानसिक समाधान मिळू शकले. अर्थ संचयाने ते मिळू शकले नसते.

लेखणी आणि वाणीने वैचारिक संघर्ष अनेकांशी निर्माण झाला. काही संस्थेशी तशा काही व्यक्तींशी, मित्रांशी, निकटवर्ती आप्तसंबंधींशी. विचार संघर्ष हे विरोधी बाजूंनी वैचारिकच राहिले नाहीत. त्याला कृतीचं स्वरूप देण्यात आलं.

अनेक दूरचे जवळ आले व जवळचे दूर गेले. पण यात कोणाचा मी खाजगी द्वेष केला नाही. पण माझे विचार न पटल्यामुळे व लेखणी तशी आळवणारी नसल्यामुळे अनेक शत्रू झाले. बहुजन समाजावर व अस्पृश्यांवर होणाऱ्या अन्यायामुळं माझं लिखाण आर्जवी होऊ शकलं नाही. संघर्षामुळे भाषेतील कटुता टाळता आली नाही. यामुळे मी ज्यांच्यावर नितांत प्रेम केलं व अद्यापही करतो, ते दुखावले गेले. पण बहुजन श्रमजीवी जनतेवर व अस्पृश्यावर प्रेम हे त्याला कारणीभूत होतं. हे जाणणारे माझा द्वेष करणार नाहीत असा मला विश्वास वाटतो. त्याच्या आग्रहामुळे मी दुराग्रही आहे असं काहींना वाटूही शकेल. त्याला नाइलाज आहे. त्याबद्दल मला पश्चात्ताप वाटत नाही. माझे विचार बरोबर आहेत, की चुकीचे आहेत समाजाच्या कल्याणाचे आहेत की अकल्याणाचे आहेत ते काळच ठरवणार आहे.

महात्मा गांधी हे स्वत: धार्मिक असूनही अनुभवाने या मताला आले, ते १९४७ साली लिहितात :-

''धर्म ही केवळ खाजगी बाब राहिली पाहिजे; तशी राहिली तर आपलं राजकारण यशस्वी होईल. जर सरकारी अधिकाऱ्यांनी, कार्यकर्त्यांनी व खासदार, आमदार मंत्री या लोकप्रतिनिधींनी निधर्मी राज्य प्रत्यक्षात

आणावयाचे ठरवल्यास व सार्वजनिक धर्मविधीपासून अलिप्त राहिल्यास भारताला नववैभव प्राप्त होईल."

असा निधर्मी वृत्तीचा समाजवादी लोकशाहीचा खरा प्रवर्तक नेता पंडित जवाहरलालखेरीज तर मला कोणी आढळला नाही. ते देव, धर्म, ईश्वर या विवेकबुद्धीस न पटणाऱ्या गोष्टीपासून अलिप्त होते. पण त्यांनी तसा कार्यक्रम आखून दिला नाही.

इंदिरा गांधी कर्तृत्वाने जवाहरलाल यांच्याही पुढे गेल्या. पण तिरुपतीला जाऊन त्यांनी आमच्यासारख्या भक्तांना खाली पहायला लावलं.

याचा अर्थ मी एवढाच लावतो की, राजकीय नेत्याला सत्ता व पक्ष टिकविण्याकरीता निव्वळ ध्येयाशी इमान राखून चालत नाही. विवेकबुद्धीला मुरड घालावी लागते. पण यामुळे निधर्मी समाजवाद अस्तित्वात कसा येणार ?

या सत्तेच्या मोहापासून अलिप्त राहणारे निर्भय कार्यकर्तेच समाजपरिवर्तन करू शकतील. महात्मा गांधी म्हणतात-

"तुम्हाला जगाविरुद्ध एकाकी लढावं लागले, जग तुमच्याकडे संतापून पाहू लागले तरी त्या रागाला तोंड द्यावे लागेल. तुम्ही कवटाळलं असेल त्या ध्येयासाठी आप्त, मित्र, पत्नी सर्वांना मुकण्याचा प्रसंग आला तरी कचरू नका". खुद्द गांधींना एकलाच चलो रे म्हणून जावे लागले.

मी स्वत: निराशवादी नाही.

## २) शाहू द्वेशाचा उद्रेक अर्थात "कोल्हापूर (बंद) दर्शन"

*काही लोकांचा शाहू द्वेश - कोल्हापूर द्वेश - कसा उफाळून येतो याच उत्तम उदाहरण म्हणजे ग. रं. भिडे यांनी संपादन केलेले "कोल्हापूर दर्शन" यात शाहू महाराजांबद्दल काही बदनामीकारक विधाने होती पुस्तकाला लोहियानी आर्थिक मदत केली होती व पुस्तक त्यांनाच अर्पण केल होते. हा ग्रंथ जप्त करावा म्हणून माधवरावांनी रान उठविले. त्यांचे मित्र लोहिया यांनी ग्रंथाला दिलेला पाठिंबा काढून घ्यावा म्हणून भाईजींनी आग्रह धरला व लोहियांशी मैत्री तोडली. माधवरावांची शाहूभक्ती व काही मतलबी ब्राह्मणांचा शाहूद्वेश या प्रकरणावरुन स्पष्ट होतो.*

शाहू शताब्दी जवळ येत असल्याने पुन: पूर्वीच्या शाहू द्वेष्ट्यांना जाग आली आहे. पूर्वीचे वैर जागे झाले, व कदाचित शाहूंना राष्ट्रीय मान्यता दिली

जाईल. म्हणून यांनी आपली हत्यारे पुन: पाजळली आहेत.

पूर्वी शाहूंच्या काली वेदोक्त प्रकरण निर्माण करून येथेच छत्रपतींना हिणवायला व अपमान करायला, हिंदू धर्माच्या मक्तेदारांनी सुरुवात केली होती. व पुण्यात टिळकांनी त्याला पाठींबा दिला होता. येथे प्रो. विजापूरकर व शंकाराचार्यांनी राजोपाध्याला उचलून धरले होते.

यामुळे महाराष्ट्रात ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला सुरुवात झाली. ती आता पुन: श्री. ग. रं. भिडे यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध केलेल्या "कोल्हापूर-दर्शन" या पुस्तकाने पुन: उकरून काढली. काँग्रेसने सर्व संस्थाने विलीन केल्यामुळे छत्रपतींची राजसत्ता नष्ट झाली आहे. कोल्हापूर जिल्ह्यातील मराठा व ब्राह्मणेतरांचा राजकीय वरचष्मा नष्ट झाला आहे. तेव्हा आता मराठा व ब्राह्मणेतरांचा विरोध झाला तरी त्याला राजकीय पाठबळ मिळणार नाही, अशी खात्री झाल्याने, या धूर्त शाहू द्वेष्ट्या साहित्यिकाने पुन: जुन्या वादाला व वाकुडपणाला मोठ्या आत्मविश्वासाने चालना दिली. ग. रं. भिडे हे ते गृहस्थ होते.

शुगर मिलच्या जाहिराती सर्व पत्रांना नेहमीच मिळत असल्यामुळे पुस्तक प्रसिद्ध केले व त्यांनाच अर्पण केले. म्हणजे येथील पत्रातून आपल्यावर टीका होणार नाही, इतर कोणी हालचाल केली तर तिला महत्त्व येणार नाही. हे जाणून ग. रं. भिडे या हुषार, धूर्त व पाताळयंत्री साहित्यिकाने शुगर मिलच्या मॅनेजरचा वाढदिवस पाहून त्या समारंभात, मॅनेजरांना, "कोल्हापूर दर्शन" हे पुस्तक अर्पण केले. तो समारंभ त्यांच्या एकसष्टीचा असल्यामुळे अतिभव्य स्वरूपात साजरा झाला. कोल्हापुरचा 'आहेरेंचा', अधिकाऱ्यांचा, कारखानदारांचा मोठा जमाव हजर होता. मी मॅनेजर लोहियांचा स्नेही असल्यामुळे मलाही नेहमीप्रमाणे गाडी पाठवून नेले होते. समारंभाचे अध्यक्ष कोट्याधीश लालचंद हिराचंद होते. मलाही बोलण्यास विनंती केली. मी म्हणालो.

'मी लोहियांचा मित्र आहे. पण भांडवलशाहीचा नव्हे. त्यांच्या इतर कलागुणांमुळे मी आकर्षिला गेलो. पण मजुरांचा प्रश्न उभा राहताच मी शुगर मिलच्या कामगारांच्या सत्याग्रहाला उत्तेजन दिले. काळ पालटला आहे याची जाणीव ठेवून भांडवलवाल्यांनी आपल्या धोरणात बदल केला पाहिजे. हा मनाचा पालट लोहियांच्यात आढळला".

त्या पुस्तकाला विरोध करण्याची कल्पना तेथे कोणाच्याही डोक्यात येणे शक्य नव्हते. अर्थातच त्या पुस्तकाला हजर असलेल्या सर्वांची मान्यता

मिळाल्यासारखे झाले. मलाही लोहियांचा जिव्हाळ्याचा मित्र म्हणून बोलण्याची संधी मिळाली. पण त्या पुस्तकात शाहू द्वेषाचे जहरी विष असेल अशी कल्पनाही मला शिवली नाही.

समारंभ पार पडल्यानंतर संपादक ग. रं. भिडे यांनी ते अनेक सार्वजनिक संस्था व प्रमुख व्यक्तीकडे लगेच पाठविले. व पैसाही घेतला. त्यापैकी एक कोल्हापूर नगरवाचन मंदिरात गेले होते. लोहियांनी मला आपला मित्र म्हणून त्यातली एक प्रत भेट म्हणून दिली. पुस्तक ४/५शे पानांचे मोठ्या आकाराचे ३०/४० हजार रुपये खर्च करून काढलेले. सावकाश वाचता येईल म्हणून मी बाजूस ठेवले.

पण माधवराव शिंदे संपादक विजयी मराठा हा माझा निकटचा संबंधित. त्याने ते पुस्तक लायबरीत चाळत असताना त्याच्या नजरेस शाहूंच्या बदनामीची ती वाक्ये वाचली. तात्काळ त्याने ती उतरून घेतली व मजकडे धावत आला. आणि हे पहा हा कोल्हापूर दर्शनातला मजकूर. आणि ही वाक्ये, प्रो. ना. सी. फडक्याने आपल्या लेखात लिहिली आहेत ती : "आपली मिळकत व आपली बायको कोल्हापूर राज्यात सुरक्षित नाही. अशी ब्राह्मणांनी तक्रार करावी इतका जुलूम ब्राह्मण वर्गावर शाहू महाराजांनी केला होता हे खरे."

या वाक्याने माझे डोके भडकले व त्या रागासरशी "इंद्रधनुष्य" दैनिकात "हे पुस्तक सरकारने जप्त करावे" असा लेख घाईघाईने खरडून त्याचक्षणी रात्री आठ वाजता कार्यकारी संपादक नारायणराव कुपेकर यांचेकडे पाठवला. त्यांनी तात्काळ दुसरा कंपोज काढून मी पाठवलेला मजकूर मोठ्या टाईपमध्ये टाकला. यामुळे कोल्हापूर एकदम खडबडून जागं झालं.

मी सकाळी नेहमीप्रमाणे लोहियासाहेबांच्याकडे गेलो व त्यांना विचारले, "भिड्यांनी या मजकुराची तुम्हाला जाणीव देऊन तो मजकूर छापला हो काय ?"

ते म्हणाले, या वेळेपर्यंत मी काहीही वाचलं नाही. मला याची जाणीव दिली नाही. पण भाईजी तुम्ही पत्राकडे धाव घेण्याअगोदर मला कळवलं असतं तर मी ती पाने फाडून टाकायला लावली असती."

पण बरीच पुस्तके खपवली होती. मी जो उतारा वाचला तो नगरवाचन मंदिरात खपवलेल्या पुस्तकातला. तो दाखवला माधवराव शिंद्यांनी व आता असं काही करणं हे कोणालाही करता आलं नसतं. ते पुस्तक त्यासाठी जप्त करावं

लागलं असतं.

लोहियांना यावेळी एकच गोष्ट करता आली असती. ती म्हणजे आपली नापसंती जाहीर करून आपल्या पत्रिकेने मिळालेली मान्यता काढून घेणे. यामुळे त्यांच्यावरचा बोल टळला असता.

मी तशी विनंती केली, पण त्यांना, त्या पुस्तकांच्या प्रकाशकास व दुसऱ्या दुय्यम संपादकास दुखवण्यास मन धजावले नाही. मी सूचना केली त्याला त्याच्या भोवतालच्या मित्रांनी पाठिंबा दिला नाही. त्यामुळे लोहिया निष्कारण लोकक्षोभात सापडले. व गं. रं. भिडे व फडक्याबरोबर करवीर नगरपालिका, जिल्हा परिषदा, कागल नगरपालिका वगैरे ठिकाणी निषेधाचे ठराव झाले. कोल्हापूर जिल्ह्यातही व बाहेरही.

माझ्या पत्रकाने जरी सुरुवातीचे वादळ उठले तरी त्याला मोठं स्वरूप दिलं ते श्री. एस. एम. शिर्के यांच्या नि:सीम शाहू भक्तीमुळें, त्यांनी कोल्हापूरला प्रचार करून जागं केलं. अनेक सभा घेतल्या व लोहियांच्या बंगल्यावर मोर्चा नेला. बिंदु चौकात साठयाला उपोषणाला बसवलं. माझा राग होता मुख्यत: भिड्यावर. लोहियांनी यात हेतूपुरस्पर काहीही केलं नव्हतं.

करणं शक्य नव्हतं. ते व्यापारी, ज्या शहरात रहात होते त्यातील बहुसंख्य समाजाला दुखवून अप्रियता मिळवणं हे व्यापारी धोरणालाही धरून नव्हतं. त्यांचेवर काहींचा आरोप होता की त्यांनी पुस्तकाला आर्थिक सहाय्य केले असावे. केले की नाही हा प्रश्न निराळा पण कोल्हापूरबद्दल एक उत्कृष्ट ग्रंथ निघावा या भावनेने मदत केली असल्यास अस्वाभाविक नव्हे. पण इतके पैसे खर्च करून अप्रियता पत्करण्याचा अव्यवहारीपणा त्यांचे हातून होणे शक्य नाही. शाहूंची बदनामी करण्याचा उद्देश त्यांचा असेल हे शक्य नव्हते. पूर्वी त्यांनी शाहूंच्याविषयी कधी वाईट उद्गार काढल्याचे मी ऐकलेले नाही.

माझं ऐकलं असतं आणि अर्पण पत्रिकेची मान्यता काढून घेतली असती म्हणजे ते जनतेच्या रोषापासून व अप्रियतेतून वाचले असते.

मी पुन: जाऊन त्यांना विनंती केली. भिड्यांचा लेख महाराजांच्या हेतूचा व अनेक प्रसंगांचा कसा विपर्यास करणारा आहे ते सांगितले पण त्यांना त्यातील डावपेच कळू शकले नाहीत.

म्हणून माझ्याहून अधिक जवळचे, अधिक जिव्हाळ्याचे, त्यांच्या हाताखालचे एक मोठे अधिकारी, कर्नल जाधव यांना घरी फोन करून

बोलावले. ते भास्करराव जाधवांचे चिरंजीव, भास्करराव शाहूंचे आवडते अधिकारी, सल्लागार, कट्टर सत्यशोधक, शाहूंचे अभिमानी म्हणून मला खात्री वाटत होती की ते लोहियांचे मन वळवतील, पण अनुभव अगदीच निराळा आला. लोहियांचं मन वळविण्याऐवजी त्यांनी माझीच कानउघाडणी करायला सुरुवात केली व मलाच म्हणाले -

"माधवराव तुम्ही साहेबांचे मित्र असून पत्राकडं एकदम धाव घ्यायला नको होती. अगोदर कळवलं असतं तर मी ठिकठिकाणी जाऊन ती पाने फाडली असती. आता काय व्हायचं असेल ते होईल". जणू हे पुस्तक त्यांनाच अर्पण केलं होतं.

हे उद्गार लोहियांचे नव्हेत. शाहूभक्त सत्यशोधक भास्करराव जाधवांच्या चिरंजीवाचे.

बरं निरनिराळ्या संस्थांना व व्यक्तींना विकलेली पुस्तके ही त्यांच्या मालकीची. त्या पुस्तकांची पाने हे कशी फाडणार? वाचनालयांना विकलेली पुस्तके ही त्या संस्थेची ती कोणाच्या अधिकारावर परत मागणार? अर्पण पत्रिकेची मान्यता काढून घेणे व आतील मजकुराविषयी नापसंती प्रसिद्ध करणे हाच एक सरळ मार्ग होता. लोहियांचे मित्र म्हणणाऱ्या त्या गृहस्थांनी तो सुचवला नाही व सुचवणाऱ्यालाच शहाणपणाचे डोस पाजले.

ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद का निर्माण झाला. तेढ कोणी निर्माण केली, वेदोक्त प्रकरण कसे निर्माण झाले, शाहूंच्या उलट कोल्हापुरचे व पुण्यातले ब्रह्मवृंदाचे नेते, शंकराचार्य, राजोपाध्ये, प्रो. विजापूरकर व त्यांचे अनेक पाठीराखे व पत्रे कशी उलटली. हा इतिहास लोहिया मूळचे महाराष्ट्राचे नसल्यामुळे त्यांना माहीत नव्हता. ते रामगडचे. तो माहीत असता तर ग. रं. भिड्यांची वृत्ती व त्यांच्या लेखात शाहू महाराजांच्या इतिहासाचा जाणून बुजून केलेला विपर्यास त्यांना कळला असावा. भिड्यांनी शाहू महाराजांविषयीची अधिकृत पुस्तके, लठ्ठ्यांनी, तोफखान्यांनी लिहिलेली चरित्रे, धनंजय कीर यांची व्याख्याने ही सर्व बाजूला सारून, त्यावेळी ज्यांनी नालस्ती केली त्यांचाच आधार घेतला व आपल्या लेखाचा विपर्यास होईल असं लेखात लिहूनसुद्धा पुन: विपर्यास करणारे लिखाण जाणून बूजून लिहिले. कोल्हापुरात शाहू महाराजांवेळचे लोक येथे होते. ज्यांनी त्यांच्याविषयी काही लिखाण केलं ते होतं. त्यापैकी कोणालाही आपला मजकूर न दाखवता "कोल्हापूर दर्शन" मध्ये

बदनामीचा मजकूर घुसडला व लोहियांना तो अर्पण करून त्यांच्या गळयात ही घोरपड अडकवली. त्यामुळे अनेकांचा रोष त्यांच्यावर ओढवला.

मी श्रद्धेतून केलेली सूचना त्यांनी ऐकली नाही. म्हणून मी त्यांच्यावर रागावलो. त्यांच्या बंगल्यावर जाणे येणे टाकून दिले. हरघडी मिळणारी मोटर मागण्याचे सोडून दिले. शक्य तितके व झेपेल तितके पायी व नाइलाज होईल तेव्हा रिक्षा करुन जाऊ लागलो. मनात वाकुडपणा नव्हता, द्वेष नव्हता. पण राग होता. तो सात्विक होता. तो शाहू महाराजांच्या अपमानात ते सहभागी झाले म्हणून होता. मित्रप्रेमाहून शाहूभक्ती मला अधिक महत्त्वाची वाटली. वैचारिक निष्ठा आणि मैत्री, आप्तसंबंध, रक्तसंबंध असा ज्या ज्या वेळी प्रश्न उभा राहिला त्यावेळी निष्ठेला, मी सतत महत्त्व देत आलो आहे.

म्हणून मी स्वस्थ बसलो नाही. ग. रं. भिडे यांच्या लेखावर पुढारीत चार लेख लिहिले. एक पुस्तिका प्रसिद्ध करून त्यांनी ठिकठिकाणी विपर्यास कसा केला ते साधार दाखवले.

## ३) "मी आहे सत्यशोधक, म्हणून नास्तिक"

*हा आहे माधवरावांच्या जीवनविषयक तत्वज्ञानाचा जाहिरनामा (मॅनिफेस्टो). फक्त फुल्यांचा सत्य धर्म व आंबेडकरांचा मानवता धर्मच भारताला वाचवू शकेल अशी त्यांची गाढ श्रद्धा होती.*

मी यावेळी ता. ३१ जानेवारी १९७३ ला आजारीपणातच माझे विचार लिहून अनेक पत्राकडे पाठविले. ब्राह्मणी वर्चस्व शाबूत ठेवणारे संपादक ते घेतील ही मी अपेक्षाच केली नाही. राष्ट्रीय आवरणाखाली सुद्धा ही वर्णवर्चस्व शाबूत ठेवण्याची वृत्ती अपेक्षेप्रमाणेच मला आढळली. ते कोणी बुध्दिवाद शिकवत नाहीत.

मरणकाळ जवळ येत चालला आहे याची जाणीव आजारीपण करून देते. म्हणूनच अधिक सत्साह वाढला आहे. म्हणूनच विचार नमूद करून ठेवण्याची मी घाई केली. मोठ्या कष्टाने पण जिद्दीने सरळ बसता येत नसतानाही पवित्र कर्तव्य म्हणून हे लिहिले व वरील लेखांच्या ४० सायक्लोस्टाईल प्रती काढून अनेक पत्रांना पाठविल्या.

राष्ट्रीय एकात्मता साधावयाची असेल, एक संधी राष्ट्र निर्माण

करावयाचे असेल, देशातील भांडणे कमी करावयाची असतील तर सत्यशोधक व्हा. धर्माधर्मातील तेढ नाहीशी करायची असेल, जाती-जमातीतील वैमनस्य नष्ट करायचे असेल, वंशभेद, राष्ट्रभेद कमी करायचे असतील, तर सत्यशोधक व्हा. देहाला, मनाला व बुद्धीला जखडून टाकणाऱ्या, अंधश्रद्धेच्या, रुढीच्या, परंपरेच्या बेड्या तोडून टाकायच्या असतील तर सत्यशोधक व्हा. देव, धर्म, स्वर्ग, नरक, पूर्वजन्म, पुर्नजन्म कर्मविषयक या निराधार कल्पनेच्या जाळ्यातून बाहेर पडायचे असेल तर सत्यशोधक व्हा. कुटिल नीतीच्या बुद्धीवाद्यांनी स्वत:च्या व आपल्या वर्गाच्या स्वार्थासाठी व सत्तेसाठी अडाणी समाजाच्या मेंदूत मुरविलेल्या खोट्या कल्पना काढून टाकायच्या असतील तर सत्यशोधक व्हा. विचाराने माणसाचा राक्षस बनवला, मानवता नष्ट केली, ते विचार काढून टाकायचे असतील तर सत्यशोधक व्हा.

तुमच्या स्वतंत्र बुद्धीचा व मनाचा विकास व्हायचा असेल तर सत्यशोधक व्हा.

**आग्रह सत्याचा धरा :-**

नको ती बंधने, संस्थेची नको, जातीची नको, धर्माची नको, वंशाची नकोत, झेंडा हाती घ्या सत्याचा, साम्राज्य स्थापन करू या बंधुत्वाचे, प्रेमाचे.

सत्यशोधकाचे अंतिम ध्येय आहे ते हे जाणण्याचा मार्ग एकच. सत्यशोधन.

सत्यशोधक व्हायला दुसरा कोणी मार्गदर्शक नको. गुरू नको. त्याला विश्वविद्यालयाची मान्यता नको. एम. ए. पी. एच. डी. व्हायला नको. भाराभर पुस्तके वाचायला नकोत. धर्मग्रंथांचा अभ्यास नको. धर्म संस्थापकाचा किंवा कोणत्या महात्म्याचा आधार नको. आमक्याने सांगितले, तमक्याने सांगितले हा निर्वाळा द्यायला नको. सत्यशोधन आपणच करावयाचे, आपल्याच डोक्याने विचार करावयाचा. निवाडा द्यायचा आपणच.

**डोळ्याला दिसतं ते सत्य :-**

आग्रह सत्याचा धरा, असत्याचा नव्हे. असत्याचा आग्रह म्हणजे दुराग्रह. सत्य स्वत:ला पटलं पाहिजे. दुसऱ्याला पटवून देता आले पाहिजे. माझे बाबा असे म्हणत होते, त्याचे बाबा पण तसेच म्हणत होते हे नको, गीता बायबल, कुराण ग्रंथात असंच म्हटलं आहे हा आग्रह नको. तुम्हाला ते पटलं पाहिजे. दुसऱ्याला पटवून देता आलं पाहिजे. नावे मोठमोठ्यांची घेऊ नका. माणूस कितीही अडाणी असो त्याला ते पटलं पाहिजे. सत्य कोणतं, असत्य

कोणतं हे कळणं अवघड नाही. त्यासाठी डोक्याला शीण द्यावा लागत नाही. डोळ्याला दिसतं ते सत्य. हाताला लागतं ते सत्य. जिन्नस हाताला जड, हलका, मऊ, खरखरीत लागतो. हाताला पाणी थंड लागतं, उकळलेल्या पाण्याने तसा विस्तवाने हात भाजतो, हे सत्य. नाकास गुलाब फुलांचा सुगंध येतो, घाणीची दुर्गंधी येते ते सत्य, जिभेला पदार्थ गोड लागतो, तिखट लागतो, खारट लागतो हे सत्य. ऊस गोड हे सिद्ध करता येते, मिरची तिखट खाताच समजते, हे सत्य. डोळे, कान, नाक, जीभ, स्पर्श या इंद्रियांना ज्याची जाणीव होते ते सत्य. हे अडाण्याला कळतं तसं सुशिक्षितांना कळतं.

**प्राण म्हणजे आत्मा :-**

देव कुणी पाहिला नाही, कुणाला दाखवता आला नाही. कोणा शास्त्रज्ञाला प्रयोगाने सिद्ध करता आलं नाही. म्हणून देव हे असत्य. जे तुमच्या ज्ञानाला आकलन होत नाही, ते अज्ञान। म्हणजे देव हे अज्ञान. जगातल्या साऱ्या जड वस्तू दगड, झाड, प्राणी, पक्षी, माणसे पृथ्वी हे सत्य. पंचमहाभूते सत्य त्यांच्या मिश्रणातून पुन्हा अनेक नव्या नव्या वस्तू निर्माण होतात. या मिश्रणातून प्राण निर्माण होतात. ते मिश्रण जमले नाही की जीव निर्माण होत नाही. शेण गरम राखेवर पडलं की किडे निर्माण होत नाहीत. ओल्यावर पडलं की किडे वळवळतात. तो जीव म्हणजे प्राण. प्राण म्हणजे आत्मा. जीव नाही तर प्राण नाही. आत्म्याला निराळं अस्तित्व नाही. म्हणून जीव हे सत्य होय. मग देव आला कोठून? कोणी निर्माण केला?

माणसाने स्वतःच्या उपयोगासाठी गाडगी, मडकी वगैरे भांडी तयार केली. गमतीखातर जनावरांच्या, पक्षांच्या, तशा माणसांच्या आकृत्या त्याच चिखलातून केल्या. काही सुरूप तशा काही कुरूप, तशा विद्रुप आणि भयानक. हास्यकारक विद्रुप कार्टुन्स कागदावर काढली जातात तशी मातीत काढली. माणसाला जनावराचे तोंड लावले तसे जनावरांना माणसाचे तोंड लावले. माणसाच्या आकाराला हत्तीचे तोंड व गरगरीत पोट लावले तर एकाला सिंहाचे तोंड लावले. दहा हात, दहा तोंडे लावून अक्राळ विक्राळ स्वरूप आणले.

धूर्तांनी त्याचा फायदा घेतला व त्याला बनवलं देव. त्याला चिकटवले चांगले, वाईट गुण. लहान मुलाला बागुलबोवाची भीती दाखवावी तशी, देव प्रसन्न झाला की, माणसाचं भलं करतो, रागावला की सूड उगवतो, असे माणसांच्या अंगचे चांगले वाईट गुण त्यांच्यावर लादले. त्यांच्या गुणवर्णनांच्या

भाकड कथा रचल्या व त्यांना प्रसन्न करण्याची जबाबदारी या धूर्त दलालांनी म्हणजे भट, पुरोहितांनी आपल्याकडे घेऊन ठकबाजीचा धंदा सुरू केला. कष्टाशिवाय उत्पन्नाची बाब निर्माण केली व सत्ता आणि संपत्तीचे ठेकेदार हे बनले. आणि अडाण्यांना फसवायला सुरुवात केली. ती आजपर्यंत चालली आहे. पण देवाचे खरे बाप कोण?

देवाचे बाप :-

खाणीतला दगड फोडून त्या दगडाला आकार देणारा पाथरवट त्याचा बाप, चिखलाला आकार देणारा कुंभार त्यांचा बाप, लोखंडाला देव करणारा लोहार, सुतार, सोनार हे या देवाचे बाप. पण हे बाप राहिले आयुष्यभर चिखल थापत, दगड फोडत. लोखंडावर घण घालत. धूर्त भटांनी यांच्या डोक्यात तोच धोंडा घालून त्यांची बुद्धी नष्ट केली व यांना राबणारा पोकळ डोक्याचा बैल बनविला. त्याची विचार करण्याची शक्ती नष्ट केली आणि त्याला दोन पायांचं जनावर बनवलं. यामुळे सत्य असत्य कळण्याला तो असमर्थ झाला. पण देशाचा गाडा मात्र चालवतो तो, आणि गाडी चालवायला बसले मात्र हे उपटसुंभे, देवाचे दलाल. अन् या गाडीत धर्मग्रंथाच्या पोथड्या टाकल्या. अन् यांना केलं निव्वळ भारवाहू. खालच्या समाजाला अज्ञानात ठेवलं व असत्याला पुजाय लावलं. सत्याचा मार्ग रोखून धरला व अज्ञ समाजावर सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय सत्ता प्रस्थापित केली.

म्हणून यांचा आधार जो देव, ईश्वर, आत्मा तो तोडून, सोडून फेकून दिल्याखेरीज स्वर्ग, नरक, पूर्वजन्म या कल्पनेतून सुटका करून घेतल्याखेरीज बहुजन समाजाला खऱ्या स्वातंत्र्याचा लाभ होणार नाही. म्हणजेच खरी मुक्ती मिळणार नाही.

सत्यशोधक झाल्याखेरीज देवाधर्माच्या, अंधश्रद्धेच्या, रुढीच्या व परंपरेच्या भट, पुरोहितांच्या पकडीतून बहुजन समाजाची सुटका होणार नाही.

सत्यशोधन हाच एकमेव सुखाचा मार्ग. सुखाची आकांक्षा टाकल्याने ते सापडणार नाही. जग दु:खमय आहे तसं सुखमय आहे. मनुष्य कितीही संकटात असो, दारिद्र्यात असो त्यातही तो सुखी होण्याचा प्रयत्न करीतच असतो. सर्व महत्त्वाकांक्षा टाकल्याने, वासना टाकल्याने, हरी ठेवील तसे रहावे ही वृत्ती बाळगल्याने तुम्हाला चांगले दिवस कधीही दिसणार नाहीत. कोणाचा हेवा करू नका. या शिकवणीने बहुजन समाज आहे त्या परिस्थितीतच खितपत पडेल. ही

निवृत्तीपर शिकवण भटशाही आणि भांडवलशाहीला पोषक ठरली आहे. आणि याच वर्गाकडून स्वत:चा स्वार्थ शाबूत राखण्यासाठी ही जिवंत ठेवली आहे. तिचा प्रचार आजही केला जातो. त्याला संत महात्मेही बळी पडले आहेत. यांनी दारिद्र्याचीच महती गायली आहे. त्यामुळे त्यांची प्रतिकारशक्ती मारून टाकली. या उपदेशांनी आहेरेंनी कसलाही त्याग केला नाही. नाहीरेंना मात्र दुर्बल बनविलं. मेंढरे बनवलं अन् हे मात्र मेंढपाळ राहिले ते राहिलेच.

ज्यांना घर नाही, दार नाही, आसरा नाही, अंगावर धडुत नाही, सुजलाम सुफलाम भूमीवर थारा नाही. त्यांना त्यागाचा व संयमाचा उपदेश करणं दु:खावर डागण्या देण्यासारखे आहे. संयमापेक्षा सात्त्विक संतापच यांच्यात निर्माण झाला पाहिजे. तो सत्यशोधनानं होईल. त्यांची नागवणूक कशी केली, कोणी कोणत्या साधनाने केली ते सत्यशोधनाखेरीज समजणार नाही.

सत्यशोधनाने तुमची ओळख तुम्हाला होईल. तुमच्यातील परावलंबित्व नाहीसं होईल. तुमच्यातील कर्तृत्व जागे होईल. तुम्ही सारी गुलामगिरी फेकून द्याल. बंधमुक्त व्हाल. म्हणून मी म्हणतो- सत्यशोधक व्हा. दुसरा मोक्ष नाही.

**मी नास्तिक आहे, देवा धर्माचा निंदक आहे.**

आम्हा नास्तिकांना काही पत्रांनी तंबी दिली, पण आमची मुस्कटदाबी कोण करणार? सरकार करणार? की धार्मिक गुंड करणार? विचार स्वातंत्र्य, लेखन स्वातंत्र्य, संघटना स्वातंत्र्य हे मानवी मूलभूत हक्क जे घटनेने दिले आहेत, ते काय सरकार काढून घेणार? की धर्म मार्तंड काढून घेणार?

आपले विचार मांडण्याचा, अमका धर्म चांगला की वाईट हे सांगण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीला आहे. नास्तिकाला आहे तसा आस्तिकाला आहे.

हिंदू धर्माने केलेली अस्पृश्यांची राखरांगोळी अनुभवीत असताना अस्पृश्यांनी व मानवतेची ज्यांना चाड आहे, ज्यांच्या अंगी माणूसपणा आहे, अशा कोणाही व्यक्तीस, तसं धर्मियाला मग तो हिंदुधर्माचा असो-नसो, त्या धर्मावर टीका करण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाला आहे. हा हक्क फक्त हुकुमशाही राजवटच काढून घेईल. किंवा हुकुमशाही वृत्तीचे गुंड अत्याचारी मार्गाने काढून घेण्याचा प्रयत्न करू शकतील.

या छळवादाचा अतिरेक हिंदुधर्माच्या घडणीतच आहे. पण ही मुस्कटदाबी ख्रिश्चन धर्माने केली आहे तशी इस्लाम धर्मानेही केली आहे.

नरकवासाची कल्पक भीती तो तो धर्म न मानणाऱ्याना घातली तो

नरकवासी छळ प्रत्येक धर्मगुरुंनी, पुरोहितांनी राजसत्तेच्या बळावर स्वतंत्र बुद्धिवाद्यांचा केला आहे. या धर्मांनी माणसांचे राक्षस बनवलं आहे. माणूसच शत्रू बनला आहे.

म्हणूनच सर्व धर्म बंधनातून मुक्त होऊन केवळ मानवतेचा स्वीकार करा. हा संदेश नास्तिक देत आहेत.

त्या नास्तिकांपैकी सर्वश्रेष्ठ नास्तिक चार्वाक व महात्मा बुद्ध होत. अस्पृश्यांच्या राखेतून बाहेर पडलेला तेजोमय अग्नी बाबासाहेब आंबेडकर हे मानवतावादी, जगमान्य नास्तिक होते. आगरकर नास्तिकच होते.

मानवी स्वातंत्र्य, समता, बंधुभाव यासाठी स्वातंत्र्य व लोकशाहीसाठी जीवन वाहून घेणारे व मानवी कल्याणासाठी आपली आहुती देणारे कोण असतील तर ते नास्तिक होत.

आणि स्वत:च्या व आपल्या वर्गाच्या स्वार्थासाठी अज्ञबहुजन समाजाला राबविणारे, पायाखाली तुडविणारे, उच्च नीच भेद पाडणारे व सरणावरची पोळी खाणारे कोण असतील तर धर्माच्या नावांवर चरणारे धार्मिक पुंड, पाठक व आस्तिकच होत.

जगाला व मानवांना मागे खेचून नेणारे जर कोण असतील तर ते देव, ईश्वर आत्मा स्वर्ग नरक या निराधार कल्पनांचा प्रचार करणारे आस्तिक होत.

पण काळाबरोबर जग पुढे चाललं आहे. यांत्रिक सुधारणेबरोबर अंधश्रद्धा आपोआपच कमी होत आहे. चंद्रावर स्वारी माणूसच करू लागल्यामुळे ग्रह देवतांचं पावित्र्य नष्ट होत आहे. औषधी ज्ञानाबरोबर अंगारा व नवस या कल्पना नष्ट होत आहेत.

हा नास्तिकवाद्यांचा जय आहे.

ज्यांच्या स्वार्थाला धक्का बसतो ते धर्मक्रांतीकारकांचा सूड घेतील पण विचार मरणार नाहीत.

राष्ट्रेच्या राष्ट्रे नास्तिक झाली आहेत.

भारताहूनही ती देवाधर्माच्या गुलामगिरीत जखडली गेली होती. पण ते पाश अखेर नवमतवाद्यांनी, नास्तिकांनी तोडून टाकले.

विचारांची मुस्कटदाबी कोणालाही करता येणार नाही. असा प्रयत्न करणारे कायद्याच्या दृष्टीने तर गुन्हेगार ठरतीलच पण मानवतेचे गुन्हेगार ठरतील.

ईश्वर, देव का मानायचा? विचार न करणारे मानतात म्हणून? बहुसंख्य अज्ञानी मानतात म्हणून? असत्याला सत्य मानणाऱ्यांची संख्या जास्त आहे म्हणून? कोणीही ईश्वराला पाहिलेलं नाही. पोष्टमन पत्ता सांगू शकत नाही.

आईबाप निर्वाळा देतात त्यांच्या आईबापांचा. मी पाहिला आहे असे म्हणणारा व त्यांची भेट घालून देणारा जगात कोणी आढळला नाही. आढळणार नाही. तरी पण देव आहे असे मानलेच पाहिजे. ईश्वरावर विश्वास ठेवून काय पदरात पडलं असेल तो मूर्खपणा.

या अज्ञानाचे डोळे उघडले महात्मा बुद्धाने.

पडलेली झापड पुन: उघडली बाबासाहेबांनी.

मार्क्सने शास्त्रीयदृष्ट्या ती सिद्ध केली.

या महात्म्यांची मुस्कटदाबी कोणालाही करता आली नाही. नेहरू नास्तिक होते. कोणताच धर्म मानीत नव्हते. जगप्रसिद्ध तत्त्ववेत्ता बर्ट्रंड रसेल नास्तिक होता.

तुम्ही दगडाला कवटाळून अकलेला फाटा देणार काय ?

बसा टाळ कुटीत आणि संसाराचे वाटोळे करीत.

भारताला पुढे नेईल तर महात्मा बुद्धाचा व आंबेडकरांचा मानवताधर्मच अन् फुल्यांचा सत्यधर्मच,

## ४) शाहूंचे कोल्हापूर समाज क्रांतिकारक होते.

*शाहू महाराजांच्या पुरोगामी कोल्हापूरात काही प्रतिगामी बुद्धीला न पटणाऱ्या घटना तथाकथित शाहू भक्तांकडून घडल्या. त्याविरुद्ध सत्यशोधक शाहूभक्त माधवराव बागल आपला आवाज येथे उठवीत आहेत. तीन घटना घडल्या आहेत. शाहू जयंतीच्या व्याख्यानात शाहू महाराज मूर्तीपूजक होते, हिंदुधर्माभिमानी होते अशी मांडणी साहित्यिक ग. दि. माडगुळकरांनी केली होती. दत्ताबाळ या आधुनिक बोवाच्या बहुजन समाजाच्या तमाशा या करमणूक प्रकारात जो गणगौळणीचा व कृष्णाचा उल्लेख येतो तो कृष्णाला कमीपणा आणणारा आहे असे विचार मांडले आहेत. तिसरी घटना चित्रकार जी. कांबळे यांनी काढलेल्या शिवछत्रपतींच्या नविन पोट्रेटची आहे. जी. कांबळे यानी असा दावा केला आहे की, त्याना स्वप्नात शिवछत्रपतींचे दर्शन झाले व त्यावरून त्यांनी हे नवीन पोट्रेट तयार केले आहे. माधवरावांचा असल्या गोष्टीवर विश्वास नव्हता. ही एक प्रकारची बुवाबाजीच आहे. बहुजन समाजाची फसवणूक आहे.*

कोल्हापूर संस्थान शाहू महाराजांच्या हयातीत शाहूमहाराजांच्या विचारामुळे व आचारामुळे त्यांच्या उक्तीमुळे व कृतीमुळे पुरोगामी व समाजक्रांतिकारक म्हणून अखिल महाराष्ट्रात गाजले जात होते. हा आभास

अद्यापही बाहेर आहे. पण त्यांच्या विचाराला व कृतीला धरून, प्रत्यक्ष आचरण करणारे आज बोटावरही मोजता येणारे नाहीत. त्यांच्या नावाचा, घराण्याचा व गादीचा फायदा घेऊन स्वार्थ साधणारेच निघाले. शिवछत्रपतींनी किंवा शाहूंनी आपल्या गादीचं महत्त्व वाढविण्याकरीता, किंवा भावी वारसांना वंशपरंपरे सुखाने ऐश्वर्यात राज्य भोगता यावं या हेतूने आपलं आयुष्य खर्चलं नाही.

शिवछत्रपतींनी स्वातंत्र्यासाठी मरणाची झुंज दिली. शाहूंनी सामाजिक व धार्मिक गुलामगिरी नष्ट करण्याकरीता व उच्चनीच भेद घालवण्याकरीता उच्चवर्णीयांशी लढा दिला. अस्पृश्यता नष्ट करण्याची पराकाष्ठा केली.

पण त्याच कोल्हापुरात, निव्वळ गादीचं व घराण्याचं नाव घेऊन दत्तक प्रकरण उचलून धरण्यात आलं व जनतेला परत मागेच रेटले.

शिव व शाहू जयंतीला, प्रतिगामी मूर्तिपूजेचं स्वरूप दिलं. अंधभक्ती, वंशभक्ती व गादीभक्तीचं पुनर्जीवन केलं. त्यांच्याच नावाचा फायदा घेऊन, प्रतिगाम्यांनी विजयमाला राणींना निवडून आणून समाजवादी काँग्रेसवर इथे मात केली. अन् तेच प्रतिगामी शाहूभक्त म्हणून मिरवतात व त्यांच्या उपदेशाविरुद्ध आचरण करतात.

**शाहू जयंती :-**

येथे भवानी मंडपात दरसाल होणाऱ्या शाहूजयंतीच्या कार्यक्रमात नामदार रुपवत्यांनी मला बोलण्याची संधी देताच मी बोललो. वर्षभर कार्य करा. अस्पृश्यता घालवण्याचा कार्यक्रम आखा. मिश्र विवाहाला उत्तेजन द्या. याप्रसंगी असे विवाह घडवून आणा. ज्यांनी केला असेल त्यांना येथे बोलवून सत्कार करा. पण सभा संयोजकांना हे बोलणे कडू वाटले व मी सभेच्या जागी पायात घालून आलो म्हणून मजवर टीका केली. सभास्थानाला देवमंदिर बनवलं. मूर्तीची पूजा, मंदिराची पूजा आणि त्यांच्या उपदेशाला व आचरणाला तिलांजली.

त्या सभेचे अध्यक्ष होते ना. रुपवते. मुख्य वक्ते होते पद्मश्री ग. दि. माडगूळकर. त्यांना खटपटीने आणणारे होते गजाननराव भोगावकर. मी धावपळ करीत आलो ते रुपवत्यांचे भाषण ऐकण्याकरीता. ते बौद्ध म्हणूनही मला जवळचे वाटले. पण ते आले जवळ जवळ तासभर उशिरा. मला माझ्या प्रकृतीमुळे ताटकळत बसणे त्रासदायक होऊ लागले. त्यांनी माझे भाषण ठरवले नसताना मला प्रथमच चार शब्द बोलण्याची परवानगी दिली.

मी म्हणालो - "इतर मंत्र्याप्रमाणेच रुपवत्यांनी आम्हां सर्वांस तिष्ठत

ठेवले. ही पद्धत बदलायला पाहिजे. एका व्यक्तिसाठी असे शेकडो लोकांना तिष्ठत ठेवणे बरे नव्हे. त्यानंतर जयंतीबद्दल वर लिहिल्याप्रमाणे विचार मांडले. नामदार माझ्या वेळेवर येण्याच्या सूचनेबद्दल रागावले नाहीत. उलट चूक कबूल केली. पण एक टोमणा मारला तो मला फार आवडला. त्या एका वाक्यात वरच्या वर्गाविषयी त्यांची चीड त्यांनी प्रकट केली. ते म्हणाले आमच्या समाजाला वरच्या वर्गाने कित्येक वर्षे असेच तिष्ठत ठेवले आहे. त्यांचे भाषण माझ्या अपेक्षेप्रमाणेच झाले व माझ्या प्रत्यक्ष कृतीच्या विचारालाच माझ्या नावाचा उल्लेख करून उचलून धरले.

मुख्य पाहुणे होते प्रसिद्ध साहित्यिक श्री. ग. दि. माडगूळकर, उच्च वर्णियातले. त्यांनी आपल्या भाषणाला साहित्याचा रंग चढवला. चढ उतार आवाजाने श्रोत्यांवर चांगलीच छाप पाडली व आपल्या विचाराला ब्राह्मणी धर्माला पोषक ठरतील अशा काही गोष्टी शाहूंच्या जीवनातून शोधून शाहूंना समाज व धर्म क्रांतिकारकाऐवजी अंधश्रद्धेचे पोषण करणारे, धर्माभिमानी असे रंगवले. त्यांच्यावर ब्राह्मणी धर्माचाच शिक्का मारला. खऱ्या पुरोगामी वृत्तीच्या शाहूंना दडवण्याचं जन्मजात कौशल्य त्यांनी आपल्या प्रतिभेने दाखवले.

मी माडगूळकर यांच्या भाषणाची प्रतिक्रिया ता. १६ नोव्हेंबर १९७२ च्या इंद्रधनुष्यामध्ये प्रकट केली ती -

**माडगूळकर ब्राह्मण, रुपवते बौद्ध**

व्याख्यानांत दोघांच्या जन्मजात संस्कारामुळे व जीवनातल्या उद्दिष्टांमुळे उघड उघड फरक दिसून आला. ज्या विचारामुळे, आचारामुळे, श्रद्धेमुळे व परंपरेमुळे उच्चवर्णीयांचे वर्चस्व टिकून राहील अशाच गोष्टींचा शोध महाराजांच्या जीवनातून हुडकून तो आदर्श माडगूळकरांनी मोजक्या शब्दात सांगितला व आपणही शाहू महाराजांचे एकनिष्ठ भक्त कसे आहेत हे सिद्ध केले.

शाहू महाराज मूर्तिपूजक होते. मीही मूर्तिपूजक आहे. शाहू महाराज हिंदुधर्माभिमानी होते. मीही हिंदू धर्माचा अभिमानी आहे. त्यांच्या हातावर शिवलिंग गोंदले होते, महाराज असे देवभक्त होते.

पण मूर्तिपूजेतून मुक्त होते गेले म्हणून राजाराम कॉलेज आर्यसमाजाचे पुढारी डॉ. बाळकृष्ण यांचे हाती त्यांनी संस्थानची नवी पिढी दिली हे सांगितले नाही.

नवसारीत ता. २४-१२-१९१८ च्या भाषणात महाराज म्हणतात "मनुष्याचे बुद्धीस नीचपणाप्रत नेणारी हलक्या प्रकारची मूर्तीपूजा फार

वाढली. त्या मूर्तीचे पूजक आपणांस पवित्र म्हणवून घेऊ लागले. तीर्थाचे काल्पनिक महात्म्य वाढविण्यात आले. मेल्यावरही मृतास पोचवण्याकरीता म्हणून श्राद्ध म्हाळ दान वगैरे .. गारुडी ग्रंथ निर्माण केले. लग्न उपनयन अमूक मुहूर्तावर व्हावे अशी थोतांडे काढून .. वेडगुळ धर्म समजुतीचा पगडा जनमनावर बसवला. ब्राह्मणी धर्माला सनातन असे नांव देऊन त्याचे महत्त्व अज्ञानांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला.

शाहू चरित्राला अनिष्ट वळण देऊन पद्मश्री प्रसिद्ध साहित्यिक ग. दि. माडगूळकर यांनी त्यांना समाजक्रांतिकारकातून बाहेर काढले. .. इंग्रज इतिहासकारांनी शिवाजी महाराजांना लुटारू ठरवले, ब्राह्मण इतिहासकारांनी रामदासांना त्यांच्या डोक्यावर बसवले. या माडगूळकरांना शाहू जयंतीच्या संयोजकांनी मुद्दाम बोलवून आणले होते. सारे बोलके भक्त. खऱ्या शाहूंचे वैरी. म्हणूनच मी म्हटलं शाहू महाराजांचे समाजक्रांतिकारी कोल्हापूर आता उरलं नाही. प्रतिगाम्याचे केंद्र बनले आहे.

याच कोल्हापुरात दत्ता बाळ या पुस्तकी प्रेषिताचा, पूर्वजन्म, पुनर्जन्म या कल्पनांचा पुरस्कार करणाऱ्या, आपला रोग बरा करतो म्हणून खोटा प्रचार करणाऱ्या, या आधुनिक बोवांचा निधर्मीराज्य ही बोवाबाजी आहे म्हणणाऱ्यांचा, उदोउदो करण्यात येत आहे. ब्राह्मणाकरवी तसा मराठाकरवी व स्वत:ला सत्यशोधक म्हणवून घेणाऱ्याकरवी येथल्या सत्यशोधक समाजाने याविरुद्ध ब्रही काढले नाही. मुंबईच्या सत्यशोधक नामधारण करणाऱ्या अध्यक्ष बाळासाहेब देसाई यांनी तर या दत्ता बाळाचा उघड गौरव केला. बाहेरची हिंदुसभावाली पत्रे आपल्याच ब्राह्मणी धर्माचं श्रेष्ठत्व प्रस्थापित करायलं मिळाला म्हणून त्याचा उदोउदो करीत आहे. जनसंघ व हिंदुसभा त्यांच्या सभा भरवून आपल्या पक्षासाठी वापर करीत आहेत आणि आमचे शाहू महाराज एवढं म्हणण्यापुरतंच आम्ही त्यांची आठवण ठेवली आहे. पोकळ भक्तीचा देखावा, कृतीला फाटा.

शाहू प्रथम जातिवादी होते. मूर्तीपूजक होते पण त्यांचं पाऊल सारखं पुढे पडत होतं. तर यांचे अनुयायी म्हणवून घेणारे मागं चालले. त्यांनी मार्ग दाखवला पुढचा; यांनी स्वीकारला मागचा.

**दत्ता बाळ, गण गौळण आणि बुवाबाजी**

याच कोल्हापूरात दत्ता बाळ या पुस्तकी प्रेषिताची व त्याच्या हस्तकांनी अवतार चमत्कार प्रविण बनवलेल्या चमत्कार प्रविणाची शक्ती, चातुर्वर्ण्य

निर्माण करणाऱ्या, हुकुमशाही प्रवर्तक श्रीकृष्णाची, गीतेची व हिंदुधर्माची महती वाढवून अंधश्रद्धाळू समाजावर आपली छाप पाडून विनासायास लोकप्रियता मिळविण्याकरीता खर्च होत आहे.

श्रीकृष्णाची म्हणे खेडचे लोक गणगौळणीत विटंबना करीत आहेत. खेडचे लोक आपल्या भाषेत श्रीकृष्णाला शहाण्यांनी रंगवले तसे आपल्या भाषेत रंगवत असतील. पण हा श्रीकृष्णाचा अपमान दत्ता बाळ यांना असह्य झाला.

पण अस्पृश्यांचे पाहू नये, ऐकू नये अशी विटंबना होत असताना त्यांच्या स्त्रियांची अब्रू रोज काढली जात असताना या गृहस्थाला चीड येत नाही. तिथं धावून जात नाही. बाबा आढावनी दौरा काढला तसा यांना काढता येत नाही. पण हिंदुधर्म व श्रीकृष्णाची गीता याचे परिणाम जे आज अज्ञ समाज भोगत आहे. त्या धर्माचा व श्रीकृष्णाचा राग येत नाही. याचं कारण हे गाद्या गिरद्यांवर लोळण घेत अस्पृश्यांच्या जीवनाकडे पहात असतात अन् श्रीकृष्णाला व हिंदुधर्मावर टीका करणाऱ्याला माराची धमकी देतात. ही यांच्यातील 'धार्मिक वृत्ती व संयम' हिंदुधर्मानेच ना निर्माण केली?

डॉ. बाबासाहेबांनी हिंदू धर्म उगाच टाकला नाही. पुरेपूर अभ्यास करून तो सुधारणे शक्य नाही असे पाहून टाकला आहे.

मी त्यांचेच विचार त्यांच्याच शब्दात देत आहे.

'सर्व असमानतेचे मूळ चातुर्वर्ण आहे. ते गीतेत श्रीकृष्णाने गोवले आहे. हिंदुधर्माचा पायाच मुळी असमानतेवर आधारलेला आहे. हिंदुधर्मात देव, आत्मा याला जागा आहे. मनुष्याच्या जीवनाला नाही. जोपर्यंत हिंदू धर्म आहे तोपर्यंत महारवाडा, मांगवाडा राहणारच. जोपर्यंत तो पाळला जातो तोपर्यंत या देशातून सामाजिक विषमतेचे उच्चाटन होणार नाही. हिंदुधर्माने बौद्धिक पातळीवरून कितीही उदात्त तत्त्वांचा घोष केला तरी त्याचा आचार हा वर्ण, जातपात, स्पृश्यास्पृश्यता असल्या विषमतेचाच असतो. कृष्णाने गीतेते काय सांगितले आहे. "हाणा, मारा, तोडा".

वरील उतारा पूज्य आंबेडकरांच्या लिखाणातला आहे.
मग ही पुस्तके सरकारने जप्त केली पाहिजेत. रविवर्म्याची राधा-कृष्णाची, रासक्रिडेची स्त्रियांची वस्त्रे पळवणारी सारी चित्रे जप्त करून टाकली पाहिजेत किंवा त्याचा निराळा अर्थ लावणारे प्रचारक निर्माण केले पाहिजेत.

पुराणातल्या गोष्टी खऱ्या कोणत्या व खोट्या कोणत्या हे सांगत हिंडले पाहिजे.

पण या धर्माभिमान्यांना अस्पृश्याकडे डोळा उघडून पहायला नको. कारण ते हाल व तो भेद ईश्वरनिर्मित.

**कलेतील बोवाबाजी**

कोल्हापूरातील चित्रकारातही दत्ता बाळाची लागण झाली आहे. एक बोवा निर्माण झाला आहे. त्याच्या बोवाबाजीला शे. का. पक्षाचे एक माजी नगराध्यक्ष एम. के. जाधव यांनी सहाय्य केले आहे. शे. का. पक्षातील यांच्या स्थानामुळे बराच खालचा समाज बोवाबाजीच्या सापळ्यात अडकला आहे. या द्वयींच्या परस्पर संबंधातून लाख दीड लाखाचे देवालय उभारले गेले आहे. भक्तगण मिळाला तो वॉर्ड त्यांनी या मोहजालात अडकून टाकला आहे. दगड सापडला की देव बनवितात. लोक पूजतात, मग आता तर दीड लाखाचे मंदिर उभे केले आहे.

जी. कांबळे हे ते चित्रकार. पोस्टरपेंटर बाबूराव यांनीही सिनेमातील पोस्टर्स करण्याकरीता याचे सहाय्य घेतले होते. शांतारामाचे स्टुडिओतही त्यांनी पोस्टर्स काढली आहेत. या धंद्यात चांगलं नांव कमावलं आहे.

मुंबई सोडल्यानंतर त्यांनी काही पोस्टर्सही केली आहेत. दोन पोट्रेटस् पुढारीकार जाधव, समाजाचे संपादक सर्जेराव पाटील वगैरेची आहेत. पण पोस्टर पेंटींगप्रमाणे पोट्रेटमध्ये या कलेतील शास्त्रीय ज्ञान त्यांनी मिळवलेलं नाही व प्रत्यक्ष लाईफ वरून फारशी पेंटीग्ज केलेली नाहीत. पोट्रेटचे मॉडेलिंग व हाय लाईटस् बरोबर टाकता येत नाहीत. तथापि आपल्या धंद्यात ते बरेच पैसे कमाऊ शकले. पण जरूर नसताना कला विषयाला भलतेच वळण त्यांनी देऊन, लोकांची दिशाभूल त्यांनी चालवली आहे. असे करण्याचे काही कारण नव्हते पण जाधव व हे या जोडगोळीने हा पैसे मिळवण्याचा एक अजब प्रकार शोधून काढला व त्याला सार्वजनिक स्वरूप दिले. कला निकेतनने मला व्याख्यानासाठी नेले होते. तेथे मी विद्यार्थ्यांपुढे या बोवाबाजीचा निषेध केला.

मी कलेत ७/८ वर्षे काढली आहेत. वाड्मयही बरेच वाचले आहे. या विषयावर ४ पुस्तके लिहिली पण हा अजब प्रकार मला कोठेच आढळला नाही. कांबळ्यांच्यातही पूर्वी हा डोकावला नव्हता. दत्ता बाळाची लागण येथेही झाली.

**कांबळ्यांना म्हणे साक्षात्कार झाला :-**

त्यांना शिवछत्रपतींनी दर्शन दिले व तसे हुबेहूब चित्र आपण रेखाटले व आज अस्तित्वात असलेल्या सरकारमान्य चित्रातील चुका सुधारून आपण

खऱ्या शिवछत्रपतींचे चित्र (पेंटींग) काढले तेच अस्सल आहे.

यावेळी त्यांचे सहकारी एम. के जाधव पुढे सरसावले व त्यांनी तशा प्रचारास प्रसिद्धी देण्यासाठी पत्राकडे धाव घेतली. कलेची माहिती नसल्याने त्या त्या पत्रांनी या बोवाबाजीला प्रसिद्धी व पाठिंबा दिला. एम. के. जाधव हे शे. का. पक्षातले एक पुढारी असल्यामुळे प्रसिद्धीच्या टेक्निकमध्ये मुरलेले. त्यांनी हेच चित्र अस्सल असल्यामुळे सरकारने याला मान्यता देऊन सर्व ऑफिसेस, सार्वजनिक संस्था व शाळांमध्ये लावण्यास भाग पाडावे व आजचे सरकारमान्य चित्र अस्सल नसल्यामुळे ते रद्द करावे अशी ठरावाद्वारे विनंती केली.

दु:खाची गोष्ट, इथं अनेक चित्रकलेचे शिक्षण घेऊन नांव काढलेले चित्रकार आहेत. पण निष्कारण संकटात का पडावं म्हणून त्यांनी एक ब्रही काढला नसावा. मूग गिळून स्वस्थ बसले.

कलेत अनेक प्रकार आहेत. (आयडियालिझम, रियालिझम, रोमॅंटिझम, क्यूबिझम) पौर्वात्य कला ही आयडियालिस्ट, तर पाश्चिमात्य ही रियालिस्टिक व नंतर तंत्रात साधनाप्रमाणे बदल होत गेले आहेत.

भारतात प्रथमावस्थेत कागद व कॅनव्हास तयार झाले नव्हते तेव्हा समोरचे दृश्य अगर व्यक्ती अगर देखावा पाहून तो नजरेत ठेवून मग आठवणींने भिंतीवर काढावा लागला. आज माणूस पुढे उभा करून कागदावर अगर कॅनव्हासवर त्याचा चेहरा अगर देखावा काढता येतो. त्यामुळे काल्पनिक चित्रेही आता प्रत्यक्ष शेडलाइटचा अभ्यास करून कॅनव्हासवर रेखाटता येतात. म्हणजे आता ध्येयवादी विचाराला प्रात्यक्षिकाचे स्वरूप देता येतं. लांबी, रुंदी, खोली व शेडलाईट दाखवता येते. मनातल्या कल्पनेला सत्यस्वरूप देता येतं. पण साक्षात्कारी चित्रे हा प्रकार और आहे. कल्पना, सत्याचे आधारे स्वप्नातही स्वरूप धारण करू शकते. प्रत्यक्षात ते पडसाद असतात- मग प्रतिभा त्याला आकार देते.

पण या ईश्वरी साक्षात्काराचा, देवाचा व अनुभूतीचा संबंध कलेच्या कक्षेत येऊच शकत नाही. दारुडा अगर गांजखेस बरळला तरी पूर्वी पाहिलेल्या गोष्टीच त्याच्या बरळण्यातून बाहेर पडतात. तो गटारात पडला तरी सिंहासनावर आपण बादशाह आहो असे म्हणाला तरी त्याने नाटकात तसे सिंहासन बघितलेले असते. शिवछत्रपती स्वप्नात आले म्हणा, पण त्याचा आणि साक्षात्काराचा काय संबंध ? साक्षात्कार म्हणजे जागृत अवस्थेतील गंजटपणा, अंमली पदार्थाचा परिणाम.

पण कांबळे व जाधव जोडीने कला प्रांतात भलताच धुडगूस घातला. जाधवांनी त्या चित्राची मिरवणूक काढली. सभा भरवून या चित्राला सरकारने मान्यता द्यावी म्हणून ठराव करून पाठवले. पण सरकारला तसा साक्षात्कार झाला नाही व त्या प्रयत्नात त्यांना अपयश आले.

पण त्यांनी पुन: निराळी टूम काढून असाच साक्षात्कार होऊन त्यांना देवालयाची कल्पना, त्यांचे स्ट्रक्चर, साक्षात्कारातून जाणवले. व लगेच ईश्वरी प्रसादाचे देवालय लाख दीड लाखातून उभारले. अंधश्रद्धेमुळे लोकांनी या बोवाबाजीला खरे मानून पैसा दिला. हिशेब द्यावा लागेल म्हणून कलायोगी कांबळे यांचेकडे हिशेब मागणे पाप ही कल्पना पसरवून टाकली.

हे सारं चाललं आहे, शाहूंच्या समाजक्रांतिकारक कोल्हापूर शहरात म्हणून मी म्हणतो शाहूंचं कोल्हापूर आता पुरोगामी उरलं नाही - ते परत प्रतिगाम्यांच्या तावडीत सापडलं आहे.

**पत्रकार, समाज, सरकार आणि निधर्मी राष्ट्र :**

महाराष्ट्रातल्या पत्रकारांचा प्रयत्न, समाजातील अंधश्रद्धा घालवावी व एकूण बहुजन समाजाला सामाजिक व धार्मिक गुलामगिरीतून मुक्त करावे असा मला दिसत नाही. अपवादात्मक एखादं पत्र आढळलं तर ते अपवादच.

टिळक, फुले, आगरकर, आंबेडकर, गांधी यांची पत्रे आपल्या निश्चित ध्येयाला चिकटून राहणारी व त्यासाठी मरण पत्करणारी होती. लोकक्षोभ आणि लोकप्रियता दोन्हींचाही विचार न करता ध्येयाचे निशाण घेऊनच वाटचाल करीत होती. पोटाचे साधन न मानता ध्येय गाठण्याचे साधन या दृष्टीने साधन म्हणून त्यांनी वापरले. पण भांडवलवाल्यांची साखळी पत्रे व खाजगी मालकीची पत्रे या सर्वांचे धोरण पत्रांचा खप कसा वाढावा याच्याकडेच असते. खाजगी पत्रे अगदी स्वतंत्र बाण्याने, समाजहिताची दृष्टी ठेवून पत्र चालवतात असे नाही तेही यजमान पाहतातच. खाजगी बडा भांडवलदार, कारखानदार, सहकारी संस्थेचा चालक किंवा मंत्री पकडून आणतात आणि वर्गणीदारांची संख्या व खप वाढवण्यासाठी अंधश्रद्धाळू भोळ्या भाविक बहुसंख्य समाजाला आवडेल तेच लिहितात. देवाविरुद्ध मूर्तीपूजेविरुद्ध लिहून त्यांना दुखवत नाहीत. जागृत देवता, साक्षात्कार अशा कल्पनांना पोसतात. क्षेत्रांचं महत्त्व वाढवितात. मग ती पत्रे ब्राह्मणांची असोत, अगर ब्राह्मणेतरांची असोत. जनसंघाची असोत किंवा काँग्रेसची असोत. काँग्रेसची पत्रे वरपांगी जनसंघाची टीका करतील पण जनसंघ

व हिंदुसभा ज्या श्रद्धेच्या आधारे समाजाला अंकित करते त्या श्रद्धा काँग्रेसची तशी ब्राह्मणेतरांची पत्रेही जिवंत ठेवतात.

ब्राह्मणेतरांची बहुतेक पत्रे शाहू, फुले, आंबेडकर या नावांचा तेवढा उपयोग करीत आहे. पण त्यांच्या जीवित ध्येयाचा पुरोगामी धोरणाचा प्रचार करीत नाहीत. सरकारी रेडिओही निधर्मी वातावरण निर्माण करण्याऐवजी सकाळी उठल्यापासून नामगजराला सुरुवात करतो. टाळकुट्यांना प्रोत्साहन देतो. दत्तगुरुला आळवत असतो.

ब्राह्मणेतर पत्र हातात हात घालतात. या विरुद्ध आवाज काढणाऱ्या व्यक्तीला ठेचायला ब्राह्मण तशी ब्राह्मणेतर पत्रे हातात हात घालतात.

तथापि याही परिस्थितीवर मात करणारे मार्गदर्शक जगाला लाभले आहेत. त्या त्या काळी लोकप्रियतेचा विचार न करता आपले नावडते पण पुरोगामी विचार मांडले आहेत.

शाहू, फुले, आंबेडकर यांची खरी परंपरा नष्ट होईल असं मला वाटत नाही.

काळ्याकुट्ट अंधकारातच विजेचा कडकडाट होतो व सारी भूमी हादरुन जाते. पाऊस पडतो, नवे अंकुर फुटतात. देव धर्मात खोट्या, असत्य कल्पनेत जखडलेल्या भारताला सोडवणाऱ्या व्यक्ती कालच निर्माण करू शकेल व भारत खरा निधर्मी होईल व केवळ मानवतेचा पुरस्कार करून जगाला मार्गदर्शक ठरेल.

चीन आणि रशिया काय कमी धार्मिक होते? पोपशाहीने, बोवाबाजीने, सरंजामशाहीने व सावकारशाहीने आवळून टाकले होते. पण आता ते देश यातून मुक्त झाले व जगातील अनेक देशांनी त्यांचे अनुकरण केले. भारताने निधर्मी राज्यघटना मान्य केली हे त्या दिशेनेच चाललेले पाऊल आहे. विचार पुढे गेला. आचार रेंगाळत राहिला आहे. त्याला कालच गती देईल.

●

## माझी सहधर्मचारिणी !

## सौ. रमाबाई माधवराव बागल.

**मी वेडा माणूस !**

माझं जीवन म्हणजे झगडा ! सतत झगडा ! कोणत्याही गोष्टीचं वेड लागलं की, मागे परतून पाहणार नाही ! पुढे काय होईल याचा विचार नाही ! यशापयशाचा विचार नाही.

वेड ! वेडासाठी वेड ! फायद्यासाठी नव्हे ! यशासाठी नव्हे ! वेडातच आनंद ! भवितव्याचा विचार नाही, वेडाच्या धुंदीतच सारं आयुष्य गेलं ! आता ७५ वीत पदार्पण केलं आहे. तरी आजही मी अशा वेडाच्या धुंदीत झगडा देत आहे. स्तुति-निंदेची मला खंत नाही. बेपर्वाईच्या मस्तीत सदा धुंद ! त्यामुळे माझ्या वृद्धपणाचाही मला विसर पडतो !

विवाहाच्या सुरुवातीपासून तो या घडीपर्यंत, माझ्या पूज्य पत्नीने माझ्या प्रत्येक वेडाला साथ दिली ! ती निधनानंतरही. अग्नि विझेपर्यंत ! तिने आपले सर्वस्व मला वाहिले ! सर्वस्वार्पण केले !

माझं वेड कोणाला आवडो न आवडो ! माझे तेच खरे ! माझे तेच बरोबर ! हा अहंभाव जणू माझ्या हाडीमासी मुरलेला ! सारं जग उलटलं तरी फिकीर केली नाही. मग विरोध आईवडिलांचा असो, आप्तांचा असो, गणगोतांचा असो, मित्रांचा असो ! प्रबल सत्तेचा असो.

पण माझ्या पत्नीने मात्र मला कधीही विरोध केला नाही. कधी नाउमेद केले नाही. सतत माझ्या पाठीशी राहिली ! इतरांच्या रोषाची तिने पण पर्वा केली नाही. सतत मला आधार दिला ! उत्तेजन दिले !

वेड ! पण या वेडानेच मला गती दिली ! वेडानेच माझ्यात निर्भयता आणली ! मला स्फूर्ती दिली ! अशक्य वाटणाऱ्या गोष्टी घडवून आणल्या ! माझं

वेड स्वार्थाचं नव्हतं ! माझ्या वेडानं माझा अध:पात केला नाही. ते कसल्या व्यसनाचं नव्हतं ! व्यसन जनसेवेचं. धोक्याचं ! झुंज देण्याचं !

सर्वांनी अविश्वास दाखवला ! पण पत्नीने कधीही पाय मागे ओढले नाहीत. वेड कलेचे असो ! अंधश्रद्धेविरुद्धचे असो ! समाजसुधारणेचे असो ! साहित्याचे असो ! राजकारणाचे असो ! माझ्या मागून सावलीप्रमाणे आली ! ती आपलं स्वतंत्र अस्तित्व विसरली होती ! नव्हतंच तिला स्वतंत्र अस्तित्व ! स्वत:च्या सुखदु:खाचा तिने कधी विचार केला नाही.

आईबापाच्या घरचे संस्कार हेच शिक्षण !

पति हेच दैवत ! !

ज्यावेळी जे वेड लागे त्यात मी भारून जात असे. त्यात मी स्वत:ला विसरून जाई.

निसर्गाचं वेड ! सकाळ, संध्याकाळ, दुपार, निसर्गाच्या विविध भावना न्याहळण्यात व त्या भावनाशी समरस होण्यात मी रंगून जात असे. ब्रह्मपुरीवरच्या हिरवळीवर पडून आकाशात चाललेली मेघांची शर्यत, देवदेवतांच्या चाललेल्या लढाया व विजयानंतर नाचणाऱ्या पताका उधळलेली गुलाल फेक व फडकवलेले झेंडे पाहण्यात मी पृथ्वीवरचं अस्तित्व विसरत असे.

रंकाळ्यावर चाललेल्या लाटावरच्या नृत्यात दंग होई. घरापेक्षा निसर्गाचाच ओढा जास्त. त्याच्या विविध भावनांशी मी खेळत असे. त्याच्या रागालोभात, आनंदात, समाधीत सहभागी होत असे.

सकाळी दिनराजानं पांघरुण फेकून डोळे उघडण्यापूर्वीच मी त्याला शांत जलीं डुबत असतानाच पकडीत असे.

दुपारी त्याच्या रागाच्या तडाख्यात सापडू नये म्हणून, पंचगंगा घाटावरच्या कोणत्या तरी देवालयाच्या गारव्यात बसून त्याचे रागाचे तडाखे चुकवत असे. तर संध्यासमयी त्याने नदीकिनारी फेकलेली रत्ने वेचण्यासाठी धावत असे.

संध्येनंतर आकाशातल्या चांदण्या मोजत झोपी जात असे. मग घरच्या माणसाने हुडकत येऊन मला जागे करावे.

**कलेचे वेड :**

याच निसर्गाच्या वेडाने मला कलेकडे ढकलले. चित्रकला शिकण्याची महत्त्वाकांक्षा निर्माण केली.

याच वेळी माझे लग्न झाले ! १९१४ साल. पण मोह कलेचा ! कलेखेरीज मला काही सुचणार नाही. सकाळ, दुपार, संध्याकाळ कागद, रंग आणि कुंचला घेऊन रानोमाळ हिंडणार ! बायकोचाही विसर पडणार ! पण ती कधी रागावली नाही की नाराजी दाखवली नाही. काढलेली चित्रे आनंदाने पहात बसे. चांगल्या वाईटाची निवड करी.

मी स्कूल ऑफ् आर्टला जाण्याचे ठरवले.

वडील व्यवहारी. हा बिनमिळकतीचा धंदा त्यांना नको होता. त्यांना मी वकील व्हायला हवे होते. म्हणून यापासून मन वळवण्याचा प्रयत्न केला ! मी मुंबईस जाण्याने सर्वात मोठा आघात होणार होता माझ्या पत्नीवर. कारण तिला सोडून ७/८ वर्षे मला मुंबईस रहावे लागणार होते.

पण तिने अडथळा आणला नाही ! या धंद्यात का पडता म्हणून नापसंती दाखविली नाही ! ७/८ वर्षे ऐन तारुण्यात संन्यास पत्करला ! मी त्या धंद्यात नाव मिळवले. त्या मोठेपणाचा वाटा केवळ माझी बायको म्हणून मिळण्यातच समाधान ! आर्थिक दृष्ट्या अपयशी, पण तिने निरुत्साही केले नाही.

मुंबईस गेल्यानंतर ती मला एका पत्रात लिहिते-

'प्रिय पतिराज,

सगळ्यांनी आपणाला टाकलं म्हणून मी तुम्हाला टाकीन असं तुमचं मन तरी तुम्हाला सांगतं का? तुम्ही ऐश्वर्याच्या उच्च शिखरावर असला म्हणजे मात्र मी तुमच्यावर प्रेम करावं आणि दारिद्र्याच्या खोल दरीत लोळत असता मी तुमचा तिटकारा करीन असं तुम्हाला वाटतं कां? तुमची स्थिती कशीही जरी असली तरी तुम्ही जवळ असला म्हणजे माझं सर्वस्व त्यात आहे'.

**सर्वस्वी तुमची,**
**हौशा (रमाबाई)**

या आश्वासनाप्रमाणे ती आजन्म वागली.

हजारो चित्रे काढली, करवीर जनतेला अर्पण केली. पण मोफत का वाटली म्हणून कधी कुरकुर केली नाही. कारण काही हजारांची इस्टेट होती ती.

## हद्दपारीत बरोबर

वडिलांनी काढलेल्या 'हंटर' साप्ताहिकात लिहू लागलो. संस्थानातल्या जनतेवरचे अन्याय चव्हाट्यावर मांडले. राजकीय हक्कांची मागणी केली.

राजरोषात आलो. त्यामुळे सरकारने पत्र बंद पाडले. २०००ची जामीनकी लादली व हद्दपारीची शिक्षा केली.

त्या हद्दपारीतही ती माझ्याबरोबर आली. पुष्कळ अपमान सहन केले! अखेरे वदंड्याला एका मित्रघरी दिवस काढले. जिकडे मी तिकडे ती! माझ्याबरोबर तिनेही वनवास पत्करला!

**पुस्तकासाठी दागिना :**

हद्दपारीत खूप वाचलं व लिहिलं. नंतर घरी परतलो. समाजवादावर पुस्तक प्रसिद्ध करण्याचं मनानं ठरवलं. वडील अनुमती देईनात. पण तिनं आपले दागिने माझ्या स्वाधीन केले. त्या जोरावर पुस्तक छापलं. सरकार पुस्तक जप्त करील म्हणून घाईनं ते गावात मी हिंडून फुकट वाटलं.

तिला दागिना करून घालण्याऐवजी तिनंच आपल्या स्त्रीधनाचा वाटा माझ्या पदरी टाकला! यामुळे 'नव्या पिढीचे राजकारण' हे पुस्तक मी प्रसिद्ध करू शकलो. हे मराठी भाषेतील महाराष्ट्रातील पहिले पुस्तक. श्रेय तिचं! नाव मात्र माझं.

**गोषाविरूद्ध झगडा :**

गोषाची चाल हा मला स्त्रियांवर भयंकर अन्याय वाटे. ती चाल आमच्या अंगी इतकी मुरली होती की तो अन्याय आहे ही भावनाच नष्ट झाली होती. ती चाल मोडण्याचं धैर्य कोणात होत नसे.

मी ती मोडण्याचं ठरवलं. बायकोनं आपली तयारी दाखवली. आमच्या घरातला अन् आमच्या गल्लीतला असा गोषा मोडणारा पहिला मीच. बाहेर पडलो की गल्लीतल्या आयाबाया खिडक्यातून व दारातून डोके बाहेर काढणार, आश्चर्यानं पहात राहणार व कुजबुजणार. पण माझ्या बायकोने त्यांच्या टीकेची केव्हाच पर्वा केली नाही! जे मला आवडे, ते तिला आवडे. जणू मीच तिची विवेचकबुद्धी.

**अस्पृश्याचे खरकटे काढले :**

अस्पृश्याला आम्ही घरी जेवायला घालत असू. पण पंक्तीत बसवून घेण्याची इतरांची तयारी झाली नव्हती. मी त्याला जवळ घेऊन बसलो तर हिने त्याचे खरकटे ताट स्वतः काढून इतरांचा रोष पत्करला. आपल्या धर्मभावना व रुढी माझ्याकडे पाहून गुंडाळून टाकल्या. अखेरपर्यंत हरिजनांना प्रेमाने वाढले. प्रेमाने जवळ केले! समाज वाळीत टाकेल म्हणून भ्याली नाही.

**त्यागाची परिसीमा :**

राजकारणात तर माझ्या पत्नीने दाखवलेले धैर्य, त्याग व सहन केलेले कष्ट हे माझ्या जीवनात अविस्मरणीय झाले आहेत. माझ्यासारख्या छोट्या माणसाच्या पदरी पडली, नाही तर वीर स्त्री म्हणून भारतात झळकली असती.

तिला लिहिता वाचता येत होते. पण ती पदवीधर नव्हती. तरी खरी वीर पत्नी होती. कोणत्याही प्रसंगाला ती डरली नाही.

**मी घर सोडले तिने घर सोडले :**

तिला राजकारण समजत नव्हते. ज्या अन्यायाचा, ज्या गुलामगिरीचा, ज्या हुकुमशाहीचा नाश करणाऱ्या वेडाने मी प्रवृत्त झालो होतो, त्याची तिला बरोबर कल्पना नव्हती.

या वेडामुळे माझ्या पदवीधर भावांच्या नोकरीच्या महत्त्वाकांक्षेला धक्का बसणार होता ! हाडाची काडे करून दारिद्र्यातून स्वकष्टाने डोकं वर काढलेल्या वडिलांच्या इस्टेटीला धोका पोचणार होता. म्हणून ज्यांचे मी पाय धरावेत त्यांनी व इतर कुटुंबियांनी माझा निग्रह बदलावा म्हणून माझे पाय धरले.

पण या सर्वांना वाटणाऱ्या भीतीपासून मुक्त करण्याकरता मीच घर सोडून दूर व्हायचं ठरवले. बाहेर पडलो. माझी पत्नी माझ्या मागोमाग बाहेर पडली. आपलं पुढं कसं होईल याचा तिने निराळा विचार केला नाही !

वडील निवर्तले ! आम्ही भाऊ विभक्त झालो. माझ्या कृत्यामुळे त्यांच्यावर संकट ओढवण्याचं कारण नव्हतं. पण हे संस्थान होतं. माझ्यामुळे त्यांच्या नोकरीला शह हा बसलाच ! दोघेही पदवीधर, त्यांना नोकरी मिळू शकली नाही. पण माझं वेड काही कमी झालं नाही.

**सत्याग्रहाला अनुमती :**

मी व्याख्यानाने जगजागृती करीत होतो. उठाव देत होतो. तेव्हा बोलीप्रमाणे कृती करावी लागणार हे जाणून मी तुरुंगात जाण्यासाठी मनाची तयारी काही महिने करीत होतो. अखेरीस ती तयारी झाली.

माझ्या जातभाईंना, आप्तांना, मित्रांना हे नको होते. काही मित्रांनी दगडावर डोके आपटून घेऊन प्राण देऊ नकोस. यापेक्षा महाराजांकडून तुला हवे ते मागून घे. तुला वाटेल ती जागा मिळेल-असा उपदेश केला.

पण मी वेडा ! हट्टी ! निग्रही !

माझ्यासारखी चार वेडी मंडळी तेवढी माझ्यापाठीशी ! समोर सत्ता अगर

संपत्तीचे कसलेही आमीष नव्हतं. होता तुरुंग आणि फाशी ! फिर्यादी तेच आणि निवाडा करणारे तेच ! पण मी धुंदीत होतो. मला पुढचं काही दिसत नव्हतं ! मरणार ! मी देशासाठी मरणार ! जनतेसाठी मरणार ! मला उन्माद चढला होता मरणाचा !

**माझी कालवाकालव :**

माझा निश्चय झाला होता ! मला परावृत्त कोणालाच करता आलं नसतं ! पण पत्नीच आडवी झाली असती तर ! ! कारण तिला माझ्याशिवाय कोणाचाच आधार नव्हता ! अन् ती अर्भकाची माता होती. म्हणून मला तिची अनुमती हवी होती.

पण हा प्रश्न काढू कसा? या विचारात कित्येक रात्री जागून काढल्या, बायका-मुलांच्या, घरादाराच्या मोहात पडलो तर अशी कार्ये होणार कशी? प्रत्येकाने असेच म्हटले तर ही जबाबदारी स्वीकारणार कोण? हा मोह बाजूस सारल्याशिवाय देशकार्य कसे होणार? विचार करकरून अखेर निर्णयाला आलो.

माझा हा निश्चय तिला बोलून दाखवावा. मी तिच्या सुखावर, संसारावर माझ्याचं हातानं पाणी ओतणार होतो. जनतेवरचा जुलूम निवारण्यासाठी, जिवाची आहुती देण्याची मला घाई झाली होती. तिला सोडून जाताना परत भेटेन याची खात्री नव्हती. संस्थानाबाहेरची राजवट व संस्थानी राजवट यात जमीन-अस्मानाचे अंतर होते.

## राजशाहीतला तुरुंग :

मी तुरुंगात जाणार ! स्वातंत्र्य संपादनापूर्वीचा राजशाहीतला तुरुंग होता तो ! यमाच्या दाढेत स्वखुषीने प्रवेश करणार होतो. त्यागाचा आनंद, आवेग व मस्ती माझ्या अंगात सळसळत होती. संकटांची कल्पना उलट मला उत्तेजित करीत होती !

स्त्रीला घर हेच जग. तिला माझ्या मन:स्थितीची काय कल्पना येणार ! ती हिंदू नवऱ्याची, हिंदू स्त्री ! स्वधर्माची शिकवण तिला परंपरेतून मिळालेली असेल तेवढीच ! नवऱ्याच्या जीवनाशी, त्याच्या सुखदु:खाशी, आशाआकांक्षांशी, संस्कारामुळे एकरूप झालेली. इतर गोष्टी तिला माहीत नव्हत्या.

मी तिला सोडून जाणार होतो. तेही कोणत्या बिकट प्रसंगी? तिला

कोणाचाच आधार नव्हता. माझे वडील निवर्तलेले ! आम्ही विभक्त झालेलो ! भाड्याच्या राजारामपुरीतील घरात ती एकटीच. मी तर उघड उघड राजद्रोही ! माझ्या घराकडे कोणी फिरकत नव्हते ! राजकीय महारोगी म्हणाना !

संस्थानी अंमलात काय होईल कोणी सांगावे ! राजाने कसलाही अत्याचार केला, अन्याय केला तरी दाद कोण घेणार ! सर्वसत्ताधारी ते ! खटला घातला की, न्यायाधीशाला राजाने अगोदरच निकाल कळवायचा व कोर्टाने तो मागाहून जाहीर करावयाचा ! केस चालविणे हा निव्वळ फार्स. अशी अनेक उदाहरणे घडलेली ! ऐकलेली ! तुरुंगात गाडून टाकलेले ! अस्तित्व नष्ट केलेले. मी ऐकलेले वाचलेले ! अशा परिस्थितीत मला कायदेभंग करून तुरुंगात जाण्यासाठी परवानगी देणे ही गोष्ट साधीसुधी नव्हती ! हे खऱ्या वीर-पत्नीखेरीज कोण करू शकणार?

**वीर पत्नी :**

माझ्या मरण्यातही स्वार्थ होता. ध्येयपूर्तीचे समाधान होते. म्हणून **तिच्या त्यागाच्या श्रेष्ठतेला मोल नव्हते.** माझा त्याग तिच्यापुढे फिका अगदी फिका पडतो !

घरात केवळ एकटी ! नुसती एकटी असती तरी त्या त्यागाचे महत्त्व इतक्या दर्जाला पोचले नसते.

**ती माता होती ! तीही अर्भकाची !** ते रांगतही नव्हते. सर्वस्वी पराधीन ! क्षणही मातेला सोडून राहण्याजोगे नव्हते ! माझ्या पत्नीला मी टाकून गेल्यानंतर सांभाळ करणारा कर्तासवरता मुलगा जवळ नव्हता. ते मूल ! सर्वस्वी मातेवर अवलंबून ! मातेचा पदर हाच त्याचा आसरा ! तेच त्याचे घर ! माता हेच त्याचे जीवन !

अशा स्थितीत मी या दोघांना टाकून जाणार होतो. माझ्या महत्त्वाकांक्षेसाठी मी या दोन जीवांना उघडे टाकून जाणार होतो ! हे शौर्य की क्रौर्य ! पण मी निष्ठुर झालो होतो खरा !

**अन्यायाने मला कठोर केलं :**

तसे पाहिले तर मी मनाने निष्ठुर नव्हतो. अत्यंत भावनाप्रधान. एखादी गोष्ट वाचताना कथेच्या प्रवाहात वहात जाऊन, दु:खद प्रसंगाने टिपे गाळीत असे तसे आनंदानेही अश्रू गाळीत असे. निसर्गातील सौंदर्य पाहण्यात गढून जात असे. मानवी सौंदर्य पाहण्यात मला संकोच वाटत नसे. तो मी इतका कठोर

कसा झालो कोण जाणे! जनतेच्या पाहिलेल्या दु:खद कथांनी व त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायांनी मला कठोर केले! माझ्या सुख-दु:खाला मी विसरलो.

**तिचं दिव्य :**

विचाराच्या गर्दीमुळे झोप लागली नाही. एकच विचार! सभाबंदी मोडून मी तुरुंगात जाणार.

रात्रीचे बारा वाजले होते!-

उठून खोलीत फेऱ्या घालू लागलो! म्हटले काय तो एकदा सोक्षमोक्ष करून टाकावा!

मच्छरदाणीत ती व माझा बाळ दौलत झोपला होता. मी तिला उठवले. विचारण्यापूर्वी छाती धडधडत होती. हृदयाची कालवाकालव होत होती. साऱ्या मायामोहाला हृदयात कोंडून विचारले,

'तू एका प्रश्नाचे उत्तर देशील काय?'

'अशावेळी असला कसला प्रश्न? वेळ काळ आहे की नाही?'

'हीच ती वेळ. उत्तर मिळाल्याखेरीज मला झोप लागणार नाही. मनाला स्वास्थ्य लाभणार नाही. वेडा होईन मी!'

'विचारा काय ते. अशी झोप उडून जाण्याजोगी कोणती गोष्ट आहे ती?'

'मी कायदेभंग करून तुरुंगात जायचे ठरवले आहे. माझ्या मनाच्या कोंडवाड्यापेक्षा मला तुरुंग सुखाचा वाटतो.'

'एवढा निश्चय झाला आहे तर मी कशाला आड येऊ.'

'पण तू एकटी आहेस! आणि दौलतला सांभाळायचं आहे!'

'मग आजही मीच सांभाळते आहे त्याला. त्याची नको काळजी.

**तिच्या शपथा :**

'मग घे माझी शपथ. मी खुषीने तुम्हाला तुरुंगात जायची परवानगी देत आहे म्हणून!'

'आणखी काय सांगू! मी तुमच्या इच्छेच्या आड येणार नाही, त्याला शपथच कशाला पाहिजे!'

'हो त्याशिवाय माझी खात्री पटणार नाही.'

'बरे घेते शपथ. जा तुम्ही.'

'माझ्या गळ्यावर हात मार.'

'म्हणजे सांगते ते खोटं का?'

'त्याशिवाय माझं समाधान होणार नाही.'

'बरं तुमची इच्छा ! झालं समाधान?'

'नाही कुंकवावर हात मार.'

'नाही मारणार.'

'मग नाही तुझी तयारी असेच ना?'

'बरे ठीक. मारला कपाळावर हात.'

'मंगळसूत्रावर.'

'बरं घ्या मंगळसूत्रावर'.

'आता एकच राहिलं आहे. पोराच्या गळ्यावर हात मारून सांग माझी तयारी आहे म्हणून.'

'ही काय सत्त्वपरीक्षा चालवलीय माझी ! एवढ्याने सुद्धा खात्री होत नाही. तीही होऊन जाऊ द्या.'

पण ही शपथ घेताना तिला अश्रू आवरणे कठीण झाले ! मलाही अश्रूला आवर घालता येईना. मी शपथ ऐकताच कृतज्ञतेने तिचे पाय धरले. धाडकन् खुर्चीतून कोसळून पडलो. यश मिळालं म्हणून आनंद ! पण इतका निष्ठुर झालो म्हणून खजील झालो !

**मरणाशी तोंड :**

येथून माझ्या राजकीय झगड्याला सुरुवात झाली. कोल्हापूर हे माझे कुटुंब बनले ! त्याच्या सुखदु:खाशी आम्ही एकरूप होऊ लागलो.

शिवाजी पेठेत सभा ठरली होती.

पण ती सभा उधळली जाणार व आम्हावर मारेकरी घातले जाणार, अशी बातमी कानावर आली. अनेक स्नेही घरी धावत आले ! आजच्या सभेला जायचं नाही, असा त्यांनी आग्रह केला. जवळच्या काहींनी रडून गोंधळ केला.

मी म्हटले, 'असे प्रसंग हे आता यायचेच ! याला भिऊन सभा थांबवून कसे चालेल?'

माझी बायको म्हणाली, 'चला मी पण येते. आता भिऊन कसे चालेल. व्हायचे ते होऊ द्या !'

बलिष्ट सत्ताधाऱ्याने अंधारात राहून माणसांना अंगावर घातले ! त्यात माझा सहकारी झवेरी जखमी झाला. बलिष्ठाच्या मारेकऱ्यांनाही दवाखान्यात जावे लागले.

माझी पत्नी अशा अनेक प्रसंगी प्रत्यक्ष भागीदार झाली ! अनेक सभात मजबरोबर येत असे. धमकीच्या तशा गौरवाच्या !

मला पकडण्यासाठी पोलीस व्हॅन आली. कधी डगमगणार नाही. घाबरणार नाही. शांतपणाने निरोप देणार.

**सत्याग्रहाला निघालो :**

मला ओवाळणार. कुंकुमतिलक लावणार. गळ्यात हार घालून माझे पाय धरणार ! बेड्यासकटचा भेसूर अवतार पाहिला, चेहरा बदलला नाही, डोळ्यात टिपूस आणलं नाही. ती खरी वीरपत्नी होती.

खरी सहधर्मचारिणी होती ! !

**जयजयकार माझा, त्याग तिचा :**

तिच्या या त्यागावर मी अनेकवेळा तुरुंगाच्या यात्रा केल्या. याच माझ्या पत्नीच्या त्यागावर माझं राजकीय जीवन उभारले. लोकप्रियतेच्या उंच लाटेवर तरंगू लागलो. पण त्या लाटेच्याखाली तिची तपश्चर्या होती. ती जगाआड राहिली. मी लोकांसमोर पुढारी म्हणून मिरवू लागलो. तिने दाखवलेल्या धैर्यापुढे माझे सारे तुरुंगवास मला फिक्के वाटतात. लोकप्रियतेचे विलोभनीय अलंकार पत्नीच्या त्यागामुळे माझ्या गळ्यात पडले. मी काही काळ करवीर जनतेच्या हृदयसिंहासनावर डोलू लागलो. सर्वत्र जयजयकार होऊ लागला ! पण सारे श्रेय माझ्या पत्नीचे. या अनभिषिक्त राज्यपदावर मला तिने नेऊन बसवले.

**माझी माता :**

**पत्नी पत्नी नव्हे :**

एवढे कष्ट ज्या माझ्या पत्नीने-माझी महत्त्वाकांक्षा पुरी करण्यासाठी सहन केले, तिने माझे अनंत अपराध, माझ्या लहरी, माझे दुर्गुण, मातेच्या औदार्याने पोटात घेतले. माझ्या गैरहजेरीत सारा प्रपंच सांभाळला. पोराला जगवले. काटकसर करून अब्रूने व अभिमानाने दिवस काढले. दारिद्र्याची झळ लागू दिली नाही. अनेकवेळा तुरुंगात गेलो. पुरे असं आता म्हटलं नाही.

तिला कसलेही ऐश्वर्य भोगता आले नाही. तिला एखादा दागिना करून कधी घातला नाही. लुगडेही खरेदी केले नाही. पोरासाठी दमडी शिल्लक ठेवली नाही. मोटार घेता आली नाही, बंगले उठवता आले नाहीत. मालकीच्या घरात राहता आलं नाही. पै शिल्लक ठेवता आली नाही.

**माझ्या ध्येयपूर्तीसाठी ती विवाहित असून संन्यासिनी राहिली !**

आम्ही बैरागी बनलो !

तिने प्रपंच केला खरा पण जगाचा केला ! !

ती माझी पत्नी !

नव्हे माझी परमपूज्य पुण्यशील माता ! साध्वी !

जिने सर्व आयुष्यभर प्रेमाने, जिव्हाळ्याने, माझा संभाळ केला. माझ्या सर्व दोषांवर, खोडीवर, अपराधावर प्रेमाची पाखर घातली. माझ्या मित्रानांही आपलं मानलं. खाऊ घातलं.

तिच्या निश्चयावर, त्यागावर व कष्टावर माझ्या महत्त्वाकांक्षेची इमारत मी डौलाने उभी केली. सर्व संकटाशी तोंड दिले. प्रत्यक्ष मरणाला आव्हान दिले ! मरणाशी टक्कर दिली !

गरीबीतही त्यागाचं सुख भोगलं. सत्ता, संपत्ती व ऐश्वर्याच्या मोहात पडलो नाही. त्याबद्दल तिला कधीही दु:ख झालं नाही.

अर्भक जवळ नसतं तर माझ्याबरोबर तुरुंगाच्या वाऱ्या आनंदानं केल्या असत्या.

**ती माझी साध्वी माता :**

ता. १३ मे १९६९ला कर्तव्यपूर्तीच्या समाधानात निघून गेली. मुलगा दौलत, सून कमल, सुचा, उल्का, सतीश, शिवराय या नातवंडांना डोळेभर पाहून तिनं जगाचा निरोप घेतला. डनिंग हॉस्पिटलमध्ये डॉक्टरांनी व नर्सेसनी पराकाष्ठा केली.

तिचा भाऊ त्र्यंबक, मुलगा दौलत, सून कमल, दौलतचे जिवलग स्नेही, वालावलकर, सावकार व सुरेश भुर्के यांनी झोप टाकून सेवा केली. गुरुदास नागेशकर व त्यांची पत्नी बडी मां बसून राहिल्या होत्या. तिनं जोडलेल्या आयाबायांची रीघ लागली होती.

**लोहियांचा आधार :**

माझे परममित्र पूज्य मित्र मदनमोहन लोहियांनी तर खऱ्या नि:स्वार्थी पवित्र मैत्रीचं दर्शन घडवलं !

सौभाग्यवतीसाठी डनिंगच्या दवाखान्यातील उत्कृष्ट जागा मिळवून दिली. डॉ. बिद्रीना खास काळजी घेण्याची विनंती केली. खर्चाचा सर्व बोजा अंगावर घेतला. तो मला निभण्याजोगा नव्हता. सर्व आधुनिक सोयी व साधने

उपलब्ध करून दिली. सेवेसाठी आपली दोन माणसे, एक पुरुष व एक स्त्री कायमची ठेवून दिली. पन्हाळ्यावरचा मुक्काम हलवून कोल्हापुरात येऊन राहिले. हजार खेपा घातल्या. कमी जास्ती ताबडतोब कळावं म्हणून उशाखाली फोन ठेवून झोपले. अखेर अखेरच्या दिवशी दोन मोटरी रात्रंदिवस ठेवून दिल्या. रोग हटेना तेव्हां मी म्हटलं,

**'साहेब, असा खर्च किती दिवस चालवणार?'**

**'जिवंत असेपर्यंत.'**

**हे शब्द माणसाचे नव्हते! ते जिवंत परमेश्वराचे होते! अशा ठिकाणीच परमेश्वराचं दर्शन घडतं! त्या स्वरूपाला सहस्र प्रणाम!**

पण माझी पत्नी! साध्वी! देवी! माता.

विवाहित संन्यासिनी! आम्हाला टाकून निघून गेली!

**प्रेमाचा वर्षाव :**

ती गेल्यानंतर असंख्य लोकांनी घरी गर्दी केली.

नेण्याची इतकी घाई का केली म्हणून रागावले! शाहू मिलच्या शेकडो आयाबाया धाय मोकलून रडू लागल्या. तिनं जोडलेल्या गल्लीतल्या बायका, जिव्हाळा तुटला म्हणून आसवे गाळू लागल्या.

शहरातून, जिल्ह्यातून, महाराष्ट्रातून व दिल्लीतून तारा, पत्रे, संदेश यांची रीघ लागली.

**निधनानंतरही महत्त्वाकांक्षा पुरी केली :**

तिने जिवंत असताना माझ्या सर्व महत्त्वाकांक्षा पुऱ्या करण्यासाठी सर्वस्वार्पण केलेच, पण गेल्यानंतरही माझी अखेरची इच्छा पुरी केली.

तिला पोचवून घरी आलो. सकाळी ८ला दहनविधी पुरा झाला. उरकून घरी पोचलो व ता. १३ मेला ११ वाजता बुलढाण्याहून पत्र आलं. तुमच्या पुस्तकांच्या ५००० प्रती छापून आम्ही कार्यकर्त्यांनी फुकट वाटण्याचं ठरवलं आहे म्हणून.

त्यावेळी अग्नी विझलाही नव्हता.

ज्यांनी त्यांनी सौभाग्यवतीच्या निधनानंतर सांत्वनपर संदेश पाठवले, भेटी दिल्या, पत्रांनी अग्रलेख व स्फुटे लिहिली त्यांना सहस्र प्रणाम-

*-(माझी सहधर्मचारिणी)*

## माझे आवडते पुढारी
## यशवंतरावजी व बाळासाहेब

श्री. यशवंतराव चव्हाण व श्री. बाळासाहेब देसाई या दोन नेत्यांचा जन्म मार्च महिन्यात पडतो. हे दोन्ही पुढारी जन्मले पण एकाच जिल्ह्यात. दोघेही वाढले गरिबीत. बाळपणचे संस्कार त्यांचेवर घडले खेड्यात. उच्च शिक्षणाचे संस्कार दोघावर झाले. कोल्हापुरात-शाहू छत्रपतींच्या राज्यात. त्या वातावरणाचे पडसाद दोघांच्या मनावर, विचारावर व ध्येयावर झाले असल्यास नवल काय.

या दोघा पुढाऱ्यांबद्दल कोल्हापूरला साहजिकच आपुलकी वाटते-इतिहासानेही तो धागा बांधला गेला आहे. सातारा आणि कोल्हापूर दोन्हीही गाद्या छत्रपतींच्या, इतिहासाने, राजकारणाने व रक्तसंबंधाने; तसेच दोन्ही जिल्ह्यातला समाजही परस्पराशी बांधलेला. भौगोलिक दृष्ट्या दोन्ही जिल्ह्याच्या सरहद्दी एकमेकाशी भिडलेल्या. म्हणूनच एका व्यक्तीची आठवण झाली की दुसरी व्यक्ती माझ्यासमोर उभी राहते. स्वतंत्रपणे एक व्यक्ती माझ्यासमोर उभीच राहू शकत नाही. बाळासाहेबांची आठवण झाली म्हणजे माझ्या डोळ्यासमोर यशवंतरावजी उभे राहतात, यशवंतरावजींची आठवण झाली म्हणजे बाळासाहेब डोळ्यासमोर उभे राहतात. निदान माझ्या बाबतीत तरी हे असं होतं खरं. ही जोडी मला अभिन्न वाटते.

एक आज मुंबईत आहेत तर दुसरे दिल्लीत आहेत. पण आठवण होताच हे अंतर क्षणार्धात नाहीसं होतं. माझ्या घरीही याच भावनेमुळे व प्रेमामुळे दोघांची पेंटिंग्ज् भिंतीवर सुद्धा जवळ-जवळ लावली आहेत. एकाचंच पेंटिंग लावलं असतं तर दुसऱ्यावर अन्याय केला असं वाटलं असतं. आणि मनाला टोचणी लागली असती.

**भिन्न स्वभाव पण परस्परपूरक-**

दोघांचा स्वभाव एक आहे असं मात्र नव्हे. भिन्न स्वभाव असले तरी ते एकमेकाला पूरक आहेत. परस्परांचे हितचिंतक आहेत. जिवाभावाचे मित्र आहेत. बाळासाहेब यशवंतरावना आपले नेते समजतात, यशवंतराव बाळासाहेबांना आपले ज्येष्ठ बंधु समजतात. प्रत्येक दुसऱ्याला मानतो, दुसऱ्याबद्दल आदराने बोलतो. आपला पाठीराखा समजतो. यातच दोघांचा थोरपणा आहे. या दोन व्यक्तींच्या संयोगात महाराष्ट्राची शक्ती सामावलेली

आहे अशी माझी भावना आहे. हे ऐक्य दुभंगले तर भावी ऐक्याची मनोमय मूर्ती दुभंगल्यासारखं वाटेल. दोघांच्या गुणांच्या, प्रेमाच्या व कर्तृत्वाच्या मीलनात महाराष्ट्राचं भवितव्य गोवलेलं आहे.

**नम्रता-**

क्षुद्र माणसं मोठ्या जागेवर चढली की मनानं अधिकच क्षुद्र बनतात. संपत्तीचा साठा त्यांना अधिकच दरिद्री बनवतो. सत्तेनं त्यांची माणुसकी नष्ट होते.

पण बाळासाहेब आणि यशवंतराव यांची माणुसकी नम्रतेनं मला अधिक उठून दिसते. तसा मला तरी अनुभव आलेला आहे.

खरे थोर अधिकारावर जातील तसे नम्र होतात. माझ्या पासष्टाव्या वाढदिवशी यशवंतरावजी हजर होते. मी म्हटलं 'यशवंतरावजींना मी मित्र कसं म्हणूं? ते इतके मोठे आहेत की बरोबरीच्या नात्यानं बोलणं मला शोभणार नाही.' त्यावर यशवंतराव म्हणतात, 'मी माधवरावांच्या बरोबरीचा नाही असं माधवराव म्हणतात ते खोटं नाही कारण ते गुरुस्थानी आहेत. मी माधवरावजींना फार पूर्वीपासून ओळखत आहे.' उलट मी विसरल्या गोष्टीचीच त्यांनी मला आठवण करून दिली.

**पूर्वीचा द्वेष्टा-**

खरं म्हणजे यशवंतरावजींनी माझ्याबद्दल चांगले उद्गार काढण्याचं काहीच कारण नव्हतं. कारण संयुक्त महाराष्ट्र चळवळीवेळी माझ्याएवढी प्रखर टीका फार थोड्यांनी केली असेल. त्या टीकेला प्रसिद्धीही प्रमाणापेक्षा जास्त मिळाली होती. टीकेवेळी माझा तोल सुटला नव्हता असं मला म्हणता येणार नाही. पण हे सर्व विसरून माझ्याबद्दल आदरानंच उल्लेख करावा याला काय म्हणावं! याला म्हणावं यशवंतराव! इतरांना ते नाही साधणार.

**याला म्हणावं यशवंतराव-**

यशवंतरावजींचा कोणी अपमान केला तर ते रागावल्याचं दाखवणार नाहीत. त्यांना कोणी टाकून बोलले तर प्रत्युत्तर देणार नाहीत. आवाज चढवणार नाहीत. उलट तितक्याच सौजन्याने त्याला निरोप देतील. जाताना पाठीवर हात मारतील. बरोबरचा असल्यास उठून नमस्कार करतील. तोच माणूस कटु बोलीबद्दल आणि वागणुकीबद्दल पस्तावेल. शत्रूला मित्र करण्याची कला अजब आहे यशवंतरावजींची. त्यांच्या भेटीला जाणाऱ्याला उच्च संस्कृतीचा अनुभव येईल.

यशवंतरावजींचे हे सौजन्य, हा संयम कमावलेला आहे असं आलेल्या अनुभवानंतर मला मुळीच वाटत नाही. सदा सर्वकाळ असं नाटक माणसाला करता येत नाही.

सौजन्य, सभ्यता आणि नम्रता हा यशवंतरावजींचा मूळ स्वभाव आहे.

**मी डोळ्यानं पाहिलेली गोष्ट-**

कोल्हापूरचे काही लक्षाधीश कारखानदार, पत्रकार आणि पदवीधर अशी मंडळी यशवंतरावजींना भेटायला कराडला गेली होती. त्यांच्याबरोबर, सत्ता, संपत्ती, अधिकार, किंवा विद्वता नसलेला एक वयोवृद्ध सामान्य नागरिकही गेला होता. त्याच्याबरोबर भांडवल होतं फक्त वयाचं आणि अल्पशा सेवेचं! त्याला पाहताच यशवंतराव, मध्ये ठेवलेल्या आरामखुर्चीतून उठले व त्या वृद्धाला त्यांनी आपल्या खुर्चीवर बसवून स्वत: इतरांसाठी बाजूस रांगेने ठेवलेल्या एका खुर्चीवर जाऊन बसले. तो ओशाळला. म्हणाला 'यशवंतरावजी हे काय?' ते म्हणतात 'मी त्या खुर्चीवर बराच वेळ बसल्यामुळे आखडलो होतो. बसा आपण.' माझ्या मनावर यशवंतरावजींची जी पकड बसली ती केवळ मंत्रिपदामुळे नव्हे तर अशा छोट्या गोष्टीत आढळलेल्या मोठेपणामुळे. खरा माणूस यातूनच प्रकर्षाने जाणवतो.

तसंच मित्राच्या व्यावहारिक दर्जापेक्षा ते प्रेमाला आणि सेवेला महत्त्व देतात.

कसल्याशा गडबडीत ते कोल्हापूरला आले होते. सारा वेळ असेल तासाभराचा. त्यातून त्यांनी पंधरा वीस मिनिटांचा वेळ काढला आणि कोणालाही न कळवता ते सरळ त्यांच्यावर निस्सीम प्रेम करणाऱ्या एका सामान्य गृहस्थाच्या घरी त्याला न कळवता दत्त म्हणून उभे राहिले. सर्वसामान्य जनतेत जे अनेक भक्त यशवंतरावजींनी पैदा केले आहेत ते अशाच गुणामुळे.

**माझी स्वत:चीच गोष्ट-**

निपाणीचे देवचंद शहा यांच्या वाढदिवस समारंभाला यशवंतराव हजर राहणार होते. माझं स्वत:चं जाण्याचं काही निश्चित ठरलं नव्हतं. यशवंतरावना भेटावं असं मनात मात्र वाटत होतं. पण मी तशी इच्छा प्रदर्शित करण्यापूर्वीच त्यांनी कोल्हापुरच्या एका अधिकाऱ्याला मला निपाणीस घेऊन येण्याबद्दल सांगितले होते. व समारंभ झाल्यानंतर मला निराळं बोलवून घेऊन माझ्या घरची विचारपूस केली. या अशा अनेक वागणुकीमुळं यशवंतरावांच्या जिव्हाळयाची,

अगत्याची आणि खऱ्या मोठेपणाची प्रचीती पटू शकली.

एखाद्या सभेत जुन्या ओळखीचा एखादा शेतकरी किंवा तुरुंगात भेटलेला सहप्रवासी दिसला की त्याला आपली ओळख देऊन, प्रसंगाची आठवण देऊन बोलावतील. प्रेमाचे शब्द बोलतील. घरची विचारपूस करतील.

**जणू दुसरे शाहू महाराजच-**

सुष्टांना तसं दुष्टांना जवळ करून समाजसेवेला जुंपण्याचं कौशल्य यशवंतरावांखेरीज इतरात आढळणार नाही. या गुणांचं कौतुक करणारे तसे टीका करणारे, चांगले तसे वाईट आरोप करणारे पुष्कळ आढळतील पण या स्तुतिनिंदेचा यशवंतरावजींच्यावर काही परिणाम होणार नाही. ते विनोबाजींच्यापुढे नतमस्तक होतील तर अट्टल कारस्थानी समाजकंटकाच्या खांद्यावर हात टाकून जवळ बसवून घेतील आणि त्याची जाहीर स्तुती करून लोकांना अचंब्यात पाडतील. पण त्या व्यक्तीला अंकित करून त्याची विषारी नांगी फोलार हाताने मोडून टाकतील. यशवंतराव चांगले संघटक आहेत. ते प्रेमाच्या धाग्यात सर्व जातीची फुले, अनंताची, बकुळीची, गुलाबाची, चाफ्याची तशी धोत्रीची अन् घाणेरीची, सर्वांना बोचणारे सराटे आटि कुचकुल्या फोलार हाताने गोवून घेतात. साहजिकच त्यांचे अंगावर कोमल फुलांच्या पाकळ्या पडणार तसे काटे बोचणार पण हे सारं झेलून नेण्याची ताकद यशवंतरावजींच्यात आहे. सुष्टांना तसं दुष्टांना जवळ करून समाजसेवेला जुंपण्याचं कौशल्य यशवंतरावजींच्यात आहे. तसं इतरात आढळणार नाही.

यशवंतराव कोणाचे हे कोणाला अजमावता येणार नाही. ज्याला त्याला वाटावं यशवंतराव आपले. आणि या जाणिवेने त्याने विरोधी इसमाकडे टरकावून पहावे. यशवंतरावावर उधड लाखोली वाहणाऱ्या व बदनाम करणाऱ्या व्यक्तीला (मी एकेकाळी त्यापैकीच एक होतो) मानाने व आदराने वागवून सर्वांना चकित करून सोडतील.

मी त्यांच्या भेटीला 'सह्याद्री' बंगल्यावर गेलो होतो. माझ्याशी बोलणं झाल्यानंतर मला दारापर्यंत पोचवत आले व पोचवण्यासाठी स्वत:ची मोटर दिली. आणि तीत बसून 'माधवराव' पोलीसांचे सॅल्यूट घेत आपल्या जागी पोचले!

ज्याने एकेकाळी यशवंतरावजींच्यावर टीकेचा गहजब उडवला होता आणि तो सर्व पत्रातून आला होता तो माधवराव या वागणुकीने शरमल्याशिवाय कसा राहील.

ही त्यांची वागणूक संताला शोभण्याजोगी आहे, तशी खऱ्या मुत्सद्यालाही शोभण्याजोगी आहे. त्याचा अर्थ कोणी कसाही काढा. त्या त्या माणसाच्या स्वभावाप्रमाणे व प्रवृत्तीप्रमाणे त्याने अर्थ काढीत बसावा.

शत्रूप्रमाणे एकमेकाशी वागणाऱ्या व्यक्तींनी 'तू कशाला घमेंड मारतोस, यशवंतराव माझे आहेत.' असं म्हणावं.

पण यशवंतरावांना मी कह्यात ठेवलं आहे असं म्हणण्याची छाती मात्र कोणाची होणार नाही. ते कोणालाही स्वत:च्या डोक्यावर चढवून घेणार नाहीत. तेवढं अंतर ते ठेवतील. चढतो आहे असं वाटल्यास त्याला सपशेल पालथा पाडतील.

**संयम आणि निर्धार-**

त्यांचा संयम दांडगा आहे. कोणत्याही परिस्थितीत ते विचलित होत नाहीत. डोंगर कोसळला तरी त्यांची शांती ढळणार नाही. त्यांनी बांधलेल्या आराखड्याप्रमाणे पाऊल टाकणार. त्यांची दृष्टी पल्लेदार आहे. यशापयशाची तमा न बाळगता निर्धाराने ध्येयाचा मार्ग चोखाळणार-

संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर त्यांच्या या गुणांची पुरेपूर कसोटी लागली. असंख्यांनी झिडकारलेली, शत्रू म्हणून लेखलेली, ही व्यक्ती लोकप्रियतेच्या शिखरावर आरूढ होऊन बसली आहे. हा चमत्कार यशवंतरावजीच करू जाणे. काही मत्सरी, अविचारी आणि कुत्सित मनाचे त्यांचावर हुकुमशाहीचा आरोप करतात! हुकुमशहा आपली इच्छा लोकांवर सक्तीने लादतो. यशवंतराव लोकशाहीच्या मार्गाने आपली इच्छा लोकांकडून मान्य करून घेतात. पक्षाची बैठक असो अगर एखादी सभा असो, दुसऱ्याला प्रथम न आवडणारे व न पटणारे विचार त्याच्या गळी उतरवून त्याच्याचकडून पास करून घेणार! यशवंतरावजींची बुद्धिमत्ता, कौशल्य व व्यक्तिमत्त्वाची छाप व्यक्तीवर तसंच बैठकीवर व समाजावर इतकी पडते की त्यांच्याविरुद्ध आवाज उठवण्याची ताकद कोणाच्यात उरत नाही. मागे कुरकुरतील समोर गोगलगाय बनतील; आणि मनातून चरफडत पुन: त्यांच्याच विचाराचा पुरस्कार करतील. अनेकांना वाटतं यशवंतराव हुकुमशहासारखे वागतात पण असं म्हणणाऱ्या विरोधकाचं स्वातंत्र्य त्यांनी हिरावून घेतल्याचा अनुभव नाही. दुर्बलांनी मागे त्यांना हुकुमशहा म्हणण्यात काय पुरुषार्थ आणि काय अर्थ!

### वैचारिक बैठक-

त्यांची वैचारिक बैठक ठाम आहे. ती केवळ पुस्तकी नाही. ते केवळ पढीक नाहीत. खालच्या समाजात जन्म झाल्यामुळे व गरिबीची झळ लागल्यामुळे साहजिकच त्यांचा ओढा खालच्या वर्गाकडे आहे. फुले, शाहू महाराज यांच्या विचाराचा परिणाम कोल्हापूरच्या वातावरणामुळे त्यांच्यावर झाला आहे. मार्क्सवादाच्या अभ्यासाशिवाय रॉयिस्ट होऊ शकत नाही. त्या विचाराला गांधीवादाचा मुलामा चढला आहे. आणि या चाळणीतूनच आज लोकशाही समाजवादावर ते येऊन ठेपले आहेत. सरंजामदारशाहीचे ते द्वेष्टे आहेत. काहींची ध्येयशून्य संग्राहक वृत्ती पाहून मी वैतागलो होतो. आणि त्यांना एकदा संतापाने लिहिले की 'यशवंतरावजी, माझा जन्म राजशाहीशी आणि सरंजामशाहीशी झगडण्यात गेला. त्यासाठी जीवही धोक्यात घातला आणि आता लोकशाहीच्या मार्गाने हाच वर्ग जर काँग्रेसमध्ये आसनावर बसू लागला तर मला फार दु:ख होईल-' त्यावेळी त्यांनी मला लिहिले होते 'माधवराव, तुमच्या विचाराशी मी सहमत आहे, तसं होणार नाही याची आम्ही खबरदारी घेऊ. एकटे यशवंतराव याला आळा घालतील असं नाही. त्या त्या जिल्ह्यात इनामदार सरंजामदार वडिलार्जित वजन व पैसा, वशीला या साधनाने कार्यकर्त्यांवर वजन पाडून जबाबदारीच्या जागा अद्याप पटकावून सामान्य कार्यकर्त्यांना मागे रेटत असतातच! जाणते पुढारीही यांच्या वजनाला बळी पडतात. पण यशवंतरावांची निष्ठा स्वच्छ आहे. अन् तसा पडताळाही अनेक वेळा मला पटला आहे.

### शुद्ध चारित्र्याचा मित्र आणि सखा-

यशवंतरावांच्यासारखा शुद्ध चारित्र्याचा माणूस लाखात मिळणार नाही. कट्टर शत्रूलाही त्यांच्यावर शीलभ्रष्टतेचा आरोप करता येणार नाही. तशी कुजबुजही ऐकायला मिळणार नाही. त्यांचे सौजन्य आणि शुद्धपणा हे ढोंग नव्हे.

अनेक छोट्या छोट्या प्रसंगातून, वागणुकीतून व उद्‌गारातून त्यांच्या हृदयाचा मोठेपणा मला दिसून आला आहे. त्यांच्या काही वाक्यांनी माझ्या हृदयात कायमची जागा पकडून ठेवली आहे. अशा वेळी यशवंतराव मुत्सद्दी आहेत, मंत्रिपदावर आहेत, राजकीय पुढारी आहेत याचा विसर पडून यशवंतराव म्हणजे प्रेमळ हृदयाचा सखा म्हणून पुढे उभे राहतात. असे यशवंतराव मी पाहिले आहेत. अशा वेळी मी माझा संकोचाचा पडदा टाकून

माझी सुखदु:खे बोलू शकलो व संपूर्ण विश्वासाने ह्रदयातले विचार मोकळ्या मनाने मांडू शकलो.

असेच लिहिलेलं पत्र त्यांनी वाचून परत माझ्या हाती दिलं. त्या पत्रामुळे माझ्या मनात कसलीही दुगदुग राहू नये म्हणून ते पत्र तसंच त्यांनी परत माझ्या हाती दिलं. ही वागणूक मुत्सद्देगिरीत कशी बरं बसेल. मंत्री म्हणून, पुढारी म्हणून ध्येयनिष्ठ म्हणून यशवंतराव मोठे आहेतच पण सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे माणूस म्हणूनही ते फार मोठे आहेत.

**अपयश माहीत नाही-**

हे सर्व गुण अंगी आहेत म्हणूनच यशवंतराव यशाच्या पायऱ्या सारख्या चढत आहेत. यशवंतरावांना अपयश माहीत नाही. त्यांची चाल कासवासारखी आहे. पण निश्चित यशाकडे नेणारी आहे. लोकप्रियतेत चढउतार सहन करावा लागला पण राजकीय सत्तेच्या प्रांतात ते सतत चढतच गेले. इमानी, एकनिष्ठ अनुयायी पुढे नेता कसा होऊ शकतो ते त्यांनी सिद्ध केले आहे. ते नेहरूंशी सतत इमानी व एकनिष्ठ राहिले ते स्वत:च्या स्वार्थापायी नव्हे. देशाचं भलं नेहरूच करतील या विश्वासावरच; स्वार्थासाठी, खोट्या लोकप्रियतेसाठी त्यांनी महाराष्ट्राशी प्रतारणा केली नाही. आपल्या नेत्याची आज्ञा प्रथम शिरसावंद्य मानली आणि नम्रता स्वीकारून त्यांच मन वळवलं. विरोधी पक्षाची कामगिरी आत राहून बजावली.

यशवंतराव आता अखिल भारतीय व्यक्ती होऊन बसली आहे. त्यांना आता जागतिक महत्त्व प्राप्त झालं आहे. भारताच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांनी आपल्या शिरावर घेतली आहे. महाराष्ट्राची शान वाढवली आहे. शिवछत्रपतींची परंपरा पुढं चालविली आहे. आपल्या सौजन्यानं, संयमानं अन् अभ्यासू मोजक्या वक्तृत्वानं तेथील मुत्सद्यांवरही छाप पाडली आहे. आपलं वजन वाढवलं आहे. आणि हे करून महाराष्ट्राच्या मंत्रिमंडळाचं मार्गदर्शन करीत आहेत. जिल्ह्या-जिल्ह्यातील बारीक सारीक गोष्टीकडं लक्ष देत आहेत. महाराष्ट्रीय मंत्रिमंडळे आणि प्रांतिक काँग्रेस त्यांना आपला नेता म्हणून मानीत आहे. यशवंतराव मंत्री झाले नसते, राजकारणात शिरले नसते तर चांगले साहित्यिक म्हणून प्रसिद्धीस आले असते. त्यांना वाचनाची आवड आहे. त्यांचा स्वत:चा ग्रंथसंग्रह दांडगा आहे. त्याही विषयात ते अधिकारवाणीने बोलू शकतात.

**अन् आमचे बाळासाहेब**

यांचा साचा यशवंतरावजींच्याहून निराळा, स्वभावाची घडण निराळी, वागण्याची पद्धत निराळी, व्यक्तिमत्त्व निराळं. ते प्रेमळ आहेत तसे ताठर आहेत. गहिवरून येतात तसे भडकून जातात. मित्राना मायेचं पांघरुण घालतात तर दुष्टांच्या छातीत धडकी भरवतात. कृतघ्नांना जवळ उभा राहू देत नाहीत. मेणाहून मऊ तसे वज्राहून कठोर आहेत. त्यांचा स्वभाव म्हणजे स्वच्छ आरसा! कोणाबद्दल काय मत आहे त्याच्या प्रतिबिंब त्याच चेहऱ्यात आणि वागण्यात पाहून घ्यावं. तेथे छपवाछपवी नाही. लढवय्या क्षत्रियाचा बाणा.

**गरिबीला विसरत नाहीत-**

ते आपल्या गरिबीला विसरले नाहीत-उपकारकर्त्याला विसरले नाहीत. त्या गरिबीची त्यांना लाज वाटत नाही. उपकार मानायला कमीपणा वाटत नाही. त्यांना दिलेल्या मेजवानीला मी गेलो होतो. जेवण आटोपल्यावर ते विनोदानं म्हणाले, 'मी विद्यार्थीदशेत वारावर जेवलो अन् आता मंत्री झाल्यावरही वारावरच जेवतो आहे.' विनोदापेक्षा त्यात जाणीव आहे बालपणच्या गरिबीची. ते ती विसरू शकत नाहीत.

ही जाणीव सतत होती, प्रिन्स शिवाजी बोर्डिंगमध्ये गरीब विद्यार्थी म्हणून आपल्याला दिवस काढावे लागले, माझ्यासारख्या अनेक गरीब विद्यार्थ्यांना दारुण अवस्थेतून जावं लागलं ही जाणीव मंत्रिपदावर आल्यानंतर जिवंत होती म्हणून गरीब विद्यार्थ्यांची ती अडचण त्यांनी दूर केली. बाराशे खालच्या उत्पन्नवाल्यांना फी माफ करून टाकली ही एकच गोष्ट बाळासाहेबांना चिरंजीव करणारी ठरली आहे. या थोर कृत्यामुळं बाळासाहेब खेडुतांचं दैवत होऊन बसलं आहे.

**उपकार विसरत नाहीत-**

क्षुल्लक उपकारसुद्धा ते विसरू शकत नाहीत. ते म्हणाले, 'माधवराव, तुमच्या वडिलांनी मला मदत केली आहे.' हे सांगायचं काय कारण होतं? आम्हाला त्याची मुळीच कल्पना नसता आठवण करून देण्याचं काय कारण होतं बाळासाहेबांना? एवढ्याशा गोष्टीचं एवढं मोठं करून सांगायचं काय कारण होतं?

पण उपकार कितीही क्षुल्लक असोत त्याचा विसर त्यांना पडत नाही. हा नम्रता हा त्यांचा खरा मोठेपणा होय.

शिकलेली पोरं बापाला चार मंडळीत बाप म्हणायला लाजतात हे मी पाहिलं आहे.

पाटणच्या सत्कारावेळी-आईबाप नसताना तुम्हीच मला कटिखांद्यावरून खेळवले असं म्हणून बाळासाहेब घळा घळा अश्रू गाळू लागले! त्यांना सारे खेडुत आईवडिलांच्या रूपात दिसू लागले-बहुजनसमाज त्यांना दैवत वाटतं ते याचमुळं.

**गरिबांचे कैवारी-**

कोल्हापूर जिल्ह्यात एका गावच्या वीज उद्‌घाटन सभारंभाला मी बाळासाहेबांच्या बरोबर होतो. मोटरीत कोयनेचे एक इंजीनियर होते. बाळासाहेब त्यांच्याकडून माहिती घेत होते. बाळासाहेब म्हणाले, 'कोयनेच्या विजेचा फायदा गरिबांना मिळाला पाहिजे. तसं त्याला कळेल अशी तुम्ही खटपट करीत आहात ना?' ते अधिकारी म्हणाले 'हो त्याकरता आम्ही पत्रातून जाहिरात दिली आहे.' 'कोणत्या कोणत्या पत्रातून?' 'टाइम्स ऑफ इंडिया', 'इंडियन एक्सप्रेस', 'फ्री प्रेस' अशी त्या अधिकाऱ्याने नावे घेतली. त्यावर बाळासाहेब एकदम गरम झाले. म्हणाले 'माझ्या शेतकऱ्यांना इंग्रजी वाचता येतंय काय? मराठी सरळ वाचता येत नाही, त्याना इंग्रजी पत्रातली जाहिरात कशी समजणार हो. याचा फायदा मोठ्या कारखानदारानांच मिळणार आणि त्यांच्यात वीज खपली म्हणजे इतरांना देता येत नाही म्हणणार! मग विरोधी पक्षांना मोर्चा काढायला आयतीच संधी मिळणार! यासाठी का कोयना हाती घेतली?'

तसंच एका साखर कारखान्याबाबतही डायरेक्टर वगैरेंच्यासमोर जाहीर सभेत बोलले 'काही बड्या श्रीमंतांनी हजार हजार शेअर्स घेऊन कारखाना चालवला तर मला समाधान वाटणार नाही, तर शेअर्स गरिबांच्यात खपले पाहिजेत व कारखाना त्यांचा झाला पाहिजे तरच सरकारचा हेतू साध्य होईल.'

खालच्या गरिबांच्याविषयीचं प्रेम आणि कळकळ मला त्यांची अनेकवेळा दिसून आली आहे.

मी त्यांना भेटायला घरी गेलो होतो. त्याच वेळी काही खेडची मंडळी-मळक्या लाल झालेल्या कपड्याचे खेडुतही भेटायला आले होते. अर्थात त्यांच्या त्या कपड्यामुळे कोचावर बसायला त्यांना संकोच वाटला म्हणून ती खालीच बसली. त्यावर बाळासाहेब म्हणाले 'अरे बाबो, ते तुमच्याचसाठी आहेत. मी य एकटा सगळ्या खुर्च्यावर बसणार? बसा बघू त्यांच्यावर.' नंतर त्यांना विचारले 'का आलात रे बाबांनो!' त्यावर एक म्हणाला, 'माझा..आजारी आहे. त्याचं ऑपरेशन करायचं आहे.' 'मग घेतलं का त्याला दवाखान्यात?'

'अजून नाही.' 'अस्सं ऽ ऽ' लगेच बाळासाहेबांनी फोन उचलला. दवाखान्याच्या मुख्याला त्याला लगेच ॲडमिट् करून घ्या, तो माझा माणूस समजून त्याच्याकडे पहा अशी विनंती केली. हा सर्व प्रकार पाहून त्या खेडुताने त्यांचे पाय धरले!

जेवायची वेळ झाली. कोणी ओळखीचा खेडुत जवळ असेल तर त्याला जेवायला आपल्याबरोबर बसवणार आणि बाळासाहेबांचं नेहमीचं जेवण तरी काय! अगदी खेड्यावरच्या माणसाला साजेसं! भाजी-भाकरी, दोन भाज्या, सांबारे, साताराची चटणी, येशेल तेल आणि घोलमा! वाढायला कोणी बबर्जी अगर वेटर नाही. त्यांची प्रेमळ मुलेच त्यांना व पाहुण्यांना वाढत होती. कोणाला वाटणार नाही की आपण मंत्र्यांचे घरी जेवतो म्हणून. कितीजणांना माहीत असेल बाळासाहेबांना गाता येत असेल म्हणून. पन्हाळ्याला बाळासाहेबांचा मुक्काम होता. २-३ दिवस त्यांचा निकटचा सहवास लाभला. रात्री झोपेपर्यंत व सकाळी उठायच्या अगोदर मी मुडदारपणे त्यांच्याजवळ बसून राही. कोणीच दुसरे जवळ नसल्यामुळे ते मनमोकळे बोलू शकले व लहरीत येऊन काहीतरी गुणगुणू लागले. त्यावेळी मला कळून आलं की बाळासाहेबांना चांगलं गाता येतं आणि गाणं समजतं. गाणारा माणूस मनानं प्रेमळ असतो अशी माझी समजूत खरी ठरली.

**गुणीजनांचे चाहते-**

मी एकदा सहजी बोललो 'साहेब, धनंजयराव कीर माहीत आहेत का तुम्हाला? फार चांगला ध्येयनिष्ठ अन् त्यागी माणूस. लिहायला वेळ मिळावा म्हणून नोकरी सोडली व टिळक, आंबेडकर, सावरकर यांची चरित्रे लिहिली. आता फुल्यांचे लिहीत आहेत. त्यांना त्यासाठी काही पुस्तके व माहिती हवी होती.' लगेच 'माधवराव त्यांना घेऊन या' म्हणून गाडी दिली. आणि ज्यांचेकडून माहिती पाहिजे होती त्यांना लगेच आपल्या सहीची पत्रे टाकली.

बाळासाहेबांनी एखाद्या माणसाची पारख केली आणि त्यांच्याविषयी चांगलं मग झालं असलं की त्याला डोक्यावर घेऊन नाचतील. त्याची स्तुती त्याच्या तोंडावर करतील मागे करतील, मित्रमंडळीत करतील व त्याचा अनादर झाला की अनादर करणाऱ्यावर रागवतील, त्याची स्तुती जाहीर सभेत करतील. सारा उघडा मामला. तेथे डावपेच नाहीत.

मी एकदा सहजी बोललो 'बाळासाहेब, तुमचा कल इनामदार वर्गाकडे झुकतो असा काही लोक तुमच्यावर आरोप करतात.' त्यावर बाळासाहेब म्हणाले, 'माधवराव, शिष्टाचार म्हणून मी कुठं जेवायला गेलो. किंवा त्यांना

जवळ घेतलं म्हणजे मी सरंजामदारशाही धार्जिणा झालो असं नव्हे. मला गरिबीचे चटके लागले आहेत व या बड्यांच्या वागणुकीची झळही लागली आहे. माझ्या कृतीत अन् धोरणात तसं काही दिसत असेल तर सांगा; वरच्या समजलेल्या वर्गात माझे आप्त आहेत हा काय माझा गुन्हा?'

बाळासाहेब ध्येयदृष्ट्या कठोर आहेत हे कारखानदारांविषयी बोलताना दिसून आलंच आहे.

अशीच न विसरण्याजोगी गोष्ट. अनेकापैकी एक. माझ्या मनातून जातच नाहीत त्या. बाळासाहेबांच्या मुलाचं लग्न होतं. बडेबडे कोट्याधीश कारखानदार, जहागिरदार आले होते लग्नाला. अर्थात मंत्र्याच्या मुलाचं लग्न म्हणून. पण या बड्यांच्या सदरात न बसणारा एक कार्यकर्ताही तेथे आला होता. त्याला पाहताच इतर सर्वांना टाकून बाळासाहेब स्वत: हार घेऊन धावत आले आणि सर्वांना टाकून त्याच्या गळ्यात हार घातला व त्याला आदराने नमस्कार केला. त्यावेळी जहागिरदारांच्याकडे नाही धावून गेले बाळासाहेब.

**जनसेवेत धुंद-**

एक दिवस मी बाळासाहेबांच्या दौऱ्यात त्यांच्याबरोबर होतो. सकाळपासून लोकांनी त्यांना कामाला जुंपलं होतं ते रात्री बारा वाजून गेले तरी सभा चालल्याच होत्या. आणि त्यावेळी ब्लडप्रेशरही होतं. मी चिडून म्हणालो, 'बाळासाहेब, तुम्ही तुमच्या जिवावर काय अत्याचार चालवला आहे हा! निवडणुकीवेळेसारखी रोज इतकी गावे करून कसे निभणार तुम्हाला. मी पी. ए. ना ही बोललो तुम्ही तरी याला आवर घाला.' बाळासाहेब म्हणतात, 'मी असंच काम करीत असताना गेलो तर मला सुखाचं मरण येईल.' 'ठीक आहे, मी मंत्री झालो नाही हे भाग्य माझं. वाटलं मला-यापेक्षा तुरुंगवास किती सुखाचा!' सेवा करीत असतानाच आपण जगाचा निरोप घ्यावा या जबर महत्त्वाकांक्षेने बाळासाहेब धुंद होतात व या धुंदीत स्वत:च्या जिवाशीही निष्ठुर होतात.

शाहूमहाराज हे त्यांचं जणू दैवत आहे. त्यांच्या विचाराची पताका घेऊन ते सारा महाराष्ट्र आज जागा करीत आहेत. प्रचाराचं तर त्यांना वेड आहे. रोज आठ आठ दहा दहा सभा असं रोज चाललं आहे त्यांचं-कोणतंही व्याख्यान असो, त्यात शाहूमहाराजांचा उल्लेख हा असायचाच.

**नेत्याविषयीची निष्ठा-**

कन्नमवार गेल्यानंतर आम्हा काही मंडळीना वाटलं बाळासाहेब

मुख्यमंत्री होतील म्हणून. त्याच सुमारास मी मुंबईस होतो. मी भीत भीतच विचारलं 'काय बाळासाहेब, उद्याच्या बातमीचा मला काही सुगावा लागेल काय?' बाळासाहेबांचं उत्तर खऱ्या देशभक्ताला, खऱ्या नेत्याला, अनुयायाला, हाडाच्या क्षत्रियाला शोभेसंच होतं. ते म्हणाले, 'आमच्या इच्छा काहीही असोत, आमचं भवितव्य आम्ही नेत्याच्या हाती सोपवलं आहे. यशवंतराव आमचे नेते आहेत. त्यांनीच ठरवायचं आहे ते. त्यांच्या निर्णयाला आम्ही निर्णयापूर्वीच मान्यता दिली आहे. त्यांना कमीपणा येईल अशी गोष्ट माझ्या हातून होणार नाही. माझ्यामुळे मी महाराष्ट्रात दुही पडू देणार नाही.'

असे अनुयायी यशवंतरावांना मिळाले आहेत म्हणून यशवंतराव मोठे आहेत. आणि यशवंतरावांच्या अंगी तसे गुण आहेत, तसे कौशल्य आहे तशी ध्येयनिष्ठा आहे, तसा प्रेमाचा आणि विश्वासाचा साठा आहे म्हणून असे अनुयायी मिळतात.

अशी नेत्याविषयीची निष्ठा आणि नेत्यांचं अनुयायांविषयीचं प्रेम यातच आपल्या महाराष्ट्राचं वैभव सामावलेलं आहे. महाराष्ट्राची इभ्रत, दानत आणि दरार वाढला तो परस्पर निष्ठेमुळे. याच गुणामुळं या दोन व्यक्तींनी माझ्या जीवनातही अढळ स्थान मिळवलं!

दोघांचं राजकीय जीवन तर सर्वांना माहीत आहे. त्याबद्दल वस्तुत: लिहिण्याची जरुरी नाही. पण माणसाचे खरे पैलू समजतात ते त्याच्या खासगी दैनंदिन जीवनात. शाहू महाराजांच्या खासगी आठवणी त्यांच्या राजकीय जीवनापेक्षाही रम्य आहेत. खरे शाहू महाराज हे त्या आठवणीतून अधिक कळून येतात. तसेच यशवंतरावजींची आणि बाळासाहेबांची माझ्या जीवनावर जी पकड बसली ती त्यांच्या खासगी जीवनातील वागणुकीमुळे.

**महाराष्ट्राची सेवा-**

बाळासाहेबांनी महाराष्ट्र उभारणीत मागं राहून जे कार्य केलं अन् यशवंतरावजींना पाठिंबा दिला तो प्रकाशात आला नसला तरी ती जाणीव यशवंतराव विसरलेले नाहीत. बाळासाहेबांची कामगिरी त्यांना मंत्रिमंडळात असलेल्या दुय्यम स्थानामुळे प्रकाशात येऊ शकली नाही एवढेच.

कोयनेला स्वरूप आणलं बाळासाहेबांनी. पाठिंबा, उत्साह व मार्गदर्शन केलं यशवंतरावजींनी. गरिबांची ज्ञानार्जनाची अडचण दूर केली बाळासाहेबानी पण त्याला पूर्ण पाठिंबा दिला यशवंतरावजींनी पैशाचा प्रश्न उपस्थित केला

असता तर ती योजना बारगळली असती. तीच गोष्ट शिवाजी विद्यापीठाची. बाळासाहेबाना आजारी स्थितीतच आणून त्यांच्याकरवी तो ठराव मांडायला लावला आणि पास करून घेतला यशवंतरावजींनी. यामुळं कोल्हापूर हे पुण्याच्या खालोखाल शिक्षणकेंद्र बनलं आहे. त्यानंतर ॲग्रिकल्चर कॉलेज कोल्हापूरला देण्यात बाळासाहेब हेच मुख्य कारणीभूत झाले आहेत. बाळासाहेबांचा जन्म कोल्हापुरात झाला नाही पण कोल्हापुरांत जन्मलेल्यांनी जो केलं नाही ते त्यांनी केलं. कोल्हापूरचा अभिमान त्यांच्या रोमरोमातून उसळत आहे. त्यांचे उपकार पिढ्यान्‌पिढ्या गेल्या तरी विसरण्याजोगे नाहीत-

बाळासाहेब व यशवंतराव परस्परपूरक ठरले आहेत.

यशवंतराव आता अखिल भारतीय अन् जागतिक महत्त्वाची व्यक्ती होऊन बसली आहे. भारताच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांनी स्वखुशीने पत्करली आहे. अन् आपली योग्यता दिल्लीत प्रस्थापित केली आहे.

बाळासाहेब गृहमंत्री होताक्षणीच त्यांनी जनमनाची पकड घेतली आहे. बाळासाहेबांनी जे जे खाते घेतले त्यात त्यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाची, कर्तृत्वाची अन् धडाडीची छाप बसवली आहे.

आज तर गृहमंत्री होताच इभ्रतीचा प्रश्न आड येऊ न देता हे लोकाभिमुख मंत्रिमंडळ आहे ही जाणीव सर्वत्र निर्माण केली आहे. योग्य गाऱ्हाणी मग ती विरोधी पक्षियांकडून आली तरी त्याची दाद घेतली जात आहे.

मुख्यमंत्री नाईक व गृहमंत्री बाळासाहेब इतक्या एकोप्याने, प्रेमाने व सहकार्याने राज्यधुरा हाकीत आहेत की मुख्यमंत्रीपद कोणाकडे आहे असे विचारल्यास नाईक-देसाई यांचेकडे आहे असेच लोकांना वाटते. यशवंतरावजींच्या नैतिक मुत्सद्देगिरीचंच हे लक्षण नव्हे काय?

आता यशवंतरावजी कऱ्हाडचे उरले नाहीत, बाळासाहेब पाटणचे उरले नाहीत. यशवंतराव भारताचे तसे बाळासाहेब महाराष्ट्राचे खरे पुढारी बनले आहेत. बाळासाहेब ज्या जागी जातील ती जागा शोभवतील. ही त्यांच्यात जिद्द आहे. कर्तृत्व आहे. लायकी आहे. ते याहीपुढे जावोत आणि ते पाहण्याचं भाग्य लाभो हीच इच्छा.

दोघेही आज अमरकोटीत गेले आहेत. चिरायु झाले आहेत. म. फुले, शाहूमहाराज, विठ्ठल रामजी शिंदे यांच्याबद्दल जो आदर, जे प्रेम मला वाटते तेच यांच्याबद्दल वाटते. या दोघांमुळे महाराष्ट्रातल्या बहुजन समाजाला ताठ मान

करून चालता येत आहे. हजारो वर्षे तुडवल्या गेलेल्या समाजात यांच्या कर्तृत्वामुळे आत्मविश्वास निर्माण झाला आहे. या दोघांपेक्षा चार पावसाळे जास्त जाऊनही यांना पुढारी म्हणण्यात मला अभिमान वाटत आहे-

बाळासाहेबांची माहिती लोकसत्तेने आपला खास प्रतिनिधी पाठवून घेतली ती उद्बोधक असल्याने त्यांच्या परवानगीने येथे कृतज्ञतापूर्वक देत आहे. त्यांच्याच तोंडची असल्याने तिला विशेष महत्त्व आहे.

"मी दीड वर्षाचा असताना माझी आई निवर्तली. वडील शेतकरी. सहीही करता येत नव्हती त्यांना. मग वाचण्याचे दूरच. पुरोगामी विचाराचे संस्कार अर्थातच त्यांच्यावर झालेले नव्हते. त्यांनी दुसरे लग्न केले. मला सावत्र आई आली. आणि माझा छळ सुरू झाला. त्रासाला कंटाळून मी वयाच्या ८ व्या वर्षी घर सोडले. त्यावेळी मी एकदा घरातून बाहेर पडलो व आजतागायत पुन्हा कधीही त्या घरात प्रवेश केलेला नाही. भाकरी मिळण्याची पंचाईत होती म्हणून वाट फुटेल तसा धावत होतो. मी त्या काळात भिक्षेकऱ्याचे जिणे जगलो. माझा मुक्काम तीन महिने कोळे गावी होता. तेथे गलांडे नावाचा माझा मित्र स्वत: माधुकरी मागून आणी व त्यातील अन्न मला देई. सातवीची परीक्षा श्री. गणेश पांडुरंग कुलकर्णी व श्री. बुधकर मास्तर यांच्या मार्गदर्शनाखाली उत्तीर्ण झालो.

आज मला जो काही मोठेपणा लाभला आहे त्यात या बुधकर गुरुजींचा वाटा मोठा आहे. माझ्यावर त्यांचा लोभ फार व त्यांनी दिलेल्या शिक्षणाचे संस्कार माझ्यावर कायम राहिले. अजूनही ते पुण्यात केव्हा भेटले तर मी त्यांच्या पायावर मस्तक ठेवतो.

सातवीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर कऱ्हाडहून इंग्रजी शिक्षणासाठी कोल्हापूरला आलो. वार लावले व वर्षात इंग्रजी तीन इयत्ता पुऱ्या केल्या. अनेक वेळा वाराच्या घरी जेवावयास मिळाल्यामुळे मला उपाशी राहावे लागे.

डॉ. रामराव कुलकर्णी यांच्या दवाखान्याची मी झाडलोट करी व बाटल्या धुऊन देई. त्याबद्दल मला त्यांनी मोफत राहायला जागा दिली होती व पुस्तकासाठी पैसेही ते देत. या कुलकर्णी डॉक्टरांचे उपकार मी कधीच विसरू शकणार नाही. चौथीसाठी राजाराम हायस्कूलमध्ये नाव घातले व सव्वाशे मुलात पहिला आलो. या यशामुळे वार बंद झाले व भोजनासाठी मासिक सव्वादोन रुपये खर्च असलेल्या 'प्रिन्स शिवाजी बोर्डिंग'मध्ये प्रवेश मिळाला. पुढे राजाराम हायस्कूलमधून मॅट्रिक झालो. राजाराम कॉलेजमधून बी.ए. झालो व १९३७

मध्ये साइक्स लॉ कॉलेजमधून एल्. एल्. बी. होऊन कोल्हापूरचा निरोप घेतला.

कोल्हापूरात मी कधीच राजकारणात भाग घेतला नाही. भाई माधवराव बागल यांच्या नेतृत्वाखाली प्रजापरिषदेचे आंदोलन चालू होते................ त्याचे संस्कार माझ्यावर घडले. कै. राजाराम महाराज ज्या कुस्तीच्या फडाला हजर राहात त्याला पैसे पडत नसत. असा फड मी कधी चुकविला नाही. जगद्विख्यात पैलवानांच्या कुस्त्या मी कोल्हापुरात पाहिल्या. कुस्तीबद्दलची प्रीती उत्पन्न झाली. पुढे मंत्री झाल्यावर महाराष्ट्रात मागे पडलेली कुस्ती वर काढण्यासाठी मी परिश्रम घेतले. तमाशाची गोडीही कोल्हापुरात लागली व पुढे या लोककलेला राजाश्रय मिळावा यासाठी मी प्रयत्न केले. कॉलेजात प्रा. पंगू मराठी शिकवीत. माझ्या भाषेवर त्यांच्या शिक्षणाचा चांगला परिणाम झाला. कॉलेजच्या वक्तृत्वस्पर्धा मी गाजविल्या आहेत. प्रिं. बाळकृष्ण यांच्या कारकीर्दीत मी कॉलेजच्या जिमखान्याचा चिटणीस होतो. निवडणुका लढविण्याचा सराव मला तेव्हापासूनचा आहे.

माझी वकिली फारच जोरात होती. पाटण कोर्टात क्रिमिनल साईडची निम्मी बाजू माझ्याकडे होती. १९४१ साली श्री. यशवंतराव चव्हाणांची गाठ पडली. त्यांनी माझ्यावर मोहिनी घातली. ते मला त्यावेळी म्हणाले, "आपण उत्तम वकिली करून आपला संसार चालवाल. पुष्कळजण तो करताहेत. पण समाजाचा संसार चालवायला कुणी पुढे यावयास नको काय?" मला ते पटले व १९४२ साली चरेगावची ६२ आरोपींची केस सेशन्समध्ये चालविली व वकिली सोडली.

श्री. यशवंतरावांच्या उपदेशामुळेच आपण राजकारणात आलो असे सांगून बाळासाहेब पुढे म्हणाले, "त्यावेळी कूपरपार्टी जोरात होती. श्री. यशवंतरावांनी या कूपरशाहीला आव्हान द्यावयाचे ठरविले. शेवटी विजयश्री आमच्या बाजूला आली. कूपरना फक्त १८ मते पडली व मला ४२ मते पडून मी जिल्हा बोर्डाचा अध्यक्ष झालो.

१९४२ साली सर्वत्र काँग्रेसचे झेंडे उतरले गेले. पण मी जिल्हा बोर्डाच्या कचेरीवरील राष्ट्रीय झेंडा उतरू दिला नाही. कै. भाऊसाहेब सोमण यांनी मला कै. शंकरराव साठे यांच्या हस्ते भर सभेत गांधी टोपी चढविली. कै. भाऊसाहेबांचे माझ्यावर फार प्रेम. बोर्डात मी केलेली कामे पाहून ते मला म्हणाले, "तुझ्याजवळ जो गुण आहे तो सातारा जिल्ह्यातील बहुतेक

काँग्रेसवाल्यांजवळही नाही. गरीबाबद्दलची तळमळ हा तुझा देह- स्वभाव झाला आहे. तोच तुला उच्चपदी नेऊन ठेवल्याशिवाय राहाणार नाही.''

यशवंतरावांनी त्यावेळी पुन्हा जिल्हा बोर्डाच्या अध्यक्षपदाची निवडणूक लढविण्यास सांगितले.

१९४२ च्या आंदोलनांतील भूमिगत बाहेर आले होते. श्री. नाना पाटलांना अमाप कीर्ती लाभली होती.

श्री. यशवंतरावांच्या पक्षाचा पराभव करण्यासाठी व उद्याच्या महाराष्ट्राचे राजकारण ताब्यात घेण्याच्या ईर्षेने श्री. नाना पाटील यांनी शिकस्त केली. शेवटी मीच ती निवडणूक जिंकली व श्री. यशवंतरावांचे राजकारण यशस्वी झाले.

१९५२ साली मी प्रांतिक काँग्रेसचा चिटणीस व विधानसभेचा आमदार बनलो. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यातही मी श्री. यशवंतरावांची पाठ कधीही सोडली नाही. एकदा तर पुरंदरजवळ या चळवळीत रस्त्यावर बैलगाड्या आडव्या घालून आमची मोटार अडविण्यात आली. लोकांनी आमच्यावर जोड्यांचा वर्षाव केला. मी यशवंतरावांवर ओणवा होऊन जोडे झेलले आहेत.

एका बजेटमध्ये एका रत्नागिरी जिल्ह्यासाठी ८० लाख रुपयांचे रस्ते बांधले, वारकऱ्यांच्या सोईसाठी पंढरपूरला जाणारे सर्व रस्ते व्यवस्थित केले, पूल बांधले, महाराष्ट्रातील साऱ्या ऐतिहासिक स्मारकांवरची धूळ झटकायला लावली, महत्त्वाच्या किल्ल्यांचे मार्ग दुरुस्त केले. प्रतापगड, रायगड, तुळजापूर या ऐतिहासिक स्थळांसाठी व पंढरपूर, देहू, आळंदी वगैरे यात्रास्थानांसाठी मोटार प्रवास सुकर झाला. मी मंत्री झालो तेव्हा गुजरातच्या रस्त्यावर १४ कोटी व महाराष्ट्राच्या रस्त्यावर २ कोटी रुपये अशी तरतूद होती. अर्थमंत्री डॉ. जीवराज यांना सांगितले की, महाराष्ट्राच्या जनतेला हे गणित पटणार नाही. शेवटी २ कोटी गुजरातच्या रस्त्यावर व १५ कोटी महाराष्ट्राच्या रस्त्यावर खर्च करावेत, असे मी मंजूर करून घेतले. माझ्या कारकीर्दीत मी कोयनेचे पाऊण हिस्सा काम पुरे केले. कोयनेचे काम तीन पाळ्या चालवून पुढे रेटले.

महाराष्ट्र-निर्मितीच्या निमित्ताने छत्रपती शिवरायांच्या जन्मभूमीत 'शिवनेरी'वर बाल शिवाजी व जिजाबाई यांचा पुतळा बसविला. छत्रपती श्री शिवरायांना मी पराक्रमाचे प्रतीक मानतो. 'धैर्याचा' महामेरू असलेल्या तथा पराक्रमी महापुरुषाची मूर्ती सदैव महाराष्ट्रापुढे उभी राहिली पाहिजे. महाराष्ट्र

हा भारताचा खराखुरा वीरबाहू त्याशिवाय बनणार नाही, असे मला वाटते. शिक्षण खात्याचा कारभार हाती येताच एन्. सी. सी. सक्तीची करण्याचे मी ठरविले. माझी एन्. सी. सी. व ए. सी. सी. योजना त्यावेळी अमलात आली असती तर आज या महाराष्ट्रात भारताच्या संरक्षणासाठी किमान दहा लाख युवक मिळाले असते. सातारा येथील सैनिकी शाळा स्थापन होण्याला माझे प्रयत्न कारणीभूत आहेत.

शेतकऱ्यांची मुले केवळ फीला पैसे नाहीत म्हणून शिक्षणापासून वंचित होत होती आणि म्हणूनच मोफत शिक्षणासाठी असलेली ९०० रुपये वार्षिक उत्पन्नाची मर्यादा आम्ही १२०० रुपयावर नेली. सरकारला त्यामुळे दरसाल ५ कोटी रुपये जादा खर्च करावा लागत आहे.

हुषार विद्यार्थ्यांना पुढे येण्याची संधी लाभत नाही. म्हणून अशी संधी त्यांना प्राप्त करून द्यावी, या इराद्याने मी तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत एकूण चार पब्लिक स्कूल्स मंजूर करून घेतली. महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यातून गरीब पण अत्यंत हुषार अशी मुले प्रत्येकी ५०० प्रमाणे एकेका शाळेत एकत्र आणावयाची. त्यांना अतिशय हुषार, विद्वान व कार्यक्षम अशा शिक्षकाकडून शिक्षण द्यावयाचे. त्या शिक्षकांचा पगारही भरपूर ठेवावयाचा. विद्यार्थ्यांच्या राहण्यापासून तो त्यांच्या हजामतीपर्यंतचा सारा खर्च सरकारने करावयाचा अशी ही योजना होती. दुर्दैवाने पुन्हा माझे खाते बदलले व ही योजना मागे पडली.

मी शिक्षणमंत्री असतानाच माध्यमिक शिक्षकांच्या वेतनश्रेणी सुधारल्या. प्राथमिक शिक्षकांसाठी पेन्शन योजना अमलात आली व शिवाजी विद्यापीठाची स्थापना झाली.

१९४८ साली गांधीवधानंतर सातारा जिल्ह्यांत घडलेल्या जाळपोळीच्या प्रकारानंतर सातारच्या छत्रपती कॉलेजची ग्रँट बंद केली होती. त्यावेळी मी जिल्हा बोर्डाचा अध्यक्ष होतो. मी बोर्डातून ५००० रुपये मंजूर केले. कर्मवीरांच्या कार्यावर ओढवलेले एक गंडातंर त्यामुळे टळले. पुढे मी मंत्री झाल्यावर माण तालुक्यातील १०० एकर जमीन संस्थेला देवविली.

खात्यातील कनिष्ठ नोकर वर्गाचे वेतनमान मी वाढविले. पशुवैद्यांची वेतनश्रेणी सुधारली. कापूस, ज्वारी इत्यादी पिकांचे भाव बांधून दिले. नाही म्हटलं तरी त्यामुळे महाराष्ट्रातील शेतकऱ्यांना दरसाल कित्येक कोटी रुपयांचा फायदा झाला आहे.

गोळीबाराच्या प्रसंगाने नुकतीच एक कसोटी उत्तीर्ण झाली. त्या निमित्ताने मी जे जाहीर केले तेच माझ्या गृहखात्याच्या कारभाराचे सूत्र राहावे, असे वाटते. मी त्यावेळी सांगितले की, या राज्यातील पोलिस गरीबांवर व शेतकरी कामकरी वर्गावर अन्याय करणार नाहीत. या धोरणाला पूरक असेच वर्तन राजकीय व कामगार नेत्यांकडूनही घडले पाहिजे.

पोलिस हा केवळ कायदा व सुव्यवस्था पाहाणारा सरकारी नोकर एवढीच त्याची भूमिका नसून तो दुर्बलांचा सदैव मित्र व दुर्जनाचा काळ ठरला पाहिजे; याच दृष्टीने माझे प्रयत्न राहातील.''

*(माझ्या आवडत्या पांच व्यक्ती)*

## महात्मा फुले

शिवछत्रपतींनी महाराष्ट्राला पारतंत्र्याच्या गुलामगिरीतून बाहेर काढले. गुलामगिरीचे पाश तोडून टाकले. सर्व धर्मियांना प्रेमाने जवळ करून आणि संन्यस्त वृत्तीचा भगवा झेंडा हाती धरून मराठी राज्याची स्थापना केली.

बहुजन समाजाच्या आणि अस्पृश्येतरांच्या गळ्यांत, हजारो वर्षे-धार्मिक गुलामगिरीच्या, अंधश्रद्धेच्या, विषमतेच्या आणि ब्राह्मण्याच्या चिकटवलेल्या जळवा महात्मा फुल्यांनी तोडून टाकल्या; आणि राजकीय, सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक आणि आर्थिक समतेचा दीपस्तंभ, महाराष्ट्राच्याच नव्हे तर, भारताच्या मार्गदर्शनासाठी उभा केला.

कार्ल मार्क्सच्याही अगोदर समतेची दृष्टी म. फुल्यांनी महाराष्ट्रास दिली.

सर्वांगीण क्रांतीचे शिंग भारतात फुल्यांनीच प्रथम फुंकले. आणि समतेचे वारे खेड्याखेड्यातून, घराघरातून, दरीखोऱ्यातून वाहू लागले. संतांनी आध्यात्मिक समतेचा पोटतिडिकीने प्रचार केला, तर म. फुल्यांनी सर्वांगीण समतेचा पाया घातला. आधुनिक प्रगत विचारांची बीजे फुल्यांच्या कार्यात; लिखाणात आणि बोलीत आढळून येतात. महात्मा फुले महान द्रष्टे होते.

सामान्य माणसाच्या नवयुगाची ग्वाही देणारा आधुनिक भारतातला पहिला समाजक्रांतिकारक म्हणजे महात्मा फुले हेच होत. कारण ते सामन्यातलेच होते, पण विचाराने व कर्तृत्वाने असामान्य होते. त्यांनी विद्वानांना मागे टाकले. पूर्वीच्या विद्वत्‌श्रेष्ठींनी अज्ञ समाजाला वर काढण्याऐवजी खाली दडपण्याचाच प्रयत्न केला आहे.

'Whenever Brahmins wrote anything they would deny all rights to other.' -Swami Vivekanand. ज्या ज्या वेळी ब्राह्मणांनी काही लिहिले त्या त्या वेळी दुसऱ्यांचे हक्क त्यांनी अवमानले आहेत, हिरावून घेतले आहेत. व्यासांनी वेदांच्या अर्थाला कलाटणी देऊन शूद्राला चकवले आहे.

आतापर्यंतचे बहुतेक सर्व समाजसुधारक वरच्याच वर्गातले असल्यामुळे त्यांनी प्रश्न हाती घेतले ते वरच्याच वर्गाचे. सामाजिक विषमतेला त्यांनी धक्का दिला नाही. खालच्या वर्गाला शिक्षण देण्याऐवजी वरच्याच वर्गाला द्यावे, म्हणजे तेच खालच्या वर्गाला शिक्षण देतील याच विचारसरणीला त्यांनी उचलून धरले. पण अनुभव मात्र अगदी उलट आला. खालच्या वर्गाला शिक्षण देण्याऐवजी त्यांनी त्या वर्गाला नाउमेद केले आहे. 'शेतकऱ्यांचे पोरांनी शिकून काय करायचे आहे ? त्यांनी नांगर धरावा.' हाच उपदेश त्यांनी केला आहे.

खुद्द फुल्यांना त्यांच्या वडिलांवर दबाव आणून एका ब्राह्मणाने त्यांना शाळेतून काढायला लावले.

शिक्षणातल्या या मक्तेदारीला महात्मा फुल्यांनी कसून विरोध केला व ब्रिटिश सरकारला त्यांनी 'वरून खाली' या उतरंडीने शिक्षण खाली पोचणे अशक्य आहे, म्हणून आग्रहाने बजावले.

पण, राममोहन राय यांना आद्य सुधारक म्हणून मानले. त्यांनी 'वरून खाली' हाच आग्रह धरला होता. इतकेच नव्हे तर ब्राह्मसमाजातले धर्मप्रचारक ब्राह्मणच असले पाहिजेत, असा दंडक घातला होता.

पण फुले, शाहू महाराज, विठ्ठल रामजी शिंदे, भाऊराव पाटील यांनी खालच्या वर्गात शिक्षणप्रसार करण्याची खटपट केली. शाहू महाराजांनी, खालच्याच वर्गाला सवलती दिल्याखेरीज तो वर्ग पुढे येणार नाही याची मनी पक्की गाठ बांधून आपले शिक्षणाचे धोरण आखले होते.

'If the lower classes are not given preferential treatment they will not rise in the scale of life.'

'खालच्या समाजाला पक्षपाती वागणूक देऊन वर काढले नाही तर तो वरचा थर गाठू शकणार नाही;' ही त्यांना खात्री होती. असा पक्षपात म्हणजेच खरा नि:पक्षपातीपणा होय.

सामाजिक विषमता दूर करण्याच्या खऱ्या राष्ट्रीय प्रश्नाकडे तर कोणीच

लक्ष दिले नाही. आजसुद्धा या प्रश्नाकडे पोटतिडिकीने पाहणारे पुढारी कुठे आहेत ? गेल्या पिढीतले निघाले तेही खालच्या समाजातीलच. आज सर्व डाव्या पक्षांच्या कार्यक्रमांकडे पाहिले तरी आर्थिक विषमता दूर करण्यावर ते जसा भर देतील तसा सामाजिक विषमता दूर करण्याकडे देणार नाहीत. देवधर्माचे प्राबल्य काढण्याचा तर कोणताच पक्ष प्रयत्न करीत नाहीत. देवावर विश्वास नसणारे व जडवादी म्हणून प्रख्यात असलेले विद्वान् तर्कतीर्थ आचरणात मूर्तिपूजकच ठरले. राष्ट्राध्यक्ष राजेंद्रबाबूंसारख्या विद्वत्‌श्रेष्ठींनी भटाचे पाय गंगेच्या पाण्याने धुवावेत याला काय म्हणावे !

या एका वर्गाचा किंवा जमातीचाच म्हणाना का, मोठेपणा वाढविण्याचा प्रयत्न पूर्वीपासून पद्धतशीरपणे चालवला गेला आहे. दुसऱ्या बाजीरावाला तर कृष्णावतार व शिवावतार बनवून टाकले होते. ब्राह्मणांनी कसलाही गुन्हा केला तरी माफ केला जात असे. 'अहो रूपम्, अहो ध्वनि:' हा प्रकार चालला होता. बाजीरावाची ही कारकीर्द म्हणजे मोंगलाईला मागे टाकणारी होती. दुष्काळात शेतकऱ्यांकडून वसूल झाला नाही तर त्यांच्या मुलांच्या अंगावर तेल टाकण्यात येई. आणि हा पेशवा इतका अनाचारी व बदफैली होता की त्याच्या अत्याचारापासून आपली सोडवणूक करून घेण्याकरिता वाईच्या स्त्रियांना आत्महत्या करणे भाग पडले.

शिक्षणाच्या बाबतीत तर इंग्रजांच्या अमदानीतसुद्धा शिक्षणाच्या सवलती वरच्याच वर्गाला मिळत व खालच्या वर्गाला दूर ठेवले जात होते. १८२१ ला ब्रिटिश सरकारने काढलेल्या कॉलेजात फक्त ब्राह्मणांनाच घेतले जात होते. इतरांना बंदी होती.

या पार्श्वभूमीवर ज्योतिरावांच्या चरित्राकडे आणि त्यांनी स्वीकारलेल्या कार्यक्रमाकडे पाहिले म्हणजे त्यांच्या चिडीची, बंडखोरीची, तिखट भाषेची कल्पना करता येते. इतके असूनही ते ब्राह्मणद्वेष्टे नव्हते. विषम वागणुकीचा व अन्यायाचा ते द्वेष करीत होते. ही गोष्ट अनुकरणीय नाही काय ? महात्मा गांधी जसे ब्रिटिश साम्राज्याचे द्वेष्टे होते, त्या राज्ययंत्रणेचे द्वेष्टे होते, इंग्रज माणसाचे द्वेष्टे नव्हते, त्याप्रमाणेच म. फुले हे ब्राह्मण्याचे द्वेष्टे होते. त्यांना अन्यायाची चीड होती. कोणा व्यक्तीचा ते द्वेष करीत नव्हते, म्हणूनच ब्राह्मणातही त्यांचे मित्र, चाहते व अनुयायी होते. गोखले, रानडे, आगरकर, लोकहितवादी यांच्याविषयी त्यांना आदर व प्रेम होते. ब्राह्मण जमातीतही स्त्रियांवर

जे अन्याय चालत त्याविरुद्ध त्यांनी नुसता आवाजच उठविला नाही तर चळवळ चालवली.

रंजल्या गांजलेल्यांना साहाय्य कारणे हा आपला धर्म असे ते मानीत, म्हणून खुद्द महात्मा गांधीजींनी-ज्योतिबांना 'खरा महात्मा'' असे संबोधले आहे.

इतके अपमानित व अवमानित असतांनाही त्यांनी कोणाचा सूड उगवला नाही. शत्रूलाही त्यांनी प्रेमाने वागवून आपले केले. ख्रिस्त व बुद्धयांच्यातील थोरपणा, भूतदया, सर्वांवर प्रेम करण्याची वृत्ती त्यांच्यात आढळून येते.

एका लग्नसमारंभाच्या मिरवणुकीत आमंत्रित म्हणून इतरांबरोबर चालत असताना त्यांचा स्पर्श सहन न होऊन 'अंगाला अंग लावून चालू नकोस' म्हणून अपमानित झालेल्या फुल्यांनी टिळक-आगरकर तुरुंगातून सुटून येताच त्यांची मिरवणूक काढण्यात पुढाकार घेतला.

ज्या पेशव्यांच्या कारकीर्दीत अस्पृश्यांनी रस्त्यावर थुंकू नये व रस्ते भ्रष्ट करू नयेत, म्हणून गळ्यात गाडगी बांधली व त्यांची सावली पडल्यानेही ब्राह्मण विटाळतो असे समजून त्यांना जनावरांहूनही पलीकडचे लेखले, त्यांना ब्रिटिशांचे राज्य आल्याने वाईट का वाटेल? ज्योतिरावांना, रानड्यांना तसे लोकहितवादी भागवतांना अन् राममोहन रायनाही ब्रिटिश राज्य एक ईश्वरी कृपा वाटल्यास नवल काय? गोखल्यांनीही ब्रिटिश राजवटीला मनापासून मान्यता दिलीच होती. ब्रिटिश राजवट आहे तोपर्यंत त्याचा फायदा घ्या, ही भूमिका ज्योतिरावांची तशी शाहूमहाराजांची होती. कारण खालच्या समाजाला समान दर्जा प्राप्त झाल्याखेरीज ब्रिटिश राजवट गेली तरी पेशवाई कारभार सुरू होईल व बहुजन समाजाला वर डोके कधीच काढता येणार नाही, ही त्यांना सार्थ भीती वाटत होती.

रानडे व लोकहितवादी हे मनाने सुधारक असूनही प्रसंगी लोकदबावापुढे नमले आहेत- १८७० सालची गोष्ट. रानड्यांनी ज्योतिरावांना सांगितले, 'माझी एक विधवा बहीण आहे.' म्हणून साहजिकच ज्योतिराव म्हणाले, 'बोलीप्रमाणे कृती करण्याची ही संधी आयतीच तुम्हाला मिळाली आहे.' त्या वेळी रानडे म्हणाले, 'ते खरे, पण आपल्या वडिलांना त्यामुळे फार दु:ख होईल.' त्यावर ज्योतिराव चिडून म्हणाले, 'मग रावसाहेब, आपण समाजसुधारक असल्याचे बोलू नका.' आणखी एक गोष्ट. रानडे जज्ज

असताना - त्यांच्याकडे, 'सत्यशोधक समाजातर्फे लावलेले लग्न हे बेकायदेशीर आहे, तो ब्राह्मण पुरोहिताचाच खास हक्क आहे, म्हणून विरोधी पक्षाने नुकसानभरपाई दिली पाहिजे.' असा निकाल त्यांच्या पुढे आलेल्या केसचा त्यांनी ब्राह्मण पुरोहिताच्या बाजूने दिला.

एवढे कडवे ज्वलत्जहाल समाजसुधारक लोकहितवादी यांच्या हातून घडलेली गोष्ट ! विश्वसनीयसुद्धा वाटत नाही. पण ती घडली खरी ! त्यांना ब्रिटिश सरकारने काही कामासाठी विलायतेला जाल काय म्हणून विचारले असता त्यांनी उत्तर दिले की, इंग्लंडला गेल्यास माझी जात माझ्यावर बहिष्कार टाकील ! याहीपेक्षा धक्का देणारी गोष्ट म्हणजे त्यांनी आपल्या ६ व ८ वर्षाच्या बालवयी नातवंडांचे लग्न केले !

याचा अर्थ एवढाच की त्या वेळच्या सत्शील पुरोगामी विचारांच्या ब्राह्मणालाही समाजाच्या विरुद्ध जाण्याचे धाडसच होत नव्हते.

विष्णुशास्त्री पंडितांसारखे काही थोर अपवादही निघाले व आलेला कमीपणा निदान त्यांनी तरी धुऊन काढला. त्यांनी आपली पत्नी वारल्यानंतर डिसें. १८७४ साली ब्राह्मण विधवेशी विरोधाला न जुमानता लग्न केले.

ज्योतिराव हीच एक अशी महान् तत्त्वनिष्ठ व्यक्ती होऊन गेली की, बोलीत अन् कृतीत त्यांनी विसंगती आणू दिली नाही. प्रत्येक वेळी ते कसाला उतरले आहेत. मानवातले ते बावनकशी सोने ठरले.

ज्योतिराव ब्राह्मणद्वेष्टे असते तर ब्राह्मण जातीतल्या विधवा स्त्रियांवर होणारा अन्याय दूर करण्याकरिता ते जातीने का लढले असते ? ब्राह्मण स्त्रियांना कसलाही धार्मिक हक्क दिला गेला नव्हता. त्यांना शूद्राप्रमाणेच मानले जात होते. निसर्गकोपाने विधवा झालेल्या स्त्रियांना सहानुभूतीने, प्रेमाने वागविण्याऐवजी त्यांना उलट शत्रुवतच लेखले जात होते. स्त्रियांना छत्री व पायात वहाण घालण्याची बंदी होती. विधवा स्त्रीचे तोंड पाहणेही अपशकुन समजला जात असे, आजही समजला जात आहे ! घरात कोणी पाहुणे आले तर तिने कोपऱ्यात बसून राहायचे ! नवरा मेल्याचा सूड तिने केशवपन करून करण्यात येत होता !

हे अन्याय ब्राह्मण स्त्रियांवर होत आहेत, म्हणून ज्योतिराव स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी त्याविरुद्ध रान उठवले, न्हाव्यात प्रचार करून त्यांनाच 'केशवपन करायचे नाही.' म्हणून तयार केले ! हा अन्याय इंग्लंडमधील स्त्रियांच्या कानांवर गेला. त्यांनी निषेधाचे ठराव केले, या जागृतीचा परिणाम

ब्राह्मण समाजावर झाल्याखेरीज राहिला नाही.

नैसर्गिक मोहाला बळी पडलेल्या बालविधवांना व त्यांच्या अपत्यांना जाहीर संरक्षण देऊन त्यांनी बालहत्या वाचवली व त्यांच्या संगोपनासाठी आश्रम काढले. त्या आश्रमात २००० बालकांची सोय केली होती. २ वर्षांपासून ते १२ वर्षांची पोरे तेथे पोसली जात होती. स्त्रियांना शिक्षण मिळाल्याखेरीज देश शिक्षित व सुसंस्कृत होणार नाही, कुटुंबाची सुधारणा होणार नाही, हे जाणून स्त्रियांना शिक्षण देण्याकरिता ज्योतिरावांनी शाळा काढली.

हिंदुस्थानातली ती पाहिली शाळा होय. त्यात कोणत्याही जातीला मज्जाव नव्हता. तथापि, याही बाबतीत ब्राह्मणांनी त्यांना विरोध केला.

पहिला विरोध त्यांच्या वडिलांच्यावर दबाव आणून ज्योतिरावांनाच शाळेतून बाहेर काढणे भाग पाडले. पण एका मुसलमान व ख्रिश्चन गृहस्थानेच त्यांना प्रोत्साहन देऊन शाळेत घातले. नंतर ज्योतिरावांनी शिक्षण संपादन केल्यानंतर बहुजन समाज शिक्षित करण्याच्या इराद्याने स्त्रियांसाठी तशी अस्पृश्यांसाठीही शाळा काढली.

अस्पृश्यांची शाळा ही महाराष्ट्रातच नव्हे तर भारतात त्यांनीच प्रथम काढली. मुलांना पाणी प्यायला मिळेना; म्हणून त्यांनी स्वत:चा हौद खुला ठेवला.

पण शाळेत शिक्षक मिळेनात, म्हणून ज्योतिरावांनी आपल्याच बायकोला शिकवून तयार केले व शिक्षिका बनवले. पण त्यांनाच दमदाटी देऊन, सावित्रीबाईंची टिंगल करून, दगड मारून शाळा बंद पाडण्याचा प्रयत्न केला! अर्थात त्यामुळे ते दांपत्य काही डगमगले नाही. तेव्हा त्यांना ठार मारण्याकरता त्यांच्यावर मारेकरीसुद्धा घालण्यात आले.

ते मारेकरी मारण्यासाठी आले असताना ज्योतिरावांनी त्यांना विचारले, 'का रे बाबा, मी तर तुमच्यासाठीच मरतो आहे आणि मला मारून तुमचा काय फायदा?' त्यावर त्यातला एक म्हणाला, 'आम्हाला एक हजाराचे बक्षीस मिळणार आहे.'

'मग मार तर' म्हणून प्रतिकार न करता ते स्वस्थ बसले. या वाक्याने त्यांचा हृदयपालट झाला व शस्त्र टाकून देऊन ते त्यांच्या पायांवर पडले. त्याला त्यांनी शिकवले व कुंभार हा पंडित झाला. हे उदाहरण कोणाही महात्म्याला शोभण्याजोगे आहे. ते रस्त्यावरून जात असताना त्यांना एक शेंबडे-मेकडे गलिच्छ पोर भुकेमुळे रडत असल्याचे दिसले. त्याला त्यांनी जवळ घेतले, त्याला

स्वच्छ केले आणि जेवू घातले. ही गोष्ट ख्रिस्त प्रभूची आठवण करून देते. केवढे मोठे अंत:करण! दुष्काळ पडला. लोक अन्नान्न करू लागले. ज्योतिरावांनी पुढाकार घेतला आणि स्वत:ची सारी शिल्लक बाहेर काढली आणि शेकडो लोकांना रोज जेवण घातले.

आणि बाजीरावाने हजारो पुष्ट ब्राह्मणांना जेवण घालून पैशाची खैरात केली! केवढी विसंगती!

निर्भयताही तशीच. कोणाची लाचारी त्यांनी पत्करली नाही. काही काल इंग्रज जाऊ नयेत, असे बहुजन समाजासाठी जरी वाटत होते, तरी इतरांप्रमाणे त्यांनी सरकारची नोकरी धरली नाही व जनतेच्या हिताचा प्रश्न आला त्या वेळी कमालीची निर्भयता व निर्भीडपणा दाखवला आहे.

आमचे एक आप्त श्रीमान् चिपळूणकर यांनी ड्यूक ऑफ कॅनाटला मोठी मेजवानी दिली होती. पुण्यातल्या बड्याबड्यांना आमंत्रण दिले होते. ज्योतिराव हे चिपळूणकरांचे स्नेही व सहकारी होते. ज्योतिरावांनाहि त्यांनी आमंत्रण दिले होते. पण ज्योतिराव गेले ते खेडुताच्या पोषाखात! तो अवतार पाहून त्यांना चपराश्याने दारावरच अडवले! त्यांनी आपला पास दाखवला. तरी विश्वास बसेना. पण चिपळूणकरांनी ज्योतिरावांना पाहताच ते धावत आले आणि सन्मानाच्या जागेवर त्यांना नेऊन बसवले. पण ज्योतिराव काही निव्वळ मेजवानी झोडण्याकरिता आले नव्हते. त्यांनी ड्यूक ऑफ कॅनाटला हिंदी शेतकऱ्यांची दैना ऐकवली.

तसेच गव्हर्नर जनरल पुण्यास येणार होते. त्यांच्या स्वागतासाठी म्युनिसिपल कौन्सिलर्सनी बरीच मोठी रक्कम मान्य केली होती; पण एकट्या ज्योतिरावांनी अशा निरर्थक गोष्टीवर खर्च करू नये म्हणून विरोध केला. त्या वेळच्या परिस्थितीचा विचार केला तर केवढे धार्ष्ट्य! पण लोकहितापुढे त्यांनी कोणाचीही पर्वा केली नाही.

काही एका गोष्टीवरून त्यांची व एका सोल्जरची बाचाबाची झाली. तो युरोपियन सोल्जर! दुसरा कोणी गर्भगळित होऊन गेला असता; पण ज्योतिरावांनी जवळच्या उसाच्या पेराने त्याला झोडपून काढले. आता इंग्रज जरी गेले असले तरीही हे धैर्य सर्वसामान्य माणसाच्या हातून होणार नाही.

त्यांनी केवळ सामाजिक व धार्मिक प्रश्नच हाती घेतले होते असे नाही. सर्व समाजातील थरांचा ते विचार करीत होते.

मुंबईच्या मजुरांकडेही त्यांची दृष्टी वळली. त्या वेळी मजुरांना १४ तास काम करावे लागे. स्त्रियांना पुरुषांप्रमाणेच अवजड व अवघड काम करावे लागे. मुलांनाही तेच त्रास होते. ज्योतिरावांचे सहकारी व अनुयायी लोखंडे यांनी मजुरांचा प्रश्न हाती घेतला. त्यांनी खास मजुरांसाठी पत्रक काढले व मजूरसंघटना बनवली. महाराष्ट्रातली तीच पहिली मजूरसंघटना होय. त्याचे परिणाम झाला. तास कमी झाले. स्त्रियांना-मुलांना सवलती मिळू लागल्या.

जुन्नरला शेतकऱ्यांचा प्रश्न उपस्थित झाला. सावकारांच्या पिळवणुकीने शेतकरी हैराण झाला होता. त्यातही विशेष गोष्ट म्हणजे सावकार ब्राह्मणच होते. त्या असंतोषाला सत्याग्रहाचे स्वरूप आले. शेतकऱ्यांनी वर्षभर जमिनी करायच्याच नाहीत, असा निर्णय घेतला. सरकारला या चळवळीची दखल घ्यावी लागली व ॲग्रिकल्चर ॲक्ट पास करावा लागला. या चळवळीला गोखले, टिळक व इंदुप्रकाशने विरोध केला व सावकारांच्याच बाजूचे समर्थन केले.

आश्चर्याची गोष्ट अशी की आजच्या पंचवार्षिक योजनांचा आराखडाही त्यांच्या लिखाणात आढळतो. त्यांची दृष्टी चौफेर फिरत होती. ती पल्लेदार होती. ते महान द्रष्टे होते.

जमिनीला बांध (बंडिंग) बांधून पाणी आडवावे, म्हणजे जमीन सुपीक होईल. धरणे बांधून नद्या अडवाव्यात, शेतकऱ्यांना कर्जमुक्त करावे, कमी व्याजाने रकमा देऊन गरज भागवावी. बी-बियाणे, औते, अवजारे पुरवावीत, उत्कृष्ट जनावरांची पैदास करावी, शेती करणाऱ्यांना बक्षिसे द्यावीत; हे सारे विचार त्यांच्या लिखाणात आढळून येतात. खेड्यावरच्या निवडक हुशार मुलांना निवडून त्यांना अखेरपर्यंतचे शिक्षण मोफत द्यावे या कल्पनेचाही पुरस्कार ज्योतिरावांनी केला होता.

केवळ लोका सांगे ब्रह्मज्ञान अशी वागणूक ज्योतिरावांची नव्हती. समतेचे ते खरे पुरस्कर्ते होते. जातिभेद मोडून काढण्याचे प्रवचन देऊन ते स्वत: स्वस्थ बसले नाहीत.

त्यांनी विवाहबाह्य विधवेच्या मुलाला जवळ केले. त्याला फुले दांपत्याने पोटच्या पोराप्रमाणे संभाळले. त्याचे नांव यशवंत असे ठेवले! आपल्या इस्टेटीतला काही भाग त्याला तोडून दिला व ज्ञानोबा सासने नावाच्या आपल्या मित्राला त्याची मुलगी यशवंतला देण्याविषयी विनंती केली. त्या थोर चेल्याने ती मान्य केली.

अशा या खऱ्या थोर पुरुषाला, सर्वधर्मीय मुंबापुरीने सत्कार करून 'महात्मा' ही पदवी दिली.

शिवस्मारकाची कल्पना फुल्यांची, पण हे कितीजणांना माहीत आहे? फुलेच स्वत: लिहितात: "पुण्यास आलो व शिवछत्रपतींच्या समाधीचे दर्शन घेण्यासाठी रायगडी जाण्यास निघालो. समाधीची जागा शोधण्यात २/३ दिवस गेले. घाणेरी व इतर जंगली झुडपे कुऱ्हाडीने तोडीत रस्ता काढावा लागला... शिवजन्म उत्सव साजरा करावा, म्हणून समाधीवरील सर्व कचरा धुऊन काढून त्यावर फुले वाहिली. ही सर्व हकीकत तेथील ग्रामभटास कळताच तो वर आला.

'कुणबट शिवाजीच्या थडग्याचा देव केला. मी ग्रामजोशी असता दक्षिणा, शिधा देण्याचे राहिले बाजूला. केवढा माझा अपमान !'

'असे म्हणून त्याने लाथेने समाधीवरील फुले उधळून दिली.

"अरे कुणबटा ! तुझा शिवाजी काय देव होता, म्हणून त्याची पूजा केलीत? तो शूद्रांचा राजा. त्याची मुंजसुद्धा झाली नव्हती."

"मी रागाने वेडा झालो. ज्यांच्या जिवावर पेशव्यांना राज्य मिळाले त्या शिवप्रभूंची पूजासामग्री ह्या भटाभिक्षुकांनी पायातील पादत्राणाने लाथाडावी काय? मी संतापवायूने वेडा होऊन गेलो".

"त्यांचे स्मारक म्हणून मी अल्प काव्य केले आहे ते त्यांना समर्पण करतो." (२७ मे १९३८, दीनबंधु).

आज तर भारतातले ब्राह्मण-ब्राह्मणेतर-ख्रिश्चन-मुसलमान शिवछत्रपतींना राष्ट्रपुरुष मानतात. उच्चवर्णीय तर त्यांना 'गोब्राह्मणप्रतिपालक' ही संज्ञा देतात. पण ज्या वेळी त्यांच्या स्मारकाची कल्पनाही कोणाला शिवली नाही, त्या वेळी फुल्यांनी तिला चालना दिली.

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## २. राजर्षी शाहू छत्रपती

महाराज माझ्या अंगावर धावूनच आले! आणि त्यांनी चार मंडळींसमक्ष आमच्या श्रीमुखात भडकवली ! दुसरे कोणी असते तर... ! पण हे पडले कोल्हापूर संस्थानचे अधिपती, छत्रपती शाहू महाराज ! ! आणि मी एका सामान्य नागरिकाचा १८ वर्षांचा मुलगा! त्यातही माझे वडील त्यांच्या

नोकरीत ! एका पेट्याचे मामलेदार. वडीलही जवळ नव्हते ! खाली मान घालून मी स्वस्थ उभा राहिलो !

माझे वडील कोल्हापूर संस्थानचे पहिले एल्. एल्. बी. म्हणून महाराजांनी मुद्दाम बोलावून घेऊन नोकरी दिलेली. तेव्हा पगार किती, मुले किती, उत्पन्न काय, हे सर्व त्यांना माहीत ! आपल्या जवळच्या आणि ओळखीच्या माणसांच्या कौटुंबिक परिस्थितीची ते नेहमीच विचारपूस करीत. आणि एकदा समजून घेतली की पाचदहा वर्षानंतरसुद्धा आठवणी काढत ! 'काय रे तुझी आजारी होती ती मावशी कशी काय आहे ? आणि त्या पोरीचं लग्न केलंस की नाही ?' असे प्रश्न विचारून चकित करीत. म्हणूनच, म्हणजे ती माहिती असल्यामुळेच त्यांनी आमची अशी संभावना केली होती !

'म्हणे मुंबईला जातो ! कुठले पैसे आणायचे रे तुझ्या बापानं ? तू काय एकटा आहेस ? तुम्हा चौघा पोरांना पोसायचं आणि शिकवायचं ! पगार पुरायचा रे कसा ? म्हणे मुंबईला जातो !'

'पेणसे, त्या पोराला स्कॉलरशिप सुरू करा. आणि आपल्या 'बाली हौस'- मध्ये राहील तो ! तो दत्तोबा दळवी आर्टिस्ट राहतो आहे ना ? राहू द्या तिथंच याला.'

अशा प्रकारे शाहूमहाराजांनी थोबाडीत मारून माझ्या शिक्षणाची आणि राहण्याची मुंबईत सोय करून दिली. मलाच नव्हे तर अशा अनेक विद्यार्थ्यांना त्यांनी आपल्या बंगल्यात जागा दिली होती आणि स्कॉलरशिप्स् दिल्या होत्या. कित्येक आर्टिस्ट झाले. कित्येक बी.ए. एल्. एल्. बी. झाले. बहुजन समाजातले भावी पुढारी, आमदार आणि खासदार महाराजांच्या बंगल्यातच वाढले.

आमचा राजा असा कनवाळू होता; भावी पिढीची काळजी घेणारा होता. कुटुंबियांची ओळख करून घेऊन, न विसरता विचारपूस करणारा होता. महाराज दहा दहा वर्षांनी आठवण काढणार ! निव्वळ अशा प्रेमाने त्यांनी जीवाला जीव देणारी माणसे जोडली. जन्मभर मला या आठवणींचा कसा विसर पडेल ? अशा अनेक आठवणी सांगता येतील.

दुसरा एक प्रसंग माझ्या वडिलांच्या जीवनातला ! महाराजांच्या गुणाचा दुसरा एक उदात्त पैलू दाखवणारा.

वडील प्रख्यात वकील. पुण्यातील एका सभेत घडून आलेल्या दंगलीचे निमित्त करून पुण्याच्या काही ठराविक लोकांनी महाराजांना गोत्यात

आणण्याकरता मारामारीची केस घातली.

काय करावे म्हणून सल्ला घेण्याकरिता कोल्हापुरातील नामवंत वकिलांना बोलावून घेतले. त्यातील बहुतेकांनी, 'महाराजांनी भारतातील प्रसिद्ध अशा बॅरिस्टरला केस देऊन ती लढवावी' असा सल्ला दिला. माझ्या वडिलांनी- 'आपण महाराज असल्यामुळे सम्राट बादशहाच्या खास मंजुरीशिवाय हिंदुस्थानातील कोणत्याही कोर्टात आपल्यावर केस घालता येत नाही. तेव्हा आपण केस चालवण्याचे व कोर्टात हजर होण्याचे कारणच नाही' असा सल्ला दिला.

तोच सल्ला खरा ठरला व तसाच निकाल न्यायाधीशाने दिला. ही बातमी तारेने रात्री महाराजांना समजताच रात्री १२ चे सुमारास महाराज स्वत: शुक्रवार पेठेतील आमच्या राहत्या घरी आले. आम्ही माडीवर झोपलो होतो. महाराजांनी स्वत: ओरडून वडिलांना जागे केले आणि म्हणाले,

'बागल, तुम्हीच सल्ला बरोबर दिला. मी संकटातून सुटलो. उद्या सोनतळीवर मला भेटायला या.'

वडील भेटायला गेले. दिसताच महाराज उठले आणि प्रेमाने वडिलांचा हात धरला !

जवळ इंदुमतीराणीसाहेब, त्यांच्या सूनबाई उभ्या होत्या. त्यांना महाराज म्हणाले, 'असं पाहतेस काय ? त्यांना नमस्कार कर. बागलांनी मला केवढ्या संकटातून बाहेर काढलं.''

वडील शिकलेले, पण जुन्या संस्कारात वाढलेले. सोशियालिस्ट नव्हे, त्या वेळी त्या विचाराचे वारेही आले नव्हते. राजनिष्ठ व गादीविषयीचा नितांत आदर आणि भक्ती. ते लगेच म्हणाले-

'महाराज, आपण बोलू नये असं. आम्ही आपल्या पायाचे नोकर-भलतीच गोष्ट करायला सांगू नये.'

'बागल, असं का म्हणता ? मी काय माणूस नव्हे ! राजा असलो म्हणून काय झाले ? आमच्यात काय केलेल्या उपकाराची जाणीव असू नये ?'

त्याच या छत्रपतींनी, माझ्या भावाचे लग्न पुण्यास झाले, तेव्हा येताना स्टेशनवर चार घोडी व वाजंत्री पाठवावीत म्हणून विनंतीवजा महाराजांना वडिलांनी तार केली होती, तर महाराजांनी आमच्या स्वागतासाठी पहिल्या प्रतीचा लवाजमा, हत्ती, घोडे रथ व खुद्द युवराज राजाराम महाराज व अक्कासाहेब यांना स्टेशनवर पाठवले होते.

ही उपकार बुद्धी, सामान्य माणसाला इतक्या मानाने, आदराने वागवणे आणि त्यात कमीपणा न मानणे इतर कोणा राजात आढळेल काय ?

या राजाच्या आठवणी सांगून वडील गहिवरून येत ! शाहू महाराज आम्हाला दैवतासारखे वाटल्यास नवल काय !

He was a King but a democratic King ! पण संतकोटीतले होते काय !

नाही, मुळीच नाही. जनकासारखे होते.

सर्व भोग भोगून अलिप्त होते ! जनतेच्या सेवेसाठी सर्वस्वाच्या त्यागाची तयारी होती. गरिबांना, शेतकऱ्यांना, अस्पृश्यांना कधी विसरले नाहीत. ते म्हणतात,

'छत्रपतीची गादी तरी कोणी मिळविली ? मावळे वगैरे घोंगड्या शेतकऱ्यांनीच ना ? शेतकरी म्हणवून घेण्याचा मला अभिमान वाटतो. त्यांच्याविषयीचे प्रेम माझ्या धमन्याधमन्यातून खेळत आहे.'

एका सभेत ते जनतेला म्हणतात,

'माझ्याकडून सेवा करून घेण्यास तुम्ही का कू करू नका. माझ्यावर एखाद्या सत्ताधारी वर्गाने दडपण आणले तर आपल्या सेवेकरता संस्थानची सूत्रे माझ्या युवराजांच्या हाती देऊन मोकळा होण्यास मी तयार आहे.'

आणि याच वृत्तीतून त्यांनी अखेरच्या कालात भगवी वस्त्रे परिधान केली होती.

व्याख्यानातून एक व कृती निराळी असा त्यांचा प्रकार नव्हता. अस्पृश्यांच्याबद्दल बोलताना ते म्हणतात,

'या वर्गाला जखडून टाकणाऱ्या भयंकर जुलमाच्या शृंखला एकदम तोडून टाकणे हीच खरी राष्ट्रसेवा आहे, अशी माझी खात्री झाली आहे. खालच्या जातीने कितीही प्रयत्न केला तरी, हे काम त्यांच्या हातून व्हायचे नाही. प्राचीन काळापासून वंशपरंपरेने उपभोगीत असलेले हक्क वरिष्ठ जातीनेच सोडले पाहिजेत.'

बोलल्याप्रमाणे त्यांनी त्या काली नागपूरच्या भरसभेत अंत्यजाच्या हातचा पाण्याचा प्याला पिऊन दाखवला. कोल्हापुरात अंबारीवरचा माहूत अस्पृश्य ठेवला. आपल्या पंक्तीत हरिजनांना घेऊन ते जेवले.

डी. आर. भोसले यांनी सांगितलेली गोष्ट-

सोनतळीला पाण्याची स्पृश्यांनाच टंचाई असता त्या साठ्याला महारांनी शिवल्याची तक्रार महाराजांच्याकडे आली. नोकरांनी त्या अस्पृश्य बाईला त्या पाण्याच्या घागरीसकट पकडून महाराजांसमोर उभी केली. महाराज त्या बाईवर खूप खूप रागावले. ते इतके की, त्या रागाच्या आवेगात त्यांना ठसका आला; जीव कासावीस झाला. तेव्हा जवळच्या हुजऱ्याने प्रसंगावधान राखून गरज भागवण्याकरता त्याच बाईच्या घागरीतले पाणी महाराजांना दिले. शांत झाल्यावर महाराज म्हणतात, 'काय रे, तुम्ही त्याच बाईच्या घागरीतलं पाणी पाजवून मला बाटवलं आणि तुम्ही तेवढं शुद्ध राहिलाय होय?'

महाराजांच्या या दूरदर्शी खोकल्याने जवळच्या सर्वातील अस्पृश्यता नाहीशी केली.

महाराज काही साधेभोळे नव्हते, चांगलेच दूरदर्शी होते. आपली शक्ती पाहून त्यांना नाइलाजाने इंग्रज सरकारबरोबर नमते घ्यावे लागले होते. पण आपल्या शिवछत्रपतींचा इंग्रज इतिहासकारांनी केलेला अपमान त्यांना डिवचत होता. तेव्हा प्रिन्स ऑफ वेल्स येण्याच्या वेळी त्यांच्यावर काँग्रेसने पुकारलेल्या बहिष्काराची संधी साधून त्यांनी आपला डाव साधून घेतला. 'पुण्याची भेट आपण यशस्वी करून दाखवतो, आपण शिवछत्रपतींच्या पुतळ्याच्या उद्घाटनास यावं' असे त्यांनी गव्हर्नर जनरलला आश्वासन दिले.

शिवछत्रपतींच्या पुतळ्याच्या उद्घाटनास अडथळा करणे बहिष्कारवाल्यांना अवघड गेले. पुण्यातला बहुजन समाज महाराजांना अनुकूल; आणि बाहेरून परगावच्या माणसांनी भरलेल्या ट्रेन्स पुण्यात सारख्या येऊ लागल्या. सारे पुणे सभारंभासाठी आलेल्या माणसांनी गजबजून गेले! प्रिन्स ऑफ वेल्सला महाराजांची शक्ती व लोकप्रियता समजून आली. ज्या शिवछत्रपतींना चोर, लुटारू, दरोडेखोर, डोंगरातला उंदीर म्हणून इंग्रज इतिहासकारांनी संबोधले त्या स्वातंत्र्यदात्या शिवछत्रपतींच्या मूर्तीला बादशहांच्या चिरंजिवांनी आदबीने कुर्निसात केला. अशा रीतीने महाराजांनी विरोधकांची तोंडे कायमची बंद केली, बहिष्कार अयशस्वी केला व शिवछत्रपतींचा अपमान धुऊन टाकला.

शिवछत्रपती राजकीय क्रांतिकारक तर शाहू छत्रपती समाजक्रांतिकारक. शिवछत्रपतींनी राज्याभिषेकाला जवळच्या भट पुरोहितांनी अडथळा आणला, म्हणून गागाभट्टाला बोलावून अभिषेक करवून घेतला

आणि युद्धाला पैशाची जरुरी असताना, लाखो होन देऊन संतुष्ट केले, तर शाहूमहाराजांनी स्वत:च क्षात्र जगद्गुरू पीठ निर्माण करून ब्राह्मणांचे धार्मिक वर्चस्व अजिबात झुगारून दिले. निव्वळ ब्राह्मण्यावर आधात करून ते स्वस्थ बसले नाहीत. स्वत: पुढाकार घेऊन मिश्र-विवाह घडवून आणले. स्वत:च उदाहरण घालून दिले.

आपल्याच घराण्यातील मुलीचा होळकर या धनगर जातीच्या राजाशी विवाह घडवून आणला. १९१० साली जातीजातीतील विवाहाचा कायदा पास करून घेऊन अशा विवाहाला कायदेशीर मान्यता मिळवून दिली. पुनर्विवाह नोंदणीचा कायदा पास केला. अरुंडेल यांची हिंदू स्त्रीशी लग्न केल्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले.

असे हे उदारमतवादी महाराज काही ब्राह्मणांचा द्वेष करीत नव्हते. ते स्वत: थोर मनाचे, समतावृत्तीचे होते. आपल्या मराठा समाजातील समाजसेवकांना ते बरोबरीच्या नात्याने वागवत होते, उच्चनीच भाव त्यांनी मनातून काढून टाकला होता; कृतीतूनही काढून टाकला होता.

गावातील सामान्य माणसांना आणि पेहेलवानांना आपल्या गाडीत आपल्याबरोबर आपल्या बरोबरच्या सीटवर ते बसवून घेत व त्याच भरलेल्या गाडीच्या मडगार्डवर आणि पायरीवर जहागिरदारांच्या मुलांना गर्दीच्या सबबीवर बाहेर उभे करून ते सर्व गावभर हिंडवीत. गुलाम मोहद्दीन, रसूल, अरबशा, इमामबक्ष या पेहेलवानांना ते मुलाप्रमाणे वागवीत आणि मानाने पण वागवीत.

तो दिवस श्राद्धाचा होता. महाराजांचा मुक्काम पुण्यास होता. बरोबर पी.सी. पाटील होते. महाराज म्हणाले, 'पाटील, श्राद्धाची तयारी आता येथेच करा.'

'पण महाराज, मला येथील शहाण्णव कुळीच्या मराठ्यांची माहिती नाही. आपण नाव सांगाल त्याला बोलावणे पाठवतो.'

'अहो, केशवराव जेधे, श्रीपतराव शिंदे, ठुबे, भिसे, हेच आमचे पितर ! आणखी दुसऱ्या कुणाला बोलावून आणता ?' महाराज म्हणाले.

पंक्ती पडल्या. जेधे, शिंदे मंडळी बसली. नेहमीच्या रिवाजाप्रमाणे छत्रपतींचे ताट मध्यावर होते. महाराजांच्या ही गोष्ट ध्यानात येताच ते ताटे ठेवणाऱ्यास म्हणाले, 'अरे, आज पितरांचा मान सर्वात मोठा. त्या सर्वांची ताटे मध्ये घाल.' तसा ताटांचा बदल केल्यानंतर महाराज सोवळ्यानिशी त्या सर्वांच्या पाया पडले व रिवाजाप्रमाणे द्यायचे असते ते त्यांना दिले.

इतक्या थोर मनाचा, अस्पृश्यांना समानतेने वागवणारा, राजा ब्राह्मण जातीचा द्वेष करणे शक्य आहे काय? पण त्यांचा ब्राह्मण्याने अपमान केला आहे, कुत्र्यानिपट मानले आहे. मग त्या शिवाशिवीची व ब्राह्मण्याची चीड महाराजांना का येऊ नये व ते ब्राह्मण्य, ती शिवाशिव नष्ट करण्याचा त्यांनी विडा का उचलू नये?

मला बॅ. केळवकर मंत्री यांनी सांगितलेली गोष्ट.

महाराज साताऱ्याला गेले होते. जेवण त्यांनीच करायला सांगितले होते. सोवळेकरी मात्र ब्राह्मण होता. जेवणाची वेळ होत आली. महाराज स्नान करून जेवण कुठपर्यंत आले आहे हे पाहण्याकरता हिंडू लागले. बरेचसे हंडे शिजत होते. एक उघडा बंब सोवळेकरी हातावर मांजर घेऊन मध्ये हिंडत होता. त्याने महाराजांना पाहिले अन् तो महाराजांना म्हणाला, 'आपल्याला इकडून हिंडता येणार नाही. शिवाशिव झाली म्हणजे साराच घोटाळा उडून जाईल.' एक सोवळेकरी खुद्द शाहू छत्रपतींना हे बोलतो!

तरी महाराज सूडबुद्धीने वागले नाहीत. आपल्या संस्थानात मोठमोठ्या जागांवर इतरांबरोबर ब्राह्मणांनाही त्यांनी नेमले होते. अगदी जवळचा विश्वासू व प्रत्येक बारीक सारीक गोष्टी समजू शकेल अशा खाजगी कारभाऱ्याच्या जागेवर कुंभोजकर ब्राह्मण होते. सरन्यायाधीश गोखले, नतंर पंडितराव, राजाराम कॉलेजचे प्रोफेसर आपटे, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट घोलकर,सोनटक्के, रात्रंदिवस जवळ असणारे चिटणीस, पेंडणे ही सारी मंडळी ब्राह्मण होती आणि विश्वासातली होती. बालगंधर्व, टेंबे यांना महाराजांचा आश्रय होता. करमरकर, सांगलीचे अभ्यंकर वकील यांना त्यांनी हजारो रुपये मिळवून दिले. तोफखाने मास्तर तर जवळ जेवण सल्लागार होते. त्या महाराजांना ब्राह्मणद्वेष्टे कधी तरी म्हणता येईल का?

सर्व जातीना समान लेखणारा असा थोर राजा होता आमचा शाहू छत्रपती. प्रत्येक जातींची बोर्डिंगे काढून देऊन सर्व जातींना त्यांनी शिक्षणाच्या सोयी करून दिल्या. खालच्या वर्गाला पक्षपाती सवलती दिल्याशिवाय वर डोके काढता येणार नाही, म्हणून त्यांनी त्यांना खास सवलती दिल्या.

या त्यांच्या पक्षपाताबद्दल सांगलीच्या अभ्यंकर वकिलांनी त्यांच्यावर टीका केली, तेव्हा महाराज त्यांना घोड्यांच्या थट्टीत घेऊन गेले. थट्टीत लहानथोर घोडी मोकळीच होती. त्यांना देण्यासाठी त्यांनी एका जाजमावर हरबरे टाकायला सांगितले. त्याबरोबर घोडी हरबरे खायला धावत आली. धडधाकट

सशक्त होती. त्यांनी पुढे होऊन सारे हरबरे फस्त केले. रोडकी, अशक्त, रोगी मागेच राहिली. मग महाराज म्हणाले,

"बघितलंत हे अभ्यंकर? म्हणून रोग्यांना वाचविण्याकरिता तोबऱ्यात हरबरे भरून द्यावे लागतात. तीच गोष्ट मागासलेल्या जमातीची. त्यांना खास सवलती दिल्या नाहीत, तर ते डोके वर कसे काढतील?

त्या या जनतेशी एकरुप झालेल्या राजावर स्वराज्यद्रोही म्हणून आरोप करण्यात येत होता. पण स्वराज्याविषयीची त्यांची त्या वेळची व्याख्या आज सर्वमान्य झाली आहे. ते म्हणतात,

"आम्हांला स्वराज्य मिळावे अशी खरोखरीच आमची इच्छा आहे. याच्या योगे आम्हाला जीवनरक्त मिळेल. परंतु याबरोबर माझा ठाम सिद्धांत म्हणून सांगावेसे वाटते की, हल्लीची जातिभेदाची शृंखला तोडल्यावाचून आपले चालावयाचे नाही. ज्यांना राजकारणात भाग घ्यावयाचा असेल त्यांनी इतर देशांप्रमाणे याही देशात प्रत्येक मनुष्याला मनुष्यत्वाचे सर्व अधिकार दिले पाहिजेत. नाही तर आमच्या हातून मुळीच देशसेवा होणार नाही."

महाराजांनी आपल्या विचाराने, वक्तृत्वाने, चातुर्याने सर्व महाराष्ट्रावरच नव्हे तर इतर प्रांतांवरही छाप पाडली होती. अनेक प्रचंड जाहीर सभांचे ते अध्यक्ष झाले होते. १९२० साली हुबळी येथे महाराजांच्या अध्यक्षतेखाली भरलेली ब्राह्मणेतर सामाजिक परिषद फारच गाजली. मुंबई प्रांतात आपली माणसे निवडून आणून त्या नाड्या ते आपल्या हातात ठेवू लागले होते. तेव्हा ही वाढती शक्ती आपल्यास जड होईल म्हणून सरकारने त्यांना बाहेर न जाण्याचा सल्ला दिला, तेव्हा आपल्या एका बड्या अधिकारी मित्रास ते लिहितात- बहुधा ते सरसबनीस असावेत-

'सरकार रागावेल असे तुम्ही म्हणता. रागावो बिचारे! गरजवंतांना मदत केल्याबद्दल, अस्पृश्यांना हात दिल्याबद्दल आणि मराठ्यांचा उद्धार करण्याकरता माझी शक्ती खर्च केल्याबद्दल परमेश्वराकडून मला खचित न्याय मिळेल. लॉर्ड...यांनी तर काय, पण खुद्द ब्रह्मदेवाने अथवा यमाने धमकी घातली आणि मी भ्यालो, तर माझे पूर्वज माझ्याकडे पाहून हसतील. भित्र्या भागूबाईप्रमाणे मी माझी मते सोडणार नाही किंवा जीव बचावण्यासाठी शरण जाणार नाही.'

तो राजा स्वराज्यद्रोही होय? महाराजांचे कट्टर विरोधी लो. टिळक हे ज्या

दिवशी मुंबईस वारले व ती तार महाराजांनी वाचली, त्या वेळी त्यांनी आपल्या पुढचे ताट बाजूस सारले व म्हणाले, 'अरेरे! देशातील एक मोठा राजकारणी महापुरुष व माझा सामनेवाला गेला!'

महाराजांच्याबद्दल मद्रासचे इंग्रजी दैनिक 'जस्टिसने' त्यांच्या निधनानंतर लिहिलं,

The Maharaja of Kolhapur, the descendent of the great Shivaji-was a prince among men and a man among princess. His majestic figure, his robust optimism, the iron will of which he was a master, his kindly and generous disposition marked him out as a true Maratha of the best and noblest type. Born at other periods he would have founded an Empire and created a confederacy - The personal hold which he had over the people was phenomenal and reminded one of the palmy days of the Maratha Empire.

गुरुवर्य विठ्ठल रामजी शिंदे म्हणतात-

'शाहू राजा नुसता मराठा नव्हता, ब्राह्मणेतरही नव्हता. तो नवयुगातला सर्वांगपूर्ण राष्ट्रपुरुष होता. तो महाराष्ट्राच्या विकासाचा एक मोठा स्वाभाविक तरंग होता.'

नरसिंह चिंतामण केळकर म्हणतात- 'शरीरसामर्थ्य, धैर्य, बुद्धिमत्ता, मुत्सद्देगिरी, मनुष्यस्वभाव-परीक्षा, उद्योगप्रियता, मतप्रचाराची हौस जितक्या प्रमाणाने शाहू छत्रपतींच्यात एकत्र आढळली तितकी गेल्या शेपन्नास वर्षात दुसऱ्या कोणत्याही संस्थानिकात आढळली असेल असे मला वाटत नाही. कोहिनूरसारखा एखादा हिरा दैवयोगाने एखाद्याच वेळी खाणीत कामगारांच्या हाती लागतो. संस्थानिकांच्या खाणीतही शाहू महाराजांसारखा पुरुष यदृच्छेनेच निर्माण झाला असे म्हटले पाहिजे.'

शाहू महाराजांच्या राजकीय जीवनाचा अभ्यास केला, सामाजिक जीवनाचे निरीक्षण केले, आणि व्यक्तिजीवन जवळून पाहिले तर त्यातून निष्कर्ष काढता येईल की, ते राजे असूनही त्यांची लोकशाही वृत्ती होती. साधुत्व होते तसे मुत्सद्दीपणही होते. कुस्तीतच ते डावपेच खेळत होते असे नाही,

गव्हर्नरांनाही खेळवत होते. त्यांची साम्राज्यनिष्ठा हा डावपेचाचा एक भाग होता. आत इंग्रजांचा द्वेष होता, स्वातंत्र्याची तळमळ होती. आतून अनेकांना प्रोत्साहन दिले जात होते.

नगरला छत्रपतींचा इंग्रजांनी घेतलेला सूड मनात डाचतच होता. आपल्या जनतेवर नितांत प्रेम होते. सर्वांकडे समदृष्टीने पाहत होते. सर्वांना अधिकारपदात वाटा दिला जात होता. एका जातीची मक्तेदारी नव्हती तरी खालच्या समाजाकडे प्रेमाची पक्षपाती दृष्टी होती. म्हणूनच ते राजे असूनही राजर्षी झाले.

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## कर्मवीर भाऊराव पाटील

भाऊराव पाटील माझे परमस्नेही, हितचिंतक, घरोब्याचे, जिव्हाळ्याचे. अगदी समवयस्क नसले तरी फार वर्षांचे अंतर नव्हे, वडील भावाइतके. आणि मला तर ते वडील भावासारखेच वाटणार. कोल्हापूराला आले की माझी भेट घेतल्याखेरीज राहणार नाहीत. साताऱ्याला गेलो तर उतरलो असेन तेथे पायीच येणार. सातारा कँपमध्ये मी राजे भोसले यांच्या घरी उतरणार. पण तेथून मला आपल्या घरी नेणार; ठेवून घेणार. आपली आंबील-भाकरी खायला घालणार. भाकरी, कांदा-खोबऱ्याची चटणी हे त्यांचे आवडते पदार्थ.

हे झाले त्यांचे-माझे वैयक्तिक संबंध. एवढ्याने ती व्यक्ती मोठी ठरत नाही. ती आवडती ठरेल. वैयक्तिक जीवनात त्यांना प्रेमाचे स्थान राहील एवढेच.

पण भाऊराव ही एक आदर्श व्यक्ती होती. ते भारतरत्न होते. तो एक मूर्तिमंत ध्येयवाद होता, ज्वलंत समाजवाद होता ! ज्या एका विचाराने प्रेरित होऊन मी अनेक लेख लिहिले, जे एक माझ्या जीवनाचे उद्दिष्ट होते, ज्याचा मी लेखाने, वाणीने व ग्रंथातून सारखा प्रचार करीत होतो, त्याचे प्रात्यक्षिक म्हणजे भाऊराव !

मी ३०-३२ पुस्तके लिहिली. खर्च दांडगा झाला. विक्री नाहीच झाली म्हटले तरी चालेल. प्रत्येक ओळखीचा अत्यंत अगत्याने पुस्तक मागणार, पण एवढ्या जवळच्या माणसाला पुस्तकाची किंमत कशी द्यायची? या भावनेने किंमत देण्याच्या भानगडीत कोणी पडत नसे. त्यामुळे पदरमोड करून पुस्तके

काढणे, सर्वांनी अगत्याने नेणे, या कृपेमुळे दिवाळखोरी पदरात पडली! भाऊरावांनी माझे 'जीवनप्रवाह' वाचले. त्यांना ते फार आवडले. आणि शंभर प्रती खरेदी करून ५०० रुपये रोख दिले! एवढी पुस्तके एकदम घेणारे हे एवढेच गिऱ्हाईक आयुष्यात लाभले. संस्थेने आणि मित्रांनी सामुदायिक रीत्या लेखकाला बुडवण्याच्या नेहमीच्या पद्धतीमुळे लेखकाने डोके वर काढण्याऐवजी त्याचा पाय सर्वांच्या कृपेने खड्ड्यात जातो! भाऊरावांनी मात्र खड्ड्यातून वर काढण्याचा प्रयत्न केला. माझ्या ध्येयवादाची जाणीव त्यांनीच तेवढी राखून त्याला प्रोत्साहन दिले!

पाश्चात्य पंडितांनी आपली बुद्धिमत्ता खर्चून समाजापुढे जे संघटित विचार ग्रंथरूपाने पुढे ठेवले ते कृतिरूपाने भाऊरावांनी अस्तित्वात आणले. विषमता गेली पाहिजे म्हणणारे सामाजिक सुधारक निव्वळ तोंडचा प्रचार करत सुटतील! पण ती विषमता प्रत्यक्ष घालवलेली भाऊरावांच्या संस्थेत मी डोळ्यांनी पाहिली.

अडाणी पण सुसंस्कृत, पदवी नसलेल्या पण अनेक पदवीधर निर्माण केलेल्या बी. ए., एम. ए., पीएच. डी., बॅरिस्टर, निर्मात्याला-ज्याने सातारा जिल्ह्याची आदर्श नवी ध्येयवादी पिढी निर्माण केली त्याला-उशिरा का असेना, पण 'पद्मभूषण' पदवी द्यावी लागली, त्याच्या पायाजवळ ती चालून आली.

त्यापूर्वी आपल्या ध्येयासाठी त्यांनी किती खस्ता खाल्ल्या! आज शाळा उघडणे हा पोटाचा धंदा झाला आहे. ज्याला इतर काही साधेना तो शाळा उघडतो व सरकारच्या सवलतीचा गैरफायदा घेऊन थोडक्याच दिवसात सुखवस्तू बनतो, ऐषारामी जीवन जगतो.

मी रोज रोज विश्वविद्यालयांच्या एकाहून एक टोलेजंग इमारती पाहतो; जणू त्याशिवाय शिक्षण देताच येत नाही. येथून तेथून एका साच्याचे, परीक्षेत मार्क मिळवणारे शिक्षण.

नव्या जगाचा, नव्या विचाराचा स्वावलंबी अन् स्वाभिमानी नागरिक निर्माण करण्याची किती संस्था खटपट करीत आहेत?

संस्था काढली की आता भरपूर ग्रँट मिळते!

इमारत बांधताना मिळकत, शिक्षकाकडून मिळकत. मुले कमी असली तरी पटावर संख्या भरपूर!!

भाऊरावांनी केवळ जनतेच्या साहाय्यावर अवलंबून स्वतः झीज

सोसून, श्रम करून साधने जमवायची आणि मुलांना आसरा करून द्यायचा! प्रथम तर त्यांनी आपल्या घरीच शाळा सुरू केली. सौभाग्यवती लक्ष्मीबाईने अडचणीच्या वेळी आपले मंगळसूत्र खर्चासाठी काढून दिले. या त्यागाने चालविलेल्या भाऊरावांच्यावर मोरारजीने वाटेल ते आरोप केले. मत्सरग्रस्तांनी ब्राह्मणद्वेषाचा आरोप केला; तर काही दुष्टांनी जाळपोळीचा फायदा घेऊन, त्यांच्यावर - तेच प्रोत्साहन देणारे म्हणून - बालंट रचण्याचा प्रयत्न केला. सरकारने संस्थेची ग्रँट बंद केली! तरी त्याला न डगमगता भाऊरावांनी आपल्यावरचे आरोप सिद्ध करण्याचे विरोधक श्रेष्ठींना आव्हान दिले. तेही जाहीरपणे भरसभेत. त्या वेळी त्यांचे ते जमदग्नीचे स्वरूप, सात्विक संतापाने तोंडावाटे ओकला जाणारा अग्नी श्रोत्यांच्या अंत:करणात जणू आग पसरवीत आहे असा भास होई. सरकारने ग्रँट बंद केली, पण जनताजनार्दनाने संतुष्ट होऊन आपल्या सहस्र करांनी त्यांच्यावर सोन्यारूप्याची फुले उधळली. कोठे गेले आणि रिक्त हस्ते परतले, असे झाले नाही. म्हणून आता संस्था कितीही मोठ्या दिसल्या आणि त्यांचा पसारा कितीही मोठा दिसला, तरी ज्या दिव्यातून भाऊरावांना जावे लागले त्या दिव्यातून कोण गेले आहे? अन् तो ध्येयवाद कितीजणांनी मुलांच्या जीवनात उतरवला आहे?

ज्यांनी महार, मांग, मराठा, ब्राह्मण सर्वांना ज्ञानाच्या पाणपोईवर पिऊ दिले त्यांच्यावर ब्राह्मणांनी तसा काही मराठ्यांनीही जातिवादाचा आरोप केला, याला काय म्हणावे! आणि त्यांच्या जातीचे तर त्यांना म्हणत होते, 'भाऊरावांनी आमच्या जातीसाठी काय केले?' त्यावर त्यांनी उत्तर दिले ते मला माहीत आहे. ते म्हणाले, 'अरे खुळ्यांनो, मी तुमच्याच जातीचे कल्याण करीत आहे. एवढ्या सागरासारख्या पसरलेल्या अफाट बहुजन समाजाला डावलून तुमच्यापुरते मी पाहात बसलो असतो तर त्यांच्या रागाला बळी पडून तुमचे अस्तित्वही नाहीसे झाले असते, त्या बहुजन समाजात तुमचा समावेश नाही का होत?'

या उदार, समतावादी, सर्वसंग्राहक धोरणामुळेच त्यांना पैशाची कमतरता पडली नाही व त्या वटवृक्षाच्या पारंब्या महाराष्ट्रभर पसरू लागल्या. त्यांच्या या लोकप्रियतेमुळे आणि कार्यामुळे धनंजयराव गाडगीळांसारखे लोक त्यांचे सहकारी झाले. थोरामोठ्यांचे पुढीलप्रमाणे आशीर्वाद मिळू लागले:

**साने गुरुजी-** 'संस्थेतील मुलात सर्व पंथांची, जातीची, धर्माची मुले होती. ही ध्येयवादी संस्था पाहून मला अपार आनंद झाला.'

**आचार्य भागवत-** 'शरीरश्रम, समता आणि सेवाभाव याचे या संस्थेत जे मीलन झाले आहे ते या संस्थेचे वैशिष्ट्य आहे.'

**जयप्रकाश नारायण-** 'शिक्षाके क्षेत्र में इन समाजवादी सिद्धांतों का व्यावहारिक प्रयोग देख मुझे प्रसन्नताही नहीं वरन् प्रथमदर्शन भी हुआ।'

**कै. सयाजीराव महाराज-** 'हिंदुस्थानच्या प्रगतीस लागलेल्या अत्यंत जुलमी जातिविशिष्ट किडीच्या मुळावरच रा. भाऊराव पाटील यांनी कुऱ्हाडीचा घाव घातला आहे. अशा प्रकारे आदर्श वसतिगृह हिंदुस्थानात कुठेच दिसून येत नाही.

**आजचे गृहमंत्री बाळासाहेब देसाई-** 'एक साधा माणूस ध्येयाने वेडा झाला म्हणजे काय करू शकतो याचे भाऊराव पाटील हे एक मूर्तिमंत उदाहरण आहे. मॅट्रिकपर्यंत शिकलेल्या माणसाने शैक्षणिक कार्यात केलेली ही कामगिरी भावी हिंदुस्थानच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी खास तेजस्वी आहे.'

अशा माणसाचा राष्ट्रीय गौरव झाल्यास विशेष नाही. तसा झाला नसता तरी त्यांची सेवा चिरस्मरणीय ठरलीच असती.

मी त्यांची हा पसारा ऐकला होता, डोळ्यांनी पाहिला नव्हता !

तेच एकदा म्हणाले, 'माधवराव, तुम्ही तुमचे स्नेही कोरगावकर यांना घेऊन या; म्हणजे मी तुम्हांला व त्यांना सातारा जिल्ह्यातील संस्था दाखवू शकेन. मात्र १।२ दिवसांची सवड काढून या.'

यापूर्वी रुकडीच्या रयत शिक्षण संस्थेचे चालक बापूजी साळुंखे यांनी स्वातंत्र्यदिनानिमित्त मला बोलावले होते. त्यात एका गोष्टीमुळे कर्मवीर भाऊरावांच्या थोरपणाचा प्रत्यक्ष अनुभव आला. तो समारंभ माझ्याच अध्यक्षतेखाली झाला. संस्थेने मला परस्परच बोलावले होते; भाऊरावांना त्याची दखल नव्हती. सहजी अनपेक्षित रीत्या त्यांच्या हाती ते हँडबिल पडले. भाऊरावांना त्या पत्रिकेला महत्त्व देण्याचे काही कारण नव्हते. मी मंत्री नव्हतो की लखपती नव्हतो-की कोणी माझ्यासाठी धावपळ करीत यावे. पण भाऊराव साताऱ्याहून माझ्यासाठी धावपळ करीत आले. साडेतीन वाजचा रुकडीला येऊन त्यांनी तेथून मला नेण्यासाठी आपली गाडी पाठवली. ती गाडी संस्थेच्या कामासाठी विद्यार्थ्यांनी पैसे जमवून भाऊरावांना दिली होती. त्यामुळे त्या गाडीने सातारा व इतरत्र पसरलेल्या त्यांच्या संस्थेच्या पसाऱ्यावर देखरेख करता येत

होती. त्यांच्या पायाला सूज आल्यामुळे त्यांना चालणे जड जात होते.

भाऊरावांनी माझ्यासारखा अधिकारपदावर नसलेल्या सामान्य कार्यकर्त्याला इतके महत्त्व द्यावे व अगत्य दाखवावे, या वयात एवढा त्रास सोसून धावपळ करीत यावे या जाणिवेने माझे हृदय भरून आले, सत्तेवर नसलेल्या निर्धन माणसाला इतका मोठेपणा देणारी माणसे या व्यवहारी जगात मिळत नाहीत म्हणून आठवण आली की डोळे भरून येतात.

महाराष्ट्रातील बहुजन समाजासाठी-अंत:करणपूर्वक, प्रामाणिकपणे निरलसपणे, निष्ठेने अन् निर्भयपणे विरोधाला न जुमानता ज्यांनी तन-मन-धन खर्ची घातले व ज्ञानामृत पाजले त्या थोर व्यक्तींपैकी पहिली व्यक्ती म्हणजे महात्मा फुले, दुसरी महर्षी विठ्ठल रामजी शिंदे आणि तिसरी म्हणजे भाऊराव हे होत.

बहुजन समाजाला शिक्षित करण्यासाठी त्यांनी भिक्षापात्र हाती घेतले, त्या माणसाने दिलेला मान व दाखवलेले अगत्य म्हणजे मला मोठ्यातले मोठे मानपत्र होय. आणि करवीर नगरपालिकेचे मानपत्र मला मिळाले ते पण त्यांच्याच हस्ते.

मध्ये काही दिवस ते राजकारणाकडे झुकू लागले होते. बहुधा ते शेतकरी-कामगार पक्षातच गेले असते. कारण त्या पक्षातर्फे भरलेल्या सभेत केव्हा ते अध्यक्ष तर केव्हा मी अध्यक्ष असे. त्या वेळी ते सरकारवर ज्वलंत जहाल टीका करीत असत. खेरांनी शिवजयंतीची सुट्टी न दिल्याबद्दल ते इतके खवळले होते की काही सोय नाही. त्या सभेचा अध्यक्ष मीच होतो. पण त्यांच्या या टीकेमुळे संस्थेवर परिणाम होईल, म्हणून पक्षातील पुढाऱ्यांनी त्यांना राजकारणापासून निवृत्त केले !

त्यांची व्याख्याने विद्वत्तेने भरलेली नसली, शब्दरचना सुसंस्कृत नसली तरी मन, बुद्धी आणि विचार सुसंस्कृत होते; ध्येयवादाने भरलेले होते. भडकले तर सात्त्विक संतापाने भडकणार. म्हणून त्यांची भाषा खेडुतांच्या अंत:करणाचा ठाव घेई. आम्हा दोघांच्या विचारात फार साम्य. एकच विचार, त्यांच्या-माझ्या भेटीशिवाय त्यांनी सभेत मांडावयाचा व मी दुसऱ्या एखाद्या सभेत मांडायचा असे नेहमी होणार. आम्ही भेटलो म्हणजे हे कळून येणार. आमचे विचार एक असले तरी त्यांना कृतीत आणून मूर्तस्वरूप आणून देण्याची शक्ती, कर्तबगारी आणि त्यांची चिकाटी विलक्षण होती.

मी रुकडीस गेल्यावेळी नव्या शिक्षणक्रमाची त्यांनी घोषणा केली.

एक तास शाळेतील काम करणाऱ्या मुलांना फी माफ, तीन तास काम करणाऱ्यांना जेवण व शिक्षण माफ. गरीबी-श्रीमंती हा भेद नाही, कोणासही अंग-मेहनतीने काम केल्याखेरीज तेथे राहता येणार नाही. तेथे मुले आळीपाळीने जेवण करीत. आळीपाळीने वाढत, आळीपाणीने ताटे खरकटे काढीत, शेण गोळा करीत.

पुन: हे ध्यानात ठेवण्याजोगे आहे. निव्वळ विधायक कार्याची महती गाऊन भाऊराव आपल्या विद्यार्थ्यांना वरच्या पांढरपेशांची हमाली करणारे बिनडोक्याचे दगड बनवीत नव्हते. त्यांना नंदीबैल बनवत नव्हते. त्यांच्या बौद्धिक विकासाकडेही तितकेच लक्ष देत होते.

यानतंर भाऊराव एकदा म्हणाले, 'तुम्ही तुमच्या मित्रांना प्रभाकरपंत कोरगावकरांना एकदा साताऱ्याला घेऊन या. तुम्हाला माझ्या संस्था मी फिरून दाखवणार आहे'. त्याप्रमाणे मी व प्रभाकरपंत कोरगावकर सातऱ्याला गेलो. सकाळी ९॥ वाजता पोचलो. प्रथम शिवाजी कॉलेजमध्ये गेलो. भाऊराव व कॉलेजचा स्टाफ हजर होता. त्या खडकावरसुद्धा विद्यार्थ्यांच्याकडून खडक फोडून शेतजमीन करण्यात येत होती. उंचवट्याखालच्या ओढ्यात विहिरीचे बांधकाम चालले होते. त्यातला गाळ काढून वरच्या खणलेल्या खड्ड्यात टाकण्यात येत होता. आणि हे काम कोण करीत होते तर कॉलेजचे, हायस्कूलमधले विद्यार्थी. स्वत: प्रोफेसर्स खणत होते, चिखलाच्या पाट्या उचलत होते. चिखल अंगावर पडत होता. डोक्यावर, कपडयावर पडत होता. एक दोन वर्षांत त्यातून शेतीचे उत्पन्न निघण्यास सुरुवात होईल असे दिसत होते. तेथून शाहू बोर्डिंगला गेलो. या इमारती बहुतेक सर्व विद्यार्थ्यांच्या श्रमाने बांधल्या होत्या. इमारतीसाठी टेकडी खोदून सपाट केली होती. त्यावर तसाच टेकडीचा थर खोदून त्यावर खोल्या बांधल्या होत्या. त्यामुळे त्याला दुमजली स्वरूप आले होते. त्या दोन्ही खोल्यांच्या रांगाच्या खालच्या टप्प्यावर केळीची बाग तयार केली होती. एकएक घडास तीसतीस, चाळीसचाळीस फण्या लोंबत होत्या. केळी भरपूर मोठी होती. माझ्यासारख्याने दोनच खाल्ली की पोट भरणार. बागेच्या आत फिरते संडास बांधून खताची सोय केली होती. त्यामुळे भरघोस घड आले होते. घडाने केळ वाकू नये म्हणून प्रत्येक घडाला ठेप्या दिला होता.

यानतंर बालक मंदिराकडे गेलो. तेथे सर्व जातींची मुले होती. भाऊरावांनी तेथे पाय टाकताच त्यांनी 'अण्णा, अण्णा' म्हणून भाऊरावांच्या सभोवती कडे केले. कोणी त्यांना बिलगली. एकाला त्यांनी कडेवर घेतले. भाऊरावांचे हे कुटुंब पाहून त्यातले वात्सल्य पाहून मी कृतकृत्य झालो. गोपाळकाल्यात गवळयांच्या पोरांना घेऊन पोटभर जेवणाऱ्या कृष्ण परमात्म्याच्या सान्निध्यात आल्याचा भास झाला. माझे ह्रदय भरून आले. सामाजिक, धार्मिक, आर्थिक समतेचे हे बाळकडू हिंदुस्थानात इतरत्र कोठे दिले जात असेल काय? कर्व्यांचे एवढे मोठे कार्य, पण त्यांच्या संस्थेत मराठा स्त्रीस प्रवेश मिळत नव्हता. खुद्द विठ्ठल रामजी शिंदे यांच्या भगिनी जनाक्कांना मिळाला नाही, मग इतरांची काय कथा? अस्पृश्यतानिवारणावर व्याख्यान देऊन घरी आल्यावर आंघोळ करणारे समाजसुधारक मी पाहिले आहेत! हरिजन सेवक संघाच्या एका अध्यक्षाला घरी अस्पृश्याच्या मुलास ठेवा म्हणताना 'आमच्या बाईसाहेबांना ते जमणार नाही' असे म्हणताना मी ऐकले आहे. त्यासाठी त्या संस्थेचा राजीनामा देण्यासही ते तयार झाले होते! आणि म्हणून भाऊरावांचे हे समतेचे राज्य पाहून मी अंत:करणात 'धन्य धन्य भाऊराव' म्हणू लागलो.

तेथून ट्रेनिंग कॉलेजकडे गेलो. त्यांना हवे तसे शिक्षण देणारा ध्येयवादी शिक्षकवर्ग तेथे तयार केला जात होता. आजीव सेवा देणाऱ्या रत्नांची घडण तयार होत होती. आधुनिक 'बुद्धभिक्षूंचा' वर्ग तयार होत होता. समाजवादी शिक्षण देणारे नवयुगाचे प्रणेते तयार करण्यात येत होते.

तेथून धनिणीच्या बागेत गेलो. आंबराईची गार छाया! पुरातन कालच्या राजशाही अमदानीत बांधलेल्या भव्य विहिरीतून हत्तीच्या सोंडेसारखा पाण्याचा जिवंत प्रवाह वाहत होता. त्यावर विद्यार्थ्यांनी तयार केलेला उसाचा मळा व बाग पोसली जात होती. माडाची झाडे आपली छत्रचामरे एका दगडाच्या कट्ट्यावर बसलेल्या कर्मवीरांच्यावर अन् आम्हा पाहुण्यांवर ढाळत होती. महाराष्ट्रातल्या या शांतिनिकेतनाचे गुरुदेव कर्मवीरभाऊराव, माझे परमस्नेही बसले होते. बाराचा सुमार झाला होता. मला तहान लागली. लगेच भाऊरावांनी एका मुलाला नारळीच्या झाडावर चढवले. नारळ काढले आणि निसर्गातले गोड नवजीवन देणारे अमृत पाजले. मुले भाकरी थापटत होती. त्यातली गरम गरम भाकरी व झुणका हातावर आणून ठेवला! पुलावा अन श्रीखंडपुरीच्या जेवणापेक्षा यातली मजा काही औरच होती. जुन्या काळातल्या वसिष्ठ-वाल्मिकी ऋषींच्या

आश्रमात बसल्याचा भास झाला मला! त्या सुबत्तेच्या निसर्गसान्निध्यात हिंदी संस्कृतीच्या माहेरघरात मी पाहुणचार घेत होतो.

यानतंर सातारा शहर सोडून जिल्ह्यातील संस्था पाहण्यासाठी बाहेर पडलो, पन्नास-साठ मैलांवर अगदी फोंड्यामाळावरील एक बोर्डिंग. तेथे विहीर खणायचे काम चालले होते.

जेथे शाळा तेथे बोर्डिंग ! जेथे बोर्डिंग तेथे विहीर ! विहीर तेथे शेती ! शाळेत शिक्षण, निर्सगाच्या सान्निध्यात. विधायक श्रम. शारीरिक श्रमांबरोबर उत्पादक श्रम. बाहेरच्या, घरच्या मदतीशिवाय स्वकष्टावर शिक्षण घ्यावे हा हेतू. श्रमाच्या मेहेनतान्यात राहणे, जेवणे, अभ्यास.

सहजीवन ! सहभोजन ! सहशिक्षण ! सामुदायिक श्रम ! शाळेतील मुले थाटामाटापासून अलिप्त होती. श्रीमंत कोण, गरीब कोण, ब्राह्मण कोण, महार कोण, कामकरी कोण, इनामदार कोण, हे समजू शकत नव्हते. विषमता आचारातून, विचारातून नाहीशी होत होती !

छोटे समतावादी राज्य होते इथे.

येथून कित्येक मैल दूर असलेल्या देवापूरला गेलो ! नाव देवापूर, पण होते ओसाडपूर ! दरवेशांचा गाव जणू ! त्या गावापासून एकदोन मैलांच्या अंतरावर टाटांच्या आर्थिक साहाय्याने शाळा व बोर्डिंगच्या इमारती बांधण्यात येत होत्या. त्याच एका इमारतीत आम्ही त्या रात्री मुक्काम केला. येथे भाऊरावांच्या मालकीची शेती होती. त्या बिनपिकाच्या हिणकस वाळू-रेतीच्या जमिनीवर पीक काढण्याचा प्रयोग चालला होता. नदीचा फक्त भास होता. जणू वाळूचीच नदी. सारी आत वाळू. पाणी जरा कुठेही दिसत नव्हते.

तेथून आणखी एकदोन संस्था पाहून अष्ट्यास गेलो. केवळ मुलांच्या श्रमावर २५।३० हजारांची शाळा उठवली होती. विहीर आहे, बाग आहे, शेतीला भरपूर जागा आहे. केळीची झाडे तर बहुतेक बागेत दिसली. मुलांच्याकडून लोकरीची विणकर चालू होती. घोंगडी, बसकुरे, गालिचे पाहायला मिळाले. त्याच एका शाळेच्या आवारात पाळलेल्या ऑस्ट्रेलियन बकऱ्यांची लोकरीची घोंगडी विकत घेण्याजोगी होती. मला ती आवडली. काही दिवसांनी त्याच शाळेच्या मुलांनी भाऊरावांची भेट म्हणून पांढऱ्या लोकरीची जाड घोंगडी मला घरी आणून भेट म्हणून दिली. ती वंशपरंपरा टिकण्याइतकी बळकट आहे.

यानंतर कोल्हापूर जिल्ह्यात आलो.

शहाजी छत्रपतींच्या रुकडी कँपची आदर्श अशी जागा इमारतीसकट महाराजांनी त्यांनी दिली आहे. स्टेशन अगदी जवळ आहे. सॅनेटोरियम चालवण्याजोगी निरोगी कोरडी हवा, उघडा माळ ! पूर्वी खुद्द शाहू महाराज केव्हा केव्हा मुक्काम टाकीत. त्या वेळी ३।४ लाखांवरची ती इस्टेट असेल. तेथेही विहीर खणणे चाललेच होते. पाहून पाहून कंटाळलो. फिरून फिरून थकलो. पण भाऊरावांना थकवा कसला तो माहीत नाही. भाऊरावांच्या कार्याचा एकचतुर्थांशही अद्याप पाहिला नव्हता. इतर जिल्ह्यांत अद्याप गेलो नव्हतो.

भाऊराव फारसे शिकलेले नव्हते, म्हणून भावी पिढीला शिक्षित करण्याचे वेड लागले होते त्यांना.

भाऊराव ब्लडप्रेशरने सारखे आजारी पडत. संधिवाताने पाय सुजत. विश्रांती घ्यायचे नाहीत. त्यांची मला काळजी वाटायची. अशाच वेळी ते मला भेटले. का कोण जाणे आम्ही कडकडून भेटलो. माझे डोळे पाणावले. मी म्हणालो, 'भाऊराव, तुमचा माझा फोटो काढून घ्यावा असं वाटतंय मला.'

भाऊराव म्हणाले, 'मग चला तर लगेच.' आम्ही बराले फोटोग्राफर यांच्याकडे गेलो व फोटो काढून घेतला.

दुर्दैव ! मला वाटत होते तसेच झाले ! भीती वाटतच होती ! ! ! ते जास्त आजारी पडले. त्यांना ससून हॉस्पिटलमध्ये नेण्यात आले. तेथून मला पत्र आले.

'माधवराव तुम्हाला भेटण्याची इच्छा आहे.'

मी गेलो, भेटलो! पुन: भेटणार नाही म्हणून की काय भाऊरावांनी मला कडकडून मिठी मारली! हाय रे दुर्दैवा! ती अखेरचीच!!!

योगायोगच म्हणायचा.

ज्यांना मी वडील भावाप्रमाणे मानत आलो, त्यांच्याच अध्यक्षतेखाली त्यांच्याच हस्ते १५-८-४९ ला नगरपालिकेने मला मानपत्र दिले व भाऊरावांना 'पद्मभूषण' मिळण्याअगोदर उत्तर सातारा जिल्हा लोकल बोर्डाने माझ्या अध्यक्षतेखाली माझ्या हस्ते भाऊरावांना मानपत्र दिले. त्या वेळी बोर्डाचे अध्यक्ष वि. श्री. बाबर हे होते.

पुष्कळांना वाटले, आता भाऊरावांची संस्था कुठली टिकायला! ते असताना सुद्धा काही म्हणत, 'भाऊराव, एवढा पसारा कशाला वाढवता?' पण

या टीकेला त्यांनी कधी भीक घातली नाही. ते मला म्हणत,

'माधवराव, ही संस्था मी एकट्यानेच निर्माण केली. आता शेकडो विद्यार्थी तयार झाले आहेत. त्यांतले कोणीच येणार नसतील तर मरू दे संस्था. मी टॉर्च घेऊन असा पुढेच जाणार.'

त्यांची इच्छा मरणानंतर फलद्रूप झाली.

माझ्याच अध्यक्षतेखाली २२-१-६० ला त्याच संस्थेच्या बी. ए. १५; बी. ए., बी. टी. ४; एम. ए. ६; अशा पंचवीसांनी संस्थेला आजन्म वाहून घेण्याच्या शपथा घेतल्या.

यापूर्वी १९३७ साली भाऊरावांच्या हयातीत अशाच १२ लोकांनी विठ्ठल रामजी शिंद्यांच्या अध्यक्षतेखाली शपथा घेतल्या होत्या.

भाऊरावांनी सुरुवात केली त्या वेळी संस्थेचे अंदाजपत्रक ३५ रुपयांचे होते. आज संस्थेचा खर्च कोटीपर्यंत गेला आहे. शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ३०।४० हजारांहून जास्त आहे.

संस्थेचे आजचे अध्यक्ष संरक्षणमंत्री यशवंतरावजी चव्हाण हे आहेत.

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## १२. महर्षी विठ्ठल रामजी शिंदे

पाहताच त्यांचे पाय धरावेसे वाटले मला

प्रथमदर्शनीच माझ्या मनावर त्यांची विलक्षण छाप पडली. मी जात्या चित्रकार. माझ्या दृष्टीसमोर जणू पुरातन कालचा महामुनी उभा होता. चित्रात पाहिलेले आणि कल्पनेत तरंगत असलेले वसिष्ठ-वाल्मिकी ऋषी यांची ती चालती-बोलती साकार मूर्ती होती. आधुनिक काळात वावरत असलेल्या त्या मूर्तीने मला पुरातनकालात खेचून नेले.

ते धिप्पाड शरीर, भरदार छाती,- पण शरीराने बुद्धीवर मात केलेली नव्हती. विद्वत्तेचे तेज आणि गांभीर्य डोळ्यांत चमकत होते. त्यागाच्या तपश्चर्येने भोवती सात्त्विक वलय निर्माण केले होते. आदर आणि भीती एकाच वेळी वाटे. सामान्य माणूस नव्हे, पण सामान्यातून जन्मलेला, गरीबीतून वाढलेला. माता-पित्यांच्या धार्मिक संस्कारांतून घडण बनलेली. समभावचे शिक्षण जन्मत:च मिळालेले. कानडी मुलखात जन्मलेला-ब्राह्मणी राजवटीत आणि

संस्कारात वाढलेला. पाहताच भास व्हावा, कोणीतरी विद्वान शास्त्री-पंडित असावा.

हिमालयाच्या शिखरावरून खाली वाहत जाणाऱ्या शुभ्र निर्झराप्रमाणे तो केशसंभार, डोक्यापासून छातीच्या भव्य पठारावर पसरलेला. नाकावरील चष्म्याने त्यावर नवसंस्कृतीचा रंग चढला होता. खादीच्या पेहेरावामुळे त्यांचे राष्ट्रीयत्व, साधुत्व आणि गांधीजींचे अनुयायित्व प्रकट होत होते. यामुळे त्यांच्या वैचारिक बैठकीची कल्पना येत होती.

अहिंसा आणि क्षात्रधर्म यांचा संयोग होता तो. जणू सात्त्विक संताप आणि भूतदया यांचा समन्वय. विषमतेची चीड आणि समतेची भूक. शिवछत्रपतींच्या विषयीचा अभिमान आणि गांधीजींच्याविषयाची भक्ती; जणू दोन्ही तत्त्वांचा मिलाफ त्यांच्या ठिकाणी झाला होता. ओळखीपूर्वीच त्यांच्या वैचारिक बैठकीची कल्पना येत होती. सावळ्या रंगाने शुभ्र केशकलापाला विशेष उठाव चढला होता. त्यांचे विशाल भाल बौद्धिक उंचीची कल्पना देत होते. पुण्यात राहणारे हे विद्वत्श्रेष्ठ ब्रह्मवृंदात मोडले जात नव्हते. मराठा जातीचे होते ते. सत्यशोधक होते, पण सत्यशोधक समाजाचे सभासद नव्हते.

अशी ही विद्यालंकृत, सात्त्विक, त्यागी, कर्तृत्वसंपन्न मूर्ती माझ्यासमोर उभी होती. न कळतच माझी मान लवली आणि पायांचा स्पर्श करण्याकरता हात पुढे झाले.

पण पायाला हात पोचण्यापूर्वीच त्यांनी ते पकडले आणि वर उचलून प्रेमभराने म्हणाले.

'छे छे! माधवराव, असं नाही करायचं तुम्ही.'

असे म्हणून त्यांनी मला जवळ ओढून घेतले, पाठीवर हात टाकला आणि विचारले, 'केव्हा आलात माधवराव? अन् किती दिवस मुक्काम आहे तुमचा? उतरलात कुठे?'

मी त्यांना सारी हकीकत सांगितली. मी हद्दपारीवर होतो. ते म्हणाले, 'मला माहीत आहे सगळं. तुमचं कार्यही मला माहीत आहे. मी ज्ञानप्रकाश नियमित वाचत असतो.'

ज्ञानप्रकाशचे संपादक कै. पूज्य काकासाहेब, माझे राजकीय पिताजी. त्यांनी मला महाराष्ट्रीय जनतेसमोर आणले होते. कोल्हापूरचा पुढारी म्हणून पुढारीपण लाभण्यापूर्वीच त्यांनी मला पुढारी बनवले होते. याच वेळी पुण्यात पाऊल टाकताच, मी दिलेल्या खादीवरच्या व्याख्यानाला ज्ञानप्रकाशमध्ये सबंध

पानभर जागा देऊन माझे पुण्यातले वास्तव्य कोनाकोपऱ्यात पोचवले होते. माझ्या हद्दपारीची बातमी सर्वांना कळवली होती.

मी पुण्यास एका जवळच्या पाहुण्याकडे मला आसरा मिळावा, म्हणून उतरलो होतो. पण्!!!

मुंबईस कुठल्यातरी हॉटेलात राहावे, म्हणून जाण्याच्या विचारात होतो. जाण्यापूर्वी विठ्ठल रामजींचे दर्शन घ्यावे, म्हणून त्यांच्या भेटीस आलो होतो. माझी सारी हकीकत मी त्यांना सांगितली. त्यावर ते म्हणाले,

'मग माधवराव, तुम्ही दुसरीकडे राहताच कशाला? जा, असेल ते सामान घेऊन या. माझ्याकडे राहा तुम्ही.'

'पण अण्णासाहेब, मी एकटा नाही. माझी पत्नीही माझ्याबरोबर आहे.'

'मग फारच उत्तम झालं! त्यांनाही घेऊन या. आमच्या जनाक्काला फार बरं वाटेल!'

मलाही असा आधार आणि आसरा हवा होता. अशा थोर पुरुषाच्या संगतीचा लाभ मला मिळणार होता. मी त्याच क्षणी परत गेलो. बिस्तारा गुंडाळला आणि पत्नीसह अण्णासाहेबांच्या पवित्र सान्निध्यात येऊन राहिलो. घरोबा अन् पाहुणेपणा नसतानाही दाखवलेली आत्मीयता माझ्या आयुष्यातली एक अभिमानास्पद अशी गोष्ट होय.

भगिनी जनाक्का ही एक संस्थाच होती. त्यांचेही जीवन सेवामयच होते. विदुषी नसल्या तरी सुसंस्कृत होत्या. आपल्या भावाची कोण काळजी घेत! त्यांच्या समाजसेवेतही भाग घेत. त्यांच्या बरोबर प्रार्थनेला जात. हरिजनांना आपले मानीत.

जनाक्कांचा पाहुणचार किती मोलाचा! त्यांनी आग्रह करकरून एक एक दिवस वाढवून घेतला. स्वत:च्या हाताने तयार केलेले मिष्टान्न खाऊ घातले. घरी स्वयंपाकीण नव्हती. नोकर नव्हते! विठ्ठल रामजींनी गरिबीचे व्रत स्वीकारले होते. सर्व घराण्यानेच ते सेवाव्रत पत्करले होते. आईबापही तसेच धार्मिक व अभ्यासू वृत्तीचे. वडिलांना ब्राह्मणी राज्यात कारकुनी मिळालेली हे विशेष. वडिलांना धर्मशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वैद्यकशास्त्र वगैरे विषयांची तांत्रिक माहिती. ब्राह्मणी शिक्षणाचे व संस्कृतीचे वळण अंगात मुरलेले. पोषाखात ब्राह्मणी झाक. मराठी, कानडी सफाईने बोलत. घरी जातिभेद पाळला जात नव्हता. मनात ती तेढ नव्हती. जन्म २३ एप्रिल १८७३ त जमखिंडी या

ब्राह्मणी संस्थानात झालेला. यांची जात मराठा. बाप ब्राह्मण राजाच्या नोकरीत-लोक कानडी बोलणारे. अशा संस्कारात वाढलेल्या अण्णासाहेबांच्यात जातिद्वेष साहजिकच नव्हता. परधर्म-सहिष्णुतेचे धडे घरीच मिळालेले. यामुळे अण्णासाहेब सांप्रदायिक सत्यशोधक होऊ शकले नाहीत. समभावाचे शिक्षण घरीच मिळालेले.

अशा या बंधुभगिनींच्या पवित्र सहवासात राहण्याची संधी आम्हा दोघांना मिळाली.

उच्च शिक्षण, उच्च संस्कार, उच्च ध्येयवाद, सात्त्विक संन्यस्त त्यागी जीवन म्हणजे विठ्ठल रामजी. विठ्ठल रामजींचे जीवन निग्रही, करारी व कसल्याही क्लेशासन डगमगणारे होते. हे खालील उदाहरणावरून दिसून येईल:

विठ्ठल रामजींनी आपण यातना किती सहन करू शकतो, हे अजमावून पाहण्याकरता व्यंकू कुलकर्णी नावाच्या एका इसमाला जळती उदकाडी उजव्या हाताच्या पंजाच्या मागील बाजूवर ठेवण्यास सांगितली. ती जळत आत गेली. तरी त्यांनी हूं का चू केले नाही. तो डाग अखेरपर्यंत त्यांच्या हातावर राहिला होता.

यावरून त्यांनी गरिबांचे जीवन व सक्तमजुरी किती न कुरकुरता भोगली असेल याची कल्पना येते.

पुण्यातल्या सहवासानंतर त्यांनी अखेरपर्यंत मजवर लोभ ठेवला. कोल्हापूरला आल्यानंतर ते नेहमी गुरुवर्य सासणे मास्तरांच्या आश्रमात उतरत. आमच्याही घरी येत. डॉ. कृष्णाबाई केळवकर यांच्या ताराबाई पार्कवरील बंगल्यात प्रार्थनेला बोलावून घेत.

तो अखेरच्या भेटीचा प्रसंग माझ्या डोळ्यांपुढून अद्यापही दूर होत नाही!

ते प्रेम! ती सदिच्छा! तो आशीर्वाद! जणू परमेश्वराचीच कृपा!

अखेरची दहा वर्षे ते अंथरुणाला खिळून होते. त्या विकल अवस्थेत, शरपंजरी पडलेला तो भीष्माचार्य मला पाहून कसाबसा उठून उभा राहिला! अंग थरथरत होते! हात कापत होते. उभे राहण्याची शक्ती नव्हती! मी आत गुदमरून गेलो! आपण आता फार दिवसांचे सोबती नाही ही त्यांना जाणीव आली होती. त्यांनी मला हृदयाजवळ ओढून धरले आणि आशीर्वाद दिला.

'माधवराव, तुम्ही मोठे व्हाल बरं! तुमची स्मारके उभारली जातील.'

तुमचा हा आशीर्वाद हजारो स्मारकांहून मी मोलाचा समजतो.

अण्णासाहेब, तुमचा हा आशीर्वाद फुकट गेला नाही. काही अंशी तो

सफल झालाही आहे.

पण! महाराष्ट्रातल्या या थोर पुरुषाला मराठा समाजही विसरला!! ज्या दलितांच्या उद्धाराकरता त्यांनी तनमनधन खर्ची घातले, प्रचाराकरता भारत पालथा घातला, अनेक ग्रंथ लिहिले, तो दलित समाज सर्वस्वी विसरला! सरकार विसरले! जनतेने त्यांचे कोणत्याही स्वरूपात उभारलेले स्मारक मला तरी माहीत नाही.

कोल्हापूर तेवढे याला अपवाद आहे.

माझे परममित्र दत्ता शिंदे यांनी कोल्हापूरला जागे केले आणि नगरपालिकेच्या सभासदांच्या पाठीमागे लागून म्युनिसिपालिटीच्या आतील आवारास **'शिंदे चौक'** हे नाव दिले. आज म्युनिसिपल शाळा त्यांची जयंती साजरी करीत आहे. नगरपालिकेप्रमाणेच जिल्हा परिषदही सुट्टी देऊन ती साजरी करीत आहे.

त्यांची साकार मूर्ती मात्र कुठे दिसत नाही!

पहिला पाहुणचार आणि नंतरची अखेरची भेट यादरम्यानच्या काळात अनेक भेटीगाठी झाल्या.

कोल्हापुरात भाषणबंदी होती. म्हणून मी सरहद्दीपलीकडील सातारा जिल्ह्यातील वाळवे तालुक्यात प्रत्येक खेड्यात व्याख्याने देऊन जागृती केली होती व सर्व तालुक्यातील शेतकरी संघटित करावा म्हणून आत्माराम पाटलांच्या सहकार्याने शेतकरी परिषद भरवण्याचे नक्की केले व परिषदेचे अध्यक्ष विठ्ठल रामजींनी व्हावे म्हणून त्यांना आमंत्रण देण्यास मी पुण्यास गेलो. त्यांनी लगेच मान्यता दिली. मी स्वागताध्यक्ष होतो. आत्माराम पाटील सेक्रेटरी होते.

विठ्ठल रामजींना माझे भाषण फार आवडले. त्यांनी माझी पाठ प्रेमाने थोपटली व म्हणाले,

'माधवराव, तुमचे भवितव्य फार मोठं आहे. तुमचे विचार मला फार आवडले. ते विशिष्ट वर्गाला नावडते असले, तरी फार पुरोगामी आहेत.'

त्या चार शब्दांनी मला किती म्हणून उत्साह वाटला. ती परिषद भरली जाऊ नये म्हणून कऱ्हाडच्या ब्राह्मण पुढाऱ्यांनी पुष्कळ प्रयत्न केला. हे कोल्हापूरचे सत्यशोधक पिलू आपल्यात बिघाड आणतेय, तरी सावध राहा म्हणून प्रचार केला. कारण, सातारा जिल्हा कॉंग्रेस परिषदेत, अणे अध्यक्ष असताना मी आणलेले ठराव त्यांना सत्यशोधकी वाटले! यशवंतरावजी

चव्हाण त्या वेळी स्वयंसेवकाच्या भूमिकेत त्या सभेला हजर होते. निव्वळ बँकेइतके व्याज सावकारांनी आकारावे हा ठराव पांढरपेशांना क्रांतिकारक वाटला! पण तो तेथे त्यांच्या विरोधाला नामोहरम करून प्रचंड बहुमताने पास झाला.

त्याच अनुरोधाने स्वागताध्यक्ष म्हणून शेतकरी परिषदेत माझे भाषण झाले. ६-६-३१ ला ही परिषद पार पडली.

'हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाले, पण शेतकऱ्यांवरचा डोईजड सारा व अप्रमाणशीर खंड कायम राहिला. सावकारी पकड ढिली पडली नाही तर ते स्वातंत्र्य बिनकष्टाळू वर्गाच्याच फायद्यात पडणार. गोरी नोकरशाही जाऊन काळी भांडवलशाही स्थापन करणे हा स्वराज्याचा हेतू नव्हे. आर्थिक समता हाच खरा उपाय आहे व त्या धोरणाने आपला प्रयत्न चालला पाहिजे.'

हा माझ्या भाषणाचा सारांश होता. विठ्ठल रामजींच्या अध्यक्षीय भाषणात हाच सूर उमटला. माझ्या भाषणाची स्तुती विठ्ठल रामजी जेथे तेथे करू लागले.

त्यांनी एका ठिकाणी त्या वेळच्या राजकारणाबद्दल उद्गार काढले,

'भारतीय राजकारण म्हणजे सुशिक्षितांची आणि काही भांडवलदारांची चळवळ! अफाट शेतकरीवर्ग, मजूरवर्ग व एकंदरीत बहुजन समाज कोणत्याही सार्वजनिक चळवळीला पारखा होता. ही चळवळ खालच्या वर्गामध्ये आली नव्हती.'

म्हणूनच सातारा जिल्हा काँग्रेसमध्ये मी खालच्या वर्गाला अनुकूल असा ठराव आणल्यामुळे ब्राह्मण वर्गाची डोकी भडकली, व वाळवे तालुका शेतकरी परिषद होऊच नये म्हणून त्यांनी खटपट केली. पण त्यांना यश आले नाही व त्याहीपुढचे ठराव वाळवे तालुका शेतकरी परिषदेत मी पास करून घेतले.

अध्यक्ष व स्वागताध्यक्ष, दोघांच्या भाषणातील आशय एकच होता. त्यामुळे विठ्ठल रामजी व मी वैचारिक दृष्ट्या फार एकमेकांजवळ आलो.

मी 'सत्यशोधकांना इशारा' हे पुस्तक लिहिले होते. त्या पुस्तकाला मला अण्णासाहेबांची प्रस्तावना हवी होती. त्यांनी मला लिहिले, 'पुण्यास या. आपण वाचू, विचार करू, मगच मी प्रस्तावना लिहीन.' त्याप्रमाणे मी गेलो. आठवडाभर त्यांच्या घरी राहिलो. सर्व हस्तलिखित वाचून दाखवले, वाटाघाटी केल्या. त्यांनी काही सूचनाही केल्या आणि मग त्यांनी प्रस्तावना लिहिली. ती अशी:-

माझे तरुण मित्र 'हंटरकर्ते' श्री. माधवराव यांनी हे छोटेसे सुंदर पुस्तक लिहिले आहे...त्यांनी आपले अभिनव विचार महाराष्ट्रातल्या बहुजन

समाजाच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न केला आहे, तो केवळ अभिनंदनीय होय...सत्यशोधक समाजाचे एक सभासद असूनही पुन: त्या समाजाला इशारा देण्यास व त्याची कार्यव्याप्ती वाढवण्यास ते तयार आहेत यावरून ते सत्याग्रही ठरतात. अर्थकारणाची धडाडी माधवरांच्या या छोट्या पुस्तकातच नव्हे तर त्यांनी अलीकडे स्वीकारलेल्या जनसेवेच्या कार्यक्रमातही स्पष्ट दिसत आहे. नुकतेच त्यांनी घडवून आणलेल्या 'वाळवे तालुका शेतकरी परिषद' व सातारा जिल्हा काँग्रेस परिषदेत त्यांनी आणलेल्या व्याजाबद्दलच्या ठरावात त्यांची ही आर्थिक वृत्ती दिसून येते.'

२३ जून १९३१ **-विठ्ठल रामजी शिंदे**

पुन: आम्ही दोघे आणखी एका बाबतीत जवळ आलो. ती म्हणजे संस्थानी प्रश्न.

काँग्रेसने संस्थानी प्रश्न हाती घेतलेला नव्हता. संस्थानी चळवळीस अधिकृत पाठिंबा दिला गेला नव्हता. तरी तो आम्हा संस्थानी प्रजेचा जीवनमरणाचा प्रश्न होऊन राहिला होता. भोर संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्ष होऊन त्यांनी या प्रश्नाला वाचा फोडली होती. विठ्ठल रामजींच्या नंतर त्या संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्षपद मला देण्यात आले होते.

मी व माझे वडील खंडेराव गोपाळराव बागल यांनी काढलेल्या 'हंटर' नावाच्या मराठी साप्ताहिकात विठ्ठल रामजींनीही-'मराठ्यांची पूर्वपीठिका व क्षात्रधर्म' ही लेखमाला चालू केली होती. ते लेख त्यांच्या वैचारिक उंचीची, संशोधनाची व अभ्यासू वृत्तीची व अगाध विद्वत्तेची साक्ष देत होते.

ते शिवछत्रपतींचे तितकेच महात्मा गांधीजींचे भक्त होते.

क्षात्रधर्म या लेखमालेत क्षात्रधर्मापासून अहिंसा बाजूला काढता येत नाही असे त्यांनी प्रतिपादन केले आहे. ते लिहितात:

'तोंडाने अहिंसा मंत्र पाठ करणारे गांधीजीही शिवाजीच्या क्षात्रधर्मानेच निघाले आहेत. अहिंसा हा धर्म नसला तरी ते धोरण नेहमी राखण्याची खबरदारी इतरांनी तर काय पण अस्सल अधिकारी क्षत्रियांनीही राखणे भाग आहे. म्हणूनच शूर क्षत्रियांमध्येही क्षमा हा गुण गणला आहे. क्षमेचा आणि जितेंद्रियत्वाचा काटेरी मुकुट धारण केल्याशिवाय क्षात्रधर्माची दीक्षा घेण्याला कोणीही मुळीच पात्र नाही. अहिंसा हा गाधींजींचा धर्म असो किंवा धोरण असो; तेदेखील मरणाला भीत नाहीत. मग ते स्वत:चे असो किंबहुना दुसऱ्याचे असो!'

अलीकडच्या मराठा समाजात व महाराष्ट्रात एवढी थोर व्यक्ती होऊन गेलेली नाही व अद्याप जन्माला आलेली नाही. हे विधान मुळीच धाष्ट्र्याचे होणार नाही.

त्यांच्यात टिळकांची विद्वत्ता, निस्पृहता, निर्भयता, जाज्वल्य देशभक्ती, संशोधकवृत्ती होती. पण त्यांत सामाजिक प्रतिगामित्व नव्हते. उच्चवर्णियांच्याबद्दल विठ्ठल रामजींच्यात द्वेष नव्हता, पण खालच्या समाजाच्या दारिद्र्याबद्दल व पिळवणुकीबद्दल चीड होती. टिळकांनी सावकारांची बाजू घेतली होती. अस्पृश्यांना त्यांनी जवळ केले नाही. खालच्या वर्गात विश्वास निर्माण केला नाही. तर विठ्ठल रामजी अस्पृश्यांच्या वस्तीतच जाऊन राहिले. भारतात हे पहिलेच उदाहरण ठरेल. त्यानंतर गांधीजींचे-ते पण हरिजन वस्तीत राहिले.

आगरकर-लोकहितवादींची सामाजिक सुधारणेविषयीची तळमळ विठ्ठल रामजीत होती, त्याच वेळी देशस्वातंत्र्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याची वृत्ती व त्याला अनुसरून कृतीही होती.

चिपळूणकरांची विद्वत्ता त्यांच्यात होती. भाषाप्रभुत्व होते. भाषाशास्त्राचा गाढ अभ्यास होता. पण विद्वत्तेची घमेंड नव्हती. खालच्या समाजाबद्दलचा अनुदारपणा नव्हता. कुत्सित मन नव्हते. मनाचा उमदेपणा होता. पित्याप्रमाणे अस्पृश्यांना जवळ केले. कर्व्यांची विधायक वृत्ती होती. पण कर्व्यांनी खालच्या समाजाविषयी दाखविलेली तुटक वृत्ती व सोवळेपणा नव्हता. विठ्ठल रामजींच्या भगिनी जनाक्का यांनाच त्या मराठा म्हणून कर्व्यांनी आपल्या संस्थेत घेतले नाही. म्हणून ते भाऊराव पाटलांना पूज्य आणि आदरणीय वाटत. केशवराव जेध्यांची धडाडी, बेडरवृत्ती, प्रामाणिकपणा व निर्मळ हृदय होते; पण त्यांचा एकांगीपणा, आग्रही वृत्ती व विरोधकांवर प्रखर हल्ले करून जर्जर करण्याचा कठोरपणा नव्हता. फुल्यांचा विशाल आत्मा होता, पण कडवी भाषा नव्हती. भास्करराव जाधवांची संशोधनाची आवड व वैचारिक प्रामाणिकपणा होता, पण कंजूषपणा नव्हता. दुसऱ्यासाठी कष्ट आणि घस सोसण्याची तयारी होती. भाऊरावांच्या अफाट कार्याला त्यांनी अफाट विद्वत्तेची जोड दिली होती. साधी रहाणी व उच्च विचारसरणीचा तो जणू आदर्श.

म्हणूनच मी म्हटल्याप्रमाणे अलीकडच्या मराठा समाजात व महाराष्ट्रात एवढा मोठा दुसरा माणूस जन्माला आला नव्हता व अद्याप आलेला नाही.

मुलींना सक्तीचे शिक्षण दिले जावे या कर्मवीरांच्या चळवळीला टिळकांनी विरोध केला तरी टिळकांच्या राजकारणाला विठ्ठल रामजींनी पाठिंबा दिला. १९०८ साली टिळकांना शिक्षा झाली. त्या वेळी यांनी त्यांच्यासाठी प्रार्थना केली. त्याबद्दल भांडारकरादींनी त्यांच्यावर टीका केली, पण ती त्यांनी मानली नाही. उलट काँग्रेसमध्ये गेले. सत्याग्रह केला व सहा महिने आनंदाने सक्तमजुरी भोगली. त्या वेळी मुंबई सरकारचे मंत्री भास्करराव जाधव त्यांना सोडवून आणण्याकरता तुरुंगात त्यांच्या भेटीस गेले असता त्यांनी नकार दिला.

काँग्रेसमध्ये गेले, पण अस्पृश्यांना विसरले नाहीत, शेतकऱ्यांना विसरले नाहीत.

अस्पृश्यता निवारणाचा ठराव आणण्याकरीता सतत दहा वर्षे खटपट केली. अखेर कलकत्ता येथे भरलेल्या अधिवेशनाच्या अध्यक्ष ॲनी बेझंट यांची सहानुभूती मिळवून अस्पृश्यता-निवारणाचा ठराव पास करून घेतला. तो खालीलप्रमाणे:

'ही राष्ट्रीय सभा हिंदुस्थानातील सर्व लोकांस जाहीर विनंती करते की, अस्पृश्य वर्गावर जो अनन्वित जुलूम होत आहे तो ताबडतोब बंद करण्यात यावा.'

त्यांनी आपल्या आयुष्यातला मोठा भाग अस्पृश्यांच्या सेवेतच खर्चला व त्यांच्या वस्तीतच राहून ते स्वत: त्यांच्यापैकीच एक झाले. त्यांच्या सुखदु:खांशी समरस झाले.

त्यांच्यासाठी अनेक ग्रंथ (१) Untouchable India (२) History of Pariahs (३) बहिष्कृत भारत (४) भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न. ही पुस्तके निव्वळ अस्पृश्यांसाठी लिहिली.

मांग जातीबद्दलच्या संशोधनाने त्या जातीचा दर्जा त्यांनी वाढवला, तो लेख २१-८-२५ ला त्यांनी आमच्या 'हंटर' साप्ताहिकातच दिला होता :

'कोल्हापूर येथे पूर्वी जैन राजे होते. त्यांनी मांग लोकांकडून हे राज्य घेतले. मांग लोकांना पुढे पुढे मातंग असे संस्कृत भपक्याचे नाव पडले. कोल्हापूरची महालक्ष्मी देखील त्या मांग क्षत्रिय राजांची देवी असावी. 'मांगलीश' या चालुक्य राजाने मांग राष्ट्राला सन ४८९ आणि ५३२ ह्याच्या दरम्यान जिंकले. म्हणूनच कदाचित त्याला मांगल+ईश= मांगलीश हे नाव पडले असावे. माकुटेश्वर नावाचा देव आणि मरीआई ही देवीही मूळ ह्या पराक्रमी मांग राज्यातलीच होय. हल्लीच्या बदामी गावाजवळ ह्या माकुटेश्वराचे देऊळ होते.

त्या देवळाजवळ मांगलीश राजाच्या एका जयस्तंभावरील शिलालेखही उपलब्ध आहे.'

ही संशोधनाच्या दृष्टीने मांग जातीची सेवा त्यांना केवढी अभिमानास्पद आहे. १९१७ त त्यांनी सयाजीराव महाराज यांच्या अध्यक्षतेखाली अखिल भारतीय अस्पृश्य परिषद भरवली. त्या परिषदेला टागोर व महात्मा गांधींचेही शुभसंदेश आले. पण **द्वारकापीठाच्या शंकराचार्यांनी विठ्ठल रामजी शिंदे व सयाजीराव महाराज हे आधुनिक काळातील महान कलिपुरुष आहेत म्हणून निषेधात्मक तार पाठवली.**

डिप्रेस्ड क्लास मिशन या संस्थेतर्फे देशभर ज्ञानप्रसाराचे काम केले.

१९०१ मध्ये 'युनेटेरियन' शिष्यवृत्ती घेऊन इंग्लंडला गेले. त्या वेळी त्यांना सयाजीराव महाराजांनीही साहाय्य केले.

मँचेस्टर विद्यालयात त्यांनी तुलनात्मक धर्मशास्त्राचा अभ्यास केला. लिव्हर पूल व ॲमस्टरडॅम येथे 'युनेटेरियन' परिषदेस हजर राहिले व दुसऱ्या १९०३ च्या परिषदेत 'लिबरल रिलिजन इन इंडिया' हा प्रबंध वाचला.

ते उदारमतवादी होते. कोणत्याही एका धर्माला चिकटून राहण्याची त्यांची वृत्ती नव्हती. विजापूर येथे दिलेल्या व्याख्यानावरून ती कल्पना येईल :

'व्यक्तीची उन्नती करणे हे प्राचीन हिंदू धर्माचे लक्षण आहे. आणि केवळ समाजाच्या उन्नतीकरता झटणे हे आधुनिक ख्रिस्ती धर्माचे लक्षण आहे. या दोन्हींचा गोड मिलाफ करण्याची हाव प्रार्थना समाज बाळगीत आहे.'

प्रथम ब्राह्म धर्माच्या प्रचारासाठी त्यांनी तीन वेळ भारतीय दौरा काढला. पण ब्राह्मो हे बहुजन समाजापर्यंत पोचले नाहीत. बड्या बड्या धनिक आणि विद्वानांपुरतीच त्यांची मर्यादा राहिली; ती विठ्ठल रामजींनी प्रार्थना समाज स्थापून खालपर्यंत पोहोचवली - त्यासाठी ते अनेक वेळा कोल्हापुरास येत असत. मीही त्यांच्या प्रार्थनेला हजर राहात असे.

मराठ्यांतील संकुचित वृत्ती नाहीशी करून त्यांच्यात राष्ट्रीय वृत्ती आणावी, म्हणून त्यांनी 'राष्ट्रीय मराठा संघाची' स्थापना केली :

शिंद्यांना राष्ट्रीय मनोवृत्ती प्रिय होती. त्यांचा मराठ्यांना असा सल्ला असे की, मराठ्यांनी सरकार किंवा ब्राह्मण चळवळे यांच्या पंखाखाली न जाता आपला स्वतंत्र संघ काढावा व राष्ट्रसेवा करावी. त्याप्रमाणे १९१७ साली, त्यांनी 'मराठा राष्ट्रीय संघ' स्थापन केला. या संघातर्फे दोन चार अखिल भारतीय

परिषदाही झाल्या.

ब्राह्मणेतर समाज जो राजकीय चळवळीत पडला त्याला विठ्ठल रामजी शिंदे व केशवराव जेधे यांचा पुढाकार व सहानुभूतीही कारणीभूत झाली.

*- सत्याग्रही महाराष्ट्र, ले. प्रेमा कटक, पान ११७.*

'मराठ्यांचे हितसंबंध वेगळे आहेत असे कित्येक म्हणतात; पण त्यांचे हितसंबंध वेगळे ते काय असणार? सगळ्या महाराष्ट्राचे हितसंबंध, तेच मराठा जातीचे हितसंबंध. स्वराज्याची तृष्णा सर्वांना सारखीच आहे. ती बोलून दाखवण्याचे काम 'राष्ट्रीय मराठा संघ' करील'.

ब्राह्मणेतर पक्षाबद्दल ते म्हणतात -

'नवीन होऊ घातलेला ब्राह्मणतेरवाद ऐक्याला फार घातक होईल. अस्पृश्यांची अद्याप नीटपणे जागृती न झाल्यामुळे त्यांची दिशाभूल होईल. अस्पृश्यांची जागृती तर व्हावी; पण त्याने राष्ट्राच्या ऐक्याच्या चळवळींपासून फुटून वेगळे व्हावे हे श्रेयस्कर नव्हे.'

**असा 'महात्मा' उपेक्षित का ?**

यांना सर्वच का विसरले? यांची ठिकठिकणी स्मारके व्हायची; पण कोठेच का नाहीत? (कोल्हापूरचा अपवाद सोडला तर) जयंती अगर पुण्यतिथी साजरी का होत नाही?

काँग्रेसमध्ये गेले; तिला मोठी केली. गांधीजींनी त्यांना कार्यकारी मंडळात घेतले. त्यांच्या आदेशाप्रमाणे तुरुंग भोगला. तरी मोठ्या मंडळींत राष्ट्रपुरुषांत काँग्रेसही त्यांची गणना करीत नाही.

याचे कारण तरी काय?

माझ्या मते त्यांच्यातील संकुचित वृत्तीचा अभाव हेच त्याचे कारण.

त्यांची धर्मभेदातीत - जातिभेदातीत - पक्षभेदातीत व्यापक आणि उदात्त वृत्ती हेच त्याचे कारण!

* उच्चवर्णीय त्यांना मानीत नाहीत; कारण उच्चवर्णियांच्या छापापासून आपली चळवळ बाजूस ठेवा असा ते उपदेश करीत होते.

* सत्यशोधक समाज का मानीत नाही? कारण ते सत्यशोधक होते पण सांप्रदायिक सत्यशोधक नव्हते.

* मराठे त्यांना आपले का मानीत नाहीत? कारण त्यांच्यातला जातिवाद मारून महाराष्ट्रातला तो मराठा ही भूमिका त्यांनी घेतली होती म्हणून.

* ब्राह्मणेतर का मानीत नाहीत ? त्यांना ते नाव, ती फुटीर वृत्ती, ब्राह्मण जातीपासूनचा अलगपणा व द्वेषाचा वास सहन होत नव्हता म्हणून.

* टिळकाइटसना नावडते का ? तर ते कट्टर समाजसुधारक होते म्हणून.

* मवाळांना का मान्य नव्हते ? तर ते जहाल राजकारणी होते म्हणून.

* आणि सारी हयात अस्पृश्यांच्या सेवेकरीता घालवून त्यांना ते आपला पुढारी का मानीत नव्हते ? त्यांना दुसऱ्या जातीचा पुढारी मान्य नव्हता म्हणून.

* साहित्यिक, भाषाशास्त्रज्ञ, ललितलेखक, संशोधक असून साहित्य परिषदेला का मान्य नव्हते ? भास्करराव जाधव, अर्जुनराव केळुसकर, केशव सीताराम ठाकरे ज्या कारणासाठी बाजूला सारले गेले त्याच कारणासाठी विठ्ठल रामजी मान्य झाले नाहीत.

पण ज्या उच्चवर्णियांनी महात्मा फुल्यांचा कमालीचा द्वेष केला त्यांचा थोरपणा आता मान्य होत चालला आहे.

ज्या वेळी विठ्ठल रामजींना अखिल भारतीय मान्यता द्यावी लागेल, असा काल निश्चितच येईल. त्यांच्याबद्दल भारतभूषण **यशवंतरावजी चव्हाण'** म्हणतात -

महर्षी शिंद्यांनी आपल्या हयातीत केलेली धार्मिक, सामाजिक, ऐतिहासिक व राजकीय क्षेत्रातील कामगिरी आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासात अद्वितीय गणली जाईल.'

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर

महाराष्ट्राच्याच नव्हे, भारताच्याच नव्हे, तर जगाच्या इतिहासातला डॉ. आंबेडकर म्हणजे एक महान चमत्कार होय; अद्भुत होय. न भूतो न भविष्यति असाच हा चमत्कार होय. पण तो काही आकस्मिक घडलेला नव्हे. तो ईश्वरी चमत्कार नव्हे ! स्वकष्टाने, स्वत:च्या बुद्धिमत्तेने व कर्तृत्वाने संपादन केलेली ती प्रचंड शक्ती होय, प्रचंड संघटना होय ! दलितांच्या अनन्वित छळातून बाहेर पडलेला तो ज्वालामुखी होय.

भारताला हादरा देणारी ही शक्ती एका व्यक्तीच्या कर्तृत्त्वातून निर्माण झाली. जगाच्या इतिहासात असे उदाहरण मिळणार नाही !

ज्या हिंदू धर्मियांना - चातुर्याने आणि दुष्ट हेतूने, ब्राह्मणांव्यतिरिक्त सर्व समाजाला अज्ञानी बनवून आणि राखून अंकित ठेवले, गुलाम बनविले, पशुवत मानले, त्या समाजाला त्या गुलामगिरीच्या नरकातून वर काढून बाबासाहेबांनी माणसात आणले व बरोबरीचा सामना द्यायला उभे केले, त्या शक्तीचे वर्णन कोणत्या शब्दानी करावे?

अशी एवढ्या समाजाची पोलादी संघटना, यापूर्वी कोणी केली नव्हती. जगात असे उदाहरण सापडणार नाही. आपल्या एका आयुष्यात एवढी किमया करणारी, स्वाभिमान जागा करून लढ्यास उद्युक्त करणारी व्यक्ती, म्हणजे बाबासाहेब आंबेडकर होय. विद्वत्तेने, कर्तृत्त्वाने, कीर्तीने त्यांनी भारतातील सर्व पुढाऱ्यांना मागे टाकले! गांधी-नेहरूंच्या बरोबरचे स्थान मिळवले, ते अधिक कष्टाने. प्रतिकूल परिस्थितीतून असंतोषाच्या कोठारातून आकाशाला जाऊन भिडणारा तो आगीचा लोळ होता! सर्व जगाला आश्चर्यचकित करून टाकले त्यांनी!

म्हणून सहा कोटी अस्पृश्य त्यांना आपला त्राता, भगवान मानतो. यात अस्वाभाविक ते काय? कारण यापूर्वी अशी व्यक्ती निर्माणच झाली नव्हती.

अशा या थोर व्यक्तीच्या सान्निध्यात थोडा वेळ मी बसलो. त्यांनी मला मुद्दाम माणूस पाठवून देऊन बोलावले! काही इच्छा व्यक्त केली. अन् त्या वेळी बागल मंत्रिमंडळाकरवी ती पार पाडली गेली हे मी भाग्य समजतो. त्यांच्याबरोबर जेवलो- मुंबईस, सेंट्रल स्टेशनच्या डब्यात. दिल्लीहून आले म्हणजे ते त्या डब्यातच मुक्काम करीत. यापलीकडे त्यांचा माझा संबंध आला नाही.

मात्र त्या वेळी ते मला म्हणाले, अगदी घरगुती भाषेत, अगदी मोकळ्या मनाने-

'माधवराव, या लेकाच्यांना भिता कशाला? तुमच्या समाजाची संघटना करताना तुमच्यावर ते जातिवादाचा आरोप करतील एवढेच ना? करू देत. माझ्यावर नाही करत? एवढा प्रचंड बहुजन समाज जातिवादी असूच शकत नाही. ती संघटना मजबूत होऊ द्या. ते तुमच्या पाया पडत येतील.'

पण ती तेवढी शक्ती माझ्यात नव्हती. तो आत्मविश्वास नव्हता. म्हणून मी स्तब्ध बसलो!!

पण एक अत्यंत पवित्र गोष्ट माझ्या हातून झाली. त्याचा मला अभिमान वाटतो. त्यांचा पुतळा भारतात त्यांच्याच हयातीत प्रथम बसवला.

तो माधवराव बागलांच्या प्रयत्नाने - माझ्याच अध्यक्षतेखाली. आणि तो ते स्वत: पाहूही शकले.

त्यांचे जीवन म्हणजे हालअपेष्टा, यातना आणि अपमान! या चिखलातून त्यांनी डोके वर काढले. चिखलातून वर आलेले ते कमळपुष्प नव्हे ! अपमानाला, अवहेलनेला, गुलामगिरीला जाळून टाकणारा भडाग्नी होता तो ! त्यात मार्दव नव्हते ! विरोधाची दंड ठोकून उभी राहणारी भीमशक्ती होती ती !

अशा हालातून कोणताही पुढारी गेला नसेल! दारिद्र्य हा तर अस्पृश्यांचा जन्मसिद्ध हक्क!! त्याबरोबर तर लढावे लागलेच! पण त्यावर त्यांनी अखेर मात केली. अन् ज्या ब्राह्मणाने त्यांना पशू मानले त्याच वर्गातील एका स्त्रीने त्यांना माळ घालावी व ज्यांनी मनुस्मृती पायाखाली तुडवून जाळली त्या मार्टिन लूथरने भारतात दुसरी आंबेडकर स्मृती (भारताची राज्यघटना) तयार करून द्यावी व तिला राजमान्यता मिळावी हा केवढा विलक्षण योगायोग ! दैवी नव्हे !

त्यांच्या प्राथमिक जीवनापासून तो ते पदवीधर होईपर्यंत त्यांच्या हालाची अन् अपमानांची यादी किती म्हणून द्यावी ? त्याला सीमा नाही. शाळेत जाण्यापूर्वीपासूनच अपमानांची परंपरा सुरू झाली.

अस्पृश्याचे पोर म्हणून समजताच गाडीवानाने त्यांना बाहेर फेकून दिले. तहानेने जीव व्याकुळ झाला, तेव्हा गटारातील पाणी त्यांना दाखवले ! नळावरचे पाणी प्यायला गेले म्हणून पाठ काळी होईपर्यंत बडवले ! रेड्या-म्हशीचे केस काढणारा हजाम त्यांचे केस काढायला तयार झाला नाही ! म्हणून त्यांची बहीण त्यांचे केस कापी ! शाळेचे मास्तर त्यांच्या पुस्तकाला हात लावत नव्हते. वरच्या वर्गातील मुले शाळेतील फळ्याला हात लावू देत नव्हती. शिक्षकांनी त्यांना 'शिक्षण सोडून दे' म्हणून उपदेश केला. संस्कृत शिकण्यास परवानगी नव्हती. कारण शूद्रांनी वेद पठण करायचे नाहीत किंवा ऐकायचे नाहीत, ही धर्माज्ञा ! पण आंबेडकर स्वत:च्याच प्रयत्नाने व शाळेबाहेरच्या मदतीने संस्कृत शिकले व शास्त्री पंडिताला शिकवण्याइतके ज्ञान आणि प्रावीण्य त्यांनी संपादन केले. १९०७ साली एलफिस्टन हायस्कूलमधून मॅट्रिक झाले व पर्शियन भाषेत पहिले आले. पुढे शिवचरित्रकार केळुसकरांनी सयाजीराव महाराज, बडोदे यांच्याकडून २५ रु. स्कॉलरशिप मिळवून दिली. प्रो. मुल्लरनी आपली पुस्तके उसनवार देऊन

कपडे दिले, पण त्या कॉलेजचा हॉटेलवाला ते अस्पृश्य म्हणून त्यांना चहा देत नव्हता. यातून ते १९१२ साली बी. ए. झाले. बडोदा संस्थानात त्यांना लेफ्टनंटची जागा देण्यात आली. १५ च दिवस नोकरी केली. पण वडील आजारी असल्याची तार आल्यामुळे नोकरी सोडून घरी गेले. यानंतर संस्थानात १० वर्षे नोकरी करण्याच्या अटीवर त्यांना पुढील शिक्षणाकरता सयाजीराव महाराजांनी अमेरिकेस १९१३ त पाठवले. १९१५ त एम्. ए. व नंतर कोलंबिया युनिव्हर्सिटीचे पीएच. डी. झाले. विलायतेहून पदवी घेऊन परत आलेल्या आंबेडकरांना बडोद्यातील हिंदू हॉटेलात जागा मिळाली नाही, म्हणून पार्शी हॉटेलात राहावे लागले. बडोदा महाराजांची इच्छा त्यांना अर्थमंत्री करण्याची होती. म्हणून त्यापूर्वी त्यांनी आपल्या मिलिटरी सेक्रेटरीच्या जागेवर त्यांना घेतले. पण त्या खात्याच्या कारकुनांनी, शिपायांनी व अंमलदारांनी त्यांना महारोग्याप्रमाणे वागवले. नोकर ऑफिसची कामे त्यांच्या टेबलावर दुरून फेकून देत. पिण्याचे पाणी त्यांना ऑफिसमध्ये मिळू शकले नाही. पारशी हॉटेलवाल्यानेही त्यांना हाकलून दिले. हिंदूंनीच नव्हे तर मुसलमानानेही कोणी त्यांना आसरा दिला नाही आणि हे विलायतेहून परत आल्यानंतर !!! दरबारी नोकरीचे बंधन त्यांना नको वाटले, म्हणून थोर हृदयाच्या सयाजीरावांनी त्या बंधनातून त्यांना मुक्त केले.

सिडनहॅम कॉलेजमध्ये त्यांना प्रोफेसरची जागा मिळाली. पण कॉलेजसाठी ठेवलेल्या पाण्याच्या भांड्यास गुजराथी प्रोफेसरने त्यांना हात लावू दिला नाही-

पण निव्वळ नोकरांच्या पेशात ते गुंतून राहिले नाहीत. आपल्या समाजाची सेवा करण्याकरता व त्यांना माणुसकी मिळवून देण्याकरता ते राजकीय आखाड्यात उतरले. त्यांना शाहू महाराजांनी उत्तेजन व सहकार्य दिले. कोल्हापुरात माणगावला जी अस्पृश्यांची विराट परिषद भरली तिला खुद्द शाहू महाराज हजर राहिले होते. २१ मार्च १९२० सालची ती गोष्ट. त्यावेळी शाहू महाराजांनी भविष्य वर्तवले - 'मला अंत:प्रेरणा सांगते, लवकरच अशी वेळ येईल की आंबेडकर हे अखिल भारतीय कीर्तीच्या पुढाऱ्यात गणले जातील.' - पण आंबेडकरांनी त्याही पुढे मजल मारली व ते जागतिक कीर्तीच्या पुढाऱ्यांत जाऊन बसले !

त्यांनी मतप्रचाराकरता (जाने. ३१, १९२०) 'मूकनायक' पत्र

काढले. त्याची जाहिरातही केसरीने घेतली नाही. त्यानंतर 'बहिष्कृत भारत' व 'जनता' अशी पत्रे काढली.

त्यांच्या जमातीला हजारो वर्षांच्या आलेल्या अनुभवावरून फुले व शाहू महाराजांच्याप्रमाणे त्यांनाही वाटले, 'जर ब्रिटिशांचा आधार गेला तर ज्यांना अस्पृश्याची सावली खपत नाही ते पुन: आपल्याला तुडवल्याखेरीज राहणार नाहीत.'

याचा अर्थ त्या कोणाला स्वराज्य नको होते असे मुळीच नाही. स्वराज्य व स्वातंत्र्याबद्दल ते म्हणतात :

'सर्वांना शिक्षणात व इतर बाबतीत समानता मिळण्याची जर हमी मिळाली, तर स्वराज्य व स्वातंत्र्याला माझा विरोध नाही. धार्मिक व सामाजिक समतेला मी अधिक महत्त्व देतो.'

म्हणून शिक्षणाला त्यांनी फार महत्त्व दिले. शिक्षणाने सज्ञान व जागृत झालेला समाज गुलामगिरीच्या शृंखला टाकल्याखेरीज राहणार नाही, ही त्यांची खात्री होती. ते म्हणतात,

'मानवी जीवनातील प्रत्येक क्षेत्रात ज्ञान ही अमोघ शक्ती आहे. या ज्ञानशक्तीचा प्रत्येक कण आणि कण आत्मसात् केल्याशिवाय दलित वर्ग आपले स्वातंत्र्य आणि समतेचे ध्येय कधीच गाठू शकणार नाही.'

याकरता 'शिक्षणाची सूत्रे ब्राह्मणांच्या हाती देता कामा नयेत' असे त्यांचे म्हणणे होते. त्याला कारण बहुजन समाजातील सर्वांना व त्यातील पुढाऱ्यांना आलेला अनुभव हेच होय. पण निव्वळ शिक्षणाकडेच लक्ष देऊन भागणार नाही. आपण गमावलेल्या हक्कांसाठी उच्च वर्णियांबरोबर झगडले पाहिजेच. म्हणून ते प्रश्न त्यांनी निर्धाराने हाती घेतले. त्या प्रश्नाला मराठा वर्गातील रा. ब. बोले यांच्या सारख्यांनी सक्रिय पाठिंबा दिला.

आमदार बोले यांनी (सप्टें. १९२३) सार्वजनिक तलाव, पाणवठे, धर्मशाळा अस्पृश्यांना खुल्या करण्याचा ठराव आणल्याबद्दल अस्पृश्य समाजाने बोल्यांना सुवर्णपदक दिले.

त्याच मुंबईत डॉ. आंबेडकर ठाकूरद्वार देवालयात जाऊ लागले असताना स्पृश्यांनी त्यांना मारले! हा मानवतेचा जन्मसिद्ध हक्क मिळवण्यासाठी, महाड चवदार तळे, काळाराम मंदिर नाशिक, पर्वती पुणे - येथे त्यांनी सामुदायिक सत्याग्रह केला. त्यामुळे समाजात प्रचंड जागृती झाली.

पोलादी संघटना बनली व एकमेवाद्वितीय असे नेतृत्व बाबासाहेबांना मिळाले.

बाबासाहेबांनी आपल्या समाजाला धर्माच्या जोखडातून मुक्त करण्याकरता त्यांना जखडून ठेवणारी 'मनुस्मृती' जाळली व हा हिंदुधर्मच नको अशी घोषणा केली. यामुळे सारा भारत खडबडून जागा झाला! जे धाष्ट्यं आतापर्यंतच्या कोणाही पुढाऱ्याच्या हातून झाले नाही ते बाबासाहेबांनी केले. यामुळे सर्व सनातनी लोकच नव्हेत तर इतरही खवळून गेले. पण ती मनुस्मृती का जाळली याचा शांतपणे विचार करणारा कोणीही माणूस बाबासाहेबांना दोष देणार नाही. म्हणून त्यातील काही उतारे वाचकांसाठी देत आहे :

मनुस्मृती - अध्याय ९ श्लोक १६ 'ब्राह्मण विद्वान असो किंवा अविद्वा असो ते मोठे दैवत आहे' - (१८.) 'ब्राह्मण सर्व कुत्सित कर्मामध्ये जरी तत्पर असतील तरी ते सर्व प्रकारे पूज्य होत. कारण ते एक परम दैवत आहे.'- अ. ११ श्लोक १२. 'यज्ञाची अंगे असंपूर्ण राहिल्यास व ती वैश्यापासून न मिळाल्यास, शूद्राच्या गृहातून बलात्काराने किंवा चोरी करून नि:शंकपणे आणावी!' - अध्याय १० श्लोक ५०. 'चांडालांनी ग्रामाच्या बाहेर घरे करून राहावे. त्यांनी ज्या पात्रात काही खाल्ले असेल त्यास अग्नीचा संस्कार करूनही ते ब्राह्मणांनी घेऊ नये. कुत्रे व गर्दभ हे त्यांचे धन होय. त्यांनी मेलेल्या माणसाची वस्त्रे वापरावीत. मातीच्या फुटक्या भांड्यात भोजन करावे. लोखंडाची काकणे वापरावीत. लोखंडाचे दागिने घालावेत. त्यास अन्न प्रत्यक्ष देऊ नये. नोकराच्या द्वारे निराळ्या भांड्याने द्यावे. रात्री त्यांनी गावात फिरू नये.' 'शूद्र हा ब्राह्मणाच्या दास्याकरता निर्माण केला आहे. दासांच्या स्वामीने शूद्रास जरी आपल्या दास्यातून मुक्त केले, तरी ब्राह्मणांच्या दास्यातून तो मुक्त होत नाही.'

अशी ही मनुस्मृती बाबासाहेबांनी जाळली आणि तुडविली म्हणून आजचा विचारी ब्राह्मण तरी त्यांना दोष देणार नाही. आज इंग्रज अधिकाऱ्यांचे पुतळे आपण बाजूस काढतोच ना? मग बहुजन समाजाचा असा अपमान करणारा ग्रंथ जाळल्यास वाईट ते काय झाले? 'कोणत्या जातीत जन्मावे हे हातात नव्हते व कोणत्या जातीत राहावे हे मीच ठरवीन!' या उद्गाराप्रमाणे व याच चिडीतून त्यांनी जळगाव परिषदेत अस्पृश्यता जाणार नसेल, तर दुसरा धर्म स्वीकारावा लागेल अशी घोषणा केली.

इतके करूनही देवालयाच्या प्रश्नात अस्पृश्यांनी गुरफटून जाऊ नये. त्यापेक्षा पोटाचा प्रश्न महत्त्वाचा आहे म्हणून त्यांनी आपल्या जमातीला इशारा

दिला व राजकारणात पडले. कायदामंत्री झाले व त्यांना हिंदुस्थानची राज्यघटना करण्याचा मान मिळाला.

दुसरा धर्म स्वीकारण्याची घोषणा त्यांनी नागपूर मुक्कामी लाखो लोकांसमोर व त्यांना घेऊन कृतीत आणली व बुद्ध धर्माचा स्वीकार केला. - बाबासाहेब म्हणतात -

'भगवान् बुद्धांनी जगाला सर्वात श्रेष्ठ असे कोणते तत्त्व सांगितले असेल तर ते हे की, मनाचीच सुधारणा केल्याशिवाय जगाची अगर मानवमात्राची सुधारणा होणार नाही. बुद्धिझम् शुद्ध लोकशाहीवादी आहे. भगवान बुद्ध हे लोकशाहीचे महान् पुरस्कर्ते होते. मनुष्यमात्राचे दुःख निवारण्यासाठी जो बुद्धाने उपदेश केला आहे व जी पद्धती सांगितली आहे ती अतिशय सुरक्षित व पक्की आहे... बुद्धाची शिकवण गोरगरीब लोकांच्या कानांवर, मनांवर सतत बिंबवली पाहिजे. बुद्धांनी आपल्या धर्माचा पाया ईश्वर, आत्मा अगर चमत्कारजन्य अशा गोष्टींवर आधारलेला नाही. 'कम्युनिझम् जो जीवनमार्ग दाखवतो त्यापेक्षा बुद्धिझमने दाखवलेला जीवनर्माग सरस आहे. जो मार्ग तुम्हास जंगलाकडे नेणार असेल त्या मार्गाने जाण्यात काहीच अर्थ नाही - कम्युनिझम स्थापन करण्यासाठी, विरोधकांची हत्या करणे, त्यांना ठार मारणे हे साधन कम्युनिस्ट वापरू इच्छितात आणि येथेच बुद्धिझम् व कम्युनिझम्मधील मुलभूत फरक आहे. भगवान् बुद्धाचे मार्ग लोकांना परावृत्त करण्याचे, युक्तिवादाने पटवून देण्याचे नैतिक शिक्षण देण्याचे व ममतेचे आहेत. करूणेने व ममतेने जिंकता येते. बुद्ध हिंसेचा मार्ग धरू देणार नाहीत. कम्युनिस्ट हिंसेचा मार्ग धरतात.

आपला समाज अज्ञानीपणामुळे व भक्तीमुळे आपल्याला देव बनवील हा धोका त्यांना दिसत असावा, म्हणून त्यांनी इषारा दिला आहे :

'मी मूर्तिपूजक नाही. मी मूर्तिभंजक आहे. आमच्या देशातले लोक राजकीय पुढाऱ्यांची पूजा करीत असलेले पाहून माझी मान शरमेने खाली होते. माणसापेक्षा आपला देश मोठा आहे हे आमची माणसे केव्हा शिकतील कोण जाणे?'

बाबासाहेबांनी बुद्ध धर्माच्या तत्त्वांचा स्वीकार करून ती शिकवण सहा कोटींना दिली नसती आणि मी कोणताच धर्म मानत नाही अशी घोषणा केली असती तर सर्व जगाला त्यांनी धर्मातीत असा दृष्टिकोन दिला असता. सर्व बंधनांतून मुक्त पण निव्वळ तत्त्वाला बांधलेला असा मानव त्यांनी निर्माण केला

असता. ती त्यांच्यात शक्ती होती. सामान्य जनता तत्त्व विसरते आणि संप्रदायालाच चिकटून राहते.

दुर्दैव आपल्या समाजाचे की ज्या अस्पृश्यतेपासून व अपमानापासून आपल्या समाजाची सुटका व्हावी म्हणून बाबांनी अस्पृश्यांना बुद्ध धर्म स्वीकारायला लावला त्या बुद्धधर्मियांना खेड्यावरचा समाज अस्पृश्य बुद्ध म्हणून समजतो व त्यांचा छळ करतो !! आणि ही गोष्ट अज्ञानी, पण गर्विष्ठ आणि आडदांड अशा ब्राह्मणेतर समाजाकडून होत आहे. या बातम्या ऐकल्या म्हणजे शरमेने मान खाली घालावी लागते. ख्रिश्चन झालेल्या अस्पृश्यांना गोरा ख्रिश्चन बरोबरीच्या नात्याने वागवत नाही व बेटीव्यवहार करीत नाही.

आंबेडकर हयात असते तर त्यांना या परिस्थितीचा पुन: विचार करणे भाग पडले असते. बरे ज्यांनी बुद्धधर्माचा अंधभक्तीने स्वीकार केला आहे, त्यांनी बुद्धधर्माच्या तत्त्वांचा अभ्यास केला आहे, असेही म्हणता येणार नाही. पुन: एका धर्मातून दुसऱ्या धर्मात जाताना मंत्र, तंत्र आणि धार्मिक विधीचा घोटाळा आहेच !

तथापि त्यांनी एक मोठा टप्पा गाठला यात शंका नाही. कोणत्याही पुढाऱ्याकडे पाहताना त्या कालाचा आणि परिस्थितीचा विचार हा करावाच लागतो. आपण आज सर्वच दृष्ट्या पुढे गेलो आहोत. म्हणून चालू काळातून पूर्वीच्या संत, समाजसुधारक आणि पुढारी यांच्याकडे पाहून त्यांचे पुरोगामित्व ठरवता येणार नाही. त्या काली त्या परिस्थितीतून त्यांनी समाजाला किती पुढे नेले याचाच विचार करून त्यांचे पुरोगामित्व ठरवता येईल. त्या दृष्टीने ते पुरोगामीच होत.

या दृष्टीने शिव छत्रपती, फुले, शाहू महाराज, विठ्ठल रामजी शिंदे यांनी त्या कालाच्या पुढे खूप मोठी मजल मारली.

डॉ. आबेडकर यांनी या सर्वांपुढे मजल मारली.

देवच नको, हिंदुधर्मच नको, ते धर्मग्रंथ नकोत, असे म्हणण्यापर्यंत फुल्यांची मजल गेली नव्हती. शंभर देव नकोत, एक देव भजा. तो पुजण्यात दलाल नको, धर्मात घुसलेली घाण काढा हा आग्रह फुल्यांनी धरला. मनुस्मृती पायाखाली तुडवण्यापर्यंत व देव-कल्पनाच टाकून द्या असे म्हणण्यापर्यंत फुल्यांची मजल गेली नव्हती. त्या कालाची वैचारिक झेप त्या टप्प्यापर्यंत पोचली नव्हती, असाच त्याचा अर्थ होय.

शाहू महाराजही धर्मसुधारक होते, पण देवाची म्हणजे मूर्तीची पूजा करणारे होते. पण देव नको, आणि धर्मही नको, इथपर्यंत त्यांचीही वैचारिक झेप गेली नव्हती. हिंदू धर्माची सुधारणा झाली पाहिजे या मताचे ते होते. खूप उदारमतवादी होते, समतावादी होते.

विठ्ठल रामजी शिंदे यांची प्रगती आकारातून निराकाराकडे गेली. सर्वधर्मसहिष्णुता त्यांच्यात आली. पण देवाच्या कल्पनेची जरूर काय, अशी घोषणा करण्यापर्यंत ते क्रांतिकारक बनले नाहीत. कालाची काही बंधने या सर्वांवरही पडली होती. अखेरचा टप्पा अद्याप गाठावयाचा होता.

माझ्या मते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची वैचारिक मजल या सर्वांपुढे गेली होती. त्यांनी देव ही कल्पनाच लाथाडून टाकली. तो साकार नको आणि निराकार नको. हा सर्व कल्पनेचाच पसारा होय. देवच काढून टाकल्यानंतर मग दलाल नको आणि त्याची पूजाही करायला नको - आधुनिक कालातील फार मोठा टप्पा बाबासाहेबांनी गाठला.

मनुस्मृती मान्य कोणालाच नव्हती. तीवर एकाहून एक असे प्रखर हल्ले सुधारकांनी चढवून तिचे वाभाडे काढले, धर्मग्रंथांतील दोष दाखवले. पण मनुस्मृती पायाखाली तुडवून जाळून टाकण्यापर्यंत आणि असा हा हिंदू धर्मच नको म्हणण्यापर्यंत कोणाही सुधारकाची मजल गेली नव्हती. इतक्या पोटतिडकीने -

'देव नको आणि हा हिंदुधर्मही नको' अशी निर्भय आणि क्रांतिकारक घोषणा करणारी पहिली व्यक्ती आंबेडकर हीच होय.

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## केशवराव ठाकरे

तो काळ बॉंबगोळे अन् मशीनगनचा नव्हता. केवळ माणसाच्या व्यक्तिविषयक कर्तबगारीचा होता. त्या वेळी एकटा पटाईत दांडपट्टेवाला हजार हजार माणसांचा गराडा तोडून कणसाच्या धाटाप्रमाणे शेकडो शत्रूंची सपासप मुंडकी उडवीत असे.

केशव सीताराम ठाकरे हे अशाच पटाइतांपैकी एक होते. मोठमोठ्या शास्त्रीपंडितांचा, विद्वान, ब्राह्मणांचा आणि ग्रंथ पढिकांचा शास्त्रांच्या

शस्त्रसंभारासकट, भोवती गराडा पडला तरी ठाकरे आपल्या लेखणीच्या फटकाऱ्याने साऱ्यांचे मुडदे पाडत. त्यांच्या लेखणीचे पाते तरवारीपेक्षाही तीक्ष्ण असे. समोरासमोर सामना देण्याचे धाष्टर्य कोणी करीत नसे. ठाकऱ्यांचे शरसंधान अचूक आणि भेदक असे. भिक्षुकशाहीच्या बंडखोरीला डोके वर काढण्याची छाती नव्हती. कोदण्डाच्या टणत्काराने भिक्षुकी वटवाघळे ढोलीत दडून बसत.

तीच धार आणि बेछूट मारावयाची ८० वर्षे उलटली तरी केशवरावांच्या लेखणीत जिवंत आहे.

केशव सीताराम ठाकरे म्हणजे छत्रपतींचे आजचे बाळाजी आवजी. केवढा जाज्वल्य अभिमान, छत्रपती 'शिव-शाहूंचा'! साताऱ्याच्या प्रतापसिंह महाराजांची दगाबाजी करणाऱ्या विश्वासघातकी नराधमांची कातडी, केशवरावांनी लेखणीच्या तीक्ष्ण पात्यांनी सोलून काढली. दगाबाज पेशव्यांचा आणि कारस्थानी इंग्रजांचा नीच डाव महाराष्ट्राच्या स्वाभिमानी जनतेसमोर केशवरावांनी उघडानागडा करून टाकला.

तीसचाळीस वर्षापूर्वीची गोष्ट.

कोल्हापूरच्या जगदंबेच्या आवारात माझ्याच वडिलांच्या अध्यक्षतेखाली भरलेला प्रचंड समुदाय केशवरावांनी आपल्या अमोघ वाणीने, त्वेषाने, संतापाने आणि सूडाने जणू भारून टाकला होता. त्यांचे शब्द म्हणजे हृदय फाडून बाहेर आलेल्या रक्ताच्या चिळकांड्या होत्या!

रागाने व दुःखाने गुदमरलेल्या समाजातून हुंदके, सुस्कारे व कोवळ्या हृदयांच्या डोळ्यातून अश्रुधारा चालल्या होत्या. जणू राजा प्रतापसिंह केशवरावजींच्या मुखावाटे आपली करुण कहाणी श्रोत्यांना सांगत होता!

३०।४० वर्षे होऊन गेली असतील त्या प्रसंगाला. पण त्या व्याख्यानाचा परिणाम अजून पुसून गेला नाही. ती वाक्ये अद्याप घुमत आहेत :

'सातारा! एकच शब्द. आणि तीन अक्षरे. पण त्यात किती सुखदुःखाच्या गोष्टी, आशानिराशेचा इतिहास आणि अंगावर रोमांच उभे करणाऱ्या स्फूर्तीची व हृदयविदारक कल्पनांची साठवण झालेली आहे! हिंदवी स्वराज्याच्या पुनर्घटनेचा धडाडीचा भगीरथ प्रयत्न येथेच झाला. आणि त्या स्वराज्याच्या बलिदानाचा भिक्षुकी यज्ञ येथेच धडाडला! छत्रपतींच्या सार्वभौम सत्ताप्रसाराची दिव्य शक्ती, येथेच प्रथम फुरफुरली व अटकेपार गुरगुरली.

आणि छत्रपती मालकाची स्वारी पेशवे नोकरांच्या कैदखान्यात येथेच झुरणीला लागून बेजार झाली. ४ सप्टेंबर १८३९ च्या मध्यरात्री १२ वाजता छत्रपती प्रतापसिंह हद्दपारीने साताऱ्याचे दैव फिरले आणि भिक्षुकांच्या देशद्रोहाला, धर्मद्रोहाला स्वराज्याचा अखेरचा बळी पडला.'

ठाकऱ्यांच्या व्याख्यानाची, चिडीची, तळमळीची आणि छत्रपतीनिष्ठेची कल्पना वरील वाक्यांवरून करता येईल. 'सातारचे दैव की दैवाचा सातार' व 'प्रतापसिंह छत्रपती आणि रंगो बापूजी' या पुस्तकातील मजकुराची वरील उताऱ्यावरून वाचकांना कल्पना करता येईल. ज्या छत्रपतीने गव्हर्नर जेम्स रिव्हेट कारन्याकला तोंडावर जबाब दिला,

'राज्य जाईल अशी धमकी देता दशाला? माझे चिमुकले राज्य राहिले काय आणि गेले काय! पण लक्षात ठेवा... असत्यापुढे या प्रतापसिंहाची मान रेसभर सुद्धा वाकणार नाही. फायद्याचा किंवा स्वार्थाचा लोभ धरून मी आपले चारित्र्य कलंकित करून घेणार नाही. तुमच्या या चिठोऱ्यावर मी सही करीत नाही, जा.'

अशा या खऱ्या क्षत्रियाचे चरित्र तितक्याच आत्मीयतेने, अभिमानाने, लिहिणारा लेखक कोणत्या शब्दांत लिहील याची कल्पनाच करावी!

छत्रपती शाहू महाराजांच्यावर त्यांची तशीच निष्ठा, भक्ती व प्रेम. आपले 'कोदण्डाचा टणत्कार' हे पुस्तक शाहू महाराजांना अर्पण करताना केशवरावजी लिहितात :

'प्रतिस्पर्ध्यांच्या निंदेला, कारस्थानांना आणि नानाविध छळांना न जुमानता धार्मिक व सामाजिक स्वयंनिर्णयाच्या सक्रिय संदेशाने बहुजन समाजाच्या आत्मिक प्रबोधनाचे चिरंजीव राष्ट्रकार्य करणारे प. वा. राजर्षी श्री शाहू छत्रपती यांच्या दिव्यात्म्याला हा 'टणत्कार' साष्टांग प्रणिपातपूर्वक अर्पण!

छत्रपती संभाजीच्या चरित्रावर आगदी नवीन प्रकाश पाडणारा असा हा ग्रंथ आहे व ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे रहस्य अचूक पटवणारा मजकूर यात आढळेल.

'भिक्षुकशाहीचे बंड' या पुस्तकात फुल्यांची चीड व आंबेडकरांचा त्वेष आणि संताप उफाळून बाहेर येत आहे :

'ज्या प्राचीन आर्यहिंदूंनी समाजऐक्याचे उच्च स्पृहणीय ध्येय प्रत्यक्ष प्राणापलीकडे जतन करून सामाजिक व्यवस्थेत कसलाही भेदभाव बाळगला

नाही, त्याच हिंदूंची सांप्रतची समाजव्यवस्था हजारो जाती-पोटजातींनी केवळ सडून जाऊन तिला कुत्र्याच्या सडलेल्या प्रेताची घाण सुटली आहे.'

अशा धर्माविरुद्ध गौतम बुद्धांनी बंड केले तरी त्याची पकड ढिली झाली नाही. म्हणून फुले, शाहू महाराज - आंबेडकरांनी तेच बंडाचे निशाण हाती धरले. केशवरावजी हेही त्याच परंपरेतले होत. साहजिकच त्यांच्या भाषेत ती चीड आली तर त्यात अस्वाभाविक ते काय? बौद्ध धर्माबद्दल केशवरावजींना आदर आहे. ते लिहितात :

'हिंदू धर्माच्या इतिहासात बौद्ध धर्माच्या स्थापनेचे विशेष महत्त्व आहे. बौद्ध धर्म हे धार्मिक, सामाजिक आणि बौद्धिक गुलामगिरीच्या विरुद्ध बंड आहे. बौद्ध धर्माच्या लोकशाही कर्तबगारीचे ऋण हिंदुधर्मावर फार आहे. गौतम बुद्धाच्या नवविचारांच्या खड्गाने भिक्षुकी जीर्ण मताचा चक्काचूर केला.... हिंदू लोकांचे सर्व प्राचीन-अर्वाचीन ग्रंथ परमेश्वराच्या उच्छ्वासापासून निर्माण झालेले !...

'परिस्थिती कोणी आणली? देवाच्या इच्छेने! जन्म कोणी दिला? देवाने! जात जन्मसिद्ध का ? देवाजी मर्जी! ब्राह्मण जन्मसिद्ध पूज्य का? वेद तसे सांगतात म्हणून! आणि वेद म्हणजे देवाचे सुस्कारे! शूद्राने शूद्रवृत्तीतच खितपत राहिले पाहिजे काय? अलबत! शूद्रत्व देवाने दिले आहे! प्रत्येक आचारविचार किंवा परिस्थिती ही देवानेच केली आहे, असे मानणे ही मानवी समाजाच्या अत्यंत निकृष्ट मनोभावनेची स्थिती होय.'

आणि या देवाधर्माचा आधार देवालये! म्हणून केशवरावजींनी 'देवळाचा धर्म व धर्माची देवळे' हे पुस्तक लिहिले. त्यात ते म्हणतात,

'सर्वांना देऊळ म्हणजे एक माहेरघर! नवरा रुसला, जा देवळात; दुखण्यातून उठला जा नवस घेऊन देवळात! अशा रीतीने हजारो भानगडी चालत असत. बऱ्यासाठी देऊळ, वाईटासाठी देऊळ! ....

'जीर्ण मताभिमानी व आत्मवर्चस्वाभिमानी भटांच्या भिक्षुकशाहीने, नवमतवादी बौद्धधर्माचा पाडाव करून, भटी वर्चस्वस्थापनेसाठी, इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात महाभारत-रामायणाच्या कथा, मनसोक्त घालघुसडीच्या फोडणीने फुगवल्या आणि मनुस्मृतीला जन्म दिला!.... आद्य शंकराचार्यांनी रक्तपाताच्या अत्याचारी पुण्याईवर पुनरुज्जीवित केलेली भिक्षुकशाही जसजशी थरारू लागली तसतशी जातिभेदाची आणि देवळांची

पैदास डुकरिणीच्या अवलादीला बरे म्हणू लागली.'

ठाकऱ्यांच्या लिखाणाबद्दल 'स्वाध्याय संदेश'च्या प्रस्तावनेत प्रिन्सिपाल गोविंद चिमणाजी भाटे म्हणतात,

'समाजाच्या प्रत्येक बाबीसंबंधी ठाकरे नवमतवादी आहेत. त्यांना जुने भिक्षुकशाहीचे बंड मोडावयाचे आहे. त्यांना जातिनिर्बंध शिथिल करावयाचे आहेत. त्यांना आचारविधीचे वर्चस्व नाहीसे करावयाचे आहे. त्यांना समाजाचे गतानुगतिकत्व घालवून टाकावयाचे आहे. ते समाजाच्या सर्वांगीण सुधारणेचे भक्त आहेत. त्यांच्या लेखात जुन्या मतांवर व जुन्या मताभिमान्यांवर मर्मभेदी कडक टीका आहे. त्यात नव्या मतांचा जोरदार भाषेत पुरस्कार केला आहे. भाषा-पद्धती ओजस्वी व भाषेचा ओघ अमोघ आहे.'

नवशक्तिकार पां. वा. गाडगीळ लिहितात -

'ठाकरे यांच्यावर अनेकांनी लेखणीचे तडाखे दिले आहेत. पण त्यांच्या लेखणीत कुजकेपणा नसून खेळकरपणा व हासरेपणा आहे. त्यांचे अंत:करण स्वच्छ व प्रेमळ असून त्यांच्या खट्याळ लेखनातही एक प्रकारचे औदार्य आहे.'

तीर्थरूप केशवरावजींचे व आमच्या घराण्याचे जवळचे व आपुलकीचे संबंध. ते वडिलांचे स्नेही. त्यांना तेही आबासाहेब म्हणूनच हाक मारीत. माझ्यापेक्षा १० वर्षे तरी वडील. त्यांनी आता ८० ओलांडली असावी. आम्हां सर्व बंधूंना वडिलांसमान. अद्यापही ते घरी व पत्रात 'बाबूराव' याच घरच्या नावाने संबोधतात. कोल्हापुरात आले की आमच्याच घरी उतरत. ते हाडामासाचे, मनाचे, बुद्धीचे व अंत:करणाचे सत्यशोधक. मीही त्याच परंपरेतला. वडिलांचे व शाहू महाराजांचे संस्कार झालेला. त्यामुळे केशवरावजी हे काही परके म्हणून आम्हा कोणा बंधूंना, वडिलांना व घरच्या मंडळींना वाटायचे नाहीत. आणि त्यांचा स्वभाव पण मनमोकळा आणि चेष्टेखोर. कोणावर तात्विकदृष्ट्या का राग असेना, मग तो हयात असो अगर मेलेला असो, न लिहिता येण्याजोग्या भाषेत त्याची उद्धरणी सुरू व्हायची. ते वाङ्मय मग महारवाड्यातल्या माणसालाही आपल्या घरोब्याचे वाटावे. आणि त्याचासुद्धा परकेपणा समूळ नष्ट व्हावा. व्यासपीठावर तो तिखट मसाला वापरत नसले तरी त्याचा झणझणीतपणा असायचाच! ते शब्द उच्चवर्णियांच्या सोवळ्या कानांत शिरताना तापलेल्या कढईतल्या तेलासारखे जळजळीत वाटणार. कारण विचार त्यांना न आवडणारे आणि भाषा अंगावर काटा उभा

करणारी, म्हणून इतके गाडीभर साहित्य निर्माण करूनही मराठी साहित्य परिषदेच्या गौरवास ते कधीही पात्र झाले नाहीत. त्यांना साहित्य परिषदेचे अध्यक्षपद या वेळेपर्यंत दिले गेले नाही, यात आश्चर्य वाटण्याजोगे काहीच नाही. नाव ऐकताच तिडीक उठायची तिथे त्यांचा व त्यांच्या साहित्याचा गौरव होणारच कसा? फुल्यांची भालाफेकसुद्धा इतकी काळजाला भिडून रक्तबंबाळ करणारी नव्हती.

इतिहास आणि धर्मग्रंथाच्या खोलात शिरून कुजट कारस्थाने हुडकून चव्हाट्यावर आणणारा असा अभ्यासू साहित्यिक आणि शिकारी संशोधक आज तरी मला कोणी दिसत नाही. त्यांच्या ग्रंथांनी, त्या विचाराने आणि भाषेने आम्हा सर्वांवर त्यावेळी परिणाम केलेले. माझे धाकटे बंधू शंकरराव बागल यांच्या लिखाणावर त्यांचा परिणाम दिसून येतो. मला त्यांची भाषा जमली नाही, तरी त्या वेळी विचारावरती खूपच परिणाम झाला. पण आज मात्र माझ्यावर छाप आहे ती मार्क्सवाद आणि गांधीवादाची. ठाकऱ्यांना दोन्हीही वावडे. कारण मार्क्सवादात राष्ट्रवाद नाही व गांधीवादात तरवारीचा खणखणाट नाही.

त्यांच्या 'प्रबोधन' साप्ताहिकाची भेट आम्हांस नियमित यायची व दर आठवड्याला नवा नवा कडक मसालेदार खुराक मिळायचा. त्या साप्ताहिकामुळे 'प्रबोधनकार' हे विशेषण त्यांना कायमचे चिकटले. जवळ जवळ ते त्यांच्या आडनावात सामील झाले आहे.

त्यांची नवी पुस्तके मला 'चिरंजीव बाबूरावांना आशीर्वादात्मक भेट' म्हणून यायचीच.

(१) प्रतापसिंह आणि रंगो बापूजी (२) साताराचे दैव की दैवाचा सातारा, (३) भिक्षुकशाहीचे बंड, (४) कोदण्डाचा टणत्कार, (५) स्वाध्याय - संदेश, (६) शेतकऱ्याचे स्वराज्य, (७) देवळाचा धर्म आणि धर्माची देवळे, (८) टाकलेले पोर, (९) पंडिता रमाबाई, (१०) जुन्या आठवणी - अशी किती तरी पुस्तके त्यांनी भेट म्हणून दिली होती! पण अगत्यपूर्वक वाचायला नेलेली पुस्तके परत देण्याचा रिवाज पुस्तके मागून नेणाऱ्यांचा नसल्यामुळे आता त्यातील फारच थोडी शिल्लक राहिली आहेत. ठाकऱ्यांनी सर्व प्रकारचे लिखाण केले आहे. नाटक लिहून नाटकात कामही केले आहे. चित्रपटसृष्टीतही प्रवेश केला. तमाशातसुद्धा भाग घेतला. सरकारी नोकऱ्याही केल्या. छापखाना चालवला. फोटोग्राफी केली. लेखणी आणि वाणी अत्यंत प्रभावीपणे गाजवली. सातारा

जागा केला. मुंबईत व इतरत्रही प्रचारदौरे काढले. यांचे नाव उच्चारले की ब्राह्मणांचा संताप होई. मराठ्यांचीही हजेरी घेतली आहे. शाहू महाराजांचे एवढे भक्त, पण महाराजांनी क्षात्रजगद्‌गुरुपीठ निर्माण करताच त्यांच्यावर टीका करण्यास कचरले नाहीत. शेंडीवाला भट जाऊन तेथे शेंबलेवाला भट आणणे म्हणजे एका गुलामगिरीतून बहुजन समाजास दुसऱ्या गुलामगिरीत टाकणे होय, अशी टीका त्यांनी शाहू महाराजांवरही केली, त्या केशवरावांना ब्राह्मणद्वेष्टा असे कसे म्हणता येईल ? ते हिंदू धर्माचे अभिमानी असले तरी त्यातील विषमतेवर त्यांनी कठोर हल्ले चढवले आहेत.

मी समाजात थोडे डोके वर काढू लागल्यावर त्यांच्या अध्यक्षतेखाली माझी व माझ्या अध्यक्षतेखाली त्यांची व्याख्याने झाली आहेत. मुंबईत तशी कोल्हापुरात.

कोल्हापूरच्या राजकीय चळवळीत मी पुढाकार घेतल्यानंतर या चळवळीकडे त्यांचे नेहमीच सहानुभूतिपूर्वक लक्ष असे. मला दोन वर्षांची सक्तमजुरी व हजार रुपये दंड झाला. आमच्याकडे धनसंग्रह नसल्यामुळे दंडवसुलीसाठी आलेल्यांना रक्कम जमा करता येईना म्हणून त्या अधिकाऱ्यांनी अतिशहाणपणा दाखवून मी तयार केलेला शाहू महाराजांचा व माझा स्वत:चा पुतळा असे दोन पुतळे जप्त करून आपल्या बेअकलीपणाचे प्रदर्शन महाराष्ट्रभर केले. त्यावर केशवरावजींनी एवढा कडाडून हल्ला केला की डोके ठिकाणावर असते तर अधिकाऱ्यांनी ती चूक सावरून घेतली असती. पण या कृत्यामुळे केशवरावजी माझ्या पाठीमागे उभे आहेत, ही जाणीव किती उत्साहजनक वाटली. ते लिहितात :

'श्रीयुत माधवराव बागल यांच्या एक हजार दंडवसुलीसाठी करवीरकर छत्रपतींच्या दरबाराने बागलांच्या घरावर जप्ती आणली आणि दोन पुतळे जप्त करून नेले. एक शाहू छत्रपती महाराजांचा व दुसरा खुद्द माधवराव बागलांचा. दोन्ही पुतळे जाहीर लिलावाने विक्रीसाठी चव्हाट्यावर मांडले. परंतु लिलाव बोलण्यास कोणी आले नाही. गुन्ह्याचा निचरा काढण्यासाठी सापडले कोण तर खुद्द करवीराधिपती शाहू महाराज आणि त्यांच्या जोडीचे राजद्रोही गुन्हेगार बागल ! .... लोकशाही तत्त्वांच्या जागृतीचे अजरामर चिन्ह म्हणून करवीर जनतेने हे दोन्हीही पुतळे विकत घेऊन सार्वजनिक ठिकाणी त्यांची स्थापना करावी.'

केशवरावजींनी इच्छा प्रदर्शित केल्याप्रमाणे १२ वर्षांनंतर शाहू महाराजांचा तोच पुतळा गंगावेश मैदानाजवळील शाहू उद्यानात शहाजी छत्रपतींच्या हस्ते बसवण्यात आला आहे.

यानंतर काही कालाने मी माझे आत्मचरित्र 'जीवनप्रवाह' या नावाने प्रसिद्ध केले. त्याला त्यांनी किती पण अगत्याने प्रस्तावना पाठवून दिली. माझ्या सेवेचे बक्षीस मला मिळाल्यासारखे वाटले. त्यातला काही मजकूर इथे देण्याचा मोह मला आवरत नाही. :

'प्रस्तुत पुस्तकाचा तोंडवळा जरी आत्मवृत्ताचा असला तरी वास्तविक तो एक चालू घडीचा राजकारणी समाजकारणी इतिहास आहे. गेल्या २५/३० वर्षांचा. तो कोल्हापूर संस्थानचा जिवंत इतिहास श्री. बागलांनी जिवंत वाणीने सांगितला आहे. बागलांचा हा इतिहास म्हणजे लेखकाने प्रत्यक्ष अनुभवलेल्या, पाहिलेल्या आणि स्वत:च घडवलेल्या शेकडो घटनांचा क्रमवार बोलका चित्रपटच म्हटला तरी चालेल. त्यातील अनेक रोमांचकारी घटनांचे साद आणि पडसाद त्या घडीला पाहून, ऐकून नि वाचून थरारलेली, चिडलेली, संतापलेली जनता आज महाराष्ट्रात हयात आहे. त्या इतिहासाचे नाटक भरघोस रंगत असताना तो प्रत्यक्ष रंगभूमीवर एक जबाबदार नेता नट म्हणून नाचला आहे, जाचला आहे आणि ठेचला गेला आहे. कधी गौरवला गेला आहे तर कधी धिक्कारला गेला आहे. कधी कुरवाळला गेला आहे, तर पुष्कळ वेळा मुरगळला गेला आहे.'

माझे समाजवादी विचार त्यांना आवडत नव्हते. कम्युनिझमचे तर ते द्वेष्टे आहेत. त्यासाठी त्यांनी मजवर टीकाही केली आहे.

मराठ्यातील स्वार्थसाधू लोक जातीचा फायदा घेऊन समाजापेक्षा स्वत:चाच स्वार्थ साधतात हे पाहून त्यांच्यावरही त्यांनी कोरडे ओढले आहेत. आपल्याच जातीतील हुंडापद्धतीवर त्यांनी मोहीम सुरू केली होती. हुंडा घेणाऱ्यांची नावे प्रसिद्ध करून त्यांनी त्यांची प्रतिगामी व स्वार्थी वृत्ती चव्हाट्यावर आणली. त्यामुळे त्यांच्या जातीतील लोकही त्यांच्या नावाने शंखवाद्य करू लागले होते.

फुले, शाहू महाराज, जेधे, जवळकर, जाधवराव, खंडेराव बागल, ठाकरे यांच्या सतत आणि निर्भय तडाख्यांमुळेच ब्राह्मण्याची नांगी मोडली गेली व ब्राह्मण्य गेले. आता कुठे आहे ब्राह्मण्य म्हणून तेच म्हणू लागले.

भटशाही व भिक्षुकशाहीचा धार्मिक वरचष्मा शहरातून तर आता पुष्कळच कमी झाला आहे. रोटीव्यवहार तर आता सर्रास चालू आहे. ब्राह्मण्यावर आता तेच लोक हल्ले करू लागले आहेत. जातिश्रेष्ठता व शिवाशिव राहायलाच पाहिजे, नाही तर धर्म नष्ट होईल असे उघड म्हणण्याची आज कोणाची छाती नाही. हे श्रेय सत्यशोधक आणि ब्राह्मणेतर चळवळीला पुष्कळच द्यावे लागेल.

संयुक्त महाराष्ट्र चळवळ सुरू होताच केशवरावजी व मी सहकारी झालो. त्यांनी लेख व व्याख्यानाद्वारे प्रचार सुरू केला. मीही सारखे दौरे काढू लागलो. 'प्रभात' मध्ये सारखे लेख लिहू लागलो. सीमा-सत्याग्रहाचा सेनापती म्हणून म्हैसूर स्टेटच्या 'मंगळूर' जेलमध्ये पाच महिने काढले.

त्यावेळी 'सेनापती बापट, अत्रे, ठाकरे, कोठारी व बागल' ही पंचकडी महाराष्ट्रभर प्रसिद्ध होती.

शिवाजी पार्कवर शिवछत्रपतींचा उभा पुतळा बसवावा ही केशवरावजींची फार दिवसांची मनीषा. त्यांनी मला पत्र लिहिले की, 'तुम्ही कोल्हापुरात खटपट करून पहा.' मी पत्रक काढले. कोल्हापुरातील इनामदार, जहागिरदार व महाराज यांना आवाहन केले. **मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण** यांनाही पत्र टाकले. त्यावेळी मी शेतकरी कामगार पक्षात होतो, तरी लिहिले.

'हा प्रश्न काही कोणा एका पक्षाचा नाही, तुम्ही त्या दृष्टीने पाहू नये व काही तरी मदत द्यावी.'

त्यांचे लगेच पत्र आले,

'मुंबईच्या शिवस्मारकाबद्दल श्री. ठाकरे यांच्याशी मी पुष्कळ बोललो आहे. आपण सुचवता त्याप्रमाणे मी यासंबंधी काही लोकांशी बोलणार आहे. व्यक्तिशः या बाबतीत माझ्याकडून आपण व श्री. ठाकरे सुचवाल ते सहाय्य देण्याचे मी जरूर करीन.'

१४.४.१९५८

आपला

**यशवंतराव चव्हाण**

याप्रमाणे यशवंतरावजींनी ठाकऱ्यांच्याकडे ५०० रु. पाठवून दिले.

संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाला. माझ्या मते संयुक्त महाराष्ट्र समितीचे काम झाले. आणि तीत सत्तेसाठी कोल्हापुरात व बाहेर लाथाळ्याही सुरू झाल्या.

म्हणून मी काँग्रेसमध्ये गेलो. त्याबद्दल ठाकरे खूप संतप्त झाले. पण जिव्हाळा नष्ट झाला नव्हता. रागातही आपुलकी होती. माझ्यावरचे हल्ले इतके भयंकर नव्हते. अत्रे-कोठारीही रागावले. पण पुढे सर्वांच्यातच फाटाफूट झाली.

तरी ठाकऱ्यांचे व अत्र्यांचे संबंध त्यांनी, तसे मी तोडले नाहीत आणि रागावले म्हणून काय झाले? त्यांनी केलेली बहुजन समाजाची सेवा, त्यांनी त्यांच्या डोळ्यांवरची उघडलेली झापड, विरोधाला टक्कर देण्याचे निर्माण केलेले सामर्थ्य यांमुळे बहुजन समाजाचे शिल्पकार या मालेत ते मानाने बसणारच. त्यांचा गौरव उच्चवर्णियांनी केला नाही यातच त्यांचा मोठेपणा सिद्ध होतो. पण मुंबईने त्यांच्याबद्दल इतकी द्वेषभावना बाळगली नाही. मुंबई मराठी पत्रकार संघाने त्यांचा सत्कार केला. त्यांचा मुलगाही कर्तबगार निघाला आहे. बापाची परंपरा लेखणीने व चित्रकलेने त्याने जिवंत ठेवली आहे.

*(बहुजन समाजाचे शिल्पकार)*

## डॉ. जे. पी. नाईक

पाहताच वाटावं कोणीतरी बेकार माणूस आपल्यासमोर उभा आहे; रॉबिनसन् क्रूसोचा अवतार.

कपडे मळलेले, गळ्याच्या कॉलरीने मूळचा रंग टाकून दिलेला, केस पिंजारलेले, दाढीला वस्तऱ्याची भेट केव्हा पडली असेल कोण जाणे. दाढीचे खुंट मुखपृष्ठावर अस्ताव्यस्त पसरलेले. वस्तरा बरोबर न वापरल्यामुळे केसाचे दड्ड कुठे जास्ती कुठे कमी. एखादा पुंजका रेझरच्या भेटीसाठी पुढे झालेला. लांडा शर्ट, मनगट मारामारीच्या तयारीत,शर्ट ढोपरावर सरकलेला खाली लांडी चड्डी. आपण तर शिष्टाचार सोडू नये म्हणून निसर्गाने केसाचे आवरण सर्व शरीरावर टाकलेले; वेळ मिळाली की चड्डीच्या खिशात कोंबलेले शेंगदाणे बाहेर निघणार. पायात पायताणाची दशा काय आहे हे पाहण्याकरिता ओणवे न झाल्यामुळे, नको हा सहवास असं वाटून त्यातल्या वाद्या परस्परापासून आणि मालकाच्या आश्रयापासून पळून जाण्याची धडपड करीत असलेल्या.

ही स्वारी उतरली मोटारीतून, भाड्याचे पैसे काय ते विचारलेही नाहीत. चड्डीत हात घातला आणि काही नोटा ड्रायव्हरच्या हातावर टाकल्या. अन् परत मोड न घेताच स्वारीनं माझ्या घरात पाऊल टाकलं.

आज अखिल भारताच्या शिक्षणात क्रांतिकारक बदल घडवून आणणाऱ्या कमेटीची ही व्यक्ती सेक्रेटरी आहे. आणि ही जागा त्यांची पात्रता अजमावून, भारताचे शिक्षणमंत्री छगला यांनी त्यांना दिली आहे.

या अगोदर त्यांना या पूर्वीचे शिक्षणमंत्री हुमायून कबीर यांनी आपले सल्लागार व ऑनररी सेक्रेटरी म्हणून जवळ केले होते.

कोल्हापूरला रीजन्सी कौन्सिलचा कारभार होता. त्यावेळी हेच कौन्सिलचे चीफ सेक्रेटरी होते. पडद्याआड राहून राज्याची सूत्रे हीच व्यक्ती हलवत होती.

त्यावेळच्या रीजन्सी कौन्सिलचे शिक्षणमंत्री रा. ब. पी. सी. पाटील होते. ते आपल्या आत्मचरित्रात लिहितात -

"मी जे. पी. नाईकांना बोलावून घेतलं. विचारलं, "तुम्ही सेक्रेटरी म्हणून माझ्या हाताखाली याल काय?" ते म्हणाले, "मला महिन्यातून तीन दिवस रजा मिळाली पाहिजे. भूमिगत असताना मी एक प्राथमिक शाळा धारवाडजवळ उघडली होती. तिच्या व्यवस्थेसाठी मला कधी कधी जावे लागते. सतरा अठरा रुपये पगार मला पुरे होईल. माझी शाळा पाहून यावयास मला १७/१८ रुपये बस होतील." "अहो, पण तुम्हाला जेवायला लागत नाही काय?" ते म्हणाले, "आता मी कोठेतरी जेवतोच."

नाईक कामात फार दांडगे. त्यामुळे ते सर्वांना हवेसे झाले. आमची कामे भराभर उठू लागली. यामुळे कौन्सिलच्या सर्व मंत्र्यांवर त्यांचे वजन पडले."

म्युनिसिपालीटीत असताना नाईकांना चहा पाहिजे असला तर त्योवळी त्यांच्याजवळ असलेल्या सर्व लोकांनाही चहा मिळे. आंबा खावासा वाटल्यास चार दोन आंबे न घेता चार दोन डझन घेऊन सर्वांना वाटणार. मुक्काम ऑफिसातच असे. शेकडो माणसांकडून कामे करवून घेण्यात नाईकांनी स्वतःच्या कर्तबगारीने चैतन्य आणले.

माझा व जे. पी. चा संबंध आला तो मुख्यत: ते नगरपालिकेत काम करू लागले त्यावेळी. संस्थानी सरकारशी प्रजा परिषदेचा लढा यावेळी सुरू होता. मी प्रजा परिषदेचा नेता होतो. जे. पी. नगरपालिकेचे जवळ जवळ सर्वाधिकारी होते. त्यांनी शहर सुधारणा रस्ते रुंदीचा कार्यक्रम हाती घेतला होता. जगदंबा देवालयाभोवतालीच्या इमारती धडाधड पाडण्यास सुरुवात केली होती. महाद्वारच्या समोरचा रस्ता रुंद करण्याचे सुरू केले होते.

आम्हाला जे. पी. च्या वर हल्ला करायला ही संधी चालून आली होती. जे. पी. तर सरकारचे नोकर. म्हणून मी बिंदु चौकाच्या व्यासपीठावरून जे. पी.च्यावर टीकेची झोड उठवली.

"हा गृहस्थ कोल्हापूरचा विध्वंस करायला उठला आहे. लोकांच्या भावनेची याला जरासुद्धा कदर नाही. ही हुकूमशाही, हा जुलूम आमच्या हाती सत्ता आल्याखेरीज आम्हाला बंद पाडता येणार नाही" अशा अर्थाची जहरी टीका सारखी सुरू केली. ते ऐकून जे. पी. माझ्या घरी आले व अगदी केविलवाणा चेहरा करून म्हणाले "भाईजी खरंच सांगा, असं काय वाईट करतो आहे मी? ही सुधारणा जर कठोरपणे केली नाही, तर शहरची कोंदट, गलिच्छ वस्ती केव्हा तरी काढून टाकता येईल काय?"

मी म्हणालो, "हे पहा जे. पी. हे सर्व खरे आहे, हे मला काय समजत नाही? पण तुमची स्तुती करणे म्हणजे सरकारचा भाव वाढवणे, असे होणार आहे; जोपर्यंत लढा चालू आहे तोपर्यंत असे हे चालणारच. लढा संपला की आम्हीच तुम्हाला ते काम सांगू".

यावर जे. पी. हसत सुटले. मला दोन्ही हात जोडून नमस्कार केला व म्हणाले, "माधवरावजी, आता माझे काही म्हणणे नाही. मनात तुम्हाला पटते ना? बस झाले. मग मला आता माझे थांबवायचे काहीच कारण नाही. मग कितीही टीका करीत अन् रागावत".

वस्तुत: जे. पी. ने राक्षसी धडाडीने हे काम केले नसते तर आजचे कोल्हापूर दिसलेच नसते. देवालयासमोरील त्या भव्य रस्त्यामुळे गावात स्वच्छ निरोगी हवा खेळू लागली. शहराला आधुनिकता आली. देवालयाजवळील घाण गेल्यामुळे आरोग्याची वाढ झाली. आज सर्वच लोक त्यांना नावाजतात. जे. पीं. ची. ही कामगिरी करवीर नगरपालिकेच्या इतिहासात अविस्मरणीय होऊन राहिली आहे.

यानंतर त्यांचा माझा संबंध आला व वाढत गेला तो कोरगावकर ट्रस्टमुळे. त्यांनी रात्रंदिवस काम करून संस्थेची ठाकठीक करून दिली. अनेक व्यवहार सुरळीत करून दिले. काही डबघाईत आलेल्या कुळांना पुन: कर्ज द्यायला लावून कर्जफेड करण्यास नेटके केले. यशवंतराव गुणे यांचा औषधी कारखाना हे त्यापैकी ठळक उदाहरण होय. ऑफिसलाच त्यांनी आपले घर केले होते. वेळेचा विचार कधीच केला नाही. अति कामाने थकले म्हणजे बसल्या

जागीच कलंडत व पुन: जागे झाले की कामाला लागत. मग ती मध्यान असो. अगर पहाट असो. डोळयांनी पाहिलेल्या या गोष्टी.

मी कोरगावकर धर्मादाय संस्थेचा ट्रस्टी होतोच. पण अंगठे बहादूरीपेक्षा कसलेले काम केले नाही आणि इतर ट्रस्टही फार लक्ष घालत असेही नाही. जे. पी. नाही ट्रस्टी करण्यात आलं. त्यामुळे सारख्या गाठी पडू लागल्या. संस्थेमुळे व कोरगावकरांच्या घरोब्यामुळे जे. पी. ही माझे स्नेही बनले. माझ्या घरच्या अडचणीमुळे आपुलकीने पाहू लागले. मन घालून जातीने लक्ष देऊ लागले.

"जीवन प्रवाह" या माझ्या आत्मचरित्राची "सूची" स्वत: बसून दुसऱ्यांना कामाला लावून तयार करून दिली. त्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ स्वत: पुढाकार घेऊन घडवून आणला. आमंत्रणे स्वत: पाठविली. सारी व्यवस्था करून पुन: स्वागतासाठी उभे राहिले. हा समारंभ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे अध्यक्षतेखाली पार पाडला.

आणखी फार मोठी कामगिरी, सार्वजनिक तशी माझ्या जीवनाशी निगडित, म्हणजे महात्मा गांधीजींच्या उभ्या पुतळया संबंधीची. हा पुतळा बाबूराव पेंटर यांच्या निधनानंतर त्यांच्याच घरी पडून राहिला होता. तो तेथून उचलून फर्लांगभर दूर पेडस्टलवर नेऊन ठेवणे माझ्या अगर त्यांच्या वारसांना सोपे नव्हते. ॲडमिनिस्ट्रेटर नंजाप्पाने समितीची बँकेतील रक्कम अडवून ठेवली होती. जे. पी. नी सर्व जबाबदारी अंगावर घेऊन कलेक्टर शेख यांची गाठ घेऊन वरुणतीर्थात रस्ता करण्यास त्यांच्याच हस्ते पहिली कुदळ लावली. इंजिनियर खात्याचे सहकार्य मिळवून क्रेन आणला. स्टाफ कामास लावला. पैसे मोकळे करून घेतले. रेव्हिन्यू मिनिस्टर भाऊसाहेब हिरे यांच्या हस्ते होणाऱ्या उद्‌घाटन समारंभाची सर्व व्यवस्था नगरपालिकेकडून करवून घेतली. जे. पी. चे हे उपकार मला कधीच विसरता येणार नाहीत. त्याची विस्मृती त्यांना मात्र होऊ शकेल.

यानंतर मौनी विद्यापीठाची जबाबदारी संस्थेचे संस्थापक खासदार व्ही. टी. पाटीलांनी, ट्रस्टींनी बॉडीने घटनेनेच त्यांच्यावर टाकली. ते डायरेक्टर व जनरल सेक्रेटरी म्हणून काम करू लागले. नेहमीच्या स्वभावाप्रमाणे त्यांनी या कार्याला सर्वस्वी वाहून घेतले. मग किती श्रम करतील याचे मोजमाप व्यवहारी ताजव्यात तोलता येणार नाहीत. मध्यवर्ती सरकारकडून लाखो रुपये मिळवून आणले. स्वत:चा पगारही संस्थेत घातला. श्रम, बुद्धी व घाम ओतला. एका

रात्रीत नव सृष्टी निर्माण करण्याच्या उमेदीने त्या पठारावर शैक्षणिक वसाहत उभी केली. छोट्या मोठ्या इमारतींचा अफाट पसारा वाढवला. पण जे. पी. ना तितकी कलादृष्टी नसल्याने त्या इमारती सौंदर्याच्या दृष्टीने आकर्षक झाल्या नाहीत. उपयुक्त झाल्या नि:संशय. त्यांच्या खटपटीने तेथील लायब्ररी ही अमोल अशी संस्था निर्माण झाली. विद्यापीठाला अखिल भारतीय दर्जा प्राप्त करून दिला. त्यामुळे मौनी विद्यापीठाला भारतातील शिक्षणतज्ज्ञ भेटी देत असतात.

पण जे. पीं. च्यात विलक्षण खोड म्हणजे ते कुठेही फार काल चिकटून रहात नाहीत. त्यांची वृत्ती साम्राज्य विस्ताराची आहे. म्हणून कोणतेही क्षेत्र त्यांच्या कार्याला अपुरेच वाटते. म्हणूनच कोणत्याही एका संस्थेला ते चिकटून रहात नाहीत. त्यांची झेप सारखी पुढे जात असते.

वृत्ती फुलपाखरासारखी, पण भरारी गरुडासारखी आहे.

मौनी विद्यापीठाचे काम करीत असतानाच त्यांना दिल्लीचे शिक्षण मंत्री हुमायून कबीर यांनी आपल्याजवळ बोलावून घेतले. आपले ऑनररी सेक्रेटरी व सल्लागार म्हणून राहण्याची विनंती केली. "मला महिन्यातून चार दिवस मौनी विद्यापीठाची व्यवस्था पाहण्याकरता मोकळीक आणि सवलत देत असाल तर राहतो" या अटीवर ते राहिले. विमानातून जाण्यायेण्याचा व किरकोळ खर्च, यावर विनावेतन काम करू लागले. त्या दरम्यान सल्लागार राहूनही शैक्षणिक स्वरूपाचे अनके ग्रंथ लिहिले.

मौनी विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकी केव्हा ताराराणी विद्यापीठात तर केव्हा मौनी विद्यापीठात होत. अशा एका बैठकीवेळी मी जे. पी. ना सहजी थट्टेत म्हणालो- "जे. पी. तुमच्या दिल्लीला हजार खेपा होतात, माधवराव बागलला न्याना केव्हातरी."

जे. पी. नी काहीच उत्तर दिले नाही. ते स्वस्थ बसले. मीही काही सिरियसली बोललो नव्हतो.

मौनी विद्यापीठाच्या दुसऱ्या बैठकीच्या अगोदर १/२ दिवस मला जे. पी. चे पत्र आले. "माधवराव तुम्ही दिल्लीला जाण्याच्या तयारीनेच बैठकीस या. आपण तसेच बेळगावहून विमानाने दिल्लीला जाऊ. रहा वाटेल तितके दिवस. तुम्ही दिल्ली पाहून फार वर्षे झाली आहेत. तेव्हा नवी दिल्ली चांगली पहा. कंटाळा आला की परत जा."

बैठक संपल्यानंतर तसेच दुपारी तीनच्या सुमारास आम्ही बेळगावला

गेलो. विमान पकडले आणि त्याच दिवशी रात्री ९/१० चे सुमारास दिल्लीला पोहोचलो. तेथे त्यांनी उत्कृष्ट जागा अगोदरच ठरवून टाकली होती. ते उच्च दर्जाचे हॉटेल होते. जेवणास प्रत्येक वेळी १५/२० रुपये पडत. रोजची ३०/३० रुपये भाड्याची जागा होती. मला गावभर फिरवून आणण्याकरता १५/२० रुपये खर्च होई. हे सर्व ऐश्वर्य मी जे. पीं.च्या मुळे सहजासहजी भोगू शकलो. त्या मुदतीत मोरारजी देसाई, स. का. पाटील, जगन्नाथराव भोसले यांच्या गाठी घेतल्या. स. कां.च्या कंपौंडात एक सभा चालली होती. त्या सभेत त्यांनी मला बोलण्याची विनंती केली. जगन्नाथरावांनी जेवायला बोलाविले. काकासाहेब गाडगीळांची फोनवरून भेट घेतली. त्यांनी चंदीगडला येण्याचे आमंत्रण दिले. त्योवळी ते पंजाबचे गव्हर्नर होते. आमचे जानी दोस्त र. के. खाडिलकर हे त्यावेळी तेथेच होते. त्यांनी जेवायला नेले. जनरल थोरातांना जे. पी. नी चहाला बोलावले होते. मला शहर दाखवण्याकरता आपल्या ऑफिसचा एक मद्रासी अधिकारी बरोबर दिला होता. जे. पी. चे ऑफिस पाहिले. त्यांच्या स्टाफचे त्यांच्यावरचे प्रेम, भक्ती व त्यांच्या उद्गारातून जे. पी. कर्तृत्वाची व औदार्याची जो तो वाखाणणी करी.

विमानाचे तिकीट वेळेला मिळाले नाही म्हणून आगगाडीतील एअर कंडिशनच्या डब्यातून मला परत पाठवले. एकूण आमचा रुबाब बड्या अंमलदारासारखा ठेवला होता. जे. पी. चे प्रेम, अगत्य, दिलदारी, त्यांची पात्रता, स्टाफवरचे वजन प्रत्यक्ष पाहता आले. अनुभवता आले. विशेष हे की आपण माधवरावांसाठी विशेष काही करतो अशी भावनाही त्यांना शिवली नाही. त्यांच्या वागण्यातून बोलण्यातून दिसली नाही. इतर कोणाही मित्रासाठी त्यांनी हेच केले असते. त्यांचा हा स्वभाव होता.

जे. पींची एखाद्यावर मर्जी बसली म्हणजे त्यांच्यावर प्रेमाचा, तसा उपकाराचा वर्षाव करतील. अगदी त्या भाराने तो कासावीस होईपर्यंत मग आपण त्याच्यावर किती खर्च केला याची जाणीव स्वत:लाच टंचाई पडू लागली म्हणजे कळून येणार. आपल्या खासगी खर्चाचे ते टिपण ठेवीत असतील असे मला वाटत नाही. होईल तो खर्च, राहील तो खिशात. विश्वास टाकला म्हणजे त्याने अक्षरश: नागवले तरी त्यांना तशी शंका येणार नाही. उलट त्याचाच गुणगौरव करीत हिंडतील. मग जगाच्या दृष्टीने तो किती नालायक, अप्रामाणिक व पैसेखाऊ ठरेना.

हे प्रेम मग कोणावरही बसो, मित्रावर बसो, मैत्रिणीवर बसो, पण हीच व्यक्ती दृष्टीआड झाली की, तो जिवंत आहे की मेला, याची विचारपूसही करणार नाहीत. वर्षे गेली तरी दोन ओळी लिहिणार नाहीत. बायको सुद्धा नजरेआड झाली तर आपले लग्न झाल्याचीही त्यांना आठवण होणार नाही. जणू भावनाशून्य. त्यागी व भोगी, अस्थिर व स्थितप्रज्ञ.

याचा अर्थ ते निष्ठुर आहेत, कृतघ्न आहेत, माणुसकीला पारखे आहेत असाही नाही.

ते भावनाप्रधान, मुलाप्रमाणे कोवळ्या अंत:करणाचे आहेत. कनवाळू आहेत. संकटात पडलेल्या समोरच्या कोणाही व्यक्तीला नि:स्वार्थीपणाने उपयोगी पडण्यास मागेपुढे पाहणार नाहीत. अनेक गोरगरीब विद्यार्थ्यांना त्यांनी सहाय्य केले आहे. अमेरिका, इंग्लंडला पाठवून शिकवून आणले आहे. आपल्या मार्गदर्शनाखाली तयारी करून घेऊन पी. एच. डी. करून आणले आहे.

लाखो रुपयाचे व्यवहार केले, पण स्वत: कफल्लक राहिले. सारी महत्त्वाकांक्षा कार्य करण्याची, वहावा मिळवण्याचीसुद्धा नव्हे.

जे. पीं.च्या अंगी देशाची सूत्रे पेलण्याची पात्रता आहे. पण निवडणुकीत उभे राहण्याची वृत्ती नसल्यामुळे भारतात कोणत्याही अधिकाराच्या जागेला लायक असलेली व्यक्ती, फक्त थोरामोठ्यांची पडद्याआडची प्रेरक शक्ती म्हणून राहिली आहे.

माझा हा लेख ५-७-६६ रोजी येथपर्यंत आल्यानंतर माझ्या हाती याच महिन्याचा ''किर्लोस्कर''चा अंक पडला. तो या लेखाला पूरक असल्यामुळे त्यातील महत्त्वाचा भाग खाली देत आहे.

''शिक्षणाची दूरगामी रचना'' या मथळ्याखाली श्री. तपस्वी यांनी तो लेख दिला आहे :

''१९६४ जुलैत नेमलेले हे शिक्षण मंडळ सर्वच दृष्टींनी आगळे आहे युनेस्कोसारख्या जगमान्य संस्थेमार्फत यातील सभासदांची निवड करण्यात आली आहे. भारतातीलच नव्हे तर जगातील नामांकित शिक्षणतज्ज्ञ त्यांचे सभासद आहेत. अमेरिकेतील कॅलिफोर्निया विद्यापीठाच्या संशोधन शाखेचे डीन, यूनेस्कोचे माजी उपसरसंचालक जॉन रॉयस, मास्को विद्यापीठातील भौतिक शास्त्राचे प्राध्यापक, टोकियो विज्ञान व तंत्रशास्त्र विद्याशाखेचे प्राध्यापक डॉ. जेम्स ॲलन, अमेरिकेच्या स्टेट एज्युकेशन डिपार्टमेंटचे

कमिशनर व न्यूयॉर्क राज्य विद्यापीठाचे अध्यक्ष, ब्रिटनच्या उच्चतर समितीने अध्यक्ष अशी एकाहून एक मोठी मंडळी ज्या समितीत आहेत त्या समितीचे सर्वांना तळमळीने कार्यास लावणारी प्रेरणा आणि स्वत:च्या अविश्रांत परिश्रमाने तरुणांनाही लाजवणारे मंडळाचे सभासद चिटणीस जे. पी. नाईक हे होत.

त्यांनी रविवारची सुट्टी न घेता १८/१८ तास काम केले. सकाळी ८ पासून रात्री ८ पर्यंत पुन: रात्री ९ ते ११ स्टेनोग्राफर्सना डिक्टेशन.

श्री. व्ही. पी. स्मिथ, निकोलसन यासारखे परदेशी नामांकित तज्ज्ञ, श्री. नाईक यांचा "अलौकिक प्रज्ञेचा धनी" असा उल्लेख करतात. तर इतर परकीय तज्ज्ञ एकमुखाने सांगतात की आमच्यासारखे एका विषयाचा किंवा विषय शाखेचा तज्ज्ञ म्हणून नावाजलेला असा अनेक व्यक्तींचा वर्ग आहे. पण शिक्षणाच्या सर्व शाखा-उपशाखांत सारख्याच अधिकाराने निवेदन आणि विवेचन करू शकेल अशी सर्वंकष व्यक्तिमत्त्वाची एकही व्यक्ती नाही. भारतातील जे. पी. नाईक ही मात्र अशी व्यक्ती आहे.

जे. पीं. चा याहूनही मोठा गुण म्हणजे फलाची आशा सोडून कर्मातच आनंद मानण्याची वृत्ती, संपत्तीची आशा न धरता कर्मातच दंग होऊन जाण्याची वृत्ती.

मला त्यांनी गीतारहस्याची भेट दिली ती हे जाणून घेण्याकरिताच की काय कोण जाणे ?

*(माझा परिवार)*

## भाऊसाहेब खांडेकर

मी साहित्यिक होईन किंवा मला कोणी साहित्यिक समजतील असे कधीच वाटले नव्हते. तरी माझी महत्त्वाकांक्षा नव्हती. लिहीत होतो, पण साहित्य निर्माण करावे म्हणून नव्हे, जनतेच्या दु:खाला वाचा फोडावी, त्यांची गाऱ्हाणी सरकार पुढे ठेवावी, मागण्या मांडाव्या, हा मुख्य हेतू.

ते लिखाणही ओघाओघानेच आले.

माझे वडील "हंटर" नावाचे साप्ताहिक काढत होते त्यात प्रूफ करेक्टींग करता करता स्फुटे लिहू लागलो. पुढे वडिलांच्या पश्चात "अखंड भारत" साप्ताहिक काढले. त्यातल्या लिखाणाला साहित्य हे नाव देता आले तर

मी साहित्यिक होतो, पण रुढ अर्थाने मी साहित्यिक नव्हतो.

नाटक, कादंबऱ्या, लघुकथा या प्रांतात मी शिरलो नव्हतो. शिरेन असे नव्हते. तशी इच्छा नव्हती व आवश्यकताही वाटली नाही. मी थोडेसे मार्क्सवादी वाङ्मय वाचले होते. आणि दु:खे, पिळवणूक व जनतेची शोचनीय अवस्था पाहून माझे लिखाण मार्क्सवादी विचारसरणीकडे झुकू लागले होते.

हे लिखाण वाचून माझे परममित्र नी. गो. पंडितराव यांनी मला सुचवले.

"तुम्ही हेच विचार जर गोष्टीरूपाने मांडले तर खालच्या समाजात तुमच्याकडून समाजवादाला अनुकूल असे वातावरण निर्माण होऊ शकेल. तुम्हाला भरपूर अनुभव आहे. प्रयत्न करा. तुम्ही लघुकथा लिहू शकाल.

मी लिहायला सुरुवात केली.

पहिलीच गोष्ट "चित्रमयजगत्" मधून आली. आणि त्याचा मेहनतानाही मिळाला. एवढे पेट्रोल भरल्यावर मग काय ? आमची गिरणी सारखी चालू लागली. गिरणी म्हणजे अगदी गिरणी. आठवड्यातून दोन गोष्टी तरी नियमित बाहेर पडू लागल्या. माझी गोष्ट कोणत्यातरी पत्रात प्रसिद्ध झाली नाही असा आठवडा जात नसे. निर्भिड साप्ताहिकाने एकदा तशी टिंगलही केली. या आठवड्यातील आश्चर्याची गोष्ट. माधवराव बागलांची गोष्ट प्रसिद्ध झाली नाही.

यामुळे वर्ष दोन वर्षात पुष्कळ वीण बाहेर पडली.

हे पाहून पंडितराव पुढे आले व म्हणाले, "माधवराव, आता या गोष्टींचे, पुस्तक छापायचे. मी वि. स. खांडेकरांच्याकडून प्रस्तावना मिळवतो."

एवढा प्रथितयश, महाराष्ट्र कीर्तीचा साहित्यिक, मला कुठली प्रस्तावना द्यायला. मी साशंकच होतो. पण भाऊसाहेबांनी पन्नास पाऊणशे गोष्टी काळजीने वाचल्या, निवडल्या, नाव सुचवले, "जिव्हाळा." सविस्तर आणि चांगली अशी प्रस्तावना लिहून दिली. त्याने भाऊसाहेबांचा व माझा जिव्हाळाही वाढला. दुसरी भाग्याची गोष्ट म्हणजे, कृष्णराव मालपेकरांच्यामुळे मला दामोदर सावळाराम यंदे हे प्रकाशक लाभले. अशा रीतीने "जिव्हाळा" हा लघुकथासंग्रह बाहेर पडला. भाऊसाहेबांच्या प्रस्तावनेमुळे त्या संग्रहाला दर्जाही प्राप्त झाला. भाऊसाहेबांच्यामुळे मला साहित्यिक म्हणून मान्यता मिळाली. यानंतर चांगल्या मान्यवर व्यक्तींचे व प्रसिद्ध मासिक व वर्तमानपत्रांचे खच्चून अभिप्राय मिळाले. साहित्यिकांच्या नामावलीत माझा सनदशीरपणे प्रवेश झाला. मी साहित्यिक नाही असे कोणी म्हणू लागल्यास हा सर्व पुरावा पुढे करून सिद्ध

करण्याची पात्रता माझे अंगी आली.

याला सर्वस्वी कारण भाऊसाहेब खांडेकर हे होत. अशा रीतीने भाऊसाहेबांनी माझ्या जीवनात प्रवेश केला. ते त्यांचे स्थान माझे जाणेयेणे वेळेअभावी व प्रकृतीमुळे कमी झाले तरी आज ता. १ मे १९६६ पर्यंत तरी कायम आहे. आणि त्या देव्हाऱ्यातून त्या मूर्तीचे कधीही उच्चाटन झाले नाही. त्यांनी असा जीवनात प्रवेश केल्यानंतर जीवनाचे अनेक विभाग व्यापून टाकले. त्यांचे मला प्रेम मिळाले. प्रेमामुळे मैत्री निर्माण झाली. मैत्रीमुळे खासगी तसे सार्वजनिक जीवनात सहाय्यक व सल्लागार बनले. नेहमीच्या सहवासामुळे घरोबा वाढला. घरच्या सुखदु:खाच्या गोष्टी बोलण्याइतका जवळचा संबंध आला. वैचारिक मतभेदामुळे काही दुरावा निर्माण झाला नाही.

भाऊसाहेब प्रत्यक्ष राजकारणात सहभागी झाले नाहीत. ते शक्यही नव्हते. त्यांनी आपल्या जीवनाचा मार्ग आखून ठेवला होता. तरी मला त्यांचा वैचारिक पाठिंबा व सहानुभूती मिळू शकली. त्यांच्याशी मी विचारविनिमय करीत होतो. माझ्या "अखंड भारत" पत्राचे उद्दिष्ट राजकीयच होते. ते सरकारच्या डोळ्यात खुपत होते. पुढे त्यांच्यावर गंडांतरही आले. त्यातून सरकारविरोधी प्रचार उघड उघड होत होता. राजशाही विरुद्ध लोकशाही हा झगडा त्या पत्राद्वारे चालला होता. मला माझ्या प्रमुख जातभाईचा व पत्रांचा विरोध होता. तरी त्या पत्राशी भाऊसाहेबांनी उघड सहकार्य दिले.

आचार्य जावडेकरांनी 'अखंड भारत"चे सहसंपादकत्व पत्करले तर भाऊसाहेबांनी त्यावर साहाय्यक म्हणून नाव देण्यास संमती दिली व दर आठवड्यास विनामूल्य लेख देण्यास सुरुवात केली. या दोघांच्या सहकार्यामुळे माझ्या साप्ताहिकाचा दर्जा व खपही वाढला. ते पत्र केवळ स्थानिक राहिले नाही.

मी तुरुंगात पडलो. सक्त-मजुरीची शिक्षा झाली. बेड्या पडल्या, माझ्यावर राजद्रोहाचा शिक्का पडला. अशावेळी सरकारच्या भीतीमुळे माझे आप्त भाऊबंद किंवा स्नेही म्हणून घेणारेही मला भेटायला कचरत असत, पण भाऊसाहेब हे पन्हाळ्यावर माझ्या घरच्या मंडळींबरोबर, वेळोवेळी भेटायला येत व वाचावयासाठी काही तरी पुस्तके आणून देत. घरच्या मंडळीत मी भाऊसाहेबांचा समावेश करीत आलो आहे.

मीही कृतज्ञ बुद्धीने माझा दुसरा लघुकथासंग्रह "संसार" त्यांना अर्पण करू शकलो.

त्यांनी माझ्या एकसष्टीच्या निमित्ताने १९५६ जूनच्या "किर्लोस्कर" मधून अखिल महाराष्ट्रीयांना आपल्या लेखणीच्या द्वारे माझी ओळख करून दिली. तो त्यांचा लेख मी अनेकवेळा उद्धृत केला आहे. माझे सारे जीवन आणि कर्तृत्व त्यात त्यांनी सहानुभूतीच्या ओलाव्यात ओतले आहे.

भाऊसाहेबांच्या मैत्रीत कसलाच वरपांगीपणा नाही. ती मैत्री अंतर्बाह्य शुद्ध आहे. माझ्या जीवनात आलेल्या अनेक कटू अनुभवात मी सात्विकतेने उठून दिसतो. त्यांना माझ्यापासून काही मिळवायचे नाही. काही मिळवण्याजोगे नाही.

माझ्या आत्मचरित्रालाही त्यांनी प्रस्तावना लिहिली. आपल्या "मंगल वाचन" या शालेय पुस्तकात माझा लेख घेतला आहे. सर्वात मोलाची गोष्ट म्हणजे त्यांनी आपल्या हृदयात मला करून दिलेली जागा ही होय.

भाऊसाहेब हा माझा विसावा आहे. भाऊसाहेब म्हणजे माझे ग्रंथभांडार. निराळ्या वाचनालयात जायला नको. त्यांच्या धबधब्याप्रमाणे वाहत्या ज्ञानगंगेत मी पोहून जातो. राजकारण असो, साहित्य असो, समाजसेवा असो, अगर शैक्षणिक विषय असो, कोणताही विषय काढला की भाऊसाहेब रंगून जातात आणि त्या रंगपंचमीत दुसरेपण न्हाऊन जातात.

ते सदा रोगी, पण बोलू लागले की आपण आजारी आहोत हे केव्हाच विसरून जातात.

विद्यार्थ्यांना साहाय्य करणे हा भाऊसाहेबांचा धर्म. निर्मळ, सत्शील चारित्र्य म्हणजे भाऊसाहेब. जीवनासाठी कला हे त्यांच्या साहित्याचे ध्येय. ते साहित्य कौशल्याने रंगवणे यासाठी ते आटापिटा करतात. ते मानवतावादी 'मार्क्सिस्ट' आहेत.

*(माझा परिवार)*

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

आठवत नाही बरोबर, पण बहुदा असेल १९३० साल. मी कऱ्हाड तालुक्यात व्याख्यानाच्या दौऱ्यावर होतो. कऱ्हाड तालुक्याच्या बटाणे या पुढाऱ्यांनी तो आखला होता. कऱ्हाड जवळचे कोणते तरी एक खेडे असावे. आमदार आत्माराम पाटीलही त्यावेळी बरोबर असावेत.

त्या माझ्या सभेत एक भटजी बोलायला उठले. त्यांना कदाचित मुद्दाम बोलावून आणले असेल. पण ही स्वारी. भटजी म्हणजे अगदी भटजी. शंभर नंबरी भटजीचा अवतार. गुळगुळीत चकाकणाऱ्या गोट्यावर, सहारा वाळवंटावर एखादे झुडूप डोकावल्याप्रमाणे, शेंडी लोंबत होती. मी होतो सुटा-बुटात, तर भटजी होते भर सभेत अगडबंब. अंगावर उपरणे टाकले होते. तरी जानवे आणि तुळतुळीत भोजनयष्टी काही झाकली नव्हती.

कोल्हापूरचा सत्यशोधक मी ब्राह्मणाकडे काही आदराने पाहणारा नव्हतो. अन् त्यात हा अगडबंब अवतार. पाहताच माझ्या कपाळाला आठ्या पडल्या. पण बोलताना बरा बोलला हा गृहस्थ. त्या सोवळ्या अवतारात बसण्याजोगे नव्हते ते व्याख्यान. जवळ जवळ सत्यशोधकाचेच विचार होते त्यांचे. पोषाख सनातनी होता पण विचार भरपूर पुरोगामी सत्यशोधकीय होते.

यामुळे प्रथमदर्शनी जो तिटकारा निर्माण झाला होता तो जाऊन ती जागा आदराने, कौतुकाने व आपलेपणाने घेतली. तीच भावना आज एप्रिल १९६६ पर्यंत टिकली आहे.

पण तेच भटजी-त्यांनी शपथ देऊन, पुरावा पुढे केला तरी आता खरे वाटणार नाही असा त्यांच्या‍ा पेहेरावात, परिस्थितीत व व्यासंगात बदल झाला आहे.

हेच सोवळे गृहस्थ एकदा गांधीवादी भक्तांच्या संगतीत सहभोजनाला बसले होते. त्यात काही सर्वोदयाच्या खास अन्नाची ताटे पडली होती. सडीचा भात, गाईचे दूध, फळे वगैरे. एकाच पंगतीत हे अन्नसेवकांचे वर्ग पडले होते. याच पंगतीत कऱ्हाडचे ते ब्राह्मण बसले होते. ते म्हणाले, "आणखी येथे कसला जातिभेद? एकाच पंगतीत निरनिराळे हे प्रदर्शन का? आपल्याला हे काही आवडत नाही. सर्वांबरोबर जे असेल, जे मिळेल ते खावे. आवडत नसेल तर पंगतीत बसू नये. आपल्या समाजात काय कमी मतभेद आहेत म्हणून त्यात ही आणखी भर?"

त्या पंगतीत शंकरराव देव वगैरे गांधीवादी बसले होते. कऱ्हाडच्या त्या ब्राह्मणाचा स्पष्टपणा ऐकून मी तरी अगदी बेहद्द खूश होऊन गेलो. त्या वाक्याने तो मला ब्राह्मणजातीचा उरला नाही. तो माझाच जातभाई झाला. सत्यशोधक.

त्या पंगतीतल्या एका गांधीवादी म्हणून घेणाऱ्याला ती स्पष्टोक्ती आवडली नाही. तो म्हणाला,

"मग निषिद्ध अन्न असले तरी ते खावे म्हणता का आपण?"

"निषिद्ध म्हणजे कोणते बोला ना ?"

"अहो मांस."

"अहो, मांस खाणाऱ्या पंगतीत बसला असाल तर मांस खाल्ले पाहिजे, नाहीतर त्या पंगतीत बसू नये."

"मग तुम्ही मांससुद्धा खाल काय ?"

"हो, पंगतीत बसलो तर जरूर खाईन. अशी जात निर्माण करण्यापेक्षा मांस खाल्लेलं मला परवडलं. मांसच काय इंग्रजी समाजात बसलो तर पिनसुद्धा."

"अहो, असे बोलू तरी नका."

का ? अशी मताची छपवाछपवी करणं मला आवडत नाही.

या त्यांच्या भाषणामुळे त्यांच्या-माझ्यामधील परकेपणा समूळ नष्ट झाला. ते माझे मित्र आणि नातलग झाले. माझे त्यांचे संबंध जवळचे आले. ते माझ्या घरी आले. राहिले, जेवले, आमचे मित्र तितक्याच गोडीने त्यांनी खाल्ले.

ही व्यक्ती म्हणजे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी होय.

याच त्यांच्या स्वभाव व वागणुकीमुळे कोल्हापूर येथे रा. सा. मुकुंदराव पाटील यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सत्यशोधक परिषदेचे उद्‌घाटक म्हणून तर्कतीर्थांना बोलावण्यात आले. हे मी व भास्करराव जाधव यांनी विचाराने ठरवले.

तर्कतीर्थांनी महात्मा फुले यांच्यावरील अभ्यासू व विचार प्रवर्तक लेख लिहिला आहे. आणि फुले तर सत्यशोधक. ब्राह्मणांचे वैरी व ब्राह्मणेतर समाजाचे दैवत, ब्राह्मणेतर पुढाऱ्यांचे पुढारी व मार्गदर्शक.

मी स्वत: निरीश्वरवादी. देव, धर्म, बुवाबाजीवर मी लेखातून ग्रंथातून व व्याख्यानांतून बरेच हल्ले चढवले. मार्क्सवादी. त्या माझ्या हातात त्यांचे जडवाद पुस्तक पडले. मग काय. पूर्वीहून तर्कतीर्थ आणखी जवळ आले.

कोल्हापुरात चंद्रकांत शेट्ये यांनी "कुमार साहित्य मंडळा"चा स्थापन समारंभ "राजाराम कॉलेजा"त आयोजित केला होता. मी होतो उद्‌घाटक, व तर्कतीर्थ होते अध्यक्ष. प्रो. पंगू त्यावेळी हजर होते. तर्कतीर्थांची व माझी सलगी अधिक असल्यामुळे मी उद्‌घाटन भाषणात म्हणालो,

"आता तर्कतीर्थ बोलतील. ते अत्यंत विद्वान आहेत. अभ्यासू आहेत. पुरोगामी विचाराचे आहेत. ते मुलांना शिकवतील पण मुलांपासूनही त्यांना पुष्कळ शिकण्याजोगे आहे. ती म्हणजे सोपी भाषा. विद्वानांनी सोपी भाषा बोलायला व लिहायला शिकली पाहिजे. ते सोप्या भाषेत बोलले तर

विद्यार्थ्यांना काही तरी समजेल, नाही तर त्यांचे "जडवाद" ते पुस्तक त्यांनी लिहिले आहे म्हणून मी ते विकत घेऊन वाचले. पण त्यापेक्षा मला जडवण्याची इंग्रजी पुस्तके सोपी वाटली. त्यांचे मराठी शब्द समजण्याकरता इंग्रजी डिक्शनरी उघडावी लागली".

यावर आपल्या भाषणात तर्कतीर्थ म्हणाले, माझ्या एका मित्राला मी माझे "हिंदुधर्माची समीक्षा" हे पुस्तक वाचायला दिले. वाचून परत केल्यावर त्याला विचारले, "कसे काय - आवडले का पुस्तक ?"

त्यावर तो म्हणतो, "पुस्तक वाचनीय, मननीय व अभ्यासनीय आहे. पण आपण मराठीत लिहिले असते तर अधिक बरे झाले असते". आता सांगा. माधवरावांची टीका या मानाने किती सौम्य. प्रयत्न करूनही सोपे लिहायला येतच नाही मला.

हा तर्कतीर्थांचा प्रांजलपणा मला फार आवडला.

कोल्हापूरला गंगावेशीत सत्यसमाज मंदिरासमोर व्याख्यान होते. मी अध्यक्ष असेन. मी म्हणालो,

"गीता हा कितीही उद्‌बोधक व महत्त्वाचा ग्रंथ असला तरी मार्क्सवादी दृष्टिकोनातून पाहिल्यास त्यात वर्गिक वर्चस्वाचा गौरव केलेला आढळतो. गरीब प्राण्यांची पिळवणूक करणाऱ्या व त्यांच्या रक्तावर जगणाऱ्या पाण्यातील "मगरात" पक्षातील "गरुडात" जनावरातील वनराज सिंहात व माणसातील - नरातील नृपधिपात राजात ईश्वराचा अंश आहे व राजदंडात ईश्वरी आशा आहे असे प्रतिपादन केल्याचे आढळते".

माझी ही विचारसरणी तर्कतीर्थांनी न बोलता मान्य केली. हा तर्कतीर्थांचा प्रामाणिकपणा मला फार आवडला. ते आग्रही दिसले नाहीत.

या अशा प्रसंगामुळे आणि अनुभवामुळे आम्ही अधिकाधिक जवळ येत गेलो.

त्यांनी अनेकवेळा मला वाईला व्याख्यानासाठी बोलावले. माझ्यासाठी मला आवडणारे पदार्थ हॉटेलातून आणून जेवण दिले व तेही संकोच न मानता मजबरोबर खाल्ले.

त्यांचा माझा पत्रव्यवहार असे. आज त्यांच्या इतर व्यवसायामुळे तो कमी झाला असला तरी नाहीसा झालेला नाही. त्यांची पत्रे फार मनमोकळेपणाने लिहिलेली असतात. हात आखडून लिहिलेली नसतात. गोही त्यांच्यावर

तितक्याच मोकळ्या मनाने टीका करीत असे.

तर्कतीर्थांनी जडवादावर पुस्तक लिहिलेले. ते निरिश्वरवादी सत्यशोधक आणि सोमनाथ मंदिराचा पुरोहितपणा केलेले. ऐकून मी त्यांना बोललो -

"तर्कतीर्थ, याचा अर्थ काय लावायचा?"

ते हसले व खिजलेही, म्हणाले, "याला म्हणायचा व्यवहार."

माझे आत्मचरित्र "जीवनप्रवाह" पुस्तक तयार झाले. त्याची प्रस्तावना त्यांनीच लिहिली. त्याचे प्रकाशन तर्कतीर्थांच्याच हस्ते केशवराव भोसले नाट्यगृहात करण्यात आले. माझ्या साठावीला त्यांनी "मौज'मध्ये माझ्यावर खास लेख लिहून माझी त्या वाचकांना ओळख करून दिली व मला उपकृत केले.

अलिकडे त्यांच्या माझ्या फारशा गाठी पडत नाहीत. सं. म. समितीतर्फे आखलेल्या प्रतापगड मोर्चासाठी मी गेलो होतो. त्या मोर्चाचा ठराव माझ्याच अध्यक्षतेखाली झाला होता. तर्कतीर्थ यशवंतरावजी चव्हाणांचे परमस्नेही आणि हितचिंतक. मी त्यावेळी समितीत. तर्कतीर्थ काँग्रेसचे, त्यातही यशवंतरावांचे लाडके. यशवंतराव तर त्यावेळी समितीचे शत्रू.

पण मोर्चा पार पडल्यानंतर आणि काँग्रेसवर व यशवंतरावजींच्यावर भरपूर तोंडसुख घेतल्यानंतर मी रात्रीचा मुक्काम ठोकला तर्कतीर्थांच्यात, आणि एकमेक मिठ्ठास बोललो. दोन्ही बाजूच्या मंडळींना आश्चर्य वाटले.

आता तर्कतीर्थांची माझी फारशी भेट पडत नाही. रागावून पत्र पाठवले म्हणजे दिलगिरी प्रदर्शित करतात.

सुरुवातीचे उघडेबंब सोवळे भटजी आता संस्कृतीच्या महान पीठावर आरूढ झाले आहेत. मोठ्या जबाबदाऱ्या अंगावर घेतल्या आहेत. त्यांच्या प्रोत्साहनाने अनेक ग्रंथ बाहेर पडत आहेत.

गाठी भेटी कमी झाल्या तरी मैत्री कमी झाली असे मात्र नव्हे.

*(माझा परिवार)*

## आचार्य अत्रे

इतक्या ओळखीच्या व्यक्तींबद्दल आतापर्यंत लिहिल्यावर आचार्य अत्रे यांच्यासंबंधी लिहिलं नाही तर कृतघ्नपणा ठरेल. पण मी काय लिहू?

महाराष्ट्राच्या आबालवृद्धांना ज्यांच्या नावाची माहिती आहे, रोज ज्यांच्या नावाचा उच्चार होतो. आठवण झाली नाही, तर "मराठा" तुमच्या

डोळ्यावरची झापड दूर करतो. त्यांची आठवण आणखी ओळख मी करून देऊ? लोक हसतील मला.

ज्यांच्या साहित्यानं वाचकांना वेड लावलं, ज्यांच्या विनोदाने घरावरची छपरं उडवली, ज्यांच्या नाटकांनी समाजातील अन्याय, बुवाबाजी, जुलूम चव्हाट्यावर आणले, ज्यांच्या फटकाऱ्यांनी पापिष्टांच्या चिंधड्या उडवल्या व कृष्णकृत्ये चव्हाट्यावर आणली, सत्ताधाऱ्यांना ज्यांच्यामुळे थरकाप सुटला, पीडितांना हर्षवायू झाला, त्यांची ओळख मी कसली करून देऊ?

आपल्या सिंहगर्जनेने ज्यांनी महाराष्ट्राला खडबडून जागं केलं आणि जो महाराष्ट्र आपलं अस्तित्व टिकविण्याकरिता दंड थोपटून उभा राहिला, ज्यांच्या प्रेरणेमुळे आपल्या प्राणाचीही त्यानं पर्वा केली नाही, अशा या विराट पुरुषाची, त्या प्रचंड शक्तीची मी कसली ओळख करून देणार?

आचार्यांच्यात टिळकांची राजकीय धडाडी आहे. आगरकरांची सामाजिक दृष्टी आहे. फुल्यांची समतादृष्टी आहे. मार्क्सवाद आणि मानवतावाद यांचा समन्वय आहे. साहित्य आणि राजकारण याचा संयोग आहे. सर्व गुण-दुर्गुणांना पचवून जगासमोर निर्भयतेने उभा राहणारा हा मानवी हिमालय आहे. चांगल्या-वाईट प्रवृत्तींना आत्मसात करून दोन्हीवर कुरघोडी करणारी व दोन्हीपासून अलिप्त राहणारी अशी ही चमत्कृतीपूर्ण व्यक्ती आहे. त्यांच्याच शब्दात लिहायचं म्हणजे हा एक चमत्कार आहे. भोगी आणि त्यागी यांचं मिश्रण आहे. पापपुण्याच्या रूढ कल्पनांना पायाखाली तुडवणारा हा मानवतावादी क्रांतिवीर आहे.

प्रत्येक विषयांत पारंगत, विश्वस्तही. अत्र्यांमुळं मला शाहू महाराजांची आठवण होते. सर्व भोगी, तसे त्यागी. लाखो रुपये मिळाले. सारखे दिवाळे निघालं सारखं. स्थितप्रज्ञाप्रमाणं संपत्तीनं उन्माद चढणार नाही. दिवाळखोरीनं हताश होणार नाहीत. कमालीचे मोकळ्या मनाचे.

व्यासपीठालाही घर बनवून घरातल्या कोट्या बिनधोकपणे व्यासपीठावर करणार. सोवळे नाक मुरडणार तर जनसामान्य खो खो हसत सुटणार. कारण त्या कोट्या त्यांच्या प्रचारातल्या. सनातनी म्हणार, "काय हे, तर कुणबी म्हणणार, "खाशी केली बोवा" - आणि त्याच कोट्यांचा पुनरुच्चार करीत घरी जाणार आणि दुसऱ्याला सांगत हसत सुटणार.

आचार्य बोलणार हे समजताच नाकं मुरडणारे येणार, तसे उत्सुक

असलेले वेडे येणार. इतर वक्त्यांना चार माणसं जमणार नाहीत. तिथं अत्र्यांना मैदान अपुरं पडणार. "चला चला" म्हणून सारेजण गणगोतांना घेऊन येणार. अत्रे म्हणजे सर्वांचं आकर्षण. निंदकाचं, तसंच चाहत्यांच, लाजाळू स्त्रियांचं, तसंच वृद्धांचं, पोरांचं, तसे पोक्त्यांचं. सर्वांना गुदगुल्या करणार. येऊन गेले म्हणजे त्यांनी उडवलेले हास्यफवारे कित्येक दिवस तसेच हवेत तरंगत राहणार. त्यांच्या वक्तृत्वात विनोद आहे. वीररस आहे. ज्या वेळेला जे पाहिजे ते प्रकट होणार.

अत्र्यांना डोक्यावर घेऊन नाचणारे हजारो आहोत. नाव निघालं की जळजळणारेही आहेत. सार्वजनिक जीवनाला अत्र्यांनी वाईट वळण लावलं म्हणणारे आहेत. तसंच अत्र्यांनी सार्वजनिक जीवनातील घाण उपसून समाजाचं शुद्धिकरण केलं असेही म्हणणारे आहेत. अत्रे शिकारी आहेत. शिकारी नेहमीच अचूक मारा करतो असं नाही. चुकून गोळी हुकते आणि दुसऱ्यालाही लागते, तो घायाळ होतो. पुरवठा करणाऱ्या बातमीदाराचीही ती चूक असू शकेल - पण आचार्य दीर्घद्विषी नाहीत. कुब्ज्या मनाचे नाहीत. कटू नाहीत. आचार्यांसारखा दिलदार, उमदा माणूस मिळणार नाही.

शिक्षक आचार्य, नाट्यलेखक आचार्य, चित्रपट निर्माते आचार्य साहित्यसम्राट आचार्य, लेखणीच्या पात्याने पाप्यांना भुईसपाट करणारे आचार्य - कोणत्या आचार्यांबद्दल लिहायचं मी. तो हास्यास्पद प्रयत्न मी करणार नाही. तो माझ्या आवाक्याबाहेरचा आहे.

त्यांचे प्रचंड आत्मचरित्र छापले जात असतांना या भानगडीत मला कसं शिरता येईल ?

तरी पण मला लिहिता येण्याजोगं असं काहीच नाही असं नाही, मी ते लिहिणार आहे.

आचार्यांच्या सहवासात मी काही दिवस काढले आहेत. अनेक दु:खीतांनी आपल्या कहाण्या घेऊन आचार्यांकडे धाव घेतली आहे. अनेक सत्ताधाऱ्यांच्या पापांची व जुलमांची यादी घेऊन लोक त्यांच्याकडे आले आहेत. त्या सर्व पापांना बेडरपणे वाचा फोडणारा, हाच एक आपला त्राता, आधार, असं कित्येकांना वाटतं म्हणून ते त्यांच्याकडे येतात.

मी त्यावेळी त्यांच्या घरी होतो. त्यांचा पाहुणचार घेत होतो. पाहुणा म्हणून राहिलो होतो. असे आलेले लोक मी पाहिले आहेत. सामान्य लोकांपासून ते पोलीस अधिकाऱ्यापर्यंत त्यांनी बातमीदारांची जाळी विणलेली आहेत.

सरकारच्या सी. आय. डी. खात्याप्रमाणे यांचीही गुप्ततेची कवच फोडणारी यंत्रणा आहे. हा साठा त्यांच्याकडे पुराव्यासकट चिक्कार असल्यामुळे बडेबडे त्यांना वचकून असतात व त्यांना खूश करण्याचा प्रयत्न करतात. मंत्र्यावर कुरघोडी करणारी अशी ती भयानक शक्ती आहे.

पण आचार्य हा काही क्रूर राक्षस नव्हे. हा प्रचंड देहधारी माणूस अथांग प्रेमाने भरलेला, कोवळ्या मनाचा; दिलदार हृदयाचा दाता आहे. राजासारखा दिलदार, आजच्या राजासारखा नव्हे.

खिशातले पैसे न मोजताच बाहेर काढून वेटरच्या थाळीत ओतणारे आचार्य मी पाहिलेले आहेत.

ज्या व्यक्तीला मानलं त्यापुढे ते नम्र होतात. त्यांना त्याचा जराही संकोच वाटत नाही. कमीपणा वाटत नाही. सेनापती बापटांबद्दलची पूज्यबुद्धी अशा प्रकारची आहे. काकासाहेब लिमयांना तर ते आपले गुरू मानतात. त्यांच्याविषयी वाटणारी त्यांची कृतज्ञता असामान्य आहे.

पण एखाद्यामागे लागले म्हणजे सोडलेला बाण त्यांना आवरता येत नाही. त्यामुळे काही लोकांना त्यांनी जन्माचे दुखावले. याचा अर्थ ते दीर्घद्विषी आहेत असा मुळीच नाही.

मी संयुक्त महाराष्ट्र समिती सोडून काँग्रेसमध्ये गेलो. ते खूप नाराज झाले. मला वाटलं होतं तितके मात्र ते चिडून उठले नाहीत. ते दु:खी झाले. तरीही मी त्यांच्याच घरी मुर्दाडपणाने जाऊन राहिलो. माझ्या आदरातिथ्यांत त्यांनी जराही उणेपणा येऊ दिला नाही. जुलमी रामराम केला नाही. अगदी खुल्या मनानं माझं स्वागत केलं.

"अशी होती संस्थानी राजवट" या माझ्या कथासंग्रहाला मला त्यांची प्रस्तावना पाहिजे होती. त्यांनी काही नाक मुरडलं नाही. कसली सबब सांगितली नाही. म्हणाले.

"रहा चार आठ दिवस. सारा मजकूर वाचून काढतो. मगच लिहितो".

त्याप्रमाणे त्यांनी प्रत्येक गोष्ट काळजीने वाचून काढली. त्याच्या नोटस् काढल्या आणि लिहायला बसले. पण जाणाऱ्या येणाऱ्या गरजूंची रहदारी त्यांना टाळता येईना. व टाळण्याचा त्यांनी प्रयत्नही केला नाही. मला चुटपूट लागली. एक गृहस्थ सकाळी येऊन बसणार ते जाणारच नाहीत. तेव्हा मला राहवेना. मी भीत भीतच त्यांना म्हणालो -

"मी आचार्यांच्याकडून एका पुस्तकाला प्रस्तावना लिहून घेण्यासाठी मुद्दाम आलो आहे. त्यांना सवड मिळाल्यास बरे होईल. म्हणजे मला कोल्हापुरास

लवकर परत जाता येईल".

ते म्हणाले, "अहो, मी नेहमीच येणारा माणूस आहे. हे असंच चालतं. आचार्यांना त्यामुळे काहीच अडथळा होत नाही. तुम्ही त्याची काळजी करून नका."

आणि खरंच आचार्य प्रस्तावना लिहित होते. अग्रलेख डिक्टेट करीत होते. त्याचवेळी आलेल्यांच्या तक्रारी ऐकत होते, त्यांना सल्ला देत होते आणि चटकन् फोन उचलून मजकुराचे मथळे कोणते द्यावेत तेही सांगत होते. आचार्य अष्टावधानी असल्याचा प्रत्यक्षच अनुभव आला.

मी घरी गेलो म्हणजे आचार्य माझी बडदास्त मोठ्या पाहुण्यासारखी ठेवतात. येणार असं कळवल्यास स्टेशनवर गाडी पाठवून देतात. उतरलो की स्पेशल खोलीत जागा करून देतात. आचार्यांच्या घरचं जेवण काही वाईट नसतं. पण त्यानं त्यांचं समाधान होत नाही. म्हणणार, "चला माधवराव, बाहेरच जाऊ आपण.' - आणि चांगल्या उंची हॉटेलमध्ये जेवण देणार. एकाच जेवणावर पाऊणशे ते शंभर रुपये सहज लीलेनं खर्चणार. आणेल्या फेकल्याप्रमाणे दहा दहा रुपयांच्या नोटा फेकणार.

रुबाब दांडगा, पण वागणं सामान्य माणसाप्रमाणं. कसला गर्व तो नाही. मनमिळाऊ, खेळीमेळीचा स्वभाव. घरी पाहुणा म्हणून उतरल्याशिवाय अत्र्यांच्या स्वाभावातले हे गोड कप्पे समजून येणार नाहीत.

मी त्यांच्या गाडीत होतो. जाता जाता मी विचारलं.

"आचार्य, तुम्ही अनेकांना टीकेनं घायाळ केलं, पण मी काँग्रेसमध्ये जाऊनही तुम्ही माझ्यावर सूडाचे फटके मारले नाहीत - हे कसं?"

त्यावर आचार्य म्हणाले,

"माधवरावजी, मी लेखणी उचलली की, लोकांसाठी तुमच्या पायात पडलेल्या बेड्या मला दिसू लागतात. अन् मग माझी लेखणी चालत नाही."

त्या आचार्यांना कठोर, सूडबुद्धीचे असे कोण म्हणणार? मी संयुक्त महाराष्ट्र समितीत होतो त्यावेळी आचार्यांनी मजवर अलोट प्रेम केले. अत्यंत आदराने व अगत्यानं वागवलं. अनेक सत्कार घडवून आणले. बोरीबंदर स्टेशनवरसुद्धा थाटानं स्वागत आणि सत्कार केला. मुंबईहून खंडाळ्याला नेले. पुण्यात खास सत्कारासाठी घेऊन आले.

पण काही एका विचारानं प्रेरित झाल्यामुळे मला हे टाकून दूर जावं लागलं. विचाराने गेलो तरी मनाने अन् हृदयाने गेलो नाही. तरी नाराजीचा परिणाम दोघांवर झाल्यास स्वाभाविक आहे आणि क्षम्यही आहे.

"माधवराव चंदनासारखं लोकांसाठी झिजले," असे म्हणून शिवाजी पार्कवरच्या जाहीर सभेत त्यांनी दिलेली चंदनाची काठी ही त्यांच्या प्रेमाची सतत आठवण देत असते.

त्यांनी आपली कितीतरी पुस्तके मला भेट म्हणून दिली आहेत. आणि काँग्रेसमध्ये गेल्यानंतरही त्यांनी आपल्या आत्मचरित्राची मला भेट दिली व त्यावर ते लिहितात--

"महाराष्ट्राचा पहिला समाजवादी मराठा क्रांतिवीर माधवराव बागल यांच्या साहित्य-कला-राजकारण-विषय लेखावर प्रसन्न होऊन हे माझे "कऱ्हेचे पाणी" त्यांना अर्पण करीत आहे."

आचार्य खरोखरच थोर आहेत. हे लिहिताना त्यांना संकोच वाटला नाही. मला मिळालेले हे सर्टिफिकेट "पद्मभूषणा" इतकंच महत्त्वाचं वाटतं. ते खऱ्या गुणी माणसाचं आहे.

आचार्यांनी लिहिलेले मृत्युलेख वाचून मी त्यांना गंमतीनं लिहिलं, "आचार्य तुमचे मृत्युलेख वाचून वाटतं आपणही मरून हा "चान्स" घ्यावा. पण एवढंच की तो वाचायला पुन्हा जिवंत कसं व्हायचं."

पण तीही मनिषा माझ्या "बहुजन समाजाचे शिल्पकार" या पुस्तकावर अग्रलेख लिहून आचार्यांनी पुरविली.

"मराठा" निघायला ज्या एक दोन व्यक्ती कारणीभूत झाल्या त्यात मी एक आहे. शिवाजी पार्कवरच ती इच्छा मी प्रकट केली होती. पण ती जाणीव आचार्य विसरले नाहीत. आणि प्रकटपणे मान्य करायला त्यांना संकोच वाटला नाही.

अत्रे हे मराठीतील माझे आवडते लेखक. कारण त्यांची भाषा क्लिष्ट नाही. सर्वांना समजण्याजोगी सोपी. ते कोट्या - अलंकारात लोकांना विसरून जात नाहीत. कलेच्या बाबतीत त्यांचे माझे विचार एक आहेत. कला निव्वळ कलेसाठी नसून जीवनासाठी आहे, हे त्यांनी हजारो वेळा आग्रहानं प्रतिपादन केलं आहे. साहित्य आणि चित्रकला या दोन्हीविषयी माझं तेच मत आहे.

"कोल्हापूरचे कलावंत", "कलाविहार", "पडसाद", "अशी होती संस्थानी राजवट" या पुस्तकाचं प्रकाशन अत्र्यांच्या हस्ते करण्याचं ठरलं होतं. ते होऊ शकलं नाही याबद्दल फार वाईट वाटतं. पण त्याची भरपाई केव्हातरी होईल, अशी मी आशा धरून आहे.

*(माझा परिवार)*

# १) सत्यशोधकांना इषारा

"Towards an eternal centre of right and nobleness is all this confusion Tending"

*- Carlyle - Past and Present.*

**भावार्थ** - हा मतभेदांचा झगडा सत्य आणि थोरवी ह्याच अबाधित मध्यबिंदूकडे चालला आहे.

सत्यसमाजाचे संस्थापक महात्मा फुले हे होत. त्यांनी व त्यांच्या मंडळाने सत्यशोधनाचे काम सुरू केले. त्यांनी त्या संस्थेला 'सत्यसमाज' हे नाव दिले. 'सत्यशोधक समाज' या नावानेच संस्थेच्या पवित्र ध्येयाचा उलगडा चटकन होतो. याच व्यापक ध्येयाला धरून संस्थेचा कार्यक्रमही तसाच व्यापक व उदात्त राहिला, तर याच संस्थेकडून हिंदुस्थानात फार मोठी क्रांती घडून येणार आहे !

***''सत्यापरता नाही धर्म, सत्य तेचि परब्रह्म''***

***-रामदास.***

**सत्यशोधन** - सत्यशोधन करणे हाच सत्यशोधकांचा धर्म आहे. त्यांना दुसरा धर्म माहीत नाही. प्रत्येक धर्मात सत्य आढळून येते. त्यामुळे सर्वच धर्म त्याला लाडके आहेत. प्रत्येक धर्मात त्या त्या संस्थापकाने सत्याकडे जाण्याचाच मार्ग दाखविला आहे. भिन्न लोकांनी भिन्न मार्ग दाखविले आहेत. या संस्थापकांच्या साठवलेल्या अनुभवालाच आपण धर्म समजतो. जगात कोणतीही व्यक्ती पूर्णावस्थेला गेलेली नसते; म्हणून कोणताही धर्म, पंथ किंवा समाज अगदी निर्दोष असा असू शकत नाही. ते दोष निघाले म्हणजे त्यात आपल्याला पुष्कळ सर्वमान्य तत्त्वे आढळून आल्याखेरीज राहात नाहीत. महात्मा फुले सार्वजनिक सत्यधर्म यात म्हणतात-

"या भूमंडलावर महासत्पुरुषांनी जेवढी म्हणून धर्मपुस्तके केली

आहेत, त्या सर्वात त्या वेळेस अनुसरून, त्यांच्या समजुतीप्रमाणे काही ना काही सत्य आहे. एकमेकांनी एकमेकांच्या धर्माविषयी सारासार विचार केल्याबरोबर कोणीच कोणाच्या धर्माला खोटे म्हणणार नाही."

हिंदु धर्माने सर्वत्र एकरूपता, आत्मानुभव, ईश्वराचे सर्वव्यापित्व या गोष्टींना प्रामुख्य दिले. महमदी धर्माने समता व बंधुत्व यावर विशेष जोर दिला. ख्रिस्त प्रभूंनी प्रेम, भक्ती, परोपकार ही तत्त्वे जगाला आचरणाने पटवून दिली. बुद्धांनी जनसेवा हाच परमधर्म मानला. यावरून कोणतेही धर्म परस्परविरोधी नसून ते परस्परसाहाय्यकच असल्याचे दिसून येईल.

सर्व धर्म, पंथ व सत्पुरुष, एकाच गोष्टीसाठी धडपड करीत आहेत. मार्ग भिन्न असले तरी ध्येय एकच आहे.

*आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।।*
*सर्व देव नमस्कार: केशवं प्रति गच्छति ।।*

पावसाचे पाणी ज्याप्रमाणे अखेर सागरालाच मिळते त्याप्रमाणे सर्वांची धाव एकीकडे जाण्याची आहे. म्हणून संत कबीर म्हणतात -

*राम रहीम करीम केशव, अलख नाम एक साचा है ।।*
*जिसकू तुम बिसमिल्ला कहते, विष्णु हमारे साई है ।।*

याकरितां सत्यशोधकाला सर्व धर्म सारखेच आहेत. सत्यशोधनाचा मार्ग त्याचा कुठेच थांबू शकत नाही.

गिरीकंदरात ध्यानस्थ बसून गूढ तत्त्वाचा शोध करीत तो बसू शकेल, समाजामध्ये राहून कोणता धर्म चांगला, कोणता धर्म वाईट, याची छाननी तो करीत बसेल.

**सत्यशोधनाच्या दिशा** - सत्यशोधन हे ठराविक मर्यादेत केले पाहिजे असे नाही. तसा निर्बंध कोणास केव्हाही घालता येणार नाही.

त्याला धार्मिक बाबतीत सत्यशोधन करता येईल, सामाजिक बाबतीत करता येईल, आर्थिक व्यवहारात करता येईल, त्याला राजकारणात मन घालता येईल.

कोणतीही धर्मसंस्था किंवा घटना निर्दोष असू शकत नाही; म्हणून कोणतीही संस्था सत्याच्या कसोटीला लावून पाहणे, हे सत्यशोधकाचे कामच आहे.

आपल्याला निर्दोष संस्था स्थापन करता येणार नाही; कारण आपण स्वत: परिपूर्ण असे नाही. जरी एखादी संस्था निर्दोष अशी त्या वेळी वाटली,

तरी तिला कायमची व सर्वव्यापी करता येणार नाही; कारण परिस्थिती बदलत असते. म्हणून सत्यशोधकाला कामाच्या सर्व दिशा मोकळ्या आहेत. सर्व विषय त्याचे आहेत. लोककल्याणाची इच्छा ठेवून त्या वेळी संशोधनाची दिशा कुणीकडे वळवली पाहिजे हे ठरवणारा तो आहे.

**समता व स्वातंत्र्य :-** "निर्माणकर्त्याने एकंदर सर्व मानव स्त्रीपुरुषांस धर्म व राजकीय स्वतंत्रता दिली आहे. एखादा मानव अथवा काही मानवांची टोळी एखाद्या व्यक्तीवर जबरी करू शकत नाही." - म. फुले

महात्मा फुल्यांच्या वरील विचारावरून त्यांना केवळ धार्मिक स्वातंत्र्य तेवढेच पाहिजे होते, आणि राजकीय स्वातंत्र्य नको होते, असे म्हणता येईल काय ? समता व स्वातंत्र्य सर्व मानवांना-स्त्रीपुरुषांना-भोगता यावे हीच त्यांची इच्छा होती. राजकारणात सत्यशोधकाने पडावे की पडू नये याला आता निराळे उत्तर देण्याचे कारण नाही. महात्मा फुल्यांच्या वरील उताऱ्यावरून त्यांची मते समजून येणार आहेत.

*"सत्कर्म आणि समता सदयत्व रीती*
*हा मुख्य धर्म निगम स्फुट हे करीती"*

*- वामन*

**समतेला प्राधान्य :-** सत्यसमाजाच्या प्रमुख तत्त्वांत समतेलाच प्राधान्य दिले आहे. राजकीय स्वातंत्र्य म्हणजे समता नव्हे; कारण आज राजकीय स्वातंत्र्य भोगणाऱ्या राष्ट्रांत समता आहेच असे म्हणता येणार नाही. राजकीय स्वातंत्र्य हे एक साधन आहे. ते मिळाले, राजकीय सत्ता सत्यशोधकांच्या हाती आली, म्हणजे त्याला त्या राजकीय सत्तेचा उपयोग समता स्थापन करण्याकडे करून घेता येईल. म्हणून राजकीय स्वातंत्र्य हे साध्य नसून ते एक साधनच आहे. ध्येय गाठण्यासाठी हे साधन अगोदर हाती घेणे भाग आहे. तथापि समता स्थापन करण्याचा जवळचा दुसरा मार्ग सापडल्यास त्या मार्गाने जाण्यालाही त्याला पूर्ण मोकळीक आहे. कारण सत्यशोधकाने -

**संप्रदाय निर्माण केला नाही** - एका गोष्टीपुरतेच सत्यशोधन करा आणि ती मर्यादा ओलांडू नका, असा नियम सत्यशोधकाला घालून दिला नाही, आणि घालता येणार नाही. इतर समाजाप्रमाणे सत्यसमाजाने संप्रदाय निर्माण केला नाही, हेच त्याचे विशेष आहे. मूळ संस्थापकांचा हेतू संप्रदाय उत्पन्न करण्याचा नसतो, पण त्यांचा शिष्यवर्ग आपले वैशिष्ट्य राखण्याकरिता तो

निर्माण करतो. त्यामुळे मूळ हेतू बाजूस राहून, संप्रदायालाच धर्माचे स्वरूप येते; धर्माची अवनति होते, तो संकुचित होत होत नामशेष होण्याच्या मार्गाला लागतो.

सत्यसमाजाने संप्रदाय निर्माण केला नाही, म्हणून त्याची भवितव्यता फार उज्ज्वल आहे.

सर्व धर्मग्रंथ त्याचे आहेत, सत्यशोधन करणारे सर्व महात्मे त्याचे आहेत, भगवद्गीता त्याची, कुराण त्याचे, बायबल त्याचे आहे; कृष्ण, ख्राइस्त, बुद्ध, महमंद पैगंबर, झोरास्टर, लूथर, टॉलस्टॉय, ठाकूर, एनस्टीन, बोस, लेनिन व गांधी हे सर्व महात्मे सत्यशोधकच आहेत. त्यांच्या सत्यशोधनाचा अभ्यास करणे, हे सत्यशोधकांच्या मर्यादेबाहेरचे नाही.

**धार्मिक, आर्थिक व राजकीय समता :-** समता स्थापन करावयाची ती एकाच बाबतीत, आणि इतर बाबतीत डोळेझाक करावी, असे करता येणार नाही. धर्म, अर्थ आणि राजकारण ही इतकी एकमेकात गुंतली आहेत की, एक बाब हाती घेतली तर तिचा परिणाम दुसऱ्या गोष्टीत झाल्याखेरीज रहात नाही. हे सर्व विषय आज परस्परावलंबी झाले आहेत.

देवालयाचा म्हणजे मंदिरप्रवेशाचा प्रश्न हाती घेतला तर सरकारी कायदा आड येतो. आर्थिक समतेचा प्रयत्न केला तर मजुरांच्या विरूद्ध भांडवलवाल्यांच्या बाजूने सरकार आड येते. राजकीय बाबतीत तर प्रश्नच नाही. म्हणून राजसत्तेपासून हल्ली आपली कुठेच सुटका नाही.

"Politics encircle us to-day like the coil of a snake from which one cannot get out no matter how one tries."

- *M.K. Gandhi*

महात्मा फुल्यांच्या वेळी धार्मिक अन्यायाची परमावधी झाली होती. तो अन्याय प्रामुख्याने त्यांच्या डोळ्यांसमोर होता. त्यावेळी सत्यशोधकांचे सर्व लक्ष धार्मिक अन्याय दूर करण्याकडे गेले. म. फुले यांनी आपल्या स्वारीचा मोर्चा धर्मगुरुकडे वळविला. सरकारी मदतीने धार्मिक अन्याय नष्ट करता येतील अशी त्यांची कल्पना होती. याचा अर्थ, हिंदुस्थान इंग्रजांच्या गुलामगिरीत रहावा असा केव्हाही करता नाही. राजकीय सत्तेचा उपयोग समता स्थापन करण्याकडे करवून घ्यावा, हाच त्यांचा हेतू होता.

**रंजल्या-गांजलेल्यांना साहाय्य -**

***''बांधवांकरिता प्राण अर्पण करणे हीच प्रेमाची खूण आहे.''***

***- महात्मा गांधी.***

"रंजल्या-गांजलेल्यांना साहाय्य" करणे हे सत्यशोधक समाजाचे प्रमुख तत्त्व आहे. रंजले-गांजलेले लोक एका धर्मकारणातच आहेत असे नाही. धार्मिक जुलमापेक्षाही आर्थिक जुलमाने जास्त पीडलेले आहेत. धार्मिक जुलूम मनुष्य सहन करू शकेल, शारीरिक गुलामगिरी तो सहन करू शकेल; पण आर्थिक गुलामगिरी सहन करणे त्याला शक्य होत नाही.

"आर्थिक स्थिरतेविना स्वातंत्र्याचा उपभोग घेणे अशक्य आहे."

*- एच्. जी. लॅस्की-लिबर्टी इन दि मॉडर्न स्टेट.*

प्रचारात म्हण आहे की "पाठीवर मारा पण पोटावर मारू नका." याकरिता गरिबांच्या पोटावर जे मारीत असतील त्यांचेपासून गरिबांचा 'रंजल्या-गांजलेल्यांचा बचाव करणे' हे सत्यशोधकाचे पहिले कर्तव्य आहे.

**राजकीय सत्ता हाती घ्या :** महात्मा फुल्यांना धार्मिक गुलामगिरी काढताना राजकीय सत्तेची मदत घ्यावी असे वाटले. तेच तत्त्व आज सर्वांना पटले आहे. कोणतीही सुधारणा घडवून आणावयाची तर ती राजकीय सत्तेशिवाय घडवून आणणे अशक्य झाले आहे. ती सत्यशोधकाचे हाती आली, राज्यकारभार सत्यशोधकाचे हाती आला; म्हणजे त्याला सार्वत्रिक समता स्थापन करण्याचा प्रयत्न करता येईल, निरनिराळे उपाय शोधून काढता येतील. कारण हल्लीच्या सुधारलेल्या जगात राजकीय सत्ता कुणालाही चुकविता येत नाही. इतर संबंध तोडणे शक्य होईल; पण राजकीय संबंध मात्र तोडणे अशक्य होऊन बसले आहेत. रॉबिनसन क्रूसोप्रमाणे आपल्या गरजेला लागणाऱ्या सर्व गोष्टी आपणच करू म्हटले तर हल्लीच्या सुधारलेल्या समाजात ही गोष्ट शक्य नाही. जगाचा संबंध सोडून अगदी अलिप्त असे आता राहता येणार नाही. तुम्ही कुठेही जा, कुठलाही प्रदेश घ्या, तो कुठल्या तरी राजकीय सत्तेखाली असतोच; आणि ती सत्ता मनुष्याला चुकवता येत नाही.

म्हणून राजकीय सत्ता सत्यशोधकांनी आपल्या हाती घेतली म्हणजे समता स्थापन करण्याची गुरुकिल्ली त्यांच्या हाती सापडणार आहे. याकरिता सत्यशोधकाने आपल्या सर्व सामर्थ्याचा जोर राजकीय सत्ता आपले हाती घेण्याकडे खर्च केला पाहिजे. त्यासाठी जो स्वार्थत्याग करावा लागेल तो केला पाहिजे. अहिंसा तत्त्वाला धरून जे जे उपाय करावे लागतील ते ते केले पाहिजेत. सत्यशोधनार्थ प्राणही खर्ची घालण्याची तयारी केली पाहिजे.

यापुढे सत्यशोधनाला ठळक दिसणाऱ्या जागा कुठे कुठे आहेत,

गांजलेले लोक कुठे कुठे आहेत, त्यांच्या शोधास आपण लागू. म्हणजे आपआपल्यापरी उपाय शोधून काढण्याच्या मार्गास सत्यशोधक सुरुवात करील. पीडितवर्ग जेथे जेथे म्हणून आहे तेथे तेथे सत्यशोधक धावत गेला पाहिजे. दरिद्री नारायणाची सेवा करताना सत्यशोधकाला प्राण अर्पण करण्यात आनंदच वाटेल. खरा सत्यशोधक हा निर्भय वृत्तीचा असतो. लोकभय, राजभय, मृत्यूभय या गोष्टी त्याला शिवत नाहीत.

*धरोनिया हाती सत्याचे निशाण। सत्कार्यासी प्राण प्रेमे वाही।*
*निश्चित निर्भय जागरूक वीर। गंभीर उदार जीवावरी।*

*- अभंग गीतांजली*

खरा सत्यशोधक या वृत्तीचा असतो. असो. यापूर्वी युरोपमध्ये सत्यशोधकांनी काय केले हे पाहू. त्यापासूनही बोध घेता येईल.

*(सत्यशोधकांना इशारा अथवा नव्या पिढीचे राजकारण)*

## *(२) सुशिक्षितांचा कृतघ्नपणा*

### *सुशिक्षितांचा जुलूम -*

*"The stomach has more rights than even brain, for it is the stomach which sustains the whole organism."*

*- P. Krapotkin.*

**भावार्थ** - "पोट हेच सर्व इंद्रियांना पोशीत असल्यामुळे बुद्धीहूनही पोटाचा अधिकार जास्त आहे."

गरिबाच्या श्रमावर जमीनदार व भांडवलवाले कसे चरतात ते दाखविले. आता सुशिक्षितवर्गही तेच कसे करीत आहे हे पाहू.

**श्रमविभागाचे तत्त्व :-** सुशिक्षित वर्ग जो चरतो तो श्रमविभागाच्या तत्त्वावर आपले समर्थन करीत असतो. पण श्रमविभागाच्या तत्त्वाला धरून त्या श्रमांची वाटणी होते काय हाच प्रश्न आहे.

हल्लीच्या युगात श्रमविभागाशिवाय चालणे शक्यच नाही. सर्वच गोष्टी एका माणसाला झेपणे शक्य नाही.

दुसऱ्याच्या श्रमांशिवाय, मदतीशिवाय जगणे ही गोष्ट अगदी अशक्य कोटीतील आहे.

माझ्यापुरता मी, माझी कुणी पंचाईत करू नये, मी कुणाच्या वाटेला जाणार नाही, माझ्या वाटेआड कुणी येऊ नये, असे कुणालाही म्हणता येणार नाही.

मूल जन्माला येताच मातेला हाक मारते. मातेच्या सहवासाशिवाय त्याचा एक पळही जात नाही. मातेच्या दुधाशिवाय त्याला जगता येणार नाही. त्यानंतर बाप मुलाला पोसतो. काम करू लागेपर्यंत त्याला बापाच्या अन्नावर सर्वस्वी अवलंबून राहावे लागते. मग भाऊ, बहीण, बायको, स्नेही, आप्तेष्ट, शेजार असे नाते वाढत जाते. एकमेकांची एकमेकाला मदत लागते. त्याचे रोजचे धान्य जे त्याला लागते त्याच्यापायी किती अनेक धंदेवाले लोक राबले असतील याची गणतीच करता येणार नाही. म्हणून दुसऱ्याची मदत म्हणजे श्रम आपण सारखे घेत असतो.

**चुकीच्या तत्त्वावर श्रमविभाग :-** श्रमविभागणी आहे म्हणून मनुष्याचे जीवित सुखकारक झाले आहे. नवऱ्याने शेतावर जाऊन कष्ट करावे, धान्य उत्पादन करावे, ते धान्य त्याच्यासाठी त्याच्या बायकोने वेळच्या वेळी तयार करून ठेवावे. ते तयार करण्यासाठी तांबटाने भांडी पुरवावीत. कुंभाराने चूल करून द्यावी. लोहाराने शेतीला लागणारी हत्यारे शेतकऱ्याला पुरवावीत. असे जर झाले नसते, अशा प्रकारची कामाची वाटणी करून एकमेकांची गरज भागवली गेली नसती तर एकाला सर्वच गोष्टी करणे फार अवघड गेले असते.

**श्रमविभाग परस्पर साहाय्याकरिता** - पण वरील गोष्टी परस्परावलंबी आहेत हे मात्र वाचकांनी विसरू नये. बायकोने जेवण तयार केले नाही तर नवऱ्याला शेतावर काम करता येणार नाही. लोहाराने नांगर, चांभाराने मोटवण तयार करून दिली नाही; कुदळ, खोरे, खुरपे पुरवले नाही तर शेतकऱ्याचे कामच अडून बसेल. तसेच शेतकऱ्याने या धंदेवाल्यांना धान्य पुरवले नाही तर हे उपाशी मरतील. म्हणजे सर्वांच्या आवश्यक गरजा पुरवण्याकरिता त्या वेळी ही श्रमविभागणी झालेली असते, त्यावेळी परस्परांच्या कामाचा बोजा घेण्यात कुणाला नुकसान वाटत नाही. कारण एकाने काम बंद पाडले तर दुसऱ्याचे लगेच नडून, काम बंद पडते.

**अनावश्यक श्रम म्हणजे श्रमविभाग नव्हे :-** आता सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या वर्गाला श्रमविभागाचे तत्त्व पुढे करता येईल काय, याचा तुम्हीच विचार करा.

मी तुमच्यासाठी वेदान्त विषयाचा विचार करीत आहे, बारा तास

ध्यानस्थ आहे आणि ही तुमचीच सेवा चालली आहे. मी डोक्याला श्रम देतो. तुम्ही देहाला श्रम देऊन मला पोसा, असे श्रमविभागणीच्या तत्त्वावर तो म्हणू शकेल काय?

सुशिक्षित वर्गाला जसे म्हणणे भाग पडते की, पोटाला घातल्याशिवाय आम्हाला काम करता येणार नाही; तसे शेतकरी म्हणतो काय की, वेदान्त समजल्याशिवाय आम्हांला नांगरता येणार नाही, आमचा नांगर अडून पडतो!

"Expert knowledge has been obtained through an expensive education inaccessible to the wage earner."

*F. R. Salter*

तसेच आपला विद्यार्थीवर्ग जो आपले निम्मे अधिक आयुष्य निव्वळ ज्ञानार्जनाकडे घालवून शेतकऱ्यांच्या अन्नावर वाढला जातो, तो त्याला कोणता मोबदला देतो? राष्ट्राच्या आवश्यक गरजा पुरवण्याकडे थोडा जरी काल त्याचा खर्ची गेला असता तर अल्प प्रमाणाने का होईना शेतकऱ्याच्या ऋणांतून त्याला मोकळे होता आले असते. पण शिक्षणाची पद्धतच मुळी चुकीच्या तत्त्वावर बसविली आहे, तेथे दोष कुणाचा दाखवायचा?

असो. आता या सुशिक्षित वर्गाकडून गरिबांचा कितीसा फायदा होतो ते पाहू.

**सुशिक्षित वर्गानेच बौद्धिक गुलामगिरी लादली** - पुरातन काळी ब्राह्मण वर्गाने शिक्षणाने काम पत्करले. त्यांना पोसण्याची जबाबदारी लोकांनी आपल्या शिरावर घेतली. पण पुढे पुढे त्याच ब्राह्मण वर्गाने शिक्षणाचे पवित्र काम करण्याऐवजी स्वत:चे वर्चस्व कायम राहील असे ग्रंथ निर्माण केले. बौद्धिक उन्नती करण्याऐवजी बौद्धिक गुलामगिरीच पद्धतशीरपणे खालच्या वर्गावर लादली. खालच्या वर्गाने डोके वर काढू नये अशी व्यवस्था करून तिला शास्त्रशुद्ध स्वरूप दिले.

**राजाश्रय** - सुखाने खायला मिळून सत्ताही भोगायला मिळावी म्हणून त्यांनी राजेलोकांचा आश्रय धरला.

पुरातन काली राजेलोकांवर यांची फार छाप असे. राजेलोकही त्यांच्या विद्वत्तेचा स्वार्थाकडे फायदा करून घेत होते. त्यांच्या अधिकाराला ब्राह्मणांकडून शिक्कामोर्तब मिळाला.

राज्यकर्त्या वर्गाची महती गाण्यास ब्राह्मणांनी सुरुवात केली. त्या

वर्गाला फायदेशीर असे ग्रंथ निर्माण केले. राजेलोकांनी त्याचा फायदा घेऊन रजेच्या श्रमाचा फायदा घेण्यास सुरवात केली.

सर्व वर्णांहून आपण श्रेष्ठ असा शिक्कामोर्तब ब्राह्मणांनी स्वत:च मारून घेतला. आपले श्रेष्ठत्व कायम रहावे म्हणून मनुस्मृतिसारख्या ग्रंथांत वाटेल तशा कल्पना घुसडून दिल्या. शंकराचार्यांच्या अमदानीत समतावादी बौद्धांचा अनन्वित छळ झाला. त्यांनी जैनग्रंथही बुडवले असे म्हणतात. जातिभेदाविरूद्ध ज्यांनी ज्यांनी प्रयत्न केला त्यांना ब्राह्मणवर्गाकडून त्रास झाला आहे.

समतावादी संत तुकाराम, ज्ञानेश्वर, एकनाथ महाराज व दयानंद सरस्वती, तसेच महात्मा फुले या सर्वांना ब्राह्मण्य चांगलेच भोवले आहे. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई यांना ब्राह्मणांनी वाळीत टाकले होते. यांना त्रासून रूखमाईने त्रिवेणीत देह टाकला. तुकारामाचा ग्रंथ याच वर्गाने बुडविला. दयानंदांच्या फोटोची गाढवावरून थिंड व महात्मा फुल्यांच्यावर दगडफेक याच वर्गाने केली. त्यांच्या जिवावरही प्रसंग आला. राजेलोकांनाही या ब्राह्मण्याने हैराण केले आहे.

हिंदवी स्वराज्याचे संस्थापक गो-ब्राह्मणप्रतिपालक शिवप्रभु यांना राज्यारोहण प्रसंगी याच सुशिक्षित ब्राह्मणवर्गाने अडवून त्यांचेकडून एक कोटी चाळीस लक्ष होन उकळले. लढाईसाठी लागणारा खजिना ब्राह्मणांना संतुष्ट करण्याकरिता त्यांना मोकळा करावा लागला. सातारचे बाणेदार छत्रपती राजा प्रताप याच ब्राह्मण्याला बळी पडले, याचा साद्यंत इतिहास बाहेर पडला आहे. तसेच राजर्षी शाहूमहाराजांना या ब्राह्मण्याबरोबर किती झगडावे लागले हे महाराष्ट्राला माहीतच आहे.

(धार्मिक बाबतीत हात घालावयाचा नाही, हा लढा मिटवायचा नाही असेच धोरण इंग्रज सरकारने ठेवल्यामुळे हा जातिकलह व धर्मकलह मिटण्याऐवजी त्याला पुष्टीच मिळत आहे. "Divide and Rule" या ध्येयाला धमैक्य विसंगत असल्यामुळे स्वराज्याखेरीज याला उपाय दिसत नाही. आपले राष्ट्र एक झाले पाहिजे, जगाच्या धकाधकीत टिकाव धरायचा तर त्याने उच्च-नीच भेद गाडून टाकले पाहिजेत, ही भावना, जबाबदारी अंगावर पडली म्हणजे जास्त उत्पन्न होण्याचा संभव आहे.)

प्रजेच्या रक्षणार्थ, प्रजेच्या सेवेकरिता राजसंस्था आहे हे विसरून प्रजा

हीच यांच्या सुखाकरिता आहे अशी कल्पना राजे लोकांनी करून घेतली. आजचा सुशिक्षित वर्गही त्याच वर्गाच्या आश्रयाला, त्या फायद्याचा वाटेकरी झाला आहे. पाच रूपयांपासून पाच हजार रूपये खाणाऱ्या सर्व अधिकाऱ्यांचा बोजा याच शेतकरी वर्गावर पडला आहे. पिढ्यान् पिढ्या खपून जी शिल्लक शेतकऱ्याला टाकता येणार नाही, ती लोकांचे प्रतिनिधी म्हणून जागेवर असलेले दिवाण एका महिन्यात स्वत:चे पदरात बांधून घेतात.

**बिनसरकारी सुशिक्षित** :- यानंतर सुशिक्षित बिन अधिकारी वर्ग गरिबांच्या फायद्यात किती पडतो?

**डॉक्टर** :- वैद्य किंवा डॉक्टर वर्ग हा समाजाला अत्यंत आवश्यक असा वर्ग आहे. याची जरूरी प्रत्येकाला आहे. या धंद्यात विशेष ज्ञानसंपन्न (Specialist) व्हावेत तितका यांच्या हातून लोकांच्यावर उपकार होणार आहे.

पण हा धंदा लोकसेवेऐवजी निव्वळ उदरभरणाकरिताच झाला आहे. या डॉक्टर लोकांच्या ज्ञानाचा फायदा किती लोकांना मिळतो? यांची फी किती लोकांना देण्याला परवडते. डॉक्टर जितका अधिक हुशार, जितका जास्त डिग्रीवान तितकी त्याची फी मोठी, तितका तो लोकांना दुर्मिळ!

**वकील वगैरे** :- वकीलांची गोष्टही पण तीच! वकील जास्त झाल्याने भांडणे-तंटे कमी व्हावेत, पण उलट भरच पडलेली दिसते. वकिलाच्या ज्ञानाचा फायदा मिळवून शेतकरी संकटांतून मुक्त व्हावा, शेतकऱ्याला आधार वाटावा, पण तो उलट त्याचाच काळ झाला. शेतकऱ्याचे रक्षण करण्याऐवजी हा वर्ग धनिकालाच साहाय्य होतो. कारण याची फी धनिकालाच द्यायला परवडते. विलायतचा बॅरिस्टर तर गरिबाला केव्हाच साहाय्यक होणार नाही. त्याच्या विशेष ज्ञानाचा फायदा सावकाराला मिळून शेतकऱ्यांचे घरदार, शेत कायदेशीरपणे सावकाराच्या मालकीचे करण्याकडेच होतो. त्यांच्या व डॉक्टरांच्या फीच्या प्रमाणाबद्दल तर काहीच प्रमाण ठरवता येत नाही. ते ठरविण्याला सरकारही असमर्थ आहे.

चित्रकार, शिल्पकार, लेखक, कवी, शास्त्रज्ञ या सर्वांचा फायदा नेहमी वरच्याच वर्गाला होत असतो, आणि शेतकऱ्याच्या जीवावर जगणारा हा वर्ग रोज वाढतच आहे.

जुन्या राजशाहीतून शेतकऱ्यांना कफल्लक बनविणारा, भणंगभिकारी बनविणारा जमीनदार वर्ग उत्पन्न झाला.

नव्या भांडवलशाहीने स्वत:ची संपत्ती वाढविण्याकरिता त्या गरिबाला पोटार्थी मजूर बनविला.

एकाने तरवारीच्या जोरावर शारीरिक गुलामगिरी अस्तित्वात आणली, तर भांडवलशाहीने आर्थिक म्हणजे पैशाची गुलामगिरी अस्तित्वात आणली.

सुशिक्षित वर्गाने यात भर घालून बौद्धिक गुलामगिरी अस्तित्वात आणली.

**वर्णाश्रम स्वराज्य :-** सुशिक्षित ऊर्फ ब्राह्मणवर्गाने नेहमी क्षत्रिय आणि वैश्य वर्गाचीच आश्रितगिरी आणि साह्यता वाढविली आहे. तिसरा जो श्रमजीवी त्याला अफाट वर्गापासून कधीच दक्षिणा देण्याचा संभव नसल्यामुळे या ब्राह्मण वर्गाची सर्व कारवाई नेहमी बहुजनांच्या उलटच! ह्याचे उत्तम उदाहरण म्हणजे आजची वर्णाश्रम स्वराज्य परिषद.

शेतकरी वर्गाच्या व मजूर वर्गाच्या हालाची कल्पना वाचकांना आतापर्यंत दिली आहे. आता सुशिक्षित वर्गाने आपल्या बुद्धीच्या दुरुपयोगाने अस्तित्वात आणलेल्या अस्पृश्य व स्त्री वर्गाच्या हल्लीच्या प्रगतीकडे पाहू.

*(सत्यशोधकांना इशारा अथवा नव्या पिढीचे राजकारण)*

## (३) ईश्वरा पहावे ठायी ठायी

आपल्या हिंदुसमाजात हा देवधर्म किंवा देवावरील अंधश्रद्धेचा प्रकार इतका खोल रूजला आहे की, कित्येक पदवीधरही अजून या देव-देवऋषी वगैरेच्या भीतीपासून मुक्त झालेले नाहीत. दगडाच्या देवाच्या अंगी 'चांगले-वाईट' करण्याची शक्ती आपणच लादून त्याचे रागापासून सुटका करून घेण्याकरिता, देवाचा दलाल नाचवील त्याप्रमाणे आपण नाचत असतो. लेखकाची या 'दगडाच्या आकारावर' मुळीच भक्ती नाही, पण हे लिहित असताना त्याच्या घरी त्याच्या मर्जीविरूद्ध, एकाचे संकट निवारण्याकरिता म्हणून 'कोंबडे' सोडले आहे. एकाने ताईबाईला प्रसन्न करण्याकरिता घरी बकरे आणून त्याचा नैवेद्य त्या देवीला दिला व तिसऱ्याने आजारातून उठला म्हणून सत्यनारायण प्रसन्न करण्याकरिता दोनशे एक माणसांचे जेवण घातले. तेव्हा राजकीय पारतंत्र्यातून हिंदुस्थान सुटला तरी, या देवांच्या म्हणजे दगडाच्या बोजाखालून तो लवकर सुटेल असे काही वाटत नाही.

ते देव, त्यांचे ते खास प्रधान, ते जगद्गुरू, त्या भट पुजाऱ्यांची ती

फलटण, भोंदू देवऋषी, लफंग्यांचा तो तांडा व त्यांचे प्रचारक यांच्या कचाट्यातून बिचारा अडाणी शेतकरी वर डोके केव्हा काढील कोण जाणे! हे त्यांचे अज्ञान दूर करण्याकरिता जर एखादा प्रचारक देवाचे गौडबंगाल उघडे करू लागला, तर त्याची समजूत पटण्याऐवजी त्याचा खरपूस समाचार मात्र घेतला जाईल. त्याच्यावर, हा बाटगा आहे, मुसलमानाचा हस्तक आहे, वगैरे आरोप त्याचेवर लादून त्यांची गावाबाहेर रवानगी झाल्याखेरीज राहणार नाही.

भांडवलशाहीचे बूड स्थिर राहण्यालाही देवाची भावना भरपूर मदत करीत आहे. फार काय श्रीमंतावरूनही देवाची कल्पना बसवली गेली असावी असे विधान करणे चुकीचे होईल असे वाटत नाही. श्रीमंतांना श्रम करावे लागत नाहीत. त्यांच्या इच्छेला येईल त्या वस्तू त्यांना मिळणे सोपे असते. त्यांची सत्ता गरिबांवर चालते. याच श्रीमंतीचा अतिरेक म्हणजे स्वर्गसुख, तेथे काय नाही ? इच्छित वस्तू इच्छा केल्याबरोबर हजर! अप्सरांचे सुख, विपुल संपत्ती - ही स्वर्गसुखाची कल्पना समाजात प्रचलित आहे - धर्मगुरू, राजे, सरदार व श्रीमंत देवाचे लाडके, पूर्वजन्मीच्या पुण्याईने सुखी झालेले अशीच ठाम समजूत असल्यामुळे गरीब मजूर वर्ग नाडलेला आहे त्या स्थितीतच राहण्यास तो कबूल असतो. समाजाची घडी बदलून ती आपल्याला अनुकूल करून घेण्याचा तो प्रयत्न करीत नाही. ही विषमता व गरिबी निर्माण होण्याला विशिष्ट वर्गाची नीतीच कारणीभूत आहे, व मनात आणल्यास हे पारडे सर्वस्वी आपल्याला बदलता येईल, ही खात्री तो दैववादाचा गुलाम झाल्याने पटत नाही. यामुळे देवाचा दगड त्याच्या डोक्यावर दडपण घालतो, तसा पोटावरही आदळतो. गरिबी ही पूर्वकर्मानुसार आपल्या भोगाला आली आहे असे समजून "नित्य नवे जे देईल मानधव, भक्षुं तेचि घरि" अशी कर्तृत्वशून्य शिकवणही अनेक संतांच्या तोंडून निघाली आहे. त्या त्या समाजघडीचा परिणाम संतांनाही टाकून देता आला नाही! या जन्मी भोगलेल्या कष्टाची भरपाई दुसऱ्या जन्मी देव देईल. अन्यायी, स्वार्थी, दुष्ट लोकांना ईश्वरच शासन करील, अशी परावलंबी वृत्ती स्वीकारल्यामुळे खालचा कष्टाळू अज्ञानी वर्ग वरती येणे दुरापास्त झाले आहे.

अनंत प्राणी रोज आपल्या पायाखाली चिरडत आहेत. प्रत्येक पावलागणिक जाणून न जाणून हिंसा होत आहे. निसर्ग या रोज घडणाऱ्या गोष्टीपासून अलिप्त आहे. आपल्या हालाबद्दल व स्थितीबद्दल देवावर अवलंबून राहून पुढच्या जन्मींच्या सुखाची आशा केल्याने जगात समता, शांती व सुख

नांदणार नाही. भांडवलशाही आपली नीती सुधारणार नाही, तर ती सुधारणे आपले हाती आहे. समता स्थापन करणे समाजाचे हाती आहे. संपत्तीचा, सुखाचा, श्रमाचा वाटा सर्वांना सारखा उपभोगता येईल, अशी परिस्थिती निर्माण करणे समाजाच्या हाती आहे. विशिष्ट जातीची, वर्गाची किंवा राष्ट्राची गुलामगिरी फेकून सर्व मानवजात विश्वबंधुत्त्वाच्या सहकार्याने एक होणे शक्य आहे. 'एकमेकां साह्य करुं। अवघे धरु सुपंथ।' पण ही परिस्थिती निर्माण होण्याला हा 'दगडाचा देवबाप्पा' आड येतो. ही गुलामगिरी टाकून जनता हीच परमेश्वर आहे. कर्तुमकर्तुम् समर्थ असा तोच आहे. पृथ्वीचा स्वर्ग बनवणे तिच्याच हाती आहे अशी खात्री पटली म्हणजे हा जागा झालेला परमेश्वर स्वर्गांतील कल्पनामय समता पृथ्वीवर आणू शकेल. दुष्टांचे निर्दालण करू शकेल. जो वेदांत, निव्वळ पुराणातच वास करतो, जे विश्वबंधुत्त्व निव्वळ कीर्तनातच वास करते, जी गोड तत्त्वें निव्वळ कथ्याकूट करण्यांतच खर्च होतात त्याचा जगास प्रत्यक्ष उपयोग काय? तेव्हा देव दगडात नाही. तो जनतेतच आहे व जगाची उलथापालथ करण्यासही तोच समर्थ आहे. धार्मिक गुलामगिरी, आर्थिक गुलामगिरी व राजकीय गुलामगिरी या सर्वांला अज्ञानाने उभा केलेला दगडाचा देवच कारणीभूत आहे.

ध्यानात निमग्न होऊन किंवा सृष्टीशी तन्मय होऊन पुढे आपली संकुचित स्वार्थवृत्ती टाकून दिली नाही व माळ ओढीत एखाद्या मठीत जन्म काढला काय किंवा पैसा ओढीत तिजोरीची तोंडे भरली काय, जगाला त्याचा काय फायदा? एक स्वार्थी, मुक्तीच्या इच्छेने संन्यास पत्करणारा, तर दूसरा स्वार्थी महत्त्वाकांक्षेने संपत्ती साठवून दुसऱ्यांना संन्यास घ्यावयास भाग पाडणारा. हे लोक पृथ्वीच्या उत्पादनांत भर न घालता व्यर्थ जनतेच्या श्रमावर जगणारे टोळच होत. जनतारूपी जनार्दनाची सेवा करण्याकडे जर आत्मविकासाची वाढ नसेल तर तो पोकळ निरर्थक वेदांत काय कामाचा! म्हणून खऱ्या भक्ताने ब्रह्मरूप जनार्दनाला आपल्या सेवेने जागा केला पाहिजे. म्हणजे जागा झालेला विराट पुरुष दुष्टांचे शासन करू शकणार आहे. आकाशाकडे हात करून देवाचा धावा केल्याने पाप्यांना शासन मिळत नाही. ज्या ज्या वेळी हा विराट पुरूष, हा जनता जनार्दन जागा झाला त्यावेळी त्याने उन्मत्त साम्राज्यशाहीला, तैमूरलंगी, बादशाहीला, सैतानी झारशाहीला, संपत्तीत लोळणाऱ्या रोमशाहीला फ्रान्सच्या कामांध लुईला धुळीला मिळविले आहे.

न्यायाचा निवाडा करण्याला अधिक बलवान जगात दुसरा कोणी नाही. रशियन अस्वलाप्रमाणे तो केव्हा भयानक स्वरूप धारण करील किंवा गांधीच्या स्वरूपांत तो महापुरूष प्रेमळ अहिंसा देवीचे गोड स्वरूप धारण करून आपल्या मोहिनीने दिव्यदृष्टी देऊन जगात प्रेमाचे साम्राज्य पसरवील; पण हा जनता जनार्दनरूप जागा झाला पाहिजे, बलवान झाला पाहिजे, सत्याधीश झाला पाहियेम्हणजेच पृथ्वीवर न्यायाचे राज्य सुरू होईल. बहुसंख्य जनता सुखी होईल दगडाच्या देवांत नव्हे, तर जिवंत देवांच्या सेवेत स्वत:चे व दुसऱ्याचे कल्याण आहे.

**देवांवर भार आपण मोकळे**

या देवालयांनी आम्हाला कर्तृत्वशून्य केले आहे. स्वत:च्या हिमतीवर व मनगटावर अवलंबून राहण्याऐवजी देवावर भरवसा टाकून हात हालवीत बसण्याची वृत्ती या देवालयांनी व त्यावर पोसले जाणाऱ्या वर्गाने अज्ञ जनतेमध्ये पेरली आहे. 'देव ठेवील त्या स्थितीत रहावे' या कल्पनेने भांडवलशाहीचे आसन स्थिर झाले आहे. अन्याय होत असताही प्रतिकाराची वृत्ती, 'सर्व काही देवाधीन आहे या कल्पनेने' नष्ट झाली आहे. संकटाशी टक्कर देऊन 'नर का नारायण' होण्याचा आत्मविश्वास नाहीसा झालेला आहे. जगाच्या धकाधकीत हिंदुस्थान जो निव्वळ धक्केच खात बसला आहे. त्याला पुष्कळसे कारण हा दैववाद आहे. देवाची इच्छा म्हणून अमके आमच्यावर राज्य करतात देवाची इच्छा म्हणून आज आमची अशी स्थिती आहे ! कर्ता करविता तो आहे ! आम्ही पामरांनी हात उचलून काय होणार आहे, असे म्हणून कित्येक विद्यार्थीसुद्धा नशीबावर हवाला टाकून कर्तव्य न करता स्वस्थ बसत असतात.

असा निव्वळ नशीबावर हवाला टाकून देवाचा धावा करणारा टाळकुट्या पंथ निर्माण झाला आहे. हे लोक स्वत:च्या पोटालाही मिळवित नाहीत; दुसऱ्याच्या श्रमावर जगणारे हे परान्नपुष्ट वर्ग खरोखरी भूमिभार तर आहेतच, पण इतरांच्या मनांतही अशी देवावर हवाला ठेवून बसण्याची वृत्ती उत्पन्न करतात, म्हणून हे लोक देशविघातक झाले आहेत.

*न करवे धंदा। आइता तोंडी पडे लोंदा।।*
*उठिते ते कुटिते टाळ। अवघा मांडिला कोल्हाळ।।* *(तुकाराम)*

हे स्वत: तर आळशी असतातच. पण दुसऱ्यांसही बनवत असतात. अहर्निश कर्तव्यरत असलेल्या देवाला असे लोक कसे आवडतील? निबुद्ध जनावरांना सुद्धा तो बसल्या जागी पोसत नाही, मग अशा म्हैदांना कसा पोशील?

कष्ट करतो त्यालाच देव पोसतो. तोच देवाचा लाडका असतो. शेतकरी स्वस्थ देवावर हवाला टाकून बसला, तर त्याची नांगरण, पेरणी करून, धान्याची गाडी देव घरी आणून पोचवत नाही. देवाला कौल लावला आणि इकडचे पान तिकडे पडले म्हणजे जगाची काही उलटापालट होत नाही.

*दैवात्तमिति मन्यन्ते ये हतस्ते कुबद्वय: ।।- (योगवसिष्ठ)*

"कोणतीही गोष्ट दैवाने घडून येते, अशी ज्यांची भावना असते ते मनुष्य दुष्टबुद्धीचे असून त्यांचा अखेरीस नाश होतो."

आतापर्यंत वर्णिलेल्या जातिभेदाला, विषमतेला, स्पर्शास्पर्शतेला, भोंदू गोसाव्यांना व अनेक उठाठेवी करणाऱ्या लोकांना आधार देणारे, हिंदुधर्माच्या ऐक्यभावनेचा विघात करणारे, अज्ञजनतेला अधिक अंध:कारात लोटणारे देव-देवालये मूर्तिपूजा, ही देशोद्धारक आहेत काय याचा वाचकांनीच विचार करावा.

जाणती मूर्तिपूजा नको असे लेखक म्हणत नाही. देवालये मूर्ती व क्षेत्रे ही सर्रहा वाईटच आहेत, यात चांगल्या गोष्टी काहीच नाहीत हे असे लेखक मुळीच म्हणत नाही- पण सरासरी काढली तर अनिष्ट परिणामच जास्त दिसून येत आहेत. प्रथमच सांगितल्याप्रमाणे बहुसंख्य जनतेचा विचार करून या प्रश्नाकडे पहायचे आहे. अपवादावरून सर्रहा नियम बांधणे योग्य होणार नाही; ते अपवादच आहेत.

लेखक, मूर्तिभंजक व मंदिरविध्वंसक नाही. लेखक स्वत: थोडाबहूत चित्रकार व शिल्पकार असल्यामुळे शिल्पकलेचे विध्वंस झालेले त्याला पहावणार नाही. जगाला थक्क करणारी चित्रकला व शिल्पकला या देवालयात व मंदिरात आजहि शाबूत आहे. उच्च प्रतीची चित्रकला व शिल्पकला पाहून इतरांना जे कौतुक वाटेल, त्यापेक्षा लेखकाला त्या कलेबद्दल आदर व अभिमान वाटणार आहे. पण या सर्वांचा जनतेवर होणारा समुच्चय परिणाम पाहिला म्हणजे ही देवालये ठेवावीत, पण त्यातील देव बाहेर काढावेत, देव ठेवावेत, पण त्यांच्यामागे लावलेल्या अंधकल्पना काढून टाकाव्यात-याकरिता उपाय म्हणून मंदिरांची, -धान्यांची किंवा शस्त्रास्त्रांची कोठारें बनवावीत. हवेशीर करता आल्यास तेथे शाळा काढाव्यात व देवांची स्थापना, शिल्पकलेची गोड कामे म्हणून संग्रहालयात किंवा त्यांची पूजा होत नसेल तर त्यांना रस्त्याच्या नाक्यावर पुतळ्यांच्याऐवजी ठेवावे, अशीच सूचना करणे नाइलाजास्तव भाग आहे.

देवालये म्हणजे रूढीला पोसणारे व आश्रय देणारे किल्ले आहेत. हा

*''रूढीचा गड खाली उतरा। पाकोळ्या घुबडांना उडवा।(गडकरी)*

म्हणजे वातावरण स्वच्छ होईल. मूर्तिपूजा नको म्हणणे, अशी मते प्रतिपादन करणे हिंदुधर्माला सुटून आहे असेही मानण्याचे कारण नाही. प्राचीन काळी ती हिंदुधर्मात नव्हती ती मागाहूनच घुसटलेली आहे म्हणून मूर्तिपूजा नाहीशी झाली म्हणजे हिंदुधर्म बुडाला असे मानण्याचे काही कारण नाही.

हे देव व ही मंदिरे नष्ट झाली म्हणजे सर्वत्र नांदणारा देव पाहण्याची बुद्धी जनतेत येऊ शकेल. मंदिराच्या कोंदट हवेतून, त्या पाकोळ्यांच्या दुर्गंधीतून बाहेर पडल्यानंतर उघड्या नीलांबरी प्रकाशात असणाऱ्या जागृत देवतेकडे सहजीच दृष्टी जाईल.

*सब घट राम पछानोरे। मेरा कहना मानोरे।* **कबीर.**

सृष्टीशी तादात्म्य झाल्यानंतर प्रकृतिमाताच अनंतरूपांनी नटलेली दिसू लागेल.

सगुण रूपाखेरीज देवाचे आकलनच करता येणार नाही, त्या शिवाय ध्यान लागणार नाही, असे म्हणणाऱ्यांनी सृष्टीसौंदर्याकडे थोडे डोळे उघडून पहावे.

देवाच्या मागे लागलेले विषमतेचे वारे बदलले. स्वार्थ हेतु नष्ट झाला म्हणजे देवाकडे पाहण्याची वृत्तीही सात्त्विक होईल. अणुरेणूंमध्ये असलेल्या परमेश्वराला भिंतीच्या तुरुंगात टाकावेसे वाटणार नाही. खुल्या पवित्र वातावरणात तो तुम्हाला दिसू लागेल. निसर्गाशी तुम्ही तन्मय व्हाल, निसर्गाशी एक होण्याने जसे तुम्ही त्या शक्तीजवळ जाल, तसे दगड-धोंड्याच्या भक्तीने तुम्ही जाणार नाही. संत महात्म्यांची मूर्तिपूजा ज्यावेळी व्यापक झाली, त्या मूर्तिपूजेने ज्यावेळी ते यच्चावत् वस्तूंशी आपलेपणाने पाहू लागले, त्याचवेळी ते मुक्तीला पोहोचले.

या देवाधर्माच्या परस्परविरोधी भांडणातून मार्ग काढण्याला महात्माजींनी केलेली व्याख्या सर्वांना ग्राह्य होण्याजोगी आहे. ते म्हणतात-

''जगात जितके प्राणी आहेत तितके देव आहेत, असे म्हणणे सत्याला धरून आहे. त्याला अनेक आकार आहेत, म्हणून त्याला आपण निराकार म्हणतो. तो प्रत्येक भाषेतून बोलतो म्हणून भाषातीत म्हणतो. पण माझ्या खोल अंतर्यामी देव म्हणजे सत्य हेच मी म्हणत असतो. सत्याबद्दल मतभेद होत नाही. हे तत्त्व अबाधित आहे. नास्तिक लोक देवावर विश्वास ठेवीत नाहीत. पण

सत्य हे सर्वांना प्रिय आहे"

कारण अबाधित तत्त्वाबद्दल मतभेद होत नसतो.

*'रूप नही रंग नही। नही बरन छाया।*
*निराकार निर्गुनही। तूंचि रघुराया।*

हा रघुराया म्हणजे अबाधित तत्त्व होय. असतील नसतील त्या गुणांचा आरोप करून मूर्तिपूजेत दंग होण्यापेक्षा, निसर्गामध्ये असलेल्या अबाधित तत्त्वांचा शोध करण्यात व्यक्तीचा तसाच जगाचा फायदा होतो. प्रगतीला मदत होत असते.

कल्पनेचा पसारा मांडण्यापेक्षा समोरील पसाऱ्याकडे संशोधक बुद्धीने पाहून अबाधित तत्त्वाचा शोध करणे चांगले नव्हे काय ?

जगातील प्रत्येक गोष्ट ईश्वरच आहे असे मानल्यास मूर्तीवरही ईश्वराचा आरोप करता येईल, पण कालांतराने मूर्तीतून विश्वव्यापी तत्त्वाकडे जाण्याऐवजी मूर्तीलाच अज्ञ जनता ईश्वर मानू लागते. मूर्तीलाच देव मानणारा अंधश्रद्धाळू इतरत्र ईश्वराचे अस्तित्व पाहण्यास समर्थ होत नाही. अंधश्रद्धाळू चौकस बुद्धीचा नसतो. तो दुसऱ्याचे हातून पाणी पिणारा असतो. असा मूर्तिपूजक आपल्या मूर्तीखेरीज दुसऱ्या मूर्तीस मानत नाही. दुसऱ्या मूर्ती खोट्या मानतो. त्यांची निंदा करतो. हे भक्त आपल्या देवाखेरीज इतर देवांची नालस्ती करतात. आणि एका देवाचे भक्त तरी सलोख्याने कुठे वागतात ? मोठमोठ्या क्षेत्रांतील देव हे सार्वजनिक असले तर दक्षिणेपायी ते पुजारी-बडव्यांच्या खास मालकीचे होतात. त्यांच्या मालकीच्या हकासाठी कोर्टाचा मार्ग पत्करण्यासही भक्तांना दिक्कत वाटत नाही. वाडीचा दत्त खाजगी मालकीचा, पर्वतीचे मंदिर खाजगी मालकीचे समजून इतर भक्ताना बंदी होत आहे. एकत्र कुटुंबातील देव्हाऱ्यावरचे देव सोन्यारुप्याचे असल्यास त्या देवापायी मारामाऱ्या होतात. सख्ख्या भावांत वितुष्ट येते. विश्वबंधुत्त्व पटण्याऐवजी या मूर्ती पाठच्या भावातही पुष्कळ वेळा भेद पाडतात !!

निसर्गाबद्दल असा भेद होत नाही. निसर्ग सर्व लोकांना वंदनीय आहे. सर्वांना समजण्यासारखा आहे. ते एक अबाधित तत्त्व आहे. ईश्वराचे सर्वव्यापी स्वरूप जसे मंदिराबाहेर नीलांबरी दिसू शकेल तसे कोंदट मंदिरांत दिसू शकणार नाही. तुमची बुद्धी व्यापक होणार नाही. देव म्हणजे अबाधित तत्त्व आहे. हा देव मूर्तीत आहे पण तो अत्यंत अल्प प्रमाणात व अपरिपक्व स्थितीत आहे.

*'पंचतत्त्वके दरगा माने'* - *(कमाल).*

कोळशातील द्रव्ये हिऱ्यांतही आहेत, पण त्यातील प्रमाण भिन्न आहे. भूमीतून वनस्पती निर्माण होते. कारण भूमीत काही अधिक गोष्टींचे मिश्रण झाल्याने तिला ते स्वरूप येते. अन्न काही काल तसेच राहिले, व त्यास विशिष्ट परिस्थिती अनुकूल मिळाली म्हणजे त्यात प्राण उत्पन्न होतो. म्हणजे ते हालचाल करू लागते. अंड्यास ऊब लागली तरच त्यात जीव येतो. या सर्व प्राण्यात मनुष्य हे एक अत्यंत नाजूक असे मिश्रण होय. मन, बुद्धी, आत्मा हे त्या मिश्रणातून निघालेले विशेष आहे. बुद्धीस मेंदू असावा लागतो. मेंदू हा देहातलाच एक भाग आहे. देह जडसृष्टीशीच संलग्न आहे. यावरून विचार हेही जडसृष्टीशी संलग्न असल्याचे ठरते. जगातील प्रत्येक वस्तू म्हणजे पंचमहाभूतांचे मिश्रण आहे. त्यांचे प्रमाण भिन्न आहे इतकेच. संशोधकांचे पाऊल रोज पुढे पडत आहे. पूर्वी अगम्य वाटणाऱ्या गोष्टी प्रयोगांद्वारा लोकांना पटवून देता येऊ लागल्या आहेत. नाजूक मिश्रणांचा शोध लागू लागला आहे. काही प्रयोगाने आयुष्यही वाढवता येऊ शकते म्हणतात. आज जी शक्ती अगम्य म्हणून आपल्यास वाटत आहे. प्राण म्हणजे काय मिश्रण आहे हे जे आपल्यास समजत नाही ते पुढे समजणार नाही असे काही म्हणता येणार नाही. पण प्रत्येक गोष्ट पंचमहाभूतांपासून निर्माण झाली आहे हे सिद्ध झाले आहे. यावरून विश्वबंधुत्त्व हे तत्त्व नैसर्गिकच ठरते. मनुष्याची धाव या मिश्रणाच्या परिणत स्थितीकडे जाण्याची असली पाहिजे. दगडाची पूजा अगदी प्रथमावस्थेकडे म्हणजे मागे नेते. हे प्रगतीला धरून नाही. जनी जनार्दन पाहणे म्हणजे त्या उच्चतम तत्त्वाकडे जाण्याची धाव होय.

पॉवर हौसपासून अनेक वस्तूंनां शक्तीचा पुरवठा मिळतो. त्याने किटली उकळते, इस्त्री तापते, पंखा सुरू होतो, दिवे प्रकाशतात. एक दिवा हजारो जणांना प्रकाश देतो तर दुसरा आपले अस्तित्व फक्त 'मिणमिण' प्रकाशाने दाखवतो. या सर्व वस्तूंचे आचार निराळे, उपयोग निराळे, आकार निराळे असले तरी सर्व वस्तूत ती शक्ती वावरत आहे. तिचे प्रमाण निराळे आहे; इतकेच.

जडसृष्टी, वनस्पतीसृष्टी व मनुष्यकोटी या सर्व अवस्था पंचमहाभूतांच्या मिश्रणावर अवलंबून आहेत. हे तत्त्व समजल्यानंतर दगडच उराशी घेऊन कोणी बसणार नाही. दगड हे निसर्गाचे कनिष्ठ स्वरूप आहे, निसर्ग हे विराट स्वरूप आहे. या व्यापक तत्त्वाकडे जाणे, त्याशी तादात्म्य होणे

म्हणजे आपपर भाव विसरणे होय. हा ज्या मानाने जाईल त्या मानाने तो जनतेच्या सेवेस प्रवृत्त होत असतो.

देवालयाच्या या खुराड्यातून, या छपरी मंडपातून बाहेर पडा. म्हणजे क्षणोक्षणी बदलणाऱ्या त्या आकाशात सकाळी उमललेल्या गुलाबकळीत, सायंकाळच्या गुलालफेकीत, काळकभिन्न अमावास्येच्या काळोखातील रत्नांच्या धूळफेकीत, प्रशांत जलाशयात स्मितहास्य करणाऱ्या तारकात, वृक्षलतांच्या कर्णोपकर्णी गुंगणाऱ्या मंजुळ गानरवांत, झुळझुळ वाहणाऱ्या निर्झरांच्या गुजगोष्टींत, मैनेच्या बासरीत किंवा मोराच्या रूबाबी नाचात तुम्हाला ईश्वर दिसू लागेल. तुमच्याबरोबर तो बोलू लागेल. व या जादूच्या किल्लीने इतका काल झाकलेले हृदयकपाट खोलून त्यात तो विश्वप्रेमाचा ठेवा ठेवील.

*ब्रह्मांड गोलकी। पवनाच्या पालकी*
*अवधूत कवतुकी। पहुडलासे ॥* *- चांगदेव*

रम्य ठिकाणी विश्वव्यापी आत्मा निद्रिस्त असलेल्या शक्तींना जागे करीत असतो. ज्ञानज्योतीने त्यांच्या हृदमंदिरांची दालने खुली होतात. मंदिरांतून बाहेर पडा म्हणजे ईश्वराचा कधीही न संपणारा ठेवा तुमच्या हाती येईल 'तो नानाविध यत्नांनी तुमच रंजन करीत आहे. नभोमंडलाच्या रंगपटावर अनादिकालापासून तो तुम्हाला निरनिराळे देखावे दाखवत आहे. आकाशातील ढग चित्रविचित्र स्वरूपे घेऊन ईश्वराची अनंतरूपे, त्याचे विराटस्वरूप दाखवत आहे. कोणत्याही रुपवतीच्या गुलाबी गालाला लाजवणारे कोणत्याहि कोहिनूर हिऱ्याला फिके पाडणारे, टर्नरसारख्या चित्रकाराच्या भपकेदार रंगाला फिकें पाडणारे हे ईश्वराचे स्वरूप डोळे उघडून तरी पहा! थकलेल्या पांथस्थाला भग्नहृदयी दुःखिताला, एकलकोंड्या जीवाला, मांडीवर घेऊन खेळवणाऱ्या या जनन्मातेला टाकून दगडाला कवटाळावे असे तुम्हाला वाटते काय?

*साऱ्या त्रिभुनवी भरला आनंद। नृत्य ताल छंद चालतसे॥*
*ऐशा या आनंदी एकताननतेने। समरस होणे असाध्य का॥* *गीतांजली.*

अशा जगाशी समरस झालेल्याला सर्वत्र नारायण दिसेल. जातिभेद, पंथभेद हे सर्व भेदाभेद जातील. जनतेमध्ये त्याला जिवंत देव दिसू लागेल. त्यांच्यासाठी तो आत्माहुतीही द्यायला तयार होईल.

*मी माझी कल्पना पळाली वासना।*
*जनी जनार्दना सेवी तुझें॥* *- सोपान*

ब्रह्मज्ञान ते हेच. देवाच्या भक्तीचे अखेर ते हेच. मनुष्याची मुक्ती ती हीच. साकार पूजा व निराकारपूजा अखेर इकडेच आली पाहिजे. जर कुणाला मूर्तिपूजेखेरीज हा मार्ग सापडत नसेल तर मूर्तिपूजा बेलाशक करावी. पण त्याने हे लक्षात ठेवले पाहिजे की, यातून सुटून आपल्याला पुढे जायचे आहे-

*चराचरी सर्व ब्रह्म ओळखावे।*
*ईश्वरा पहावे ठायी ठायी।।* -(गीतांजली)

अशी व्यापक दृष्टी झाल्यानंतर हा ब्राह्मण तो ब्राह्मणेत्तर, हा हिंदू तो मुसलमान, हा स्पृश्य तो अस्पृश्य, मी हिंदुस्थानचा -तो इंग्लंडचा, हा आर्य तो अनार्य अशा प्रकारचे सर्व भेदाभेद जाऊन, हा श्रीमंत -तो गरीब हा भेदही नाहीसा होऊन "अहिंसा समता व विश्वबंधुता" या पवित्र तत्त्वाने जग हेच एक कुटुंब होईल. परकेपणा नष्ट झाला म्हणजे लढाया साहजिकच बंद पडतील. सर्वच देश आपले, सर्व लोक आपले बंधू, असे वाटल्यानंतर जिंकायचे कुणाला ?

*(सत्यशोधकांना इषारा अथवा नव्या पिढीचे राजकारण)*

## ४) स्वराज्याचा पुनरुद्धार

"In village communities, each one forming as seperate little state in itself has I conceive contributed more than any other cause to the preservation of the people of India through all the revolutions and changes which they have suffered"

*Sir C. Metcalfe.*

**समाज-संस्था**

हिंदुस्थानची संस्कृती कायम राहण्याला अनेक क्रांत्या, स्वाऱ्या वगैरे आपत्तीतून जिवंत राहण्याला, खेड्यावरच्या स्वतंत्रपणे चाललेल्या समाजसंस्था याच कारण होत, असा कबुलीजबाब विद्वान अनुभवी इंग्रजांना व अधिकाऱ्यांना द्यावा लागत आहे. या नष्ट होत चाललेल्या संस्थांचा पुनरुद्धार करण्याचे पवित्र काम नव्या पिढीस हाती घ्यावे लागणार आहे.

हिंदुस्थानातली खेडी पूर्वी स्वराज्याचा अनुभव घेत होती. राज्यांच्या उलथापालथीचा त्यांच्यावर फारसा परिणाम होत नसे. धर्मकारण, राजकारण या सर्व गोष्टीत खेडी स्वावलंबी असत. आश्रमसंस्था म्हणजेच त्या वेळच्या शिक्षणसंस्था, राजाच्या मदतीवर फारशा अवलंबून नसत. ही छोटी छोटी स्वतंत्र

राज्ये हिंदुस्थानभर विखुरलेली होती.

हे स्वराज्य मिळण्यास शेतकऱ्यास फार दूर जाण्याचे कारण नाही.

"तुझे आहे तुजपाशी, परि तू जागा चुकलासी"

या पुरातन संस्थेचा आज त्याला फक्त विसर पडला आहे. थोडासा प्रयत्न केल्यास या संस्था पुन: ऊर्जितावस्थेस येतील, या संस्था ज्या मानाने ऊर्जितावस्थेस येतील, त्या मानाने राष्ट्रसंघटना करणेही फार सोपे होईल. परस्पर सहाय्यासाठी एकजूट झालेले खेडे राष्ट्रैक्यास सहजच मदत करू शकते कारण ते त्याच्या वृत्तीला धरूनच आहे.

**- मोठा राज्यकारभार चालविण्याकरिता, ग्रामसंस्था या शेतकऱ्यांच्या राजकीय शिक्षणाच्या प्राथमिक शाळा आहेत.** - यांत्रिक सुधारणेचा स्वीकार करण्याच्या अगोदर सहकार्यावर व सामुदायिक तत्त्वावर कारभार चालण्याचे त्यांना शिक्षण मिळाले म्हणजे भांडवलशाहीचा ठराविक अध:पात हिंदुस्थानला चुकविता येईल. सामुदायिक सत्तेने व समतेने राज्यव्यवस्था चालण्याचे शिक्षण या ग्रामसंस्थेत साहजिकच मिळणार आहे. प्रचारकांनीही त्या धोरणानेच आता ही ग्रामसंघटना केली पाहिजे.

**नि:शस्त्र पण निर्बल नव्हे.** : खेड्यातील शेतकरी नि:शस्त्र आहे म्हणून त्याला हताश होण्याचे मुळीच कारण नाही. त्याचे स्वराज्य त्याला शस्त्राशिवायच मिळवायचे आहे. स्वराज्यप्राप्तीसाठी त्याला लढाई करायला नको आहे. हाती तलवार न धरता स्वराज्य त्याला आज मिळवता येणे शक्य आहे. 'निश्चयाचे बळ, हेच फक्त त्याला पाहिजे, म्हणजे 'स्वराज्याचे फळ' दूर नाही, या निश्चयापुढे केवढीही मोठी सत्ता विरोधी असली तरी तिचे फारसे चालणार नाही. तीच पुढे मेटाकुटीस येते.

आज शेतकऱ्याला शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे. त्याच्या अज्ञानामुळे तो हरघडी फसला जातो. त्याला मराठीप्रमाणे इंग्रजी शिकता आले तर तेही पाहिजेच आहे; पण आज त्याला लिहिता वाचता येत नाही, इंग्रजी समजत नाही म्हणून हातपाय गाळण्याचे कारण नाही. खेड्याचा सर्व कारभार पाहण्याचे त्यांनी ठरवले म्हणजे आपले व आपल्या मुलाबाळांचे अज्ञान काढण्याचे काम त्यांना करावे लागणारच आहे. खेड्याच्या गोष्टी पाहण्याला प्रथमपासून शिकलेलेच सर्व पाहिजेत असे म्हणत बसल्यास पाऊलच पुढे पडणार नाही.

या घरच्या कारभाराला वकील, बॅरिस्टर यावाचून नडत नाही. शिकलेला माणूस मिळाला तर बरेच झाले. त्याच्या सहाय्याचा उपयोग होईल; पण तसा कोणी नसला तर आपले गाडे अडून बसता कामा नये. तुमच्या गरजा काय आहेत, या साध्या गोष्टी समजण्याला इंग्रजी शिक्षणाची आवश्यकता नाही. या गोष्टी घरगुती असल्यासारख्याच आहेत. याला जाड्या विद्वत्तेची जरूरी नाही. खेड्याची सुधारणा करायला कौन्सिलातील ठरावाची व त्या ठरावाच्या मंजुरीची वाट पहात बसायला नको. रस्ता दुरुस्तीबद्दल वरच्या अंमलदाराकडे किंवा त्या खात्याकडे अर्ज करून पुढच्या सालपर्यंत मंजूरीची वाट पहात बसायला नको. फुकट्या वादाची रणे न माजवता, पाहिजे असतील त्यापैकी पुष्कळ गोष्टी खेड्याच्या शेतकऱ्याला संघटनेने करून घेता येतात. तात्पुरत्या गोष्टी दूर करून घेता येतात आणि या त्याच्या जीवितास व रोजच्या व्यवहारास अडचण आणणाऱ्या गोष्टी दूर झाल्यास त्याला त्याच्या बौद्धिक सुधारणेकडे लक्ष देता येईल.

**यांत्रिक युगाचे निरीक्षण.** : पाश्चिमात्य राष्ट्रे यांत्रिक सुधारणेत आपल्या पुढे फार गेलेली आहेत, म्हणून निराश होण्याचे कारण नाही. उलट एका अर्थी यांत्रिक युगात आपण पाठीमागे पडल्याने आपला फायदाच झाला आहे. निवांतपणे त्या यांत्रिक प्रगतीचे आज आपल्यास निरीक्षण करता येत आहे. त्यातले चांगले वाईट निवडणे आज आपल्यास सोपे जात आहे.

**- यंत्राचा उपयोग व्यक्तिस्वार्थाकडे केल्याने आज जगावर केवढे संकट ओढवले आहे** : हे पाहून आपल्यास मार्ग बदलता येणार आहे. पाश्चिमात्यांच्या चुकीच्या मार्गातून न जाता भांडवलशाहीच्या पकडीत न सापडता आपल्यास यांत्रिक सुधारणेचा उपयोग करून घेता येईल. 'पुढच्यास ठेच मागचा शहाणा' या न्यायाने एकापरी आपला फायदाच होणार आहे.

जगातील सर्व सुधारणा, निरनिराळे शोध, सोयी, ऐषआरामाची साधने, लढाया करून देश जिंकणे व व्यापाराने पैसे मिळविणे या सर्वांच्या मुळाशी एकच गोष्ट आहे. या सर्व घडामोडी, ही जिवाची धडपड एकाच गोष्टीसाठी चालली आहे. ती गोष्ट म्हणजे सुख, समाधानी व आत्मोन्नति ही होय. हे सुखसमाधान जितक्या अधिक लोकांना मिळेल. आत्मोन्नतीचा मार्ग जितक्या अधिक लोकांना मिळेल, त्या मानाने देश सुखी, समाधान व संपन्न म्हणता येईल.

हजारात एक माणूस मिष्टान्न खात आहे व ९९९ अन्नान्न करीत फिरत आहेत; एक नवकोटनारायण व बाकीचे नऊ कोट, दरिद्री नारायण

बनून नंगे फिरत आहेत; जेथे आत्मोन्नतीचा मार्ग चारांना मोकळा तर इतरांच्या चारी दिशा बंद आहेत; जेथे काहींना पैसा कसा खर्च करावा त्याचा मार्ग सुचत नाही, तर इतरांना तो केव्हांही दिसत नाही - तो देश यांत्रिक सुधारणेत पुढे गेला असला, तरी सुखी कसा म्हणता येईल? एक इमला चढून हजारो झोपड्या बसण्यापेक्षा त्या इमल्याऐवजी हजारो झोपड्याच वर आलेल्या बऱ्या नाहीत काय? यांत्रिक सुधारणेने समाजस्वास्थ्यात विष कालवायचे असेल तर ती न आलेली काय वाईट!

**पोट अगोदर!** : आपल्या हिंदुस्थानातील कित्येक कोटी लोकांना श्रमाची भाकर, मालकीची झोपडी व हक्काची विश्रांती मिळत नाही! मनुष्याच्या आत्मविकासास या गोष्टीच्या गरजेतून बाहेर पडणे अगोदर भाग आहे. ही तरतूद त्याची प्रथम झाली पाहिजे. "अगोदर पोटोबा व मग विठोबा," इतर गोष्टींचा विचार मागाहून.

यांत्रिक सुधारणा मागाहून पाहता येतील. शिक्षणाची सोय मागाहून करता येईल; पण या अगोदर खेड्याचे संघटन करून नेहमी नडणाऱ्या आवश्यक गोष्टींचा विचार केला पाहिजे. हे खेड्यांचे संघटन सुशिक्षित समाजसेवकांनी खेड्यावर जाऊन व राहून केले पाहिजे. क्रमिक शिक्षणापर्यंत वाट पाहण्याचे कारण नाही. जगातील मोठमोठ्या क्रांत्या, व्याख्याने, भाषणे, कीर्तन, प्रवचन वगैरेंचे द्वाराच झाल्या आहेत, पुस्तकी ज्ञानाशिवाय लोकजागृती करता आली आहे. ख्रिस्त, बुद्ध, महंमद, सॉक्रेटीस वगैरे महात्म्यांनी उपदेशानेच जागृती केली आहे. हे साधन प्रचारकाच्या हाती आहे. **-थोड्या प्रचारकांना पुष्कळ जागृती करता येते-**

**देशसंस्कृती** : क्रमिक शिक्षण मिळाले नसले म्हणजे शेतकरी आपला कारभार पाहण्यास सर्वस्वी नालायक कांही ठरत नाही. जगाच्या रोजच्या व्यवहारात ज्ञानभंडार भरलेले आहे. प्रत्येक देशाची अशी एक संस्कृती चालत आलेली असतेच. त्या आपल्या प्राचीन संस्कृतीची शिकवण, पाळण्याच्या झोक्याबरोबर प्रत्येक मुलाला थोडीबहुत मिळालेली असते. रामायण-महाभारतातल्या गोष्टी, त्यातील तत्त्वज्ञान, मातेच्या साध्या भोळ्या भाषेत मुलाच्या कानावर पडत असते. तुकोबाचे अभंग, कबीराचे दोहे, मुक्ताईची गाणी या संतमालिकेचा उपदेश ठिकठिकाणी त्यांना ऐकावयास मिळतो. जात्यावरच्या गाण्यात त्याला आपल्या जिव्हाळ्याच्या संस्कृतीची

ओळख रोजच्या साखर झोपेत मिळत असते. वेदांताचे आख्यान लिहिता वाचता न येणारा शेतकरी सुद्धा तासाचे तास घरबसल्या देऊ शकतो. लावण्या पोवाडे-या गाण्यातून नीतीबोध मिळत असतो.

तेव्हा इंग्रजी लिहिता वाचता आले नाही म्हणून आमचा शेतकरी अगदी मूर्ख ठरेल काय? आपला कारभार पाहण्यास सर्वस्वी नालायक ठरेल काय?

**"There is such a thing as social education and education outside books and this is distinctively higher in India than any part of Christiandom" - *Max Mullar***

आज आपण कुठे आहोत, जग कुठे चालले आहे हे समजण्यास लिहिणे वाचणे येणे आवश्यक आहे. पण इंग्रजी नाही म्हणून हिंदुस्थान देश अशिक्षित आहे असे मात्र म्हणता येणार नाही. कारण इंग्रजी न जाणणारी जगातील राष्ट्रे आपआपले राज्य व्यवस्थितपणे चालवतच आहेत. शेतकऱ्याला आपल्या भाषेची ओळख चांगली झाली व लिहिता वाचता आले म्हणजे तो आपल्या देशापुरता व्यवहार पाहण्यास लायक होतो. ज्ञान केव्हाही वाईट नाही. परक्या भाषेची माहिती झाल्यास त्यांच्यातील विद्वानांची ओळख होते, आपले ज्ञान वाढते; पण खेड्याच्या स्वराज्यास एम. ए. पीएच्. डी. व एल्. एल्. बी. वाचून अडत नाही.

इंग्लंडच्या प्रजेने 'स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्यावर' राजाची सही घेतली, त्यावेळी इंग्लंड आजच्या दृष्टीने सुशिक्षित नव्हते. जपान देश सुशिक्षित होऊन स्वराज्य मागू लागला नाही, तर स्वराज्यानंतर तो सुशिक्षित झाला. कॅनडाने सुशिक्षित होण्यापूर्वीच प्रातिनिधिक संस्थेचा स्वीकार केला व त्यानंतर त्याने शिक्षण हाती घेतले. आपला कारभार आपण पाहू लागल्यानंतर त्या देशातील लोकांना आपल्यास वाटणाऱ्या अडचणी दूर कराव्या लागतातच. 'पोहण्यास आल्यानंतर पाण्यात पडावे' हा उपदेश जसा चुकीचा आहे, तसेच 'शहाणे झाल्यानंतर आपल्या घरचा कारभार पहावा' हे म्हणणे चुकीचे आहे. चुकीतूनच शहाणपणा येतो. मनुष्य अनुभवानेच शहाणा होतो.

**राजकीय शिक्षणाच्या शाळा.** : हा स्वराज्याचा अनुभव, ही स्वराज्याची शिकवण शेतकऱ्यास त्या त्या खेड्यावर मिळू शकते. पण इंग्रजी आमदानीत या संस्था मोडल्या गेल्या. त्यांचा पुनरुद्धार झाला की शेतकऱ्याचे राज्य स्थापन होईल; आणि हिंदुस्थान हे तर शेतकऱ्यांचेच राज्य आहे, तो त्याचा खरा मालक आहे. तो सुखी झाला की सर्व सुखी होणार आहेत. या

शेतकऱ्याच्या कल्याणात आपले कल्याण आहे; म्हणून शेतकऱ्यांच्या उद्धाराकरिता, म्हणजे पर्यायाने आपल्याच उद्धाराकरिता समाजसुधारकांनी पुढे झाले पाहिजे.

**-ग्रामसंघटना हाच स्वराज्याचा पाया; व्यापक राजकारणाचा 'श्रीगणेशा' शेतकऱ्यांना या शाळेतून मिळणार आहे.** - यात राष्ट्रैक्याचे बीज आहे. तसेच जागतिक एकीचेही बीज आहे; ज्या समाजातील लोक त्या समाजाच्या कल्याणासाठी स्वार्थ आवरू शकतात, स्वैर स्वातंत्र्यावर निर्बंध घालू शकतात, सामुदायिक हितात व्यक्तींचे हित मानू शकतात, ते लोक विश्वराष्ट्र बनवण्यास आपोआपच समर्थ होऊ शकतील.

आधुनिक पुढारलेल्या राष्ट्रात जी आर्थिक चढाओढ चालली आहे, ज्या विषाची वाढ झाली आहे, ते विषाचे झाड वरील ग्रामसंस्थेत आवरता येईल. कारण सहकार्याची सवय लागल्यास तेथे भांडवलशाही पद्धतीचे रोप फोफावणार नाही. वाढू लागलेच तर त्याला उपटून काढणे सोपे जाईल.

**चुकीची व्यापारी नीती** : चालू व्यापारी नीतीमुळे संपत्तिमान झालेले राष्ट्र किंवा व्यक्ती, व्यापक दृष्टीने विचार केल्यास जगास पोषक नाहीत. दुसऱ्या राष्ट्रास बुडवून एका राष्ट्राने संपन्न होणे, किंवा गिऱ्हाईकास फसवून व्यापाऱ्याने धनाढ्य होणे, याने जगाच्या संपत्तीत भर पडत नाही. देशातील दलालीने तो देश संपन्न होत नाही. देशातील संपत्ती नवीन नवीन उत्पन्न होणाऱ्या धान्याने व वस्तूंनी वाढत असते.

हल्लीची व्यापारी नीती ही चुकीच्या तत्त्वावर चालली आहे. दिसणारी भरभराट हा आभास आहे. दलालीने देशातील लोक जगत नसतात. प्रत्येकाने दलालीचाच धंदा करावयाचा ठरवले तर कशावर जगायचे? लोक धान्यावर व जीवितास लागणाऱ्या आवश्यक वस्तूवर जगत असतात. दलालीत एकाचा फायदा तर दुसऱ्याचा तोटा असतो. कमी किंमतीचा माल फसवून अधिक किंमतीत विकल्याने गिऱ्हाईक बुडते व व्यापाऱ्याचा फायदा होतो. असा व्यापारी राष्ट्रधनात भर घालत नाही, असे राष्ट्र जगाच्या संपत्तीत भर घालत नाही. एकाच्या खिशातला पैसा दुसऱ्याकडे गेल्याने एक श्रीमंत तर दुसरा गरीब होतो. संपत्तीत वाढ होत नाही. दोघेही कष्ट करून जर नवी वस्तू निर्माण करतील तर दोघेही श्रीमंत होतील. दलालीने नवी गोष्ट निर्माण होत नाही. व्यवहार सहकार्यासाठी असल्यास मात्र दोघांच्या सोयी होतात, व तसा तो राहिलाच

पाहिजे. समाज आहे तेथे व्यवहार हा राहणारच.

चालू व्यापारी पद्धतीने राष्ट्रातील विभागलेले धन फसवणुकीच्या मार्गाने एका ठिकाणी येते. त्याचा परिणाम बहुसंख्य जनतेवर होऊन ते सारखे खालावत जातात, गरीबीचे प्रमाण वाढत जाते. असंतोष उत्पन्न होतो, परस्परातील प्रेम नाहीसे होते. श्रीमंत गरिबाकडे पैशाचे साधन या दृष्टीने पाहू लागतो. ते एक त्याचे सावज होते ! त्यामुळे परस्पर सहकार्याची बुद्धी नष्ट होते ! वर्गकलह सुरू होतो.

एकमेकांच्या गरजा भागवण्याकरीता व्यवहार चालणे, आपण पिकवलेला जोंधळा देऊन दुसऱ्याने काढलेले वस्त्र याची अदलाबदल करणे, हा व्यवहार निराळा व स्वत:च्या निव्वळ फायद्यासाठी (गरजेसाठी नव्हे) चाललेला दलालीचा व्यवहार निराळा.

**गरजेसाठी देवाणघेवाण** : प्राचीन काळी जरूरीच्या वस्तूंची देवाणघेवाण चाले. त्यात चालू व्यापारी पद्धती शिरली नव्हती. नाण्याच्या सुरुवातीनंतर व्यवहारास निराळे स्वरूप येऊ लागले. आज खेड्यास सहकार्याची शिकवण देऊन त्याची एकी केली पहिजे. आर्थिक दृष्ट्या व राजकीय दृष्ट्याही ते स्वावलंबी केले पाहिजे; पण या शिकवणीत ते दुसऱ्या खेड्यापासून अगदी तुटून राहील असे करता कामा नये. संघटनेतून कूपमंडूकवृत्ती उत्पन्न होता कामा नये; कारण चालू यांत्रिक युगात जगातील कोणचाही भाग सर्वस्वी अलग, अगदी स्वतंत्र असा राहणे शक्य नाही. नव्या सुधारणेमुळे जग एक होत चालले आहे, व ते अंतर नाहीसे होत आहे.

खेडी म्हणजेच हिंदुस्थान असे असल्याने खेड्याबरोबर देशाची स्थितीही चांगली वाईट होत असते. यावरून आपल्या देशाची ऊर्जितावस्था या खेड्यावर किती अवलंबून आहे हे वाचकांस दिसून येईल.

**-ग्रामसंस्था या देशाच्या रक्तवाहिन्या आहेत. मध्यवर्ती संस्थेच्या प्राणाला त्या जगवत असतात.** -हा संबंध कायम राहिल्यास या हिंदुस्थानातून अत्यंत उच्च व उदात्त अशी राष्ट्र भावना निर्माण होणार आहे. जगाच्या राजकारणास याने निराळी दिशा लागणार आहे.

*"A genuine Asiatic government springing up out of the Hindu population itself might in the long run be more beneficial because more conjenial than such a foreign Government as our own."* *- Prof. Seely.*

***(बेकारी व तीवर उपाय)***

## ५) मजुरांची एकजूट

"in Europe the number of the unemployed has succeeded 30- millions (1931)

मजूरवर्ग हा सारखा वाढू लागला आहे. त्याची हळूहळू एकजूट होऊ लागली आहे. ही एकजूट होण्यास बरेच दिवस लागतात. त्रास सहन करावा लागतो, अनुभव यावा लागतो. नंतर एकीच्या आवश्यकतेची जरूरी भासते. संप होतो पण तो प्रथम फार दिवस टिकू शकत नाही. त्याची एकी झालेली नसते. इतर नोकरीस हपापलेल्या लोकांची त्यात भरपाई होते. दारिद्र्यामुळे उघडे पडलेले लोक कमी पगारावर, मालक म्हणतील त्या अटीवर राहण्याचे कबूल करतात. यामुळे मूळच्या संपवाल्याची ताकद फार काळ टिकत नाही. संपाने भांडवलवाल्याचे जरी नुकसान झाले तरी संपामुळे मजुराला जे नुकसान भोगावे लागते, त्या मानाने भांडवलवाल्याचे नुकसान काहीच होत नाही. पगार मिळाला नाही किंवा नोकरी गेली तर मजुराची भाकरी गेली. संध्याकाळचे जेवण बंद झाले व त्या श्रमावर जगणारी त्याची बायकापोरे निराधार झाली. अशी निकराची स्थिती भांडवलवाल्यास केव्हाच येत नाही. फायदा बुडाला तर भांडवल असतेच. मजूराला पोटाची टंचाई सारखी भासत असते, त्याखेरीज त्याचे जीवित नेहमी धोक्यात असते. अपघाताने निकामी होणाऱ्या मजूराला कोणाचा आधार नसतो. आपल्या मुलाच्या मजुरीवर जिवंत राहणाऱ्या आईबापांची संपाने दुर्दशा होते. भांडवलवाल्याप्रमाणे साठवून ठेवलेला पैसा मजुराकडे नसता. पोटावरचे लोक ते ! कयंगटीस आले की पुन: कामावर रुजू होतात.

**मजूर संघ** : हे प्रसंग वरचेवर येऊ लागतात व सर्व मजूरांना आपण सर्व समदु:खी आहोत ही गोष्ट अनुभवाने पटू लागते. अपयशाने ते परस्पराजवळ अधिक जवळ येऊ लागतात. त्यांच्यात आपलेपण व प्रेम उत्पन्न होते, संप तडीस नेण्याकरीता त्यांच्यात फंड जमा होऊ लागतो. अशी एकी झाली म्हणजे, संप झाला असता तेथे दुसऱ्यास नोकरी धरणे होत नाही. असे मजूरांचे संघ आता प्रत्येक भांडवलवाल्या राष्ट्रात होऊ लागले आहेत.

हे संघ चांगले एकजूट झाले म्हणजे भांडवलवाल्यांची खोड काढण्याकरिता ते कामात आळस व दिरंगाई मुद्दाम करतात. विशेष काम करणारा व हुशार मजूर असल्यास त्यालाही ते अधिक काम करू देत नाहीत. ठराविक तासात एखादाच काम जास्त काढू लागला तर त्याला पुढेही तेच प्रमाण

ठेवावे लागते व दुसऱ्यांना जास्त काम करण्याचा तगादा सुरू होतो. याकरिता ते कोणास अधिक काम करू देत नाहीत. यामुळे सर्वांना सारखा पगार पडतो. अशक्त व सशक्त, हुशार व बथ्थड यांच्या पगारात फरक पडत नाही. याचा परिणाम एकंदर मालाच्या पैदाशीवर होतो. काम कमी निघते. या अडवणुकीमुळे मजूरसंघास आपली ताकद अजमावता येऊ लागली आहे. ते एकीच्या जोरावर पुष्कळ यशही मिळवू लागले आहेत.

हे 'मजूरसंघ' जे निर्माण होतात, त्यांचा हेतू गिरण्यांच्या फायद्याचा वाटा घ्यावा, असा असतोच असे नाही. त्यांचा पगार त्यांच्या प्राणधारणेला अपुरा पडतो. आरोग्याचे संरक्षण होत नाही. श्रम ताकदीबाहेर पडतात. व इतर गोष्टीत, व्यासंगात व ज्ञानार्जनात मन घालण्यास काडीचीही फुरसत मिळत नसल्यामुळे ते माणुसकीस गमावतात. तेव्हा ही माणुसकी संभाळून तिला उन्नतीच्या मार्गास नेता येईल अशी परिस्थिती त्यांना प्राप्त झाली पाहिजे. ''खालच्यास लाथा व वरच्यास माथा'' अशी त्यांची पक्षपाती वागणूक असते.

वॉशिंग्टनची गोष्ट सांगतात की, तो अमेरिकेचा अध्यक्ष असूनही नीग्रो भेटल्यास त्यास प्रथम नमस्कार करी. 'असे तुम्ही का करता' असे विचारले असता तो म्हणे ''नम्रतेच्याा व सभ्यतेच्या वागणुकीत मी नीग्रोला हार जाणे मला बरे वाटत नाही'' अशा प्रकारची बरोबरच्या नात्याची वागणूक या समाजात मिळणार नाही, तेथे एखादा मॅनेजर मजुराशी अशी वागणूक ठेवील हे शक्य आहे काय ?

पोटासाठी लाचार झालेल्या ह्या बहुसंख्यवर्गास हा अपमान पुढे पुढे असह्य होऊन तो प्रतिकारास तयार होतो व संघटनेच्या जोरावरच आपला अधिकार त्यांचेवरही गाजवू शकतो.

याला प्रतिकार म्हणून त्या त्या राष्ट्रातील भांडवलवालेही आपआपले संघ निर्माण करून मजूरांच्या एकीस टक्कर देण्याचा प्रयत्न करतात; एकीकडे पैशाचे बळ आहे तर दुसरीकडे माणूसबळ अधिक आहे. पण मजूराचा प्रश्न हा पोटाचा म्हणजे जगण्यामरण्याचाच असल्यामुळे व हा पीडितवर्ग असल्यामुळे याच्या असंतोषास पुष्कळ वेळा भयंकर स्वरूप प्राप्त होते.

याच वेळी 'नवाकाळ' मधून अमेरिकेची आलेली स्थिती मनन करण्याजोगी आहे. ती वाचली म्हणजे आतापर्यंत केलेल्या विधानांची सत्यता कळून येईल.

"अमेरिकेतील बेकारांची संख्या ऐंशी लाख ते कोटीपर्यंत गेली असून त्यांना पोसण्याचा व संतुष्ट ठेवण्याचा प्रश्न अमेरिकेला फार महत्त्वाचा होऊन बसला आहे. त्यापैकी पुष्कळसे सार्वजनिक संस्थेच्या दानधर्मावर पोसले जातात. परंतु त्याऐवजी इंग्लंडप्रमाणे त्यांना सरकारी भत्ता देऊन पोसण्याची योजना गेले कित्येक महिने अमेरिकेत पुढे आली असून ती प्रे. हूव्हर यांना मान्य नाही. तिकडे बेकारीच्या असंतोषाला बंडाळीचे स्वरूप येऊ लागले असून, हा वणवा केव्हा पेटेल याचा नेम नाही, अशी स्थिती येऊन ठेपली आहे. नुकतेच सुमारे ३०० माजी लष्करी सैनिकपैकी बेकार लोक जवळ पैसा नसल्यामुळे फुकट प्रवास करण्यासाठी आगगाडीत चढल्यामुळे त्यांना बाहेर काढण्यासाठी लष्कराची मदत मागवावी लागली. अन्नासाठी केव्हा दंगा होईल याचा नेम नसल्यामुळे प्रसंग पडल्यास चोवीस तासाच्या आत सर्व अमेरिकेची व्यवस्था लष्कराच्या ताब्यात देण्याची तयारी युद्धखात्याने केली असल्याची बातमी लंडनच्या 'डेली हेरल्ड'ने प्रसिद्ध केली आहे.

सध्याच्या परिस्थितीत भांडवलवाल्यांचे सूत्रधारित्व स्थापन करण्यात यावे अशी मागणी करण्यात आली आहे."

आपली मागणी कायदेशीरपणाने ऐकली जाणार नाही, संथपणाने दाद लागणार नाही, अशी सबळ खात्री वाटल्यामुळे बेकार लोक हे असे भावनेला वश होतात. त्यांचे हे प्राणासाठी धडपडणे असते. आगीत सापडलेला जीव, मुक्त होण्याकरिता कोणत्याही मार्गाने बाहेर पडतो, त्याप्रमाणे ते हिंसा-अहिंसेचा विचार न करिता सुचेल तो मार्ग पत्करतात. हा बेफाम झालेला, जिवावर उदार झालेला वर्ग अत्याचारासही प्रवृत्त होतो. देशातील स्वस्थता भंग झाली म्हणजे सरकार मध्ये पडते; मजूर गुन्हेगार ठरतात. अत्याचारी लोकांना कडक शासन होते. काही तरी तात्पुरती तडजोड होते. पण तडजोड करणाऱ्यात बहुतेक भांडवलवाल्यांचेच पक्षाचे असल्यामुळे व नोकरशाहीचा कलही बहुधा तिकडेच असल्यामुळे तडजोड भांडवलवाल्यांनाच अनुकूल होते. पण याने मजुरांचे समाधान होत नाही. असंतोष आत धुमसत असतो. पुन: वेळ आली की पेट घेतो. हे प्रकार प्रत्येक भांडवलवाल्या राष्ट्रात आता सारखे होत आहेत. रोज कुठे तरी संप आहे. आज मुंबईत, उद्या कलकत्त्यात, तर परवा विलायतेत असा हा वणवा सर्व जगभर पेटला आहे. प्रत्येक राष्ट्रात दोन वर्ग परस्परविरूद्ध निर्माण होऊन, एकमेकांस शत्रूप्रमाणे लेखीत आहेत.

**जागतिक एकी** : मजूर इथून तिथून सारखाच ! त्याचे हाल सारखेच ! मग तो कुठेही असो ! हिंदुस्थानात असो, इंग्लंडात असो, अमेरिकेत असो ! त्याला पिडणारा वर्ग एकच ! त्याच्या जीवावर जगणारा वर्ग एकच. हे ज्ञान झाल्यामुळे जगातला मजूर आपलेपणाच्या भावनेने एकजूट होऊ लागला आहे. देशादेशामध्ये, भांडवलशाहीने पाडलेला राष्ट्रभेद नष्ट होत चालला आहे. - मजूर इंग्लंडात असो, अमेरिकेत असो, जपानमध्ये असो अगर हिंदुस्थानात असो, भांडवलवाला हा त्याचा शत्रू झाला आहे. भांडवलवाला व मजुर यांच्या संबंधात जात, गोत, देश यासंबंधाने बदल होत नाही. कोठल्याही भांडवलवाल्या देशात जा, मजुराला गिरणीचा मालक काळ झाला आहे. म्हणून मजूरही देशभेद, वंशभेद, धर्मभेद टाकून बंधुत्वाच्या नात्याने एक होत चालला आहे.

दोन श्रीमंतांची मैत्री लवकर जमत नाही, पण समदु:खी प्राणी झटकन एकजीव होतात. त्यांचे अंत:करण परस्परांकडे ओढले जाते. भांडवलशाहीमुळे जगावर हे एक प्रकारचे उपकारच झालेले आहेत. वाईटातून चांगले निष्पन्न होत आहे. प्रांतभेद, देशभेद, ही सरहद्दीची कृत्रिम रेषा मजुरापुरती नष्ट होत चालली आहे. संकुचित भावना जाऊन विश्वबंधुत्वाचा धागा न कळत जुडला जात आहे.

कोण जाणे, या विश्वकुटुंबी वर्गाचे हातून जगाचा उद्धार होणार असेल ! या जाग्या झालेल्या परमेश्वराच्या हातून दीनानांचे तारण होणार असेल !

असो. हा इकडे असा जागतिक असंतोष उत्पन्न झाला असताना, भांडवलवाला व मजूर असे वर्ग पडले असताना, मजुरांप्रमाणे जगातील भांडवलवाला एकजूट होत आहे काय ?

**इस्टेटीचा धुमाकूळ** भांडवलवाल्यांची एकी होणे शक्य नाहीच, पण त्यांचे घरी त्यांची मुलेही एकीने व सलोख्याने राहू शकत नाहीत. पैसा रक्तसंबंध जाणत नाही. आपला परका भेद ठेवत नाही. इस्टेटीसाठी मुलगा बापाच्या मरणाची वाट पाहतो. बंधू एकमेकाकडे शत्रूप्रमाणे डोळ्यात तेल घालून लक्ष ठेवतात. त्यातला कोण मेला तर कुणाकडे वारसा जाईल, कोण कुणाला हात उचलून देईल याचा विचार करीत असतात. परान्नपुष्ट वाढलेल्यांचे विचार इतर व्यासंगाची जरूरी नसल्यामुळे कुत्सित बनलेले असतात.

श्रीमंत चोचल्यात, कष्ट न करता, स्वत:चे पायावर उभा न राहता

वडिलार्जित इस्टेटीवर वाढलेली ती मुले आळशी, परावलंबी, कर्तृत्वहीन, उन्मत्त व निरूपयोगी अशीच झालेली असतात. बापाच्या इस्टेटीचा आधार असल्याने, त्यांच्यात धाडसी वृत्ती उत्पन्न होत नाही. अंगच्या गुणांची वाढ करावी अशी बुद्‌धी होत नाही. साठवलेल्या धनाच्याच आशेत गुंतल्यामुळे प्रत्येक भाऊ अधिक हिश्शयासाठी धडपडतो ! गिळंकृत करता येईल तितके करण्याचा प्रयत्न करतो. विश्वास, प्रेम, सहकार्य, स्वार्थत्याग याऐवजी संशय, द्वेष, तुटकपणा, स्वार्थ, मत्सर या गुणांचीच भरपूर वाढ होते ! बापाचे प्रेत स्मशानावर जाण्याअगोदरच तिजोरीची किल्ली आपल्या ताब्यात घेण्याचा जो तो प्रयत्न करतो. रस्त्यावरच्या परक्या माणसाबरोबर जी सौजन्याची वागणूक असेल ती पाठच्या भावात मिळणार नाही ! पाठीला पाठ मारून आलेले भाऊ पोटावर लाथ देण्याला कमी करीत नाहीत. भिकाऱ्याला हात उचलून दानधर्म करणारी बायको, दुसऱ्या भाऊबंदाच्या हिश्शास चिपटे मापटे धान्य अधिक गेलेले खपवून घेणार नाही ! नावासाठी संस्थेस देणगी देणारा भाऊ, दमडीच्या जिनसासाठी सख्ख्या भावावर चोरीचा आरोप करून डोके फोडण्यासही कमी करणार नाही. स्नेहाच्या शब्दावर चिठ्ठी चपाटीशिवाय हजारो रूपये हात उसनवार देणारी माणसे, भावाच्या वाटणीचे वेळी क्षुल्लक राहिलेल्या रकमेसाठी कायदेशीर बांधून घेतील व पै पैसा इकडून तिकडे जाईल या भीतीने डोळ्यात तेल घालून बसतील व क्षुल्लक फायद्यासाठी पाठच्या भावावर कुऱ्हाड घालण्यास मागे घेणार नाहीत. बापाच्या हयातीत सुव्यवस्थितपणे चाललेल्या घराण्याची अब्रू भांडणामुळे चव्हाट्यावर आलेली कित्येकांनी पाहिली असेल. उकिरड्याच्या हक्कापायी एकमेकांच्या अंगावर कुऱ्हाड घेऊन धावत गेलेले सख्खे भाऊ लेखकाने पाहिले आहेत. भावाभावांचे वाकडे त्यांच्या नोकरात व त्या नोकरांच्या चाड्या चुगल्याने, सख्खे भाऊ नरडीचा घोट घेण्यास - आणि याच्या फिर्यादी अर्यादी कोर्टात आणि ज्या दमडीपाई ही भांडणे झाली, जे चिपटे कोळवे भावाघरी जाऊ नये म्हणून सर्व डोके खर्चले तोच पैसा अखेर वकिलाच्या घरात ! हे या इस्टेटीचे खेळ आहेत. हा कष्ट न करणाऱ्या भावांचा धुमाकूळ आहे. या इस्टेटीच्या हक्कापायी भावाभावांची हाडे अवेळी स्मशानावर पोहोचली आहेत !

चार कुत्री एकमेकाबरोबर मोठ्या प्रेमाने खेळत असावीत. त्यांचेपुढे सर्वांसमोर एखादे हाडूक समाईकात टाकेल की तीच लडिवाळपणे खेळणारी एकमेकाला फाडू लागतात ! सुखाने एकोप्याने चालणाऱ्या भावात समाइक

असे धनाचे हाडुक टाकले की ते सख्खे भाऊ पक्के हाडवैरी झालेच! न मिळवलेली वडिलोपार्जित प्राप्ती म्हणजे कुत्र्याचे पुढील हाडुक आहे. हे एक विष आहे.

बंधुभाव हा अत्यंत पवित्र शब्द आहे. हा शब्द पूर्ण नि:स्वार्थीपणा दाखविणारा आहे. यात पूर्ण सहकार्य, प्रेम व त्याग मूर्तिमंत भरलेला आहे. पण हा शब्द प्रचारात येण्याचे वेळी त्यांच्यामध्ये इस्टेटीची घाण नसावी. वडिलार्जित इस्टेटीचे विषय त्याचेमध्ये शिरले नसावे. आज बंधुभाव हा शब्द त्या अर्थाने वापरता येणे अर्थाला सुटून होईल. हा पडताळा आपल्याला घरोघरी दिसून येईल! बाप असल्यावेळी सलोख्याने वागणारे, बापाचे पश्चात् शत्रू का होतात? त्यांच्यात असा बदल का व्हावा? त्याला कारण हेच की बापाचे वेळी इस्टेटीची मालकी त्यांचेकडे नसते. तो वारल्यानंतर ते बापाच्या इस्टेटीचे मालक होतात. ही महामाया मालकीची मंथरा शिरली की सख्खे भाऊ पक्के वैरी होतात. वैर कुणाचे असेल तर ते सख्खा भावांचे. बंधू आहेत तेथे भाऊबंदकी आहे. असा प्रकार शेकडा ९० ठिकाणी तरी दिसून येतो. बंधुभाव म्हणजे वैरभाव हाच प्रकार मालकीमुळे उत्पन्न होतो.

साठवलेल्या वाडवडिलार्जित इस्टेटीचा हा घरोघरी खेळ चाललेला असतो. भांडवलशाही राष्ट्रांचाही पण हाच खेळ सुरू असतो. जित राष्ट्रे ही खासगी मिळकत, तेथील प्रजा म्हणजे नोकरवजा गुलाम समजूनच जे ते वागत असतात. जित लोक स्वातंत्र्यासाठी झटू लागले तर त्यांना राजद्रोही म्हणून दडपले जाते. दुसऱ्या राष्ट्रावर स्वारी करायची झाली म्हणजे राष्ट्र गुन्हेगार ठरते. भांडवलशाही बलाढ्य राष्ट्रात, क्वचितच परस्पर प्रेम नांदते. केव्हाहि नि:स्वार्थी कष्ट करणाऱ्या गरीब लोकांची एकी होईल तशी स्वार्थी लोकांची होत नसते. त्यांच्यातील चुरस कमी होत नाही. त्यांचा स्वार्थ सारखा वाढत असतो. नीतीअनीतीचा ते विचार करीत नाहीत. इकडे मजुरांची गळचेपी व तिकडे गिऱ्हाईकांचीही फसवणूक चाललेली असते.

**व्यापारनीती व युद्धाचे प्रसंग** : माल स्वस्त देता यावा म्हणून मजुराचा पगार कमी करून व्यापारी थांबत नाहीत, तर कच्चा मालही वाईट हलक्या किंमतीचा घालून गिऱ्हाईकाला फसवतात. कापूस उत्तम असल्यास त्यात हलका घालून भेसळ करणे, कापड वजनाला भरावे म्हणन त्यात खळ जास्त घालणे, कुजक्या कापडाला खळ घालून चांगले स्वरूप आणणे, अशा

प्रकारची वागणूक ज्या त्या मालात केली जाते, जुने फर्निचर, टेबल, खुर्च्या वगैरे रंगवून नवे म्हणून विकणे, किरकोळ मालात वजनावेळी फसवणे, भपकेदार जाहिराती छापून नसल्या गुणांचे वर्णन करून अडाणी लोकांची दिशाभूल करणे. औषधांच्या भपकेदार जाहिराती 'हटकून गुण', 'रामबाण गुण', 'गुण न आल्यास पैसे परत', अशा अनेक फसवणुकीच्या मार्गाने, डोळ्यात धूळ फेकली जाते. या जाहिरातीचा, एजंटाचा खर्च अखेर गिऱ्हाईकावरच पडतो. निरर्थक वाङ्मयासाठी लेखक, चित्रकार, छापखानेवाले व मजूर गुंततात. अमेरिकेत फक्त एका दिवसात, वर्तमानपत्रात येणाऱ्या जाहिराती, एका माणसास वाचण्यास ५०० वर्षे लागतील असा तज्ज्ञांचा अदमास आहे. इतका वेळ व इतका सामुदायिक पैसा अनाठाई खर्च होत आहे. जनतेला चांगला माल मिळावा, स्वस्तात पडावा ही बुद्धी कोणा व्यापाऱ्यास कधी शिवत नाही. मजुराला पिळून, जनतेला फसवून, नीतिअनीतीला, न्याय-अन्यायाला गुंडाळून ज्या मार्गाने पैसा मिळेल त्या मार्गाने व्यापारी जात असतो.

**अनावश्यक माल** : गिरणीतून निघणारा माल नेहमीच बहुसंख्य जनतेच्या गरजेचा असतो असेही नसते. अनावश्यक जिनसा, ज्यांचा जनतेला उपयोग नाही, पण ज्या निव्वळ श्रीमंत लोकांचीच हौस पुरवतात अशा पुष्कळ निघत असतात. अनेक मजूर व पुष्कळ पैसा, बुद्धी व श्रम, निरर्थक खर्च होत असते. बरे, हे श्रीमंतांचे चैनीचे चोचले श्रीमंतातच राहतात असे नाही. तो संसर्ग जनतेला चिकटतो. तसा तो लागावा म्हणून प्रथम काही कंपन्यांनी सिगारेटच्या हजारो डब्या लोकसमुदायात फेकलेल्या लेखकाने पाहिल्या आहेत. निरनिराळ्या छानछोकी जिनसांनी दुकाने भरली आहेत. इकडे या निरर्थक मालात ज्या मानाने पैसा खर्च होतो त्या मानाने गरीबाच्या लागणाऱ्या आवश्यक जिनसा महाग होत असतात, त्या काढण्यास वेळ दिली जात नाही, यामुळे गरिबांच्या आपत्तीत ही एक आणखी भर पडते.

**लोकशाहीचा फार्स** : व्यापारी चढाओढीत राजकारणाचा आपण अद्याप विचार केलेला नाही. भांडवलवाल्या राष्ट्रातील राजकारण नेहमी व्यापारी वर्गाचेच हाती असते. सर्व सूत्रे भांडवलशाहीचे तंत्राने चाललेली असतात. सरकारला पैशाचा पुरवठा याच वर्गाकडून होत असतो. सुशिक्षित वर्गही यांचाच ताबेदार असतो. त्या वर्गाचे जीवित्व भांडवलवाल्यावरच अवलंबून असते, म्हणजे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष राजकीय अधिकार त्यांचेच हाती असतो. कायदेही यांच्याच इच्छेप्रमाणे, त्यांना अनुकूल असे होत असतात, बदलत असतात.

प्रजासत्ताक व स्वतंत्र राज्य म्हणून मिरवणाऱ्या 'स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुता' या उच्च तत्त्वांची जगाला ग्वाही देणाऱ्या, अमेरिकेचे राज्य अशा अल्पसंख्य भांडवलवाल्यांचेच हाती आहे. निवडणुका त्यांच्याच हातात आहेत. यांनी निर्माण केलेली बाहुलीच सरकारी अधिकारावर आहेत, स्वातंत्र्य फक्त या वर्गालाच उपभोगता येते. मजूराला मात्र स्वातंत्र्य मरणानंतरच !! आमचे राज्य काही बड्या भांडवलवाल्यांच्या ताब्यात असून त्यांच्या एकजुटीने सर्व धंद्यावर त्याचे नियंत्रण चाललेले असते असे प्रे. विल्सन यांनीही कष्टाने कबूल केले आहे.

"Our Government has been under the control of the heads of great allied corporations with special interests... The unholy alliances of bosses and big business have been able to assume to govern for us." (Woodrow Wilson).

भांडवलशाहीत मजूर स्वतंत्र होणे शक्य नाही. कारण मजुराच्या गुलामगिरीवरच भांडवलशाहीचे अस्तित्व आहे. ही भांडवलशाही धनतृष्णा आज जगाला गांजू लागली आहे.

**मुलुखगिरी** : फायदा मजुरी कमी करण्याने होतो, तसाच कच्चा माल स्वस्तात व भरपूर मिळण्यानेही होतो. यामुळे व्यापारी लोकांना कच्चा माल, कापूस वगैरे पाहिजे, तर जेथे तो पिकतो, तो देश व त्या जमिनीही, आपल्या सत्तेच्या पाहिजेत. मोठमोठ्या गिरण्या उभारावयाच्या तर जवळ भांडवल पाहिजे. त्यासाठी दुसऱ्या देशावर स्वारी करून संपत्ती लुटली पाहिजे किंवा जिंकून कायम खंडणीच्या रूपाने पैसा मिळविला पाहिजे. म्हणजे लागेल तितके भांडवल मिळते. कच्च्या मालाची भरपूर तरतूद होते. याच कच्च्या मालासाठी युरोपच्या राज्यतृष्णेने जगावर धिंगाणा घातला. आपले राज्य बरेच वाढविले. इंग्लंड देशास सर्वांत मोठा लचका सापडला, ते राष्ट्र सर्वाहून सत्तावान व धनवान झाले. सर्व साधनांनी सज्ज झाले, त्याच्या आरमाराची दहशत सर्व जगावर बसली. या मागून फ्रान्स, स्पेन, इटली, डेनमार्क, पोर्तुगाल असे एक एक देश पुढे सरकले. भांडवलशाही राष्ट्रांनी सर्व जगाला जिंकून त्याचे तुकडे एकमेकांनी वाटून घेतले !!

**पाश्चिमात्य राष्ट्रातील समेटाचे सोंग** : सर्वच स्वार्थाने वेडावलेले, त्यांच्यात मैत्री कशी जमेल ? प्राप्तीचा वाटा सर्वांपेक्षा आपल्याला अधिक असावा असे प्रत्येकाला वाटणार. ज्याने अधिक वाटा बळकावला त्याच्याबद्दल मनात द्वेष असावयाचाच. एका देशातील व्यापाऱ्यांची भरभराट दुसऱ्या देशातील व्यापाऱ्यांना बघवत नाही. त्यांचा व्यापार मारावा असे त्याचे प्रयत्न असतात. पण एकमेक परस्परांच्या बळाबद्दल साशंक असल्यामुळे वरून सलोखा, पण आतून चढाईची

तयारी चाललेली असते. आत्मविश्वास उत्पन्न झाला, आपण खात्रीने जिंकू असे वाटू लागले म्हणजे लढाई उकरून काढण्याकरिता काही तरी कुरापत निघते. लांडग्या-बकऱ्यांचे गोष्टीप्रमाणे 'तू नाही तुझ्या बापाने शिव्या दिल्या होत्या' हा बोल ठेवून जशी लांडग्याने बकऱ्यावर झडप घातली, तेच कारण अशा लढायांना लागते. ते केव्हाही मिळते. कुठल्या तरी माणसाने कुणाचा तरी खून केला, कुठे तरी बॉंब पडला, कुणाचा तरी अपमान झाला, एवढी व असली सबब पुरे होते. ती सबब मिळाली, एक कुठेतरी तसा खून झाला. निमित्त मिळाले आणि एक रात्रीत सर्व युरोप युद्धाने पेटले. स्वसंरक्षणाच्या पांघरूणाखाली जो तो आत शिरला. सत्याचे निशाण दोन्ही बाजूने हाती घेतले. आपलीच बाजू सत्याची म्हणून जगाचा धावा केला. जगात शांतता स्थापन करण्याकरिता असंतोषाचा वणवा जगभर पेटवून रक्ताच्या नद्या वाढवल्या. थकून युद्ध थांबले. शत्रू नाहीसा झाला नाही - असंतोष गेला नाही - सूडाची पेरणी मात्र नाही. राखेखालचा अंगारा विझला नाही. निमित्ताचा पाचोळा पडण्याची तो वाट पहात आहे.

**भांडवलशाही व युद्ध** : भांडवलशाहीला युद्धाशिवाय तरणोपाय नाही. कारण मला जगातील सर्व संपत्ती पाहिजे, माझे जगावर स्वामित्व पाहिजे, ही वृत्ती जोपर्यंत कमी झाली नाही तोपर्यंत ही युद्धे चालणारच.

समबल झाल्यानंतर, भांडवलवाल्या राष्ट्रात मित्रत्वाचे करारमदार होत असतात. माझ्या वाट्यात तू मन घालू नये, तुझ्या वाट्यात मी मन घालणार नाही अशा प्रकारची 'आळीमिळी' होत असते. व परस्परांनी जिंकलेल्या राष्ट्राच्या बाबतीत कुणी मन घालायचे नाही, परतंत्र राष्ट्राच्या वर होत असलेल्या जुलमाकडे, राष्ट्रसंघाने लक्ष घालायचे नाही. त्या गोष्टी अंतर्गत साम्राज्यातल्या आहेत अशा प्रकारची एकी युरोपियन राष्ट्रात तात्पुरती झाली आहे.

**जेत्यांचा पराभव** : जर्मनीचा पराभव झाल्यानंतर विरूद्ध राष्ट्रांचीही स्थिती काही सुधारलेली नाही. युरोपातील राष्ट्रावर नेहमीच लढाईचे प्रसंग येत असल्यामुळे त्यांच्या संपत्तीच्या वाढीमध्ये अडथळे आले. लढाईमुळे व्यापार, व्यवहार, धंदे एकदम मंदावतात. मनुष्याची, संपत्तीची व धंद्याची हानी होते. अमेरिकेवर असे लढाईचे प्रसंग न आल्यामुळे, तिची सार्वत्रिक उन्नती झाली आहे. लढाईप्रसंगी सर्व राष्ट्रांनी अमेरिकेपासूनच कर्ज काढले. लढाईत यश मिळाले पण प्रत्येकाच्या डोकीवर, अमेरिकेच्या कर्जाचा बोजा शिल्लक राहिला. हा सर्व बोजा जर्मन राष्ट्राकडून भरून घेणे अशक्य होते. त्यावेळी नाइलाजाने कबूल केलेल्या गोष्टी जर्मनीला निभणे शक्य नव्हते. आज त्याने खाका वर केल्या आहेत. याच खंडणीतून अमेरिकेची बरीचशी फेड होणार असल्याने या नकारामुळे मोठा घोटाळा

उडाला आहे.

**अमेरिकचे जू** : आज इंग्लंडची राजकीय सत्ता सवपिक्षा मोठी दिसत असली तरी अमेरिकेच्या सावकारी साम्राज्याखाली आज युरोप आर्थिक गुलाम बनले आहे. इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड, इटली यांना अमेरिकेच्या कर्जाचे व्याज भागवणे जिवावर आले आहे.

हे अमेरिकेचे जू सर्वांना जड झाले आहे. पण ही सत्ता तशीच जबरदस्त असल्यामुळे कुरकुर करण्यापलीकडे कुणाची मजल जात नाही. एकट्या दुकट्याने उठून अमेरिकेला दुखावण्याची कोणाची प्राज्ञा नाही. सर्व जगभर अमेरिकेने पैसा पेरल्यामुळे जगात शांतता नांदावी असे अमेरिकेला वाटत आहे. ही शांततेची मनोवृत्ती मोठ्या पवित्र भावनेने उत्पन्न झाली आहे असे मुळीच नाही. सावकाराला आपल्या कुळाचे दिवाळे निघाल्यास, आपला पैसा परत मिळणार नाही म्हणून ऋणकोची स्थिती पैसा फेडण्याजोगी रहावी असे वाटते. पुन: लढाई सुरू झाली तर, व्यापारावर परिणाम होईल. लढाईच्या नाशामुळे राष्ट्रांची दुर्दशा उडेल. मग आपला पैसा परत मिळणार नाही, म्हणून अमेरिकेला आज जगात लढाई नको आहे. ती शांततेसाठी म्हणून नसून केवळ स्वार्थासाठी आहे.

**पूर्वतयारीसाठी शांतता** : इतर देशांनाही काही काल शांततेची जरूरी असते. काही तात्पुरत्या करारमदारावर सह्या होतात. पण ही शांतता नेहमी भावी युद्धाची तयारीच असते. आतापर्यंत तरी हाच अनुभव जगाला येत आहे. जर्मन युद्धानंतर आजची स्थिती पाहिली तर शस्त्रास्त्रे व युद्धखाते यांची वाढच झाली आहे.

"In 1913 the peace time expenditure of these countries were 3 billion gold marks. Today this amount has grown to about 114 billions."

पुन: पूर्वीपेक्षा मोठ्या भयंकर प्रमाणात सुधारलेल्या साधनांनी लढाई सुरू करण्याची पूर्वतयारी म्हणजे भांडवलशाही राष्ट्रांचे तहनामे होत. शस्त्रसंन्यास हाच शांतीचा उपाय, तो कोणी अंमलात आणू इच्छित नाही. भीती व शंका यामुळे शस्त्राची चढाओढच सर्व राष्ट्रात चालली आहे.

युद्ध व भांडवलशाही यांची जोडी केव्हाही फुटत नसते. जपानने सुरू केलेली चीनवरची चढाई ही पुन: तीच गोष्ट सिद्ध करते.

आजची चीनची लढाई ही अनपेक्षित गोष्ट नाही. त्याचे भविष्य पूर्वीच केलेले आहे. चीनवर हात मारण्याची महत्त्वाकांक्षा ही जपानची पूर्वीपासूनची आहे. विशिष्ट परिस्थितीची ते वाट पहात होते एवढेच. म्हणून युद्ध व

भांडवलशाही ही अभेद्य जोडी आहे. त्यापासून परस्परांची सुटका नाही हा सिद्धांत अबाधित ठरतो.

**बँकेचे साम्राज्य** : भांडवलशाहीची वाढ होत होत ती आज एका विशिष्ट परिस्थितीत येऊन पोहोचली आहे. काम करणारा शेतकरी, उत्तम कसाची जमीन कष्ट करण्यास मिळाल्यामुळे पुढे पुढे कष्ट न करता दुसऱ्यास जमीन लावून खंडावर जगू लागला. यापुढे पैसेवाला स्वत: काम न करता, पैसे व्याजी लावून, त्यावर जगू लागला. यांत्रिक युगातील भांडवलवाला गिरणी काढून, किंवा एखादा धंदा काढून, त्यात धाडसाने पैसा घालून, स्वत:च्या बुद्धीसामर्थ्याने कसबाने व धडाडीने गब्बर होऊ लागला. पण आज हा वर्ग पगारी नोकरावर सर्व भार टाकून त्याच्या बुद्धीचा, शिक्षणाचा, श्रमाचा, फायदा घेऊ लागला आहे. पूर्वीप्रमाणे व्यापारात स्वत: डोके घालणारा वर्ग, कमी कमी होत आला आहे. याला हल्ली कसलेच काम नाही. गिरणी चालवणारा हाच गिरणीचा मालक, अशी परिस्थिती आज नाही. हे काम करणारा असा अजिबात निराळा वर्ग निर्माण होत आहे. तो सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेत आहे. त्याकरिता तो खास शिक्षण घेत आहे. हिशेब ठेवणारा, गिरणी चालवणारा, यंत्राची माहिती असलेला, बँकेचा व्यवहार सुरळीत चालवणारा - हा वर्ग स्वत: बिनभांडवलवाला आहे, पण पगार घेऊन मालकाचा धंदा तितक्याच अगत्याने व हुषारीने चालवून, मालकाला त्याच्या बंगल्यावर पैसा नेऊन पोहोचवत आहे. शिलकीचा पैसा कोणच्या बँकेत टाकावा, कोणच्या कंपनीचे शेअर घ्यावेत, हा सल्ला सुद्धा तोच देत आहे. बँकाही यांच्याच सल्ल्याने निघतात व तंत्राने चालतात. थोडक्यात सांगायचे म्हणजे, आजचे भांडवलवाले यांच्याच डोक्याने चालतात असे म्हटले तरी चालेल-

**बँका** : बँकेच्या भागीदारांची मोठमोठी नावे दिसतात. गिरणीचा मालक असतो दुसराच. पण त्यांच्या नावावर व पैशावर सर्व धंदे चालवणारा हा मध्यम सुशिक्षित वर्ग होय. हाच श्रीमंतांच्या पैशाला पाय फोडतो. ह्यांच्या पायाने श्रीमंत चालतात. यांच्या डोक्याने विचार करतात. श्रीमंत वर्गाचे काम, अशा या कंपन्यांचे भागीदार होऊन, त्यावर निर्धास्त ऐश्वर्य भोगणे हे झाले आहे! आजच्या यांत्रिक युगात बँकांना दिवसेंदिवस फार महत्त्व येऊ लागले आहे. 'ज्याच्या हाती सोन्याची साखळी, तो सर्वांना छळी' हा आजचा न्याय आहे. ही सोन्याची साखळी, किंवा सोन्याची सुरी, पैसेवाल्यांच्या हाती असल्यामुळे तिला गरीब चळाचळा कापत आहेत! या अस्त्रांचे कोठागार, ही पैशाची सत्ता,

बँकेच्या हाती असल्यामुळे, देशाचा जीव यांचा बंदा आहे. दुबळी दुनिया पोटाची गुलाम असते ! गरिबांचे 'तारण मारण' बँकांचे हाती आहे. बँक पैशाच्या भाराने, सत्तावान सरकारलाही मिंधे करते. लढाईच्या किंवा इतर संकटाचे प्रसंगी, सरकारही यांचेपुढे पदर पसरते. बँका सरकारच्या सत्तेलाही ग्रहण लावू शकत आहेत. आज जगातले अत्यंत प्रमुख राष्ट्र अमेरिका, या बँकेच्या, म्हणजे काही धनवानांच्या हातातले खेळणे झाले आहे ! काही बँकांची आर्थिक सत्ता या देशावर चालू आहे. व या देशाची आर्थिक सत्ता आज सर्व जगावर चालू आहे. म्हणजे अमेरिकेच्या काही बँका जगावर आर्थिक साम्राज्य भोगतात असे म्हणणे सत्याला सुटून होणार नाही. पुन: प्रत्येक देश त्या त्या धनिकांच्या सत्तेखाली जाऊ लागला आहे. तेव्हा अशा या जगड्व्याळ सत्तेची थोडीबहुत ओळख वाचकांना असणे आवश्यक आहे.

*(बेकारी व तीवर उपाय)*

## ६) समाजसत्ता की भांडवलशाही

व्यक्ती की समाज असा प्रश्न आज जगातील विचारवंतांपुढे पडला आहे.

आज या व्यक्तिस्वार्थामुळे जगात इतकी बेबंदशाही,अनाचार व रक्तपाताचे प्रसंग आले आहेत की या स्वार्थाला आता काही तरी निर्बंध घातलेच पाहिजेत अशी स्थिती प्राप्त झाली आहे.

संतांनी, कोण जाणे, भावी आपत्तीचा विचार करूनच की काय जगापुढे अनुभवाचे विचार ठेवले आहेत. त्यांचे काही विचार आज अर्थशास्त्रज्ञांनाही मान्य होण्याजोगे आहेत व कित्येक राष्ट्रांत ती मते व्यवहारांत आणण्याचाही प्रयत्न होत आहे; तर कुठे त्यांनी कायद्याचेही स्वरूप धारण केले आहे. म्हणून संतांच्या सर्वमान्य तत्त्वाकडे आपण पुन: एकदा लक्ष देऊ.

संत महात्म्यांचा उपदेश, ते महात्मे युरोपांतले असोत किंवा आशिया खंडांतले असोत; त्यांचा उपदेश केव्हाही समतेलाच धरून आहे. भगवद्गीतेतील उदात्त तत्त्वे, संतांच्या थोर उक्ती व इतर धर्मग्रंथातील सर्वमान्य तत्त्वे लोकांनी ग्राह्यच ठरवली आहेत. ती सनातन्यांना व भांडवलवाल्यांना मान्य झालीच पाहिजेत. तेव्हा अशी अबाधित तत्त्वे समतावादाशी विसंगत आहेत की भांडवलवाल्यांच्या व सनातन्यांच्या आचरणाला सोडून आहेत ते आपण पाहू;

आणि ज्या युरोपियन राष्ट्रांत भांडवलशाही पूर्ण जोरात आहे त्यांच्याच धर्मसंस्थापकांचा विचार करू म्हणजे त्यांच्या आचरणांत व धर्मतत्त्वांत विसंगती आहे काय, ते आपल्याला पाहता येईल.

बहुतेक सर्व संतांनी आपल्या शिकवणीत प्रेमाला प्राधान्य दिले आहे. अंत:करणापासून एकमेकांवर प्रेम करू लागल्यावर तेथे 'देवाचे' म्हणजे समतेचे राज्य सुरू होते. **सेंट जॉन** म्हणतात, 'परस्परावर प्रेम करू लागलो म्हणजे आपल्या ठायी ईश्वर वास करतो;' पण निव्वळ शाब्दिक प्रेम करून, धर्मतत्त्वांचा विचार करून व पाठांतर करून कार्य भागत नसते. नुसत्या प्रेमाने भुकेलेल्यांचा जीव शांत होत नाही. प्रेमाला कृतीचे रूप आल्याखेरीज ते व्यर्थ आहे. म्हणून **सेंट आगस्टीन** म्हणतात, 'जर तुझ्या शेजाऱ्यावर तुला प्रेम करावेसे वाटत असेल तर तुझा हिस्सा त्याला वाटून दे.' सर्वा ठिकाणी वास करीत असलेली शक्ती ही एकच असल्यामुळे आपण परस्परांचे बंधू आहोत. तेव्हा आपण एकमेकाला मारक न होता सहाय्यक झाले पाहिजे. म्हणूनच वरील महात्म्याने 'तुझा हिस्सा शेजाऱ्याला वाटून दे' असा उपदेश केला आहे.

इस्टेट ही एक आपल्यावर पडलेली जबाबदारी आहे. **संपत्ती म्हणजे जनतेच्या श्रमाचे पैशात झालेले रूपांतर होय.** त्या संपत्तीचा उपयोग ज्यांचे श्रम असतील त्यांच्याकरिता होणे न्याय्य आहे. कारण नैतिकदृष्ट्या तेच त्यांचे मालक आहेत. आपल्या संपत्तीकडे पाहताना भांडवलवाल्यांनी ही दृष्टी ठेवली असती तर जगात भांडणे झालीच नसती; पण या उपदेशाप्रमाणे वागणूक होत आहे कुठे ?

**सर्व मानवजातीकडे बंधुभावाने पाहून आपपरभाव विसरणे हाच मोक्ष होय.** ख्रिस्तप्रभु शेजाऱ्यावर प्रीती कर म्हणतात त्यावेळी त्यांच्या दृष्टीसमोर सख्खे - एकाच रक्ताचे - भाऊ होते असे मुळीच अनुमान काढता येणार नाही. शेजारपणापासूनच हा बंधुभाव वाढत जावा म्हणून हा निकटचा शब्द त्यांनी वापरला आहे; कारण 'शेजाऱ्याच्या दु:खाने जो द्रवणार नाही; समोर कासावीस झालेल्यास जो पाणी देणार नाही तो; जगावर प्रेम कसा करील ?' अशा माणसावर आमचे **संत तुकोबाही** कडाडले आहेत. 'धिक् तो

दुर्जन नाहीं भूतदया। व्यर्थ तया माय प्रसवली।। कठीण हृदय तया चांडाळाचे। जो नेणे पराचे दु:ख काही।। आपुला हा प्राण तैसे सकळ लोक। न करी विवेक पशु जैसा।।

**येशू ख्रिस्तांनी** : केलेल्या शेजाऱ्याच्या व्याख्येत सर्व प्राणिमात्रांचा समावेश होतोच होतो. त्यांची भूतदया आकुंचित नाही. त्यांना शेजारी कोण म्हणून विचारले असता ते म्हणतात **'जगातील सर्व माणसे ही शेजारीच होत.** तुला शत्रू मानणारे हेही पण तुझेच शेजारी आहेत'. पण आज ख्रिश्चन म्हणवून घेणारे आपल्या धर्मबांधवांना तरी भूतदयेने कुठे वागवितात. ख्रिश्चन भांडवलवाला गरीब ख्रिश्चनाला पिळून काढतोच! या लोकांना ख्रिस्ताचा शाप लागल्याशिवाय कसा राहील? ते म्हणतात - 'प्राण्यांनो तुम्ही माझ्यापासून दूर जा. तुम्ही परधर्मीय म्हणून नव्हे; तर मी भुकेलेलो असता तुम्ही मला जेवू घातले नाही; तहानलेलो असता तहान भागवली नाही; मी परस्थ असतान मला आसरा दिला नाही; मी उघडा होतो तेव्हा मला पांघरूण घातले नाही - हा त्या त्या लोकांचा तुम्ही अपराध केला नसून, तो तुम्ही प्रत्यक्ष माझाच केला आहात.'

आज भांडवलशाही राष्ट्रे जो दीनांचा छळ करीत आहेत, तो येशूचा छळ नव्हे काय? मजुरांचे रक्तशोषण करणारे, कुळांच्या घरादारांवर नांगर फिरवणारे, प्रजेवर आपली सैतानी सत्ता गाजवणारे, हे ख्रिस्ताचे शत्रू नव्हेत काय?

दर रविवारी ज्या पीठावरून 'तू हत्या करू नको' असा पाठ म्हटला जातो त्याच देवालयात लढाईत यश मिळावे म्हणून प्रार्थना व्हावी; ही त्या प्रभूची चेष्टा नव्हे काय? कोट्यवधी मजूर अन्नान्न करीत दारोदार भटकत असतां कोटी रूपयांच्या राशीवर सुखाने झोपणाऱ्यास ख्रिश्चन कोण म्हणू शकेल?

'देवा, देवा' म्हणून फुकट धाव मारणाऱ्याला पुण्य लागत नसते. पोपटपंची प्रार्थनेत पुण्य नाही, सुंता-बाप्तिस्म्यांत स्वर्ग नाही, शेंडी-जानव्यांत तो अडकलेला नाही. खरा धर्मनिष्ठ, खरा अधिकारी, हा प्रत्यक्ष सेवा

करणारा होऊ शकतो. **सेंट पॉल** म्हणतात - 'तू काम केले नाही तर तुला खाण्याचा अधिकार नाही-'

आपला हिंदू वेदांत तरी काय सांगतो? **'भगवद्गीता'** हा आपला सर्वमान्य ग्रंथ; त्यातला वेदांत पूर्ण व्यवहारी जनतेसाठी अर्जुनाला पुढे करून श्रीकृष्णांनी जगाला सांगितला आहे. तो निव्वळ मनरंजनासाठी नाही. गीतेत मोक्षमार्गाला जाण्याची तीन साधने सांगितली आहेत. त्या तिन्हींचा संयोग योग्य प्रमाणात व्हावा याच गीतादेशाचा मुख्य हेतू! **टिळकांनी** कर्मयोगाला प्राधान्य दिले; संतांनी भक्तियोगाला दिले; विद्वान पठिकांनी ज्ञानयोगाला दिले; पण खरा शहाणपणा या तिन्ही मार्गांचा संयोग घडवून आणण्यातच आहे. तेव्हा त्या प्रत्येक मार्गाचा सारांशाने विचार करू.

कर्मापासून कोणाची सुटका झालेली नाही. देह आहे त्या ठिकाणी कर्म हे आहेच. जीव आहे तेथे हालचाल आहे. सर्व प्राणिमात्र जर कर्म करीत आहेत तर मग कर्मयोगाच्या शिकवणीची काय आवश्यकता? पण ही अंशी स्वाभाविक होणारी कर्मे कर्मयोगात येऊ शकणार नाहीत. योग म्हणजे अप्राप्य, विशेष खटपट केल्याशिवाय न मिळणारी वस्तू. बुद्धिपुरस्सर काम करून कष्टाने मिळणारी वस्तूच कर्मयोगात येऊ शकेल. सर्वांभूति असणाऱ्या ऐक्यभावाने एका शक्तीचे अस्तित्व ओळखून, आपपरभाव मनात न धरता अनाथांच्या व देशाच्या कल्याणासाठी कर्म करणे हाच **खरा कर्मयोग**. मानवतेच्या यशाची गुरुकिल्ली ही पाच प्रकारच्या कर्मयोगात आहे - कर्मे चुकत नाहीत, ती होतातच; पण जाणूनबुजून व सद्हेतूने कर्मे केली पाहिजेत. नशीबावर हवाला ठेवणारा मनुष्य प्रत्येक कर्म ईश्वराच्या प्रेरणेनेच होत असते हा वेदांत (?) पुढे करून आपल्या अकर्तृत्वाचे आळशीपणाचे खंडन करीत असतो. या **दैववादाने** सुखवस्तु श्रीमंतांना-परोपजीवी प्रतिष्ठितांना चांगले फावते - काम न करता सुखाने त्यांच्या तोंडी घास पडतो, अशा गरिबांच्या श्रमावर जगणाऱ्या भटभिक्षुकांना, सावकार - जमीनदारांना असे विचार सुचत असतात. यांची ईशभक्ती म्हणजे रिकाम्या वेळांतली करमणूक आहे. 'न करवे धंदा। आइता तोंडी पडे लोंदा।। उठिते ते

कुटिती टाळ। अवघा मांडिला कोल्हाळ।।' अशा प्रकारच्या आळशी लोकांचा आधार गीतेने काढून टाकला आहे. 'आत्मैव हि आत्मैव बंधु:। आत्मैव रिपु आत्मन:।।' आपले बंधु आपणच, शत्रूही आपणच. निरूद्योगी माणसाला पोसण्याचा मक्ता ईश्वराने घेतलेला नाही. **रामदास**ही म्हणतात 'कष्टेविण फळ नाही, कष्टेविण राज्य नाही। केल्याविण होत नाही, साध्य जगीं।।' हा सृष्टीचा सर्वसाधारण नियम आहे. नुसते काम करण्यास लागा म्हणूनही भागत नाही. ते काम स्वार्थबुद्धीने केल्यास जगास अपायकारक होते. तेव्हा निव्वळ स्वार्थासाठी कार्यप्रवृत्त न होता, **जनहितासाठी काम करणे हाच खरा कर्मयोग**. तेव्हा युक्तीने म्हणजे कोणते कर्म आपल्याला बंधनकारक होईल, कोणत्याने आपली अधोगती होईल, कोणत्याने आपण माणसुकीचे सार्थक करू, याचा विचार करून जाणूनबुजून कर्म करण्यातच खरा माणुसपणा आहे. इच्छा वाईट ठेवून कर्म केले तर त्याचे फळही पण वाईटच मिळते. 'भाव तैसे फळ;' निसर्ग फक्त साक्षी आहे. तो ढवळाढवळ करीत नसतो. 'एका हाताने करावे दुसऱ्या हाताने भरावे' हा निसर्गाचा नियम आहे. भांडवलशाहीचे कृत्य आसक्तीचे-आसुरी लालसेने-भरल्यामुळे, तिचा परिणाम सर्व जगाला भोवू लागला आहे; तेव्हा या कर्माला प्रतिबंध केला पाहिजे.

स्वोन्नतीच्या शिखराला पोहोचण्याला ज्ञान, भक्ती (चिकाटी) आणि कर्म यांची योग्य सांगड घातली पाहिजे. निव्वळ ज्ञानवान होऊनही चालणार नाही. भक्तीची म्हणजे अंत:करणाची जोड जर ज्ञानाला नसेल तर मोराच्या अंगभर असलेल्या डोळ्याप्रमाणे ती निरूपयोगी आहे. **भक्ती म्हणजे कळकळ**; ज्ञानाचा आनंद अंत:करण बाजूस टाकल्यास भोगता येणार नाही व भक्तीला कर्माची जोड असल्याखेरीज ती व्यर्थ होय. तिने दुसऱ्याचे कल्याण साधणार नाही. एखादा मनुष्य ईशचिंतनांत निमग्न होऊन अखंड टाळ कुटीत बसला आहे; पण जवळच बुडत असलेल्याला तो जर हात देणार नाही तर त्याचे ईशचिंतन म्हणजे निव्वळ फसवेगिरी आहे. अशी निरर्थक बडबड काय कामाची? 'बोलाचिच कढी। बोलाचाचि भात। जेवुनिया तृप्त। कोण जाहला।' तेव्हा ज्ञान भक्तिविना भक्ती ज्ञानाविना आणि हे दोन्ही कर्माविना

व्यर्थ आहेत. **भक्तिविना म्हणजे प्रेमाविना तळमळ व आपलेपणा उत्पन्न होत नाही. त्याशिवाय समत्वबुद्धी येत नाही**.त्याखेरीज निर्दोष कर्म हातून घडणार नाही. त्यात स्वार्थ राहील; तेव्हा धर्मग्रंथांची पारायणे करून किंवा रामनामाचा जप करून मोक्ष मिळत नाही. त्याला कृतीच केली पाहिजे.

अशी नि:स्वार्थी वृत्ती सर्व लोकांची एकाच वेळी होणे फार कठीण आहे. सर्वांचा स्वभाव एकाच वेळी बदलणे अशक्य आहे. म्हणून हीच धर्मातील उदात्त तत्त्वे कायद्याच्या जोरावर प्रस्थापित करणेच योग्य होय असे समतावाद्यांचे म्हणणे आहे. शक्तीशिवाय ही तत्त्वे अंमलात येणे अशक्य आहे, म्हणून राजकारणातच ते या तत्त्वांचा समावेश करू इच्छितात. यात वावगे असे वाटण्याचे काहीच कारण नाही. कारण ती तत्त्वे सर्वांना मान्य होण्याजोगीच आहेत. वरील विवेचनावरून **समाजसत्तावाद धर्मविरोधी म्हणता येईल काय ?** पण काही शहाणे धर्मतत्त्वे व्यवहारात आणता येत नाहीत असे म्हणून आपल्या स्वार्थी कृत्यांचे समर्थन करीत असणारच ! तेव्हा धर्मतत्त्वे व्यवहारासाठी असतात की नाही त्याचाही विचार करावा लागेल - हाच **अव्यवहारीपणाचा आरोप** आज समाजसत्तावाद्यांवर - सोशियालिस्टवर होत आहे.

कोणत्याही एका नव्या तत्त्वाचा पुरस्कार केला आणि ते तत्त्व ठराविक लोकरूढीविरूद्ध व समजुतीविरुद्ध असले म्हणजे त्यावर पुराणमतवाद्यांची टीका ही व्हावयाचीच. ख्रिस्त, महंमद, बुद्ध, एकनाथ, नामदेव, तुकाराम, साक्रेटीस, ग्लालेलियो, लूथर, आगरकर, फुले, आदिकरून सर्वांवर टीकेचा भडिमार झालाच आहे. हिंदुस्थानामध्ये आज विशेषत: जवाहरलाल यांचेवर हा आरोप प्रामुख्याने होत आहे. काही प्रामाणिकपणे करतात तर काही निव्वळ विरोध करावयाचा म्हणूनच करतात; पण जगाला **प्रथम अव्यवहारी वाटणारे हेच** महात्मे अखेर पूर्ण **व्यवहारी** व **वंदनीय ठरले आहेत.**

**रूढीच्या श्रृंखलेत जखडून गेलेल्या समाजाला तीच समाजव्यवस्था हितकारक वाटत असते.** अलिप्तपणे स्वत:कडे पाहण्याची त्यांची दृष्टी नष्ट झालेली असते. जन्मभर बंदिवासात आयुष्य

काढलेल्याला त्याच आयुष्यात राहणे बरे वाटू लागते. विषयांधाला विषय वाईट आहे, हे समजण्याची बुद्धी क्वचितच रहाते. त्याची अधोगती तिसऱ्याला बरोबर ताडता येते. प्रवाह पतिताचा-दारूच्या पिपांत गटकळ्या खाणाऱ्याचा-अध:पात दुसऱ्याला स्वच्छ दिसू शकतो. लढाईच्या उन्मादाने बेहोष झालेल्यांना आपण मानवतेचा केवढा अपराध करीत आहोत याची कल्पना येत नाही. म्हणून **चालू समाजव्यवस्थेकडे पाहतांना** त्याकडे त्रयस्थ वृत्तीने पहाण्याची आवश्यकता आहे. **पूर्वसंस्कृती, पूर्वग्रह, रूढी, श्रद्धा यांपासून त्याने अलिप्त राहिले पाहिजे.** म्हणजेच त्याला निर्णय देता येईल.

विचारवंत माणसे - त्यांना संत म्हणा, महात्मे म्हणा किंवा धर्मात्मे म्हणा - या सर्व व्यक्ती समाजरचनेकडे नि:पक्षपातीपणे पहात असतात. अनुभवाच्या परिपक्व विचाराने निर्णय ठरवून ते आपली मते समाजाला मार्गदर्शक व्हावीत म्हणूनच जगासमोर ठेवीत असतात. अव्यवहारी म्हणून नव्हे तर ती पूर्ण व्यवहारी म्हणून. श्रीकृष्णांनी गीता सांगितली ती अर्जुन सारासार विचारापासून सुटू लागला म्हणून; त्यांनी त्याला कार्यप्रवृत्त करण्याकरतां उपदेश केला. तसेच इतर धर्मसंस्थापकांनी जे विचार मांडले पोपटपंचीसाठी नव्हते, लोकांचे निव्वळ मनरंजन करावे म्हणून नव्हते; तर तत्कालीन समाज परिस्थितीचा विचार करून चुकलेल्या समाजाची घडी पुन: व्यवस्थित बसवावी म्हणून. त्या त्या धर्मातील तत्त्वभांडार हे जनतेसाठी आहे; निव्वळ ग्रंथांत राखून ठेवण्यासाठी नाही किंवा त्या ग्रंथांची पूजा करण्यासाठी नाही. त्या धर्माचा प्रसार ती तत्त्वे लोकांना पटली म्हणूनच त्यावेळी होऊ शकला व त्याप्रमाणे लोकांकडून काही काल आचरणही झाले आहे. निरनिराळ्या काली निरनिराळे धर्म अस्तित्वात आले. पूर्वीच्या धर्मांत व समाजात त्यांच्या मते त्यांनी सुधारणा केली आहे. **या बदलण्याच्या प्रवृत्तीवरच समाजाची प्रगती अवलंबून असते.** जुना पुराणमतवादी व स्वार्थी समाज प्रत्येकवेळी नव्या कल्पनेला विरोध करीत असतो. तीच परिस्थिती आजही आली आहे. नव्या संतांनी 'समाजसत्तावादाचा' पुरस्कार केल्यापासून त्यांच्यावर टीका होऊ लागली आहे. काही अज्ञानामुळे करीत

आहेत, तर सनातनी भांडवलवाले व चालू समाजव्यवस्थेचा ज्यांच्या पदरी भरपूर फायदा पडत आहे व तिच्यावर अवलंबून आहेत असे, सर्व एकजुटीने समतावाद्यांवर तुटून पडत आहेत. काही धूर्त लोकांच्या धर्मभावनेचा फायदा घेऊन त्या लोकांना चेतवत ओहत. सत्तावान सत्तेचा राजरोस उपयोग करीत आहेत. भांडवलवाल्यांचे सुशिक्षित हस्तक बुद्धिवादाने समतावाद्यांचे खंडन करू पहात आहेत. म्हणजे आतापर्यंत प्रत्येक नव्या धर्माला ज्या दिव्यांतून जावे लागेल त्यातून समतावादाला आज जावे लागत आहे. **सर्व धर्मांची चाळणी करून चालू समाजरचनेतील दोष काढून ती व्यवस्था आमूलाग्र बदलण्याचा व समाजातील प्रत्येक व्यक्तीला सुखाचा मार्ग मोकळा करण्याचा समाजसत्तावाद्यांचा प्रयत्न** आहे. कोणाचाही एक **विशिष्ट धर्म त्यांनी स्वीकारलेला नाही.** जी तत्त्वे सर्वमान्य होऊ शकतील - सर्वांना सुखाचा व उन्नतीचा मार्ग दाखवतील तीच त्यांनी मान्य केली आहेत.

समाजात रहायचे तर काही नियमबद्धता ही राहणारच; पण नियमबाह्य आचरणाला **पाप** ही संज्ञा लावणे मात्र मूर्खपणाचे आहे. **अमकी गोष्ट सुखाची व दुसरी दु:खाची किंवा अपायकारक एवढेच म्हणता येईल.** कोणतीही गोष्ट असो, या कसोटीला लावूनच मनुष्य आपल्या समजुतीप्रमाणे तिचा स्वीकार किंवा अव्हेर करीत असतो. या कसोटीला पूर्वीचे नीतिनियम व धर्माज्ञा आहे तशा सर्वच उतरू शकत नाहीत. आजच्या बदललेल्या परिस्थितीत त्या सर्वच ग्राह्य मानता येत नाहीत. त्यात बदल करणे व काही मोडून टाकणे आज समाजसुधारणेसाठी आवश्यक होऊन बसले आहे. सुखाची सर्वांना शक्य तितकी मोकळीक मिळावी हाच हेतू. एकाचा स्वार्थ दुसऱ्याच्या सुखाआड येऊ नये. पुराणमतवादी नवमतवाद्यांचा द्वेष करतात, तेही पण स्वत:च्या सुखासाठीच. त्या वर्गाने आतापर्यंत भोगलेले हक्क, विशिष्ट सवलती वगैरे आपल्या हातून जाऊ नयेत म्हणूनच **सर्वांची धडपड सुखाकरता** असते हे तत्त्व मात्र अबाधितच आहे. निदान तसा प्रत्येकाचा दृष्टिकोन राहील. सुखाची कल्पना भिन्न असू शकेल. कोणी त्यागात सुख आहे म्हणेल, कोणी संपत्ती साठवण्यात मानेल, तर कोणी दानांत मानील. कोणी जनतेला पिडून राजऐश्वर्य भोगणे सुखाचे मानेल, तर

कोणी जनसेवेसाठी कुबेराचा बेकार बनण्यात सुख मानेल. दृष्टिकोण निराळा राहील; पण ध्येय एकच ! सुखाचा लाभ व्हावा हेच ध्येय सर्वांचे !

भांडवलशाहीने व्यक्तिसुखासाठी राक्षसी प्रयत्न केला आहे व राक्षसी वृत्तीही स्विकारली आहे. त्यांच्या या प्रयत्नामुळे मानवाना पूर्वीहून सहस्त्रपटीने सुख भोगता येणे शक्य झाले आहे. शास्त्रीय संशोधनाच्या वाढीबरोबर सुखाची साधने वाढली; पण त्या साधनांची मालकी मूठभर भांडवलवाल्यांच्याच हाती असल्याने त्यांनाच फक्त सुखाचा मार्ग मोकळा झाला आहे. त्यामुळे त्या प्रमाणात त्यांनी दुसऱ्याने सुख हिरावून नेले आहे ! ही झाली भांडवलवाल्यांची गोष्ट. सनातन्यांनाही पण तेच केले आहे. त्यांनी लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन आपले वर्चस्व राखले आहे. अंधश्रद्धा निर्माण करून विवेचकबुद्धी नष्ट केली आहे. देवाधर्माची ढाल पुढे करून आपला स्वार्थ साधला आहे. पाप आणि पुण्य ठरवले देवाने, शासन करणारा तो आहे असे म्हणून साध्या सुखाचा मार्गही बंद केला आहे. पापकल्पनेची लटकती तलवार अज्ञानी लोकांच्या डोक्यावर लोंबत ठेवली आहे; पण कालाबरोबर जनता जागी होत चालली आहे व ती सर्व संस्थांना, धर्मतत्त्वांना, विचारांना वरील कसोटीस घासू लागली आहे. धार्मिक जुलमाखाली हजारो वर्षे स्वखुषीने दिवस काढणारे, आज धर्म झुगारून देऊ इच्छित आहेत. त्याने पाप लागेल ही भीती नाहीशी झाली आहे. जागा झालेला नवा समाज अंध रूढींना फेकून देऊ लागला आहे. चिरडलेला बहुसंख्य समाजही सत्तावानाशी विरोध करू लागला आहे. राजकारणालाही हीच कसोटी लागत आहे. राजा देवावतार असे कोणी मानत नाहीत. आज परंपरागत संस्था बहुजन सुखाच्या आड येत आहेत, त्यांचे अस्तित्व बहुजन सुखाला घातक होऊ लागले आहे. तेव्हा कोणताही धर्म घ्या, संस्था घ्या, कोणतीही राजवट घ्या, विचार घ्या, ते बहुजन सुखाला पोषक असतील तरच यापुढे टिकू शकतील. हीच कसोटी आता समाजातील प्रत्येक गोष्टीस प्रत्येकजण लावू लागले आहेत. तिची पारख करू लागले आहेत.

प्रथमदर्शनी अव्यवहारी वाटणारी थोर वचने खरोखरी व्यवहारीच असल्याचे अनुभवांती नाही का कळून येत? प्रामाणिकपणाच्या उपदेशावरसुद्धा अव्यवहारपणाचा शिक्का व्यवहारी म्हणणारे देतातच; पण

'प्रामाणिकपणा हाच खरा मुत्सद्दीपणा होय' हा सिद्धांत व्यवहाराने खराच ठरत आहे. तात्पुरती फसवेगिरी थोडा वेळ फायदेशीर वाटली तरी अखेर ती मूर्खपणाचीच ठरते. 'लांडगा आला रे आला' या खोट्या हाकेला प्रथम चार फसले; पण पुढे खऱ्या हाकेलाही कोणी धावून आले नाही. सचोटीचा व प्रामाणिकपणाचा व्यवहार, हाच अखेर किफायतशीर ठरतो. चोरी करणे, खोटे बोलणे, दुसऱ्यास इजा करणे, लुबाडणे, हिंसा करणे वाईट हा उपदेश पूर्ण व्यवहारी व स्वार्थाचाच आहे. कारण हे नियम समाजातील प्रत्येकजण मोडू लागला तर समाजाचे अस्तित्वच राहणार नाही. प्रत्येकाचे जीवित धोक्याचे होईल. कोणालाही सुरक्षितता वाटणार नाही. एखाद्या व्यक्तीला समाजनिर्बंध मोडल्याने फायदा झाल्यासारखे वाटले तरी त्याचे स्वत:चे अखेर त्यात नुकसानच आहे. या व अशाच दूरदर्शीपणाने समाजातील सर्व घटकांच्या हिताचा विचार करून व्यापक तत्त्वावर समाजरचना आज विचारवंत लोक बसवू लागले आहेत. भांडवलवाल्यांच्यात स्वार्थामुळे त्यांना ही दूरदृष्टी नसल्यामुळे समतावाद कडू व अव्यवहारी वाटतो; पण यात ते आपलेच मरण जवळ ओढून घेत आहेत याची त्यांना कल्पना येत नाही.

'सर्वांशी बंधुभावाने वागावे' हे उच्च धर्मतत्त्व आहे. तसाच हा उत्तम व्यवहारही आहे. कारण आपण दुसऱ्याबरोबर वागू तसे ते आपल्याबरोबर वागतात हा साधा मनुष्यधर्म आहे. **आघाताला प्रत्याघात** होत असतोच. हे **'जशास तसे' मग केव्हाच थांबत नाही.** तो सूडाची वेळच पहात असतो. कोणतेही भांडण कायमचे मिटवण्याला यापेक्षा अधिक परिणामी तोड कोणची काढता येईल? **शत्रू** नाहीसा करायचा तर **द्वेषाने नाहीसा होणे शक्य नाही.** पराभवाने शत्रुत्व जात नाही असा अनुभव रोज येतच आहे.

पैसा उन्नतीच्या आड येतो म्हणून आमच्या साधुसंतांनी त्याचा त्याग केला. समतावादी राष्ट्र व्यक्तीजवळील प्रमाणाबाहेरची संपत्ती बेकायदेशीर ठरवते एवढेच! धनलालसा व आत्मविकास परस्परविरोधी आहेत. पैसा शत्रू उत्पन्न करतो; कारण इतरांना लुबाडल्याशिवाय दुसऱ्यांपेक्षा कोणी श्रीमंत होऊ शकत नाही. ही हिंसा केव्हांही द्वेषास कारणीभूत होत असते. पैशाची हाव

म्हणजे दुसऱ्यांपेक्षा आपल्याकडे अधिक संपत्ती असावी असे वाटणे हे होय! ही हाव सुरू झाली म्हणजे पैसा कोणत्या मार्गाने मिळवावा याचा विचार माणूस करीत नाही. साधनांचा विचार करत नाही. ज्या मार्गाने जवळ पैसा अधिक येईल त्या मार्गाने त्या इसमाची दुसऱ्यास पिळण्याची शक्ती अधिक. आपल्यापेक्षा दुसऱ्यास अधिक श्रम करावयास लावल्याखेरीज श्रीमंत होता येणार नाही.

पैसा एका व्यक्तीचे हाती साठला म्हणजे त्याचा दुरूपयोग होतो. समाजातील इतर घटकांना त्रासदायक होतो. याकरिता अशी **व्यक्तिविषयक श्रीमंती प्रमाणाबाहेर वाढू नये म्हणून पैसा मिळण्याची साधने समाजाच्याच हाती ठेवावीत,** राष्ट्राच्या हाती ठेवावीत व सामुदायीक सुख वाढवावे. संपत्तीची सारखी वाटणी झाल्यास अनिष्ट प्रकार आपोआप कमी होतील, गरीब, बेकार व दरिद्री जर समाजांत नसतील तर धनिकांना सुखवस्तूवर आपली सत्ता आजच्यासारखी चालवता येणार नाही. संतांच्या शिकवणीशी अशाप्रकारे मेळ घालून नवी समाजसत्ता आखल्यास ती सर्वांना सुखदायक नाही का होणार?

घसरत्या संस्कृतीबरोबर वहात जाणे यात शूरपणा नसतो. तिला आवरण्याकरिता, सत्याचे संरक्षण करण्याकरता, दुष्टांचे व दुष्ट विचारांचे निर्दालन करण्याकरता पुढे सरसावणे हेच मनुष्यकोटीचे खरे कर्तव्य आहे. सत्याला विरोध हा व्हायचाच. विरोधाला न जुमानता संस्कृतीची स्थिरता, समाजरचना वगैरेकरिता नवी तत्त्वे व्यवहारात आणण्याचा प्रयत्न प्रत्येकाने केला पाहिजे.

'समाजसत्तावाद' हिंदु समाजाला पचण्याजोगा नाही. परकीयांची तत्त्वे आपल्या समाजात आणून विनाकारण असंतोष मात्र माजेल, वर्गकलहाला ऊत येईल, असा बाऊ समाजसत्तावादाविरूद्ध उभा केला जातो; पण वरील विवेचनावरून यात भयंकर असे काही नसून, ती तत्त्वे हिंदुमनाला अपरिचित नाहीत. कित्येक तत्त्वांचा संतांनीच पुरस्कार केला आहे; पण निव्वळ उपदेशापलीकडे ते गेले नाहीत ही त्यांची चूक झाली.

समतावाद हा वर्गकलह निर्माण करण्याकरिता नसून तो मिटविण्याकरिता आहे. आपण परस्परांचे बंधू आहोत ही गोष्ट लोकांना पटवून त्याप्रमाणे वागणूक घडवून आणण्याकरीता व वर्गकलह मिटविण्याकरता आहे. हिंदु समाजात तर वर्ग कलहाला आज ऊत आला आहे. अशी परिस्थिती असता वर्गकलहाची भीती घालण्यात काय अर्थ आहे. आज ब्राह्मण-ब्राह्मणेतरास, स्पृश्य-अस्पृश्यास, हिंदु-मुसलमानास, हिंदी-इंग्रजास अविश्वासाने परक्या भावाने वागवत आहेत. त्यांच्यामधील परकेपणा काढून टाकून प्रेमाची वाढ करणे हे समतावादाचे धोरण आहे. हजारो मनुष्यांच्या कल्याणासाठी एखाद्या व्यक्तीस थोडा स्वार्थत्याग करावा लागत असेल तर तो तसा करण्यास लावत असताना एखादा मनुष्य दुखावला तर त्याला नाइलाज आहे. हजारो अस्पृश्य रसातळास जात असताना त्यांना बचावण्याकरता वरच्या वर्गास थोडे दुखवावे लागले तर तेवढे दुःख सहन केले पाहिजे. तेवढा स्वार्थ सोडला पाहिजे. जमीनदाराच्या खंडाने, सावकाराच्या व्याजाने गावेच्या गावे धुळीस मिळाली आहेत. खेड्यावरचा शेतकरी निव्वळ मजूर बनला आहे. सबंध खेडीच्या खेडी जमीनदार किंवा सावकारांच्या ताब्यात गेल्यामुळे शेतकऱ्याला जमिनीचा व झोपडीचा आसरा नाहीसा झाला आहे. या निराधार शेतकऱ्याला भांडवलवाला यंत्रांत घालून पिळू लागला आहे. मग बहुसंख्यपीडित वर्गाच्या प्राणधारणेसाठी, सुखासाठीसुद्धा नव्हे, जर या थोड्या लोकांना आपली वाढती तृष्णा आवरणे भाग पाडले, गरिबांना छळण्याची त्यांची सत्ता कमी केली, वाढलेली श्रीमंती मर्यादित आणली, तर हा वर्ग दुखवेल खरा; पण कोट्यावधी लोकांना जगण्यासाठी, त्यांचे अनंत हाल वाचवण्यासाठी यांना थोडा त्रास होतो म्हणून कोट्यावधींचा तळतळाट घेणे बरे होईल काय? तेव्हा समाजसत्तावादाने वर्गकलहाला ऊत येईल म्हणण्यांत काही अर्थ नाही, हे भांडवलवाल्या मगरीचे अश्रू आहेत.

**समता व मनुष्यस्वभाव :** काही वेळा तर समाजसत्तावादावर हास्यास्पद टीका केली जाते. समतेचा प्रयत्न व्यर्थ आहे, कारण समता मनुष्यस्वभावाला सुटून आहे, निसर्गाला सुटून आहे. ती समाजात आणणे अशक्य आहे. वरील आरोप सकृतदर्शनी मनाला पटतोही; पण हा आक्षेप

समतावादी खोडून टाकू इच्छित नाहीत. या गोष्टी गृहीत धरूनच त्यातून मार्ग काढू इच्छितात.

मनुष्यस्वभाव एका ठराविक साचाचा केव्हाच आढळून येत नाही. मनुष्यस्वभाव चांगला आहे तसा तो वाईटही आहे. त्यात परस्परविरोधी गुण आहेत. त्यांत पशुकोटीचे गुण आहेत, तसेच उच्च कोटीतीलही आहेत. तो स्वार्थासाठी झटतो तसा परार्थासाठी मरतो. त्यागासाठी, लोककल्याणासाठी आनंदाने सुळावर चढतो-केवळ एखाद्याचे संरक्षण करण्यासाठी आगीत उडी घालतो तर पैशापायी अर्भकाचा गळा कापण्यासही कचरत नाही. तो वाघासारखा क्रूर तर शेळीसारखा गरीब आहे. सिंहासारखा निधड्या छातीचा तर हरणासारखा भित्रा आहे. पैशासाठी देशद्रोह करू शकतो, तसेच राष्ट्रभक्तीसाठी स्वत:चे शीर आपल्याच हाताने छाटून राष्ट्रदेवीस वाहण्यास कमी करीत नाही. दया, क्षमा, शांती हे गुणी अंगी आहेत, त्याप्रमाणेच क्रूरता, सूडबुद्धी व जहालपणाही त्याचे अंगी आहे. असे परस्परविरोधी गुण मनुष्यस्वभावात आहेत; पण त्याला जसे शिक्षण मिळेल तसे ते गुण त्याचे अंगी वाढत असतात. स्वभाव परिस्थितीने व अभ्यासाने बदलत असतो. व्यक्तीची, तीच गोष्ट समाजाची. ब्राह्मणवर्ग निराळा समाज बनून त्याने आपली संस्कृती निर्माण केली. स्वभावाला एक ठराविक दिशा दिली. सात्विक गुण मिळवण्याचा प्रयत्न केला. तशी त्याला परिस्थितीही मिळाली. त्या त्या घराण्याचा परिणाम भावी पिढीवर होत असतो. क्षत्रिय लढाऊ बनला, त्याच्यात राजसी गुण विशेष आले, त्याची मुले त्या वृत्तीची झाली. वैश्य, व्यापारी, शूद्र, कष्टाळू व अडाणी असे वर्ग पडून त्यांचे स्वभावगुण निराळे बनले. मनुष्य उपजतांच ठराविक गुणांचा असतो असे मात्र ठाम विधान करता येणार नाही. प्रयत्नाने मनुष्यस्वभाव बदलू शकतो.

Human on alive they say never changes. In truth it never ceases to change. (H.G. Wells) शिक्षणामुळे त्याच्या आशा-आकांक्षा, ध्येय व सुखाची कल्पनाही बदलू शकते. ज्ञानी होण्याची आकांक्षा ब्राह्मणवर्गात वाढली- पैशाऐवजी विद्वत्ता हे त्यांचे ध्येय बनले; तसा त्यांचे गुणाला मानही मिळू लागला. भगवी कफनी, झोळी, कमंडलू धारण

करणाऱ्या संन्याशाला राजदरबारी खडी ताजीम मिळू लागली. क्षत्रियाची आकांक्षा, ध्येय व वृत्ती त्याच्या शिक्षणाप्रमाणे निराळी बनली. त्याच्यात शूर तरवारबहाद्दर जगज्जेता होण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. वैश्याला कुबेर होऊन सर्वांवर सत्ता गाजवण्याची इच्छा झाली. शूद्र शेतकरी, कष्टाळू, अल्पसंतुष्ट आज्ञाधारक, धर्मभोळा, अडाणी, गुलामवृत्तीचा बनला. म्हणजे एकाच मानववंशांतील ही माणसे शिक्षणामुळे व परिस्थितीमुळे भिन्न स्वभावाची होऊ शकली.

**निसर्गातील विषमता :** आता निसर्गातील विषमतेचे उदाहरण देऊन समतावादाचे तोंड बंद करण्याचा प्रयत्न होतो. ते म्हणतात, 'हाताची पाच बोटेसुद्धा सारखी नसतात, तेथे समतेचा प्रयत्न करण्यात काय अर्थ?'

निसर्गातील ही विषमता मान्य न करून कसे चालेल? आणि समता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न यशस्वी तरी कसा होईल? पण ही विषमता समाजास हानिकारक होत नाही. पाच बोटे सारखी नसतात हे खरे; पण ती एकमेकाला मारक होत नाहीत. ती एकमेकांस सहाय्य करून घास घालतात, त्या देहास मदत करतात. काळा-गोरा, उंच-ठेंगा असा भेद आहे. म्हणून काळ्या माणसाने गोऱ्याला झोडपून काढणे, त्याला गुलाम करणे इष्ट होईल काय? मनुष्यत्वाला साजेसे होईल काय? शक्तीचा दुरूपयोग करता येईल; पण ते मनुष्याच्या उच्च गुणाला धरून नाही, संस्कृतीस पोषक नाही. मनुष्यस्वभावच आहे म्हणून या गोष्टींचे समर्थन करता येईल काय? या वृत्तीवर नियंत्रण घातले नाही तर समाज जगूच शकणार नाही. एक मनुष्य खूप सशक्त आहे म्हणून त्याने आपल्या शक्तीच्या जोरावर अशक्ताच्या घरी जाऊन त्याला बाहेर ढकलून काढले आणि घराचा ताबा घेतला तर ते न्यायाला धरून होईल काय? त्याचप्रमाणे एखाद्या विशेष बुद्धिमान मनुष्याने धूर्तपणाने व फसवेगिरीने दुसऱ्याचे जगण्याचे साधन हस्तगत करून घेतले तर ते माणूसपणाचे होईल काय? मनुष्याला शक्ती व बुद्धी अधिक असली म्हणजे तिचा उपयोग दुसऱ्यांना त्रास देण्याकडे केल्यास त्याने त्याची मानसिक अधोगती होते. आपण आपली बुद्धी व आपली शक्ती आपल्या बायकोपोरांना मारण्याकडे व त्यांचे अन्न हिरावून घेण्याकडे खर्च करीत नाही.

मग दुसरे लोक आपले बांधव असे मानल्यानंतर बुद्धीचा व शक्तीचा उपयोग त्यांच्या कल्याणाकरिताच करणे युक्त नव्हे काय ! पर्यायाने त्याचा फायदा आपल्याही पदरी पडल्याशिवाय रहात नाही. आपल्या चांगल्या वागणुकीचा मोबदला तशाच परत वागणुकीने आपल्याला मिळतोच.

बुद्धीची व शक्तीची विषमता राहील; पण ती परस्परास घातक होणार नाही अशी व्यवस्था आपल्यास करायला पाहिजे. समाज घड्याळासारखा आहे. घड्याळात मोठे यंत्र असते, धाकटे असते; पण ती सर्व परस्परांस मदतच करीत असतात. प्रत्येकाचा अधिकार त्यात सारखाच आहे. त्यातले एखादे यंत्र जरी बिघडले तरी सर्व घड्याळावर परिणाम होतो. समाजात सर्व घटक पाच तत्त्वांवर बांधले गेले पाहिजेत. ते तसे बांधले गेले नसल्यामुळे समाजात असंतोष, कलह, रक्तपात, युद्ध हे प्रकार सुरू आहेत.

**कृत्रिम विषमता** : कृत्रिम विषमता बदलता येणे शक्य आहे. नैसर्गिक विषमता ही राहणारच-पण ती तशी त्रासदायक नाही-पण अज्ञ समाज गरिबी-श्रीमंतीला नैसर्गिक समजतो. एखादा मनुष्य उपजता श्रीमंत व दरिद्री पाहिला म्हणजे त्यांना वाटते, या गोष्टी दैवाधीन आहेत, हा दैवाचा खेळ आहे, तो माणसाला कसा बदलता येईल ? पण देवाचा म्हणजे निसर्गाचा व याचा संबंध तरी काय ? गरिबी व श्रीमंती ही जन्मणाऱ्या जन्माच्या पूर्वकर्मानुसार आहे ही कल्पना साफ खोटी आहे. अगम्य अशा त्या शक्तीचा यात काही संबंध नाही. ही त्या निसर्गाची गोष्ट नव्हे. ही त्याने केलेली नाही, त्याला करता येणार नाही. निसर्गाची गाडी ठराविक मार्गाने चालली आहे, ती असा व्यक्तिविषयक पक्षपात करीत बसलेली नाही. हे कालचक्र पापपुण्याचा विचार करीत नाही. विस्तवात हात घातला म्हणजे तो पोळतो. समाजविघातक किंवा शरीरविघातक कृती झाली, ती मर्यादेबाहेर गेली म्हणजे केल्या कृत्याचा उलट जाब मिळतो. हा दैवाचा खेळ नव्हे. रोज असंख्य प्राणी जन्मतात व मरतात, निसर्ग त्याची पर्वा करीत नाही. ही गरिबी व श्रीमंती व जगातील संपत्तीची कमी अधिक वाटणी मनुष्याने केली आहे, आजच्या समाजाने ती मान्य केली आहे. रूढीने तिच्यावर शिक्कामोर्तब बसवले आहे, राजसत्तेने या अन्यायी वाटणीचे संरक्षण केले आहे, कायद्याने नैतिक पाठबळ देऊन तिला कायमपणाचे स्वरूप दिले आहे.

**कृत्रिम विषमता** कृत्रिम विषमता बदलता येणे शक्य आहे. नैसर्गिक विषमता ही राहणारच-पण ती तशी त्रासदायक नाही-पण अज्ञ समाज गरिबी-श्रीमंतीला नैसर्गिक समजतो. एखादा मनुष्य उपजता श्रीमंत व दरिद्री पाहिला म्हणजे त्यांना वाटते, या गोष्टी दैवाधीन आहेत, हा दैवाचा खेळ आहे, तो माणसाला कसा बदलता येईल ? पण देवाचा म्हणजे निसर्गाचा व याचा संबंध तरी काय ? गरिबी व श्रीमंती ही जन्मणाऱ्या जन्माच्या पूर्वकर्मानुसार आहे ही कल्पना साफ खोटी आहे. अगम्य अशा त्या शक्तीचा यात काही संबंध नाही. ही त्या निसर्गाची गोष्ट नव्हे. ही त्याने केलेली नाही, त्याला करता येणार नाही. निसर्गाची गाडी ठराविक मार्गाने चालली आहे, ती असा व्यक्तिविषयक पक्षपात करीत बसलेली नाही. हे कालचक्र पापपुण्याचा विचार करीत नाही. विस्तवात हात घातला म्हणजे तो पोळतो. समाजविघातक किंवा शरीरविघातक कृती झाली, ती मर्यादेबाहेर गेली म्हणजे केल्या कृत्याचा उलट जाब मिळतो. हा दैवाचा खेळ नव्हे. रोज असंख्य प्राणी जन्मतात व मरतात, निसर्ग त्याची पर्वा करीत नाही. ही गरिबी व श्रीमंती व जगातील संपत्तीची कमी अधिक वाटणी मनुष्याने केली आहे, आजच्या समाजाने ती मान्य केली आहे. रूढीने तिच्यावर शिक्कामोर्तब बसवले आहे, राजसत्तेने या अन्यायी वाटणीचे संरक्षण केले आहे, कायद्याने नैतिक पाठबळ देऊन तिला कायमपणाचे स्वरूप दिले आहे. एखाद्या बेअकली पोराला सोन्याच्या ढिगावर व बुद्धिवान होतकरू तरूणाला रानोमाळ जे पळवले आहे ते निसर्गाने नव्हे. पण अनादिकालापासून या गोष्टी चालत आल्यामुळे व त्याकडे पाहण्याची आपल्याला सवय झाल्यामुळे त्यात अस्वाभाविक असे काही आपल्याला आता दिसतच नाही. ते नैसर्गिक वाटू लागले आहे. पण वस्तुस्थिती मात्र तशी नाही. उपजताच एक मालक व दुसरा गुलाम हा भेद निसर्गाचा नव्हे. या विषमतेला आपला समाज जबाबदार आहे व ही व्यवस्था आपल्याला बदलता येणे शक्य आहे व तशी समाजव्यवस्था वेळोवेळी राजसत्तेबरोबर बदलतही आली आहे.

हे शक्य आहे, असे कबूल केल्यावरही त्यावर अव्यवहारित्वाची छाप मारतातच. सहजी बोलता बोलता एक गृहस्थ बोलून गेले :- समता समता बोलायला ठीक आहे. कृतीत आली म्हणजे आपल्याला तरी बरी वाटेल काय ? समजा, चार मंडळी जेवायला बसली आहेत आणि तेथे तुमच्यात पंगतीत अगदी खालच्या दर्जाचा माणूस येऊन बसला तर तुम्हाला अपमान नाही का वाटणार ?

चालू विषमसमाजाच्या होणाऱ्या मन:स्थितीचा हा दुष्परिणाम होय. मुंबईसारख्या शहरातील खानावळीत रोज या गोष्टी घडत आहेत. धनाढ्य व निर्धन शेजारी शेजारी बसत आहेत. आगगाड्या; मोटरी, ट्राम्स, आगबोटी, नाटकगृहे याठिकाणी हे भेदाभेद पुष्कळ अंशाने मोडलेले आपल्याला दिसतील. त्यावेळी निदान त्याठिकाणी तरी वरील विचार फारसे येऊ शकत नाहीत. पैसा दिला की कोठलीही जागा मिळू शकते. राजा ज्या खुर्चीवर बसेल त्यावर दुसऱ्यालाही बसता येते. आर्थिक विषमतेमुळे आपल्या घरच्या नोकराला आपण कमीपणाने वागवले म्हणजे हे वागवणे मनुष्य स्वभावाला धरून आहे असे नसून विशिष्ट परिस्थितीमुळे ते शक्य झाले एवढेच! हीच राजसंस्था जर श्रमजीवी वर्गाच्या हाती असती तर रिकामटेकड्या परोपजीवी वर्गाचा दर्जा नाहीसा होऊन त्यांची समाजातील आजची मान्यता नाहीशी झाली असती. समाजसेवेचे पहिल्या दर्जाचे काम म्हणून राजदरबारी त्याला मान मिळू लागला, तर धर्मगुरूंचा दर्जा अत्यंत हीन होईल. त्याला कोणी मान देणार नाही. परोपजीवी वर्गाकडे समाजाचे शत्रू व गुन्हेगार म्हणून पाहिले जाईल. या उच्च नीचपणाच्या कल्पना सामाजिक दर्जावर अवलंबून असतात व हा सामाजिक दर्जा आर्थिक स्थितीवर अवलंबून असतो. समाजव्यवस्थेत बदल झाला की त्याप्रमाणे मन:स्थितीतही बदल होऊ शकतो.

**मतपरिवर्तन** :समतेचे तत्त्व पटल्यानंतर किंवा त्याला प्रामाणिकपणे विरोध करता येणे शक्य नाही असे वाटल्यावरही सक्तीने समता आणणे योग्य नव्हे. उपदेशाने लोकांचे मन वळवून, मतपरिवर्तन करून या गोष्टी केल्यास कोणाचा रोष होणार नाही. तेव्हा राजकीय क्रांती घडवून आणण्याचा व सक्तीचा उपाय करणे बरे नव्हे, असाही उपदेश करण्यात येतो. पण निव्वळ मतपरिवर्तनावर विसंबून समता प्रस्थापित होणे ही गोष्ट शक्य नाही.

हिंदुस्थानात अनादिकालापासून निव्वळ मतपरिवर्तनाची खटपट संतमहात्म्यांनी केली आहे. व्याख्यानांत, कीर्तनात व प्रवचनांत समता, विश्वबंधुत्व वगैरे तत्त्वे प्रतिपादन केली गेली आहेत. फार काय, रशियातील समतेची सर्व तत्त्वे आमच्या हिंदुधर्मांत शोधू लागल्यास सापडतीलच. फार काय, समतेचा पुरस्कार केला नाही असा एकही धर्म मिळणार नाही. पण तेवढ्याने समाजात समता स्थापू शकली नाही. निव्वळ ध्येयवादाने कार्यभाग होत नसतो. ध्येयाला कृतीची आवश्यकता आहे. एखाद्याने मोठा कवी,

लेखक, चित्रकार किंवा शास्त्रज्ञ होण्याचे ध्येय ठरवले आणि तो कसलाही प्रयत्न न करता घरी स्वस्थ बसला तर ते ध्येय त्याला गाठता येणार नाही. ध्येयाशिवाय एखादा कार्यक्रम आखणे जसे चुकीचे आहे तसे ध्येय ठरवून निव्वळ स्वस्थ बसणे त्याहूनही मूर्खपणाचे आहे-

निव्वळ उच्च तत्त्वे प्रतिपादन केल्याने मनुष्यस्वभाव बदलणार नाही. त्याकरता सभोवतालच्या परिस्थितीत बदल घडवून आणला पाहिजे. परिस्थिती बदलेल तसा त्याचा स्वभावावर परिणाम होतोच होतो. मनात इच्छा असून अनुकूल परिस्थिती नसल्यास त्या व्यक्तीची इच्छा मनातच मरते. हल्लीची समाजघडीच अशी बसून गेली आहे की, निव्वळ व्यक्तिविषयक आचरणाने समाजातले दोष निघू शकत नाहीत. निव्वळ उपदेशाचा फारसा परिणाम होत नाही. याकरिता कायद्यानेच समाजव्यवस्था बदलली पाहिजे. कारण ती कायद्याच्याच आधारावर राहिली आहे. समाजघडी जशी बदलावी तशी न्यायान्यायाची कल्पनाही त्याबरोबर बदलत जाते. बरे मतपरिवर्तनावरच जोर देणारे, त्यांच्या डोळ्यासमोर या विचाराविरूद्ध चालू असलेल्या गोष्टीकडे दुर्लक्ष करतात. आजचा समाजही मतपरिवर्तनावर विसंबून कोठे आहे?

चोरी करणे हे पाप आहे, नैतिक अध:पात आहे. चोरी, दरोडा, खून या गोष्टी वाईट आहेत असा उपदेश करून व निव्वळ मतपरिवर्तनावर भिस्त ठेवून चालू समाज स्वस्थ बसला आहे काय? नाही. उपदेशावर विसंबून रहा म्हणणारे लोक नवनव्या होणाऱ्या कायद्यांना अनुमती देत असतातच. याच भांडवलशाहीतील पुष्कळ कायदे भांडवलवाल्यांच्या हिताविरूद्ध होत आहेत. पण नाइलाज होऊन त्यांना त्यास संमती द्यावी लागते. खालचा समाज हक्कास जागा होईल तसा तो आपले हक्क संख्याबलावर व संघटनेवर मिळवू लागला आहे. भांडवलवाल्यांच्या पक्षपाती सरकारलाही त्यांना सतत खूश ठेवणे शक्य होत नाही.

गिरणीचे मालक निव्वळ सांगून मजुरांचे तास कमी करतील या भरवशावर सरकार कुठे राहते. तासावर नियंत्रण घालणारा फॅक्टरी ॲक्ट त्यांना पास करावा लागला व त्याला भांडवलवाल्यांना संमतीही द्यावी लागली. भूतदयेच्या उपदेशाने गुलामगिरी जाईल म्हणून ते स्वस्थ बसले नाहीत. गुलामगिरी कायद्याने काढून टाकली. इकडे सती जाण्याविरूद्ध कायदा झाला, बालविवाह प्रतिबंधाचा झाला; असे कायदे होत आहेत. पण दुसऱ्या इसमाला

गुलाम करता येणार नाही. पैशाच्या व सत्तेच्या जोरावर दुसऱ्याला राबवता येणार नाही, स्वत: श्रम न करता दुसऱ्याच्या श्रमावर जगता येणार नाही, असा कायदा करणे चुकीचे का होईल? व्यापक समाजहित समोर ठेवून आता रोज रोज नवे कायदे होत आहेत. लढाईच्या वेळी अन्नाचा दुरूपयोग केल्यास शासन होत होते. गरीब असो, श्रीमंत असो, त्याला मोजकेच अन्न घेता येत होते. आपलया येथे आजही रोगाच किंवा साथीचा प्रसार होत आहे असे दिसताच व्यक्तीस्वातंत्र्याचा विचार न करता घरोघरी जाऊन टोचून येतातच - प्लेगची केस झालेल्या घरच्या मंडळीस इतर लोकांच्या जीवित रक्षणासाठी सक्तीने बाहेर काढले आहे. या सर्व कायद्यांना व वागणुकीला समताविरोधी अनुमती देत आहेत व त्याबद्दल सरकारची स्तुती करीत आहेत. मतपरिवर्तनावर विसंबून रहा असे म्हणत नाहीत. मग परोपजीवी वृत्तीचा व बेकारीचा रोग हा सर्व देशास व बहुजन समाजास हानिकारक आहे हे ठरल्यानंतर कायद्याच्या जबरदस्तीने या रागाने पछाडलेले लोक बाहेर का काढू नयेत? सार्वजनिक व्यवहारात एखाद्या घराचा अडथळा आल्यास सुरळीत दळणवळणासाठी ते घर म्यु. पालिटी किंवा सरकार सार्वजनिक हितासाठी म्हणून पाडून नाही का टाकत? रस्तारूंदीच्या वेळी कित्येक घरे पाडली जातात. भांडवलशाहीच्या बेशिस्त प्रसारामुळे बहुजनसंख्येच्या उन्नतीच्या सर्व वाटा बंद झाल्या आहेत, त्यांचा प्राण गुदमरू लागला आहे, त्यांची हालचाल बंद पडू लागली. रोगाच्या सर्व साथी, अनीतीचे सर्व प्रकार, भांडवलशाहीमुळे समाजात फैलावू लागले आहेत. म्हणून म्यु. पालिटी प्रमाणेच सरकारने यांचे इमले खाली आणले पाहिजेत. यात चालू पद्धतीला सुद्धा फारसे सुटून आचरण होईल असे मानण्याचे कारण नाही. मनुष्यस्वभाव आपोआप बदलेल या विश्वासावर बसणे म्हणजे सर्व न्यायकोर्टे बंद करण्यासारखेच आहे. कारण मग त्यांचे काम काय?

समाजाची घडी बदलल्यानंतर मात्र त्याचा परिणाम स्वभावावर झाल्याशिवाय रहात नाही.

घाण, गलिच्छ वस्तीत, अशिक्षित समाजांत, एखादे मूल टाकताच त्या समाजातील गुणधर्म त्या मुलास चिटकतातच. ब्राह्मणाची मुले स्वच्छ राहतात, शुद्ध बोलतात, त्यांच्या अंगी चांगले गुण येतात, याचे कारण तसे शिक्षण त्यांना उपजल्यापासून मिळत असते. अस्पृश्यांची मुले अगदी निराळ्या संस्कृतीची वाटतात. त्याचे कारण उपजतच ती तशी असतात असे नाही. समाजाच्या

दर्जाबरोबर ते ते गुण त्यांना चिकटतात. जमीनदार, इनामदार, श्रीमंत, सावकार, अधिकारी यांची मुले एका विशिष्ट स्वभावाची, वृत्तीची बनतात. बहुधा ती अरेरावी, उन्मत्त, आळशी व परावलंबी होतात. नोकराची मुले नम्र, आज्ञाधारक, गुलाम वृत्तीची बनतात. कारण नोकर वर्गाला पोटासाठी मानापमानात गिळावे लागतात, स्वाभिमानाला फाटा द्यावा लागतो. यामुळे शिव्या देणे मालकाचा धर्म, शिव्या खाणे हा नोकराचा धर्म ही एक रूढीच मान्य होऊन गेली आहे. केवळ आर्थिक विषमतेमुळेच स्वभावावर असे दुष्परिणाम होत असतात. मनुष्यांची परस्पराबरोबरची वागणूक समतेची असावी असे वाटल्यास त्यांच्या आर्थिक स्थितीत साम्य असावे लागते. मालक व गुलाम हे नाते गेले की त्याला अनुसरून असलेली वागणूक गेली. हिंदुस्थानातले इंग्रज उर्मट का याचे कारण आमची गुलामगिरी होय. जेत्यांच्यात सौजन्य साहजिकच आढळून येत नाही. समतेच्या वागणुकीला आर्थिक समतेची अत्यंत आवश्यकता आहे. ती कायद्याने व राजसत्तेनेच करता येणार आहे. उपदेशाने येणार नाही. आपली सत्ता, धन, इस्टेट निव्वळ उपदेशाने कोणी टाकील ही कल्पनाच चुकीची आहे. ही गोष्ट अशक्य आहे. आर्थिक समता हाच यावर तोडगा आहे.

**इस्टेट** : पण यावर एक समतावादाचा विशेष विचार न केलेले आक्षेप घेतात की समता स्थापन करण्यासाठी श्रीमंताजवळची संपत्ती सक्तीने काढून टाकली तर पुन: काही कालाने ही स्थिती येणारच. तेव्हा हा प्रयोग यशस्वी कसा होईल ? मग याला आळा घालायचा तर समतावादी सरकारलाही जबरदस्तीची वाटणी सालोसाल करावी लागेल.

पण हा वरील आक्षेपच मुळी चुकीचा आहे. समतावाद्यांचे धोरण स्वकष्टाचा मागे राखलेला आवश्यक पैसा-त्यांचा संकटसमयीचा किंवा म्हातारपणचा आधार काढून घेण्याचे नाही, याने कायमची आर्थिक समता स्थापन होणार नाही हे समतावादीही जाणतात.

आपण साठवलेल्या वाडवडिलार्जित इस्टेटीवर जगतो ही कल्पनाच मुळी चुकीची आहे. वाडवडिलांनी साठवलेल्या संपत्तीवर आपल्याला जगता येणार नाही. ती गोष्ट अशक्य आहे. अशा साठवलेल्या संपत्तीवर काही दिवस जगता आले तर त्याने देशाचे नुकसान होणार नाही, लोकांनाही त्यामुळे फारसा त्रास होणार नाही. व स्वकष्टाने मिळवून अडचणीसाठी मागे टाकलेला पैसा

काढून घेणेही अन्यायाचे होईल. हा आधार देशांतील प्रत्येक मनुष्याला असला पाहिजे. रोजची गरज भागून प्रसंगाला आधार म्हणून थोडा तरी पैसा प्रत्येकाला राहिलाच पाहिजे. या साठ्यावर घाला घालण्याचे पाप समतावादी करू इच्छित नाहीत. देशांतल्या गरिबांना हा साठा वाटून देण्याने त्यांची कायमची गरिबी जाणार नाही. एक दिवस पंचपक्वान्नाचे ताट पुढे केल्याने त्यांची रोजची भूक शमणार नाही. जिवाची दगदग कायमची मिटणार नाही.

वळवाच्या पावसाने नदी-नाले, विहिरी-तलाव, डबकी व डबरे भरून जातात. खाचखळगे भरून वर वर साफ दिसते. समतेचा भास उत्पन्न होतो. पण एक दोन दिवस गेले, उन्हाचा ताव मारू लागला म्हणजे साठलेले खाचखळग्यातले पाणी आटून ते अगदी कोरडे ठणठणीत पडतात. पण जिवंत झऱ्याचे पाणी असे आटत नाही. विहिरीजवळील डबके उपश्याशिवाय आटून जाते आणि माटवण चालू असलेली विहीर कोरडी पडत नाही. डबक्यांतले पाणी शेतकऱ्याला दिल्याने त्याची शेती सुधारणार नाही. रोपांना एखादा दिवस टवटवी येईल पण ती टिकणार नाही. त्याला जिवंत झऱ्याचे सतत वाहणारे पाणी दिले तरच त्याची पिके वाढतील व फोफावतील. साठलेल्या संपत्तीची वाटणी करणे म्हणजे डबक्यातले साठलेले पाणी वाटण्यासारखे आहे. तर जिवंत झऱ्याचा फाटा प्रत्येकाला त्याच्या हिश्श्याप्रमाणे आला पाहिजे. सर्वांना आवश्यक अशा या जिवंत झऱ्याची मालकी बळजबरीच्या किंवा बुद्धीच्या जोरावर कोणी धूर्ताने जर आपल्या स्वाधीन ठेवलेली असली तर ती काढून घेऊन सर्वांच्या मालकीची करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे. हा जिवंत झरा सर्वांच्या मालकीचा झाला पाहिजे.

जग साठलेल्या धान्यावर फार वेळ जगू शकत नाही. सालोसाल उत्पन्न होणाऱ्या धान्यावर व वस्त्रावर मनुष्य अवलंबून आहे. वाडवडिलांनी साठवलेल्या धान्यावर तो किती दिवस जगणार? सर्वांना अन्नवस्त्र पुरवणारा झरा म्हणजे जमीन होय. या जमिनीतून सालोसाल नवे उत्पन्न निघत आहे. या जमिनीवर कोणा एका व्यक्तीचा किंवा एकाच वर्गाचा ताबा असल्यास दुसऱ्या उरलेल्या लोकांना जगता येणार नाही. हा वर्ग, जगण्याचा जिवंत झरा जेवढा सोडील तेवढ्यावरच दुसऱ्यांना जगावे लागणार. जगण्यासाठी सांगतील त्या गोष्टी कराव्या लागणार.'आजन्म तुम्ही नोकर रहात असाल, आमच्यासाठी कष्ट करीत असाल, देऊ त्यात समाधान मानाल, तरच तुम्हास जगण्यापुरते पाणी व अन्न आम्ही देऊ. या सर्व अटी जगायचे तर कबूल करायलाच

पाहिजेत. असे कष्ट करून जगण्याबाहेरचे सर्व उत्पन्न स्वस्थ बसून जर दुसरा वर्ग अपहार करू शकला तर एक वर्ग श्रीमंत व दुसरा मजूर हा भेद कायम राहणारच. तोपर्यंत समता येणे शक्य नाही. तेव्हा ही जमीन व मनुष्याच्या आवश्यक गरजा भागण्याची सर्व साधने सामुदायिक मालकीची करणेच भाग आहे. साठलेल्या संपत्तीची वाटणी हा उपाय नव्हे.

मनुष्य तैलबुद्धीचा आहे, मोठा कसबी आहे, सशक्त आहे; अशा माणसाला तुरुंगात टाका. वरील सर्व गुण त्याच्या अंगी असूनही तो त्या तुरुंगात उपाशीच मरणार. त्या बुद्धीचा, कौशल्याचा व शक्तीचा उपयोग त्याला करता येत नाही. शक्ती असून श्रम करता येत नाहीत. बुद्धि-कौशल्य खर्चण्यास जागा नाही. तुरुंगाच्या चार भिंती त्याच्या उन्नतीच्या आड येत आहेत. त्या भिंतींनी त्याची जगण्याची सर्व साधने अडवून ठेवली आहेत.

जमीन कष्टास असली तर माणूस त्यातून पीक काढू शकेल, बुद्धीचा उपयोग करून त्यातून निरनिराळ्या धातू पैदा करील, यंत्रे बनवील, हरतऱ्हेच्या जिनसा तयार करील, पण हे सर्व केव्हा, त्याच्या मालकीची किंवा त्याला कष्टास जमीन असली तर; नाहीतर बाहेर असूनही तो तुरुंगात असल्यासारखाच. तो लहान तुरुंग, हा मोठा तुरुंग; जगण्याची साधने काढून घेतल्यानंतर तुरुंगात असले काय आणि बाहेर असले काय दोन्ही सारखेच ! या साधनांची मालकी आज भांडवलवाल्यांच्या हाती आहे. ती त्यांच्या हातून काढून घेऊन बहुसंख्य जनतेच्या म्हणजे राष्ट्राच्या मालकीची झाल्यास आजची विषमता दिसणार नाही. जमीन राष्ट्राच्या मालकीची झाली पाहिजे.

**वडिलार्जित जमीनजुमला** : पण वंशपरंपरागत भोगत असलेल्या व मालकीत असलेल्या जमिनीची मालकी काढून घेणे नैतिकदृष्ट्या योग्य होईल काय? ही अन्यायी जबरदस्ती व दरोडेखोरी नव्हे काय? असा प्रश्न उद्‌भवणारच !

पण ही गोष्ट अन्यायाची मुळीच नाही. जी गोष्ट आपली नव्हे, जी वस्तू आपण तयार केलेली नाही, तिजवर आपल्याला हक्क सांगता येणार नाही. वाडवडिलांनी उत्पन्न केली नाही, अशा वस्तूवर हक्क सांगण्याचा अधिकार कसा पोचतो? जमीन आपण निर्माण केली नाही, वाडवडिलांनी केली नाही, पण जिच्यावर देशातील सर्व जनतेचे प्राण अवलंबून आहेत, ती काही जणांनी आपल्या ताब्यात ठेवणे म्हणजे दुसऱ्यांना उपाशी मारणे नव्हे काय? असा एका

मनुष्याला, दुसऱ्या मनुष्याचा प्राण आपल्या ताब्यात ठेवण्याचा अधिकार नैतिकदृष्ट्या कोणाला भोगता येईल काय? तसेच सर्वांनी सामुदायिक श्रमाने निर्माण केलेल्या संपत्तीवर, अनेक शतके संशोधन करून अनेकांच्या बुद्धीने लागलेल्या शोधावर म्हणजे आजच्या यंत्र साधनावर काही व्यक्तींना मालकी सांगता येणार नाही. आज चालत आलेली मालकी जबरदस्तीची आहे. तरवारीच्या जोरावर मिळविलेली आहे.

आपल्या श्रमाने मिळवलेल्या संपत्तीवर जगण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे. रोजची काटकसर करून साठवलेली संपत्ती भोगण्याचा त्याला अधिकार आहे. पण या साठ्याच्या जोरावर दुसऱ्यास राबवून तो साठा वाढवण्याचा मात्र नैतिकदृष्ट्या त्याला अधिकार पोचत नाही. श्रमाने साठवलेले धन फार काळ टिकूही शकत नाही. ही संपत्ती लवकर खर्च करावी लागते. पैसा म्हणजे संपत्ती नव्हे. लोकांची येथे दिशाभूल होत असते. धन म्हणजे पैसा नव्हे. ज्यावर मनुष्य जगतो त्या वस्तूस खरी संपत्ती म्हणतात. रुपया, अधेल्या, पावल्यांवर जगता येत नाही. फक्त धनाची म्हणजे संपत्तीची अदलाबदल करण्याचे ते एक सोयिस्कर साधन आहे, म्हणून त्याला महत्त्व आले आहे. आजकाल नोटांच्या कागदांनी व्यवहार करता येतो, म्हणून कागदाच्या भेंडोळ्यांना कोणी खरे धन म्हणत नाही. या अशा प्रकारच्या धनावर कोणी जगत नाही. ज्यावर आपल्यास जगता येते तिलाच संपत्ती म्हणतात. ही संपत्ती म्हणजे धान्य, कपडे व इतर जगण्यास लागणाऱ्या वस्तू होत. या वस्तू पिढ्यान्‌पिढ्या टिकू शकत नाहीत. सालोसाल निर्माण होणाऱ्या धान्यावर आपण जगतो व तसेच वस्त्र वापरतो. त्रेतायुगात वाडवडिलांनी स्वकष्टाने साठवलेल्या धान्यावर म्हणजे धनावर आपण जगत नाही. धान्य दरसाल उत्पन्न होत आहे. त्यासाठी जनता सालोसाल कष्ट करीत आहे. त्या ताज्या संपत्तीवर आपण जगतो. ती संपत्ती कष्टाशिवाय निर्माण होत नाही. म्हणून कष्ट केलेल्या संपत्तीवर अधिकार सांगता येईल. पण जमीनदार स्वत: कष्ट न करता बळकावलेल्या जमिनीवर मालकी सांगून त्यावर कुणब्याने केलेल्या कष्टाचा अपहार करतात. ज्या वस्तूवर व्यक्तीचा अधिकार पोचत नाही, जी वस्तू मनुष्याने निर्माण केली नाही, करता येत नाही, त्या वस्तूवर सर्व मानवजातीचा सारखाच हक्क नाही काय?

भांडवलशाहीने प्रत्येकास उन्नती करण्याची शाब्दिक मोकळीकच तेवढी ठेवली आहे. उन्नती करून घेण्याची साधने मात्र काढून ती आपल्या

हाती ठेवली आहेत. ज्याने त्याने कर्तबगारीने पोटास मिळवावे असे म्हणण्यात काय अर्थ आहे? हातपाय घट्ट बांधून टाकल्यावर तुम्हाला वाटेल तिकडे जाण्याची परवानगी आहे, असे म्हणणे सभ्यपणाचे होईल काय? ज्या जमिनीशिवाय धान्य उत्पन्न होत नाही, ज्या साधनाशिवाय आवश्यक वस्तू तयार करता येत नाहीत, ती काढून घेऊन 'तुम्हाला सुखाने जीवित कंठण्यास मुभा आहे' असे बोलणे म्हणजे जखमेवर पुन: डाग देणे नव्हे काय? ही अशा प्रकारची सवलत देणे म्हणजे मरण्याचे पूर्ण स्वातंत्र्य दिल्यासारखे नाही काय? जमिनी जमीनदारांच्या ताब्यात, गिरण्या भांडवलवाल्यांच्या खास मालकीत ठेवून शेतकरी-मजुरांची उन्नती करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे बहुसंख्य जनतेला फसविणे नव्हे काय? भांडवलशाहीला ठेवून गरिबांच्या उन्नतीचा प्रयत्न करणे ही त्या वर्गाची निव्वळ दिशाभूल आहे.

**कामाची हौस** : आता 'धंदे, गिरण्या, जमिनी वगैरे धनोत्पादनाची सर्व साधने व्यक्तीच्या ताब्यातून राष्ट्राकडे गेली तर काम करणाऱ्याला आपलेपणा राहणार नाही, अगत्य वाटणार नाही. त्यांच्या स्वार्थाचे आमिष नाहीसे होईल व याचा परिणाम मग राष्ट्राच्या उत्पादनावर होईल.'

भांडवलशाहीची आजची स्थिती पाहिली तर वरील आक्षेपाच्या अगदी उलट आहे. गिरण्यांची व इतर साधनांची मालकी आज कष्ट करणाऱ्या लोकांकडे नाहीच मुळी! मालकी, फायदा व त्या कामाचे सर्व नियंत्रण भांडवलवाल्याच्याच हाती असल्यामुळे मजूर हा फक्त डोळे झाकलेला घाण्याचा बैल झाला आहे. गिरणीत जाऊन पहा, त्याला इकडे तिकडे पाहण्याची सोय नाही. पाठीच्या कण्यात ठणका लागल्या तर देहाला आळेपिळे देण्याचीही सवलत नाही. कित्येक गिरण्यांत तर मजुरांच्या हालचालीचे फोटो घेण्यात येतात. हिंदुस्थानातील संस्थानी गिरण्यात तर अद्याप तासावर नियंत्रण नाही; पगाराचे प्रमाण नाही, अशा स्थितीत खुशीने काम करणारा एक तरी मजूर मिळू शकेल काय? त्याला त्यात का म्हणून आपलेपणा वाटेल? फायद्याचा वाटा त्याला नाही, भूतदयेने त्याला वागवण्यात येत नाही, मग उत्पादन वाढवण्याची बुद्धी त्याला का व्हावी? तो चुकारपणाच अधिक करणार! राष्ट्राकडे मालकी आल्यावर प्रत्येक व्यक्तीचा हक्क उत्पन्नावर येईल, त्यामुळे उत्पादन वाढवल्यास प्रत्येकाचा त्या प्रमाणात फायदा होईल. आपण दुसऱ्यासाठी राबतो, आपण दुसऱ्याचे गुलाम आहेत ही त्यांची भावना नाहीशी होईल. एखादी कंपनी निघाली

म्हणजे त्यात पुष्कळ भागीदार असतात, ते व्यक्तिश: कंपनीचे मालक नसले तरी सर्व भागीदारांची सामायिक मालकी त्या कंपनीवर असते. त्याप्रमाणे उत्पादनाची सर्व साधने राष्ट्राच्या मालकीची झाल्यावर राष्ट्रातील प्रत्येक व्यक्ती ही एक प्रकारे भागीदारच होते. यामुळे उत्पादन वाढेल आणि प्रत्येक व्यक्तीचाही त्या प्रमाणात फायदा होईल.

**यांत्रिक प्रगती** : चालू भांडवलशाहीपद्धती देशास कशी घातक आहे ते थोडे मागे पाहिले म्हणजे चांगले समजून येईल.

गिरण्या येण्यापूर्वी जिनसांची पैदास व्यक्तिविषयक श्रमाने, कौशल्याने व बुद्धीने होई; यामुळे देशातील छोटे छोटे असंख्य धंदेवाले चढाओढीने माल चांगला, टिकाऊ, दिखाऊ व स्वस्त देण्याला झटत. यंत्रांनी म्हणजे गिरण्यांनी हे व्यक्तिविषयक श्रम, कौशल्य, व फायदा काढून टाकला. छोट्या धंदेवाल्यांना व कसबी लोकांना यंत्राशी टक्कर देणे अशक्य झाले. हातकामावर व कौशल्यावर जगणारे बेकार झाले. गिरण्यांच्या चढाओढीमुळे सार्वत्रिक उन्नतीला व कलेच्या वाढीला आळा बसला. तो गिरणीवाल्याचा पोटार्थी नोकर झाला, त्याचा कामातला आपलेपणा नाहीसा झाला. गिरण्यांच्या चढाओढीमुळे मजुराचे तास वाढले, पगारात काटाकाट होऊ लागली, कष्टाळू जनतेचा कामाचा उत्साह गेला, संपाचे प्रसंग येऊ लागले, चढाओढ त्यांनाही नडू लागली, परस्पर मारक होऊ लागली म्हणून त्यांनी आपल्या धंदेवाईकांचे गट बनवले व या गटांनी मग देशातील त्या त्या धंद्यावर आपले प्रभुत्व बसवले. त्या जिनसांचे दर वाटेल तसे वाढवून जिन्नस महाग करू लागले. देशात महागाई आणली. बाजार पेठावरचे हे राजे झाले. यांनी राजसत्तेवर आपले वर्चस्व बसवले. परदेशातून येणारा स्वस्त माल यांनी राजसत्तेच्या बळावर महाग करून स्वत:चा माल आपल्या देशबांधवांच्या गळ्यात बांधला. संरक्षक जकातीचे तट उभे करून परराष्ट्रांचे स्नेहसंबंध मोडले. परदेशच्या गिरण्यांबरोबर चढाओढ करण्याकरता मजुरांची छळवणूक सुरू ठेवली. प्रत्यक्ष देशातला बहुसंख्यवर्ग हा कामकरीच ! मालाचा मोठा खप तेथेच. त्याचा पगार कमी होताच त्याची माल काढण्याची ताकद कमी झाली. मालाचा उठाव कमी झाला. त्यामुळे गिरण्या बंद ठेवाव्या लागल्या. काम गेल्यामुळे मजूर उघडे पडले. बेकारी वाढली. दंगा, चोऱ्या, मारामाऱ्यांना ऊत आला.

मालाची महागाई, मजुरांचे हाल, चढाओढीने आत्मनाश, बेकारीमुळे

असंतोष, जकातीमुळे देशादेशांत वितुष्ट हे या भांडवलशाहीचे परिणाम आहेत. गटांच्या नाकेबंदीमुळे व्यापरवृद्धीवर व उत्पादनावर अनिष्ट परिणाम होत आहे. बेकारीमुळे माल कोठारांत कुजतो आहे. जकातीमुळे सर्व जिनसा महाग होतात. तेव्हा ही भांडवलशाही देशातील सामान्य जनतेस फायदेशीर आहे असे म्हणता येईल काय ? पण समाजसत्ताकपद्धतीत यंत्राचे मालक, त्याचा फायदा घेणारे, तास ठरवणारे, पगार देणारे, तेच असल्यामुळे वरील दोष किती तरी कमी होऊ शकतील.

**जगण्याची धडपड** मनुष्याच्या सुखासाठी दुसऱ्यांनी प्रयत्न करण्यात काय अर्थ आहे ? दुसऱ्याच्या मदतीने काय होणार आहे ? 'जो लायक असेल तो जगेल' हा अबाधित नियम काय खोटा आहे ? जगण्याची धडपड ही सर्व प्रणिमात्रामागे लागली आहे. ती कमी करण्याचा प्रयत्न यशस्वी कसा होईल ?

हा नियम भांडवलशाही आपल्या समर्थनार्थ उपयोगात आणीत असते; पण चालू आर्थिक चढाओढीला हा नियम लावता येत नाही. ही भांडवलशाहीची चढाओढ म्हणजे, जगण्याची धडपड नव्हे. निसर्गनियमाला धरून होणारी प्राण्यांची वाढ व प्रतिकूल परिस्थितीमुळे त्यांचा होणारा नाश व भांडवलशाहीच्या स्वार्थामुळे होणारा बेकारांचा व गरिबांचा प्राणनाश यात फारच अंतर आहे. निसर्ग व परिस्थितीचा परिणाम आहे. एक नैसर्गिक स्थिती व दुसरी कृत्रिम आहे; मनुष्यनिर्मित आहे. ही जगण्याची धडपड जशी प्रत्येक प्राणिमात्रामागे लागली आहे; तशीच मनुष्यालाही त्याच्याशी टक्कर द्यावी लागत आहे- पण या जगण्याच्या धडपडीत दुसऱ्या मनुष्याशी कलह करण्याचा, त्याला खाली पाडण्याचा, संबंध येत नाही. युद्ध हीजगण्याची धडपड नव्हे. आजारातून वाचण्याचा प्रयत्न करणे, बुडत असताना तरण्याचा प्रयत्न करणे किंवा भुकेने व्याकूळ झाल्याबरोबर तुकड्यासाठी धडपडणे, प्राणधारणेसाठी उपाय शोधून काढणे या जिवाच्या धडपडीत स्वसंरक्षणाचा मुख्य हेतू आहे. पण पोटाची सर्व विवंचना गेल्यानंतर आज चालू असलेल्या भरपोटी व्यापारी चढाओढीस व दुसऱ्या देशावरच्या स्वारीस व जग जिंकण्याच्या साम्राज्य-स्थापनेच्या महत्त्वाकांक्षेस जगण्याची धडपड कोण म्हणेल ? ही राक्षसी धडपड होय ! पोट भरल्यानंतरची दुसऱ्याचे पोटावर पाय देण्याची, दुसऱ्याच्या तोंडचा घास काढून घेण्याची, जीव घेण्याची ही आसुरी धडपड होय. हजारो लोकांना उपाशी ठेवून संपत्तीच्या जोरावर केवळ स्वतःच्या सुखासाठी राबवणे ही व्यापारी धडपड

जगण्याची नव्हे. आपला देश आपल्या ताब्यात असताना साम्राज्य लालसेने दुसऱ्या देशाला जिंकून त्याचे स्वातंत्र्य नष्ट करणे ही जगण्याची धडपड खास नव्हे; मनुष्याच्या पाशवीवृत्तीचे हे आविष्करण आहे. पशुकोटीहूनही ही अधोगती आहे. **Survival of the fittest** म्हणजे हा प्रकार नव्हे. एखादा रोगी हवेमुळे किंवा अशक्तपणामुळे मरणे व प्रतिकूल परिस्थितीस बुद्धीच्या व ताकदीच्या जोरावर टक्कर देत जगणे या गोष्टीस जगण्याची धडपड म्हणता येईल. अशा स्थितीत लायक तो जगेल असे म्हणता येईल. खालच्या कोटीतील कित्येक प्राणी हवामान प्रतिकूल झाल्याबरोबर मरून जातात, त्यातून जे तग धरतील ते जगण्यास लायक ठरतात. मनुष्याची स्थिती पशूहून निराळी आहे. थंडीच्या प्रदेशात हवामान निभले नाही तर त्या प्राण्याला जगता येत नाही. पण मनुष्य बुद्धीचा उपयोग करून प्रतिकूल परिस्थितीसही अनुकूल करून घेतो. थंड प्रदेशात जगायचे तर उबदार कपडे घालून व बंदिस्त घर बांधून व शेगडी वगैरे पेटवून आपले संरक्षण करतो. मनुष्यप्राण्यांत इतर प्राण्याहून जी एक विशेष चीज आहे ती म्हणजे बुद्धी. बुद्धीचा उपयोग करून निसर्गाशी टक्कर देत देत तो आपल्या उत्क्रांतीच्या मार्गास लागला आहे, अनुभवाचा फायदा घेऊन आपल्या चुका दुरुस्त करीत आहे, आपल्याला सुखाने कसे जगता येईल याचा विचार करून येतील त्या अडचणींतून निभावून जात आहे. जगण्याचा मार्ग सुकर करणे व आपल्या ध्येयाचा व उन्नतीचा मार्ग आक्रमणे हाच मानव-संस्कृतीचा उद्देश । विश्वबंधुत्व, समता, स्वातंत्र्य हे त्याचे ध्येय. प्रत्येक व्यक्तीला अधिकांतअधिक सुख भोगता यावे व आपली उन्नती करून घेता यावी हाच प्रत्येक संस्कृतीचा अंतिम हेतू. याला पोषक अशी समाजव्यवस्था बसवणे यातच मनुष्यपणाची लायकी ठरणार आहे. ज्या मानाने एकमेकांच्या विनाशक स्वातंत्र्याला आपण आळा घालू त्या मानाने सर्व समाजाचे व त्यातील व्यक्तींचे स्वातंत्र्य व सुरक्षितता वाढत जाईल. आजच्या भांडवलशाहीची प्रगती अखिल मानवजातीस आपयकारक होत आहे. म्हणून सर्वांच्या जीवित-संरक्षणासाठी हिच्या प्रगतीस पायबंद घातला पाहिजे. दुसऱ्याचा नाश करण्यात आपल्यालाही धोका आहे. मानव समाजात सर्वच चोर व दरोडेखोर झाले तर सर्वांचे नुकसान आहे; ही साधी गोष्ट भांडवलशाही विसरू लागली आहे. मानवजातीस आता आपण जगण्याला लायक आहोत असे ठरवायचे असेल, नव्हे जगायचे असेल, तर या भांडवलशाही वृत्तीला समाजातून हाकून दिलेच पाहिजे. तरच मनुष्यप्राणी म्हणून जगण्यास लायक ठरू.

**पैसा** : यावर अशी शंका निघेल की, 'मग माणसांच्या इस्टेटीचे काय होणार? पैसा साठवण्याची वृत्ती गेली तर मनुष्य कार्यप्रवृत्त कसा होणार? पैशाची आवड तर प्रत्येकाच्या हाडीमासी खिळली आहे. पैशाशिवाय पाय टाकणे अशक्य होईल. जिवाचा आधार नाहीसा होईल.'

जिला आम्ही पैशाची हाव म्हणतो ती हाव मनुष्याला खरोखरी नसते. नुसत्या नाण्याची हाव मनुष्याला नाही. सत्तेची, सुखाची, ऐश्वर्याची व लोकमान्यतेची हाव मनुष्याला आहे. निव्वळ नाणी, त्याचा उपयोग काढून टाकल्यास, ती दगडाच्याच किमतीची आहेत. नाणी खाता येत नाहीत, पांघरता येत नाहीत, जळण करता येत नाहीत. तेव्हा सोन्यानाण्याची व नोटांची किंमत वस्तुत: काहीच नाही. आज तो देवघेवीच्या व्यवहाराचा अत्यंत सोयीचा पदार्थ असल्यामुळे, जिनसांची अदलाबदल करण्याचे ते एक सोपे साधन झाले. म्हणून त्याला आज फार महत्त्व आले आहे. पैशाने अन्नवस्त्र मिळते, नोकर चाकर ठेवता येतात, जगातील सुखे भोगता येतात, दुसऱ्यावर सत्ता चालवता येते, सर्व जगाला अंकित करता येते, देशच्या देश खरेदी करता येतात, जगावर कुठेही जा त्याला सुखात राहता येते व मित्रमंडळी गोळा होतात. अशी ही सत्ता चुकीच्या अर्थशास्त्रामुळे पैशामागे लपली आहे. म्हणून पैसा मिळवण्याची धडपड प्रत्येक मनुष्य करत असतो. ती धडपड निव्वळ पैशासाठी नसून त्यापासून मिळणाऱ्या फायद्यासाठी असते. वरील गोष्टी पैसा दिला असता मिळाल्या नाही तर पैसा कोणीही जवळ ठेवणार नाही. ठेवलाच तर मजेची गोष्ट म्हणून ठेवला जाईल.

ज्या गरजा पैशामुळे भागतात, जी आकांशा पैशाने पुरी करता येते, पाहिजे त्या गोष्टी पैसा न खर्चता मिळू लागल्या तर पैका साठवण्याचे कारण उरणार नाही. आपल्याला हवी ती गोष्ट पैशाशिवाय मिळू लागली, फुकट मिळू लागली, वाटेल तेव्हा मिळू लागली व वाटेल तितकी मिळू लागली तरी त्याचे साठवण कोण करील? नेहमीच्या पाहण्यातलीच गोष्ट, आपल्याला पाणी मोठ्या शहरी जे मिळते त्या पाण्यावर मालकी दुसऱ्याची असते. पण घरी चावी आणल्याबरोबर वाटेल तेव्हा पाणी मिळते. असे झाल्यावर उगाच पिंपेच्या पिंपे पाणी कोण भरून ठेवील? मोफत लायब्ररीत वाटेल ते पुस्तक वाटेल त्यावेळी मिळाल्यास घरी पुस्तकाच्या पेट्या कोण भरून ठेवील? अन्नवस्त्राची गरज आज पैशाविना भागत नाही. म्हातारपणी, साठवून ठेवलेला पैसा जवळ असेल

तरच जगता येते, असे आहे. म्हणूनच कोणीही पैसा साठवून ठेवतो. पैशाने मिळणाऱ्या गोष्टी दुसऱ्या काही साधनांनी मिळू लागल्या, श्रमाने मिळू लागल्या तर पैशाऐवजी श्रमाला महत्त्व येईल. यावरून पैशाची स्वतंत्र अशी काही किंमत नाही. व्यवहाराचे एक मोठे सोयिस्कर साधन म्हणून त्याला महत्त्व आले आहे.

**जिवाचा आधार** समाजसत्ताक राज्यात कोणाला काहीसुद्धा साठवता येणार नाही, इस्टेट करता येणार नाही, असे मानण्याचेही कारण नाही. त्याला काही प्रमाण राहील एवढेच. प्रत्येकाला इस्टेट करता यावी असेच प्रोत्साहन उलट मिळू शकेल. भांडवलशाही मात्र सार्वत्रिक सुबत्तेला व इस्टेटीला मारक आहे. आज अगदी थोड्या लोकांनाच तेवढी इस्टेट आहे, बाकी कोट्यावधी लोकांना हक्काचा आसरा नाही, दुसऱ्या दिवशीची सोय नाही. घर नाही, शेत नाही, काम नाही, कनवटीला दमडी नाही, अंगावर धडुतं नाही. त्याला कसले ते स्वातंत्र्य माहीत नाही. तुकडा टाकेल त्याचा तो गुलाम ! त्याला जणू स्वतंत्र असे अस्तित्त्वच नाही, ते असू शकणारही नाही. स्वत:च्या मालकीच्या अशा काही वस्तू मनुष्याला आवश्यक आहेत. ज्या मानाने या वस्तू त्याकडे अधिक त्या मानाने तो अधिक स्वतंत्र असतो. बेकार मजुराकडे असा काहीच आधार नसल्यामुळे तो दुसऱ्याचा सहजासहजी गुलाम होतो, श्रीमंताचे बाहुले बनतो. समाजसत्ताक राज्यांत तो असा गुलाम बनणार नाही. कारण हे सरकार प्रत्येकाला आसरा, वस्त्र, अन्न, काम मिळेल अशी व्यवस्था करील. यामुळे तो आवश्यक गरजेसाठी, म्हणजे जगण्यासाठी ताबेदारी पत्करणार नाही, काम नाही म्हणून दारोदार भटकण्याचे कारण त्याला उरणार नाही. कष्टापुरती जमीन मिळेल, ज्या धंद्यात वाकबगार आहे त्या धंद्यातली नोकरी मिळेल. त्याच्या मुलाच्या संगोपनाची, त्याच्या म्हातारपणची व आरोग्याची काळजी सरकार घेईल. त्याचे घर, त्याच्या विशिष्ट व्यासंगास लागणारी साधने, हौसेच्या जिनसा, यावर त्याला त्याच्या हयातीत मालकी भोगता येईल. मात्र साठवलेले पैसे व्याजी लावून त्या व्याजावर, जमिनीच्या खंडावर, म्हणजे स्वस्थ बसून दुसऱ्याच्या श्रमावर, आज जसे भांडवलवाले, जमीनदार, सावकार जगतात, तसे जगता येणार नाही. अनावश्यक पैशाची वाढ करता येणार नाही. मनुष्याला पैशाची आवश्यकता आहे; पण तोच प्रमाणाबाहेर गेला की, समाजास हानिकारक होतो. मनुष्याला खाण्याची आवश्यकता आहे; पण अधिक झाले की प्रकृती बिघडते व मिळाले नाही म्हणजे जीव जातो. आज भांडवलवाल्यांना अजीर्ण होत आहे व

बेकारांची उपासमार होत आहे. यामुळे दोन परस्परविरोधीवर्ग निर्माण होत आहेत. दोघांचाही नैतिक ऱ्हास होत आहे.

**श्रीमंती आणि सुख** : जरा बारकाईने विचार केला तर आज ज्या प्रमाणात गरीब-श्रीमंत हे भेद आहेत त्या प्रमाणात त्यांच्या सुखदु:खात अंतर आहे असे नाही. पैशाच्या राशीवर सुख अवलंबून नाही. पाच रुपये व पाच हजार रुपये या पगाराच्या प्रमाणात सुखाचे प्रमाण ठरत नाही. काही एका ठराविक प्रमाणाबाहेर पैसा गेला म्हणजे त्याचा उपयोग त्या मालकालाही करून घेता येत नाही. त्याची उधळपट्टीच करावी लागते. तसे केले नाही तर पैशाच्या राशी मोजण्यापलीकडे सुख मिळणार नाही.

उत्तम हवेशीर अशी राहण्यास जागा असल्यानंतर तो बंगला हजार माणसांना राहण्याजोगा अवाढव्य बांधल्याने त्याला विशेष सुख भोगता येणार नाही. एका पलंगाऐवजी दहा पलंग घरात टाकल्याने झोप दसपट लागणार नाही, किंवा दहा आराम खुर्च्यांनी दसपट आराम मिळणार नाही. उत्तम घर, उत्तम कपडे, उत्तम वाहन, उत्तम जेवणाचे ताट यांच्या संख्येच्या वाढीने सुखाचे प्रमाण वाढू शकत नाही. मात्र हे खरे की, काही एका मर्यादेपर्यंत संपत्तीच्या कमीअधिक प्रमाणावर सुखाचे प्रमाण राहू शकते. दहा रुपये पगारवाल्यापेक्षा शंभर रुपये पगारवाला अधिक सुखी असू शकतो. कारण जेवणखाण, कपडलता, सुखसोयी अधिक करून घेता येतात. कारण प्राणधारणेच्या आवश्यक गरजा दहा रुपयात तशा भागवून घेता येणार नाहीत. पाचशे पगाराचा माणूस या सर्व गरजा भागवून काही हौसेच्या गोष्टी पैदा करू शकेल. त्याला काही रक्कम शिल्लक राखता येईल. ही गरज भागून उरलेली शिल्लक त्या माणसाला खरोखरी अनावश्यक असते. म्हणूनच ती शिल्लक राहते. त्या संपत्तीचा त्याला स्वत:ला उपभोग घेता येत नाही, मग असला पैसा बँकेत टाकायचा, सावकारी करायची, शेअर्स घ्यायचे, घरे बांधायची, जमिनी खरेदी करायच्या. देशात बेकारी जी माजते तिला कारण श्रीमंतांचा हा अनावश्यक पैसा व इस्टेट. त्याला त्या पैशाने प्रत्यक्ष सुख भोगता येत नाही. कोट्याधीश किंवा एका देशाचा राजा जेवढे भारी किमतीचे ताट जेवील तेवढे हजार दोन हजार पगारवाल्यालाही जेवता येईल. निव्वळ ताटांच्या संख्यने त्याच्या पोटात भर पडणार नाही. बाकीच्या ताटांचा उपभोग दुसऱ्यालाच द्यावा लागतो. एका मनुष्याला लागणाऱ्या वस्तूंची कमाल मर्यादा झाली म्हणजे त्यापुढे त्या संपत्तीचा उपभोग त्याला करून घेणे अशक्य होते. दहा

मोटारी, दहा बंगले, पाचपन्नास घोडी, शंभर दोनशे नोकर हा इतमाम स्वतःच्या आवश्यक गरजा भागून उरलेल्या अनावश्यक पैशातला आहे. हे श्रीमंती चोचले प्रमाणाबाहेरच्या श्रीमंतीचे आहेत. हा असा निरर्थक साठणारा व खर्च होत असणारा पैसा राष्ट्राच्या मालकीत आल्यास सार्वत्रिक सुबत्ता नाही का होणार? उत्पादनाची साधने राष्ट्राच्या मालकीची झाल्यास अशी बेसुमार संपत्ती व्यक्तीच्या ठिकाणी वाढणार नाही. दुर्भिक्ष किंवा सुबत्ता जी व्हायची ती सार्वत्रिक होईल.

**बेकारी व समाज** : 'बेकारी नाहीशी व्हावी, सर्वांस काम मिळावे व मजुरांची स्थिती सुधारावी हा प्रयत्न भांडवलशाहीदेखील करीत आहे. मग त्याला समाजसत्तावादाचीच आवश्यकता काय?

असा प्रयत्न भांडवलशाही राष्ट्रात होत आहे हे खरे. बेकाऱ्याला काम नाही असे आपल्या देशात होऊ नये म्हणून मजुरांना काम देणे, त्यांच्यासाठी नवी नवी कामे सुरू करणे, नवे धंदे काढणे हे धोरण ठरवल्यास यंत्रसहाय्य कमी करावे लागेल. यांत्रिक सुधारणेवर अनिष्ट परिणाम होईल व बेकार हे कायमचे मजूरच राहतील. बेकारांना काम देणे, त्यांना जगता येईल असे करणे, याने देशातील दारिद्र्य नाहीसे होणार नाही. वर्गभेद नाहीसे होणार नाहीत. देशांतील गुलामगिरी नाहीशी होणार नाही, मालक व मजूर हा भेद जाणार नाही. मजुरांची स्थिती सुधारणे हा हेतू निव्वळ समतावाद्यांचा नव्हे. गुलामांची स्थिती सुधारल्याने गुलामांचे हाल कमी होतील पण गुलामगिरी नष्ट होत नाही. पोपटाला सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवून मोत्याचे दाणे घातले म्हणून पोपटाचे पोट भरत नाही किंवा त्याचे पारतंत्र्य काही जात नाही. मजूर आज निव्वळ मालकावर अवलंबून आहे. तो देईल त्या अन्नावर जगत आहे. मालक म्हणेल तितका वेळ राबत आहे. मालकाची मालकी काढून घेतल्याखेरीज बेकारी म्हणजेच पोटाची गुलामगिरी नष्ट होणार नाही. ज्या कारणामुळे बेकारी उत्पन्न झाली ते कारण - तो रोग काढून टाकला पाहिजे. सक्तीची नोकरी असता कामा नये.

एखादा पोलीस ज्यावेळी मार्ग दाखवित असतो त्यावेळी त्याचा अधिकार व हुकूम लोकहितासाठी असतो. ऐकले नाही तर न ऐकणाराचे नुकसान होते. अपघात होण्याचा व प्राणास मुकण्याची भीती असते. शिक्षणाबद्दलची सक्ती, रोगराईत टोचून घेण्याबद्दलची सक्ती यात हुकूम करणाऱ्याच्या स्वार्थाचा संबंध नसतो. हे ऐकण्यात मानहानी नाही. पण

ज्यावेळी एखाद्या गिरणीचा किंवा कारखान्याचा मालक मजुराला दरडावून काम करून घेतो, दंडाच्या भीतीने राबवितो त्यावेळी मजुराच्या कल्याणाचा हेतू त्यात नसतो. मजुराच्या फायद्यासाठी त्याची हुकमत नसते. कामात कुचराई होऊ नये म्हणून होत असलेली त्याची टेहळणी व अपघात होऊ नये त्याबद्दल रस्त्यावरच्या पोलिसाची टेहळणी यात महद्‌तंर आहे. एक अधिकारी पूर्ण स्वार्थाने भरलेला आहे, तर दुसरा पूर्ण नि:स्वार्थी आहे. हे नाते फक्त समाजसत्ताक राज्यातच राहू शकेल. कारण त्यातल्या गिरण्या- कारखाने हे एका व्यक्तीच्या फायद्याकरता नसून सर्वांच्या फायद्यासाठी चालू असतात.

काम देऊन बेकारी घालविण्याचे भांडवलशाहीचे धोरण म्हणजे मजुरांना मालक बनवणारे नव्हे. त्यांचे काम हलके करण्याचे नव्हे आणि यांत्रिक प्रगतीलाही ते पोषक नाही. कारण यंत्राने काम हलके झाले की, माणसाचे काम उरणार नाही. याकरिता यंत्र सुधारणा कमी करावी लागणार. आतापर्यंत मिळवलेला सर्व अनुभव, संशोधन, ज्ञान, प्रगती टाकून रानटी स्थितीकडे जावे लागणार. म्हणून भांडवलशाहीत दारिद्र्य नाहीसे होणार नाही, गुलामगिरी जाणार नाही, आणि सर्वत्रांना शक्य तै अधिक काम द्यावे हे यांत्रिक प्रगतीविरुद्ध होणार. तेव्हा दारिद्र्य निवारण्याला उपाय एकच ! समाजसत्ता हाच तो उपाय.

**स्वातंत्र्य** : पण समाजाला व समाजसत्तेलाच महत्त्व दिल्यानंतर व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी नाही का होणार ! अशी भीती पुष्कळांना वाटते.

हे व्यक्तिस्वातंत्र्य आज भांडवलशाहीत किती मिळते ते पाहू. समाजात राहणाऱ्याचे व्यक्तिस्वातंत्र्य व समाजाबाहेर राहणाऱ्याचे स्वातंत्र्य यात फारच अंतर आहे. समाजातील व्यक्तीचे बेलगाम स्वातंत्र्य सर्व समाजास असह्य होत असते. त्याचे स्वातंत्र्य अनेकांचे स्वातंत्र्य हिरावून घेते. जुलमी राजाच्या लहरी व स्वैराचार सर्व प्रजेला कसे भोगावे लागतात त्याचा अनुभव बहुतेक सर्व देशांना येऊन गेला आहे. म्हणून गांजलेल्या सर्व प्रजेने एकजूट होऊन अशा अनियंत्रित राजसत्तेवर नियंत्रण घातले आहे. इंग्लंडच्या चार्लस्‌ची उद्दाम व बेदरकार वृत्ती, फ्रान्सच्या लुईची अनिवार सुखलालसा, झारची झोटिंगशाही, औरंगजेबचे धर्मवेड, नेपोलियन, सीझर, कैसरची व आजच्या हिटलर-मुसोलिनीची साम्राज्यतृष्णा जनतेला कशी त्रासदायक झाली आहे व होत आहे हे काही निराळे सांगायचे व पटवून देण्याचे कारण नाही. खून, दरोडा, रक्तपात व अनिवार राज्यतृष्णा या व्यक्तींच्या व विशिष्टवर्गाच्या अनिवार

स्वातंत्र्याला आळा घातला नाही तर ते स्वातंत्र्य सर्वांस तापदायक झाल्याशिवाय राहणार नाही. ज्या मानाने व्यक्तीची दुसऱ्यास त्रास देण्याची शक्ती व स्वातंत्र्य कमी होईल त्या मानाने समाजातील प्रत्येक व्यक्तीचे स्वातंत्र्य, सुरक्षितता व स्वास्थ्य वाढेल.

आज भांडवलशाही राष्ट्रात दोन वर्ग प्रामुख्याने आहेत. एक अल्पसंख्य, श्रीमान्, मूठभर वर्ग व दुसरा श्रमजीवी, बेकार, बहुसंख्यवर्ग. भांडवलवाल्यांच्या बाजूस राजकीय सत्ता आहे; पैसा, रुढी, कायदा, कर्म, नीती, न्याय वगैरे त्यांनी आपलीशी करून घेतली आहेत. हजारो मजुरांना उपाशी किंवा अर्धपोटी ठेवणे; गुलामाप्रमाणे राबवणे हे भांडवलवाल्यांच्या हाती आहे. यांच्या फायद्यासाठी, यांच्या आकांक्षेसाठी, यांच्या तंत्राप्रमाणे आपल्या स्वत:च्या आवडीनिवडीस बाजूस ठेवून मतस्वातंत्र्यास गाडून, मजूर यांचा घाणा डोळे बांधून ओढत असतो. मजूराने पोटासाठी डोळ्यावर, तोंडावर, इच्छेवर, ध्येयावर पांघरुण ओढून घेतलेले असते. तो हुकुमाचा ताबेदार; त्याला व्यक्तिस्वातंत्र्य असत नाही. ते फक्त भांडवलवाल्यापुरते आहे. त्यालाच ते भोगता येते. बहुसंख्य जनता ही निव्वळ गुलाम बनलेली आहे.

समता आणि स्वातंत्र्य या गोष्टी इतक्या परस्परावलंबी आहेत की, समाजात समतेशिवाय स्वातंत्र्य भोगणे अशक्य आहे. आर्थिक विषमता असल्याखेरीज एक दुसऱ्यावर असा जुलूम करू शकत नाही. एकाचा दुसऱ्यावर जुलूम झाल्याखेरीज समाजांत आर्थिक विषमतेचा शिरकाव होत नाही. आर्थिक विषमतेचा परिणाम बुद्धीच्या विषमतेतही होत असतो. कारण बुद्धीच्या विकासाला जो वेळ व विश्रांती आवश्यक आहे ती पोटासाठी अहोरात्र राबणाऱ्या मजुराला मिळू शकत नाही. याचमुळे खालचा वर्ग देहाने तसा मनानेही गुलाम बनतो, बुद्धीचा मंद असतो; रुढीचा बंदा असतो.

विषमतेमुळे व्यक्तिस्वातंत्र्यास, मतस्वातंत्र्यास, राजकीय स्वातंत्र्यास वाव मिळत नाही. कारण समतेशिवाय स्वातंत्र्याचा लाभ मिळणे व तो भोगणे अगदी अशक्य आहे. मात्र समता म्हणजे स्मशानवत समता व शांती नव्हे. तशी बुद्धीची, कौशल्याची, शक्तीची विषमता नैसर्गिक राहणारच. पण ती दुसऱ्याचे उन्नतीस प्रतिबंध मात्र करणार नाही. ही आर्थिक विषमता व्यक्तिस्वातंत्र्यास व उन्नतीस सारखी आड येत असते. मनुष्यप्राण्याला जगण्यास लागणाऱ्या आवश्यक वस्तूंचा व्यक्तिविषयक ताबा काढून घेतला म्हणजे समाजातील

व्यक्तिस्वातंत्र्याचे फारच संरक्षण होईल ! कारण या गरजा भागल्यानंतर तो पोटासाठी आज वाटेल त्या स्थितीत रहात आहे. वाटेल ते ऐकत आहे; सर्व मानपान गिळून राबत आहे, तसे ती गरज भागली तर वागणार नाही. तो ताठ मानेने चालेल. आपले अन्नवस्त्र हिरावून घेण्याची कोणाची ताकद नाही अशी खात्री वाटल्यास जमिनीपर्यंत वाकून मुजरा करणार नाही. बुटाच्या लाथा खाणार नाही. जनावरी जिणे जगणार नाही. तो पुरुषाप्रमाणे वागू लागेल. प्रत्येकाला अन्नवस्त्राचा व आसऱ्याचा आधार समाजसत्ताक राजवटीत प्रत्येक व्यक्तीला मिळू शकेल. त्याची पोटाची गुलामगिरी नाहीशी होईल.

भांडवलशाही राज्यपद्धतीत मतस्वातंत्र्य भोगता येत नाही. कारण ज्या मताचे राजमंडळ असते, जो वर्ग अधिकारारूढ असतो, त्याच्या मर्जीविरुद्ध, धोरणाविरुद्ध, हिताविरुद्ध व आचाराविरुद्ध बोलण्याचे मतस्वातंत्र्य त्या राज्यांतील दुसऱ्या कोणासही भोगता येत नाही. त्यांनी केलेल्या कायद्याविरुद्ध बोलणे म्हणजे राजद्रोह ! ते धाडस केल्यास ठराविक शिक्षा ठरलेली. तेथे न्यायाचा तराजू नेहमी राजकर्त्यांच्या व राजनिष्ठांच्या बाजूला झुकलेला ! साध्या गोष्टीतला मतभेद बोलून दाखवणेही धाडसाचे असते. याचे दाखले इतिहासांत भरले आहेत. ख्रिस्तप्रभूंना आपल्या मतासाठी सुळावर चढावे लागले. काही पोपांच्या अमदानीत एकांती विचार करण्यासही मना होती. इंग्लंडच्या मेरी राणीच्या अमदानीत धार्मिक मतभेदासाठी जिवंत जाळण्याची शिक्षा झालेली आहे. पेशवाईत उच्च समजलेल्या ब्राह्मणवर्गाविरुद्ध बोलणाऱ्यांना यातना सहन कराव्या लागल्या आहेत. जोतिराव फुले, दयानंद, आगरकर, शाहू महाराज वगैरे समाजसुधारकांना लोकटीका, निर्भत्सना व प्रत्यक्ष हालही भोगावे लागले आहेत. गांजलेल्यांची बाजू घेतल्याबद्दल संत तुकाराम, ज्ञानदेव, एकनाथाचे धिंडवडे निघाले आहेत. लढाईविरुद्ध बोलणाऱ्यांना, राजसत्तेविरुद्ध बोलणाऱ्यांना आजही सर्वप्रकारचे त्रास होत आहेत. देशी संस्थानांचा तर या बाबतीत फार वरचा नंबर लागेल. तेव्हा भांडवलवाल्या राष्ट्रात मतस्वातंत्र्य असते; पण ते फक्त अधिकारी वर्गालाच. आजकाल संस्थानी राजाइतके व्यक्तिस्वातंत्र्य जगात फारच थोड्या व्यक्तींना भोगता येत असेल. सत्ताधिशांना वाटेल ते बोलता येते, लिहिता येते, वागता येते. यामुळे इतर सर्व प्रजाजनांचे मात्र स्वातंत्र्य सर्वस्वी नाहीसे होते. मतदानाचीच गोष्ट घ्या, मजुरांना मत देण्याचा अधिकार असला तरी तो त्यांना कितीसा भोगता येतो ? ज्याचे ते नोकर

असतील, त्यांचेच हिताहित; ज्यांचेकडे ते गुंतले असतील त्यांना त्यांची मते पडायचीच. त्यांनी आपले मत मालकांना केव्हाच विकलेले असते. गिरणीच्या मालकाविरुद्ध, राजाविरुद्ध व राज्यकर्त्याविरुद्ध बोलणाऱ्यांची कधी धडगत लागली आहे ?

वर्तमानपत्रे ही आज मतप्रसाराची साधने आहेत; पण त्यांतली पीडित जनतेला अनुकूल लिहिणारी अशी किती मिळतील ? तशी असली तर त्यांचे आयुष्य मोजकेच असते. संस्थानातलीच पत्रे पहा ! त्यात प्रजेची बाजू मांडलेली कधी मिळायची नाही. हरहमेश राजाची, अधिकाऱ्यांची, राज्यकारभाराची स्तुते त्यात वाचून घ्यावी. हा दोष व्यक्तीचा नसून परिस्थितीचा आहे. ज्यांची सत्ता, त्यांचे भाट ! समाजसत्ताक राज्यात स्थिती उलटेल. या सर्व गोष्टी, ही सर्व सत्ता बहुसंख्य वर्गाला अनुकूल अशीच राहील. पक्षपात झालाच तर तो समता या धोरणाला धरून होईल. स्वार्थी लोकांना फक्त त्रास होईल. गरिबांचा फायदा घेऊ इच्छिणाऱ्यांना तो घेता येणे शक्य होणार नाही. राहिलेच दोष तर आजच्याहून हजारोपटीने कमी असतील.

कवी, लेखक, चित्रकार यांच्या स्फूर्तीला समाजसत्ताक राज्यात अधिक वाव मिळू शकेल. लोकांची मनोभूमिका तयार करण्याचे काम हाच वर्ग करीत असतो. पोटासाठी हे सर्व आज श्रीमंतांचेच भाट झाले आहेत. दारिद्र्यात बुडलेल्या बहुसंख्य प्रजेतून-पोटाची विवंचना आहे अशा लोकांतून स्फूर्तीची ही फुले कशी उमलतील ? पाणीच नाही तर त्यांना बहर कसा येईल ? ध्येयवाद्यात केवळ श्रीमान होण्याची महत्त्वाकांक्षा नसते. त्यांना पैशाचे ढिगावर बसवून व्यासंग सोडण्याची अट घातली तर त्या ढिगास ते लाथाडून दिल्याखेरीज राहणार नाहीत. पोटापुरत्या झुणकाभाकरीत ते समाधान मानतील. पण ती पोटापुरती झुणकाभाकर मात्र त्यांना पाहिजे असते. कित्येक कवी, चित्रकार, लेखक, शास्त्रज्ञ वगैरे जे रात्रीचा दिवस करून काम करतात ते पैशासाठी श्रीमंत होण्यासाठी नव्हे ! त्याला दोन वेळ सुखाचा घास मिळाला, त्याच्या कलेचे कौतुक माणसांनी केले म्हणजे तो संतुष्ट होतो- कुबेराच्या अफाट संपत्तीची त्याला जरूरी नाही. पोटार्थी जनतेतून जर एखादा कलाव्यासंगी बाहेर पडला तर पोटासाठी त्याला श्रीमंतांचा आश्रय पत्करावा लागतो. असा आश्रय पत्करल्यानंतर त्याची कला त्या आश्रयदात्याला खूश करण्याकडे खर्चावी लागते. आतील निर्मल, स्वतंत्र व स्फूर्तीला धरून त्याला आपली कलाकृती

निर्माण करता येत नाही; कारण ती खपेल की नाही याची त्याला भीती असते- ही भीती गेली की, कला स्वैर विहार केल्याखेरीज राहणार नाही. याकरिता कलावंतांना आर्थिक स्वास्थ्याची व सुरक्षिततेची अत्यंत आवश्यकता आहे. स्वतंत्र वातावरणाखेरीज स्वतंत्र वृत्तीची कला बाहेर पडणेच शक्य नाही.

**समता व स्त्रीपुरुष** : आर्थिक समतेचा इष्ट परिणाम स्त्रीपुरुष संबंधावरही झाल्याखेरीज राहणार नाही. दोघांचेही आयुष्य सुखमय होईल. आज लग्नबंधनाला आलेले तुरुंगवासाचे स्वरूप जाऊन ते मानवी सौख्याचे माहेरघर बनेल ! लग्नश्रृंखलेचे प्रेमाच्या गोड मालेत रूपांतर होईल.

गुलामगिरी म्हणजे बळजबरीचे स्वामित्त्व ! गुलामगिरीत प्रेमाचा विकास होत नाही. दोघां स्वतंत्र, समान दर्जाच्या व्यक्तीचे प्रेममीलन निराळे आणि गुलामगिरीचे जूं निराळे ! हा शिरजोरपणा काढून दोघांना स्वतंत्र केले पाहिजे. धार्मिक, सामाजिक, आर्थिक विषमता त्यांच्यातील नाहीशी केली पाहिजे. म्हणजे घडणारे लग्नबंधन स्वखुशीचे होईल. हे प्रेमाचे सहकार्य दोघांनाही हितकारक होईल.

धर्माज्ञा वस्तुस्थितीला व मनुष्य स्वभावाला पुष्कळ वेळा विसंगत असल्यामुळे तिचे निर्बंध पाडले गेले नाहीत- विवाह धर्माज्ञेमुळे तुरुंग बनला आहे. स्वतंत्र वृत्तीच्या वधुवरांना तो फोडण्याचीच बुद्धी होऊ लागली आहे. दोघा स्त्रीपुरुषांना प्रेम करू लावण्याची शक्ती, मंत्रतंत्रात किंवा हुंड्याच्या पिशवीत साठवून ठेवलेली नाही. प्रेम बळजबरीने उत्पन्न होऊ शकत नाही. धर्माज्ञेने, कायद्याने, रूढीने व समाजाने स्त्रीपुरुषाला बांधून घातले तरी मनाने ते पूर्ण विभक्त असू शकतात. मत्सरामुळे पुरुष वर्गाने स्त्रीला असा बांधण्याचा प्रयत्न केला आहे. पण अनुभवाअंती तो फोलच ठरला आहे. लग्नसंबंधाने प्रेमाला पावित्र्य येऊ शकते. ज्यात प्रेम नाही असा संबंध दोघांसही दु:खाचा होतो. लग्नाबाहेरच्या संबंधाला लग्नाने काही आळा घालता येतो असे नाही. या सर्व मनाच्या गोष्टी आहेत.

प्रेमात आर्थिक विषमता विष कालवते. पोटासाठी बाप आपल्या पोटची पोर पाप्याच्या पितराला बिनदिक्कत देतो. 'पोट की प्रेम' असा प्रश्न उभा राहिला की प्रेमालाच गाडून टाकावे लागते. श्रीमंत घरात वाढलेल्या मुलीला, श्रीमंत नवरा मिळाला नाही तर आयुष्यभर औपचारिक कौमार्य राखण्याचे प्रसंग येत असतात. तसेच लग्नानंतर वितुष्ट आले तरी परावलंबित्वामुळे स्त्रीला तशा

स्थितीत आयुष्य कंठावेच लागते- हेच स्त्रीपुरुष आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी झाले तर त्यांच्यातील औपचारिक गोडवा जाऊन खऱ्या प्रेमाचा संबंध राहू शकेल. लग्नसंबंध स्वखुशीचे व्हायला, त्यातली गुलामगिरी नाहीशी व्हायला, ही आर्थिक समता हा फारच परिणामकारक उपाय आहे.

आतापर्यंतच्या विवेचनावरून समाजातील असंख्य दोषास भांडवलशाही म्हणजे आर्थिक विषमता कशी कारण आहे ते थोडक्यात मांडण्याचा प्रयत्न केला आहे. समाजसत्ता चांगली की आजची भांडवलशाही चांगली असा प्रश्न आज सर्वांपुढे आहे. या पुस्तकाने समतोलपणे विचार करण्याची बुद्धी जरी निर्माण झाली तरी पुरे आहे. ती उत्पन्न झाली म्हणजे समाजसत्ताच चांगली हा निर्णय विचारी पुरुष दिल्याखेरीज राहणार नाही.

**निश्चित ध्येय** : समता हे ध्येय मान्य झाले म्हणजे मग उपायांत मतभेद राहतील. पण ध्येय ठरवून पाऊल टाकण्याची आता वेळ आली आहे. ते ध्येय पटले तरी काम झाले. ध्येयाला धरून आखलेली चळवळ हीच खरी व्यवहारी असू शकते. आपल्याला कुठे जायचे हे ठरल्याखेरीज जर तुम्ही बाहेर पडला तर वाट चुकून भलतीकडे जाल. मोटारीत बसणे, आगगाडीत बसणे, विमानातून जाणे; कौंसिलाबाहेर राहून काम करणे की आत जाऊन, या तात्पुरत्या गोष्टी आहेत. ही ध्येयाकडे जाण्याची साधने आहेत. ते ध्येय नव्हे. या साधनांचा उपयोग करून घेण्यापूर्वी जाण्याचे ठिकाण नक्की केले पाहिजे. मगच मार्गाला लागले पाहिजे.

समाजात गरिबी आहे, दारिद्र्य आहे, बेकार भरले आहेत. गिरण्यांतील मजुरांना त्रास होत आहे. असंख्य लोकांना अन्न मिळत नाही. रोगराई पसरत आहे. मृत्युसंख्या वाढत आहे. खटले, मारामाऱ्या, दंगेधोपे, चोऱ्या व दरोडे हे प्रकार सुरू आहेत. याला दानधर्म हा खरा उपाय नव्हे. गिरण्याचे तास कमी करणे, पगार वाढविणे, अन्नछत्र उघडणे, दंगेधोपे होतात म्हणून कोर्ट व पोलीस वाढवणे हे उपाय व्यवहारी म्हणून समजले आहेत; पण ते आज चुकीचे ठरत आहेत. त्याने समाजाचा मुख्य रोग नाहीसा होणार नाही. ध्येय निश्चित करून मग एकेक पाऊल त्या अनुरोधाने टाकणे हाच खरा दूरदर्शीपणा होय. गरिबीचा रोग मुळातून काढून टाकायचा तर समाजदेहातील दूषित रक्त प्रथम काढून टाकले पाहिजे. भांडवलशाही हे ते दूषित रक्त होय. त्याला समाजसत्ता हाच एक रामबाण उपाय !

*(समाजसत्ता की भांडवलशाही)*

## ७) शेतकरी

आपल्या मनगटाच्या जोरावर मातीचे सोने करणारा, स्वकष्टाच्या कमाईवर पोराबाळांना पोसणारा, दिनरात भू-मातेच्या सेवेत रंगून गेलेला. तिचा हक्काचा वारस तो हाच! शेताचा खरा मालक तो हाच!

कुबेराच्या धनदौलतीची की राजेरजवाड्यांच्या ऐश्वर्याची ज्याने खातर केली नाही असा-

**सुखी, समाधानी, स्वावलंबी व स्वाभिमानी माणूस म्हणजे आमचा शेतकरी.**

राज्ये, साम्राज्ये वावटळीप्रमाणे वाऱ्यावर विरून गेली. याने शेतकऱ्याच्या झोपड्या कायमच्या विस्कटल्या नाहीत. या सर्व शेतकरी संकटातून सावरला आहे. एका साली लूट झाली तर दुसऱ्या साली त्याने पुन: डोके वर काढले आहे. शस्त्राच्या जोरावर, दरवडेखोरांनी दागदागिने पळविले तर कष्टाच्या जोरावर याने ते पुन: मडवले आहेत. झोपड्या मोडल्या तर चारचौघांच्या मदतीने त्या पुन: उभ्या केल्या आहेत.

सालोसाल येणाऱ्या नव्या पिकावर किंवा नव्या बांधलेल्या घरावर याचीच मालकी असे. बापाचे पाप नातवाला भोवत नव्हते.

**तो वंशपरंपरेचा गुलाम झाला नव्हता.** : पोराबाळांचे स्वातंत्र्य व त्याच्या पुढील कष्टाची कमाई आजच परस्वाधीन झाली नव्हती. याची पुढची पिढी जमीनदाराच्या जन्मास येणाऱ्या रत्नाची आजच गुलाम म्हणून बांधून गेली नव्हती.

हा स्वत:साठी राबत होता. याच्या पोराबाळांचा शेतवडीचा कष्टाचा आधार तुटला नव्हता. तो सुखाने जगून उरलेल्या धान्यात इतरांची गरज पुरवत होता.

आज सर्व पारडे फिरले आहे. लाथ मारील तेथे पाणी काढणारा, आज सर्वांच्या लाथा खात आहे! दुनियेला पोसणारा दारोदार भटकत आहे.

आजचा शेतकरी शेताचा मालक नाही. शेतावरचा मजूर हत्यारांचा मालक नाही, त्याच्या कष्टाच्या पिकावर त्याची मालकी नाही.

**शेतकरी सुखी तर जग सुखी** गोष्ट अगदी खरी, पण वरील म्हणीप्रमाणे आज स्थिती आहे काय?

'उत्तम शेतकी, मध्यम व्यापार, कनिष्ठ नोकरी' हे वाक्य ज्याचे त्याचे तोंडी आहे. अशी स्थिती समाजात एके काळी असल्याखेरीज ही म्हण उगाच काही प्रचारात आलेली नाही.

**पण आज सगळा उलटा प्रकार!** : आज उत्तम व्यापार, मध्यम नोकरी, आणि कनिष्ठ शेतकी अशी स्थिती आहे. आज शेतकरी दु:खात तरच दुसरे सुखात, असे झाले आहे. शेतकरी जमीनदाराच्या खंडाखाली जेवढा चिरडावा तेवढा जमीनदार वर येत आहे! सावकारी बोजाने शेतकऱ्याचे छप्पर बसले की सावकाराच्या घरावर सोन्याची कौले चढलीच! शेतकऱ्याचे पाय मोडले की सावकार अंतराळी चालू लागतो. गाडी घोड्याशिवाय हलत नाही. ज्या मानाने शेतकरी अक्षरशत्रू, त्या मानाने वकील कारकून हे लेखणीबहाद्दर त्याचे शत्रू!

जमीनदाराची बापजादी सत्ता, सावकाराचा पैशाचा फास व शिकलेल्यांच्या लेखणीचे पाते या कात्रीत त्याचे त्राण उरत नाही. हे तिघे त्याच्या घरादाराची, जमिनीची व उरल्या सुरल्या किडुकमिडुक चीजवस्तूची आपापल्यात वाटणी करून घेऊन, त्याला पुरा जमीनदोस्त करतात!

दिवसेंदिवस शेतकरी खालावत आहे. पैसा कमी होत आहे. धान्याला भाव नाही, बदलण्याचे चिन्ह नाही. शेताचा खरा मालक शेतकरी, पण हा मात्र दु:खात! मातीत राबणारा मातीमोल झाला आहे!

**गरिबीचे खापर देव बाप्पावर!** भोळा शेतकरी या सर्वाचे खापर देवबाप्पावर आदळून निराश होऊन स्वस्थ बसतो. या सर्व संकटांना तो नशीबाचा खेळ समजतो. हा कष्टाळू सांब असा स्वस्थ बसतो म्हणूनच सर्वांचे फावते. वरच्यांच्या गमजा चालतात. जातीचा वाघ आपल्या ताकदीस विसरल्यामुळे मेंढरासारखा मुकाट्याने मरण्यास पुढे होत आहे. **त्याला आपल्या जातीची, म्हणजे आपल्या ताकदीची जाणीव झाल्याखेरीज तो आपले हक्क मिळवणार नाही.** ही जाणीव त्याला आपली योग्यता समजली म्हणजे लवकर येईल.

हा असा उलटा प्रकार का व्हावा? समाजात असे भेदाभेद का? एक इमामदार तर दुसरा दारोदार! एक कोटीचा मालक तर दुसरा कवडीला महाग! असा फरक का? हे काय गौडबंगाल आहे? उपजताच शेतकरी गरीब झाला काय?

**''माणसांनी उत्पन्न केलेले जिन्नस माणसांचे''** : जगात जगण्याची साधने सर्वांजवळ आहेत. श्रम केल्यास सर्वांना सुखाने जगता येईल अशी पुरेशी जमीन आहे. ती अमक्याच्याच कष्टाला अधिक पिकते व दुसऱ्या कोणाचा हात लागला की पिकत नाही, असे होत नाही. जो इमानाने कष्ट करील त्याला ती उपाशी ठेवीत नाही. त्याच्या श्रमाची, हजारो पटीने परतफेड करते. ती कष्ट करणाऱ्याची दासी बनते. फक्त कष्ट करणाऱ्याच्याच ताब्यात ती जात असते. ती कष्ट न करणाऱ्यास केव्हाही प्रसन्न होत नाही.

**जमीन, पाणी, आकाश वगैरे पंचमहाभूते सर्व प्राणिमात्रांच्या सारख्याच मालकीची आहेत.** : त्यांना आवडते नावडते कोणी नाही. जीवमान असेपर्यंत त्यावर सर्वांना ताबा गाजवता येतो. सर्वांची त्याचेवर मालकी आहे. गरजेपुरता त्याचा सर्वांना उपभोग घेता येतो.

आपल्याला जगण्यापुरती जेवढी हवा लागेल तेवढी ती आपणच घेत असतो. ते काम आपण कधी दुसऱ्यास सांगत नाही. तहान लागल्यास आपण स्वत:च पाणी पितो. आपल्याबद्दल दुसऱ्यास पाणी पिण्यास सांगत नाही. तसेच आपल्यास भूक लागली तर ते भुकेचे अन्न आपणच मिळवणे हे योग्य आहे. कारण ते वरील नियमांना धरून आहे. स्वत: जगायचे तर कष्ट स्वत: करणे हेच न्यायाला धरून आहे. आपली भूक भागवण्याकरिता जर दुसऱ्यास जेवण्याचा आपण आग्रह करीत नाही तर **आपल्या जगण्यासाठी कराव्या लागणाऱ्या श्रमाचा बोजा दुसऱ्यावर कसा टाकता येईल ?**

**आज शेतकऱ्याची स्थिती मोठी बिकट झाली आहे. श्रम करावे म्हटले तर त्याला हक्काची जमीन नाही आणि मरेपर्यंत राबले तरी उत्पन्न केलेल्या धान्यावर त्याची सत्ता नाही. जनावरापेक्षाही त्याची स्थिती वाईट झाली आहे. आणि आम्ही तर सर्व प्राण्यात माणसाला श्रेष्ठ समजतो.**

**''जनावराचे स्वातंत्र्य माणसाला नाही.''** : जंगलातली पाखरे पहा. या झाडावरून त्या झाडावर जातील. आसऱ्याच्या जागी कोटे बांधतील. भुकेपुरती कुठलीही फळे खातील. त्यांच्या भुकेआड कोण येत नाही. अमक्याच झाडावरची फळे तुला खाता येतील, त्या दुसऱ्या झाडावर तुला जात येणार नाही असा हुकूम कोणी सोडलेला नाही. भुकेपुरते फळ खाऊन आसरा दिसेल तेथे तो राहतो. मात्र आपल्या एकट्यासाठी तो आणखी दहा घरटी बांधत नाही. व पुष्कळ झाडावरची फळे गोळा करून आपल्या एकट्यासाठी साठवत नाही.

भुकेपुरती चार झाडे धुंडली की तो जगू शकतो. त्याचप्रमाणे जंगलातली जनावरे कुठेही जाऊन आपल्या भुकेपुरते धान्य-पाला मिळवू शकतात. या रानात जा, त्या रानात जाऊ नको, अशी त्यांनाही कुणी आज्ञा केलेली नाही. असे असता माणसामागेच आडकाठी का? जिकडे पहावे तिकडे बांध, सरहद्दी आणि मनाई ! ! !

**भूमातेवर पशुपक्षांचा जेवढा हक्क चालतो तेवढा माणसाचाही चालू नये ?** : मनुष्यप्राणी हा तर म्हणे सर्व प्राण्याहून श्रेष्ठ ! प्राणीकोटीची अखेरची वाढ म्हणजे मनुष्य कोटी ! मग यातील सर्वात श्रेष्ठ वर्गाचे, आणि तेही कष्ट करणाऱ्या शेतकऱ्याचे, सर्वाहून अधिक हाल व्हावेत ! पाय ठेवण्यापुरती जमीन त्याच्या मालकीची असू नये ?

हा भेदाभेद, ही विषमता, ही गरिबी-श्रीमंती कुणी उत्पन्न केली ?

**राबणाऱ्यास अन्न नाही !** शेतकरी दिवसाचे बारा तास व वर्षाचे बारा महिने राबतो. त्याला दिवसाचे बारा तास निभावून नेण्याइतके अन्न मिळत नाही. जमीनदार वर्षातून एक वेळही जमिनीकडे जात नाही. पळभरही त्या मातेची सेवा करीत नाही. पण हाच निर्धास्त गादीवर लोळतो. त्याला पोटाची चिंता नाही. दर हंगामात धान्याची पोती त्याचे घरी येऊन पडतात, त्याला राहण्यास दुसरे लोक घर बांधून देतात. आपले स्वतःचे कामही तो आपण करीत नाही. शेतावरचा मजूर मरमरेपर्यंत काम करतो, पण मरताना पैची शिल्लकही त्याला मागे टाकता येत नाही. आजारी पडला की काम बुडले ! तितके नुकसान झाले ! आजाराचे दिवस वाढतील, तितकी शिलकीची दमडी आटोपली ! आजारातून बरा होताच सावकाराचा बोजा वाढला. मनगटाची ताकद, हा त्याचा जिवंत पैसा. हात-पाय थकले की हा जिवंत झरा आटला ! म्हातारपणाची हक्काची विश्रांती त्याच्या वाटेला येत नाही. मग आपल्यामागे पोराबाळांना काय ठेवणार ?

पण जमीनदार किंवा सावकाराचे पोर उपजताच इतके श्रीमंत, की जन्मभर हातही न उचलता, त्याचा चरितार्थ चालावा ! त्याला पोटाची काळजी नाही. त्याने वाटेल तसे पैसे उधळावेत.

जगात असा विसंगतपणा का? हा पक्षपात कुणी केला? याला जबाबदार कोण? की उपजताच एक मालकाची जात व दुसरी नोकराची जात निर्माण झाली?

वाघाला आपले सावज पकडण्यासाठी ताकतदार पंजे, व तीक्ष्ण नखे उपजताच असतात. उबेसाठी बकऱ्यास लोकर असते, हरणास रक्षणासाठी चपळ पाय असतात, पाखरास पंख असतात. म्हणजे जगण्याकरिता व जीवाचे रक्षण करण्याकरिता प्राण्यास अनुरुप अशी साधने देहाबरोबरच निर्माण झालेली असतात. तसे गर्भश्रीमंताला उपजताच घरादारांची व जमिनीची इस्टेट अंगाला चिकटलेली नसते. हातापायाची व बुद्धीची साधने हीच त्याची उपजीविकेची खरी साधने आहेत. गरीब व श्रीमंतास ती सारखीच आहेत. गरीब म्हटला की थोटा, पांगळा, श्रीमंत म्हटला की चार हाताचा, चार पायाचा व हत्तीच्या बळाचा, असा काही फरक नाही. उपजताना सर्व सारखे, सारख्या अवयवाचेच असतात. मग हा भेद पडला कसा? गरिबी-श्रीमंती आली कशी?

हे हाल व ही गरिबी काय यांच्या पूर्वजन्माच्या पापामुळे भोगावी लागते ? या सर्व डोळ्यासमोर झालेल्या गोष्टीत देवाला ढकलण्याचे कारण हेच, की शेतकऱ्याची दृष्टी आपल्या फसवणुकीकडे लागू नये. हा धूर्तवर्गाचा डाव आहे. आपल्या अन्यायाचे खापर ईश्वरावर फोडले म्हणजे वरच्या वर्गाची सर्व पापे खपतात व पचतात.

देव कुणी पहिला नाही. त्याची काही गाठ पडत नाही. हे देवाने केले म्हटले की अडाण्याचे तोड बंद!

ही देव म्हणून काय चीज आहे, ती कुणाला आढळली आहे ? हा देव भटांचा व श्रीमंतांचा ताबेदार ! ते नाचवतील तसा हा नाचतो ! भोंदू लोकांनी निर्माण केलेले हे बाहुले गरीब अज्ञानी शेतकऱ्यास भेदरवण्यास हुकमी उपयोगी पडते.

या देवाजीची स्वारी, जमिनीची वाटणी करीत बसलेली. एक मनुष्य गरीब, दुसरा श्रीमंत, अशी माणसांची उंची हलकी नाणी पाडीत बसलेली, कोणी पाहिलेली नाही. शेतकऱ्यांच्या तोंडातला घास 'आकार असलेल्या व आकार नसलेल्या, जिवंत असलेल्या, जिवंत नसलेल्या' या बहिरुप्याने काढून घेतलेला नाही. हे जगाचे गाडे सारखे चालले आहे. ते माणसांची तोंडे पहात किवा लाच घेऊन कमी जास्ती फायदा पदरात टाकत बसलेले नाही. त्याला रावरंक सर्व सारखे.

**मग हा भेदाभेद कुणी पाडला? हा अन्याय कुणी केला?**

डोके शांत ठेवून, वाडवडील सांगत आले म्हणूनच खरे, ही कल्पना बाजूस सारून, अंधश्रद्धेला फेकून देऊन, धर्मभोळेपणाचा पडदा फाडून, स्वच्छ

डोळ्यांनी जगाच्या व्यवहाराकडे पहाण्याचा प्रयत्न करा ! म्हणजे खरे काय याचा उलगडा तुमचा तुम्हालाच करात येईल. स्वत: विचार करण्याची सवय लागली की तुम्ही केव्हाही फसणार नाही. आज फसला तर उद्या तुमची चूक तुम्हाला समजून येईल.

*(बेकारी व तीवर उपाय)*

## ८) विषमतेचा उगम

ही व्यवस्था झाली कशी, श्रीमंत गरिबीचा भेद कसा पडला, केव्हा पडला, याचा आता आपण शोध करू. शोध करण्यासाठी जरा मागे पहावे लागते, म्हणजे कारण सापडते. कारण काय ते समजले की हे कोडे आपोआप उकलू लागले. हे कोडे एकदा उकलले, जगातील हा भेदभाव उपजताच नाही हे एकदा समजले, ही करणी आमच्याचपैकी काही धूर्त, स्वार्थी लोकांची आहे व काही गोष्टी ओघाओघानेच झाल्या आहेत, अशी मनाला खात्री पटली, म्हणजे मग शेतकरी, नशिबाला दोष देत किवा कपाळावर हात मारीत, निराश होऊन स्वस्थ बसणार नाही. ही माणसांची करणी असल्यास, ती बदलणे त्याच्या आटोक्यातली गोष्ट आहे. निश्चय केला व सर्वांनी मिळून हे पारडे बदलावयाचे ठरवले तर ते बदलण्यास फारसा वेळही लागणार नाही.

आता हे कोडे उकलण्याच्या मार्गास आपण लागू या. माणसाची वसाहत कसकशी झाली, त्याचा फायदा कसकसा पडला ते पाहू या.

**पहिली वसाहत** :खेडी, गावे व शहरे ही वसण्यापूर्वी माणसे इकडे तिकडे भटकत असत. हे भटकणे टाकून कुठे तरी रहावेसे वाटल्यास माणूस चांगली जागा साहजिकच निवडणार! जवळपास पाणी मुबलक आहे, छायेला झाडी आहे, जमीन पिकाला चांगली, काळीभोर आहे, हे पाहून तो आपली झोपडी तेथे बांधणार. प्रत्येक देशातल्या वसाहती प्रथम याच धोरणाला धरून झालेल्या असतात. खडकाळ, नापीक प्रदेशात कोणी राहणार नाही. आर्यन् असोत, द्रवीडियन् असोत, मोंगोलियन असोत, त्यांनी त्या त्या देशात प्रथम प्रथम तरी वरील तत्त्वाला धरूनच वसाहत केलेली असणार. याला इतिहासाकडेही जाण्याचे कारण नाही. कारण या गोष्टी सर्वसाधारण मनुष्यस्वभावाला धरून आहेत. या वस्तीनंतर पुढेच इतिहासाला सुरुवात होत असते.

देशात प्रथम जे लोक आले त्यांनी साहजिकच चांगल्या जागा निवडल्या. जेथे सुपीक प्रदेश असेल तेथे तेथे लोक टोळ्या करून राहू लागले. मागाहून आलेले, झालेली वसाहत पाहून त्या शेजारीच राहू लागले. एकमेकांना मदत व्हावी, एकीच्या बळावर एकमेकांचे रक्षण करावे, दळणवळण सोपे व्हावे, धान्याच्या 'देवाणघेवाणीस' त्रास पडू नये, वेळ वाचावा, व्यवहार सोयीचा व्हावा, अशा अनेक कारणामुळे थोडी वाईट जमीन पत्करूनही लोक जवळच राहू लागले.

एका हाकेच्या टापूतसुद्धा अगदी एका कसाची सारखी जमीन लागतेच असे नाही. प्रथम आलेल्यांना उत्तम कसाच्या जमिनी मिळाल्या. मागाहून येणारे त्याच्या शेजारी राहिले.त्याच्या पदरी कमकसाच्या जमिनी पडल्या. इतर सोयीकडे पाहिले तर हा तोटा सहन करावा लागला.

उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा जमिनीत, त्या जमिनीच्या कसाप्रमाणे पीक निघत असते. सर्वच लोक कष्ट करणारे, सारखेच राबणारे, पण जमिनीच्या कसामुळे त्यांच्या उत्पन्नात फरक पडू लागला. प्रथम वसाहत करणाऱ्याला उत्तम जमीन मिळाल्यामुळे, इतरांच्या इतक्याच लांबीरुंदीच्या त्यांच्या जमिनीत, अधिक धान्य निघू लागले.

**श्रम न करणारा कोणी नव्हता.** :कष्ट सर्वांचे सारखे. डाग सर्वांचे सारखे-(कारण कष्टापुरती जमीन तो ताब्यात ठेवणार, कष्ट झेपणार नाही इतकी जमीन त्याला पिकविणे, त्याची मशागत करणे शक्य नव्हते.) पण त्याच्या उत्पन्नात फरक पडू लागला. पहिल्या उत्तम जमिनीच्या मालकास पीक जास्त निघू लागले. श्रीमंत गरीब या भेदाला इथे सुरुवात झाली. पण कष्ट मात्र अद्याप कुणाचे चुकले नव्हते.

नदीकाठची जमीन, त्यावरील काळी, तांबडी व माळ जमीन. या जमिनीच्या कसात पडणारा फरक, तो त्या जमिनीच्या मालकातही हळूहळू पडू लागला. प्रथम वसाहत केलेल्या म्हणजे उत्तम जमिनीच्या मालकाचा दर्जा समाजात वाढू लागला. त्याचे उत्पन्न सर्वांहून अधिक निघत असल्यामुळे तो अधिक धान्यवान म्हणजे धनवान बनला. उपजीविकेच्या वस्तूंनाच त्यावेळी धन समजले जाई. पैसा हा पदार्थ मागाहून आला, कमकस जमिनीच्या मालकाचे उत्पन्न कितीही कष्ट केले तरी उत्तम जमिनीच्या मालकाइतके निघणे शक्य नव्हते. एकाच लांबीरुंदीच्या जमिनीच्या उत्पन्नात असा फरक पडू

लागल्यामुळे, त्यांच्या घरच्या स्थितीतही फरक पडू लागला. **संपत्तीच्या कमी-अधिक मानाप्रमाणे समाजातही कमी-अधिक मान मिळत असतो.** संपत्ती हा समाजाचा मुख्य कणा आहे. हा वाकडा झाला, चढउतर झाला की समाज़ात चढउतार होत असतो. जोपर्यंत सर्व कष्ट करीत होते तोपर्यंत हा भेद समाजास इतका भोवला नाही. या वेळेपर्यंत कष्ट न करता कुणाला जगता येईल ही कल्पनाही कुणाच्या डोक्यात आलेली नव्हती. या कलीचा म्हणजे भांडवलासुराचा जन्म अद्याप व्हावयाचा होता. बिनकष्टाच्या मालकीची मंथरा, अद्याप बुरख्यातच दडून होती ! अद्याप ही भूमातेची निर्दोष मुले एकमेकांबरोबर बंधुभावाने खेळत होती.

संपत्तीच्या वाढीबरोबर कलीच्या खेळास सुरुवात झाली. तो यापुढे आपले फासे हळूहळू टाकू लागला. त्याचा खेळ यापुढे सुरू होणारच आहे!

**भांडवलासुराचा जन्म** :भांडवलासुराच्या जन्माकडे व त्याच्या खेळाकडे आपण आता पाहणार आहोत. मालकीची मंथरा ही त्याची आई. या आपल्या लाडक्या बाळाचे ती पोषण करीत आहे. हे मूल वाढले त्या मानाने जगाला भेसूर स्वरूप येणार आहे. स्वार्थाच्या घरी हे झपाट्याने वाढेल. आज या लोभी भांडवलासुराने जगभर नाच घालण्यास सुरुवात केली आहे. ज्या देशात संपत्तीची वाढ जास्त, त्या देशात कलह जास्त. एकमेकातील प्रमात विष घालून आज जगभर याने भाऊबंदकीस ऊत आणला आहे. जमिनीचे उत्पन्न एकापेक्षा दुसऱ्याचे वाढू लागताच, हे स्वार्थी बाळ आपले विषमतेचे घुंगूर वाजवू लागले.

**खादाड अजगर** :सारख्या लांबीरुंदीच्या, म्हणजे एकाच क्षेत्रफळाच्या जमिनीचे उत्पन्न, त्या जमिनीच्या कसामुळे, कसे कमीअधिक निघते हे वाचकांना माहीत आहेच. या पडलेल्या फरकामध्ये कलीचा शिरकाव झाला. तो आपले स्वार्थाचे फासे हळूहळू टाकू लागला. या मधल्या वाढत चाललेल्या प्राप्तीवर रुपेरी अजगर फुगत चालला. ज्या मानाने संपत्तीचा ढीग वाढेल, त्यामानाने याची स्तुती वाढते. पोटाची ददात नसल्यामुळे पोटासाठी हालचाल करण्याचे कारण उरत नाही. गरीब, शेतकरी व मजुराची सावजे या सावकारी अजगराच्या तोंडी आपणहून जाऊन पडतात. याच्या पोटात जगातले कष्ट करून जगणारे जीव सारखे पडत आहेत. पण या भांडवलासुराची भूक शांत होत नाही. ती सारखी वाढतच आहे. मात्र पोटात पडलेल्या सावजाच्या तडफडण्याने याला आता धक्के बसू लागले आहेत. ही दरिद्री सावजाची संख्या वाढेल त्या

मानाने याचा जीव आटोपता येणार आहे. एकजुटीच्या बळावर हीच दरिद्री सावजे याचे पोट फाडून बाहेर आल्याशिवाय रहाणार नाहीत. या भविष्यापूर्वी आपण त्याची वाढ पाहू.

**बिनकष्टाचा पैसा :** मळीकाठच्या उत्तम सुपीक जमिनीचे उत्पन्न सर्वांपेक्षा जास्त आल्यानंतर या मालकाचे अंगी सुस्ती चढू लागली. वर्षामागे त्याची शिल्लक इतकी पडू लागली की, थोड्या वर्षात साठलेल्या शिलकीतून त्याला जन्मभर पुरण्याइतकी सोय झाली, दुसऱ्यास दोनदोन वर्षात जे उत्पन्न येणार नाही, ते त्याला एका वर्षात येऊ लागले. आणि माळ जमिनीच्या तर कितीतरी पटीने वाढले. दहा पंधरा वर्षाच्या कष्टात जन्मभर पुरेल इतकी संपत्ती साठल्यानतंर पहिल्यासारखेच दिवसभर काबाडकष्ट करावेसे त्याला का वाटेल? वयोमानामुळे पूर्वीची उमेद उरलेली नसते आणि धनधान्याचा साठा शिलकीस भरपूर राहिल्यामुळे उरफोडी श्रम करण्याची जरूरी नसते. अशा वेळी कमी उत्पन्न मिळणाऱ्या जमिनीच्या मालकाने, "आपण ती जमीन करतो व दरसाल ठराविक बैठे उत्पन्न देतो, फक्त कष्टास तुमची जमीन द्या," असे बोलणे लावले, तर तो मालक आपली जमीन आनंदाने का लावणार नाही? मालकी राहिली, काम न करता अगदी म्हातारपणापर्यंत मिळणारा हक्काचा खात्रीचा पैसा झाला. अशा प्रकारे उत्तम कसाच्या जमिनी, कमकसाच्या जमिनीच्या मालकास, वर्षास ठराविक पैसा देण्याच्या कराराने कष्टास मिळू लागल्या. या सालोसाल मिळणाऱ्या ठराविक रकमेलाच आपण खंड म्हणतो.

**उत्पन्नातील अंतर :** उत्तम कसाच्या जमिनीच्या मालकाचे उपन्न आपण पाचशे रुपये धरू. मागाहून वसाहत करण्यास आलेल्याला, तितकी चांगली जमीन मिळाली नाही. या मागाहून आलेल्याचे जमिनीचे उत्पन्न अडीचशे धरू. या दोन जमिनीच्या उत्पन्नात (२५०) अडीचशेचे अंतर पडले. हे अंतर कष्टात फरक झाला म्हणून नव्हे. दोन्ही जमिनीवर दोन्ही जमिनीचे मालक सारखेच राबले आहेत. तेव्हा अडीचशे रुपये हा पडलेला फरक हा कष्टाचा किवा विशेष कसबाचा नसून कसाचा होय. आता मागाहून आलेल्याने म्हणजे मध्यम जमिनीच्या मालकाने पहिल्या मालकाची जमीन कष्टाला घेतली. तो डाग जवळच असल्याने कष्टालाही बरे पडले. आपल्या स्वत:च्या जमिनीइतके उत्पन्न निघाले. घरच्या पोराबाळांना जवळच कष्टाला दुसरी जमीन मिळाली. उत्तम जमीन कष्टाला आल्यामुळे आपल्या मध्यम कसाच्या

जमिनीइतके उत्पन्न निघून वर २५० शिल्लक उरेल. हे पहिल्या मालकास दिल्यास आपले नुकसान झाले असे त्याला वाटणार नाही. अशा प्रकारे उत्तम जमिनीचा मालक काही वर्षांनी आपल्या जमिनी दुसऱ्यास लावून खंडावर जगू लागला. हा खंड त्याला काही श्रम न करता मिळू लागला.

**आळसाला सुरुवात :** बिनकष्टाळू वर्ग निमार्ण होण्याला येथपासून सुरुवात झाली. हा दुसऱ्याच्या श्रमावर जगणारा, खंडाच्या पैशावर जगणारा जमीनदार वर्ग आळशी, अरेरावी आणि उठाठेवी होऊ लागला. ज्यावेळी लोकांनी वसाहत केली त्यावेळी आपल्यापैकी कुणाला, कष्ट न करता जगता येईल, आपल्यापैकीच एकाला राबवून, त्याच्या जिवावर जगण्याची कुणी इच्छा करील, ही कल्पनाही कुणाच्या डोक्यात आली नव्हती. पण आता वरच्याचे उदाहरण गिरवून खालचाही त्यासारखे वागू लागला. हा परिपाठ सुरू झाला. वरच्या उतरंडीतील घाण खाली वहात आली. काम न करणारा हा मोठा माणूस असे समजून त्याचा दर्जा समाजात वाढू लागला. हे विष समाजाच्या वृत्तीत कालवले गेले. मान्यतेची कल्पना बदलू लागली. सांपत्तिक समता बदलताच समतावृत्तीतही बदल पडला. माणसा-माणसात उच्चनीच भेद पडू लागला. देहाच्या एकाच बाजूला रक्ताचा पुरवठा जास्त होऊ लागला तर तो भाग विशेष ताकतदार होतो. दुसरी बाजू लुळी पडते. त्याला लकवा (अर्धांग) होतो. ती बाजू अशक्त, रोगी होते. समाजदेहाच्या एका बाजूलाच पैसाचा पुरवठा जास्त झाल्याबरोबर दुसरी बाजू कमकुवत झाली! तिच्यात त्राण उरले नाही. श्रीमंती-गरिबीबरोबरच मालक व गुलाम, स्वामी व सेवक असे भेद पडले!

**जमिनीत पाय न टाकता पैसा! :** जमिनीची मालकी शाबूत आहे. तिचा हक्क काही हिरावून घेतला जात नाही. इच्छा झाली की आपली जमीन पुन: आपल्या ताब्यात घेता येते. तेव्हा जमिनीकडे न जाता, कष्ट न करता, दुसरा पिकवतो, कष्ट करतो आणि पैसा आणून पोहोचता करतो. हे पाहून, पहिल्या मालकाची जमीन खंडाने पत्करलेल्यानेही, काही थोडा पैसा साठल्यानतंर तोच क्रम सुरू केला. त्याच्यापेक्षा वाईट जमीन असलेला मालक ती जमीन पत्करून वरच्यास खंड देऊ लागला. म्हणजे या तिसऱ्या कुळावर वरचे दोन मालक स्वस्थ बसून जगू लागले. त्याच्या स्थितीत कसकसा फरक पडू लागला ते आकड्यांनी समजणे अधिक सोपे जाईल.

**जमिनीतला फरक खंडात! :** अगदी पहिला मालक व जवळच्या

जमिनीचा दुसरा मालक अगदी बरोबर कष्ट करीत होते त्यावेळी जमिनीच्या चांगले-वाईटपणामुळे पहिल्याचे उत्पन्न ५०० व दुसऱ्याचे २५० निघे, काही वर्षानतंर दुसऱ्या मालकाने दोघांच्या उत्पन्नात पडलेले अंतर २५० रुपये देऊन ती जमीन खंडाने पत्करली. पुढे त्याच्या शेजारच्या कनिष्ठ जमिनीच्या मालकाचे उत्पन्न १५० रु. निघे, म्हणजे दुसऱ्या व तिसऱ्या मालकाच्या जमिनीच्या उत्पन्नांत २५०-१५० म्हणजे १०० रुपये तफावत पडली. ही तफावत आपण घेऊन हा दुसरा मालक तिसऱ्याच्या जिवावर चरू लागला. प्रथम पहिल्या मालकाने दुसऱ्यावर जमीन टाकली, दुसऱ्याने तिसऱ्यास कष्टास दिली म्हणजे या तिसऱ्याने वरच्या दोघास खंड देऊन पोसले. कष्टाला जमीन उत्तम, पण पदरात प्राप्ती कनिष्ठ जमिनीइतकीच. कारण दोघांच्या खंडाचा जबर बोजा याचे माथी पडलेला!

**शेवटच्या कुळावर सर्वांचा बोजा :** पहिल्या व दुसऱ्या मालकात झालेला खंडाचा करार २५० रु. खालच्या म्हणजे तिसऱ्या कुळानेच द्यायचा, व दुसऱ्या कुळात व आपल्या जमिनीच्या उत्पन्नात पडलेले अंतर (२५०-१५० = १००) शंभर हेही त्यानेच भरायचे. २५०+१०० म्हणजे ३५० खंड भरल्यानंतर त्या जमिनीतून मिळणाऱ्या ५०० रुपये उत्पन्नापैकी (५००-३५० = १५०) त्याचे हाती फक्त १५० रुपये पडले. हे उत्पन्न त्याच्या मालकीच्या कनिष्ठ जमिनीइतकेच आहे. वरचा सर्व फायदा वरच्या दोघांत वाटून गेला. दोघे आळशी बनले. कष्ट करणाऱ्याने उत्तम जमिनीतून उत्पन्न ५०० रुपये काढले तरी त्याच्या पदरात मात्र पडले दीडशेच! दीडशेवरील सर्व रक्कम बसून खाणाऱ्याच्या पदरी टाकावी लागली.

बरे, कनिष्ठ जमिनीच्या मालकाच्या पदरी पडलेल्या या १५० रुपये उत्पन्नात शिल्लक म्हणावी तर काही उरलेली नसते. त्याची व त्याच्याबरोबर राबणाऱ्यांची बारा महिन्याची मजुरी, घरच्या बायकोचे मुलाबाळांचे म्हाताऱ्याकोताऱ्यांचे पोट, जमिनीचे खतमूत, बैलनाडा, मोट, बी-बियाणे याचा खर्च, इतका जाऊन शिल्लक काय उरणार?

बरे, कष्टाला जमीन पत्करताना एकावर एक उड्या. ज्याची जमीन सर्वात वाईट तो सर्वाहून अधिक खंडाला पत्करणार. कारण रानमाळापेक्षा जेवढे उत्पन्न अधिक निघेल तो त्याला फायदाच वाटणार, त्याच्या पोराबाळांना तेवढाच आधार. अगदी कनिष्ठातली कनिष्ठ जमीन असेपर्यंत व पोटाची गरज

कशीबशी भागेपर्यंत ही खंडाची रक्कम वाढत जाते व पुढेपुढे पोटावारी मजुरीच तेवढी कष्ट करणाऱ्याच्या पदरात उरते. या अखेरच्या निव्वळ पोटाचा मजूर बनलेल्या कुळास, वरच्या सर्व कुळांना पोसावे लागते. वरच्या दोन मालकाचे श्रम त्याला एकट्याला करावे लागून व त्यांना घरबसल्या पोसून ते संतुष्ट झाले असते तरी चालले असते. पण एवढ्याने भागत नाही. कष्ट करणाऱ्याजवळ जगून जेवढी शिल्लक उरेल ती सर्व यांना पोचती करावी लागते. ज्या मानाने कमकस जमिनीचे मालक जास्त त्या मानाने खंडावर जगणाऱ्यांची संख्या जास्त. **दिवसेंदिवस अशी कष्ट करणाऱ्यांची स्थिती बिकट होत चालली आहे, श्रम वाढू लागले आहेत. मिळकत कमीकमी होत आहे.**

**हाच तो देशाचा खरा धनी! :** भर मध्यान्ही, उन्हाच्या तावात भाजून निघालेल्या श्रमामुळे घामाने थबथबलेला, अंगभर मातीने माखलेला, भूमीचा खरा मालक तो हाच. पावसाच्या मुसळधारेत न्हाऊन, कंबरेकंबरेपर्यंत गाळात बुडलेला देशाचा खरा धनी तो हाच! आपल्या कष्टाने दुनियेला पोसणारा दयाळू देव तो हाच!

राजे महाराजांचे ऐश्वर्य, त्यांचा इतमाम, बडेजाव, त्यांचा वाजवी-गैरवाजवी, सरकारी आणि खासगी खर्च चालवणारा दयाळू दाता तो हाच! प्याद्यापासून फर्जीपर्यंत, शिपायापासून सम्राटापर्यंत, दिवाणापासून दिवाणजीपर्यंत, सर्वांचा, सावकारांचा, इनामदारांचा, व्यापाऱ्यांचा, नोकरांचा पोशिंदा तो हाच ! कवीच्या विश्वव्यापी भराऱ्या ज्याचे आधाराखेरीज धाव मारत नाहीत, शास्त्रज्ञांचे संशोधन ज्याच्या श्रमाशिवाय चालत नाही, ग्रंथकाराची लेखणी फार काळ टिकू शकत नाही, असा सर्वसमर्थ सत्ताधारी प्रभु तो हाच!

ज्याने राजेमहाराजांना, मदांध सम्राटांना दाती तृण धरून पायाशी लोळवले, उन्मत्त राजांची ज्याने परलोकी रवानगी केली, सुखलोलुप लुईला ज्याने पदच्युत केले, जगाला घाबरवणाऱ्या कैसरला ज्याने देश सोडावा लावला, स्पेनच्या आलफान्सोची ज्याने क्षणात उचलबांगडी केली, असा महाबलवान माणूस तो हाच ! ज्याच्या नजरफेकीने सिंहासने हादरली, ज्याचे धमकीने बेताल राजसत्ता ताळ्यावर आली, असा पृथ्विराज तो हाच! पण!

**आपल्याच गुलामांचा गुलाम :** हाच आज अन्नाला मोताद, वस्त्राविना उघडा, आसऱ्याविना दरवेशी, दिडकीसाठी दारोदार हिंडत आहे. याच्याच अन्नावर जगणारे यालाच आज बुटाच्या ठोकरांनी उडवीत आहेत !

हा दीन लाचार आपल्याच गुलामाचा गुलाम, आपल्याच आश्रिताचा ताबेदार झाला आहे. दानवांनी देवावर मात केली आहे!!!

**वर्षभर मरमरूनही आज त्याला खंडाची भरपाई करता येत नाही. व्याज फेडता येत नाही. फाळा सुटत नाही.** सरकारी फाळा, सावकारी व्याज व सरदारी खंड, या त्रिखंड बोजाखाली त्याची कंबर मोडली आहे. शेतकरी म्हणजे निव्वळ शेतावर जगणारा मजूर. त्या मालकाचा गुलाम बनला आहे. त्याच्या मालकीत आज रानमाळही उरलेला नाही. देशाच्या सर्व जमिनी सावकार व जमीनदार यांनी आखून टाकलेल्या! शेतकऱ्याला त्यात पाय टाकायची मनाई!

अगदी कसेतरी जगता येऊन वर राहणारे सर्व उत्पन्न खंडाच्या रूपाने जमीनदाराकडे जात असल्यामुळे पिकाची स्थिती जरा बदलली. एखाद्या वर्षी पाऊस चांगला पडला नाही की, खंड भरण्याचे त्राण उरत नाही. कारण इतर गरजूंच्या चढाओढीमुळे यात थोडीही तफावत राहिलेली नसते. पण कष्ट करून सुखाने दोन घास निर्धास्तपणे त्याचे तोंडात पडत नाहीत, एखादे नक्षत्र चुकले की त्याचे तोंडचे पाणी पळते. बिचारा हवालदिल होऊन बसतो.

**लग्नगाठ व सावकाराची गाठ :** एक वर्ष दुष्काळाचे आले की खंड चुकला. खंडाची गाठ चालायची ती सावकाराची गाठ घेतल्याखेरीज अशक्य! सावकाराची गाठ पडली की, ती लग्नगाठीपेक्षा घट्ट बसते! लग्नाची गाठ सोड चिठ्ठीने तोडता येते. पण सावकाराच्या चिठ्ठीपासून कधी सोडवणूक झालेली नाही. लग्नाची गाठ एकाच जन्माची असते, पण सावकारांची गाठ पिढ्यान्पिढ्याही सुटत नाही, अशी ती इमानी! सुतळीचा तोडा शिल्लक असेपर्यंत सावकराचा समंध सुटत नाही.

गावात एखाद्या शेतकऱ्याची जमीन चांगली असल्यास सावकाराचे पैसे त्याच्या मदतीसाठी सारखे धाव घेत असतात! उपकाराची(?) संधीच तो पहात असतो! लग्नाचा प्रसंग आला तर शेतकऱ्याच्या वाडवडिलांच्या योग्यतेची आठवण देऊन, साजेसा खर्च करण्याकरिता सावकार स्वत: व चार मंडळी जमा करून भीड घालणार. आपण पुढे होऊन सर्व खर्च करण्याला तयार होणार. शेतकऱ्याची ही कळकळ अखेर त्याच्या घराण्यास पुरीपुरी भोवते!

खंडाची भरपाई झाली नाही की, सावकाराखेरीज दाता दुसरा कोण? नाही तरी खंड चुकला की, जमीनदार त्याच्या जमिनीचा ताबा घेणारच! पुढच्या वर्षी कदाचित चांगले पीक येईल या आशेने तो सावकाराची मदत घेतो.

**अक्षरशत्रूला सर्वच शत्रू :** शेतकरी बिचारा अडाणी. अक्षराची माहिती नाही. आकड्याची ओळख नाही. पहिला शंभराचा दस्त करतानाच पुढे वाटोळी टिंबे किती पडली त्याची त्याला कुठली दखलगिरी ! त्यापुढे पडलेल्या वाटोळ्या टिंबात त्याचे वाटोळे होत असते याची त्याला जाणीव नसते. आंगठा उठवून पैसे मिळाले की झाले ! रक्त न काढता जीव घेण्याची कोण भयंकर ताकद त्या लेखणीच्या पात्यात असते त्याचा अनुभव त्याला एक दोन सालातच येतो. 'शंभराचे शिडीबारा व्याजाने वर्षाच्या सोळा महिन्याचे साडेएकोणतीस आणि तेच चक्रवाढव्याजाने दोन सालचे पाचशे पस्तीस ! त्यात पस्तीस तुला बघून सूट देतो.' अशा हिशेबाची दामदुप्पट तीनचार वर्षातच होते. शेतकरी अक्षरशत्रू असल्यामुळे स्वत:चाच कसा शत्रू होतो पहा ! या शेतकऱ्याच्या अज्ञानावरच सुशिक्षितांची सुखं वाढतात. याच्या अज्ञानावरच ज्ञानी समजलेला वर्ग चरतो. याच्या समाधान वृत्तीमुळे अन्यायाचा उलट जाब तो देत नाही.

**देव बाप्पाचा डोक्यात घातल्यामुळे शेतकरी नशीबावर हवाला टाकून पुढच्या जन्माच्या आशेवर या जन्मी हाल भोगीत असतो.**

**पैशाचा फास व दारूचा ध्यास :** गडकऱ्यांचा 'एकच प्याला' त्या माणसाला प्यालात बुडवून ठार करतो, पण सावकाराच्या रुपेरी जाळ्यातून खेडचा एखादा तरी शेतकरी सुटला असेल की नाही याची शंकाच आहे. कित्येक खेडीच्या खेडी सर्वस्वी सावकाराच्या मालकीत गेलेली लेखकाला आढळून आली आहेत. तर कित्येक खेडी इनामदाराच्या ताब्यात पूर्वापार चालत आली आहेत. तेथील रहिवाशांना कष्टाला टीचभरही मालकीची जमीन उरलेली नाही.

कोणत्या का निमित्ताने असेना, एकदा का दारूचा घोट घशाखाली गेला की, तो त्याच्या नरडीचा घोट घेतल्याखेरीज रहात नाही.

तसाच सावकाराचा पैसा, हात उसणवार म्हणून जरी घेतला तरी तो शेतकऱ्याचा हात मोडल्याखेरीज रहात नाही. लग्नाच्या मंगलकार्यासाठी काढलेला पैसा त्या आनंदी जोडप्याचे जन्माचे अमंगळ केल्याखेरीज रहात नाही. साध्या सल्ल्यासाठी म्हणून सावकाराच्या घरी पाय टाकला की त्याचा 'सल्ला' झालाच म्हणून समजावे. मधुमेही आजाऱ्याला अगदी जुजबी जखम जिवाला घातक होते. सावकाराच्या रूपेरी सुरीचा ओरखडासुद्धा त्याचा व त्याच्या पोराबाळांचा जीव घेतो. ही जखम सारखी चिघळत जाते. बापाला झालेली जखम नातवालाही भोवते हे त्यात विशेष आहे. त्या कुळाचा साफ निकाल लागला की बमगच त्याची सुटका ! देशाच्या धन्याची कोण ही दाणादाण ! *(बेकारी व तीवर उपाय)*

## ९) सत्यशोधक छत्रपती शाहू महाराज

सत्यशोधक शाहू महाराज हे विशेषण त्यांना लावल्यामुळे ते सत्यशोधक समाज संस्थेचे मेंबर होते असा कदाचित ग्रह होण्याचा संभव आहे, पण वरील विशेषण त्या दृष्टीने वापरले नाही. व्यापक दृष्ट्या ते विशेषण लावले आहे.

त्यांचा या संस्थेला आश्रय होता, त्यांच्याच कृपेमुळे हा उत्सव करण्याची ताकद आम्हांमध्ये आली म्हणून कृतज्ञतेदाखल आणि आदर्शभूत राजा म्हणून त्यांचे त्रोटक चरित्र देत आहे.

सत्यसमाजाचा अंतिम हेतू धार्मिक व सामाजिक बाबतीत समता आणि स्वातंत्र्य स्थापन करणे हा होय. जनतेला ते मिळवून देण्याचा प्रयत्न त्यांनी आपल्या आयुष्यात कसकसा केला ते पाहिले म्हणजे ते कोणत्या दर्जाचे सत्यशोधक होते हे आपल्याला समजून येईल.

'खाना पीना मजा मारना' हे त्यांच्या आयुष्याचे ध्येय नव्हते. ते लढवय्ये होते. असत्याशी त्यांचा झगडा चालू होता.

केवळ महाराज या दृष्टीने आपण त्यांच्याकडे आता पहात नाही !

राजे म्हणून नव्हे, छत्रपती म्हणून नव्हे, संस्थानचे अनियंत्रित सत्ताधारी म्हणून नव्हे, शाहू महाराज हे आपल्या गुणांनी चिरंजीव झालेल्यांपैकी होत म्हणून.

**लोकप्रियता** : शाहू महाराज एवढे लोकप्रिय का झाले ? क्षत्रिय शिसोदिया कुलांत यांचा जन्म झाला म्हणून नव्हे. बापाच्या पोटी मुलगा जन्मला ही काही मोठी कामगिरी नव्हे. मनुष्याचे मोठेपण या गोष्टीवर अवलंबून नसते.

छत्रपती शाहू महाराज पुढे आले ते त्यांच्या अचाट कर्तबगारीमुळे, ठरलेल्या ध्येयासाठी केलेल्या स्वार्थत्यागामुळे, सोसलेल्या त्रासामुळे. शाहू महाराज घराण्याने पुढे आले नसून, त्यांच्या कृतीने त्यांनी आपल्या घराण्याचा लौकिक वाढवला.

देशविघातक रूढीला तोडण्याकरिता जगातील महात्म्यांनी बंडाचे निशाण हाती धरले आहे. त्या सर्वांना लोकविरोध सहन करावा लागला आहे. ख्रिस्त, बुद्ध, पैगंबर, लूथर, साक्रेटिस वगैरेंनी तसेच दयानंद सरस्वती, आगरकर, यांनी हे बंडाचे निशाण हाती धरले होते.

सत्यशोधक समाजाचे संस्थापक महात्मा फुले व त्याच समताव्रताला पुन: जोमाने वाढवणारे शाहू महाराज यांनीही ते हाती घेतले.

आज भरणारी अखिल भारतीय परिषद ही पण कै. शाहू महाराजांच्या पुण्याईने भरत आहे. संस्थेचे अस्तित्त्व त्यांच्यामुळेच दिसत आहे. आज ब्राह्मणेतर जनतेमध्ये दिसत असलेली जागृती व राजकीय वातावरणात दिसून येणारे ब्राह्मणेतरांचे अस्तित्त्व याला पुष्कळसे कारण शाहू महाराज हे होत यात मुळीच शंका नाही.

त्यांनी आपली जागा ब्राह्मणेतरांच्या, समतावादी लोकांच्या हृदयामध्ये कोरून ठेवली आहे.

स्वराज्य म्हटल्याबरोबर जसे हिंदूंच्या मन:चक्षूसमोर शिवछत्रपती दिसू लागतात; अहिंसा म्हटल्याबरोबर जसे भगवान गौतमबुद्ध व महात्माजी उभे राहतात तसे सामाजिक समता म्हटल्याबरोबर शाहू महाराज प्रामुख्याने पुढे येतात. त्यांनी संतमहात्म्यांनी वर्णिलेली समतेची कवीकल्पना कृतीत आणण्याचा प्रयत्न केला. आपल्या राजसत्तेचा उपयोग धार्मिक समता प्रचारात आणण्याकडे केला.

धार्मिक गुलामगिरीत, स्वत:च्या माणुसकीस विसरलेल्या अंधश्रद्धाळू जनतेला त्यांच्या माणुसकीची ओळख करून देऊन त्यांनी त्याचा अभिमान जागा केला. या त्यांच्या कृत्याबद्दल बहुसंख्य जनतेच्या आठवणींतून ते कधीही नाहीसे होणार नाहीत.

ते महाराष्ट्राचेच नव्हे तर मागासलेल्या बहुसंख्य जनतेचे पुढारी म्हणून लोकादरास पात्र झाले. संस्थानचे अभिषिक्त व खालसातले अनभिषिक्त राजे म्हणून त्यांना सर्वत्र मान मिळू लागला.

मद्रासमधील 'जस्टिस' पत्र त्यांच्याबद्दल कशी प्रशंसा करते ते पाहिले म्हणजे परप्रांतातसुद्धा त्यांनी आपला पगडा कसा बसवला होता ते समजून येईल.

The personal hold which he had over the people was phenomenal and reminded one of the palmy days of the Maratha Emperors. He cast aside the little cob-webs which for centuries were wound round the Maratha chiettains by designing individuals and crafty sects and at once bounded into unprecedented popularity.

The latter day awakening of the warlike Marathas, their freedom from the snares of the Chitpavan priests and their ability to assert their manhood was due to his teachings and his personal example.

त्यांनी मराठा सरदारकीचे बडेजावीचे जाळे फेकून दिल्याने ते जनतेशी तादात्म्य झाले होते. ब्राह्मणेतर जनतेवर हजारो वर्षे लादली गेलेली गुलामगिरी त्यांनी काढून टाकली.

ब्राह्मणेतर जनतेला आपल्या हक्काची ओळख करून दिली!

महाराजांची लोकप्रियता वाढू लागली. तशी खालसा मुलुखांत त्यांना बोलावणी येऊ लागली. महाराजांचा उपदेश ऐकण्याकरिता खेड्याचे लोक धावीन येऊ लागले. त्यांचा शब्द झेलू लागले. महाराजांच्या कह्यांत एक एक प्रांत येऊ लागला. त्यांच्या धार्मिक व सामाजिक राज्यांची मर्यादा वाढू लागली.

महाराष्ट्रातील प्रत्येक ब्राह्मणेतर पत्रास त्यांनी सढळ हाताने मदत केली त्याचप्रमाणे सार्वजनिक कामे करणाऱ्या परंतु द्रव्याभावामुळे नडलेल्या अनेक ब्राह्मणेतरांना त्यांनी द्रव्य सहाय्य करून सार्वजनिक कामे करण्यास संधी दिली. किंबहुना महाराष्ट्रात झालेल्या ब्राह्मणेतर चळवळीच्या प्रत्येक अंगोपांगास महाराजाच्या मदतीचे पाणी मिळाले आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. १९१८ नोव्हेंबरात 'पीपल्स, युनियन' मार्फत भरलेल्या दोन प्रचंड जाहीर सभांचे ते अध्यक्ष होते. १९२० साली हुबळी येथे भरलेल्या ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेचेही ते अध्यक्ष होते.

एखादा मनुष्य विशेष लोकप्रिय होऊ लागला की त्याचवेळी त्याच्या उलट एखादा वर्ग निर्माण होतोच होतो आणि ज्या वर्गाच्या अन्यायाविरुद्ध हा पुढारी उठला असेल तो तर याचा शत्रू होतो.

आतापर्यंत ब्राह्मणेतरांचे सर्व धार्मिक विधी ब्राह्मण जातीतील पुरोहिताकडूनच होत. शाहू महाराजांनी ही वंशपरंपरे चालत आलेली मिरासदारी आपला मराठ्या जातीचा पुरोहितवर्ग निर्माण करून काढून टाकली. मराठा पुरोहिताकडून सर्व धार्मिक विधी होऊ लागले. यामुळे ब्राह्मण वर्गाचे आर्थिक नुकसान झाले. हक्कदारी नष्ट झाली व धर्म विधीला ब्राह्मणच पाहिजे हा हट्ट बहुसंख्य ब्राह्मणेतर जनतेतून पुष्कळच निघून गेला आहे, असे निर्धास्तपणे म्हणता येईल. ब्राह्मण न आणता मराठा पुरोहित आल्यास तो धर्मविधी शास्त्रशुद्ध होत नाही ही कल्पना तरी नाहीशी झाली.

या नव्या पुरोहितवर्गामुळे पूर्वीची परंपरा मोडली. समाज एक पायरी पुढे गेला. महाराजांनी एकदम क्रांती घडवून न आणता त्यांच्या अंधश्रद्धेला धरूनच हा एक तात्पुरता उपाय काढला. समाज सुधारणेची ही एक पद्धती आहे.

खरे म्हटले तर आपल्याला कोणीच दलाल नको आहेत आणि महाराजांनी हा एक वर्ग निर्माण केला म्हणून हे दलाल कायम ठेवावे ही त्यांची मनीषा होती अशी त्यांची पुढील वागणूक व क्रांतिकारक मते पाहिली म्हणजे मुळीच म्हणता येणार नाही.

ते कूपमंडुक वृत्तीचे जात्याभिमानी नव्हते. जातिभेद नष्ट व्हावा हीच त्यांची मते होती.

पण महाराजांनी आपले उत्पन्न बुडवल्यामुळे ब्राह्मण वर्ग त्यांच्यावर चरफडू लागला होता. त्यांच्याविषयी वाटेल त्या कंड्या उठवू लागला. शाहूमहाराजांना हा अनुभव आल्याखेरीज राहिला नाही. आतापर्यंत विशिष्ट हक्क भोगत आलेला व ब्राह्मणेतरांच्या अज्ञानावर चरणारा मिरासदार वर्ग महाराजांचा शत्रू झाला. त्यांच्याबद्दल त्यांनी गैरसमज पसरविला.

महात्मा फुल्यांवर या वर्गाने ख्रिश्चन व सरकारचे आश्रित हा आरोप केला. या गोष्टी व्हायच्याच; न होणे म्हणजे नवल! त्यांच्यावर काही तरी निमित्ताने फौजदारी केस करेपर्यंतसुद्धा मजल नेली. त्यांच्या विरुद्ध टीकेने पत्रांचे रकानेच्या रकाने भरू लागले.

महाराजांच्या लोकप्रियतेमुळे एकच वर्ग जळफळू लागला असे नाही. काही सरकारी अधिकाऱ्यांनासुद्धा त्यांची लोकप्रियता खपली नाही. त्यांच्या एका पत्रावरून ही गोष्ट स्पष्ट होते. आपल्या मित्रास पाठवलेल्या एका पत्रात महाराज म्हणतात-

'सरकार रागावेल असे तुम्ही म्हणता. रागावो बिचारे! गरजवंतांना मदत केल्याबद्दल, अस्पृश्यांना हात दिल्याबद्दल आणि मराठ्यांचा उद्धार करण्याकरता माझी शक्ती खर्च केल्याबद्दल परमेश्वराकडून मला खचित न्याय मिळेल. लार्ड XX यांनी तर काय पण खुद्द ब्रह्मदेवाने अथवा यमाने धमकी घातली आणि मी भ्यालो तर माझे पूर्वज माझ्याकडे पाहून हसतील. भित्र्या भागुबाईप्रमाणे मी माझी मते सोडणार नाही किंवा जीव बचावण्यासाठी शरण जाणार नाही."

यावरून महाराजांची निर्भीड वृत्ती, सत्याची चाड व लोकांसाठी स्वार्थत्यागाची तयारी दिसून येते.

**समतावृत्ती :** महाराजांची मागासलेल्या जनतेसाठी ही आत्मयज्ञाची तयारी त्यांची समतेची बुद्धी, प्रेमळ वागणूक व अस्पृश्यांची तळमळ कृतीतही

तशीच दिसून येते.

जनता ही आपल्या बरोबरीचीच आहे व ही जाणीव लोकांना करून द्यावी म्हणून ते आपल्या आचरणाने साध्या वागणुकीने लोकांना शिक्षण देत.

गाद्यागिरद्यांवर कलंडणारी ती सुखलालसी काया गार दगडाच्या उघड्या फरशीवर व निसर्गाच्या नील छताखाली निर्धास्त झोपी गेलेली पाहण्याचे प्रसंग हे नेहमीचे असत.

पंचपक्वान्नाची ताटे टाकून कुळवाड्याची चटणीभाकर मुद्दाम घेऊन पोटभर खाल्लेली सर्वांनी अनेकवेळा पाहिली आहे.

मोठमोठ्या अंमलदाराबरोबर व पुढाऱ्याबरोबर गहन विषयावर वाद करीत असताना त्याचवेळी महारमांग किंवा फासेपारध्याबरोबर त्याच्या घरच्या गोष्टी ते मोठया जिव्हाळाने बोलत असत.

मोटारीच्या मडगार्डवर मोठ्या सरदारांना उभे करून त्याचवेळी गावातील यःकश्चित मनुष्याचे अंगावर हात टाकून बरोबरीच्या नात्याने बोलत बसलेले महाराज करवीरस्थ जनतेच्या आठवणींतून जाणार नाहीत.

एक साधीच गोष्ट, पण त्यावरून महाराजांची समतावृत्ती दिसून येईल.

एका फासेपारध्याने महाराजांना ससा मारून दिला. ससा मुदपाकखान्यात गेला. फासेपारधी लांब तीनचार फर्लांगावरील चौकीत जाऊन बसला. जेवण्याचे वेळेस ताटात सश्याचे मांस येताच महाराजांना त्या पारध्याची एकदम आठवण झाली. आणि महाराजांनी 'अरे तो का जेवायला नाही ?' म्हणून पृच्छा केली. हुजऱ्या म्हणाला बोलवतो महाराज 'पण ताट खाश्यात करू, खर्च्यांत करू ?' महाराज रागावून म्हणाले, 'अरे त्याचेच अन्न मी खात आहे आणि खाश्यात आणि खर्च्यात म्हणून काय विचारतोस, माझ्या पंक्तीत माझ्या शेजारी त्याचे पान कर' अशा अनेक गोष्टी महाराजांच्या सांगता येतील.

दरबारातील नोकरीतसुद्धा त्यांनी पक्षपाताचे धोरण स्वीकारले नव्हते. पक्षपात झालाच तर तो गरीबांच्या बाजूचा असायचा. त्यांची अमकीच जात लाडकी होती असे नाही. पण हजारो वर्षे खाली चिरडलेल्यांना वर आणण्याचा प्रयत्न केल्यामुळे त्यांची वागणूक पक्षपाती दिसली असेल पण सत्य बाजू उचलून धरण्यासाठी त्या पक्षपाताची आवश्यकता असते. सत्य आणि असत्य या दोन्हीकडे सारख्या दृष्टीने पाहता येणे शक्य नाही. महाराजांच्या अधिकाऱ्यांत सर्व जातीचे लोक होते, ब्राह्मणसुद्धां मोठमोठ्या हुद्यावर होते ही गोष्ट त्यांची

नि:पक्षपातीपणा स्पष्ट दाखविते.

ब्राह्मणांवरही कटाक्ष होता तो तत्त्वासाठी. व्यक्तिद्वेष ब्राह्मणाबद्दल त्यांचा नव्हता. टिळक हे त्यांचे प्रतिस्पर्धी होते. पण त्यांच्याविषयी त्यांचा आदर कमी नव्हता. त्यांची योग्यता ते जाणून होते.

टिळक हे आजारी असताना त्यांनी मिरजेच्या आपल्या बंगल्यात येऊन रहावे अशी त्यांनी विनंती केली. टिळक वारल्याची बातमी ऐकताच प्रतिस्पर्धी म्हणून समजलेल्या महाराजांच्या डोळ्यात आसवे उभी राहिलेली तिथे त्यावेळी असलेल्या मंडळींनी पाहिली आहेत.

ब्राह्मणद्वेषाचा आरोप महाराजांच्यावर ब्राह्मण करीत असतात, पण तो कसा चुकीचा आहे हे त्यांच्याच उद्‌गारावरून कळून येईल.

"आपले धार्मिक व इतर बाबतीत अन्याय्य व माणुसकीला लाजवणारे वर्चस्व इतरांवर कायम रहावे अशाविषयी धडपडणाऱ्या ब्राह्मणाशी आपला विरोध आहे. विद्येत पुढे गेलेल्या ब्राह्मण जनतेशी नाही."

या विचाराला धरूनच त्यांची वागणूकही होती. न्यायाधीश, डि. मॅजिस्ट्रेट, मुन्सफ, खासगी कारभारी या मोठ्या व विश्वासातल्या जागा त्यांनी ब्राह्मणांना दिल्या होत्या. संस्थानातील व बाहेरील ब्राह्मणेतर वकिलांना हजारो रुपये मिळवून दिले होते.

**समाजसुधारणा :** महाराजांचा जात्याभिमान कोता नव्हता. जातिभेद नष्ट व्हावेत, हिंदूंची संघटना व्हावी, उच्च-नीच भेद नाहीसे व्हावेत असे ते प्रतिपादन करीत व आचरणही तसे ठेवीत.

"महाराजांनी केलेला **जातीजातीतील विवाहाचा कायदा** हा महाराजांच्या सुधारणोन्मुख कामातील एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. ब्राह्मणेतर चळवळीचे सामाजिक ध्येय जातिभेद मोडणे हेच होते. हे या कायद्याचे पुरस्करण करून महाराजांनी दाखविले."

या कायद्यातील मूलतत्त्वास अनुसरून प्रत्यक्ष विवाहाने जातिभेद नाहीसा करण्याचा महाराज प्रयत्न करीत होते. अशा दोन मोठ्या घराण्याचा संबंध १९२४ साली (कागल आणि इंदूर यांचा) मराठा धनगर विवाह संबंध, महाराजांच्याच प्रोत्साहनाने घडून आला.

तसचे १९२० साली ब्राह्मण मुलीचा मि. अरुंडेल यांच्याशी विवाह झाला, त्यावेळी महाराजांनी त्यांचे अभिनंदन केले. ते म्हणतात-

'पूर्व आणि पश्चिम यांच्यात विवाहसंबंध घडून यावेत हे अत्यंत इष्ट आहे. असल्या सुधारणेशिवाय त्यांना विभागणारी विस्तृत खांच भरून येणार नाही. मी जातिभेद मुळीच मानीत नाही.'

पुनर्विवाहालाही महाराजांनी उत्तेजन दिले व त्यासाठी १९१७ सालीच्या जुलै महिन्यात पुनर्विवाह नोंदणीचा कायदा पास केला. या कायद्याने पुनर्विवाहाची संस्था कायदेशीर ठरली.

महाराज मागासलेल्या वर्गाबद्दल कळकळ करीत होते तशीच दशास पोषण करणाऱ्या शेतकऱ्यांचीही त्यांना कळकळ होती व त्यांच्याबद्दल अभिमानही होता. ते या शेतकऱ्यांबद्दल म्हणतात-

'छत्रपतीची गादी तरी कोणी मिळवली? मावळे वगैरे घोंगडीवाल्या मराठ्या शेतकऱ्यांनीच ना? शेतकरी म्हणवून घेण्याचा मला अभिमान वाटतो. राजे होण्यापूर्वी माझे वाडवडील शेतकरीच होते. त्यांच्याविषयीचे प्रेम माझ्या धमन्यातून खेळत आहे.'

याच प्रेमामुळे महाराजांच्या सेवेची मर्यादा संस्थानाबाहेर पसरू लागली होती.

सत्यशोधक चळवळीला जे स्वरूप आले ते महाराजांच्याच सहानुभूतीने, ब्राह्मणेतर पार्टी अस्तित्त्वात आली तीही महाराजांमुळे.

अखेर अखेरची त्यांची संन्यस्तवृत्ती व भगवे वस्त्र परिधान ही त्यांची आतील मनोवृत्ती दाखवते. तसे त्यांनी एका ठिकाणी उद्गारही काढले आहेत. '×× संस्थानच्या कामातून आता मला सोडवा आणि राहिलेली आयुष्याची थोडी वर्षे लोकांची सेवा करण्यात मला घालवू द्या'

महाराजांचे हे उद्गार लोकसेवेची तळमळ दाखवत नाही काय? फार काय कैद-भोगण्याचीही त्यांची तयारी त्यांच्या उद्गारावरून दिसून येते.

शाहू महाराज राजे नसते तरीसुद्धा लोकपुढारी म्हणून हिंदुस्थानभर चमकले असते यात काय संशय आहे!

**अस्पृश्योद्धार :** अस्पृश्योद्धार ही आज अत्यंत जिव्हाळ्याची गोष्ट होऊन बसली आहे. पण हिचे महत्त्व त्याचवेळी महाराजांना पटले होते. व त्याप्रमाणे त्यांनी आचरणात आणले? यावरून त्यांच्या दूरदृष्टीची कल्पना येईल. त्यांनी मानाच्या अंबारीवर महाराची नेमणूक केली. आपल्या पंक्तीत अस्पृश्याला घेतले. भर सभेत अस्पृश्याबरोबर सहभोजन व सहपान केले.

खेडेगावातील महत्त्वाच्या म्हणजे तलाठ्याच्या जागा अस्पृशांना दिल्या. त्यांचा दर्जा वाढवला. सार्वजनिक जागी, सरकारी शाळा पाणोथे विहिरीवरची अस्पृश्याची आडकाठी कायद्याने दूर केली. गुन्हेगार जात म्हणून सर्व जातीवर केलेला आरोप काढून टाकण्याकरिता त्यांची हजेरी बंद केली.

स्वतः अस्पृश्यांना बरोबर घेऊन हिंडू लागले. अस्पृश्याबद्दल महाराज म्हणतात -

'या वर्गाला जखडून टाकणाऱ्या भयंकर जुलुमाच्या श्रृंखला एकदम तोडून टाकणे हीच खरी राष्ट्रसेवा आहे; अशी माझी खात्री झाली आहे. खालच्या जातीने कितीही प्रयत्न केला तरी हे काम त्यांच्या हातून व्हायचे नाही. प्राचीन काळापासून वंशपरंपरेने उपभोगीत असलेले हक्क वरिष्ठ जातींनीच सोडले पाहिजेत. असल्या पवित्र आत्मयज्ञानेच त्यांचे उदाहरण उपयोगी होईल.

या उद्धाराप्रमाणे महाराजांच्या हातून प्रत्यक्ष कृती झाली आहे. ते अस्पृश्यांना अनुलक्षून म्हणतात, 'माझ्याकडून सेवा करून घेण्यास तुम्ही कां कूं करू नका. माझ्यावर एखाद्या सत्ताधारी वर्गाने दडपण आणले तर आपल्या सेवेकरता संस्थानची सूत्रे माझ्या युवराजांच्या हाती देऊन मोकळा होण्यास मी तयार आहे.'

महाराजांनी अस्पृश्यता घालविण्याबद्दल स्पष्ट शब्दात वटहुकूम प्रसिद्ध केले आहेत.

**स्वराज्य :** महाराजांच्यावर स्वराज्यद्रोही असा सुद्धा आरोप करायला त्यांच्या विरुद्ध पक्षांनी कमी केले नाही. पण त्यांनी महाराजांची वाक्ये मनन करावीत म्हणजे आजच्या काळांतही ती किती मार्गदर्शक आहेत हे दिसून येईल.

महात्माजी-गांधीजींच्या तोंडातून तरी दुसरे कसले उद्‌गार बाहेर पडणार ! महाराज स्वराज्याबद्दल म्हणतात -

"आम्हाला स्वराज्य मिळावे अशी खरोखरीच आमची इच्छा आहे. याच्या योगे आम्हाला जीवन रक्त मिळेल. परंतु याबरोबरच माझा ठाम सिद्धांत म्हणून हे सांगावेसे वाटते की हल्लीची जातिभेदाची श्रृंखला तोडल्यावाचून आपले चालावायचे नाही. ज्यांना राजकारणात भाग घ्यावयाचा असेल त्यांनी इतर देशाप्रमाणे याही देशात प्रत्येक मनुष्याला मनुष्यतत्त्वाचे सर्व अधिकार दिले पाहिजेत. नाही तर आमच्या हातून मुळीच देशसेवा होणार नाही-"

जे हक्क आम्ही मागतो किंवा ज्यासाठी खटपट करतो तेच हक्क

खालच्या वर्गास द्यायला आपण प्रथम तयार झाले पाहिजे. स्वराज्य म्हणजे विशिष्ट वर्गाचे स्वराज्य नव्हे. त्याचा उपभोग सर्वांना घेता आला पाहिजे.' हेच महाराजांचे म्हणणे होते. आजचे सर्वमान्य पुढारीहीपण तेच म्हणतात.

महाराजांची वाक्ये आजही किती मनन करण्याजोगी आहेत, त्यांची समतावृत्ती ऐक्याला किती आवश्यक आहे, त्यांची कृती संघटनेला किती जरूर आहे हे त्यांचे चरित्र वाचणाऱ्याला सहज कळून येण्यासारखे आहे.

महाराजांच्या हयातीत महाराजांच्या थोर गुणांची बरोबर कल्पना येत नसे. आपण त्यांच्या शेजारी असल्यामुळे त्यांच्या चारित्र्याची पुरी कल्पना येत नव्हती. आपल्यापासून दूर गेल्यामुळे त्यांची योग्यता, त्यांचे महत्त्व, त्यांची कामगिरी आता विशेष दिसून येत आहे. महाराज हे एक अष्टपैलू हिरा होते हे त्यांना मिळालेले विशेषण अक्षरश: खरे असल्याचेच दिसून येईल. त्यांच्या चारित्र्यांत प्रत्यक्ष आचरण व व्यावहारिक दूरदर्शकत्त्व लोकसंग्रह व शिक्षण प्रसार यांची उत्कृष्ट उदाहरणे दिसून येतील.

प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा त्यांनी इतके काम केले. जस्टिस पत्राच्याच शब्दात बोलायचे म्हणजे-

'Born at other periods he would have founded an empire and created a confederacy.'

दुसऱ्या काळी जन्मते तर त्यांनी साम्राज्य स्थापन केले असते.

*(श्रीशाहू सत्यशोधक समाज करवीरतर्फे - सत्यशोधक हीरक महोत्सव ग्रंथ)*

## १०) बहुजन समाजाच्या चळवळीचे विश्लेषण

महाराष्ट्रातील बहुजन समाजाच्या चळवळीला तीन महान नेते मिळाले. महात्मा फुले, शाहू महाराज आणि डॉ. आंबेडकर. पहिली व्यक्ती, बहुजन समाजातील अगदी सामान्य थरातील. दुसरी व्यक्ती, सर्वश्रेष्ठ राजघराण्यातील, मराठा बहुजन समाजातील. तिसरी व्यक्ती, महाराष्ट्रातल्या सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय दृष्ट्या छळलेली, पिडलेली, तुडवलेली दलित अस्पृश्य वर्गातील. हे तीन नेते म्हणजे चळवळीच्या तीन अवस्था होत.

महात्मा फुल्यांची दृष्टी सर्वव्यापक होती. 'जे रंजले गांजले' त्यांची बाजू त्यांनी घेतली. त्यांच्यासाठी झगडले. स्वत: अत्यंत हाल सहन केले. जिवाचा

धोका पत्करला. समाजाची अप्रियता पत्करली. लोकभय तसे राजभय टाकले. केवळ सत्याचा झेंडा हाती धरला. अंधश्रद्धेत बुडालेल्या हिंदू धर्मीयांना नवी दृष्टी दिली. मानवतेचा संदेश दिला. ईश्वर हा शब्दही काढून टाकला. त्या ठिकाणी निर्मिक तयार केला. ईश्वराची रूढ कल्पना बदलून टाकली. धर्माची रूढ कल्पना बदलली. विश्वकुटुंबवादाचा पुरस्कार केला. मानवी स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुत्व या पायावर सत्याची कास धरली.

हिंदू धर्मावरच नव्हे तर सर्व धर्मांवर आघात केला. हे धर्म राष्ट्राराष्ट्रांत व मानवामानवांत भेद पाडणारे आहेत म्हणून त्याज्य ठरवले. हिंदू धर्मातील मूर्तिपूजेवर, परोपजीवी फुकटखाऊ वर्ग पोसला जातो, ब्राह्मणांची सर्व मदार त्यावर अवलंबून. म्हणून ब्राह्मण जातीची कारस्थाने चव्हाट्यावर मांडली. ईश्वर मानला; पण ईश्वराची रूढ कल्पना बदलून टाकली. भारतातले पहिले समाजक्रांतिकार महात्मा झाले.

शाहूमहाराज जन्माने थोर घराण्यातले. श्री शिवछत्रपतींचे वंशज; पण सामान्यातील सामान्यांच्या जीवनाशी जणू एकरूप झालेले. दलितांचे कैवारी. त्यांच्या जीवनाचे मुख्य कार्य म्हणजे ब्राह्मण जातीच्या श्रेष्ठत्वाला सुरुंग लावणे. आपल्या संस्थानातून तरी ते श्रेष्ठत्व नष्ट केले.

पण वैचारिक दृष्ट्या फुल्यांच्याइतकी त्यांची प्रगती झाली नव्हती. त्यांनी मूर्तिपूजा टाकली नव्हती; पण तिला त्यांनी महत्त्व दिले नाही. दैनंदिन कार्यक्रमातला चालत आलेला एक रिवाज एवढेच ते मानीत. त्यांना जे अनुभव आले, त्यांतून त्यांची मते बनत गेली. त्या अनुरोधाने चळवळ केली. ते अमकयाच एका व्यक्तीचे अनुयायी होते असे म्हणता येणार नाही; पण त्यांची दोन कार्ये अत्यंत उठून दिसतात. ती म्हणजे ब्राह्मण जातीचा वरचष्मा नष्ट करणे व अस्पृश्यता-निवारण. ते भूतदयावादी होते. अन्यायाची चीड. यातून त्यांच्या चळवळी निर्माण झाल्या.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हा कोहिनूर! मानवी कचऱ्यातून भारतासमोर नव्हे, तर जगासमोर चमकू लागला. माणूस न मानलेल्या समाजातून अतिमाणूस जन्माला आला. आधुनिक भारताची नवस्मृती तयार करून भारतभाग्यविधाता ठरला. शाहू-फुले-बुद्ध यांना गुरुस्थानी मानून स्वत:च आधुनिक बुद्ध झाला. वैचारिक दृष्ट्या त्यांची झेप शाहू-फुल्यांच्या पुढे गेली.

जगाच्या इतिहासातला बाबासाहेब आंबेडकर म्हणजे एक महान

चमत्कार होय. न भूतो न भविष्यति असा चमत्कार होय. तो ईश्वरी चमत्कार नव्हे. स्वकष्टाने, स्वत:च्या बुद्धिमत्तेने व कर्तृत्वाने संपादन केलेली प्रचंड शक्ती होय. खोल दरीतून डोके वर काढलेला. गगनाशी भिडणारा तो हिमालय होय. असंतोषाच्या कोठारातून आकाशाला जाऊन भिडणारा तो आगीचा लोळ होता.

आपल्या समाजाच्या उद्धाराकरता त्यांनी आपले सर्व जीवन, सर्व बुद्धी, सर्व शक्ती खर्च केली. नाही तर ते एका धर्मात जखडून गेले नसते. केवळ एका मानवधर्माचाच पुकारा केला असता; पण आपल्या समाजाचा उद्धार करण्याचा, हिंदू धर्माच्या जोखडातून मुक्त करण्याचा, बुद्ध धर्माच्या स्वीकाराखेरीज त्यांना दुसरा मार्ग नव्हता. प्रचलित धर्मात तोच सर्वश्रेष्ठ धर्म होय. देव नाही, ईश्वर नाही, पुनर्जन्म नाही, म्हणणारा तोच सर्वश्रेष्ठ एक धर्म होय.

सत्यशोधक चळवळ ही सामान्यांची, सामान्यांसाठी, सामान्य समजलेल्या माणसाने चालवलेली चळवळ होय. तिचा जनक विद्वानात गणला गेला नव्हता. उलट त्याला शुद्ध लिहिता येत नव्हते, अशी टीका उच्चवर्णीयांतले विद्वत्श्रेष्ठ करीत होते. त्यांच्या वर्तमानपत्रांनी त्यांची अशिक्षित म्हणून निर्भर्त्सना केली. विद्वत्तेचा हा कस लावल्यास ख्रिस्त, बुद्ध, पैगंबर हीही अशिक्षितच ठरतील.

मनुष्याचा मोठेपणा केवळ पुस्तकी ज्ञानावर अवलंबून नसतो. महात्मा फुल्यांनी अभ्यास केला तो समाज-ग्रंथाचा. त्या समाजाच्या अंतरंगात शिरून, त्यांची सुखदु:खे जाणून घेऊन, त्यांची दु:खे निवारण्याचा मार्ग काढला. त्यासाठी संघटना तयार केली - 'सत्यशोधक समाज.' त्या समाजाने केलेली चळवळ ती सत्यशोधक समाजाची चळवळ. बहुजन समाजासाठी केलेली.

ही चळवळ झाली ती महाराष्ट्रात. कारण त्या तिन्ही नेत्यांचा जन्म झाला तो महाराष्ट्रात. त्यांनी काढलेले निष्कर्ष केवळ महाराष्ट्रातील बहुजन समाजालाच ग्राह्य ठरणारे आहेत असे नाहीत. ते अखिल मानवजातीच्या उत्कर्षाला उपयुक्त ठरणारेच आहेत. मी असे म्हणेन की, महात्मा फुले हे महाराष्ट्राचे कार्ल मार्क्स होत. त्या मार्क्सवादाची तत्त्वे, मार्क्सवाद न वाचलेल्या फुल्यांच्या विचारात व कार्यक्रमात आढळून येतील इतकी त्यांची दृष्टी विशाल व सर्वव्यापी होती.

ब्राह्मण जातीच्या ब्राह्मण्याच्या अन्यायाची ती प्रतिक्रिया असली, तरी तशी ती संकुचित राहिली नाही. अन्यायाचा प्रतिकार व सत्याची उपासना हे

महात्मा फुल्यांचे ध्येय राहिले. स्वातंत्र्य, समता, लोकशाही व निधर्मी वृत्तीचा विश्वबंधुत्वाचा व मानवतावादाचा त्यात आशय होता. त्यातून निर्माण झालेल्या ब्राह्मणेतर चळवळीत तो तसा राहिला असे म्हणता येणार नाही. त्यांच्या अनुयायांत त्या प्रमाणात तो राहिलेला नाही.

सत्यशोधक चळवळीतून ब्राह्मणेतर चळवळीचा जन्म झाला. ब्राह्मणेतर चळवळीतून ब्राह्मणेतर पक्षाचा जन्म झाला. त्यांच्यापुढे राजकीय सत्ता हस्तगत करणे हे ध्येय मुख्य होते. सत्तेच्या मागे लागल्यामुळे महात्मा फुल्यांची सर्वंकष दृष्टी कमी झाली. ब्राह्मणद्वेषाला प्राधान्य मिळाले. बहुजन समाजाची मते मिळविण्याकरिता, फुले-शाहू आंबेडकर ह्या नावांचा घोष करण्यात आला. वागणूक उलट होत गेली. आज स्वत:ला फुले-शाहू आंबेडकरांचे अनुयायी म्हणवून घेणारे, ढोंगी उपासक झाले. सत्यशोधक हा फसवा शब्द झाला. हा ढोंगीपणा महात्मा फुल्यांच्या ठिकाणी नव्हता.

स्वराज्य व स्वातंत्र्य याला फुले, शाहूमहाराज व आंबेडकर यांचा विरोध नव्हता; पण तशी टीका प्रत्येकावर झाली आहे. शाहूमहाराजांवर तर स्वराज्यद्रोही म्हणून शिक्का मारण्यात आला.

फुल्यांना स्वातंत्र्य नको होते असे नाही; पण सामाजिक, धार्मिक व आर्थिक समतेकडे दुर्लक्ष करून व विरोध करून मिळवलेले स्वातंत्र्य नको होते. राष्ट्रीय सभेच्या नेत्यांवर फुल्यांचा विश्वास नव्हता. 'जोपर्यंत कॉंग्रेसचे नेते महार, मांग आणि शेतकरी यांच्या हिताची कळकळ बाळगत नाहीत आणि त्यांच्या मानवी व्यक्तिमत्त्वाविषयी आदर बाळगत नाहीत तोपर्यंत राष्ट्रीय सभा ही खऱ्या अर्थाने राष्ट्रीय होऊ शकत नाही' असे त्यांचे मत होते. शाहू महाराज म्हणत : 'आम्हाला स्वराज्य मिळावे अशी खरोखरीच आमची इच्छा आहे. याच्या योगे आम्हाला जीवन रक्त मिळेल; पण याचबरोबर माझा ठाम सिद्धांत म्हणून सांगावेसे वाटते की, हल्लीची जातिभेदाची श्रृंखला तोडल्यावाचून आपले चालावयाचे नाही. ज्यांना राजकारणात भाग घ्यावयाचा असेल त्यांनी प्रत्येक मनुष्याला मनुष्यत्वाचे अधिकार दिले पाहिजेत.' डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले: 'सर्वांना शिक्षणात व इतर बाबतीत समानता मिळण्याची जर हमी मिळाली तर स्वराज्य व स्वातंत्र्याला माझा विरोध नाही. धार्मिक व सामाजिक समतेला मी अधिक महत्त्व देतो.'

व्यक्ती म्हणून फुल्यांनी, शाहूंनी व आंबेडकरांनी ब्राह्मणाचा द्वेष केला

नाही. उलट अनेकांना साहाय्य केले आहे. फुल्यांच्या मित्र मंडळीत ब्राह्मण होते. शाहू महाराजांच्या अत्यंत विश्वासात काही ब्राह्मण होते, नोकरीत होते. मोठ्या अधिकाराच्या जागा त्यांना दिल्या होत्या. टिळक व शाहू महाराज हे वैचारिक दृष्ट्या एकमेकांचे शत्रू होते; पण व्यक्तिजीवनात परस्परांबद्दल आदरच होता. टिळक वारले त्या वेळी शाहू महाराजांनी टिपे गाळली आहेत. त्या दिवशी अन्नही घेतले नाही. टिळक आजारी होते तेव्हा पन्हाळ्यावर येऊन रहा असा निरोप धाडला होता. शाहू-फुल्यांना स्वातंत्र्यद्रोही म्हणायचे तर रानडे, फिरोजशहा मेहता, भांडारकर वगैरेंनाही स्वराज्यद्रोही म्हणावे लागेल. त्यांची तर, ब्रिटिश राजवट ही ईश्वरी वरदान अशी भावना होती; पण त्यांच्यावर स्वराज्यद्रोही अशी कोणी टीका केलेली नाही.

संस्थापकाप्रमाणे अगर थोर व्यक्तीप्रमाणे त्यांचे अनुयायी असतात असे मानणे चुकीचे आहे. धर्मसंस्थापकाची गोष्ट घ्या. त्यांच्या उपदेशाप्रमाणे अनुयायी वागले असे थोडेच आहे. अहिंसेच्या तत्त्वासाठी स्वत:चे बलिदान करणाऱ्या ख्रिस्ताच्या अनुयायांनी आपली संघटना वाढवण्याकरीता अगदी विरोधी वागणूक करून जगाला रक्ताने न्हाऊन काढले. इस्लाम धर्म विश्वबंधुत्वाची घोषणा करणारा, त्याच्या धर्मप्रसारकांनी किती कत्तली केल्या? जपान हा बुद्ध धर्मीय, त्याने साम्राज्यतृष्णेपायी किती हत्या केली? कॉंग्रेस पार्टीत घोषित ध्येयाविरुद्ध न वागणारा हुडकून काढता येणार नाही. क्रियाशील कार्यकर्ते खादी वापरण्याची प्रतिज्ञा घेऊन त्या प्रतिज्ञेशी किती प्रामाणिक रहातात? तीच गोष्ट इतर पक्षांची. ध्येयवाद आणि कृती यात विसंगती ठरलेली. पण त्या त्या थोर महात्म्यांनी घोषित केलेल्या ध्येयास दोष देता येणार नाही किंवा दुष्टपणाचा आरोप करता येणार नाही.

सत्यशोधक चळवळ ही प्रतिक्रियात्मक होतीच होती; पण नकारात्मक नव्हती. तिचा गाभा लोकशाही समाजवाद व निधर्मी राज्य हाच होता. स्वातंत्र्याचा लाभ सर्वांना व्हावा हा होता.

राममोहन रॉय, जांभेकर, लोकहितवादी, आगरकर, दयानंद सरस्वती हे सत्यशोधकच; पण त्यांनी त्यांच्याखालील जमातींच्या सुखदु:खाचा, अडचणींचा विचार केलेला नाही. ते ज्या वरच्या समाजात वाढले त्यातील दु:खे व अन्याय दूर करण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले, म्हणून त्यांची चळवळ मर्यादित राहिली. त्यांचे विचार खाली पोहोचू शकले नाहीत.

शिक्षणाचाच विचार केला तर दिसून येईल की, राममोहन रॉय, शिक्षणाचा प्रसार वरच्या वर्गात झाला म्हणजे तो खालच्या वर्गात आपोआप पोचेल या मताचे होते. पण अनुभव काय आला? शिक्षण खाली झिरपत तर आले नाही; पण जाणूनबजून अडवून धरण्यात आले; पण महात्मा फुल्यांच्याकडे पहा. ते काही महार-मांग जातीचे नव्हते. त्यांनी अस्पृश्य जमातीतील मुलींसाठी, अखिल भारतात प्रथमच शाळा काढली. शेतकरी/कामगार यांची दु:खे निवारण्यासाठी चळवळ सुरू केली. जातिभेद संस्थेवर हल्ला केला. स्वत:च्या जीवनातून ती काढली. पांढरपेशांच्या स्त्रियांच्यावर होणारा अन्याय दूर करण्यासाठीही चिकाटीचा प्रयत्न केला. पुनर्विवाह हा प्रश्न काही बहुजन समाजाचा नव्हे. केशवपन हाही प्रश्न काही बहुजन समाजाचा नव्हे; तरी फुल्यांनी ह्या प्रश्नाकडे लक्ष दिले. बालहत्या जी होत असे ती ब्राह्मण स्त्रियांना पुनर्विवाहाची बंदी केल्यामुळेच. त्यांनी बालहत्या-प्रतिबंध-गृह काढून त्यांना आधार दिला व अब्रू वाचवली.

कुलकर्ण्यांच्या हाती खेड्यावरच्या सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय नाड्या होत्या. त्या आवळून तो खेडूताच्या नरड्याला तात लावत होता. शेटजीही तोच. भटजीही तोच. राजकीय सत्ताधारीही तोच. त्याच्याबद्दल फुले लिहितात :

*'वसुलीचा पैसा खर्च करून खिचडी ऐद्यांना।*
*कष्टकरी शेतीत चटणी भाकरीना।*
*वर्षासने भटजी नेती खुल्ला खजीना॥*

राजेलोकांनाही त्यांनी इशारा दिला आहे. वसूल केलेली करपट्टी रयतेच्या सुखासाठी खर्च न करता, स्वत:च्या उपयोगासाठी खर्च केल्यामुळे अनेक राज-रजवाड्यांची खानेखराबी होऊन ते धुळीचे दिवे खाऊन वाया गेले. पुढेही जातील.

फुल्यांच्या नंतर सत्यशोधक समाजाच्या नेत्यांनी बहुजन समाजाची संघटना करून राजकीय सत्ता हस्तगत करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली, व ब्राह्मणेतर पक्षाची स्थापना केली. त्यात ब्राह्मणांव्यतिरिक्त सर्व हिंदूंचा समावेश करून घेतला. त्यामुळे सत्यशोधक चळवळीचे व्यापक स्वरूप कमी झाले. त्यात ब्राह्मणद्वेष साहजिकच आला.

याच सुमारास या चळवळीकडे शाहू महाराज परिस्थितीमुळे ओढले

गेले; पण त्यांची चळवळ केवळ एकांगी राहू शकली नाही.

ते संस्थानात असल्यामुळे तिचे स्वरूप राजकीय सत्ता हस्तगत करण्याचे ठेवता आले नाही. काही काळ गेल्यानंतर त्यांचा कल तिकडे वाहू लागला; पण उघड स्वरूप त्यांना केव्हाच देता आले नाही. अन् तितकी निकडही त्यांना भासली नाही; पण सत्यशोधक चळवळीकडे जे खेचले गेले त्याला कारण ब्राह्मणसमाज अन् त्यांची वागणूक.

त्यांच्या हाताखालच्या पुरोहिताने व प्रत्यक्ष वेतन भोगणाऱ्या राजोपाध्याने, ते क्षत्रिय, राजे-शिसोदिया घराण्यातले असूनही, वाड्यावरचे धर्मविधी त्यांना शूद्र मानून वेदोक्त पद्धतीने करण्यास नाकारले. या कृत्यास शंकराचार्यांनी पाठिंबा दिला.

महाराज धर्मभावनेने प्रयागचे (कोल्हापूर) स्नानाला महिनाभर नियमित जात. बरोबर नारायण भटजी नावाच्या ब्राह्मणाला नेत. महाराज वेदोक्त पुराणोक्त हे समजण्याइतके संस्कृत जाणत नव्हते. भटजी म्हणतो आहे ते धर्माला धरूनच आहे, ही त्यांची समजूत. राजारामशास्त्री भागवत हे त्या वेळी त्यांच्याबरोबर होते. भटजी संकल्प सांगत असताना त्यांनी ऐकले. तेव्हा त्यांनी साहजिकच विचारले, "आपण संकल्प पुराणोक्त का सांगत आहात?" त्यावर नारायण भटजींनी उत्तर दिले, "शूद्रासाठी पुराणोक्त सांगावे लागते." हा घाव महाराजांच्या जिव्हारी बसला.

सहजी बोलता बोलता बॅरिस्टर केळवकरांना महाराज म्हणाले, "केळवकर, संस्थानभर दौरा काढावा आणि प्रत्येक खेड्यातल्या महारवाड्यात जाऊन जेवावं असं मला फार वाटतं."

"असं वाटायचं कारण काय महाराज?" केळवकर

"त्याचं असं झालं बघा, मी एकदा सातारला गेलो होतो. जेवण आम्हा मंडळींसाठीच चाललं होतं. जेवण ब्राह्मणी होतं. सोवळेकरी ब्राह्मण होता. जेवायची वेळ आली. मी स्नान करून जेवण कुठपर्यंत आलंय हे पाहण्याकरता गेलो. एक उघडाबंब सोवळेकरी हातावर मांजर घेऊन मध्ये हिंडत होता. त्यानं मला पाहिलं आणि म्हणाला इकडून हिंडता येणार नाही, आपल्याला शिवाशिव झाली म्हणजे साराच घोटाळा उडून जाईल. त्या मांजरापेक्षाही मी खालच्या दर्जाचा? असा प्रश्न मी स्वत:ला विचारू लागलो."

या प्रतिक्रियेचा परिणाम, म्हणजे ब्राह्मणांचा व ब्राह्मण्याचा तिटकारा व

जातिभेद व अस्पृश्यता नष्ट करायचा निश्चय ह्यातून झाला असावा. ह्यातून ते आत्मपरीक्षणही करू लागले, हा केवढा मोठेपणा. एका क्षुल्लक सोवळेकराच्या अपमानातून, स्वत:च्याही शहाण्णव कुळीच्या भावनेचाही त्याग केला पाहिजे असे वाटूनच, त्यांच्या पुढील चळवळी झाल्या असे मानल्यास चुकीचे ठरणार नाही.

मूर्तिपूजेवरची श्रद्धाही त्यांची कमी झाली. ते बाबूराव यादवला शिकारीला घेऊन गेले होते. हा गृहस्थ बराच मागे रेंगाळला. महाराज वाट बघत राहिले. ही स्वारी खटाऱ्याबरोबर आस्ते कदम येत होती. खटाऱ्यावर झापड नव्हती. आत बरेच दगड गोळा केलेले दिसले. महाराजांनी विचारले, "बाबूराव, अरे, कसले दगड घेऊन आला आहेस हे?"

"वाटेनं शेंदूर फासलेले लहान मोठे दगड आढळले. ते घेऊन आलो आहे. या दगडांनीच आमच्या डोक्याचा दगड बनवला अन् भटा-गुरुवांची भर केली महाराज." - बाबूराव.

महाराज पोट धरधरून हसू लागले. देवस्थानांची उत्पन्ने शिक्षणासाठी खर्चणे ही त्यांची प्रतिक्रिया.

पुरोहिताने केलेल्या अपमानातून मराठा पुरोहित निर्माण केला. शंकराचार्याने केलेल्या अपमानामुळे मराठा शंकराचार्य (क्षात्र जगद्गुरू) निर्माण केला. व खेड्यावरची ब्राह्मणी सत्ता नष्ट करण्याकरता कुलकर्णी वतन नष्ट केले. जातिश्रेष्ठतेच्या कल्पनेमुळे सोवळेकऱ्यासारख्याने केलेल्या अपमानामुळे अंतर्मुख होऊन स्वत:च्या शहाण्णव कुळीची आढ्यता, धनगर घराण्याशी आपल्या घराण्याचा संबंध घडवून आणून नाहीशी केली. व आपल्या बरोबरीचे नसलेले, कमी जातीचे म्हणून मानलेले व ज्यांच्यात पाटाची चाल होती अशा घराण्याशी स्वत:चे संबंध जोडले.

वेदोक्त प्रकरणी टिळकांनी शंकराचार्यांच्या निर्णयाला पाठिंबा दिला व कुलकर्णी-वतन नष्ट केले म्हणून 'केसरी' ने त्यांच्यावर टीकेची झोड उठवली. सारा ब्रह्मवृंद खवळला. अशा रीतीने महाराज सत्यशोधक व ब्राह्मणचळवळीत ओढले गेले व टिळकांचे विरोधक बनले. पुण्यात टिळकांविरुद्ध सत्यशोधक व ब्राह्मणेतर समाजनेत्यांची एकजूट बनत चालली होती. त्यामुळे पुण्यात ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाला लढ्याचे स्वरूप येत चालले होते.

काँग्रेसचे नेतृत्त्व या सुमारास टिळकांच्याकडे होते. ती काँग्रेस अधिकारावर आल्यास बहुजन समाजाची धडगत लागणार नाही. पुन:

आधुनिक पेशवाई अस्तित्वात येईल- सर्व सत्ता ब्राह्मण जातीकडेच जाईल, अशी सबळ शंका ब्राह्मणेतरांना आली होती. त्याला कारण टिळकांची उक्ती व कृती. म्हणून ब्राह्मणेतर हे काँग्रेस-द्वेष्टे बनले होते.

टिळकांनी एकदा आपल्या व्याख्यानाच्या ओघात उद्गार काढले की तेली, तांबोळी, शेतकरी यांना कौन्सिलमध्ये जाऊन काय नांगर हाकायचे आहेत की तागडी धरायची आहे? या वृत्तीचे आणखी एक प्रत्यंतर पुढे आले. ते म्हणजे टिळकांनी काढलेल्या गणपती उत्सवाच्या मेळ्यात मवाळांची व सुधारकांची मनसोक्त निंदा. मराठा पुढाऱ्यांची टिंगल. या विरुद्ध केशवराव जेध्यांनी शिवछत्रपती मेळा काढला होता.

केशवराव येथे ग्रुपमध्ये जेधे, दिनकरराव जवळकर, शंकरराव मोरे, श्रीपतराव शिंदे, केशवराव बागडे, 'जागरूक' चे संपादक वालचंद कोठारी असे जबरदस्त कार्यकर्ते होते. श्रीपतराव शिंद्यांचा 'विजयी मराठा', वालचंद कोठाऱ्यांचे 'जागरूक', 'केसरी' च्या टीकेला समर्थपणे तोंड देत होता. नवल्यांचा 'दीनबंधू'ही साथ देत होता. पुणे जिल्ह्याच्या बाहेर नगरचे 'दीनमित्रकार', मुकुंदराव पाटील आपली लेखणी भाल्यासारखी वापरत, बेळगावचे शामराव देसाई 'राष्ट्रवीर' मध्ये 'केसरी'च्याच भाषेत मुद्देसूद उत्तर देत- कोल्हापुरात शाहूछत्रपतींनी ब्राह्मण्याविरुद्ध आघाडी उघडलीच होती. त्यांची व केशवराव जेध्यांची युती जमली. अशा प्रकारे टिळपंथीयांना समर्थपणे तोंड देणारी पार्टी निर्माण झाली होती.

केशवरावही घराण्याच्या दृष्टीने छत्रपतींच्या तोलामोलाचे. त्यामुळे पुणे व पुणे जिल्ह्यात त्यांचे स्थान फार मोठे होते. पुणे जिल्ह्याबाहेरही त्यांच्या घराण्याचा दबाव मोठा होता. शब्दाला वजन होते. त्यांचे थोरले बंधू बाबूराव जेधे, यांनी 'जेधे मॅन्शन' सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीच्या कार्यास वापरण्यास दिला होता. तेथे कार्यकर्त्यांचा मुक्काम पडे. त्याचा सर्व खर्च बाबूराव जेधे करीत. त्यांनी केशवरावांना या कार्यासाठी मोकळे सोडले होते. 'जेधे मॅन्शन' या सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीचे माहेरघर बनले. स्वतःला मला अनेक वेळा तेथे जाण्याचा व पाहुणचार घेण्याचा प्रसंग येत असे. शाहू महाराजही अनेक वेळा 'जेधे मॅन्शनला' भेट देत. यामुळे कोल्हापूर व पुणे यातील चळवळीचे सूत्र तेथे गोवले गेले होते.

शाहू महाराज तर महाराष्ट्रभर व कर्नाटक भागातही संचार करून

ब्राह्मणेतर चळवळीला व्यापक स्वरूप आणू लागले होते. मद्रासची जस्टिस पार्टी महाराजांना सहाय्यक होऊ लागली होती. मुंबई कौन्सिलसाठी स्वत: उमेदवार म्हणून उभे राहण्याची ते मनीषा बाळगून होते. त्यासाठी आपली माणसे तेव्हापासून ते नक्की करू लागले होते.

टिळकांच्या हयातीपर्यंत, सत्यशोधक पक्षाचे व ब्राह्मणेतर नेते काँग्रेसपासून अलिप्त राहिले; पण टिळकांच्या निधनानंतर काँग्रेसचे नेतृत्त्व महात्मा गांधींच्याकडे गेले. महात्माजींनी राजकारणातला संकुचितपणा काढून टाकला. राजकारण अगोदर की समाजकारण अगोदर, ही विचारसरणी काँग्रेसमधून काढून टाकली. समाजकारण, धर्मकारण, अर्थकारण व राजकारण असे भाग पाडले नाहीत. सर्वच प्रश्न हाती घेतले. त्यामुळे बहुजन समाज काँग्रेसकडे आकर्षित होऊ लागला व केशवराव जेधे, शंकरराव मोरे, तुळशीदास जाधव, दिनकरराव जवळकर वगैरे कट्टर सत्यसमाजिस्ट हे सर्व काँग्रेसमध्ये शिरले. पण टिळकपंथी बहुतेक ब्राह्मण हे काँग्रेसपासून अलिप्तच नव्हे तर प्रतिकूल राहिले व हिंदू महासभेचे म्होरके बनले.

अशा वेळी पुण्यातील काही पांढरपेशांना काँग्रेसमध्ये आणण्याचे महनीय कार्य शंकरराव देव यांनी केले व ब्राह्मण समाजावर वर्चस्व असलेले काही पुढारी काँग्रेसमध्ये येऊ लागले. बहुजन समाज तर केशवराव ग्रुपच्या मागे होताच. शंकरराव देवांनी अशक्य वाटणारा पालट घडवून आणला. देव, देवगिरीकर, देवकीनंदन, काकासाहेब गाडगीळ वगैरे वजनदार पुढारी यांच्या सहकार्याने पुणे काँग्रेस कमिटी बलवान झाली. पुढे महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेसचे अध्यक्षपदही केशवराव जेध्यांना मिळाले. त्यामुळे ब्राह्मण-ब्राह्मणेतर युती वस्तुत: भरभक्कम व्हायला पाहिजे होती. पण केशवरावांचे स्थान काहींना फार बोचू लागले. त्यांच्यात जातिवाद आहे असा प्रचार होऊ लागला. केशवरावांनी बाजूस व्हावे असा कट शिजू लागला. दि. ७.३.४८ रोजी भरलेल्या प्रांतिकच्या बैठकीत, मला प्रजा परिषदेचा कार्याध्यक्ष म्हणून बसण्याचा मान मिळाला होता. बाळ गंगाधर खेर त्या बैठकीला हजर होते. तेथे हे दृश्य मला दिसून आले.

मला कोल्हापूरची परिस्थिती बैठकीस समजून द्यायची होती; पण मजबद्दल अगोदरच दूषित ग्रह बनवून घेतलेल्या ब्राह्मण सभासदांना, मला बोलूच द्यायचे नव्हते- म्हणून एकाने माझ्या भाषणाला आवर घाला, म्हणून सूचना केली. पण केशवराव हे प्रांताध्यक्ष असल्याने त्यांनी मला खाली

बसविण्याऐवजी मला बोलू देऊ नका म्हणणाऱ्यालाच खाली बसविले. मला बोलायचे ते मी बोललो. मला विरोध करणाऱ्या या ग्रुपने प्रजा परिषदेत माझ्याविरुद्ध चाललेल्या कटाला हातभार लावला होता. केशवराव अत्यंत निर्मळ, निर्भय व स्पष्टवक्ते. उगाच कुणाची बडेजावर ते ठेवत नसत. तसे स्वत: संकटाला डगमगत नसत. त्यांनी आपली मळमळ मी कोल्हापुरात चालवत असलेल्या 'अखंड भारत' पत्रात ओकून टाकली. ते लिहितात : "ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद नष्ट करण्याचे प्रयत्न मी गेली कित्येक वर्ष अविश्रांतपणे केले आहेत; पण असे असताही महाराष्ट्रातील बुद्धिजीवी वर्गातील काही मूठभर मंडळी माझ्यासंबंधी खोटानाटा प्रचार करून ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाच्या शिळ्या कढीला ऊत आणण्याचा देशद्रोही प्रयत्न करीत आहेत. गोबेल्सची पद्धतीने प्रखर चढाई करून बहुजन समाजासाठी झगडणाऱ्या कार्यकर्त्यांना खच्ची करणाऱ्या वावदुकांनी आपले खोडसाळ प्रयत्न जरूर चालू ठेवावेत. त्यांच्या अशा प्रयत्नानेच बहुजन समाजाची अधिक प्रगती होईल. मी ब्राह्मणेतर पक्षातील स्वार्थी पुढाऱ्यांवर कडवटपणे हल्ले करून त्यांची धूळधाण उडवली, त्या वेळी माझी पाठ थोपटण्यासाठी हात पुढे करणारी, काँग्रेसमधील पुढारलेल्या वर्गातील मंडळी मी काँग्रेसमधील भांडवलवाल्यांच्या पिळवणुकीपासून अडाणी व दरिद्री बहुजन समाजाचे रक्षण केले पाहिजे, असे म्हणताच खवळून मी शेटजी-भटजींचा द्वेष्टा आहे असा छाप मारू लागली."

मी सातारा जिल्ह्याच्या मसूर येथे भरलेल्या अधिवेशनात अणे अध्यक्ष असताना सावकारांनी कुळांकडून बँकेएवढेच व्याज घ्यावे, असा ठराव आणला असताना मी कम्युनिस्ट आहे असा आरोप ब्रह्मवृंदांनी केला. त्या सभेला यशवंतराव चव्हाण स्वयंसेवक म्हणून हजर होते. त्यांनी हा प्रकार पाहिला आहे.

केशवराव जेध्यांवर प्रांतिकमधील ब्राह्मणांनी जातिवादाचे आरोप केले व आपण बाजूस व्हावे हा कट केल्याचे जेध्यांना कळताच त्या स्वाभिमानी व्यक्तीने काँग्रेस सोडली. केशवराव जेधे यांच्याबरोबर शंकरराव मोरे, तुळशीदास जाधव व ब्राह्मण असूनही र. के. खाडिलकर बाहेर पडले. बुद्धिवान ध्येयवादी पुरोगामी शंकरराव मोरे यांच्या अध्यक्षतेखाली 'शेतकरी कामगार पक्षा'ची स्थापना केली. या प्रचंड युतीमळे व सर्वच प्रभावी वजनदार लोकप्रिय नेत्यांमुळे 'शेतकरी-कांमगार पक्षा' ची काँग्रेसला शह देण्याइतकी ताकद वाढली. मीही या पक्षात पुढे प्रजापरिषदेच्या विसर्जनानंतर गेलो.

ब्राह्मणेतर चळवळीच्या संदर्भात कोल्हापूर संस्थानातील सामाजिक आणि राजकीय चळवळीचा खास असा उल्लेख करावयास हवा. संस्थानी प्रश्नाकडे सुरुवातीला काँग्रेसने लक्ष दिले नाही. स्वातंत्र्य मिळविल्यानंतर मग पाहता येईल. एकाच वेळी दोन शत्रू नकोत, ही त्यांची भूमिका होती. गांधीजींनी, म्हणजे काँग्रेसने, अधिकृतरीत्या भाग घेऊ नये असे ठरविले होते. पण संस्थान-सरहद्दीबाहेर चाललेल्या चळवळीचे वारे संस्थानातही वाहू लागले होते. शाहू महाराजांच्या काळी संस्थानात राजकीय चळवळीने उठाव घेतला नव्हता.

शाहू महाराजांनी सामाजिक क्रांतीचे निशाण हाती धरले होते. त्यांच्या सामाजिक क्रांतीमुळे बहुजन समाज त्यांच्याविरुद्ध चळवळ करण्याच्या मन:स्थितीत नव्हता. अस्पृश्यांना तर त्यांनी आपल्या सेवेने व ममतेने त्यांना सामाजिक, धार्मिक व आर्थिक गर्तेतून वर काढण्याच्या केलेल्या प्रामाणिक प्रयत्नामुळे त्यांच्या विरुद्ध त्यांनी चळवळ करणे त्या वेळी अशक्य होते. राजा मराठा, बहुसंख्य समाज मराठा, राजा जनताभिमुख, स्वत:च बहुजन समाजाच्या चळवळीचा नेता. तथापि टिळक ग्रंथीय काही व्यक्तींनी, येथे राजकीय चळवळ सुरू केली. त्या चळवळीचा पाया समाजात जराही रूजला गेला नाही. समाजाचा पाठिंबा नसला की, त्या कार्यकर्त्यांररना दहशतवाद स्वीकारावा लागतो. त्यातही ते सर्व ब्राह्मण. ब्राह्मणाकडे समाज विश्वासाने व आपुलकीने पाहत नव्हता. शाहू महाराजांनी ती चळवळ सहज लीलेने चिरडून टाकली.

शाहू महाराजांच्या हयातीत त्यांनी राजकारणात भाग घेतला नव्हता. शाहू महाराजांच्या हयातीत सत्यशोधक समाजाचे प्रचारक अनेक तयार झाले होते. काही प्रामाणिक होते. काही राजाला खूश करण्याकरता व स्वत:चा फायदा करून घेण्याकरता पुढे झाले होते. शाहूमहाराजांच्या निधनानंतर चळवळीचा जोर कमी होत चालला. अशा वेळी माझ्या वडिलांनी राजकारणात पाय टाकला. त्यावेळी हरिभाऊ चव्हाण या कट्टर सत्यशोधकाने 'हंटर' साप्ताहिक काढले होते. त्याच्या आर्थिक परिस्थितीमुळे त्यांना ते चालवणे अशक्य झाले. म्हणून ते बागलांच्या गळ्यात टाकले. या विद्वान गृहस्थाने शाहू महाराजांच्या उद्दिष्टाला धरून काढलेले हे पत्र होय. त्यांनी 'माझे ऋग्वेदावरचे वाचन' ही टीकात्म लेखमाला लिहून ऋग्वेदाचे वाभाडे काढले. अस्पृश्यांचे हिंदुसभावाल्यांनी चालवलेले शुद्धीकरण हे अस्पृश्यांचे दिशाभूल करणारे, स्वत:चे श्रेष्ठत्त्व

वाढवणारे व अस्पृश्य जमातीचा अपमान करणारे, ब्राह्मणांचे कारस्थान आहे. एका मानवाने दुसऱ्या मानवाचे शुद्धीकरण करणे हा मानवजातीचा अपमान होय, अशा अर्थाचा लेख त्यांनी लिहिला होता. तसेच मनुस्मृतीतील उतारे देऊन ब्राह्मणांव्यतिरिक्त सर्व जातींना गुलाम बनविणारी, स्त्रियांना शूद्र म्हणून लेखणारी, चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करून ब्राह्मण जातीखेरीज इतर जातींना स्वत:साठी राबवणारी व अस्पृश्यांना जनावराहून कनिष्ठ मानणारी ही मनुस्मृती - हिच्या मुसक्या आवळून अरबी समुद्राच्या तळाला नेऊन गाडून टाकावी, असा लेख ता. ५ ऑगस्ट १९२७ च्या 'हंटर' च्या अंकात प्रसिद्ध केला होता.

त्याच मनुस्मृतीला १९३५ साली नाशिक जिल्ह्यातील येवले या गावी बाबासाहेब आंबेडकरांनी जाळून टाकली.

याच सुमारास राजाराम हायस्कूलच्या एका हेडमास्तराने (ते उच्चवर्णीयच होते) विद्यालयाच्या त्रैमासिकावर शिवाजीमहाराज ओणवे होऊन रामादासांच्या पायाजवळ डोके ठेवतात व रामदास एक पाय वर करून पायाच्या चंप्याने त्यांना आशीर्वाद देतात असे चित्र काढले होते. या चित्रावर व ते टाकणाऱ्या हेडमास्तरावर खंडेराव बागलांनी प्रखर टीका करून त्याला माफी मागायला लावली. हा प्रकार आजही चाललाच आहे. शिवछत्रपती, व रामदास आपापल्या क्षेत्रातील थोर व्यक्ती; पण न. र. फाटकांसारखे नि:स्पृह संशोधक वगळता बहुतेक ब्राह्मण संशोधकांनी रामदासाला शिवछत्रपतींच्या डोक्यावर नेऊन बसवण्याचा व त्यांना गुरुपद देण्याचा अट्टाहास चालवला आहे. यात सत्यनिष्ठेहून जातिनिष्ठाच दिसून येते.

वडिलांनी सहभोजने घडवून आणली होती. घरी अस्पृश्य विद्यार्थी ठेवला होता. तो पूजेचे सामान तयार करून ठेवी. आम्ही चार भाऊ, वडील, व मातु:श्री यांच्यासाठी चांदीची ताटे करून आणली होती. त्यात आम्ही प्रथम महार, मांग, चांभार व मुसलमान यांना जेवू घातले. माझे वडील मामलेदार असता वाडी येथे नृसिंहगुरुद्वादशीला हिंदूंना प्रसाद (जेवण) दिले जात असे. ते फक्त ब्राह्मणांना. ते त्यांनी सर्व जातीला देण्याची सुरुवात केली. घरी नेहमी ब्राह्मण वकील व वडिलांचा वादविवाद चाले. पत्रातून डॉ. बाळकृष्ण, चित्रावशास्त्री, आहिताग्नी राजवाडे, पंडीत सातवळेकर, भालाकार भोपटकर यांची लढत चाले. असे असूनही दरबारवरही वडील सडेतोड टीका करीत. मी महारवाडे, मांग वाड्यात जाऊ-जेवू लागलो. अनेक मिश्रविवाह घडवून

आणले. अस्पृश्यांसमवेत जगदंबा मंदिर-प्रवेश केला. शाहू मिल कामगारांच्या चळवळीत मला आठ महिने हद्दपारी झाली. त्या कालात मी समाजवादीवादी वाङ्मयाचा अभ्यास केला. 'यंग इंडिया' तर सुरुवातीपासून वाचत होतो. 'हंटर' नंतर वडिलांच्या पश्चात मी 'अखंड भारत' साप्ताहिक काढले. त्याचे सहसंपादक आचार्य जावडेकर झाले. त्यांच्या संगतीचा व विचारांचा परिणामही झाला. यामुळे कोल्हापूरच्या राजकीय चळवळीचे स्वरूप सुरुवातीपासून ते अखेरपर्यंत एकांगी राहू शकले नाही. सातारच्या चळवळीचे स्वरूप हे घातपाती झाले.

शहराबाहेरील खेडूतांना राजाच्या शिकारीच्या नादामुळे सारखा त्रास होत असे. हरिणाचे कळप उभी पिके खलास करीत. डुकरे उसाचे मळे उद्ध्वस्त करीत. वेठबिगारीचा त्रास होता. सारा खालसाहून जास्त होता. हेच प्रश्न हाती घेतल्यामुळे व त्यात मूलभूत हक्कांची व जबाबदार राज्यपद्धतीची मागणी घुसडल्यामुळे त्यांचा पाठिंबा मिळू लागला. सभाबंदी मोडल्यामुळे मला अटक झाली. त्यामुळे लोकांची सहानुभूती जास्त मिळू लागली.

संस्थानातली मराठ्यांनी चालवलेली वर्तमानपत्रे सर्व उलट. दोन पत्रे अनुकूल होती. ती ब्राह्मणांची. पुण्याच्या व बाहेरच्या वर्तमानपत्रांनी मात्र मला डोक्यावर घेतले. माझ्या बातम्यांना मोठमोठे मथळे घालून व गौरवाचे लेख लिहून मला महाराष्ट्रभर प्रसिद्धी दिली. मला मोठा पुढारी बनवले. कोल्हापुरातले मराठे म्हणत, "मराठ्यालाच मराठा राजावर छौ घालून पुणेरी भट छत्रपतीवर सूड उगवत आहेत. टिळक व शाहू हे वैर साधून घेत आहेत."

लोक काहीही म्हणोत, खरे असो, खोटे असो, मला लोकशाही राज्य स्थापन करायचे होते. त्यात व्यक्तीचा द्वेष नव्हता. खरे म्हणजे माझी महत्त्वाकांक्षा शेतकरी कामगार राज्य स्थापन करायची होती. दौऱ्यात ती कल्पना स्पष्ट करीत होतो. भटजी, राजे, इनामदार, जहागिरदार, गिरण-मालक हे आपले हितशत्रू कसे ते दाखवून देत होतो. अस्पृश्यतेविरुद्ध बोलत होतो. दौऱ्याला बाहेर पडलो की, अस्पृश्य वसाहतीत जात होतो; त्यांचे अन्न खात होतो; पण भिऊन व शाहू महाराजांनी केलेल्या उपकारामुळे ते भाग घेत नव्हते-काही तर उलट होते.

शेतकऱ्यांच्या पाठिंब्यामुळे व मोर्चामुळे सरकारला भीती वाटण्याइतके बळ वाढले व जनता संघटनेच्या बळावर प्रजापरिषदेची स्थापना झाली व नंतर

सर्व प्रकारच्या शिक्षा, अनेक वर्षांचा तुरुंगवास, कार्यकर्त्यांचा छळ या दिव्यातून गेल्यानंतर, राजाराम महाराजांच्या निधनानंतर शहाजी महाराजांच्याकडून प्रजापरिषदेच्या पदरी अधिकार मिळाले. जवळ जवळ सर्व सत्ता माझ्या ठिकाणी कार्याध्यक्ष या नात्याने आली. ती हाती पडताच मी बिंदु चौकातील भरवलेल्या सभेत जाहीर घोषणा कली की, माझ्या हाती सत्ता आहे तोपर्यंत मी कोणत्याही जातीवर अन्याय घडू देणार नाही.

लोकसंख्येच्या प्रमाणात योग्य इसमांना नोकऱ्या देण्यात येतील. ही घोषणा करताच एकूण एक ब्राह्मण चाहत्यांचा नूर पालटला. ज्यांनी मला सतत वाणीचा व लेखणीचा पाठिंबा दिला त्या मित्रांनी व पत्रकारांनी मजवर जातिवादाचा आरोप करण्यात सुरुवात केली. मजवर टीका चालू केली. बाहेरच्याही सर्व ब्राह्मण पत्रांनी, ज्यांनी अव्याहतपणे मला प्रसिद्धी दिली, अनेक गौरवात्मक लेख लिहिले त्या सर्वांनी एकजात माझ्याविरुद्ध झोड उडवली. मी मराठा, राजाविरुद्ध त्याची जात न पाहता बंड केले. त्याच ठिकाणी पुन: मराठाच अधिकारावर आल्याचे पाहून त्यांचे पित्त खवळले. जो अनुभव केशवराव जेध्यांना आला तोच मला या वेळी आला.

याच सुमारास काँग्रेसने, मुख्यत: गृहमंत्री वल्लभभाईंनी, संस्थाने विलीन करण्याचे धोरण अवलंबिले. मी विरोध केला. माझी महत्त्वाकांक्षा कोल्हापूर हे छोटे समाजवादी राज्य करण्याचे होते. यावेळी काँग्रेसने समाजवादाची घोषणा केली नव्हती. वल्लभभाई-मोरारजी समाजवादाविरुद्ध होते. म्हणून मी विलिनीकरणास विरोध केला; पण तो प्रबळ सत्तेपुढे टिकला नाही. कोल्हापूर संस्थान विलीन झाले. प्रजापरिषदेचे कार्य संपले. प्रजापरिषद विसर्जन केली. त्यात झालेले दोन गट, मराठ्यांचा व अल्पसंख्य जमातीचा. मी ध्येयदृष्ट्या जवळचा पक्ष म्हणून शेतकरी कामगार पक्षात गेलो. तिथे मूळचे सत्यशोधक शंकरराव मोरे, केशवराव जेधे, तुळशीदास जाधव, नाना पाटील वगैरे होतेच. दुसरा गट काँग्रेसमध्ये गेला. त्यांच्यापुढे शेतकरी-कामगार पक्षाचे ध्येय नव्हते.

समाजवादी ध्येय प्रत्यक्षात आणण्याचे झाल्यास हाती सत्ता पाहिजे. निव्वळ विरोधातून ते ध्येय कसे गाठता येईल ? तेव्हा काँग्रेसमध्ये जाऊनच ती काबीज का करू नये ? बहुतेक वरच्या थरातील म्हणजे वडीलधाऱ्या मंडळीत हा प्रवाह वाहू लागला. पक्षाचे जवळ जवळ सर्व नेते एकामागून एक काँग्रेसमध्ये

शिरले. केशवराव जेधे, शंकरराव मोरे, खाडिलकर, तुळशीदास जाधव, मी, यशवंतराव मोहिते, आनंदराव चव्हाण, डी. एस. खांडेकर व पी साळुंखे अशी मंडळी काँग्रेसमध्ये गेली.

याला आणखी एक कारण म्हणजे या वेळी काँग्रेसमधील ब्राह्मणी वर्चस्व कमी झाले होते. मंत्रिमंडळात बहुसंख्य मंत्री बहुजन समाजातील व मुख्यत: मराठ्यातील आले होते. आणि एक असामान्य, बुद्धिमान, चळवळीत भाग घेऊन काही दिवस तुरुंगात गेलेली व्यक्ती मुख्यमंत्रिपदावर आरूढ झाली होती. योग्यतेने कोणाही उच्च वर्णीयातील विद्वानांच्या बरोबरीची होती. साहित्य-संगीतकलेत गोडी घेणारी, राजकारणात पडली नसती तर साहित्यिक म्हणून पुढे आली असती. फुले, शाहू, आंबेडकर, एम्. एन्. रॉय, टिळक, गांधी नेहरू यांच्या विरांचा संस्कार झालेला. यामुळे एक ठाम वैचारिक बैठक निर्माण झाली होती. गरीब शेतकरी घराण्यातील. जातीने मराठा. नम्र व मनमिळाऊ. सर्व जातींना मिळवून घेणारी अशी ही व्यक्ती. स्वयंप्रकाशित. यशवंतराव चव्हाण.

डॉ. आंबेडकर वारल्यानंतर सामाजिक चळवळीची परंपरा खंडित होते की काय अशी भीती वाटत होती. अशा वेळी महाराष्ट्रात टिळकांना जी लोकप्रियता मिळाली नाही ती आपल्या कर्तृत्वाने यशवंतरावजींनी मिळविली. जात मराठा असल्यामुळे सारा बहुजन समाज त्यांच्याकडे आकर्षिला गेला. ते आंबेडकरांनाही विसरले नाहीत. त्या स्थानावरून अस्पृश्यांची सेवा करता येईल तेवढी त्यांनी केली आहे. त्यांची निष्ठा भारताशी आहे. नंतर महाराष्ट्राशी. त्याच दृष्टिकोणातून त्यांनी सतत आपली वागणूक ठेवली आहे. तरी त्यांना मी समाजक्रांतीकारक म्हणणार नाही. आंबेडकरांप्रमाणे ते निर्भय व धडाडीचे नाहीत. त्यांचे विचार पुरोगामी आहेत; पण समाजातील अंधश्रद्धा, देवाधर्माच्या खुळचट कल्पना समाजातून समूळ उखडून काढण्याइतके धैर्य दाखवीत नाहीत. ते धैर्य आल्यास फुले, आंबेडकर, शाहू महाराज यांचे अपुरे राहिलेले कार्य ते पुरे करतील. निधर्मी राज्य आणण्याकरता जी स्वत:त निधर्मी वृत्ती हवी आहे ती आत असेल; पण ती बाहेर पडत नाही. त्यांच्या 'युगांतर' या विचारसंग्रहात ती विसंगती दिसून येते. त्यांची पावले वस्तुत: शाहू-फुले-आंबेडकर यांच्यापुढे पडायला पाहिजेत. महाराष्ट्रात तीच एक अशी व्यक्ती आहे की, ती समाजाला आपल्या बरोबर ओढून नेईल.

आता एकूण समाजाकडे पाहिले तर ब्राह्मण जातीचा वरचष्मा आता

कमी झाला आहे. निवडणुकीच्या मार्गाने ते राजकीय सत्ता हस्तगत करतील हा संभव नाही. जातिश्रेष्ठतेचा टेंभा आता कोणी मारीत नाही. रोटीबंदी-बेटीबंदीचे निर्बंध त्यांनी स्वीकारले आहेत. खेड्यावरचे त्यांचे अस्तित्त्व नष्ट झाल्यासारखेच आहे. कुलकर्ण्यांची सत्ता जाऊन तेथे बहुजन समाजातले तलाठी आले आहेत. ब्राह्मण जातीतील हिंदुसभा व जनसंघासारख्या संघटनांना अंधश्रद्धा, देवधर्म, पुनर्जन्म यांची राखण करायची आहे, ती ब्राह्मण जातीत नव्हे, बहुजन समाजात. यावर ते आपल्या संघटनेचे बळ वाढवतात. आमच्याकरवीच आपल्या संघटना वाढवत आहेत. त्यांच्या आहारी, उच्चकुलीन सरदार-जहागीरदार, राज व बडे बडे धनिक स्वत:च्या स्वार्थासाठी श्रमजीवी बहुजन समाजाशी कृतघ्न होऊन सहकार्य देत आहेत. म्हणून निव्वळ ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाच्या शिळया कढीला ऊत आणण्याचा प्रयत्न करण्यात काही अर्थ नाही. म्हणून बहुजन व मराठा समाजातील विचारवंतांनीच पुढाकार घेऊन व आत्मपरीक्षण करून आपल्या समाजातले ब्राह्मण्य, जातीचा अहंभाव, शहाण्णव कुळीची आढ्यता, व देवधर्माविषयीची श्रद्धा, अप्रियता पत्करूनही काढून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. आज अस्पृश्यांवरचे अन्याय व त्यांचे हाल ब्राह्मणांकडून होत नाहीत; पण आपणच मनुस्मृतीचे पुनर्जीवन करीत आहोत.

आता ब्राह्मण जातीवर लेखणी व वाणी झिजवण्यापेक्षा ती आपल्यातील दोष काढण्याकरता झिजविली पाहिजे. शाहू-फूले-आंबेडकर यांच्या घोषणा आणि भक्ती हे निव्वळ नाटक बनले आहे. पुष्कळ मंत्रीच नटाची भूमिका करतात. सारे नाटक निवडणुका जिंकण्याकरता. फुल्यांच्या प्रतिमेला हार घालून पुन: देव-देवतांच्या पायावर डोके ठेवून आपल्या अंधश्रद्धेचे प्रदर्शन करतील; पण फुले मूर्तिपूजक नव्हते याचा विचारही करणार नाहीत. अस्पृश्यांची दु:खे निवारण्याकरता शाहू महाराजांप्रमाणे मातेच्या ममतेने त्यांना जवळ घेणार नाहीत.

आज पाहिजे केशवराव विचाऱ्यांसारखा खरा सत्यशोधक. केवळ मानवतावादाचा पुकारा करणारा, देवधर्म, धर्मविधीतून बहुजन समाजाला मुक्त करणारा; निवडणुकीपासून अलिप्त राहणारे, लोकशाही, समाजवाद व निधर्मी राज्याचा झेंडा हाती धरून बुद्ध भिक्षूप्रमाणे ढोंगी पुढाऱ्याचे निर्भयतेने कान उघडणारे कार्यकर्ते तयार झाले पाहिजेत. लोकभय व राजभय टाकून सद्सद्विवेकबुद्धीचे भय बाळगणारे कार्यकर्ते हवेत.

आज राष्ट्राला ही गरज आहे.

*(आचार्य शंकरराव देव गौरव ग्रंथ)*

## ११) नास्तिकवाद

या शब्दाला लोक निष्कारण भितात :

नास्तिकवाद म्हणजे सर्व मानवजातीच्या कल्याणाचा मार्ग - नास्तिकवाद ! म्हणजे केवळ निरीश्वरवाद नव्हे. अखिल मानवजातीला समानतेच्या पातळीवर आणणारा मार्ग. सर्वांना प्रेमाच्या बरोबरीच्या सहकार्याच्या धाग्यात गोवणारा मार्ग.

**आतापर्यंतच्या तत्त्वज्ञानात प्रगत झालेले तत्त्वज्ञान :** सर्व प्रकारच्या गुलामगिरीतून कृत्रिम, अनैसर्गिक बंधनातून सुटका करणारा मार्ग.

मनुष्याला स्वतंत्र करणारा, त्याच्या कर्तृत्वावर विश्वास निर्माण करणारा, स्वावलंबी बनवणारा, धैर्य-निर्भयता व सत्यशोधनाची प्रवृत्ती निर्माण करणारा मार्ग.

प्रथमावस्थेतील माणसाच्या अज्ञानाने निर्माण झालेल्या व पुढे स्वार्थसाधूंनी रंगवलेल्या खोट्या कल्पना करून दाखविणारे विचार.

जुन्या-नव्याची चाळणी करून, जे सत्याला पटेल व दुसऱ्याला पटवून देता येईल, अशाच कल्पनेवर व उपदेशावर नास्तिक विश्वास ठेवतो.

**सत्य हे कधीही बदलता येणारे नाही असे नसते :** जगाच्या सुरुवातीपासून ते आतापर्यंत ते बदलत गेले आहे. समाज नुसता बदलत नाही, तो प्रगतीच्या मार्गावर आहे. संशोधनाने जसे शोध लागत गेले, तसतसा पूर्वीच्या सिद्धांतात, समजुतीत बदल होत गेला आहे. माणसाची कौटुंबिक मर्यादा वाढून ती उपदेशाशिवाय सुद्धा आणि माणसाच्या मनाची तयारी झाली नसतानाही विश्वकुटुंबी बनत चालली आहे.

रॉबिन क्रुसोप्रमाणे एकाच बेटावर राहणाऱ्यांची संकुचित दृष्टी आजच्या तारायंत्रे, रेडिओ, विमाने, टेलिव्हिजनचा वापर करणाऱ्या जगात राहूच शकत नाही. त्यांचे संबंध विश्वव्यापी झाले आहेत.

जातिभेद, धर्मभेद, वंशभेद, राष्ट्रभेद यांची कृत्रिम कालबाह्य बंधने तोडून सर्व मानवजातीला मानवतेची दीक्षा देणारा मार्ग म्हणजे नास्तिकवाद.

आयुष्यात उद्‌भवणारी संकटे व अडचणी, अगम्य शक्तीवर विश्वास ठेवून निष्क्रीय न रहाता नास्तिक स्वत:च्या बळावर व बुद्धीवर विश्वास ठेवून निवारण्याचा प्रयत्न करतो. देवाला नवस करीत अगर देवाचा धावा करीत,

व दगडासमोर डोकं बडवीत बसत नाही. स्वर्ग-नरक, कर्मविपाक या कधीही सिद्ध न होणाऱ्या गोष्टींवर विसंबून स्वस्थ बसत नाही. धडपडेल, चुका करील, त्या सुधारून पुढे पाऊल टाकील. अद्याप ज्या गोष्टींचा उकल व्हायचा आहे, त्याचा उकल करण्यासाठी तो प्रयत्नास लागेल.

**ईश्वरावर विश्वास ठेवणारे :** अध्यात्मवादी सभोवतालचा समाज, दु:ख व दारिद्र्याच्या गर्तेत लोळत असताना, 'देवा, याचे संकट दूर कर' म्हणून देवाची प्रार्थना करीत बसतील. नदीच्या प्रवाहात मूल पडून वहात आहे, हे पहात असताना, 'देवा, त्याला वाचवा' म्हणून धावा करीत बसतील. पण उडी मारून त्याला वाचवणार नाहीत. धान्याची स्वत:च्या कष्टाने निपज करणारा, जमीनदाराला खंड भरून अगर सावकाराला व्याज भरून दैवाधीन स्वत: उपाशीच निष्कांचन राहील. राजाचा जुलूम कितीही असह्य झाला, तरी आम्ही गेल्या जन्मी केलेल्या पापाचे फळ भोगतो व सारे परोपजीवी सुखात व ऐश्वर्यात राहणारे गतजन्माच्या पुण्याईमुळे सारे भोगतात, म्हणून मेल्यानंतरच्या सुखाच्या आशेवर या जन्मी दु:खे भोगत राहील. ही सर्व कर्मविषयक थियरी त्यांच्या डोक्यात धूर्त ईश्वरवाद्यांनी घुसवली.

या सर्व प्रकारच्या अज्ञानातून, अंधश्रद्धतेतून मुक्तता करून तुझ्या दु:खाचं, दारिद्र्याचं, गुलामगिरीचं कारण गेल्या जन्मीचं पाप हे नसून, इहजन्मीच तुझी लुबाडणूक भांडवलवाले यांनी पिळवणूक केल्यामुळे झाली आहे. जमीनदार, सावकार, राजे हे सर्व तुझ्याच श्रमावर जगतात. तुझीच पिळवणूक करून गबर होतात. तू जागा हो. प्रतिकारार्थ दंड ठोकून उभा रहा. जे हात त्यांच्या सेवेसाठी खर्ची लावलेस, ते तुझ्या स्वार्थासाठी, कष्टकरी समाजासाठी खर्च कर. म्हणजे तूच त्याचा मालक होशील, ही जाणीव नास्तिकवादानेच येईल.

सर्व समाजाला अन्न पुरवणारा अन्नदाता स्वर्गात नाही, तो पृथ्वीवरच आहे. तो जगाला जगवण्याकरता अहोरात्र राबतो आहे. उन्हात राबत असताना त्याची पाठ काळीठिक्कर पडत आहे. थंडीत काम करीत असताना त्याचं अंग चिरून, तडकून फाटत आहे व पावसात भात काढीत असताना त्याचे पाय कुजून खत होत आहेत.

या अन्नदात्याशी कृतघ्न होऊन त्याच्या उपासमारीचा आपली मिळकत वाढवण्याकरता फायदा घेत आहेत ते नराधम होत. पालक तू आणि

शोषक ते !

**अन्नदाता शेतकरी : तसा वस्त्रदाता गिरणीचा मजूर व कोष्टी :**

आमची अब्रू राखण्याकरता तो गिरणीच्या भट्टीत उकळून निघत आहे. कापसाच्या पिंजरानं त्याची छाती फुटून आयुष्य कमी होत आहे. तो वस्त्रदाता आकाशात नाही, गिरणीत काम करीत आहे.

आणि थंडी-वाऱ्यापासून संरक्षण करणारे, श्रीमंतांना गगनभेदी हवेल्या बांधून देणारे, दगड फोडणारे वडर, गवंडी, सुतार लोहार हे आसरा देणारे होत. आकाशातला कल्पित देव कुणाला आसरा देत नाही, उलट तुम्हाला कापायची मेंढरे बनवतो.

**...आणि तुमच्या माता-पित्यांच्या ठिकाणी कोण ?- :**

देव्हाऱ्यातले टाक नव्हेत : आपल्या मातेला का पूजता ? म्हणताना, की आई, तू मला लहानाचं मोठं केलंस. हागलो, मुतलो तुझ्या मांडीवर, तू न्हाऊन-पुसून मांडीवर घेतलंस. दूध पाजून पुष्ट केलंस. घर सारवून लख्ख ठेवलंस, गटारेही साफ केलीस.

पण हेच काम करणाऱ्या महार-भंगी, ढोर-चांभार यांना जवळही येऊ देत नाही. भंग्यांनी काम केले नाही. महारांनी रस्ते झाडले नाहीत, तर रोगराई होऊन समाजाचा जीव धोक्यात येईल. पण माता-पित्यांच्या ठिकाणी असलेल्या अस्पृश्य समाजालाच आपण शत्रू म्हणून समजतो. कल्पित राक्षसाहूनही त्यांचा छळवाद करतो, याची जाणीव नास्तिकवादी करून देतील.

पण हा अन्याय फार काळ सहन केला जाणार नाही, याचा सहस्त्रपटीने मोबदला घेतला जाईल.

लोकांना याची जाणीव झाली... ते पूर्ण नास्तिकवादी बनले की, यांची सद्दी भरून येते.

रशिया-चीन ही समाजवादी राष्ट्रे नास्तिक बनली व या सर्व परान्नपुष्ट माजलेल्या चोरांना त्या जागृत समाजाने जमिनीत गाडले.

फ्रान्सच्या चौदाव्या लुईला व त्यांच्या कुटुंबियांना राजवाड्यातून ओढून बाहेर काढून त्यांची व त्यांच्या थोराबाळांची कत्तल केली. त्यांनी केलेल्या छळवादाचा क्रूरतेने घेतलेला हा सूड होय. रूसो व्हॉलटेअर हे फ्रेंच राज्यक्रांतीचे जनक होय. तथापि या क्रांतीचे श्रेय लुईच्या जुलमी राजसत्तेलाच द्यावे लागते. जनता त्याची उपभोग्य वस्तू झाली होती. ऐश्वर्याची परिसीमा गाठली होती.

त्याने आपल्या अमदानीत बांधलेला व्हर्सेलिसाचा राजवाडा हे सर्व जगाचे आकर्षण बनले होते. त्यावर केलेल्या पैशांची उधळपट्टी आवाक्या बाहेर होती. याचेच अनुकरण युरोपच्या इतर राष्ट्रात होऊ लागले. जणू त्या काळाचा तो महिमाच होता. भारतात मोगल सम्राटांनी बांधलेल्या दिल्ली-आग्रा येथील किल्ले, राजवाडे, ताजमहाल, फत्तेपूर-शिक्री येथील इमारती कमी दर्जाच्या ठरणार नाहीत, पण राजांची ही टोलेजंग वैभवसंपन्न निवासस्थाने वाढली, तशी कष्टकरी सामान्यजनांची घरे भुईसपाट झाली. लोक अक्षरश: रस्त्यावरच्या खडीप्रमाणे चिरडले गेले, त्या घर्षणातून क्रांतीच्या ठिणग्या बाहेर पडू लागल्या. अन्यायाचं, पापाचं पेव काठोकाठ भरलं. त्यात अखेरची ठिणगी व्हाल्टेअर रूसोने टाकली व भडका उडाला. त्यात राजघराण्याची राख झाली. त्याच राखेतून 'स्वातंत्र्य, समता, बंधुता' यांची महान पवित्र घोषणा बाहेर पडली.

रशियात झार, झारिना व तिच्या प्रियकरांनी, सरदारांनी धर्मगुरूंनी व पुरोहितांनी जनतेचे जीवन जुलमाने जर्जर करून टाकले होते. क्रांतीची भूमिका भुसभुशीत करून ठेवली होती. शेतकरी, सैनिक व नोकरही बिथरले.

मार्क्स एंगल्सच्या विचाराने कामगार क्रांतीचे बीज पेरले व श्रमिकांच्या नव्या युगाची ग्वाही दिली. लेनिन या महान नेत्याने तिला प्रत्यक्ष स्वरूप दिले.

रशिया व चीनच्या कम्युनिस्ट नेत्यांनी धर्मगुरूंची देवाच्या नावावर अज्ञानी जनतेला फसवणाऱ्या व स्त्रियांना भ्रष्ट करणाऱ्या बोवांची गाढवावरून धिंड काढली. जमावादेखत त्यांना फाशी दिले व दैवी शक्तीचा आभास निर्माण करणाऱ्या या प्रेषितांची प्रेते रस्त्यावर फेकून दिली आणि हाडाचे सांगाडे प्रदर्शनाकरता ठेवले. देवालये हा त्यांचा आधार, त्यावर नांगर फिरवून सपाट केली. देवस्थानच्या जमिनी शेतकऱ्यांना वाटून दिल्या. सुरुवातीला देवाच्या जमिनी आपण केल्या, तर देवाचा शाप लागेल, म्हणून शेतकरी करायला भीत होते. पण इतर शेतीप्रमाणेच तेथे धान्य आले, त्यांच्या पोटाचा प्रश्न सुटला. धनधान्य पदरात पडले. त्यामुळे देवावरचा विश्वास खालच्या अज्ञजनतेतून समूळ नष्ट झाला.

रशिया व चीनने धर्मगुरू व पुरोहितशाही तशीच राजशाही नष्ट केली.

पण इटली व जर्मनीत क्रांतीच्या पुढाऱ्यांनी, मुसोलिनी व हिटलरने जनतेत विदेशी राष्ट्राभिमान व वंशाभिमान जागा करून साम्राज्यशाहीची महत्त्वाकांक्षा निर्माण करून सर्व सत्ता आपल्या हाती घेतली व अनिर्बंधित

हुकूमशाही प्रस्थापित करून पुन: राजशाही जुलमालाही मागे टाकले ! पण एका क्रांतीने जागे झालेल्या व स्वत:च्या शक्तीची जाणीव झालेल्या जनतेने तीच गत यांची केली. मुसोलिनीला मारून त्याचे प्रेत रस्त्यावर फेकून दिले. हिटलरची गत पण तीच झाली.

इंग्लंडने पहिल्या चार्लसला त्याच्या राजवटीला विटून मुख्यत: त्याचे सैन्यच त्यांच्यावर फितरले. आणि त्याला राजवाड्याबाहेर काढून लाकडाच्या ठोकळ्यावर पडायला लावून त्याची मान कुऱ्हाडीने तोडली. पण त्यानंतर लोकराज्य निर्माण करण्याऐवजी क्रामवेलने आपल्या हाती सत्ता घेतली. पण सनदशीर पार्लमेंटरी राज्यवस्थेत मुरलेल्यांनी ती सत्ता टिकू दिली नाही. फ्रेंच क्रांतीनंतर नेपोलियन सत्ताधारी बनला. पण अखेर त्यालाही सत्तेला मुकावं लागलं व त्याचा अंत एका बेटावर झाला.

ब्रिटनमध्ये राजसत्ता व इटलीच्या पोपची सर्वंकष सत्ता यात विरोध आला, म्हणून आठव्या हेन्रीने आपला पोप निर्माण करून इटलीच्या पोपचं अधिराज्य आणलं.

**जगात सारखा बदल होत आहे. सत्य हेही अबाधित नाही. एका वेळचे सत्य, दुसऱ्या काळी असत्य ठरले आहे.** : प्रत्येक काळाच्या त्या त्या वेळच्या सत्यशोधकांनी एक एक पाऊल पुढं टाकले. त्या त्या नवविचारवंतांचा त्या त्या समाजव्यवस्थेतील विचारात व समाजरचनेत गुरफटलेल्यांनी समाजद्रोही, धर्मद्रोही म्हणून छळ केला आहे.

ख्रिस्त, महंमद, साक्रेटीस यांचाही सुरुवातीला त्या वेळच्या धर्माभिमान्यांनी धर्मद्रोही म्हणून छळ केला आहे. पण कालांतराने त्यांची मते पटल्यामुळे द्रोह करणारेच त्यांचे अनुयायी व स्तुतिपाठक झाले.

**जग पुढं चाललंच आहे** : त्या धर्मसंस्थापकांच्या शिकवणुकीत व वागणुकीत नव्या विचारवंतांना जे दोष दिसू लागले, त्याविरूद्ध त्यांनी उठाव केला. लूथरसारख्या धर्मसुधारकाला, धर्मद्विष्ट्याला नव्हे, तसाच छळ सोसावा लागला. हा जुन्या-नव्याचा संघर्ष सारखा चालला आहे.

**संघर्षामुळे जग बदलत चालले आहे.** : महमंद पैगंबरने विश्वबंधुत्वाची घोषणा केली, पण त्यांनी तिला आपल्या अन्यायापुरतीच संकुचित केली. लोकांनी आपले विचार ऐकावेत, मान्य करावेत. म्हणून एका हातात कुराण आणि दुसऱ्या हातात तरवार घेऊन विश्वबंधुत्वाचा प्रचार केला.

सर्वांवर तरवार चालवता येणे अशक्य होईल, म्हणून स्वत:लाच देवाचा अवतार बनवले व नव्या विचारांनी कुराणावर आक्रमण करू नये म्हणून त्यात बदल करण्यास बंदी करून समाजाची प्रगती थोपवून धरली. स्वर्ग-नरकाची हिंदू धर्माप्रमाणेच भीती व आमिष दाखवले. स्त्री स्वातंत्र्यावर तर भयंकर आघात केला. त्यांची स्थिती केविलवाणी करून टाकली. अफगाण व तुर्कस्थानने इस्लाम धर्मात क्रांतिकारक बदल घडवून आणला. आता भारतीय स्त्रिया हक्कासाठी झगडू लागल्या आहेत. अनेक विचारवंत त्यांना पाठिंबा देत आहेत. आज अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी पुढे प्रिय होत आहेत.

**महात्मा गांधी स्वत:ला हिंदुधर्माचे अभिमानी म्हणवून घेत** : पण त्यांच्या विवचेकबुद्धीला न पटणाऱ्या हिंदुधर्माच्या आज्ञा ते पाळत नसत. शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या परिषदेत ते मुख्य पाहुणे म्हणून बसले असताना, शंकराचार्यांच्या विचारसरणीला व अस्पृश्यतेच्या समर्थनाला त्यांनी सभेत विरोध करून आपल्या मारवाडी समाजाला 'शंकराचार्यांच्या आज्ञेला मानू नका,' असे सांगितले ते त्यांना पुढे खटकल्यामुळे त्यांच्या श्रद्धेत बदल होत गेला आहे. ज्या धर्माज्ञा त्यांना पटल्या नाहीत, त्या त्यांनी झुगारून दिल्या आहेत. धर्माहून त्यांनी सत्यालाच महत्त्व दिले आहे. जुन्या हिंदुधर्माच्या चौकटीत ते बसत नसल्यामुळे जनसंघवाल्यांनी त्यांना शत्रू समजून गोडसे या त्यांच्या पुढाऱ्याने महात्माजींचा खून केला. या हिंदुधर्माभिमान्यांनी बुद्धधर्मियांचीही हत्या केली आहे.

पण कोणाला विचारावर बंदी घालता आली नाही. प्रत्येक काळी विचारवंत नवे विचार मांडतात, प्रथम ते नावडते होतात, कालांतराने ते पटले की, ते स्वीकारले जातात व ते मग रूढ होत जातात.

सर्व जगात त्या त्या युगात एक साच्याचीच समाजव्यवस्था व विचार आढळून येतात.

समाजाच्या प्राथमिक अवस्थेत देवाची कल्पना जवळजवळ एक सांचाचीच होती. ती निसर्गाच्या भीतीतूनच निर्माण झाली. पुढे निसर्गावर ताबा बसवून, आपल्या बुद्धिसामर्थ्यानेच त्यावर ताबा बसवून कामास लावल्यानंतर दैवी आभास नाहीसा झाला!

औषधातील संशोधनाने रोग बरे होतात, हा प्रत्यक्ष अनुभव घेत गेल्याने नवस-सायास, अंगारा त्यांच्यावरचा विश्वास कमी होत गेला. मऱ्याईला आंबील

दिल्याने कॉलरा जात नाही, तो इंजेक्शनने जातो. असाध्य वाटणारा मलेरिया औषधी उपायाने जवळजवळ नाहीसा झाला आहे, हे प्रत्यक्ष अनुभवास आल्यामुळे देवावरची अंधश्रद्धा आता पुष्कळ कमी झाली आहे.

देव तुमचं चांगलं-वाईट करीत नाही, त्याचं अस्तित्वच नाही. त्यावर अवलंबून राहू नका, हेच नास्तिकवादी सांगतो आहे.

राजशाहीचा अंत तर जगातील बहुतेक राष्ट्रात झाला आहे. ब्रिटनमध्ये नामधारी राजा निव्वळ देव्हाऱ्यात बसवला आहे. इतरत्र राहिलेले पथास लागले आहेत. भारतात रक्तक्रांतीशिवाय ते खलास केले आहेत. पण धार्मिक बाबतीतील अंधश्रद्धा, समूळ नष्ट झाली नाही. धर्माच्या बाबतीत वल्लभभाईसारखा कणखर, निर्भय नेता अद्याप भारताला मिळाला नाही. धार्मिक बाबतीत इंग्रजांचं समझोत्याचं धोरण आमच्या नेत्यांनी स्वीकारलं आहे. अद्याप सर्व धर्मियांना, स्त्री-पुरुषांना एकच कायदा लागू केला नाही.

सर्व धर्म सहिष्णुतेने निधर्मी राज्य प्रस्थापित होणार नाही.

*(सामाजिक विचार मंथन)*

## १२) गोब्राह्मण प्रतिपालक नव्हे - पीडितांचे, सामान्यांचे शिवाजी महाराज !

अन्यायाचा प्रतिकार करण्याकरताच शिवछत्रपती लढ्यात पडले. तो अन्याय, तो जुलूम, प्रथम मराठे, जहागिरदार, जमीनदार व राजे यांचाच दिसला. मुसलमानांचा, मुसलमान राजांचा व बादशहांचा नव्हे. खरे शत्रू दिसले ते कष्टकरी, गरिबांना छळणारे मराठी जहागिरदार.

शिवराय म्हणतात - बळकट व्हावे दुसऱ्या घ्यावे, दावे-दरोडे करावे, हा यांचा सहज हव्यास, परचक्र आले म्हणजे वतनाच्या आशेने अगोदरच सलोखा करतात, स्वत: भेटतात. तिकडील भेद इकडे व इकडील तिकडे करून राज्यात शत्रूस प्रवेश करतात. देश मारतात.

**शिवबांचा वर्गसंघर्ष** : यावरून स्वच्छ दिसून येते की, शिवाजी महाराजांचा लढा हिंदू धर्माचे संरक्षण करण्याकरता नव्हता, गोब्राह्मणांचे प्रतपालन करण्याकरता नव्हता, तो वर्गसंघर्ष होता. कष्टक यांची पिळवणूक करणाऱ्यांविरूद्ध होता. त्यावेळी वर्गसंघर्षाला चालना दिली. याचे कम्युनिस्टांना

व समाजवाद्यांना आश्चर्य वाटेल. हिंदूसभावाले व जनसंघीय मात्र घोटाळ्यात पडतील. मुसलमानाविरूद्ध हिंदूंना चेतवायला अवघड पडेल. ब्राह्मणांनी शिवाजीस आपल्या स्वार्थासाठी आपल्या विचारसरणीत ओढून घेतले, तरी तो त्यांचा नव्हता. त्या लढ्यात कौटुंबिक स्वार्थही नव्हता, जातिस्वार्थही नव्हता. तो दीनदलितांचा पालनवाला होता.

अनेक मराठे व रजपूत राजांनी दिल्लीचे व विजापूरच्या आदिलशहाचे मांडलिकत्व पत्करून आपल्या मुलीसुद्धा त्यांच्या जनानखान्यात ढकलल्या व त्यांचेकडून मानसन्मानाची पदे मिळवली. त्या गुलामगिरीचाही त्यांना अभिमान वाटे. फार काय शिवाजी महाराजांचे वडील, शहाजीमहाराज हेही विजापूरकरांचे मांडलिकच होते. त्यांना आपल्या मुलाने मालकाविरूद्ध बंड करू नये, आदिलशहाच्या मुलखावर स्वारी करून तो मुलख घेऊ नये अशी आज्ञा केली तेव्हा शिवबा त्यांना लिहितात -

'आम्हाला यवनाचे चाकर म्हणून अन्न सेवन करावयाचे नाही, तेव्हा आमचे पुंडपणात वडिलांची विपत्ती होणार ऐशास त्यांचे दैव आपण जन्म दिला, परंतु कर्म दिले नाही.'

शिवबांना ही शिकवण कोणी दिली ? मार्गदर्शन कोणी केले ? रामदास आले होते काय इथे ? रामदासांची भेट तरी झाली होती काय ? शास्त्रशुद्धरीत्या गादीवर बसेपर्यंत शिसोदिया घराण्यातील या राजबिंड्याला शूद्र म्हणून संबोधले. गागाभटाने शास्त्रशुद्ध अभिषेक केल्यानंतर मात्र गोब्राह्मण प्रतिपालक म्हणून गौरविले ! त्या गागाभटाला सामील करून घेण्याकरता महाराजांना एका युद्धाला खर्च करावे लागेल इतके धन द्यावे लागले.

माझ्या दृष्टीने हे करायला नको होते. तलवारीच्या जोरावर राज्य मिळवल्यानंतर यांच्या राज्यपदाला बहुसंख्य कष्टकऱ्यांनी मान्यता दिलीच असती. विरोध केला असता तो ब्राह्मणांनी. त्यासाठी गागाभटाला इतकी लाच देण्याचे काहीच कारण नव्हते. मुसलमान झालेल्या फलटणच्या निंबाळकराला भटांच्या सँक्शनशिवाय हिंदू करवून घेऊन त्यांच्याशी रक्तसंबंधही घडवून आणला, त्या महाराजांनी गागाभटाला लाच देऊन राज्यभिषेक करवून घेण्याचे काहीच कारण नव्हते. शाहुंनी आपल्या अधिकारात क्षात्र जगद्गुरू नाही का निर्माण केला ! महाराजांनीसुद्धा एक पुढचे पाऊल टाकले एवढेच. पण ब्राह्मण जगद्गुरूच्या ठिकाणी मराठा जगद्गुरू आणला ! पण कालांतराने त्यालाही

कोणी विचारीना !

स्वातंत्र्याच्या आड आले, ते मुसलमान कापून काढले, तसे हिंदू पण कापून काढले. आप्त व रक्तसंबंधितांनाही कापून काढले. त्यांच्याशी ज्यांनी सहकार्य केले, त्यांची जात न बघता त्यांच्यावर मोठमोठ्या जबाबदाऱ्या टाकल्या.

संभाजी शत्रूला मिळाला असे कानावर पडताच त्यासही अटकेत टाकले. विजापुरी अंकित असलेल्या आपल्या सावत्र बंधु व्यंकोजीवर चाल करून गेले. स्वातंत्र्यद्रोही चंद्रराव मोरे व बाजी घोरपडे यांना कापून काढले. पण प्रामाणिक एकनिष्ठपणे ज्यांनी सहकार्य केले, त्या मुसलमानांना जबाबदारीच्या जागेवर नेमले. दौलतखान व सिद्धीमेस्त्री या मुसलमानांना आरमार प्रमुख केले. आरमाराची कल्पना तर अगदीच नवीन. तरी त्यावरसुद्धा मुसलमान नेमला.

**शिवबांना हिंदू सारखे... मुसलमान सारखे !** : शिवाजीविरूद्ध अनेक हिंदूंनी विजापूरच्या सुलतान आणि दिल्लीचा औरंगजेब या मुसलमान शासकांना मदत केली आहे. शिवाजीचा पिता शहाजी यास कपटाने कैद करून विजापुरी सुलतानासमोर आणणाऱ्या मुस्तफाखान व अफझलखान यांच्याबरोबर मुधोळचा बाजी घोरपडे हाही होता. अफझलखानचा विश्वासू वकील होता- कृष्णाजी भास्कर कुलकर्णी नावाचा ब्राह्मण. अफझलखानास ठार केल्यावर हाच कृष्णाजी शिवरायांवर चालून आला नि त्याने महाराजांच्या मस्तकावर तलवारीचा वार केला. खोक पडली. शिरस्त्राणामुळे महाराज बचावले. त्यावेळी समर्थ रामदासस्वामी अफझलखानाचा विश्वासू सरदार बाजी घोरपडे यांच्याच आश्रयास होते. (मा. म. देशमुख)

पन्हाळा येथील सिद्दी जोहारच्या वेढ्यातून सुटका करून घेण्यासाठी सूर्यराव सुर्वे यांचा त्यांना पराभव करावा लागला. औरंगजेबाचा मामा शाईस्तेखान शिवाजीवर चालून आला, तेव्हा जोधपूरचा जसवंतसिंग त्यांच्या मदतीस आला. दक्षिणेतील माहूरची रायबागन, मूळची ब्राह्मण विधवा आपल्या अनुयायांसकट औरंगजेबास मिळाली ! पुरंदरच्या तहात २३ किल्ले औरंगजेबास मिळवून देणारा मिर्झा राजा जयसिंग हिंदूच होता. विजापूरचा आदिलशहा किंवा दिल्लीचा औरंगजेब यांचे देशमुख, देशपांडे आणि पाटील हे हिंदूच होते.

आग्रा येथे महाराज औरंगजेबाच्या कैदेत असताना स्वत:चा जीव धोक्यात घालून शिवरायाची सुटका करणारा मदारी मेहेतर हा मुसलमान होता.

खुद्द औरंगजेबाचा पुत्र मुआजम याच्याशी महाराजांचे स्नेहसंबंध होते. शिवजी महाराजांचे वडील शहाजी व चुलते शरीफजी हे एका अवलीया पीराच्या प्रसादाने झाले. या समजूतीने त्यांची नावे मुसलमानी ठेवली.

**शिववांचे मुस्लीम चाहते** : हमीद दलवाई म्हणतात, 'असे असताही शिवाजी महाराज आज लोकांसमोर जे चितारले जातात ते मुसलमानांचे विरोधक म्हणून !' त्यामुळे हिंदुराष्ट्रवादी व इतर शिवाजीमहाराजांचा आपापल्या स्वार्थासाठी उपयोग करून घेतात.

शिवाजी पाटगावच्या मौनीमहाराजांना आपले गुरू मानीत. तसे केळशीचे याकूबबाबा यांनाही गुरू मानीत. महाराज कुराणाचा मान राखत. त्यांनी पीराला उत्पन्ने करून दिली आहेत. आपल्या सैन्याने कुराणाचा अपमान करावयाचा नाही. मशिदी व पीरांना इजा द्यावयाची नाही. मुसलमान स्त्रियांनाही संरक्षण द्यावयाचे असा हुकूम दिला होता.

बाळ ठाकरे एका ठिकाणी म्हणतात की, शिवाजी महाराजांची धार्मिक सहिष्णूता आणि मुसलमानांकडे बघण्याचा दृष्टिकोन ही त्यांच्या कार्याची फार महत्त्वाची अंगे होत. त्यांच्या लढाया जरी धर्मवेड्या मुसलमान राजाशी झाल्या, तरी त्यांनी आपल्या राज्यातील मुसलमानांना त्रास दिला नाही. यातूनच त्यांच्या आचारविचारांची घडण बनली होती.

शिवछत्रपती भोवतालची परिस्थिती, शेतकऱ्यांवर होणारे अन्याय व जुलूम पाहून अस्वस्थ होत.

पोर्तुगीज लेखक कास्मे डि गाडा म्हणतो, १५ वर्षांचा असतानाच शेजारपाजाऱ्यांचे हाल पाहून विचारमग्न होत असे. या जुलमाचा प्रतिकार करण्यासाठी त्याने मावळ्यांची संघटना केली व प्रबळ सैन्याला प्रत्यक्ष तोंड न देता गनिमी प्रकारच्या युद्धाला सुरुवात केली.

हा गनिमी युद्धप्रकार चीन या माओने चंगकैशाकविरूद्ध स्वीकारून त्याच्या सैन्यास हैराण केले.

**ब्राह्मणी श्रेष्ठत्वाचा रामदासी प्रयत्न** : महाराजांना दादोजी कोंडदेवने युद्धशास्त्र शिकविले नाही, रामदासाने तर नाहीच नाही. त्यांच्या अंगी ती पात्रता नव्हती. आणि राज्यारोहणापर्यंत रामदासाची व शिवछत्रपतीची गाठही पडली नव्हती.

शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या प्रयत्नाला हिंदुंचे राज्य

स्थापन करण्याचा प्रयत्न म्हणणे सर्वस्वी चुकीचे आहे. (प्रा. नरहरी कुरूंदकर) किंकेड म्हणतो - शिवाजी हा अलौकिक असा दूरदृष्टी, सर्वश्रेष्ठ मुत्सद्दी व राजकारण धुरंदर होता. राष्ट्रीय स्वातंत्र्य हे त्याचे एकमेव ध्येय होते.

केशवराव ठाकरे म्हणतात - शिवाजीला गोब्राह्मण प्रतिपालक ठरविण्याचा बूट ब्राह्मणांनी रचला. शिवाजीच्या पत्रव्यवहारात गाई आणि ब्राह्मण यांना स्थान नव्हते.

अर्जुनराव केळकर म्हणतात, 'स्वतःस राज्याभिषेक करून घेण्याचा निर्धार केल्यानंतर मगच मातुश्रींची संमती घेतली. नंतर महाराष्ट्रातील संतांना भेटले. रामदास हे त्यापैकी एक होते. बापाची सल्लामसलत घेण्याचा प्रसंग त्यांना कधीच आला नाही. उलट बापाने विरोध केला असता त्यांनी तो मुळीच मानला नाही.

रामदास हा तर महाराजांचा राज्याभिषेक होईपर्यंत केव्हाच भेटला नव्हता व त्यांची व महाराजांची गाठही पडली नव्हती. शिवाजी महाराजांचे मार्गदर्शन करण्याची त्यांच्या अंगी पात्रता नव्हती. त्यांच्या मार्गदर्शनाने समाजाची संघटनाच करता आली नाही.

ब्राह्मणाचे श्रेष्ठत्व राखण्याचा अतिहीन प्रयत्न रामदासाने केला. ब्राह्मणाखेरीज इतर हिंदूंना रामदासाने अगदी हीनच लेखले.

डोके वर काढणाऱ्यांना लाथा मारायच्या व त्याचे पुढारीपण प्रस्थापित झाले की, त्यांच्या पायावर डोके ठेवायचे !

त्यावेळी नांगरणीला ट्रॅक्टर्स नव्हते, नांगरणीसाठी शेतकऱ्यांना बैलाची अत्यंत जरूरी होती. बैलांची पैदास गाईशिवाय होणे शक्य नाही. यादृष्टीने शिवाजी महाराज गोपालन, राष्ट्राला आवश्यक म्हणून पहात. गोपालन झाले नसते, तर शेतकऱ्याला व त्यांच्या कुटुंबियांना जगणेच अशक्य झाले असते.

पण ब्राह्मण वर्ग गोपालनाकडे स्वार्थी दृष्टीने पहात होता. शेतावर जाऊन नांगरणी-कुळवणी करणारा हा वर्ग नव्हे. स्वतःच्या जमिनी ब्राह्मणेतरांना लावून कष्टाशिवाय जगणारा हा वर्ग, गोपालनामुळे दूधदुभत्याची यांची चंगळ ! गोपालनाबरोबर ब्राह्मणपालन होऊ शकत होते. म्हणून त्यांनी महाराजांना 'गोब्राह्मण प्रतिपालक' हा किताब देऊन टाकला.

महाराजांच्या व ब्राह्मणांच्या दृष्टीतला हा फरक होता. महाराजांची दृष्टी राष्ट्रीय होती, ब्राह्मणी जातीय होती. ती रामदासांच्या खालील श्लोकातून

अगदी स्पष्टपणे दिसून येते-

*गुरू तो सकलाशी ब्राह्मण। जरी तो झाला क्रियाहीन॥*
*तरी तयासीच शरण। अनन्य भावे असावे॥*
*ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत॥*
*पूर्ण होती मनोरथ। विप्र वाक्ये करूनी॥*
*असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथे मानव बापुडे किती॥*
*जरी ब्राह्मण मुढमति। तरी तो जगद्वंद्य॥*
*अंत्यजे शब्दज्ञाता बरवा। परि तो घेऊन करावा॥*
*ब्राह्मण सन्निध पूजावा। हे तो न धडे कधी॥*

हे वाचल्यानंतर या गृहस्थाला कोणीही संत अगर साधू म्हणणार नाही. काय शिकविले रामदासाने?

अशा प्रकारचे विचार, अज्ञ ब्राह्मणेतरांच्या डोक्यात ठासून घातल्यामुळे यांनी विनाश्रम दूध मिळण्याची सोय करून घेतली व शिवाजी महाराजांना 'गोब्राह्मण प्रतिपालक' हे चिकटवून टाकले. पण कोणत्याही बखरीत महाराजांनी हे विशेषण स्वत:ला लावून घेतलेले नाही.

**'गोब्राह्मण रक्षक' म्हणवीत नसत**

याच भटांनी राज्यारोहण होण्यापूर्वी महाजारांना शूद्र म्हणून राज्यारोहणाला मान्यता दिली नव्हती.

चढणाऱ्यास खाली ओढायचे.

चढलेल्यांचे पायावर डोके ठेवायचे, ही यांची नीती.

इतिहाससंशोधक शिवाजी विद्यापीठाचे पहिले कुलगुरू डॉ. पवार मुंबई युनिव्हर्सिटीत केलेल्या भाषणात म्हणतात, 'पूर्वीच्या बखरीत अगर ऐतिहासिक कागदपत्रात महाराजांना मी 'ब्राह्मण प्रतिपालक' असे विश्लेषण लावलेले अगर त्यांनी लावून घेतलेले कोठेच आढळत नाही. उलट राजा जयसिंहाला लिहिलेल्या पत्रात शिवाजीने घोड्याची शपथ घेऊन विश्वास पटवण्याचा प्रयत्न केला आहे. गुन्ह्याच्या बाबतीत ब्राह्मणाचे पालन करण्याची हमी शिवाजीने दिली नव्हती. अशा खास सवलती पेशव्यांनी दिल्या होत्या. असा पक्षपात शिवाजीने आपल्या राज्यातील प्रजाजनांबद्दल केला नव्हता.

त्यांच्यात धर्माभिमान नव्हता असे म्हणणार नाही. पण तो धर्माभिमान मुसलमानांचा द्वेष करीत नव्हता. देशाला गुलामगिरीतून मुक्त करण्याकरता

होता, पण याचा विचार ब्राह्मणांनी केला नाही व त्यांच्या राज्यारोहणाला ते शूद्र मानून त्यांनी विरोध केला. पण गागा भटाकडून मंत्रशुद्ध राज्याभिषेक घेतल्यांतर यांना 'गोब्राह्मण प्रतिपालक' म्हणण्यास सुरुवात केली व राज्यारोहण झाल्यानंतर रामदासाला गुरूपद दिले.

**रणजीत देसाईंची खुशामत**

या गटात मराठी कादंबरीकार रणजित देसाई सामील झाला व त्याने इतिहासाची पाने ब्राह्मणांना खूश करण्याकरता सत्याची फिरवाफिरव करून लिहिली. मराठा समाजाला अभिमान वाटेल अशी त्यांची लेखणी आहे. भाषा सोपी आहे. रचनाकौशल्य आहे. एखादी स्त्री रूपवान आहे, पण तिने ते सौंदर्य धनप्राप्तीसाठी विकले असल्यास लोक तिचा तिटकाराच करतील.

रणजित देसाई याने रामदासाला राज्याभिषेकाला अगोदर आपल्या कादंबरीत आणला. ती कादंबरी असली तरी त्या साधनाने इतिहासाचा विपर्यास करणे हा गुन्हा आहे. पण त्याला ब्राह्मण पुढाऱ्यांकडून व त्यांच्या वर्तमानपत्राकडून गौरव करून घ्यायचा होता तसा त्यांनी गौरव केला. रामदासाचा आशीर्वाद घेऊन म्हणे ते सिंहासनारूढ झाले !

समर्थांची भेट घेऊन राजे रायगडी येत होते. महाराज म्हणतात, 'मोरोपंत, हत्तीवर अंबारी बरी चढवली ?'

राज्याभिषेकानंतर देवदर्शनाला अंबारीतून जावे लागले. त्यासाठी हत्ती सजवले. (याचा अर्थ राज्याभिषेकापूर्वी रामदासांची गाठ पडली होती असे रणजित वर्णन करतात) त्या कादंबरीचे पान २१५ - जिजाबाई रामदासाला म्हणतात, 'महाराज, आपण आलात, दर्शन घडलं. महाराज काळजी वाटते शिवबाची. आम्ही निघतो. आता त्याला मायेचे कोणी राहिले नाही, ती जबाबदारी आपली. आम्ही आता त्याला तुमच्या ओट्यात टाकतो, त्याला सांभाळा.'

शिवबा हेच मुळी प्रजेचे पालनकर्ते होते. त्याला रामदासाच्या ओट्यात टाकण्याइतकी रामदासाची पात्रता नव्हती. हा सर्व शिवभक्तांचा व शिवाजीचा रणजितने अपमान करून अक्षम्य गुन्हा केला आहे.

'शिवाजी दि प्रॅगमॅटिस्ट' (के. एल् महाल्ये, एम. ए. विदर्भ महाविद्यालय - इतिहास विभाग) लिहितात, 'शिवाजी महाराजांच्या जीवनावर कथा-कादंबऱ्या लिहून अगर चित्रपट काढून शिवभक्ती दाखविणे हे हास्यास्पद

व मूर्खपणाचे होय.'

रियासतकार सरदेसाई यांनी दिलेली माहिती - 'रामदासाची व महाराजांची राज्यारोहणापूर्वी गाठही पडली नव्हती व ओळखही नव्हती, हे पुराव्यानिशी सिद्ध होते - १६५९ नोव्हेंबरला अफझलखानाचा वध झाला.

**त्यांची प्रेरणा स्वयंभू होती**

अफझलखानाच्या वधापूर्वीचे म्हणजे १८ फेब्रुवारी १६५९ चे भास्कर गोसाव्याचे, दिवाकर गोसाव्यास आलेले पत्र उपलब्ध आहे. ते पुढीलप्रमाणे - मी शिवाजी राजेचे भेटीस गेलो होतो. त्यांनी विचारले, 'तुम्ही कोणकोणत्या ठिकाणी असता ?' आम्ही रामदासी श्री समर्थाचे शिष्य- चाफळास राहतो.' 'ते कोठे राहतात ?' याचा सरळ अर्थ यावेळेपर्यंत शिवाजींना रामदास हे कोण माहीत नव्हते.

पुढे केव्हा तरी रामदास महाराजांची भेट घ्यायला आले असताना रामदास शिवाजींना खालील वाक्य टोचून बोलले, 'तुमचे देशी वास्तव्य केले पण वर्तमान नाही घेतले.' हे स्वत: रामदासच म्हणतात. असे असताना राज्यारोहणाआधी रामदासाची गाठ कादंबरीत लिहून त्यात घालणे किती कृतघ्नपणा !

गोविंद चिमणाजी भाटे म्हणतात, '- शिवाजी महाराजांनी रामदासाची गाठ पडण्यापूर्वीच स्वराज्याची स्थापना केली होती. तोपर्यंत शिवाजी महाराजांनी ज्या संघटना बांधल्या, छापे घातले, लढाया केल्या, किल्ले हस्तगत केले, जगाला थक्क करणारी रणनीती व राजकीय मुत्सद्देगिरी दाखविली, तिचा व रामदासांचा काडीचाही संबंध नव्हता-'

प्रा. न. र. फाटक म्हणतात, 'शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापनेची प्रेरणा कोणाकडूनही घेतली नव्हती. परिस्थितीनेच त्यांना प्रेरणा दिली.'

डॉ. आंबेडकर चरित्र, कीर, पान १४४ - '- रामदासाची सामाजिक भूमिका माणसाची मूल्ये ओळखणारी नसून ती ब्राह्मणांची वर्णवर्चस्वाची नि ब्राह्मण जातीची महती गाणारी होती. रामदासी पंथाचे लोक तर पहिल्यापासूनच जातीदुराभिमानी व कडवे म्हणून प्रसिद्ध आहेत.'

आचार्य भागवत म्हणतात, '- शिवाजीच्या कर्तृत्वाचा इगम रामदासांकडे आहे, असे म्हणणे निराधार आहे. शिवाजीचे कर्तृत्व पाहूनच रामदासाला राजकीय विचार सुचले, एरवी सुचले नसते-'

डॉ. पवार, कुलगुरू शिवाजी विद्यापीठ म्हणतात, '-शिवाजी महाराजांना रामदासांची शिकवण होती, ही गोष्ट संपूर्ण निराधार आहे. ज्यांना शिवाजी महाराजांचे मोठेपणा खपत नाही व ज्या वर्गाने त्यांच्या हयातीत त्यांना त्रास दिला, तोच वर्ग अद्याप हा उपहासच करीत आहे. रामदासांची शिकवण शिवाजीने घेतली असती तर महाराष्ट्राचे ऐक्य त्यांना केव्हाच साधता आले नसते-'

**रामदास हे शत्रूंचे हेर होते** : इतकेच नव्हे तर हिंदुतील ब्राह्मणेतर अस्पृश्यांची एकी घडवून आणता आली नसती. आणि महाराष्ट्राला गुलामगिरीतून मुक्त करता आले नसते.

वीर उत्तमराव मोहिते म्हणतात, 'रामदास हे शिवाजीचे गुरू तर मुळीच नव्हते, ते आदिलशहा व औरंगजेबाचे हेर होते. नेताजी पालकर मोंगलांच्या छावणीतून गुप्तपणे निसटला आणि साताऱ्यास शिवाजीस भेटला. शिवाजीने त्याला आपल्या अधिकारात हिंदू करून घेतले, क्रांतिकारकच कृत्य होय-'

'लोकांच्या त्यावेळच्या समजुतीप्रमाणे राज्याभिषेकाशिवाय राजा नव्हे.' असे असल्यामुळे त्यांनी राज्याभिषेक करवून घेतला. तथापि, शिवाजीने यापूर्वीच रायगड जिंकल्यावर ते स्थळ राजधानी म्हणून निश्चित केले व तेथे जरुर त्या इमारती बांधावयास सुरुवात केली होती. रायगड राजधानी करावी, हा निश्चय राज्यारोहणापूर्वीच झाला होता. परंतु हा विधी समंत्रक यथाविधी करावा व स्थापित राज्यास धर्मराज्याचे स्वरूप द्यावे, राजासही आपल्या प्रजेच्या कल्याणाप्रीत्यर्थ करावयाच्या कृत्यासंबंधी राजाने स्वत:स धर्मबंधनांनी बांधून घेऊन राज्याभिषेक विचार व्हावा, हा विचार गागाभटाचा.

त्याने राजास व राजाने इतरांस सांगितला. तो सर्वांस मानवला व तसा राज्याभिषेक विधी झाला. अखिल भारतीय विद्वानांत गागभटास स्थान होते, म्हणून त्याच्या कवीस प्रांतिक किंवा स्थानिकपणा राहिला नाही. (श्री. रा. वि. ओतुरकर)

**रामदासांचे कार्य ही कल्पनेची दौड** : येथे रामदासांचा कोठेही संबंध येत नाही. पण हे अनेक दुष्टात्म्यांना पहावले नाही व पहावत नाही. ते रामदासाला शिवाजीच्या डोक्यावर नेऊन बसवतातच.

माझा अनुभव. १९२५ सालची गोष्ट. त्यावेळी राजराम हायस्कूल शुक्रवार पेठेत होते. त्या हायस्कूलचा हेडमास्टर अय्यर नावाचा ब्राह्मण होता. त्याने त्रैमासिक काढले होते. त्यावर चित्रकाराकडून एक चित्र काढून घेतले

होते. शिवाजी व रामदास असे. रामदास उभा आहे व शिवाजी नतमस्तक होऊन त्याला प्रणाम करीत आहेत; रामदास त्यांना आशीर्वाद देत आहे तो कसा ? तर त्यांच्या डोक्यावर हात ठेवून नव्हे, तर पायाचा पंजा मस्तकावर ठेवून ! बेशरमपणाची परमावधी !

**गुणसागर शिवाजी** : हे चित्र नजरेस येताच आमच्या 'हंटर' साप्ताहिकात त्याची भरपूर हजेरी घेतली. बेळगावच्या राष्ट्रवीरचे संपादक शामराव देसाई, पुण्याच्या विजयी मराठ्याचे संपादक श्रीपतराव शिंदे यांनीही खूपच हजेरी घेतली. अखेर अय्यरला माफी मागावी लागली. चित्रपटातही असाच देखावा दाखवला गेला होता. तेव्हा अमरावतीच्या नागरिकांनी तो पडदा फाडून टाकण्यास धाव घेतली.

*(फुले चरित्र, धनंजय कीर - २५३)*

भारतात नवीन युग सुरू करणारा शिवाजी हा एक महापुरुष होता. रामदास शिवाजीचा गुरू आणि मार्गदाता होता. येथपर्यंत ब्राह्मण इतिहासकारांनी इतिहासातले सत्य ताणावे हे योग्य नव्हे रामदास हा चिपळुणकर-टिळक पंथाचा गुरू होता. रामदास रामोपासक होता, तर शिवाजी शिवभक्त होते. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यविषयक कर्तृत्वामुळे समर्थांची सल्ला मसलत नव्हती, तर गुप्तपणे मदतही सुरू होती असे म्हणण्यापर्यंत अर्वाचीन स्वयंभू किंवा संप्रदाय दीक्षित समर्थभक्तांनी मजल मारली अशा तऱ्हेची फारच मोठी कामगिरी समर्थांच्या झोळीत टाकण्याचे कौशल्य, आपल्या कल्पनेची बेफाम दौड मारणाऱ्या अर्वाचीन समर्थ भक्तांनी दाखवली आहे. समर्थांच्या चाफळ येथील देवस्थानाला जसे शिवाजीचे शत्रू दिनायतराव आणि बाजी घोरपड्याचे साह्य लाभले, तसे मोऱ्यांचेही साह्य मिळावे म्हणून रामदास शिवरायाकडे ये - जा करीत होते.

धनंजय कीर म्हणतात, 'शिवाजी हा आदर्श नेता होता. नेता हा चारित्र्यवान, त्यागी व सदाचारी असला पाहिजे, तरच तो संघटना बांधू शकतो व केडर निर्माण करू शकतो. आजचे सर्वच नेते या आदर्शाप्रत पोचू शकतील असे नाही. आजच्या या नेत्यांना हे कळले पाहिजे की राजसत्ता ही स्वत:च्या नातेवाईकांच्या स्वार्थसिद्धीसाठी नसते, तर ती जनतेच्या कल्याणासाठी असते.

शिवाजी महाराज म्हणजे अथांग गुणांचा सागर. त्यांच्या भूतदया आणि मानवतावादावर लिहावे, नीतीशास्त्रावर लिहावे, रणनीतीवर लिहावे, व्यवहारी

जीवनावर लिहावे, ध्येयवाद, व्यवहार आणि मुत्सद्देगिरी यावर लिहावे. त्यांचे चरित्र म्हणजे अनेक विषयांचा वस्तुपाठ.

तीनशे वर्षे होऊन गेली तरी शिवनामाची जादू जिवंत आहे.... ती स्फूर्ती देत आहे.

'शिवछत्रपती शिवाजी महाराज की जय' ही घोषणा कानावर पडताच सारा खेडूत विजेचा धक्का बसल्याप्रमाणे जागा होतो. झोपी गेलेले वाघ डरकाळ्या देत बाहेर पडतात. शाहीरांचा हात नकळत डफावर पडतो. हलग्या वाजू लागतात. रणशिंग फुंकले जाते. पोरे नाचू लागतात. म्हातारे तरूण होतात. मिरवणुकीत भाग घेण्याकरिता स्त्रिया धांदल करतात.

उत्स्फूर्त गाणे अंत:करणातून बाहेर पडते...

*शिवबा ये रे ये।*
*राष्ट्ररणी व्हावयास सेनानी*
*शिवबा ये रे ये।।*

*(सामाजिक विचार मंथन)*

## १३) मी समाजवादी कसा बनलो।

मी समाजवादी कसा झालो व का झालो हे मी सांगणार आहे. मला कोण गुरू भेटला व त्याने मला समाजवादाची दीक्षा दिली असे झाले नाही. तसेच मूर्तिपूजा, प्रार्थना याने देव पावतो व संकट निवारण करतो, यावरचाही विश्वास उडून गेला. तोही कोणी नास्तिक भेटला म्हणून नव्हे. या अगदी बालपणापासून. त्यावेळी ग्रंथ वाचण्याइतके माझे वय नव्हते, असं असूनही मला शिकवलं ते मला मिळालेल्या अनुभवानं.

अन्यायाची चीड हा माझा स्वभाव. त्या अन्यायाविरूद्ध प्रतिकार करण्यासाठीच मन धाव घेई. माझ्यावर झाला, म्हणून नव्हे. दुसऱ्यावर झालेला पाहिल्यावर किंवा ऐकल्यावर मन अस्वस्थ होई. पण प्रत्यक्ष कृती करणं मला शक्य नव्हतं. मी १०-१२ वर्षाचा पोर. मी काय करणार! माझं प्रत्यक्ष असं वाकडं कोणीच केलं नव्हतं.

मी जन्मलो तो "Silver spoon in my mouth." मी मामलेदाराचा मुलगा. माझं वय आता ८६. त्या काळी मामलेदाराचं ऐश्वर्य आजच्या जिल्हा

कलेक्टरनं हेवा करण्याजोगं. मामलेदाराच्या घरी आठ पट्टेवाले शिपाई कामाला. आम्ही म्हणजे युवराज ! संध्याकाळी आमची स्वारी घोड्यावर बसून फिरायला निघणार. आम्ही घोड्यावरून खाली कोसळू नये म्हणून धरायला एक शिपाई. घोडा उधळू नये म्हणून त्याला काठीने आवरणारा व घोड्याबरोबर पळणारा एक पट्टेवाला असणार. शहरातून युवराज निघाले की, लोक वाकून मुजरा करणार. हे वातावरण तर समाजवादी विचार डोक्यात यायला मुळीच अनुकूल नव्हतं, उलटच होतं.

पण ! मी लाडका म्हणून वडील मला फिरतीवर बरोबर घेऊन जाणार. ते ज्या गावी मुक्काम करतील, त्या गावचे शेतकरी त्यांना भेटून आपली गाऱ्हाणी सांगणार. आपल्याला सावकाराने खोटे दस्तैवाज लिहून घेऊन, दहाचे शंभर, शंभराचे हजार करून, आपले घरंदाज, जमीन-जुमला लुबाडून कसे दरवेशी केले, जमीनदाराने, सुकाळ असो वा दुष्काळ असो, सक्तीने फाळ वसूल कसा करून घेतला, बायका पोरांना कसे राबवून घेतले, कसे अत्याचार केले ते डोळ्यात पाणी आणून, तर स्त्रिया ओक्साबोक्सी रडून सांगणार. ते ऐकून माझेही अंत:करण भरून येई.

यामुळे त्या बालवयातही सावकारशाही व जमीनदारशाही विषयीचं शत्रुत्व माझ्या हृदयात ठाम बसलं. अशा रीतीने समाजवादाची पार्श्वभूमी माझ्या मनात तयार झाली. ती दुसऱ्यांचे हाल पाहून. मी हळव्या मनाचा, भावनाशील. बालपणीच मी सावकारशाहीचा व जमीनदाराचा द्वेष्टा झालो. परिस्थितीमुळेच मला समाजवादी विचारसरणीकडे खेचून नेले व प्रतिकारासाठी मनाची तयारी केली.

याच सुमारास माझी आई क्षयाने आजारी पडली. तिचे हाल मला बघवेनात.

वडील धार्मिक. रोज नियमाने देवपूजा करणार, ताम्हनात अनेक देव-देवतांच्या मूर्ती ठेवून त्यांना स्नान घालणार, फुले वाहणार. गीतेचा एक अध्याय रोज म्हणणार, प्रार्थना करणार. यांचा संस्कार माझ्या मनावर झाल्याखेरीज राहिला नाही. पाहुणे-पै, स्वत:संबंधी हे सर्वच अंधश्रद्धाळू. कोणी अंगारा आणत. कोणी पीराला जा म्हणत. डॉक्टर व वैद्यापेक्षा या लोकांचा विश्वास देव-देवतांवर व भविष्यवाद्यावर; याचा परिणाम माझ्यावर झाल्याखेरीज राहिला नाही.

प्रार्थनेने देव पावेल अशी आशा मलाही वाटू लागली. व मी रात्री सर्व

झोपल्यावर एकांती उठून देवाची प्रार्थना करू लागलो. 'देवा मला ने, पण माझ्या आईला वाचव.' हे सांगत असताना माझ्या डोळ्यातून अश्रू वहात. जणू देव माझ्यासमोरच उभा आहे. हा दिनक्रम माझा रोज चाले, दिवसा आईकडून देवापुढे ठेवण्याकरता पै-पैसा रोज मागून घेई व शाळेला जाताना रोज शेंदूर फासलेल्या देवापुढे त्या पैशाचा कापूर लावी. देवळातल्या देवासमोर बसलेल्या भटाला दक्षिणा म्हणून जवळचे पैसे देई. पण महिन्याने आईचा आजार वाढला व ती मला कायमची सोडून गेली ! माझ्या आयुष्यात मला हा फार मोठा धक्का बसला. देव व प्रार्थना सर्व झूट आहे अशी माझी खात्री पटली. त्या देवांचा असा राग आला की, वडिलांनी पूजेला घेतलेले सारे देव घ्यावेत व गटारात टाकून द्यावेत; पायाखाली ठेवून कचाकचा तुडवावेत. देवाविषयीची भीती व आदर मनातून संपूर्ण नष्ट झाला. वडिलांचाही राग आला. इतकं शिकून व एल. एल. बी. होऊनही त्यांना समजत कसं नाही ?

या प्रसंगाने देवाविषयीची भीती व आदर जो नष्ट झाला तो कायमचा. पुनः या अखेरच्या कालापर्यंत ८६ वर्षांपर्यंत देव व प्रार्थना याचा पगडा मनावर बसला नाही. म्हणजे बालवयातच सावकारशाही, जमीनदारशाही व देवाचा मी द्वेष्टा झालो.

समाजवादाची पार्श्वभूमी कसलेही वाचन न करता मिळालेल्या अनुभवाने झाली.

वडील वारल्यानंतर मी राजारामपुरीतील मातंग वसाहतीत रहायला आलो. जवळच फर्लांगावर शाहू मिल. यामुळे अस्पृश्य व गिरण मजुरांची परिस्थिती मी स्वत: अस्पृश्य अगर मजूर नसतानाही मला समजू लागली.

अन्यायाची चीड येणं व प्रतिकारासाठी मन धडपडणं हा तर माझा जन्मस्वभाव.

अस्पृश्यांना उच्चवर्णीय माणूस म्हणूनही वागत नाहीत. जनावराहूनही कमी लेखतात, शिवाशिव करीत नाहीत. हिंदू असूनही देवळात घेत नाहीत, हे मी पाहिले. मी हा भेदाभेद मुळीच मानला नाही. माझ्या घरी येत नाही. स्वयंपाक घरापर्यंत जात. माझी बायको त्यांना जेवायला वाढी. खरकटे काढी, त्यातले काही माझे जिवलग मित्र झाले. त्यातल्या अनेकांना कुलगुरू डॉ. पवारांना सांगून नोकऱ्या देवविल्या.

कोल्हापूरच्या जगदंबा देवालयात त्यांना प्रवेश नव्हता. मी जाहीर

सभा घेऊन बंदी मोडून अस्पृश्यांचे हातात हात घालून जगदंबा मंदिरात प्रवेश केला. लगेच दुसऱ्या दिवशी गंगाराम कांबळे याला सांगून महार वाड्यातील लोकांना ट्रकमधून नृसिंहवाडीस दत्त पादुका स्पर्शासाठी नेले. त्यांनी झुणका भाकरही बांधून घेतली होती. आसपासच्या गावचे शेकडो लोक सभेला आले होते. सभा घेऊन अस्पृश्यांसह पादुकास्पर्श केला. यामुळे संस्थानचे वातावरण बदलून गेले.

**गिरणी मजूर** : मजूर माझ्या घरावरूनच जात. त्यातले बरेच अस्पृश्य होते. त्यांच्याकडून गिरणीच्या आतील कारभाराची माहिती मिळाली. गिरणीचे मॅनेजर माझे घरोब्याचे जिवलग मित्र. खादी भक्त. मुंबईस शाहू महाराजांच्या 'पन्हाळा लॉज' या बंगल्यात एकाच हॉलमध्ये आम्ही रहात होतो. पण त्यांच्याकडून आतील कारभाराची मला माहिती मिळू शकली नाही. पण कामावर जाणाऱ्या येणाऱ्याकडून पुष्कळ माहिती मिळू शकली. पहाटे दिवस उजाडायचे आत व संध्याकाळी दिवस मावळल्यानंतर त्यांची सुटका होई. म्हणजे १४ तास काम. पगार नऊ. स्त्रियांना तशीच वेळ, पगार ७, मुलांना वेळ तितकाच. पगार ५. फॅक्टरी ॲक्ट लागू नाही, बोनस नाही, अपघात भरपाई नाही. ब्रिटीश हद्दीतली स्थिती त्या मानाने बरीच चांगली होती. माझ्या स्वभावानुसार मी हाही प्रश्न हाती घेतला. यामुळे माझे मित्र मॅनेजर गरम झाले. मला म्हणाले, 'माधवराव तुम्ही यात पडू नका. मी सरकारचा नोकर आहे. इथं खाजगी संबंध मला मानता येणार नाहीत. तुम्हाला हे जड जाईल. मीही मामलेदाराचाच मुलगा; मी त्यांच्या धमकीला डरलो नाही. मी मॅनेजरना म्हणालो, 'तुम्ही तुमचं कर्तव्य करा, मी माझं करीन.'

मी जवळच एक भाड्याची ७ रू. ची जागा घेऊन तेथे मजुरांना काय करावे ते सांगू लागलो. त्यांची संघटना बांधली. विनंती, मोर्चा, उपवास सामुदायिक व संप या मार्गाने मागण्या मान्य करणे भाग पाडले.

आज मजुरांचा पगार २०० ते ३०० आहे. तास १४ चे ८ झाले. बोनस मागणी मान्य केली. अपघाताची भरपाई देण्यात येते. ७ रूपयाची भाड्याची जागा सोडून २/२॥ लाखाची कामगार संघाची जागा उभी राहिली आहे. संघटनेची शक्ती त्यांना कळाली. मला कळाली. त्याचा उपयोग मला पुढे झाला. आतापर्यंत मिळालेले यश केवळ माझ्या पुढाकाराने. माझा उपजत स्वभाव व परिस्थिती मला पुढे पुढे ढकलत होती.

यानंतर मी पुढची उडी घेतली. तिलाही परिस्थिती हेच कारण.

वडिलांनी शाहूंच्या निधनानंतर सत्यशोधक चळवळ बंद पडू नये म्हणून

'हंटर' नावाचे मराठी साप्ताहिक सुरू केले होते. मी त्यात स्फुटे लिहू लागलो. पत्रात लोक आपली गाऱ्हाणी लिहून छापावी म्हणून कळवत. यामुळे मला एकतंत्री बेजबाबदार राजशाहीचा कारभार, शोकासाठी शेतकऱ्यांचे होणारे नुकसान, वाड्यावरच्या बगलबच्चांची हुकूमशाही व अनीतीचा कारभार समजू लागला. त्याला मी प्रसिद्धी देऊ लागलो म्हणून जबर जामीनकी लादून पत्र बंद पाडले.

तेव्हा सरकारविरूद्ध तोंडी प्रचार करण्यास सुरुवात केली म्हणून मला हद्दपारीची शिक्षा केली. मी व माझी पत्नी रमादेवी या काळात कुलाबा, रेवदंडा या गावी माझ्या मित्राच्या घरी राहिलो. तेथे राहण्यापूर्वी मला समाजवादी विचारसरणीच्या पुस्तकाची यादी जवळकरांनी दिली होती. ती सर्व पुस्तके विकत घेऊन मी नेली. त्या काळात मी तेथे समाजवादी, प्रसिद्ध जगमान्य नेत्यांच्या विचारसरणीचा अभ्यास केला. ते सर्व सावकारशाही, जमीनदारशाही, भांडवलशाही, राजशाही व भटशाही याविरूद्धच होते. मी हे वाचण्यापूर्वीच प्रत्यक्ष केलं याबद्दल मला अभिमान वाटतो.

मी आता पक्का समाजवादी झालो आहे. देवा-धर्माचा द्वेष्टा झालो आहे.

सर्व धर्माची ओळख करून घेतली आहे. सर्वच धर्मांनी परस्परांचे शत्रूत्व केल्यामुळे जगाची हानी झाली आहे. असंख्य जनतेचे प्रत्येक धर्मियांनी खून पाडले आहेत.

या अभ्यासानंतर बुद्धिवादी-बुद्धधर्म तेवढाच जगाचं कल्याण करणार आहे याची खात्री झाली. तो देव मानत नाही, स्वर्ग-नरक, आत्मा परलोक मानत नाही. तो विचारस्वातंत्र्य हिरावून घेत नाही. पण तो धनाचा, इस्टेटीचा मोहच टाका म्हणतो. ते मला मान्य नाही. त्यामुळे सावकार, जमीनदार, भांडवलवाले यांनाच संरक्षण मिळेल. म्हणून या विचारातील काही दोष काढून डॉ. आंबेडकर यांनी आपली स्वतंत्र भर घातली आहे व त्यांच्या विचारात त्यांनी बुद्धिझम व कम्युनिझमचा समन्वय केला आहे, तो मला मान्य आहे.

बुद्धांना यांत्रिक प्रगतीच्या दुष्परिणामाची कल्पना नव्हती. मार्क्सला भारतातील वर्णाश्रमाची, जातीभेदाची व अस्पृश्यावर होणाऱ्या अन्यायाची व अनन्वित छळाची बरोबर कल्पना नव्हती. म्हणून मी म्हणतो, कम्युनिझम व बुद्धिझम यांचा समन्वय होणे अत्यंत आवश्यक आहे-बुद्धिझम हा डॉगमॅटिक नाही, तसा मार्क्सवादही डॉगमॅटिक नाही.

*(सामाजिक विचार मंथन)*

## १४) मराठवाड्यातील अत्याचार अखेर दलितांना कल्याणकारकच ठरतील

मराठवाड्यात पाडलेल्या रक्तातून तुमचे मतभेद नाहीसे होतील. पक्षभेद नाहीसे होतील. तुम्ही खऱ्या अर्थाने एकाच रक्ताचे व्हाल ! पुण्यश्लोक बाबांची प्रेरणा व संदेश तुम्हाला प्रेमाने बांधून घेईल.

आज मराठवाड्यात तुमची होरपळ चालली आहे. आंबेडकर हे नावही त्यांना खपेना ! तुमच्यावर सूड उगवायला हे नाव केवळ कारणीभूत झालं ! हे मनूने पेरलेलं विष पुन: इतरत्रही फैलावू लागलं आहे ! ज्या विषातून पाकिस्तान निर्माण झालं, अखंड भारत खंडित झाला, ते विष अद्याप निपटलं गेलं नाही. ते वाढलं आहे !

आंबेडकरांनी खुद्द गांधीजींना बजावले, ती भूमिका आजही तशीच आहे ! आंबेडकर म्हणतात-

'गांधीजी, मला मायभूमी नाही... ज्या देशात कुत्र्याच्याही जिण्याने आम्हाला जगता येत नाही, कुत्र्या-मांजरांना जेवढ्या सवलती मिळतात तेवढ्या सवलतीही आम्हाला गुण्यागोविंदाने ज्या देशात मिळत नाहीत त्या भूमीला माझी जन्मभूमी आणि त्या भूमीतील माझा धर्म म्हणण्यास मीच काय पण ज्याला माणुसकीची जाणीव झाली आहे नि ज्याला स्वाभिमानाची चाड आहे, असा कोणताच अस्पृश्य तयार होणार नाही. ह्या देशाने आमच्या बाबतीत इतका अक्षम्य गुन्हा केला आहे की, आम्ही त्याचा कसलाही व कोणताही भयंकर द्रोह केला तरी त्यामुळे घडणाऱ्या पापाची जबाबदारी आमच्या शिरावर पडणार नाही, असे असल्यामुळे मला अराष्ट्रीय म्हणून कोणीही कितीही शिव्या दिल्या, तरी त्याबद्दल विशाद मानून घेण्याचेही मला प्रयोजन नाही... ज्या राष्ट्रात माझ्या अस्पृश्य बांधवांची माणुसकी धुळीप्रमाणे तुडवली जात आहे, ती माणुसकी मिळवण्यासाठी ह्या राष्ट्राचे मी कितीही नुकसान केले तरी ते पाप न ठरता पुण्यच ठरेल.'

'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत ऐकताना त्यांचं मन प्रफुल्लित होईल काय ? त्यांच्यावर शत्रू चालून आल्यास स्वत:चं बलिदान करण्यास ते तयार होतील काय ? राष्ट्रगीताविरूद्ध ब्र काढला म्हणून राजा ढाले विरूद्ध केवढा गहजब

उठला ! आज त्याच मनस्थितीत अस्पृश्य बौद्ध समाज आहे. त्यांना देशाबद्दल अभिमान वाटावा अशी परिस्थिती आज दिसून येते काय ?

दलितस्थानाची मागणी डोकावू लागली आहे. त्याला जबाबदार कोण ? अस्पृश्य की स्पृश्य ?

काँग्रेस असो अगर आजची Socalled जनता आघाडी असो, यांनी देवाधर्माचं स्तोम कमी केलं नाही. उलट अंधश्रद्धेची जोपासनाच केली आहे. कोणा मंत्र्यानं कोणा गावाला भेट दिली की प्रथम त्या गावच्या दगडोबाला, तो प्रथम भेट देईल ! व अज्ञ समाजाला पुन: आपल्या पाठिंब्याने अंधश्रद्धेच्या डबऱ्यात ढकलील !

पंडित नेहरू हे एक अपवाद वगळले, तर इतर सर्व पंतप्रधान व मंत्री एका माळेचे मणी ठरले ते देशावरची धर्माची छाप कशी कमी करणार? ती हिंदुधर्माची छाप नष्ट झाल्याशिवाय अस्पृश्यांवरचे अन्याय कमी होणार नाहीत.

महात्मा गांधी धार्मिक होते, पण एवढं खरं की, त्यांनी धर्माचा अर्थ आपल्या सोयीप्रमाणे लावला व न पटणाऱ्या विधानांना मुरड घातली. इंदिराजी वस्तुत: नास्तिक असायला हव्या पण त्यांनी तिरूपतीला जाऊन धार्मिक विधी पार पाडले ! त्यांच्या सत्तेवर पाय ठेवून उभे राहिलेल्या मोरारजींनीही तिरूपतीला जाऊन आपल्या ईश्वर-भक्तीचं प्रदर्शन केलं ! आज आधुनिक गांधी समजलेले राष्ट्रधुरीण व मार्गदर्शक जयप्रकाश यांचं मार्गदर्शन देवी भगवती करीत असते. त्यांना आजारातून वाचवलं ते सुद्धा देवी भगवतीने म्हणे; तरी लोक विज्ञानापासून अलिप्त राहू नयेत म्हणून डॉक्टरचं सहाय्य घेतलं व अमेरिकेला त्यासाठी भेट दिली. माझे पूज्य यशवंतरावजी कर्मविपाक सिद्धांताविरूद्ध बोलतात. पण भवानी देवीला सोडत नाहीत.

तेव्हा अस्पृश्यांनी कोणा व्यक्तीवर अगर पक्षावर विसंबून न राहता, या पक्षातून त्या पक्षात त्या पक्षातून या पक्षात उड्या न मारता सर्व अस्पृश्यांची स्पृश्य दलित व अस्पृश्य दलित, शेतमजूर व गिरणीमजूर यांची स्वतंत्र संघटना बांधून आपली सत्ता स्थापन करावी. माझ्या दृष्टीने हाच एक उपाय त्यांना खरं स्वातंत्र्य व स्वराज्य मिळवून देईल.

*(सामाजिक विचारमंथन)*

## १५) उद्‌घाटकीय भाषण : अस्मितादर्श पाचवा मेळावा, कोल्हापूर

आजच्या संमेलनाचे उद्‌घाटन करताना माझे परममित्र अस्मितादर्शनचे विद्वान संपादक गंगाधररावजी पानतावणे यांची व अस्पृश्य व बौद्ध समाजाची सेवा केल्याचे पुण्य माझे पदरी पडत आहे. मात्र याचा अर्थ मी कर्मसिद्धांत मानतो असा नव्हे.

राजर्षी शाहू महाराज असते तर त्यांनी पानतावण्यांचे स्वत:च स्वागत केले असते. सर्व पाहुण्यांची वाड्यावरच व्यवस्था केली असती.

महाराचा पोर अमेरिकेहून पी. एच. डी. होऊन आला हे समजताच, ते आंबेडकरांना भेटण्याकरिता मुंबईच्या परळ विभागातील चाळीत गेले. आंबेडकरांना पाहताच महाराजांनी त्यांना प्रेमाने आलिंगन दिले व म्हणाले, 'आता माझी काळजी दूर झाली. दलितांना पुढारी मिळाला !' त्यांना मोटारीत घेऊन आपल्या बंगल्यावर नेऊन कोल्हापूरला येण्याचे आमंत्रण दिले. कोल्हापुरात आल्यावर बाबांना आपल्या रथात बसवून, त्यांची भव्य मिरवणूक काढली' त्या छत्रपतीच्या क्षेत्रात तुम्ही आला आहात. याच वर्षात भारतीय सरकारने त्यांच्या नावाने तिकीट काढून आमच्या राजाला अखिल भारतीय मान्यता दिली. याबद्दल आम्हा सर्वांनाच आनंद व अभिमान वाटेल.

वेदोक्ताने व ते नाकारणाऱ्या राजोपाध्ये-वगैरेंनी व मुख्यत: ब्रह्मवृन्दाचे एकमेव पुढारी टिळक यांनी, आम्हा ब्राह्मणेतर व अस्पृश्यांना शाहू महाराज दिले.

कृष्णाच्याने, वर्णाश्रमधर्माने व मनूच्या विषमतेच्या हीन कायद्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकर मानवतेच्या रक्षणासाठी भारताला दिले. हे टिळकांचे तसेच कृष्ण मनूचे आमच्यावर उपकारच झाले म्हणायचे.

बाबासाहेब अमेरिका व इंग्लंडच्या सर्वोच्च पदव्या मिळवून आले. आर्थिकदृष्ट्या संपन्न झाले. शैक्षणिकदृष्ट्या जागतिक श्रेष्ठत्व संपादन केले. भारतातल्या कोणत्याही पुढाऱ्याला जी कमाई करता आली नाही ती केली. गांधी-नेहरू व इतर मंत्र्याहून विद्वत्तेने, त्यागाने व कष्टाने श्रेष्ठ ठरले.

तरी अस्पृश्यच ! इतरांहून हीनच ! सयाजीराव महाराजांनी त्यांना मोठ्या हुद्द्याची जागा दिली. तरी त्यांच्या हाताखालच्या शिपुरड्याने त्यांचे सरकारी कामाचे दप्तर लांबून त्यांच्या टेबलावर फेकून दिले ! त्यांना रहायला सुद्धा जागा मिळाली नाही हा अपमान सहन न होऊन त्यांनी ती नोकरी सोडून

दिली. मुंबईस प्रोफेसरच्या जागेवर आले. तेथे सर्वांसाठी ठेवलेल्यांसाठी हंड्यातील पाणी घेण्यास बंदी केली. भाड्याचे वहान केले. गाडीवानास हे अस्पृश्य समजताच गाडीतून यांचे सामान फेकून दिले.

लहानपणी सर्व समाजाबरोबर जे हाल सर्वांना भोगावे लागले ते यांनाही भोगावे लागले. शिकताना अनेक अडचणीशी व विरोधाशी तोंड द्यावं लागलं. संस्कृत शिकू दिले नाही. तर कष्टाने शिकून पंडित झाले. या मनुस्मृतीने अस्पृश्यांना माणसातून उठवलं, गावाच्या हद्दीबाहेर ढकललं. त्यांनी जेवायला भांडी खापराची वापरायची. गाय, म्हैस, घोडी पाळायची नाहीत. कपडे प्रेतावरचे टाकलेले वापरायचे, स्त्रियांनी लोखंडाची काकणेच वापरायची.

पेशवाईने मनूच्या कायद्यात जादा भर घातली. माणुसकीचा लवलेश शिल्लक ठेवला नाही. अस्पृश्यांच्या सावलीने माणसू विटाळला जातो, म्हणून रस्त्यावरून जाण्यास बंदी ! रस्त्यावरून गेल्यास त्याची उठलेली पाऊले पुसून टाकण्याकरिता, कसेबसे झाडपाल्याची फांदी बांधून घ्यावी लागे. रस्त्यावर अस्पृश्याची थुंकी पडू नये म्हणून गळ्यात गाडगे बांधून घ्यावे लागे !

हा अन्याय व अपमान असह्य झाल्यामुळे त्याचा प्रतिकार करण्याचा व बंडाला लोकांना प्रवृत्त करण्याचा बाबांनी निश्चय केला. त्यासाठी अन्यायाची जाणींव करून दिली. उच्चवर्णियांची माणुसकी धसाला लावावी म्हणून महाडच्या चवदार तळ्याचे पाणी सामुदाईकरित्या जाऊन पिण्याचा कार्यक्रम जाहीर केला, त्यात अत्यंत कटू अनुभव आला. बाबासाहेबांनी आपल्यामागे प्रचंड समाज असूनही कमालीचा संयम व शांतता राखली, मार खाल्ला, स्त्री-पुरुषांना, वृद्धांना व मुलांनाही बेछूट मारपीट केली. हिंदुधर्मीय सुधारतील, माणुसकीनं वागतील ही आशा नष्ट झाली. चवदार तळ्याचा संग्राम व काळाराम मंदिर प्रवेशाची अहिंसात्मक चळवळ ही म. गांधीच्या देश-स्वातंत्र्याच्या अहिंसामय सत्याग्रहाहून पवित्र होती.

आंबेडकरांचा संग्राम मानवी स्वातंत्र्यासाठी होता. गांधींचा देश-स्वातंत्र्यासाठी होता. मंदिर प्रवेशाची चळवळ ही देशभक्तीसाठी होती. हक्क संपादनासाठी होती. यावेळी माझ्या जीवनातला एक प्रसंग आठवतो - सेनापती बापट व साने गुरूजी कोल्हापुरात आले होते. राजारामपुरीतील मांगवाडा झाडून माझ्या घरी आले. साने म्हणाले, 'माधवराव, मी पंढरपूरला अस्पृश्यांना मंदिर प्रवेश मिळविण्यासाठी प्राणांतिक उपोषण करणार आहे. तुमचा आशीर्वाद

हवा.' 'गुरूजी, माझी योग्यता तुम्हाला आशीर्वाद देण्याइतकी मोठी नाही, पण माझी सहानुभूती नाही. बडव्यांना ब्राह्मणेतरांकडून लाखो रूपये मिळतात ते कमी पडले म्हणून अस्पृश्याकडूनही मिळवून देता काय?'

गांधींच्या अहिंसा लढ्याला त्यावेळच्या विशिष्ट जागतिक परिस्थितीमुळे यश मिळाले, अहिंसा सत्याग्रह या तत्त्वज्ञानाला मिळाले असे म्हणता येणार नाही. हिटलरच्या वीजिगीषु स्वारीच्या धास्तीमुळे ब्रिशीट साम्राज्यच धोक्यात आले होते. म्हणून यावेळी भारताच्या सहाय्याची ब्रिटनला आवश्यकता भासली. ब्रिटीश हा वित्तसर व मशीनगन्सपुढे अहिंसा सत्याग्रहाचा जराही टिकाव लागला नसता. व्हिएटनामने अमेरिका व चीनचा हल्ला अहिंसा सत्याग्रहाने हटवला नसता.

आंबेडकरांना सत्याग्रह करताना कार्यसिद्धीसाठी हिंसा जरी झाली तरी ती त्यांना मान्य होतीं. सत्याग्रही माणसाने शक्य असेल तोवर अहिंसा, जरूर पडेल तर हिंसा हे धोरण स्विकारावे. आंबेडकरांनी आपल्या बुद्धीने निर्णय घेण्याची वृत्ती टाकली नाही. आंबेडकरांनी जरी बुद्ध धर्म स्विकारला तरी स्विकारण्याजोगे असेल ते घेतले आहे. स्विकारता येणार नाही ते बाजूस सारले आहे. भ. बुद्ध म्हणतात -

'सर्व काही नाशवंत आहे म्हणून मालमत्तेसाठी झगडण्याची आवश्यकता नाही.'

हा उपदेश अव्यवहारी आहे. याने 'आहेरे' वर्गाला म्हणजे सावकार, जमीनदार, जहागिरदार यांना सरंक्षणच मिळणार आहे. दरिद्री, बेकार व श्रमजीवी वर्गाने 'सर्व काही नाशवंत आहे' असे समजून स्वस्थ बसल्यास त्याची स्थिती केव्हाही सुधारणार नाही.

गांधीजींच्या ट्रस्टीशिपने जसे धनिकांनाच संरक्षण मिळाले. कोणी आपली इस्टेट ही लोकांची समजून तिचा विनियोग केला नाही.

आंबेडकरांना संघर्ष, क्रांती नको होती, असे मुळीच नाही. ते म्हणतात,

मला कोणी विचारले. 'धर्म-क्रांती अगोदर की आर्थिक क्रांती अगोदर तर मी म्हणेन धर्मक्रांती अगोदर.",

धार्मिक क्रांतीनंतर अस्पृश्य, बेकार, दरिद्री राहावेत असं आंबेडकरांना वाटणं केव्हाही शक्य नव्हतं. आपल्या समाजाला ऊर्जितावस्था आणणं, त्याची सर्वांगीण उन्नती करणं, हेच त्यांचे समोरचे मुख्य ध्येय होते. म्हणून ते म्हणत-

'माझ्यासमोर देश आणि समाज असा प्रश्न उभा राहिला, तर मी समाजाला महत्व देईन. मी व देश उभा राहिल्यास देशासाठी प्राण देईन.'

आज धार्मिक क्रांतीसाठी बुद्ध तत्त्वज्ञानाचा व आर्थिक क्रांतीसाठी मार्क्सवादाचा स्वीकार करावा लागणार आहे.

मार्क्सच्या मते खाजगी मालकी ही मानवी वितुष्टाच्या मुळाशी आहे. बुद्धाचंही म्हणणं तेच आहे- म्हणू बुद्ध भिक्षुनी इस्टेट करायची नाही असा दंडक घातला. ४ अगर ७ घरं भिक्षा मागून जगावे. पण याने स्वाभिमान कसा राखला जाईल ? कम्युनिझम म्हणजे हिंसा असं मानण्याचं कारण नाही. सर्वांना सुखाने जगता यावे एवढी मालमत्रा प्रत्येकाची असावी. त्यांच्या आवडीच्या विषयाची वाढ करण्यास आर्थिक साधन त्यांच्याकडे असावे, हाच कम्युनिझमचा उद्देश आहे. फ्रांस, रशिया, चीन या राष्ट्रांना हिंसा केल्याखेरीज स्वातंत्र्य मिळालंच नसतं- भारतात लोकशाही असल्यामुळे निवडणुकीच्या मार्गाने सत्ता बदलता येते, हा अनुभव आला आहे.

बुद्ध धर्माचा एक गाढा अभ्यासू ख्रिस्तमस हम्प्रे म्हणतो -

Communism and Buddhism have features in Common.'

आंबेडकरांनी हिंदू धर्माचा त्याग करण्यापूर्वी सर्व धर्माचा अभ्यास करून, मगच बुद्धीवादी बुद्ध धर्माचा स्वीकार केला. कृष्ण, ख्रिस्त, महंमद या प्रत्येकांनी देव, देवांचा पुत्र व प्रेषित असे बिरूद चिकटवून घेतले आहे. स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, कर्मसिद्धांत या कल्पना प्रत्येक धर्मात आहेत व आपला भाव वाढवणाऱ्या कथा, आपापल्या धर्मात घुसडल्या आहेत. दुसऱ्या धर्मियांचा द्वेष शिकवला आहे. पण आपल्याच धर्मात उच्चनीच भाग पाडले नाहीत, ते कृष्णाने आपल्याच धर्मात 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र' असे चार विभाग कायमचे पाडले. त्यांचा धर्म म्हणजे त्यांना दिलेला धंदा, तो जन्मभर पालन करणे त्यात या जन्मी बदल होणार नाही. बदल केल्यास 'नरको नियत वास:' तो माणूस नरकात जाईल असा शापही देऊन टाकला. मनूने त्याला कायद्याचे स्वरूप देऊन त्यात अस्पृश्याची भर घातली. चार वर्ण पाडले, पण स्त्री-पुरुष आकर्षणाला बंदी घालता आली नाही. निसर्गाकर्षणाला आवर घालता आला नाही.... वनपर्वात युधिष्ठिर-नहुष संवादात, युधिष्ठिर म्हणतो, 'हल्ली मनुष्य ही एकच जात उरली आहे. सर्व वर्णांचा संकर झाला आहे. जातीची परीक्षा करता येत नाही.' ही सरमिसळ सर्व जातीत आजपर्यंत चाललीच आहे 'श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणांचा संग

न सुटे शुद्रीचा' ब्राह्मणाची स्त्री शुद्राबरोबर व शूद्राची ब्राह्मणाबरोबर गेलीच आहे. पण वारसा सांगायचा झाला म्हणजे बाप म्हणतो हा मुलगा माझा, आईला माहीत असतं कुणाचा ! वंशशुद्धता अगर जातिशुद्धता हे केवळ थोतांड आहे. हरिणी नावाच्या अनार्य स्त्रीच्या पोटी कौशिक गवताच्या बेटात जन्मास आले. वाल्मिक मातीच्या ढिगाआड जन्मास आले वेश्येचे उदरी, वसिष्ठ जन्मास आले. नारद स्वत: दासीपुत्रच होते गवताचे बेट, मातीचा ढीग अशा ठिकाणी पोर जन्मास घालणाऱ्या माता चुकलेल्या कुमारिकाच असण्याचा संभव आहे. कुंतीने कर्णाला नदीत सोडून दिले. आज कित्येक अर्भके विहिरीत, गटारात व संडासात टाकलेली आढळतात. हे बंद व्हावे म्हणूनच म. फुल्यांनी बालकाश्रम काढून टाकलेल्या मुलांचा संभाळ करणारी संस्था काढली. वसिष्ठ, विश्वामित्र, पराशर, कौशिक, भरद्वाज, गौतम या ऋषींनीच ब्राह्मण आपले कुलगुरु समजतात. वसिष्ठ ऋषींनी अक्षमाला या नीच जातीय स्त्रीशीच विवाह केला, तिलाच पुढे अरुंधती म्हणू लागले. पराशरांनी कोळणीशी समागम केला, व ते वेदमहर्षी व्यास झाले. परशुराम हा चित्त्पावन ब्राह्मणांचे कुलदैवत, बाप जमदग्नी ब्राह्मण, आई रेणुका जोतीण, कुठं राहिला आहे तो कृष्णाचा वर्णाक्षम धर्म ? पण हे जातिधर्माचे थोतांड अद्याप जिवंत आहे. हा उच्चनीच भेद अस्पृश्यातही शिरला आहे. या कुटीलनीती कृष्णाने 'संभवामि युगेयुगे' असे म्हणून, बोवाबाजीलाही उत्तेजन दिले आहे, ते कोल्हापूरला त्यांची कृष्णकृत्ये उघडकीला येईपर्यंत खूपच भोवलं आहे. याबाबत सत्यशोधक ना. भास्करराव जाधव म्हणतात, 'बुवाबाजी नष्ट करायची असेल, तर ईश्वर अवतार घेतो, या कल्पनेचा फोलपणा लोकांना पटवला पाहिजे. 'संभवामि युगेयुगे' अशा वाक्यांनी, भगवद्गीतेने अवतारकल्पना घट्ट केली म्हणून भगवद्गीता हीच बुवाबाजीचे मूळ आहे, बुवाबाजी हा एक मोठा विषवृक्ष आहे, आमच्या समाजाचे रक्त शोषित आहे व आमच्या सद्सद्विवेक बुद्धीस मारून टाकून, आमच्या लोकांस भित्रे व परावलंबी करीत आहे. निरनिराळ्या ठिकाणी बोवा बनून साधुत्वाचा बाजार मांडणारे महाराज, हे या विषवृक्षाच्या फांद्या आहेत. याची पाळेमुळे खणून नष्ट केली पाहिजेत.

कृष्ण म्हणतो - *चातुर्वर्ण्यम मया सृष्टम । गुण कर्म विभागश: ।* परीक्षेत विद्यार्थ्यांना मार्क देऊन पास-नापास करतात, तशी यंत्रणा कृष्णाने तयार केली होती काय ? एवढ्या प्रचंड मानवी समाजाला ती कशी लागू केली ?

तसं पाहिलं तर प्रत्येक माणसात चारी वर्णाचे गुण असतात. सकाळी तो भंगी व महाराचे काम करतो, बाजारहाट करताना वैश्य बनतो, मालमत्तेसाठी झगडा करताना क्षत्रिय बनतो व सर्वांना आपल्या जीवनाचं साधन बनवून, आपलं श्रेष्ठत्त्व प्रस्थापित करण्याकरिता कथा व वचने लिहित बसताना, ब्राह्मण बनतो त्याचं उत्कृष्ट उदाहरण म्हणजे रामदास व ज्ञानेश्वर. रामदास हा कट्टर जातिवादी ब्राह्मणनिष्ठ. तो जनमनाची लाज सोडून म्हणतो,

*ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत*
*पूर्ण होती मनोरथ। विप्रवाक्ये करुनी।।*
*असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथे मानव बापुडे किती।*
*जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य।।*

ज्ञानेश्वराने गीता मराठीत करून संस्कृत न जाणाऱ्या वर्णाश्रमधर्माचं महत्त्व निवेदन केलं आहे. अस्पृश्यांना हीन लेखलं आहे. ज्ञानेश्वर आपल्या वर्णाची स्तुती करताना म्हणतात, स्वर्ग लोक हे ब्राह्मणांचे इनाम गाव; मंत्र-विद्येचे माहेरघर, ब्राह्मण हे सर्व वर्णामध्ये श्रेष्ठ हे पृथ्वीवरचे देव आहेत ते अंत्यजाबद्दल म्हणतात, अंत्यजाच्या समागमाने ब्राह्मणही अत्यंज होतो. ब्राह्मण जरी दरिद्री झाला, तरीही त्याने शूद्राच्या घरची उत्तम पक्वाने सुद्धा सेवू नयेत.

*सांगे शुद्राघरी आघवी । पक्वाने आहाति बरवी।।*
*ती द्विजे केवी सेवावी। दुर्बल जरी जाहला।।*

या ब्राह्मणी संतांनी व भटांनी, वाटेल ते बरळावे आणि आम्ही खरे मानावे. आम्हाला डोकं आहे व विचार करता यतो असं त्यांना वाटतच नाही. ती आमची बुद्धी त्यांनी गोठून टाकली आहे. जी गोष्ट कधी काळी झाली नाही, होणार नाही व निसर्गाला सुट्टून आहे, ती अगदी निर्लज्जपणे हे बरळतात.

ईश्वराच्या मुखातून म्हणे ब्राह्मण जन्मला, बाहुतून क्षत्रिय, जांध्यातून वैश्य, पायातून शूद्र ही निसर्गबाह्य गोष्ट कोणत्या विज्ञानाने घडवून आणली ते अद्याप कुठं प्रसिद्ध झालेलं नाही. ट्यूबने मूल जन्माला घालता येते, ही विज्ञानी वाढ झालेली आहे- पण तोंडातून, हातातून, मांडीतून, पायातून मुले अद्याप काढता आली नाहीत.

जातीबद्दल अशीच समजूत. जाती देवाने पाडल्या? निसर्गाने जनावरांच्या पाडलेल्या जाती ओळखता येतात- गाय, म्हैस, उंट, हत्ती, वाघ, सिंह, पक्ष्यांच्या - कावळा, कोंबडी, चिमणी, मोर वगैरे. जलचरात-मगर,

मासा वगैरे. तसं माणसातल्या जाती ओळखता येतात? ब्राह्मणांचं मूल शेंडीसकट, मुसलमानाचं दाढीसकट, लिंगायताचं लिंगासकट व अस्पृश्यांचं घाण चिकटलेलं असं बाहेर येतं?

सर्व माणसे सारखीच असतात. माणूस हीच सर्वांची जात पण भेदभाव पाडले ते हिंदूधर्माने, वर्णाश्रम या सर्वांचा आधार देव, अन् तो देव म्हणजे मूर्ती. तो कोण तयार करतो?

खाणीतून वड्डु दगड बाहेर काढतो, त्या दगडाला कोणी पाया पडत नाही, त्याचे तुकडे करुन रस्त्यावर टाकले जातात. त्याला तुडवत जातो. त्याला कोणी पाया पडत नाही. त्याच दगडाची कुंडी शेतखाण्यात घालतो, तिच्यावर घाण टाकतो, पाया नाही पडत, त्याच दगडाला स्त्री अगर पुरुषाचा आकार देऊन चार भिंतींच्या आत बसवला की, त्या घराचं देऊळ बनतं. त्या देवासमोर भट बसला की, तुम्ही त्याला देवाचा दलाल समजून दक्षिणेची लाच देता. आपल्या अडीअडचणी पार पाडाव्यात म्हणून प्रार्थना करता! यां मूर्खपणावर संत गाडगे महाराजांनी कोरडे उडवले आहेत. ते म्हणतात, 'शेंदूर फासोनिया धोंडा। पाया पडती पोरे रांडा।। देव दगडाचा केला। गवंडी त्याचा बाप झाला। देव सोन्याचा केला। सोनार त्याचा बाप झाला।। सोडोनिया खऱ्या देवा। करी म्हसोबाची सेवा। पण खरा देव कुठं आहे? त्याची सेवा मी जन्मभर करत आलो, तो देवळात नाही. तो सर्व जनतेला पोसण्याकरिता राबतो आहे. उन्हारान्हात राबताना त्याची पाठ काळीठिक्कर पडत आहे. थंडी वाऱ्यात काम करताना त्याचं अंग तडकन चिरून फुटत आहे. पावसात भात काढताना, त्याचे पाय कुजले आहेत. हा देव आकाशात नाही, तो अन्नदाता प्रभू दुसरा कोणी नसून, शेतकरी हाच होय. आणि वस्त्रदाता परमेश्वर तुम्हाला नटवण्याकरता, गिरणीत राबतो आहे, त्याचे हात मी पाहिले आहेत, कापसाच्या पिंजराने न्हाऊन निघालेला छातीत पिंजर जाऊन क्षयाची वाट धरलेला स्वत: फाटके मळलेले कपडे घालून कोंबडीवजा खुराड्यात राहणारा पण त्याच्या श्रमावर जगणारे मात्र गगनचुंबी इमल्यात, हे सारं बदलायला पाहिजे. या सावकार जमीनदार-भांडवलवाले या सर्वांना आधार देवाचा. हा देवाचा दगड गाडून टाकला पाहिजे. देव मानला की तुम्ही गुलाम झाला. देव तुमच्या डोकीवर बसला तुम्ही जिवंत असून बिनडोक्याचे दगड बनता. देव मानला की तो उच्च, तुम्ही नीच, देव मानला की समता गेली, समाजवाद गेला, लोकशाही गेली, स्वातंत्र्य,

समता व बंधुता गेली, हुकुमशाहीच्या आधीन झाला, साहजिकच जनसंघ तुमच्या डोक्यावर बसणार. आज राज्यकर्ते या धर्माच्या व अंधश्रद्धेच्या गुंगीतच राज्य करत आहे.

या सर्व धर्मांचा, समाजातील अज्ञानाचा व अंधःश्रद्धेचा विचार करूनच, बाबासाहेबांनी बुद्धिवादी बुद्ध धर्माचा स्वीकार केला... महात्मा बुद्ध स्वर्ग मानीत नाहीत, जातिभेद जाणत नाहीत, कर्मकांडाला जुमानत नाहीत, मूर्तीपूजा करत नाहीत, त्यांनी स्वामी 'बाबा' दलालांना जवळ केले नाही. देवालयात पाऊल टाकले नाही, विश्वाचा शास्ता कोणी मानला नाही, 'हा ईश्वर कोण आहे, कसा अस्तित्त्वात आला, या प्रश्नाला उत्तर नाही. कोणीही ईश्वराला पाहिलेले नाही. लोक फक्त ईश्वरासंबंधी बोलतात, कोणीही असे सिद्ध करू शकत नाही, की ईश्वराने सर्व जग निर्माण केले, जग हे रचलेले नसून विकास पावलेले आहे, ईश्वरावर विश्वास ठेवण्यात काही लाभ नाही, ईश्वराधीन धर्म हे कल्पनाश्रित धर्म आहेत. ईश्वरावरच्या अस्तित्त्वाचा सिद्‌धांत हा सत्यावर आधारलेला नाही, धर्माचा हेतू सर्व सुखी होतील अशा रीतीने माणसाशी कसे वागावे हा आहे.'

बाबासाहेबांनी बुद्ध धर्माचा स्वीकार केला तरी बुद्धकालाच्या दृष्टीने त्याच्यात जो उणेपणा आला तो या कालाचा विचार करून बाबासाहेबांनी काढून टाकला. त्याचे ऋण मानून आपले पाऊल पुढे टाकले म्हणून आज आम्हांला बाबासाहेबांनाच आपले मार्गदर्शक मानले पाहिजे.

बाबासाहेबांनी म. फुले व कबीर यांना आपले गुरू मानले तरी त्यांनी आपल्या गुरूच्या पुढे मजल मारली आहे.

म. फुले-ईश्वर एक असून तो सर्वव्यापी आहे. मनुष्यप्राणी त्याची लेकरे आहेत असे म्हटले. त्याची पूजा-अर्चा होऊ नये म्हणून त्यांनी त्याला निर्मिक असे नाव दिले. म्हणजे ईश्वर या कल्पनेला टाकून दिले नाही. निर्मिक याऐवजी निसर्ग हा शब्द संयुक्तिक ठरला असता, म्हणून आम्हाला आंबेडकरच मार्गदर्शक वाटतात.

कबीर-इतरांच्या मानाने ते पुरोगामी आहेत यात शंका नाही. तथापि ईश्वर व त्याचे वरचे परावलंबित्व झुगारून दिलं नाही. त्यांचेकडून निष्क्रियतेचाच पुरस्कार झाला आहे. ते म्हणतात.

*अजगर न करे चाकरी। पंछी करे न काम॥*
*दास कबीरा कह गये। सब का दाता राम॥*

अगदी हेच विचार बायबलमध्ये आहेत.

सेंट म्यॅथ्यू - रानामधील वृक्षवेली व तृण पहा. त्यांची वाढ आपोआपच होते, ते का श्रम करतात? पण ईश्वर जर रानावनातल्या फुलवेलींना पोसतो तर ती तुम्हाला नाही का पोसणार? म्हणून अन्नपाण्याची, तुम्ही काळजी करू नका' तुकारामही या परावलंबित्वातून सुटलेले नाहीत, 'आम्ही काय कुणाचे खातो रे। तो देव आम्हाला देतो रे.' सर्व धर्मगुरूंची जात एकच, बुद्धच तेवढा अपवाद. त्यांनी तुमचं वैचारिक स्वातंत्र्य हिरावून घेतलं नाही. म्हणूनच आंबेडकर त्यांचे पुढे गेले म्हणून या युगाचे सर्वश्रेष्ठ नेते आंबेडकरच होत. आचार्य अत्रे म्हणतात - महार जातीत जन्माला आलेला माणूस वृत्तीने, व्यासंगाने, अधिकाराने ब्राह्मणापेक्षाही अधिक श्रेष्ठ आणि पवित्र असा ब्राह्मण आहे! एवढेच नव्हे तर 'ब्रह्मर्षि' ह्या श्रेष्ठ पदवीपर्यंत जाऊन तो पोहोचलेला आहे. डॉक्टर म्हणजे स्वाभिमानाचा एक जळता ज्वालामुखीच आहे.

आजच्या कोणत्याही सरकारपासून, अगर पक्षापासून अस्पृश्यांना खरं स्वातंत्र्य मिळेल ही शक्यता नाही. राजेंद्र बाबूपासून ते आजचे पंतप्रधान मोरारजी देसाई पाहिले तर एकही देवा-धर्माच्या व अंधश्रद्धेच्या पटंड्यातून सुटलेला नाही; अपवाद एकच तो पंडित जवाहरलाल नेहरूंचा. म. गांधी, विनोबा तसे सर्वकष क्रांतिकारक म्हणून समजले गेलेले. जयप्रकाश एकाच मालेत बसतील. राजेंद्र बाबु तर भटाच्या अंगठ्याचे तीर्थ पिऊन त्यांना स्वर्गाची (?) वाट मोकळी करून घेतली. सोमनाथ मंदिराचा जीर्णोद्धार करून उघड्या पडलेल्या देवाला आसरा करून दिला, औरंगजेब येतोय या भीतीने, पंढरपूरच्या बडव्यांनी त्यांना उत्पन्न देणाऱ्या देवाला दडवून ठेवले, काशी येथील विश्वेश्वराची मूर्ती फोडताना त्या विश्वाच्या ईश्वराने, त्यांचे हात मोडले नाहीत. त्याच ईश्वराची पूजा करण्याकरता आपल्या पिताजीचे संस्कार गुंडाळून ठेवून इंदिराजी तिरुपतीला व भारतावर अमंल गाजवणाऱ्यांनी भटांच्या आज्ञेप्रमाणे धार्मिक विधी पार पाडले. यानंतर त्यांचेच गादीवर आरूढ होणाऱ्या आजच्या पंतप्रधान मोरारजी देसाईंनी, त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून तिरुपती गाठली व भट सांगेल त्याप्रमाणे धर्मविधी उरकून घेतले, उरले सर्वंकष क्रांतिकारक जयप्रकाश. यांना भगवती देव म्हणे मार्गदर्शन करते. त्यांना आजारातून बरं केलं ते डॉक्टरांनी नसून देवी भगवतीने! तरी पण त्यांनी आपल्या आजारासाठी डॉक्टरांचे सहाय्य घेतलेच. अमेरिकेला खास उपचारासाठी गेले. विज्ञान आणि

अज्ञान यांचा संयोग म्हणायचा.

म. गांधी यांनी सर्व जनतेला लढ्याला प्रवृत्त केलं. भारत स्वतंत्र केला पण अंधश्रद्धेतून मुक्त केलं नाही, त्यांच्या आचारात-विचारात पूर्ण विसंगती दिसून येते. धड प्रतिगामी नव्हेत पुरोगामी नव्हेत. वर्णाश्रम धर्म व जातीच्या म्हणजे अंधश्रद्धेच्या अडकित्त्यातून ते सुटले नाहीत. हिंदू कोण? तर गांधीजी म्हणतात -

जात जन्मामुळे प्राप्त होते - जो जाती आणि वर्णाश्रम व गोरक्षण यावर श्रद्धा ठेवतो तो हिंदू.'

काळाराम मंदिर प्रवेशाला गांधींनी आशीर्वाद दिला नाही. उलट विरोध केला.

विनोबांनी तर गोरक्षणासाठी प्राणांतिक उपोषण जाहीर करून मोठा विनोदच केला! त्यांचा समझोता करण्यासाठी मंत्र्यांचं डेप्यूटेशन जातं हा त्यातूनही मोठा विनोद. गाईला प्राण आहे आणि इतर जनावरांना नाही? आज लोक दूध विकत घेतात ते म्हशीचं, गाईचं अपवाद पूर्वी बैलाचा उपयोग शेतीला होत होता. आता ट्रॅक्टरने त्याची शेतीतली उपयुक्तता समूळ नष्ट केली. तर हा अशास्त्रीय आग्रह कशासाठी? त्याचं ग्रामदान हेही ऑफीस झालं. टाकाऊ व खकट्यात अडकलेल्या जमिनी दान करून जमीनदारांनी फुकटाचा मोठेपणा मिळवला. त्यांचे दौरे म्हणजे खेडुतावर धाड. यांचेबरोबर फुकटखाऊ ध्येयनिष्ठांची फलटण असायची. त्यांना मीच पन्हाळ्याचे मुक्कामावर याची जाणीव करून दिली होती. पण मला यातलं काही माहित नाही असं त्याचं उत्तर मिळालं. यांनी मराठवाड्यातील दंगल पाहून उपोषण केलं असतं तर अनेकांचे प्राण वाचले असते. गाईच्या प्राणापेक्षा त्याला महत्त्व होते. मोरारजी म्हणतात, 'प्रत्येक विद्यार्थ्याने रामायण-महाभारत जवळ ठेवावे. ज्या रामाने शूद्राने धर्मग्रंथ वाचला म्हणून एका ब्राह्मणाने तक्रार करताच शुद्राला ठार मारले, एका परिटाने सीतेच्या पावित्र्याची शंका घेतली म्हणून, आपल्या गर्भवती सहधर्मचारिणीची चौकशी न करता त्याग केला! रावणाच्या बहिणीचे नाक कापून स्त्री-दाक्षिण्याचे प्रदर्शन केले एकलव्य धनुष्य मारण्यात अर्जुनाहून प्रवीण झालेला न खपून द्रोणाचार्यांनी त्याचा अंगठा तोडला, हाच आदर्श मास्तरांनी गिरवायचा काय? याच वृत्तीतून आंबेडकर ब्राह्मण मुलांच्या वरचढ होतील म्हणून संस्कृत शिकू दिले नाही, पण स्वतंत्रपणे शिकलेच.

यशवंतरावजी चव्हाण अधिकारावर असते, तर मराठवाडा विद्यापीठाचा प्रश्न इतका चिघळला नसता. त्यांनी पददलित अस्पृश्यांच्या समस्या सोडवण्याच्या दृष्टीने योग्य दिशेने पावले टाकली होती. म्हणून भारतीय रिपब्लिकन पक्ष नेत्यांनी व नवदीक्षित बौद्ध जनतेने, नागपूर येथे १६-१२-१९६० रोजी दीक्षा भूमिमैदानावर त्यांचा प्रचंड सत्कार केला, या समारंभाचे अध्यक्ष खा. दादासाहेब गायकवाड होते. मुख्य वक्ते ज. से. खोब्रागडे होते. यशवंतराजींनीच गुलामी पद्धतीची महार वतनी पद्धत नष्ट केली, यासाठी बाबासाहेबांनी खूप प्रयत्न केले होते, पण यश मिळाले नाही. केवळ बुद्ध धर्माचा स्वीकार केल्याने त्यांचा सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक मागासलेपणा नष्ट होत नाही, हे मान्य करून, त्याबाबतीत सवलती देण्याचे हुकूम सर्व खात्यांना दिले. यशवंतरावांनीच आंबेडकर जयंतीची सुटी जाहीर केली, नागपूर येथे ज्या भूमीवर आंबेडकरांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेतली, ती बौद्धांच्या स्वाधीन केली. दिल्लीच्या पार्लमेंटसमोर जो भव्य स्टॅच्यू उभा आहे, त्या समितीचे अध्यक्ष यशवंतरावजीच होते.

यशवंतरावजी नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'ऋणानुबंध' या पुस्तकात म्हणतात, परवा मराठवाड्यात झालेली उग्र निदर्शने व दंगली पाहिल्या, म्हणजे आमच्या आशावादाचा तात्पुरता का होईना, पण पराभव झाला आहे असे मला वाटते, या जातीयतेच्या अंधारामध्ये कोणाला वर येता येणे शक्य नाही.

यशवंतरावजींचे मानसपुत्र आज महाराष्ट्राचे मुख्यमंत्री आहेत. त्यानी विधीमंडळात पास केलेला ठराव तेव्हाच अमलांत आणायला हवा होता. शांतता निर्माण होईल या अपेक्षेने, विलंब लावल्याने शांतता निर्माण होणार नाही. शांतता निर्माण करण्यासाठी लष्कराचं सहाय्य तो ठराव अंमलात आणावा, असे मी सुचवितो.

तथापि अस्पृश्यांनी परावलंबित्व टाकून संघटना बळकट करावी. फाटाफूट नष्ट करावी. आंबेडकरांना मानणाऱ्या सर्व व्यक्तींनी व पक्षांनी एक व्हावे व प्रतिकाराला सज्ज व्हावे. आपल्या संघटनेचे पुढारीपण आपल्याचकडे ठेवावे. जोपर्यंत जातिवाद आहे, तोपर्यंत सर्व दलित एक होऊ शकत नाही.

ब्राह्मण, दलित, मराठा, दलित यांचा दर्जा समान नाही म्हणून -

'Workers of the world unite' ही घोषणा येथे युरोप अमेरिकेप्रमाणे परिणामकारक होणार नाही. खुद्द अस्पृश्य वर्गातच सत्ता व स्वार्थासाठी हपापलेले

समाजद्रोही, गीता-रामायणाचा उदोउदो करणारे नामांतराची चळवळ हत्या होते, म्हणून बंद करा, म्हणणारे सूर्याजी पिसाळ आहेत. राखीव जागेमुळे अस्पृश्यांना खूश करून हे निवडून आहेत. त्याला जबाबदार गांधीच होत. यांना ओळखून बाजूस ठेवले पाहिजे.

कोल्हापूरला संमेलन भरल्यानंतर राजर्षी शाहूंच्याबद्दल चार शब्द न बोलणे कृतघ्नपणाचे ठरेल. महाराज सुरुवातीस जातिवादी होते, धर्मभोळे होते, मूर्तिपूजक होते, पण त्यांच्या विचारात व आचारात अनुभवाने सारखा बदल होत गेला आहे. मृत्यूपूर्वी दोन वर्षे त्यांनी जाहीर केले की, मला ही अंधश्रद्धा व तिची कारणे समूळ नष्ट करावयाची आहेत.'

ते असते तर आंबेडकरांच्या हातात हात घालून, भारतात सामाजिक व धार्मिक क्रांती घडवून आणली असती व राज्यशकट अस्पृश्यांचे हाती आला असता, टिळकांच्या राजकारणाला उखडून टाकलं असतं.

मी गडकऱ्यांच्या शब्दात तुम्हा सर्वांना अपील करतो,

*चला रूढीवर आता घसरा। टाकुनी सीमा मृत धर्माच्या,*
*अंधपणाच्या ।। अहंपणाच्या ।। जुन्या मताचा जाळा कचरा ।*
*श्रुति-स्मृतींना आता विसरा। अंध भक्तीचा पांगुळगाडा।*
*पाताळी तो नेऊन गाडा ।। जरिपटका घ्या सुधारणेचा।*
*भगवा झेंडा नव्या मताचा । नव्या दमाने फडकविण्याचा ।*
*मानव धर्माचा दसरा।*

आंबेडकरांचं मानव धर्म प्रस्थापित करणं हेच ध्येय होतं.

बुद्ध, फुले, कबीर या सर्वांचं ध्येय मानवता हेच होतं.

माणूसपणा आला की सर्व काही आलं। माणूसपणा आला की लोकशाही आली। धर्मभेद गेले। वंशवेद गेले। राष्ट्रभेद गेले। माणूसपणा म्हणजे सर्वश्रेष्ठ नीती।

माणूसपणा आला की पिळवणूक गेली. पिळवणूक गेली की भांडवलशाही गेली. भांडवलशाही गेली की साम्राज्यवाद गेला शस्त्रसत्ता गेली. सहकार्य आले. 'मी' ही भावना जाऊन 'आम्ही' ही भावना आली. संमेलनात महाराष्ट्रात नामवंत लेखक, कवी, कथाकार जमले आहेत. मी स्वत: कवी व साहित्यिक नसल्यामुळे तुम्हाला मी काय सांगणार. पण सत्यशोधक ना. भास्करराव जाधव यांनी साहित्याबद्दल मला जे मार्गदर्शन केले, तेच आपल्याला सांगणार आहे. १९३४ साली दासराय जाधव यांनी काढलेल्या बालमासिकात

'वन्देमातरम्' यावर मी एक संवाद घातला होता. तो -
मास्तर मुलांना म्हणतात- अरे 'वन्दे मातरम्' गीत म्हणा पाहू ?
**अस्पृश्य मुलगा :** 'वंदे मातरम् म्हणजे काय ?
**मास्तर :** वंदे, म्हणजे नमस्कार असो, मातरम् म्हणजे आईला, काळ्या आईला. म्हणजे जमिनीला. कारण तीच आम्हाला अन्न देते, फळ देते, म्हणून तुला प्रणाम.'
**अस्पृश्य :** पण मास्तर, आम्हाला जमीन कुठं ? आम्ही भूक लागली म्हणून समोरच्या शेतात जाऊन आंबे पाडले, शेतातली चार कणसे घेतली तर आम्हाला शेतकऱ्याने लाथा-बुक्क्या मारल्या, घेतली कणसे व शेताच्या बाहेर ढकलले व म्हणाला पुन्हा शेतात पाय टाकला तर कंबर मोडीन, मग आम्ही का त्या आईच्या पाया पडायचं ? कुठं आहे आम्हाला आई ?

हा लेख वाचल्यावर जाधवरावांनी मला आपल्या बंगल्यावर बोलावून घेतले. पाठीवर थाप मारली व म्हणाले, 'माधवराव, छान लेख लिहिलात, तुम्ही निर्भय आहात. तुमची भाषा अगदी सोपी आहे ती तशीच ठेवा, जोडाक्षरे येऊ देऊ नका. संस्कृत आलाच तर खड्यासारखा निवडून बाजूस काढा.

लेख आईला अगर भांडी घासणारणीला वाचून दाखवावे. त्यांना समजला म्हणजे पुरे. तोच आपला बहुजन कष्टकरी समाज, बड्या साहित्यिकांची शिफारस नको. लेखकांनी व कवींनी महारवाड्यात, मांगवाड्यात जाऊन आपले कथा-लेख व काव्य वाचून दावावे. त्यांना समजले म्हणजे झाले. आंबेडकरांनी जी घटना तयार करून दिली ती टिळकाप्रमाणे एकांगी नाही, ती सर्वकषक्रांतीकारक आहे. जग बदल घालुनी घाव.' हे आंबेडकरांनी केवळ अण्णा भाऊ साठ्यांनाच सांगितले नसून तुम्ही-आम्ही सर्वांनीच घडून आणायचे आहे. अस्पृश्य हाच भारतातला खरा प्रोलिटेरिएट आहे त्यालाच अमरशेख बेभान होऊन गरजतात.

*'उघड नेत्र तो तिसरा भयंकर*
*लाले लाल अंगार,*
*ऐतखाऊचे कर निर्दालन,*
*घे रुद्र अवतार,*
*घेई आता ही एकजुटीची मशाल*
*उचला निशान, उचला निशान*

एवढं बोलून मी संमेलनाचं उद्‌घाटन करतो.

***(सामाजिक विचार मंथन)***

## १) राष्ट्रीय कला

कला ही काही खास लोकांसाठी आहे, तज्ज्ञांसाठी आहे हे म्हणणे अगदी चुकीचे आहे. तिची आवश्यकता श्रीमंतांना आहे तशी गरिबांना आहे. शिक्षितांना आहे तशी अशिक्षितांना आहे. सौंदर्याच्या दर्शनाने सर्वांची मने शुद्ध होतात. प्रफुल्लीत होतात, सुंदर स्त्री, सुंदर फूल, सुंदर मूल, सुंदर देखावा याचे आकर्षण काय सुशिक्षितांनाच होते, आणि अशिक्षितांना काहीच नाही?

मनुष्याची पोटाची भूक जशी स्वाभाविक आहे, तशीच इतर इंद्रियांची भूकही तितकीच स्वाभाविक आहे. गाण्याची लकेर कानावर पडताच साप नाही का डोलू लागत? मानवकोटी ही त्यापुढची अवस्था. त्याच्या इतर इंद्रियांचीही वाढ झाली आहे. म्हणून हवापाण्याइतकीच हीही भूक नैसर्गिक आहे.

चांगली कला म्हटली म्हणजे ती भारतीय असो वा पाश्चिमात्य असो. तिचे ध्येय व हेतू त्या त्या समाजाच्या त्या वेळच्या उद्दिष्टाला धरूनच असतात. तंत्रात फरक पडत असतो. साधनात पडत असतो. कारण त्याचीही वाढ होत असते. नवे शोध, नवी सुधारणा, नवे अनुभव याची भर त्यात पडतच असते.

भाषा निराळी असली तरी उद्दिष्ट एकच असते.

मनातले विचार, आशा, महत्त्वाकांक्षा ध्येय प्रगट करणे. हे सारे त्या सामाजिक परिस्थितीवर, त्यांच्या विचार-आचारावर अन् वातावरणावर अवलंबून असते.

हिंदी कलेची धाव अध्यात्माकडे वळली तर ग्रीस, रोम वगैरे पाश्चात्त्य राष्ट्रांच्या कलेची धाव प्रत्यक्ष वस्तुनिदर्शनाकडे वळली. याचं कारण त्या त्या राष्ट्राची भौगोलिक परिस्थिती हे होय.

भारताचा निसर्ग-समृद्ध असल्यामुळे, पोटासाठी त्याला फारशी

धडपड करावी लागली नाही. निसर्गाशी शत्रुत्व करावं लागलं नाही. तो अतृप्त अगर असंतुष्ट नव्हता. परमेश्वरच आपल्या गरजा भागवतो -

"आम्ही कुणाचे खातो रे. देव आम्हाला देतो रे" अशी श्रद्धा निर्माण झाली आहे. त्यामुळे त्याच्या मनाची धाव अध्यात्माकडे वळली. त्यामुळे संतांचं पीक फोफावलं.

ब्रिटिश राष्ट्राला निसर्ग-समृद्ध नव्हता. सागराच्या लाटा सारख्या तडाखा देत होत्या. अन्नाचा तुटवडा आणि सागराचं शत्रुत्व. अंतर्मुख होण्याला त्यांना अवसरच नव्हता. असंतुष्ट पोटोबा विठोबाची पूजा कशी करणार. दारावर शत्रू धडक्या मारीत असताना डोळे मिटून समाधी कशी मिळणार?

इंग्लंडसारख्या देशाला जगण्यासाठी निसर्गाशी सतत झगडा द्यावा लागला. सताड डोळे उघडे ठेवून सदैव जागृत रहावं लागलं. अध्यात्माकडं जायला फुरसत नव्हती. साहजिकच या परिस्थितीचा परिणाम कलेवर झाला, ती कला वस्तुनिष्ठ झाली. रियालिस्ट झाली.

पाश्चिमात्य कला आक्रमक, निसर्गाशी झगडा देणारी, त्याला काबूत आणणारी, त्यावर वर्चस्व गाजवणारी, सत्यसृष्टीवर आधारलेली, जडवादी बनली.

हा त्या त्या परिस्थितीचा परिणाम-

म्हणून आपलीच कला श्रेष्ठ असं म्हणणं योग्य होणार नाही. तो इतर राष्ट्रांवर अन्याय होईल.

हिंदी कलावंतांनी कल्पनाशक्तीवर भर दिला.

पाश्चात्त्यांनी प्रत्यक्ष वस्तुनिदर्शनावर भर दिला.

नाही तरी कल्पनेचा पाया प्रत्यक्ष वस्तू हाच असतो. त्या शिवाय कल्पनेचे पतंग आकाशात गिरक्या मारत नाहीत. पृथ्वीवरच्या दोऱ्याचा आधार त्याला घ्यावाच लागतो.

भारतीय कला स्फूर्तीदायक, विचाराला गती देणारी; तर युरोपिय कला यंत्रमय जीवन झालेल्या युरोपियनांच्या, वेगाने विचार करणाऱ्या मेंदूला क्षणमात्र गुंगवणारे औषध. दाट धुक्यामध्ये इमारतीचे निरनिराळे भाग जसे अंधुक दिसतात तशी हिंदी कलाकृती स्वप्नमय वाटते. भारतीय कलेला चांगल्या नमुन्याला उपमाच द्यावयाची तर, उष्मा होणाऱ्या दिवशी सुटलेल्या शीतल वाऱ्याची, प्रसन्न झुळकेची द्यावी लागेल. अन् युरोपिय कलेचा उत्तम नमुना म्हणजे कडक थंडी पडली असता, शेगडीत धगधगणाऱ्या झळझळीत

निखाऱ्याच्या उबाऱ्याची द्यावी लागेल.

आता आम्हाला स्वप्नमय धुक्यातून डोकं वर काढायचं आहे. तसंच भाजून काढणाऱ्या धगधगीत निखाऱ्यापासूनही दूर रहायचं आहे.

पाश्चिमात्त्यांनी निसर्गाशी झगडा देऊन ऐहिक सुखाची जणू परमावधी गाठली आहे. म्हणून आता त्यांची दृष्टी अध्यात्माकडे वळणे साहजिकच आहे. भारत ऐहिक सुधारणेच्या दृष्टीनं मागे पडल्यामुळे तो डोळे उघडून पाश्चिमात्त्यांची यांत्रिक प्रगती आत्मसात करू पहात आहे. म्हणून त्यांची दृष्टी अध्यात्माकडून ऐहिकाकडे वळणे तितकेच स्वाभाविक आहे.

आज जुने ते जुने राहिलेले नाही. नवे ते सर्व आत्मसात केले नाही. म्हणून जुन्या-नव्या संस्कृतीचा अन् तंत्राचा अभ्यास करून आमच्या कलावंतांनी आधुनिक कला समृद्ध केली पाहिजे. जुने ते सर्व चांगले ही भूमिका प्रगतीला पोषक नाही. तसंच पाश्चिमात्त्यांचे सर्व ते वाईट ही भूमिका प्रशंसनीय नाही. दोन्हीतील चांगल्याची निवड करून आजची कला समृद्ध बनवली पाहिजे. हिलाच मी आधुनिक राष्ट्रीय कला असं म्हणेन.

आम्हाला अगदी सोवळं असं राहताच येणार नाही. यांत्रिक युगामुळे जग लहान होत चाललं आहे. एका राष्ट्राचे संस्कार दुसऱ्या राष्ट्रावर रोज होत आहेत. हीच आमची संस्कृती म्हणण्याचा काल मागे पडत आहे. सर्व जगाची अशी नवसंस्कृती तयार होत चालली आहे.

पूर्वीची भाषा राहिली नाही. विचार राहिले नाहीत. आचार राहिले नाहीत. जाणता-अजाणता बदल हा होतच आहे. मग कलेत तो झाल्याशिवाय कसा राहील ?

आम्ही अजंठा कालात रहात नाही, तसं अत्यंत आधुनिक अशा पाश्चिमात्त्यांच्या प्रगत वातावरणातही वावरत नाही. त्यावेळच्या कालात अजंठा कलेनं कल्पनेत आणि रेखानैपुण्यात उच्चांक गाठला होता. पण ती परिपक्व अवस्थेत गेली होती असं कसं म्हणता येईल. आज कलाशास्त्रात, साधनात आणि विचारात कितीतरी भर पडली आहे. त्याचा इन्कार कसा करता येईल ? सर्व काही आहे ते वेदांत आहे असं म्हणणं हा केवळ दुराग्रहच नव्हे तर आपलं अज्ञान प्रगट करण्यासारखं आहे.

वेदकाली कला प्रथमावस्थेत होती. अपरिपक्व साधनामुळे, तंत्रामुळे व अनुभवामुळे ती सदोष राहिली. इतर कलेचे तिच्यावर परिणाम झाले नाहीत.

आपला देश सोडून बाहेर जाण्याला, आपल्या धर्मानेच प्रतिबंध केला होता. त्यामुळे इतर देशातील कलावंतांचा संपर्क येऊ शकला नाही. म्हणून कलाही संकुचित मर्यादा ओलांडू शकली नाही. वेदकालीन कला ओबड-धोबड राहिली. हिंदुधर्मातले दोष काढून बुद्ध धर्माने त्यात सुधारणा केली. तीच गोष्ट बुद्ध कलावंतांनी केली. मोगल कलेवर वेदकालीन, बुद्धकालीन व पाश्चिमात्त्यांची कला या तिन्ही कलांचा परिणाम झाला आहे.

अजंठाने एक खास वैशिष्ट्य संपादन केले. अद्यापही त्या कलेचं कौतुक सर्व जग करीत आहे. त्या काली कलेने इतकी मजल कशी मारली याचं आश्चर्य आजच्या जगालाही वाटत आहे. इकडे रोम कलेनं प्रत्यक्षाचा आभास निर्माण करण्यात जगाला थक्क करून सोडणारी प्रगती केली होती. वेद आणि बुद्ध कालानंतर मोगल अंमदानीत "ताज" निर्मितीने ' न भूतो न भविष्यती' असा अद्भुत चमत्कार उभा केला. म्हणून आजच्या कलावंतांना -

वेदकालीन कला, अजंठाकालीन बुद्ध कला, मोगल कला व पाश्चिमात्त्यांची रीत व ग्रीसची कला या सर्व कलांचा विनम्रभावे अभ्यास करून आपली आजची कला समृद्ध करणे आवश्यक आहे. अशा सर्वसंग्राहक वृत्तीतूनच आपल्या राष्ट्रीय कलेची वाढ होणार आहे.

पौर्वात्त्य आणि पाश्चिमात्त्य संस्कृतीचा सुंदर संगम म्हणजे आमचे पंडित नेहरू.

तेच आमच्या राष्ट्राचे प्रतीक.

कलेनंही त्यांचंच अनुकरण केलं पाहिजे.

तीच आमची राष्ट्रीय कला होय.

हा गोड संगम "बॉंबे सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या प्रिन्सिपॉल ग्लॅडस्टन सालोमन यांनी घडवून आणला होता. त्यांनी अजंठातील उत्कृष्ट रेखानैपुण्याची पाश्चिमात्त्य, परिणत वस्तुनिष्ठ कलेशी सांगड घालून नवभारताच्या राष्ट्रीय कलेला चालना दिली होती. तीच आजच्या कलाकारांनी पुढे चालू ठेवली पाहिजे.

मॉडर्न आर्टच्या नावाखाली चाललेल्या विकृत कलेचा स्वीकार करू नये.

*(कलाविहार)*

## २) मॉडर्न आर्टचे दर्शन

मी निसर्गाचा शोकी. पन्हाळा जवळच असल्यामुळे मला निसर्गाचं ते भव्य उदात्त स्वरूप पाहण्याची नेहमीच ओढ लागे. याचमुळे पन्हाळा पाहण्यास मी नेहमी जात असे. बरेच दिवस गाठ न पडलेल्या मित्राकडे जाताना जो आनंद वाटावा तसा मला वाटत होता.

पन्हाळा गडावर माझ्या एका मित्राचा बंगला होता. त्या बंगल्यात खास पन्हाळ्याची चित्रे काढण्याकरिता एक आर्टिस्ट उतरले होते. आपली चित्रे पाहण्याकरता त्यांनी माझ्या मित्राकडून मला आमंत्रण दिले होते. मीही गडावरची पुष्कळ चित्रे काढली होती. साहजिकच त्यांच्याही कामापासून मला काही तरी शिकता येईल म्हणून मी त्यांची चित्रे पाहण्यास उत्सुक होतो.

बंगल्यासमोरच्या व्हरांड्यात खुर्च्या टाकून बसल्यावर त्यांनी आपली कामे सर्वांसमोर ठेवली. चार-पाच जण होतो आम्ही. मी चित्रकलेचा कोर्स पुरा केल्यामुळे कलेतला थोडा अधिक माहितगार, चित्र पाहिल्यास ते अमक्या जागेचे एवढे समजण्याची पात्रता खास माझ्या अंगी आली होती. पुष्कळच चित्रे दाखवली त्यांनी. ती पाहिल्यानंतर मी त्यांना म्हणालो, "पण पन्हाळ्यावरची चित्रे कुठे आहेत?"

त्यावर ते म्हणाले, "सारी इथलीच आहेत की."

यावर मी अगदी चाट पडलो. त्यातलं एकही चित्र मला पन्हाळ्याचं दिसेना. मला तर कोनाकोपरा ओळखीचा. विशेष सौंदर्याची अशी बहुतेक स्थळे मी स्वत: काढलेली. त्यातलं एकही त्यात दिसत नव्हतं. इतकंच नव्हे तर निसर्गाचा भास होईल असंही चित्र मला आढळेना. कागदावर रंगाच्या आकृत्या होत्या, पण त्यातून मला कसलाच अर्थबोध होईना. मी कलेच्या सेवेत सातआठ वर्षे काढलेली. पण निसर्ग अथवा माणूस यातलं साम्य मला कोणत्याही चित्रात दिसेना. काही त्रिकोण, काही चौकोन, काही अर्धवर्तुळ असा काही प्रकार दिसू लागला. हातापेक्षा फूटपट्टी, कंपास व त्रिकोण याचाच उपयोग केल्याचे दिसत होते. कागदावर काहीतरी काढले होते. पण ते माझ्या आकलनशक्तीच्या पलिकडचे होते. न समजणाऱ्या बोलीत कोणीतरी बोलू लागला म्हणजे जसे वेड्यासारखे होते तसे झाले मला. जवळ बसलेल्यांना ती चित्रे दाखवली. त्यांना तर त्यातले काहीच समजू शकले नाही. तेव्हा मी अचंब्याने विचारले -

"ही कशाची चित्रे ? आम्हाला काही समजत नाही यातलं". यावर ते म्हणाले, "ही चित्रे दुसऱ्याकरता नाहीतच मुळी. मी ती लोकांकरता अशी काढलीच नाहीत. ती केवळ माझ्या समाधानाकरता आहेत." या उत्तराने मी अगदीच चरकलो. चिडलोही पण.

चटकन माझ्या हातातला ढिगारा त्यांच्या स्वाधीन केला व म्हणालो, "असं जर होतं तर ती चित्रे तुम्ही आम्हाला दाखवायचं काहीच कारण नव्हतं", ती तुमच्या ट्रंकबाहेरही काढायला नको होती. अशी चित्रे काढली काय न् फाडली काय ? समाजाला त्याच्याशी काही कर्तव्य नाही !

चित्रे केवळ माझ्या समाधानाकरता आहेत म्हणे".

या चित्रकाराने काय केवळ स्वत:च्याच मेहनतीने कला वाढवली ? यांना कोणी वाढवलं ? यांच्या आईबापांना कोणी पोसलं ? शाळेत शिकत असताना यांना कोणी जगवलं ? यांच्या रक्ताचा कण अन् कण समाजानंच नाही का पोसला ? यांच्या अन्नासाठी शेकडो शेतकरी अहोरात्र राबत आहेत. वस्त्र पुरवण्याकरता हजारो मजूर गिरणीत काम करीत आहेत. बरे त्या कलेची साधना तरी कुणी निर्माण केली ? कुंचले कोणी तयार केले ? रंग कोणी घोटले ? ते कॅनव्हास आणि कागद तयार करण्याच्या कारखान्यात किती मजूर आपले रक्त आटवत आहेत. पूर्वीच्या कलावंतांचा व जनतेच्या श्रमाचा, कौशल्याचा व ज्ञानाचा साठा मागे आहे म्हणूनच आपण पुढे पाऊल टाकीत असतो.

**कलेचा अध:पात** : जनतेपासून, सत्यापासून आणि अनुभवापासून सुटलेली कला म्हणजे कलेचा अध:पात होय. मग ती अगम्य, अर्तक्य अशा गूढवादात शिरू लागते.

कलेकरता कला या विकृतींना मुलामा चढवण्यात येतो.

कुंचला आणि लेखणी ही समाजात विचारक्रांती घडवून आणणारी हत्यारे आहेत. साहित्यिक व कलावंत ती पेलणारे सैनिक, नेते व वीर पुरुष होत.

बहुजन समाजाच्या शत्रूंनी, वर्गाने व राजसंस्थेने आपल्या पिळवणुकीला नैतिक पाठिंबा मिळविण्याकरता कलावंतांना, साहित्यिकांना व संशोधकांना पैशाने व दहशतीने आपल्यासाठी राबवण्याचा प्रयत्न केला आहे. अशा गुलामांनी व आश्रितांनी आपल्या लेखण्या व कुंचले आपल्या मालकासाठी झिजवले आहेत.

साहित्यिकाला आणि कलावंताला विकत घेतले की हे त्यांचे भाट

बनतात. विचाराला कलाटणी देतात. यामुळे पिळवणूक करणाऱ्यांचा धोका टळतो. त्यांच्या स्वार्थी पिळवणुकीला नैतिक पाठिंबा मिळतो. याचमुळे पिळवणुकीवर जगणारे, कलेला उपयुक्ततेपासून, समाजापासून अन् राजकारणापासून दूर ठेवतात. कलेने प्रचार हाती घेतला की आकाशपाताळ एक करतात. कलेचे स्वातंत्र्य गेले म्हणून टाहो फोडतात. पण असा कितीही प्रयत्न केला तरी कला ही समाजाच्या गरजेपासून, उपयुक्ततेपासून, राजकारणापासून आणि प्रचारापासून अलग ठेवताच येणार नाही.

**गरजेतून वाढ :** दुसऱ्या माणसाचं लक्ष वेधण्याकरता खाणाखुणा, नंतर आवाज, आवाजातून वाणी, वाणीतून लिपी, त्या लिपीची सुरुवात चित्रांच्या साधनांनी, त्यातून अक्षरे, पुढे वाङ्मय आणि नंतर साहित्य -

यावरून कळून येईल की समाजाच्या गरजेतून कलेचा विकास झाला आहे. प्रथम मानवी गरज. नंतर कल्पनाविलास आणि प्रतिभा. मूळ चालना मिळाली ती मानवी गरजेतून. जगण्याची धडपड ही प्रथम. ती भागल्यानंतर मग कल्पनाविलास, कल्पनेलाही जड वस्तूचा आधार लागतो. मग कल्पनेचा विलास विहार करू लागतो. प्रतिभेला गती मिळते.

मनुष्य जंगली अवस्थेत ओंजळीने पाणी पीत असे. तो त्या ओंजळीच्या आकाराच्या वाट्या पाणी पिण्यासाठी करू लागला. मग त्या वाट्यांना तो आकार देऊ लागला. येथेच त्याच्या कलेचा विकास सुरू झाला. गरज, तंत्र आणि प्रतिमा यातून कलाकृती बाहेर पडू लागली. अगदी प्रथमावस्थेत पशुपक्षी, माणूस यांचा बोध होणारी ठोबळ आकाराची चित्रे आढळून येत. त्यावेळच्या चित्रात त्यावेळचे कपडे, दागिने, भांडी अर्थात येणारच. गाण्यातली तालबद्धता हीही अशीच श्रमातून निर्माण झाली. कांडताना निघणारा हूं हूं असा ठेका. जमीन तयार करताना ठेक्यात बडवण्याचा व त्याचबरोबर निघणाऱ्या सुराचा आवाज - जात्यावरची गाणी या गोष्टी हेच सिद्ध करतात. कलेचा उगम हा उपयुक्ततेतूनच आहे. गायन, वादन, नृत्य या कलांच्या उगमाकडे पाहिले तर या कलांनाही सामुदायिक श्रमानेच जन्म दिला आहे.

समाजबंधनातून, सहकार्यातून कलेला धार चढली आहे. तिला जिवंतपणा आला आहे.

चित्रकार हा भावनाप्रधान असल्यामुळे समाजातील चांगल्या-वाईट गोष्टींचा, अन्यायाचा, जुलमाचा, दारिद्र्याचा परिणाम होतो. त्या तळमळीतून

त्याची कलाकृती रूप धारण करते. समाजाशी एकरूप झालेला समाजकारण, धर्मकारण, अर्थकारण यापासून अलिप्त राहू शकत नाही.

**देशभक्त कलावंत :** आयर्लंडच्या स्वातंत्र्याची कवने शेलेनं रचली. इटलीच्या स्वातंत्र्यासाठी तो जातीने लढला. ब्रिटिश कामगारांच्या बाजूने निवडणुकीस उभा राहिला. बायरने ग्रीसच्या स्वातंत्र्ययुद्धात स्वतःचा बळी दिला. फ्रान्सच्या लोकशाहीचा व्हिक्टर ह्यूगोने पुरस्कार केला व अन्याय चव्हाट्यावर आणले. डिकन्सने उन्मत्त सरदारशाहीला उघडे केले. क्रांतीची स्फूर्तीदायी चित्रे डिलेक्रोने रंगवली. गोयाने जेत्याविषयीच्या द्वेषभावनेला उठाव दिला. श्रीमंत सरदारांच्या राक्षसी खेळांचे अमानुष स्वरूप उघडे केले. डोस्टोव्हस्की आपल्या लेखनाने झारशाहीच्या अवकृपेत आला. टॉलस्टॉयला रशियन चर्चने वाळीत टाकले. शाळेत त्याच्या नावाचा उच्चार करण्यासही बंदी केली. यावऱ्हान तुर्गेनिव्ह हा तर रशियन क्रांतीचा प्रेरक होता. राजशाही उलथून पाडण्याला त्याने वातावरण निर्माण केले. अलिकडचे इंग्रजी लेखक राल्फ फॉक्स, जॉन कॉनफॉर्ड, ख्रिस्तोफार काडवेल यांनी तर रणांगणावर देह टाकला. अमेरिकन भांडवलवाल्यांनी लेखक हावर्ड फास्ट, गायक पॉल रायसन यांच्या खुनाचा प्रयत्न केला. चँग-कै-शेकने अनेक कलावंतांना तुरुंगात टाकले.

पण आपली कला विकलेल्या व्यभिचारी आश्रितांनी "कलेकरता कला" या बुरख्याचा आश्रय घेतला व आजही घेत आहेत.

**कलावंताचा कस :** कलावंत ज्या काळात वावरत होते त्या काळाच्या बहुजन समाजाची बाजू घेतली की नाही, त्या काळाला पुढे ढकलणारे त्यांचे विचार होते की नाही त्या काळाच्या पुढे दृष्टी होती की नाही, दलितांच्या गाऱ्हाण्यांना, दुःखांना, त्यांच्या महत्त्वाकांक्षांना त्यांनी वाचा फोडली की नाही याचा विचार करून त्यांचा दर्जा ठरवावा लागेल.

यादृष्टीने रामायण, महाभारत, शाकुंतल हे त्या काळचे पुरोगामीच वाङ्मय ठरेल. तुकारामाचे अभंग क्रांतिकारक ठरतील. कुराण, बायबल, गीता हे ग्रंथ धार्मिक असूनही पुरोगामीच म्हणावे लागतील. कारण त्या काळाचे पुढे त्यांनी पाऊल टाकले होते.

फूल, मूल यातील किंवा निसर्गातील आनंद भोगता येतो. रेनॉल्डच्या बालकांच्या चित्रांनी, फ्रेन ब्रॅगविनच्या फलाफुलांनी निसर्गातही आनंद काही कमी भोगता येत नाही. तथापि निव्वळ करमणुकीची ही कला दुय्यम दर्जाचीच

ठरेल. ती अल्पसंतुष्ट म्हणावी लागेल. हे चित्रकार प्रवाहावरचे बुडबुडे पाहण्यातच रंगतील, पण प्रवाहात बुडी मारून त्याला घुसळणारे व प्रवाहाला आपल्या इच्छेप्रमाणे वळण देणारे मार्गदर्शक ठरणार नाहीत.

**तीच कला श्रेष्ठ कला होय :** सौंदर्य, जीवन आणि संदेश याने समृद्ध झालेली, नवसंस्कृती निर्माण करणारी, तीच खरी राष्ट्रीय कला होय. समाजाच्या जीवनाशी समरस होऊन त्यातील विरोध विकासाचा अभ्यास करून, पुरोगामी शक्तींना चालना देणारी कलाच श्रेष्ठ होय.

पण जी चित्रे काढली आहेत, ती का काढली आहेत, त्यांचा हेतू काय हे सामान्य जनांना समजू शकत नाही, जाणत्यांनाही समजत नाही, त्या कलेला फक्त विकृतीच म्हणावी लागेल. मॉडर्न आर्ट ही ती विकृती होय.

**कला नव्हे विकृती :** या मॉडर्न आर्टचे एक चहाते, अभिमानी व उपासक त्या कलेचे समर्थन करताना म्हणतात, "ही कलाकृती समजून घ्यायला दिव्य चक्षू प्राप्त करून घ्यावे लागतील. काही चित्रे अशी असतात की नुसत्या चर्मचक्षूंनी समजतात. काहींच्या बाबतीत अंत:र्चक्षूची मदत घ्यावी लागते. आणि नंतरच मनाला समाधान वाटते. हे दिव्य चक्षू प्राप्त करून घ्यावे लागतात."

केवळ्या गूढ रहस्यमय अध्यात्मज्ञानाचे प्रकटीकरण हे. अशी चित्रे डोळे मिटूनच अंत:र्चक्षूंनी पहावीत. अशी प्रवचने पण डोळे मिटूनच ध्यानस्थ होऊन समाधीच्या अवस्थेत ऐकावीत. उघड्या डोळ्यांनी पाहण्याची नाहीत. उघड्या डोळ्यांनी ऐकायची नाहीत.

इहलोकीचा संबंध ठेवून ही चित्रे पाहता येणार नाहीत. त्यांची प्रवचने पण ऐकता येणार नाहीत. त्या निर्वाण अवस्थेलाच तो माणूस पोचला पाहिजे. थोडक्यात म्हणजे तो देवलोकीच गेला पाहिजे. आकाराचा निराकार झाला पाहिजे. विश्वात विलीन झाला पाहिजे. हे येरागबाळ्याचे काम नव्हे. तशी तपश्चर्या, तसे निर्मल, पवित्र एकांगी जीवन काढणाऱ्यालाच या दिव्य चक्षूंचा लाभ होणार. तो पण त्याच्यापुरताच. ती दिव्य दृष्टी जनतेला येण्याची शक्यता नाही. या मर्त्य लोकांतील सर्वसामान्यांनी या चित्राचा अर्थ काढण्याच्या फंदात पडू नये.

पण उघड्या डोळ्यांनी जगाकडे पाहणाऱ्या, अभ्यास करणाऱ्या आणि कलातंत्र हस्तगत करण्याकरता सारी हयात खर्ची घालणाऱ्या, विद्यार्थ्याप्रमाणे

रेखा, रंग, रचना, कल्पना चित्रित करण्यासाठी आयुष्याच्या अखेरच्या काळपर्यंत धडपडणाऱ्या व ज्यांच्या हाताखालून शेकडो विद्यार्थी तयार झाले आहेत, नावारूपास आले आहेत, असे कलातपस्वी (हळदणकर) म्हणतात-

**कलातपस्वी म्हणतात :** मॉडर्न आर्ट म्हणजे नवकला, हे एक वेड आहे. आपल्याला जगावेगळ्या सौंदर्याचा साक्षात्कार झाला आहे या अहंभावातून या कलेचा जन्म झाला आहे. असे त्याला वाटत असते. आपण मोठे पुरोगामी, प्रगतिशील असा एक प्रकारचा गंड त्याला निर्माण झाला आहे. या चित्रांच्या गूढ कल्पना आणि त्यातील सौंदर्य पटवून देण्यासाठी त्यांना लांबलचक बडबडावे लागते.

कागदावर अनेक उभ्या, वाकड्या, आडव्या तिकड्या रेघोट्यांचे जाळे मी चितारले, आणि म्हटलं "चित्र कसले आहे सांग ?" त्याला उत्तर देता येईना, मी म्हटलं या चित्राचे नाव "ब्रह्म" यात सबंध विश्व तुला दिसेल, फक्त तुझी चित्र समजण्याची पातळी तेवढी उंच झाली पाहिजे.

मॉडर्न आर्टवाल्यांना हळदणकर मास्तरांनी हा दिलेला आहेर किती अचूक आहे. यांची ती चित्रे लोकांना समजत नाहीत. नामवंत चित्रकारांना समजत नाहीत. यांना तो समजवून देता येत नाहीत. आणि आज वर्णन केलेल्या चित्राचे वर्णन दुसऱ्यावेळी त्यांना करता येत नाही. पूर्वीच्या वर्णनाशी ते पूर्ण विसंगत असेल.

ही चित्रे म्हणजे परमेश्वराचे स्वरूप. "रंग नाही, रूप नाही, नही वरन छाया" अशा या निराकार रघुरायाचं चित्र; समाधीची तार चढलेल्या तपस्वीखेरीज ही चित्रे कुणाला कळणार ?

मॉडर्न आर्टची तरफदारी करणारेही आपल्या चित्राबद्दल हेच म्हणतात.

*(कलाविहार)*

## ३) सोव्हिएट रशियातील चित्रकला

रशियाने काही एकाच बाबतीत क्रांती घडवून आणली आहे असे नाही. तर आर्थिक व राजकीय बाबींबरोबर 'साहित्य, संगीत आणि कला' यातही बदल घडवून आणला आहे. पूर्वी या साधनांचा उपयोग फक्त श्रीमंतांना सुखविण्याकरिता व त्यांचीच हौस पुरविण्याकरिता केला जात होता आणि

'कलेकरताच कला' या ध्येयाने कलेची आराधना केली जात होती. कलेच्या द्वारे मानवोन्नतीचा काही मार्ग शोधायचा आहे किंवा काही विशिष्ट संदेश सांगायचा आहे या उद्देशाने कलेकडे पाहिले जात नव्हते. प्रचाराकरता कला असता कामा नये असे म्हणणाऱ्यांनी राजेमहाराजे, सरदारकरदार यांची सेवा करण्याकरिता कलेला व्यभिचारी बनवली होती. कुठेही जा, भांडवलशाही राष्ट्रातली कला ही श्रीमंतीची दासीच बनलेली असते. त्यांचे मन रिझवावे, त्यांचे पोवाडे गावे, त्यांचे ऐश्वर्य व थाटमाट लोकांपुढे मांडावा हेच काम त्यावेळच्या कलावंतांनी केले आहे. यामुळे भांडवलवाल्या राष्ट्रातील कलाविकास व विकास हा शेलक्या लोकांतच गुरफटून राहिला.

समता स्थापन करणाऱ्या रशियाने ही मक्तेदारी काढून घेतली व तिला बहुसंख्य जनतेसाठी राबविण्यास सुरुवात केली.

पूर्वीचे कलावंत श्रीमंतांची सेवा करीत होते म्हणून ते काही दुष्ट होते असे नाही. ज्या ज्या समाजव्यवस्थेचा इतर लोकांवर परिणाम होतो तसा त्यांच्यावर झाल्यास नवल काय? गरिबांसाठी चित्रे काढली तर ती खपायची कशी? व आपल्या पोटाला मिळायचे कसे? हा प्रश्न त्यांच्यासमोर होताच. त्यामुळे साहजिकच माल जेथे खपेल त्या गिऱ्हाईकासाठी तो त्याला आवडेल असा तयार करावा लागत होता. यातून केवळ आपल्या प्रेरणेला जागून काम करणारा कलावंत अपवादात्मक निघायचा. पण त्यासाठी त्याला हाल सोसणेच भाग पडे. शेतकरी - मजूर त्याला काय देणार. तेच एखाद्या राजाचे किंवा कोट्याधिशाचे चित्र काढले की पैसा ठरलेला. म्हणून श्रीमंतांना खूश केल्याखेरीज इलाजच नव्हता. दोष त्यांचा नव्हता, पोटाचा होता. त्या समाजघटनेमुळे बहुसंख्य जनतेला समजेल, त्यांना आवडेल त्यांना काही शिकवण मिळेल अशी कलाचित्रे, मूर्ती, काव्य, लेखन, नाटके, कादंबऱ्या निर्माण होऊ शकल्या नाहीत. परिस्थितीमुळे त्यांची अंत:स्फूर्ती मारली गेली. उत्कृष्ट कलेच्या गूढ, बहुसंख्य जनतेला व समजण्याजोगे असे काही नसते, पण विषम समाजरचनेमुळे कला ही खानदानांच्या जनानखान्यात बंदिवान होऊन बसली.

१९१७ च्या क्रांतीने जनतेबरोबरच कलेलाही बंधमुक्त केले. आजच्या रशियन सरकारने तिला बंधमुक्त केले. बहुजनसमाजाच्या उद्धारासाठी, शिक्षणासाठी, करमणुकीसाठी तिला कामास लावले. तिचे कामाचे क्षेत्र आता

वाढले आहे. अफाट जनतेत ती आता संचार करू लागली आहे. सौंदर्य ही निसर्गाची देणगी आहे, तिने श्रीमंताचे हृदय उचंबळते आणि गरिबीचे अंत:करण गारठते असे काही नाही. दिनराजाच्या आगमनाने सर्व प्राणिकोटी डुलू लागते, तो आनंद काय श्रीमंतांसाठी खास राखून ठेवला आहे? त्याला बुद्धिमत्ता व विद्वत्ता पाहिजे असे नाही.

चित्रकाराची पोटाची काळजी दूर झाल्यास तो आपल्या अंत:स्फूर्तीला जागून काम करू शकतो. म्हणून रशियाने प्रथम त्यांचीही काळजी दूर केली. जनतेत हिंडण्यास, त्यांची सुखदु:खे, आकांक्षा समजून घेण्यास, देश पाहण्यास व त्यांना वाटेल तेथे राहण्यास किंवा इच्छेप्रमाणे प्रवास करण्यास सोयीसवलती व साधने, आवश्यक लागणारा पैसा पुरवण्याचे ठरवले आहे. गिरण्यात, कारखान्यात, शेतात जाऊन त्यांच्या परिस्थितीचा सूक्ष्म अभ्यास करण्यास लावले आहे. त्यांनी देशाच्या आखलेल्या योजनेला मदत केली पाहिजे. नव्या कल्पना लोकांपुढे मांडल्या पाहिजेत. भांडवलशाही समाजरचनेतील दोष उघड करून दाखविले पाहिजेत, ही रशियाची आजची अपेक्षा आहे. मोक्षप्राप्तीसाठी ध्यान, आत्मोन्नतीसाठी कला, कलेसाठी कला या कल्पना समाजविरोधी आहेत असे ते मानतात. ज्या ध्येयासाठी राष्ट्र अहोरात्र तळमळत आहे, अनेक दिव्यातून जात आहे, ज्यासाठी अनेकांच्या आहुती पडल्या व आज पडत आहेत त्या ध्येयपूर्तीसाठी कलावंतांनीही झटले पाहिजे.

प्रसिद्ध चित्रकार रेपिन म्हणतो,

"I Cannot weave Carpet that feast the eye, or make lace and go in for fads with all my meagre faculties; I strain to express my ideas in truth?

याच विचारसरणीला धरून रशियन बहुजन समाजाची वृत्ती बनली आहे.

या दृष्टीने नाटकांसंबंधी येथील दोन स्त्रियांच्या तोंडून बाहेर पडलेले विचार ऐकण्याजोगे आहेत. एक बाई दुसरीला म्हणते, "नाटकापासून माझी करमणूक झाली म्हणजे झाले, यापेक्षा दुसरी अपेक्षा मी करीत नाही' दुसरी बाई 'अगं तू समाजद्रोही आणि क्रांतिविरोधीच दिसतेस, नाटकांनी किंवा कोणत्याही कलेने जनतेसमोर नवे विचार, नवे प्रयत्न ठेवलेच पाहिजेत. जीवनाचे अवघड प्रश्न सोडवण्यासाठी प्रयत्न केला पाहिजे. जर तुम्हाला काही नवा संदेश द्यायचा नसेल तर हजारोंचा वेळ फुकट का म्हणून घ्यायचा?' मॅक्झिम गोर्की म्हणतो :-

"Russian literature was predominantly a literature of problems."

काही प्रश्न सोडविणे हाच रशियन साहित्याचा उद्देश होता. लेनिनचे बहुतेक निबंध प्रश्नचिन्हात्मकच आहेत.

रशियाने नाटकांची सार्वजनिक वाढ व्हावी म्हणून नाट्यशिक्षणाचे ठिकठिकाणी खास वर्ग उघडले आहेत. यामुळे नटवर्गाची, नाटकांची, लेखकांची संख्या सारखीच वाढते आहे. नाटकगृहे आहेत. सायबेरीया प्रांतात पूर्वी नाटक म्हणजे काय याचीही लोकांना कल्पना नव्हती. आता त्या लोकांनी स्वत: बसवलेली नाटके त्यांच्या नाटकगृहात दाखविली जात आहेत. त्या त्या प्रांताचे वैशिष्ट्य व संस्कृती यांची यामुळे जोपासना होत आहे. नाटकात काम करणारे लोकही वाढल्यामुळे तेही स्वतंत्रपणे खेळ करीत आहेत. अशा "ॲमेचूअर्सच्या" खेळांना जाणाऱ्या प्रेक्षकांची संख्या दोन कोटीपर्यंत गेली आहे. लहान मुलांसाठी खास थिएटर्स बांधली असून त्यांच्यासाठी त्यांना समजतील असे सोपे खेळ बसविले आहेत. लहान मुलांना सोप्या भाषेत उपयुक्त शिक्षण कसे द्यावे, नव्या योजनेची माहिती कशी करून द्यावी याचा विचार करूनच खेळ बसविले जातात. आज तरी निर्हेतुक, ध्येयशून्य करमणुकीला रशिया प्रोत्साहन देऊ शकत नाही.

रशियन क्रांतीपूर्वीची बहुतेक सर्व कथानके एका ठराविक साच्याचीच असत. विशिष्ट व्यक्ती, त्याच्या भावना, मनोविकार, नायक-नायिका त्यांचे प्रणय प्रसंग व त्याच्या प्रेमात विघ्न आणणारा खलपुरुष अशाच गोष्टींचा त्यात समावेश होत होता. समाज, समाजाची महत्त्वाकांक्षा, त्यांचे हक्क, त्यांच्या अडचणी व ध्येयाचा मार्ग वगैरे गोष्टींना त्यात प्राध्यान्य मिळत नव्हते. पूर्वीच्या राजवटीला उचलून धरणारी, व ती समाजरचना शाबूत ठेवणारी अशी कथानके रंगविली जात. त्यात व्यक्तिविषयक सुखाच्या धडपडीलाच प्राधान्य दिले जात असे. पूर्वीच्या लेखकांना व कलावंताना समाजाच्या सहकार्याची आवश्यकता भासत नव्हती. कुठेही एकांत जागी बसून तो कथानक रंगवू शके. आता ते समाजाच्या सहकार्याशिवाय पूर्णतेला पोहोचवू शकत नाहीत. त्याची अनेक जणांकडून छाननी होऊनच मग ते रंगभूमीवर येऊ शकते. प्रथम प्रथम जुने वळण बदलण्याला व नवी नाटके बसविण्याला फारच अडचणी उभ्या राहिल्या. प्रसिद्ध ग्रंथकार-नाटककार यांचे सहाय्य मिळेना. नव्या राज्यपद्धतीला ते

अनुकूल नव्हते. यामुळे रंगभूमी व साहित्य यांची जुळणी बसेना. साहित्याची प्रगती रंगभूमीवर होईना. त्यावेळचे साहित्य हे वरच्या 'बुर्या'' श्रीमंत वर्गाच्याच हातात होते. ते लोकक्रांतीला अनुकूल नव्हते. कारण साहित्यसेवकांचा पोशिंदा श्रीमान वर्गच होता. पण ही स्थिती लवकरच बदलली. नव विचाराचे, नव्या राज्यपद्धतीला उचलून धरणारे नवे साहित्यसेवक पुढे आले. त्यांना सरकारकडून प्रोत्साहन व सहाय्यक मिळाले. त्यांना राष्ट्रीय मान्यता मिळू लागली, यामुळे क्रांतिकारक कथानके लोकप्रिय होऊ लागली. त्यांची संख्या वाढू लागली.

प्रथम प्रथम वस्तुस्थिती निदर्शनावर लेखकांनी भर दिला. वर्गिक कलह हाच विशेष बहुतेक खेळात दिसून येई. पुढे समाज, भावी समाज रचना, नवे नवे प्लॅन्स, त्यातल्या अडचणी या गोष्टी कथानकात येऊ लागल्या. त्यामुळे दैनंदिन जीवनात त्यांचे मार्गदर्शन होऊ लागले. पूर्वीच्या राजवटीतील अमानुष प्रकार दाखविणे, त्याविषयी मनात द्वेष व तिटकारा उत्पन्न करणे, राज्यक्रांतीमुळे घडून आलेली सुधारणा, पुढची उद्दिष्ट, ध्येये व नवा कार्यक्रम या गोष्टी आता जनतेसमोर ठेवल्या जातात. निव्वळ कल्पनारम्य गोष्टींचे दिग्दर्शन करणे आता राहिले नाही. देशाचे रोजचे आंदोलन आता कलेतून, वाङ्मयातून व नाटकातून पाहता येते.

रंगभूमीला सहाय्य करण्याकरिता जनतेतून समित्या निर्माण झाल्या आहेत व त्यात गिरण्यातील, कारखान्यातील, खेड्यावरील व शेतावरील प्रतिनिधी निवडून आलेले असतात. पुष्कळ वेळा प्रेक्षकांच्याही परिषदा भरून प्रसिद्ध झालेल्या नाटकांची व कथानकांची चर्चा होते, व त्यांच्या सूचना नाटक कंपन्यांना विचारात घ्याव्या लागतात. केव्हा केव्हा नाटक पाहून झाल्यावर प्रेक्षकात त्यावर अनुकूल व प्रतिकूल टीका होते. ज्या खेळाबद्दल काहीच चर्चा होत नाही. टाळ्या पडत नाहीत व लोक निमूटपणे घरी जातात ते नाटक नापसंत म्हणून समजले जाते.

नाटक मंडळी खेड्यावर जाईल त्या त्या वेळी लोकांना नाटकाचा हेतू व उपयुक्तता पटवून देण्यासाठी तज्ज्ञांची व्याख्याने ठरविली जातात. खेळ अगदी उघड्यावर दाखवता येण्याजोगे बसविल्यामुळे शेतकऱ्यांना व मजुरांना त्याचा कोठेही फायदा करून घेता येतो. अशा रीतीने सोव्हिएट सरकारने कला ही बहुजन समाजाच्या हाती आणून सोडली आहे. तिची मिरासदारी काढून तिला लोकशाहीचे स्वरूप दिले आहे.

सिनेमासृष्टीत रशियाने बऱ्याच मागाहून पदार्पण केले असले, तरी त्यातही त्यांनी आपली प्रगती फार झपाट्याने केली आहे. सिनेमाच्या साधनांमुळे त्यांना लोकांपुढे त्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करता आला. रशियातील पूर्वीचे जीवन व आताचे जीवन, त्यांनी घेतलेली नवी प्रचंड कामे लोकांच्या डोळ्यांसमोर ठेवता येत आहेत. स्टॅलिनच्या नेतृत्त्वाखाली गेले युद्ध कसे जिंकले यांचाही प्रत्यक्ष चित्रपट फोटोग्राफी आपला जीव धोक्यात घालून घेतला आहे. "जीवनाचा मार्ग" हा त्यांचा पहिला बोलका चित्रपट १९३१ साली एन इक याने डायरेक्ट केला होता. सिनेमा धंद्याच्या वाढदिवसानिमित्त १९३५ साली जोसेफ स्टॅलिन याने संदेश दिला.

"पुढील ध्येय गाठण्यासाठी लोकांची तयारी करण्याचे काम चित्रकारांनी करावे अशी सोव्हिएट राज्याची अपेक्षा आहे."

या दृष्टीने आपले चित्रपट किती मागे आहेत त्याची कल्पना येईल. आमच्या चित्रपट निर्मात्यासमोर जर मुख्यत: कोणते ध्येय असेल तर पैसा. लोकांना काही शिकायचे आहे म्हणून चित्रपट काढणारे फारच थोडे. पुष्कळवेळा आपल्याला दिसून येते की व्यापारी लोक प्रसिद्ध नटासाठीच कथानक रचतात. कथानकासाठी नटाचा उपयोग करून घेण्याऐवजी प्रसिद्ध नटाला घातलेच पाहिजे म्हणून त्याला जुळणारा चित्रपट व प्रसंग तयार करण्यात येतात. लोकांना आवडते म्हणून जरुरी नसतानाही नाच, गाणी, खेळ, उगाच भव्य सेटिंग्ज घुसडण्यात येतात. लोकांचा धर्मभोळेपणा अंधश्रद्धा काढून टाकण्याऐवजी, भाविकांना व देवभोळ्यांना आपल्याकडे ओढण्याकरिता दैवी चमत्कार दाखविले जातात. प्रणयाने मजा वाटते म्हणून प्रणय घालायचा. हे असे चित्रपट देशाला उपकारक होण्याऐवजी अपकारक होतात. रशियाने या धंद्याला राष्ट्रोद्धारासाठी राबविले आहे.

*(कलाविहार)*

## ४) खिद्रापूरचे शिवमंदिर

रम्य सृष्टीसौंदर्य, समोर चंद्रकोराकृती लकाकणारी पुण्यवती कृष्णामाई - उन्हाचे प्रखर किरण थोपवून धरणारे वटवृक्ष. अस्पष्ट कुजबुजणाऱ्या पल्लवांची अखंड वेदवाणी, मोदभराने डुलत असलेली सभोवारची हिरवीगार शेते. वृक्षांच्या आसऱ्याने राहणारे पक्षिगण, या सर्वांमुळे शिवमंदिराच्या

आसपास पावित्र्याचे वारे खेळत असते. शिवभक्तांच्या भावपूर्ण हृदयात उमाळे आणीत असते. लोकांच्या सहवासापासून किंवा संशोधकांच्या दृष्टिक्षेपातून अलग राहण्यासाठी शंभू देवांनी हे ठिकाण ध्यानासाठी शोधून काढले असावे.

खऱ्या थोरांना मान्यतेची हौस नसते. म्हणतात ते काही खोटे नाही. शिल्पकलेतील नवलांचे हे रत्न, कोल्हापूर जिल्ह्याच्या शिरोळ तालुक्यातील खिद्रापूर गावी आहे.

खिद्रापूर हे करवीरचे जगद्गुरू शंकराचार्य यांचे गाव, या गावास नरसोबाच्या वाडीस उतरून कृष्णेचा प्रवाह सुरू असल्यास नावेतून जाणे सोयीचे असते. दुसरा मार्ग शेडबाळ स्टेशनवर उतरून मोटरने जुगळवरून आहे.

हे खिद्रापूरचे शिवमंदिर प्रथम चालुक्यांनी बांधले. त्यानंतर यादवरावांनी ते सुशोभित केले व त्याची व्यवस्था उत्तम ठेवली. हे देवालय म्हणजे शिल्पकारांच्या स्वप्नसृष्टीची प्रतिकृतीच होय. देवालयाच्या आकाराकडे पाहिले म्हणजे आकाशात विहार करणाऱ्या देवांचे हे विमान पृथ्वीतलावरच जखडून राहिले असावे असे वाटते.

मंदिराच्या सभोवार पायथ्याशी शंभर :त्तींचे वेष्टन आहे. व त्याच्या चार कोपऱ्यात शिवाचे वाहन जो नंदी त्याच्या मूर्ती आहेत व त्याच्या पाठीवर शिवमहादेवाचे गणगोत उतरलेले दिसतात. स्वर्गमंडपाच्या प्रवेशद्वारावर आणखी आठ हत्ती आहेत. यामुळे गजसेवा मंदिराला आपल्या पाठीवर घालून नेत आहे असा भास होतो.

हत्तींची रांग सोडून वर पाहिले म्हणजे देवालयासमोर कमरबंधाचे वेष्टन दिसते व त्यावर कितीतरी तऱ्हेच्या अष्टकोन, चौकोन, त्रिकोणांचे जुळवलेले दगडी अवघड नक्षीकाम व त्या माळेमध्ये फुलवेलीचे कोंदण खऱ्या चांदीच्या पट्ट्यालाही मागे टाकील किंवा देवीच्या स्वागतार्थ त्याचे पायाखाली सुंदर रांगोळी घालून ठेवली नसेल कशावरून ?

वरील दगडी रांगोळीचा पट्टा सोडून आता वरती पाहू.

आतातर शिल्पकाराच्या खऱ्या कामाच्या कसोटीला सुरुवात झाली. येथून मात्र दृष्टी काढवत नाही. मन निघत नाही. हिंदी कारागिरांच्या कसबांची इथे कमाल झाली आहे. भक्तीचा भावच जणू चालता हाताला चालना देत आहे. भाव नाही तेथे कौशल्य काय करणार ?

देवालयाचा मध्यभाग आता सुरू होतो. येथे मूर्तीचे खोदकाम सुरू होते. या मूर्ती म्हणजे स्वर्गातील अप्सरा वस्त्रालंकारविभूषित नटून थटून लज्जेने

मुरकत मुरडत महादेवाला आहेर देण्यासाठी जात आहेत. कोणी देवाला आळवण्यासाठी गानसाहित्य घेऊन येत आहेत. त्या पातळ झिरझिरी त वस्त्र नेसल्यामुळे त्यांच्या यौवनभर व भारी जडावाचे अलंकार मुळीच झाकून जात नाहीत. वर कोनाकोपऱ्यात जागा मिळेल तेथे त्या रुपवतींची इतकी गर्दी झाली आहे की शिवमहोत्सवासाठी या आनंदाने बेहोष होऊन मार्ग काढत आहेत असे वाटते. या बरोबर देवीसरस्वती, राम-सीता व रामायणातील प्रसंग अन् दुर्गेशनंदिनीच्या मूर्तीही दिसतात.

हे देवालय म्हणजे पुरातन हिंदी संस्कृतीच्या सुवर्णकाळातील एक जिवंत दृश्य आहे.

संशोधकांना येथे पूर्वीचे तलम कपडे, नाजूक नक्षीकामाचे अलंकार, वाद्ये, चालीरीती यांचा अभ्यास या ठिकाणी करता येईल. समाजशास्त्राविषयी विचार करणाऱ्याला, हिंदू लोक स्त्रियांना किती मानतात ते समजून येईल. त्याची जागृती परंपरा आमच्या शिल्पकारांनी दगडात कायमची कोरून ठेवली आहे. तो दगडात कोरलेला जणू इतिहास आहे.

*(कलाविहार)*

## *कला आणि हृदय*

*बऱ्याच लोकांची व काही विद्वानांचीही अशी समजूत आहे की कलेचा सौंदर्याशीच संबंध आहे. आणि आनंद केवळ सुंदर वस्तूतच भोगता येतो. म्हणून कलावंतांचे काम वरवर दिसणारे सौंदर्यच रंगविणे हे होय. पण ही समजूत सर्वस्वी खरी आहे असे मात्र नाही.*

*मनाला आल्हाद देण्याची शक्ती प्रेममीलनात आहे तशी विरहातही आहे. आनंदाश्रूत आहे तशी दु:खाश्रूतही आहे. म्हणून कलावंताचे मुख्य काम भावना-प्रकटीकरण हेच राहील. आता त्याचा दर्जा मात्र तो कोणत्या तऱ्हेच्या भावना प्रेक्षकाच्या मनावर उठवील त्यावर अवलंबून राहील. म्हणून कलेचा मुख्य उद्देश कलावंताच्या हृदयांतील भावना आपल्या कलाकृतींत आणणे हा होय.*

*"It is not the eye - it is the mind - which the painter of genius desires to address."*

*Sir Joshua Reynolds*

या भावनांनी कलावंताच्या मनावर पगडा बसवला असेल त्याचाच जास्तीत जास्ती परिणाम जो कलावंत दुसऱ्याच्या अंत:करणावर करू शकेल त्यालाच कुशल कलावंत (आर्टिस्ट) म्हणता येईल.

मग तो आर्टिस्ट आपल्या मनातील भावना प्रगट करण्याला कोणतेही साधन वापरील. तो चित्रकार असेल, शिल्पकार, लेखक, कवी, गायक किंवा कोणीही असेल. इतर कौशल्याची आवश्यकता असली तरी ती गोष्ट गौण आहे.

चित्रात खूप बारीकसारीक काम केले आहे, एखादा देखावा, प्रसंग किंवा मनुष्यकृती अगदी बरहुकूम काढण्याचा कसून प्रयत्न केला आहे, वाटावे की जणू रंगीत फोटोग्राफच !

पण एवढे गुण त्या चित्राला श्रेष्ठ दर्जा आणू शकत नाहीत.

चित्राने जर कसल्याच भावना जागृत होत नसतील तर ते कौशल्य व्यर्थ होय. प्रेताला सजवल्याचाच तो प्रकार !

एखाद्याचे अक्षर वळणदार असले म्हणून त्याच्या हातून चांगले साहित्य निर्माण होईल असे नाही. शब्दकोश म्हणजे वाङ्मय नव्हे. निव्वळ भाषाशैली असल्याने, उच्च वाङ्मय निर्माण होईल असे नाही.

त्यात विचार नाहीत, भावना नाहीत तर ते असून नसून सारखेच. कौशल्याचे दृष्टीने अगदी निर्दोष कलाकृती असली तर तेवढ्याने त्याला थोर दर्जा प्राप्त होत नाही. याचा अर्थ कौशल्याशिवाय चित्र असणं भूषणावह आहे असे नाही. सांगायचे हे, की निव्वळ 'टेकनिक' म्हणजे कला नव्हे. ते एक साधन आहे. ते ज्या मानाने साधेल त्या मानाने कलावंताच्या विचाराला मूर्तस्वरूप चांगले येईल. ते परिणामकारक होईल.

उत्कृष्ट चेहरेपट्टी काढता येत असेल, बांधेसूद मनुष्याकृती सहजासहजी रेखाटता येत असेल, पण कागदावर चार माणसे उभी केली किंवा एखाद्या देखाव्यांतली झाडे झुडपे अगदी आहेत तशी काढली म्हणजे ते चित्र एक उत्कृष्ट कलाकृती होईल असे नाही.

चित्रांतील वस्तू कोणत्याही हेतूशिवाय रेखाटल्या, त्या चांगल्याही आल्या, पण त्या ज्या हाताने काढल्या त्याचा अंत:करणाशी काही संबंध नसेल व केवळ कोरडे हस्तकौशल्य असेल तर त्याचा दुसऱ्याच्या मनावर काही परिणाम होणार नाही. भावना जाग्या होणार नाहीत. ती उच्च कलाकृती नव्हे.

उत्कृष्ट कलाकृतीने पाहणाऱ्याला आनंद उर्मीच उठतील असे नाही.

कलेमुळे भावना जाग्या झाल्या पाहिजेत. त्या कलावंताच्या मनातला संदेश दुसऱ्याच्या अंत:करणाला पोचला पाहिजे. आता तो (आर्टिस्ट) कलावंत कोणत्या भावना जागृत करील या त्याच्या स्वत:च्या मन:स्थितीवर, संस्कृतीवर व परिस्थितीवर अवलंबून राहील. त्यानेच त्या चित्राचा दर्जा ठरू शकेल. कारण भावना अनेक प्रकारच्या आहेत. तम, रज, सत्त्व यापैकी ज्या गुणाचा प्रभाव त्यावर जास्त असेल त्या मानाने ते चित्र वठणार. त्या मानाने त्या चित्राचा दर्जा ठरणार.

ती भावना आल्हाददायी असेल, कारुण असेल, राग, द्वेष, असूया उत्पन्न करणारी असेल; समाजाची चांगली बाजू दाखवणारी असेल किंवा समाजाचे अन्याय, विषमता, स्वार्थ वगैरे दोष दाखवणारी असेल; पण ज्यात हेतू उदात्त आहे - मानव उत्क्रांतीला, मानवी ऐक्याला, प्रेमविकासाला पोषक आहे - तीच कलाकृती उच्च दर्जाची ठरली आहे.

चित्र असेल, शिल्प असेल, लेख, काव्य, नाटक, कादंबरी किंवा गाणे - काहीही असेल !

चित्र बाहेरून दिसायला गलिच्छ असूनही त्यात उदात्त तत्त्व गोवले असेल ! सौंदर्याशीच तिचा संबंध असेल असे नाही.

चित्रकला, लेखनकला आणि शिल्पकला या अगदी सख्ख्या बहिणी आहेत. लेखनकलेअगोदर तिचे काम चित्रकलाच करीत होती. आपल्या मनातले विचार दुसऱ्यांना कळवण्याचे त्यावेळचे ते एक साधन होते. मानव संस्कृतीत भर घालण्याचेच काम त्यांनी केले आहे. आणि ज्या कलेने मानवी उत्क्रांतीला मदत केली तीच श्रेष्ठ अशी ठरली आहे.

वाङ्मयांत धर्मग्रंथांना जो मान आणि दर्जा प्राप्त झाला आहे, तो याचमुळे.

लेखनकलेची जी गोष्ट तीच इतर कलेची. मनुष्याला मोठेपणा येतो तो याचमुळे. रामायण, महाभारत, बायबल, कुराण यांना वाङ्मयात जे स्थान मिळाले आहे ते त्यातील निव्वळ भाषाशैलीमुळे नव्हे. त्यातील उदात्त तत्त्वामुळे. त्या प्रत्येक ग्रंथांनी मानवसंस्कृतीत भर घातली आहे. लोकांना ध्येयाचा मार्ग दाखवला आहे. निव्वळ करमणूक आणि मनाला आनंद एवढेच त्यांनी केलेले नाही. तडाखेही ओढले आहेत !

"Art itself is not necessarily the creating of the sense of beauty any more than the creating of any other sensation."

निव्वळ विचार देता आले; भावना जागृत करता आल्या म्हणून तेवढ्यानेही ते उच्च दर्जाचे ठरत नाही. **त्या भावना कोणत्या प्रकारच्या असतील त्यावरच त्याचा दर्जा अवलंबून राहील.**

चित्रामध्ये जर हेतू उदात्त नसेल तर त्यात कितीही कौशल्य घातले तरी त्याचा दर्जा उच्च ठरणार नाही; आणि उदात्त विचार असले, कल्पकता आणि प्रतिभा दांडगी असली आणि कौशल्य काहीच नसले तर सर्वच व्यर्थ.

मनुष्याला जसा देह, तसे चित्राला त्यातील रूपरेखा, रचना आणि रंगकौशल्य आणि त्यांतला प्राण म्हणजे कल्पना. कला आणि कौशल्य याचा हा अभेद्य असा संबंध असतो.

कोणतीही कलाकृती असो - तो कलावंत ज्या संस्कृतीला पोचला असेल, त्या मानाने त्याचा स्वत:चा आत्मविकास झाला असेल त्या मानाने त्याचे चित्र चांगले वाईट ठरू शकेल.

भावनेवर चित्राचे महत्त्व अवलंबून आहे आणि भावनेचा अंत:करणाशी जवळचा संबंध आहे. प्रेमळ अंत:करणाशिवाय उच्च भावनांचा उगम होणार नाही. जगातील सुखदु:खाशी तो समरस होणार नाही. सभोवतालच्या परिस्थितीचा त्याच्यावर परिणाम होणार नाही. कृती झाली नाही तरी, अंत:करणात तरी त्याला जगात सुखसमाधानी आणि ऐक्य नांदावे असे वाटेल.

प्रेमळ अंत:करणाशिवाय - गरिबीने - मानवी ऐक्याला विघातक अशा गोष्टीने, त्याला हायसे होणार नाही. तळमळ सुटणार नाही. त्यांच्या आनंदाबरोबर त्याला आनंद होणार नाही. प्रेमळ हृदयाखेरीज तो दु:खिताशी समरस होणार नाही आणि हा तर कलावंताठिकाणी असणारा मोठ्यांतला मोठा गुण !

बुद्धी, विद्वत्ता, हस्तकौशल्य या कोणत्याही इतर गुणापेक्षा 'प्रेमळ हृदय' हा कलावंताचा मुख्य गुण आहे. कलेचा प्राण आहे.

प्रेमळ हृदयाशिवाय चांगला कलावंत होऊच शकणार नाही.

"Unless they have a passionate feeling for the vital things that move men, heart and soul.... Their work must be forever cold...."

*- Terence MacSwiney*

प्रेमळ हृदय असेल तरच दुसऱ्याविषयी सहानुभूती उत्पन्न होईल.

त्याखेरीज दुसऱ्याच्या सुखदु:खाशी तो समरस होणार नाही. निसर्गाच्या भावना त्याच्या अंत:करणात उमाळे उत्पन्न करणार नाहीत; म्हणून **कलावंत होण्याला तसेच त्याची वृत्ती जाणण्याला सहानुभूतीच्या ह्रदयाची - प्रेमळ ह्रदयाची - आवश्यकता आहे.**

*(कला आणि कलावंत)*

## ६) पौर्वात्य आणि पाश्चिमात्य चित्रकला

पौर्वात्य आणि पाश्चिमात्य चित्रकलेत काही फरक आहे काय आणि असल्यास तो का पडला याचा या लेखात विचार करायचा आहे.

हिंदुस्थान सुपीक प्रदेश. पुरातन काली येथील मनुष्यवस्तीला खाण्यापिण्याची केव्हाच ददात नसे. निसर्ग पूर्ण अनुकूल; त्यामुळे पोटासाठी झगडण्याची पाळी त्याला क्वचितच येई. या जगण्याच्या यातायातीतून मुक्त झाल्यामुळे साहजिकच त्याची दृष्टी अन्तर्मुख झाली. यामुळे हिंदुस्थानातील चित्रकार, शिल्पकार व वेदांती एकाच स्फूर्तीने प्रेरित झाले. एकाच दिशेने चालू लागले.

चित्रकला, शिल्पकला, गायनकला व लेखनकला यांचे ध्येय बहुतांशी एकच झाले. ईशसेवा हा त्यात मुख्य हेतू होता. देवादिकांची चित्रे भिंतीवर रंगविणे, मूर्ती करणे, गायकांनी ईश्वराला आळवणे व विचारवंतांनी ईश्वराचा शोध करणे व लेखकांनी धर्मग्रंथ लिहिणे हेच महत्त्वाचे काम झाले. यामुळे ऋषी हे लेखक, चित्रकार, शिल्पकार व गायकही होऊ शकले.

हिंदी गायनाला पद्धतशीर वळण वेदकालापासून लागत आले आहे. वेदांमधील सामवेद हा शास्त्रीय गानपद्धतीला धरूनच लिहिला आहे. गायनाची व विद्येची अधिष्ठात्री देवता सरस्वती असून तिचे हाती वीणा वगैरे वादनांची आयुधे दिली आहेत. एकतानता उत्पन्न होण्याला गायनाचा पुष्कळच उपयोग झाला आहे. श्रीकृष्णाच्या मुरलीने राधा प्रेमस्वरूप झाली आणि गवळणी देहभान विसरल्या. त्या ऐहिक बंधने तोडू शकल्या.

धर्मात्मे ते उत्तम चित्रकार, तेच उत्कृष्ट गवई तसे शिल्पकार झाले आहेत. एकाच आईची ही मुले एकमेकांशी पूर्ण सहकार्याने वागून राष्ट्राची संस्कृती निर्माण करू लागली.

मुनी शुक्राचार्य हे जसे जाडे विद्वान तसेच उत्कृष्ट शिल्पकार होते. चित्रकलेतील ते आद्यगुरू समजले जातात. या अशा थोर लोकमान्यांनी या कला हाती घेतल्यामुळे पुरातनकाळी तिचा दर्जा फार श्रेष्ठ होता. त्या धंद्याला एक प्रकारचे पावित्र्य उत्पन्न झाले होते.

ईश्वराला आपण विश्वकर्मा म्हणतो. शिल्पकार, मूर्तिकार यांनाही हेच नाव मिळाले आहे. कारण हे लोक आपल्या कल्पनेची सृष्टी निर्माण करीत असतात. मूर्ती करण्याचा धंदा हा सोनार वर्गात असे. त्यांना विश्वकर्मा हे नाव पडले आहे. आज तिला जातीचे स्वरूप आले आहे.

प्राचीनकाली हिंदुस्थान वेदांत विचाराच्या शिखरास पोचले होते. हिंदी कलावंतांच्या हातूनही याच वृत्तीतून कामे निघाली आहेत. ध्यानस्थ बसून जे विचार मनात उद्भवले ते ऋषींनी लिहून ठेवले, चित्रकारांनी रंगवले, मूर्तिकारांनी खोदले, कवींनी व गायकांनी त्या विचारांनी देश भारून टाकला, म्हणूनच आमचे भरतराष्ट्र ही धर्माची भूमी झाली. त्याची दृष्टी अंतर्मुख झाली. ऐहिक सुखाकडे दुर्लक्ष झाले. शास्त्रीय प्रगतीत ते मागे राहिले.

मूर्तिकार आपले नमुने डोळ्यापुढच्या मनुष्य आकारावरून न बसवता मन:चक्षूंसमोर ध्यानाने उभ्या केलेल्या आकृतीवरून बसवू लागले, म्हणून त्या कल्पनेतील मनुष्यकृतीत व डोळ्यापुढच्या मनुष्य आकृतीत असा फरक पडू लागला. बाकी डोळे झाकले तरी उघड्या डोळ्याने पाहिलेल्या आकृती बुजवणे हे मनुष्याला शक्य न झाल्याने झाकलेल्या डोळ्यासमोरही त्याच आकृती उभ्या राहिल्या आहेत. देवाची रूपे मनुष्याकृतीच्या आधारावरती उभारली गेली आहेत. यामुळे चित्रकाराच्या भूमिकेचा विचार न करणाऱ्याला ती केव्हा केव्हा विद्रूप दिसू लागतील आणि असतातही बरेच वेळा; कारण हा आधार नेहमी बरोबर वठूं कसा शकणार ?

पण जिवंत व्यक्तीला देव मानणे हा मूर्खपणा आहे म्हणून धर्माज्ञेने व्यक्तीच्या आधारावर मूर्ती करण्यास मनाई केली आहे.

*अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धय: ॥*
*परं भावमजानंते मामव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥*

*- भगवद्गीता अ. ७*

"अल्पबुद्धिजन मला अव्यक्ताला व्यक्तिभाव प्राप्त झालेला समजतात. म्हणजे व्यक्तिरूपाने ज्ञात झालेला समजतात."

या आज्ञेनुसार मनुष्याला प्रत्यक्ष समोर बसवून त्याबरहुकूम देवाची मूर्ती घडवणे पाप समजले जाई. यामुळे विचित्र आकाराच्या मूर्ती घडवल्या गेल्या. चित्रकाराची आवड, त्याचा कल, त्याचा बुद्धिविकास, त्याची वृत्ती मूर्तीत कोरली जाऊ लागली. काही देवता अक्राळ विक्राळ, उग्र, काही मोहक, हास्यमुख तर काही कामुक अशा त्या त्या कलावन्ताच्या दर्जाप्रमाणे वठल्या.

ह्या सर्व कलावंतांना ईश्वराचा शोध लागला की नाही हे सांगता येणे फारण कठीण आहे. तथापि त्यांच्या या प्रयत्नाने एक विशिष्ट संस्कृती मात्र निर्माण झाली आहे. एका ठराविक कलेच्या पद्धतीची वाढ झाली आहे एवढेच म्हणणे जरूर होईल.

थोडक्यात म्हणजे हिंदी चित्रकला ही कल्पनेवर किंवा मनाच्या शिकवणीवर उभारलेली आहे. विशेषकरून तिचा उगम हृदयांतून आहे आणि अंत:चक्षूंच्या सहाय्यांने ती रेखाटली गेली आहे हेच तिचे वैशिष्ट्य आहे.

अजंठा लेणीतील चित्रे या दृष्टीने उत्कृष्ट आहेत. साधेपणा, भव्यपणा व स्पष्ट रूपरेखा (Simplicity, Dignity and Perfect outline) या गुणांत ती चित्रे जगांत उत्तम म्हणून मान्य झाली आहेत. हिंदुस्थानात संस्कृतीला धरून चाललेली राष्ट्रीय कला जर पुन: हस्तगत करायची असेल तर हिंदी चित्रकारानी अजंठा लेणीतील चित्रांचा मन:पूर्वक अभ्यास केला पाहिजे. कलकत्ता स्कूलने या दिशेने प्रगती केली आहे.

काही आधुनिक चित्रकारांनी आणि विशेषत: रविवर्म्याने पौराणिक प्रसंग पाश्चिमात्त्य धर्तीवर रेखाटल्यामुळे त्यात धेडगुजरेपणा आला आहे. सर्व आकार, कपडे सजीव मूर्तीचे व चित्र मात्र काल्पनिक व असंभाव्य असे दिसणारे, यामुळे त्यांच्या काही चित्रांत बराच विसंगतपणा आला आहे.

एखाद्या सुंदर स्त्रीचे प्रत्यक्ष समोर बसवून पेन्टिंग केल्याप्रमाणे लक्ष्मीचे चित्र; पण ती बसते कमलपुष्पावर - एवढा भार त्या कमळाच्या देठाला कसा सहन होणार !

मुंबईचे स्कूल ऑफ आर्टचे हिंदकलाप्रेमी प्रख्यात कलावंत ग्लॅडस्टन सालोमन यांनी या प्राचीन कलेचे पुनर्जीवन केले आहे. त्यांनी विद्यार्थ्यांना पाश्चिमात्त्य कलेची पूर्ण माहिती देऊन प्राचीन हिंद कलेला निर्दोष करण्याची पराकाष्ठा केली आहे. हिंदी कलेचे वैशिष्ट्य हिंदी विद्यार्थ्यांनी राखले पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे. पाश्चिमात्त्यांशी त्यांच्याच टेकनिकने चढाओढ

करण्यापेक्षा पाश्चिमात्य ज्ञानाची भर आपल्या विशिष्ट संस्कृतीची जोपासना करण्यात घालणे हे हिंदी विद्यार्थ्यांनी आपल्या समोर ध्येय ठेवले पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. या ध्येयाला अनुसरून त्यांनी हिंदी कलेला वळण दिले आहे व युरोपमधील पुष्कळ ॲकॅडमीतही या चित्रकलेला त्यांच्या प्रयत्नामुळे चांगले स्थान मिळाले आहे.

आतापर्यंत हिंदी चित्रकारांनी आपल्या कलेचा उपयोग फक्त धार्मिक गोष्टींसाठीच विशेषकरून केला आहे. बुद्धधर्मियांनीही या कलेचा उपयोग धर्मप्रसारार्थ करून घेतला आहे.

ज्या भावनेने चित्र किंवा मूर्ती काढली गेली असेल त्या चित्रकाराच्या भावनेचा परिणाम पाहाणाऱ्यावर झाल्याखेरीज रहात नाही. It is the expression of soul talking to another. बुद्धाची ती शांत गंभीर मूर्ती, ध्यानस्थ आसन, नम्न पावित्र्य याचा परिणाम भक्तांच्या भावना जागृत करण्याकडे झाला आहे.

इंग्लंड वगैरे पाश्चिमात्य देशांना अंतर्मुख दृष्टी करण्याला वेळ मिळाला नाही. त्यांना निसर्ग अनुकूल नव्हता; त्यांशी त्यांना सारखे झगडावे लागले. ध्यानस्थ-आसनमांडी घालून विचार करण्यात वेळ, खर्चण्याला वाव मिळाला नाही. यामुळे त्यांच्या कलेवर याचा परिणाम झाला आहे. जडवस्तुनिदर्शनाकडेच त्यांनी आपले कौशल्य खर्च केले. त्यांची संस्कृती पण तशीच बनू लागली - आम्ही त्यांना Materialist समजतो.

पण त्यांनी त्या कलेत कमालीचे प्रावीण्य मिळविले. काही प्रख्यात चित्रकारांची पेंटिंग्ज इतकी वस्तुबरहुकूम वठली आहेत की पहाणाऱ्याची दिशाभूल झाली आहे. भिंतीवरील भरलेला रम्य देखावा पाहून आपण खरोखरीच खिडकीतून प्रत्यक्ष देखावा पाहतो आहो काय असा आभास ते उत्पन्न करू शकले.

ते निसर्गाशी तादात्म्य होऊ शकले. तथापि पाश्चिमात्य देशांतील राष्ट्राराष्ट्रात काही वैचित्र्य राहिलेच आहे.

ग्रीस व इटली यांचा ओढा उत्तम मनुष्याकृती काढण्याकडे लागला. त्यांची कला पुरातन कालीसुद्धा इतकी पूर्णावस्थेला गेली होती की रॉयफेल व मायकेल अँजेलोसारख्या कलावंतांना मागे टाकणारे अद्याप झाले नाहीत म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही.

उत्तम मनुष्याकृती काढण्याकडे यांचे लक्ष वेधण्याचे कारण हे दश लढाऊ होते. उत्तम सशक्त उंचे पुरे मनुष्यांची पैदास करण्याकडे राष्ट्राचा प्रयत्न होता; कारण त्यावेळची लढाई प्रत्यक्ष समोरासमोराची असल्यामुळे शक्तीची

जरुरी होती. सशक्त प्रजा निपजावी म्हणून अशक्त मुले मारली जात.

याचा परिणाम चित्रकारावरही झाला. देशांतील सर्वांगसुंदर सशक्त अशा स्त्रीपुरुषांचे त्यांनी नमुने तयार केले. व्हीनस, अपोलोसारखे पुतळे यामुळेच आज आपल्यास पाहण्यास मिळतात.

चीन इकडचा देश. तो रम्य वनश्रीने भरल्यामुळे **सृष्टीसौंदर्य रेखाटण्यात त्याने आघाडी मारली,** कादंबरीत व गोष्टीत त्याची सृष्टीसौंदर्याची वर्णने दुसऱ्यांना क्वचितच साधतील इतकी सुंदर आहेत. ते निसर्गाशी एकरूप झाले.

वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे।
पक्षीही सुस्वरे आळवीती॥

..... the brids and fishes are his little brothers and sisters and he calls the hills and valley, the rivers and the woods, to join him in praising God.

चिनी भांडी, चिनी पंखे, चिनी पडदे, चिनी चटया, चिनी खेळणी, रम्य, सुंदर देखाव्याखेरीज पहायला मिळणार नाहीत. त्यांची लिपीही निसर्गातील पशुपक्षांच्या आकारावरूनच बनली आहे.

या त्यांच्या वृत्तीचा परिणाम त्यांच्या लिखाणावर, संस्कृतीवर झाला आहे. विश्वाशी एकरूप त्यांना लवकर होता आले. सृष्टीतूनच त्यांना वेदांताचे धडे मिळाले.

'Books in running brooks.'

हा जिवंत ज्ञानाचा झरा त्यांना अखंड पिता आला.

आज कला म्हणजे बऱ्याच जणांना चैनीची गोष्ट वाटते. पण ते आत्मविकासाचे एक साधन आहे. गायन, वादन, लेखन व चित्रकला ही सर्व संस्कृतीची फुले आहेत. यांना कमी लेखून, यांचा तिटकारा करून चालणार नाही.

Music and the fine arts are among the highest means of national self-expression without which the people remain inarticulate.

गायन, वादन, हरहुन्नर या राष्ट्रसंस्कृतीच्या मूकभाषा आहेत. यांना मारून टाकणे म्हणजे राष्ट्रीय आत्म्याची वाढ खुंटून टाकण्यासारखे आहे. पण या कलेचा उपभोग सर्वांना घेता आला पाहिजे; तिच्यापासून मिळणारा आनंद, शिकवण सर्वांना घेता आली पाहिजे. म्हणून तसा प्रयत्न होणे मात्र अवश्य आहे.

*(कला आणि कलावंत)*

## ७) सौंदर्य आणि मोक्ष

सौंदर्याची कल्पना सर्वसाधारण जनतेतील बहुतेकांना असते. सौंदर्य दिसले की त्याचा परिणाम न होणारा माणूस विरळा!

ज्या मानाने मनुष्याचा विकास झाला असेल, त्या मानाने सौंदर्याची आवड त्यांच्यात जास्ती दिसून येते.

पण सौंदर्याची व्याख्या जर कोणाला करावयाला सांगितली, तर कोणालाही अचूक करता येईल असे मला तरी वाटत नाही.

चित्रकार, कवी वगैरे कलावंतांना मात्र ते सौंदर्य झटकन् दिसेल; व त्याच्या मनावर त्याचा लगेच परिणाम होऊन त्याच्या भावना उद्दीपित होतील. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहतील, हृदय फुलून जाईल, तेथे आनंदाच्या लहरी उठू लागतील व नसानसातून सौंदर्य झरझरू लागेल. हीन वासना लुप्त होऊन तो एका उच्च व उदात्त अशा वातावरणात तरंगू लागेल. त्याला जगाचाही विसर पडेल. वेदांत्याच्या समाधीचा आनंद त्याला भोगता येईल.

सौंदर्याचा हा बहर कलावंतच अधिक लुटू शकतो.

निसर्ग-चित्रकार तर आपल्यासमोरच्या देखाव्यांतही वेचक सौंदर्य निवडून आपली सुधारलेली सौंदर्यसृष्टी निर्माण करील, निसर्गाची सुधारणा करील.

एखादा देखावा चित्रित करू लागल्यास, तो त्याची उलथापालथ करील. तो स्वत:च विश्वकर्मा होईल. वस्तुस्थितीने तो बांधला जाणार नाही.

पण त्यालाच जर विचारले की, तू हे कोणत्या नियमाला धरून करीत आहेस? तर त्याला काही सांगता येणार नाही. तो एवढेच म्हणेल - 'मला असं करावंसं वाटतं. त्याचे नियम मला काही सांगता येणार नाहीत किंवा घालून देता येणार नाहीत. मला अशी स्फूर्ती झाली, असं म्हणा वाटलं तर.

सौंदर्याची व्याख्या मला करता येणार नाही, पण माझ्या हृदयावर होणारी सौंदर्याची प्रतिक्रिया अल्पांशाने मी तुमच्या डोळ्यांसमोर उभी करू शकेन.'

निसर्ग-चित्रकाराने एखादा देखावा चित्रित केला, म्हणजे त्या देखाव्याचे साम्य पाहणारा मनुष्य साहजिक म्हणेल, 'हे असे दिसत नाही.'

त्याचे म्हणणे पण खरेच असते.

निव्वळ डोळ्याला दिसणाऱ्या, व कॅमेऱ्याने निघणाऱ्या गोष्टी तो काढीत नसतोच मुळी. समोरच्या सृष्टीसौंदर्याचे, त्याच्या हृदयावर उठलेले पडसादच

फक्त त्याच्या कृतीत उमटलेले असतात.

एका देखाव्याचे परिणाम सर्व चित्रकारांवर सारखे होतात असेही नाही.

एकाच ठिकाणावर बसून काढलेल्या अनेक चित्रकारांच्या प्रतिकृतीत फरक दिसून येतो - रंगांत दिसून येतो, रेखेत दिसून येतो व रचनेत दिसून येतो.

एकच देखावा, एकाच प्रकारची भावना वा मनोविकार, सर्व चित्रकार व कवी वगैरे कलावंत, यांच्या मनात जागा करू शकत नाही. एकच देखावा एकाच्या हृदयात आनंदाच्या ऊर्मी उठवू शकेल, तर दुसऱ्याच्या अंत:करणावर दु:खाची छाया पाडील, तिसऱ्यात संताप उत्पन्न करील.

कलावंताच्या वृत्तीचाही त्याच्या कलाकृतीवर परिणाम होत असतो.

निसर्गातील शांतता, स्तब्धता व समाधी, निसर्गचित्रकार कोरो यालाच विशेष दिसली - व शेलके तेच निवडून त्याने आपल्या कृतीत दाखविले. टर्नरने सकाळ-संध्याकाळची रंगश्रीमंती लुटली व पुन: ते प्रकाशाचे कण त्याने आपल्या प्रेक्षकांवर उधळले. कॉन्स्टबलने आपला मनस्ताप, दु:ख, त्वेष व अस्वस्थता, 'उधळता घोडा' (लीपिंग हॉर्स) या देखाव्यात प्रकट केली. वॅशोने रंगेल सृष्टी उभी केली. क्लॉडने स्वर्गीच्या अप्सरा आपल्या खास नंदनवनांत उतरवल्या. गांगवली या हिंदी निसर्ग चित्रकाराने नवस्नात सृष्टीची कोमलताच शोधून काढली; हे सौंदर्याचे विविध प्रकार आहेत.

पण कोणाही चित्रकाराने सौंदर्याची अचूक व पटणारी व्याख्या केल्याचे मला तरी माहीत नाही - करता येईल की नाही याची सबळ शंका आहे.

कलेचे अभ्यासू सर केनेथ क्लार्क म्हणतात - 'सौंदर्याची व्याख्या शब्दात करता येणार नाही; पण ज्याच्या त्याच्या ग्राहक शक्तीप्रमाणे ते सौंदर्य अनुभवता येते. ('Beauty is a quality, not one that we can put into terms, but one that we all feel in proportion to our receptivity.)

'विल् ड्युरंट' या प्रसिद्ध ग्रंथकाराने सौंदर्याविषयी लिहिताना 'अनॅटोल फ्रान्स' या जगमान्य वेदान्त्याचे उद्गार उद्धृत केले आहेत, ते असे - 'अमकी एक गोष्ट सुंदर आहे, ती का, हे आम्हाला समजू शकणार नाही; मग सांगता तरी कसे येणार ?' ('I believe that we shall never know exactly why a thing is beautiful.)

पण सौंदर्याची आवड कसकशी उत्पन्न झाली व वाढत गेली ती पाहणे आता फारच मनोरंजक आहे, व ते त्यांनी मोठ्या कुशलतेने मांडले आहे.

नीतीच्या कल्पना जशा निरनिराळ्या देशात, लोकांत, धर्मात व जातीत निरनिराळ्या आढळून येतात, तशाच सौंदर्याच्या कल्पनाही निरनिराळ्या दिसून येतात. याचमुळे सौंदर्याची व्याख्या करणे अवघड आहे.

पण सौंदर्याची आवड का उत्पन्न झाली, तिचा उगम कशात आहे, याविषयी ठोकताळा बांधता येण्याजोगा आहे.

अगदी रानटी लोकांतील (आफ्रिकन) काही जातीत, खूप जाडे ओठ व अंगावरचे वण आणि डाग हे सौंदर्याचे लक्षण मानले जाते. ग्रीक लोकांना स्त्रियांहून युवकांतच सौंदर्य अधिक दिसते आणि ग्रीक शिल्पकारांनी विशेषेकरून पुरुषसौंदर्याची व शक्तीचीच आराधना केलेली दिसते. मायकेल एंजेलो हा तर पौरुषाचाच पूजक होता व त्यासाठी रॅफेलने त्याची निर्भर्त्सनाही केली होती. सुसंबद्धता, उदात्तता व शक्ती या गुणांना रोमने उचलून धरले. यापुढील पिढीच्या कलावंतांनी रंगसौंदर्याकडे दृष्टी वळवली. हल्ली भावनेवर जोर दिला जात आहे. हल्लीचे निसर्ग चित्रकार क्षणिक परिणामावरच भर देत आहेत. अशा प्रकारे कोणत्या तरी एका विशिष्ट सौंदर्याची पकड त्या त्या समाजावर व व्यक्तीवर पडली आहे व त्यांनी त्या त्या सौंदर्याला उठाव दिला आहे.

काही चित्रकारांच्या कलाकृतींकडे पाहिले, तर ही सौंदर्याची विविधता आपल्याला स्पष्ट दिसून येईल.

लॉरेन्सच्या चित्रात डोळ्यांतील चमक प्रथम मन ओढून घेईल. आर्पनच्या चित्रातील प्रकाशाची विशिष्ट रचना डोळ्यांना आनंद देईल. रेंब्रा आपल्या चित्रांतील व्यक्तींवर कोठल्या तरी कडोशांतून उजेड घेऊन त्यात गूढ गांभीर्य उत्पन्न करील. त्याची माणसे अंधारात चालू बोलू लागतील. हॅल्स एखादा हसरा चेहरा दाखवून मन उल्हसित करील; तर रेनॉल्ड उदात्त विषय निवडील. गोया समाजातील एखादा भयंकर अन्याय चव्हाट्यावर आणील. कलकत्यातील प्राचीन हिंदी कलेचे रक्षक अवनींद्रनाथ टॅगोर व बोस हिंदूंची भक्तिपूजा चित्रित करतील आणि मुंबईचे आर्टस्कूल नव्याजुन्याची मिळवणी घालून नवा मार्ग काढील. अशी ही चित्रकारांच्या सौंदर्याच्या आविष्करणाची विविधता दिसून येते.

ॲरिस्टॉटलने सौंदर्याची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. पण ती व्याख्या बे दुणे चार अशी समजूत पाडणारी नाही. तो म्हणतो - 'सौंदर्य म्हणजे सुसंबद्धता, प्रमाणबद्धता व एकतानता असे म्हणता येईल. ('Beauty is

symmetry, proportion and organic order of parts in a united whole.')

'सिमेट्री' या शब्दाची बरोबर कल्पना करून देणारा मराठी अचूक शब्द मला आठवत नाही ! एका इमारतीच्या दोन्ही बाजूला सारखे खांब, सारख्या कमानी, एकाच उंचीचे पुतळे असल्यास त्यांना 'सिमेट्रिकल' म्हणता येईल. पण त्यांच्यात अगदी साम्य असलेच पाहिजे असे नाही. ताजमहालच्या इमारतीत 'सिमेट्री' साधली आहे; व ती पाहताना मनाला आनंद वाटतो. मुख्य इमारतीच्या दोनही बाजूंना सारख्या उंचीचे व आकाराचे मनोरे (टॉवर) आहेत. पण त्या सारखेपणाला व साम्यतेला भिडणारा गाभाऱ्यावरील मोठा घुमट मध्ये असल्याने त्या मनोऱ्याचे साम्यसौंदर्य खुलून दिसते. त्याच तसल्या मनोऱ्यांची एकसारखी पायदळा (इन्फंट्री) सारखी ओळ उभी केली असती, तर ती साम्यता डोळ्याला आल्हादकारक वाटली नसती. सरळ रेषेला मारणारी बाकी रेषा (कर्व्ह) जवळ असल्यास सरळ रेषेला अगदी निराळेच महत्त्व येऊ शकते. त्या सरळ रेषेत ताकद आल्यासारखे वाटते. ओणव्या माणसाजवळ छाती पुढे करून ताठ राहिलेला माणूस असल्यास त्या माणसाला अधिक उमदेपणा चढतो. तेथे मनाला आकर्षण करणारे एक प्रकारचे सौंदर्य दिसू लागते. चित्रांत पुनरावृत्तीही (रिपिटिशन)- उदा. गाण्यातला ठेका खुलावट चढवतो. एका ठिकाणी असलेला रंग पुन: एखाद्या ठिकाणी दिसला की बरे वाटते. पण त्याची अतिशयोक्ती झाली की कंटाळवाणे होते व चीड येते. निसर्गाच्या चित्रात म्हणा किंवा रंगवलेल्या कथानकात म्हणा, त्यातील विविध आकारात व रंगात हे गुण असावे लागतात. त्यांच्यात सुसंबद्धता व प्रमाणबद्धता असावी लागते; व या सर्वांना सुसूत्रतेने गोवणारी एक कल्पना असावी लागते.

घड्याळात एकाच आकाराची व शक्तीचे यंत्रे नसतात. पण त्यात सुसंबद्धता, प्रमाणबद्धता व एकतानता असते - ती सर्व मिळून एकच गोष्ट दाखवतात, की आता किती वाजले.

गायनशास्त्रातील मी तज्ज्ञ नाही. पण सतारीच्या कमीअधिक सुरांच्या तारांचा लय लागला की विविध सुरांना एका गोड पातळीत आणणारा तो आवाज कानाला मधुर लागतो.

छोट्यामोठ्या गोष्टी एकमेकांना पोषक होऊ लागल्या की तेथे सौंदर्य भासमान होते.

इंद्रियांच्या वासना, भावना, प्रमाणबद्धतेत पोचल्या की मनाचा लय लागतो व मनुष्य सुखाच्या परमोच्च स्थितीला पोचतो. सौंदर्याचा परिणाम मनुष्यावर असा होऊ शकतो. त्यालाच आपण समाधी असे म्हणतो.

सौंदर्य एकतानतेत आहे असे म्हणता येईल. सर्व एक आणि त्याचे भाग यांचे सहकार्य म्हणजेच एकतानता. ('It is co-operation of the part with the whole.') पण ही एकतानता म्हणजे अनेक गोष्टींचा गोड मिलाफ असल्याने ही एकतानता येथे आहे असे बोटाने दाखवता येणार नाही. कारण तो एक मेळावा असतो. छोट्यामोठ्या भागांचे सुंदर एकीकरण असते.

सौंदर्याचे कण जगभर विखुरले आहेत. तिच्या भक्तांची जशी व जितकी उत्कटता असेल, तितका त्याचा आस्वाद त्यांना घेता येतो.

पण खाण्याच्या जिनसांप्रमाणे किंवा बँकेच्या हिशेबाप्रमाणे त्याचे मोजमाप ठरवता येणार नाही; किंवा व्यवहारी उपयुक्तता मारवाड्याला पटवता येणार नाही. कारण हा एक मनाचा व्यापार आहे.

हे सौंदर्य मोजता कसे येणार ?

सौदर्यलोलुपता, गानलुब्धता ही काही निव्वळ मानवकोटीतच आढळतात असे नाही. पशुपक्ष्यांमध्येंही ती आढळून येतात.

माणसांपेक्षां जनावरांचे घ्राणेंद्रिय अधिक तीक्ष्ण असते. साप नेहमी केवड्याच्या बनात घुटमळत असतो, हिरव्या चाफ्यावर मोहित होतो. कुत्री, कोल्हे, लांडगे, वासावरून आपले भक्ष्य शोधतात व बहुतेक सर्व जनावरांची कामेच्छा वासानंतर प्रदीप्त होते, हे दृश्य काही नवीन नाही. काही कादंबऱ्यात अंगसुगंधाची वर्णने आढळतात. ज्या अंथरुणावर त्याची प्रिया झोपली, ते अंथरुण, ते कपडे प्रियकराला तिच्या स्पर्शसुगंधाने कळले. अशा गोष्टी व असा अनुभव अनेकांना आला असेल. लहान मुलांच्या उघड्या अंगाचा पवित्र सुगंध मातापित्यांच्या हृदयाला उल्हसित करू शकतो. या गंधमीलनातून फुलांची वाढ आणि उत्पत्ती होत असते.

तेव्हा सौंदर्य हे केवळ दृश्य स्वरूपातच असते असे नाही. "किती सुंदर वास आहे हा', असे आपण नाही का म्हणत ! मनाला आल्हाद देणारी गोष्ट ती सौंदर्याची, आत्म्याचा विकास करणारी ती सौंदर्याची, असा निष्कर्ष यातून काढता येईल. असो.

खालच्या प्राणिकोटींत मला स्वत:ला तरी गानलुब्धता व गंधलुब्धता

सापाइतकी कोठे दिसत नाही. हिंस्र पशूंना वास हे भक्ष्य शोधण्याचे साधन असते. पण साप त्यापासून निर्भेळ आनंद उपभोगू शकतो. 'केवड्याच्या बनामधीं नाग डोलतो ग, बाई, नाग डोलतो' असे गीत मुली म्हणत असल्याचे मला आठवते - तसेच नागपंचमीच्या दिवशी गारुडी लोक लोकांनी पूजा करावी म्हणून साप आणतात. त्यावेळी पुंगी वाजवताच तो फणा काढून कसा खुशीत डोलू लागतो ! त्याची विषारी वृत्ती त्या वेळी लयाला गेलेली असते. त्या गाण्यामुळे तो एका उच्च थरात जातो.

पण गाण्याला चालना मिळाली ती प्रियाराधनेंतूनच असावी. वैषयिक स्वार्थातून त्याचा उगम झाला असला, तरी ते एक आनंदाचे स्वतंत्र साधनही होऊ शकते.

कबूतर प्रियाराधन करीत असताना पहावे. या वेळचा त्याचा थाटमाट नुसता पाहून घ्यावा. आपल्या प्रियकरणीला वश करण्याकरिता त्यामध्ये असलेले विविध सौंदर्य तो तिला दाखवतो. छाती फुगवून तो आपल्या फुशारकीचा पिसारा दाखवतो, तालबद्ध नाचूं लागतो, आपल्या प्रेयसीच्या सभोवार सारखा घुमत राहून तिला आळवतो, आपल्याजवळचे दृश्यसौंदर्य, गानसौंदर्य सर्व प्रकट करतो. चित्रकला, गायन, नृत्यकला व तालबद्धता (ऱ्हिदम) यांचे पितृत्व तरी या पक्षाकडे येत नसेल ?

गाण्याची मोहिनीच अशी आहे की, त्याचा अंमल असेपर्यंत सर्व प्राणिमात्र मंत्रमुग्ध होऊन जातो. श्रीकृष्णाची विश्वमोहिनी मुरली कोणा हिंदूला माहीत नाही बरे ? वृंदावनी मुरली वाजवणाऱ्या सावळ्या कृष्णमूर्तीभोवती जमलेला गवळणींचा, गुराख्यांचा, त्यांच्या खिल्लारांचा, आजूबाजूच्या वनचरांचा मेळावा, गोड स्वराने गुंग झालेला, चित्रात आपण नेहमी पाहतो. ते काही निव्वळ कल्पित चित्र नव्हे. पाव्याचा आवाज कानी पडू लागला की गायी रवंथ करू लागतात. पक्षी स्तब्ध बसतात. हिंस्र पशु झोपी जातात. आपल्याआपल्यातील वैरभाव क्षणभर विसरून जातात. आपल्याला पाहता येतात या गोष्टी. मी कोल्हापूरच्या सेंट्रल जेलमध्ये असताना, पहाटेची जाग करणारी तुतारी वाजली की तेथील कुत्री त्याच सुरात तात्काळ गाऊ लागत. वाघाला सारंगी आवडते म्हणतात, पण तोच कर्कश आवाज कानावर पडला की तो खवळतो ! काही माद्या (मेअर्स) गाण्यामुळे कामोत्सुक होतात. कित्येक स्त्रियांनी गानलुब्ध होऊन त्या क्षणी अनोळखी पुरुषालाही आपला देह

वाहिल्याचे अनेक वेळा प्रत्ययाला येते. तर स्त्रीच्या कर्कश आवाजामुळे ती नकोशी वाटते.

विषयेच्छेतून गाण्याचा उगम झाला असला, स्त्रीला मोहित करण्याकडे जरी त्याचा उपयोग झाला असला-तरी त्याची मर्यादा त्यापुरती राहिली नाही.

स्त्रीला संतुष्ट करण्याकरिता गाण्याने आळवू लागणारा मनुष्य-आपल्याला पोसणारा, जगवणारा, रक्षण करणारा, नाश करणारा ईश्वर आहे असे समजून त्या शक्तीला, देव-देवताना व पुढे मूर्तींना आळवू लागला. ईश्वराच्या आराधनेसाठी काव्य निर्माण होऊ लागले. अनेक धर्मग्रंथ मूळ काव्यस्वरूपातच आढळून येतात.

शक्तीला ईश्वर मानता मानता सर्वात बलवान अशा वाटणाऱ्या व्यक्तीने जवळ जवळ देवाचे स्थान पटकावले व पुढे त्याच्या स्तुतिपाठाकरिता गान आणि काव्य उपयोगात येऊ लागले. पुढे त्याच गाण्याचा व वाद्याचा उपयोग पोवाडे, रणगीते व रणवाद्ये इकडे होऊ लागला. पण निव्वळ शांततेच्या कलात आनंद निर्माण करण्यासाठींही होऊ लागला. गाणे गाण्यासाठी आवडू लागले. आनंद उपभोगण्याचे व मिळवण्याचे ते एक स्वतंत्र साधन झाले.

दृश्य सौंदर्याचीही आवड पशुपक्षात आहे.

पक्षाची कोटी पहावी, म्हणजे त्यांच्या कौशल्याची व सौंदर्याची आवड दिसून येईल. विशेषत: काही जातीच्या चिमण्यांची कोटी म्हणजे सौंदर्याचे नमुनेच ठरतील.

सुंदर सुंदर पिसे, रंगीबेरंगी काचा, खडे, आकर्षक रंगांच्या चिंधुटल्या पळवून नेऊन ते आपली कोटी श्रृंगारणार ! त्यांच्या दृष्टीचा तो सौंदर्यविकास पाहून माणसांनी थक्क व्हावे. आपल्या अंगच्या सौंदर्याचा उपयोग पशुपक्षी प्रियाराधनेकडे करीत आलेच आहेत.

धनिक आपल्या रत्नभांडाराचे व आपल्या ऐश्वर्याचे प्रदर्शन करून स्त्रीला वश करून घेण्याचा प्रयत्न नाही का करीत ? त्याचप्रमाणे आपल्या प्रियेचे डोळे आपल्याजवळच्या रत्नभांडाराने दिपवण्याकरिता मोर, लांडोरीसमोर जवळची सर्व रत्ने पसरून ठेवून नाचू लागतो. आणि आळवून आळवून डोळ्यातून टिपेही टाकतो असे म्हणतात.

गायरातला वळू आपली ताकद व मर्दानी ऐश्वर्य दाखविण्याकरिता डरकाळी फोडून पृथ्वीला पायाखाली दडपू लागतो व शेपूट वर करून धावतो -

तर वारू खुराने माती उधळत, कान वरती करून नाचत बागडत, छाती फुगवीत, तिच्यापुढे येतो - कबूतर तर कामशास्त्रांतले तज्ज्ञच आहे.

विशेषत: या वैषयिक भेटीच्या वेळीच सौंदर्याचे आविष्करण प्राणिकोटीत होत असल्याचे दिसून येते. मानवकोटीतही या कालीच सौंदर्याची आवड वाढलेली दिसून येईल.

एखादी व्यक्ती जरा विशेष थाटमाट करू लागली, चेहऱ्यावरून विशेष हात फिरवू लागली, आरशाकडे धावू लागली, केसाकडे लक्ष देऊ लागली, तिच्या कपड्यांना सेंटचा वास येऊ लागला की बेलाशक समजावे इथे काहीतरी पाणी मुरते आहे. स्वारीचा डोळा कुठेतरी लागला आहे.

पशुपक्षात व माणसातही याच वेळी दिसून येणारी सौंदर्याची आवड पाहिली म्हणजे दृश्य सौंदर्याचा उगमही विषयेच्छेतूनच असे मानावे लागते.

पण पुढे आपल्या इच्छेचा आवडीचा विषय हाच सौंदर्याचा विषय होऊन बसतो.

जिच्यावर आपलं प्रेम बसलं आहे ती स्त्री आपल्याला लावण्यखनी वाटू लागते. म्हणतात, लैला काही देखणी नव्हती. तेव्हा कोणी तरी मजनूनला विचारले,

'मजनू, असं काय सौंदर्य, लैलीत पाहिलंस तू, की तू तिच्यावर इतका वेडा व्हावंस?'

त्यावेळी त्यानं उत्तर दिलं,

'लैलीला पाहायला मजनूचेच डोळे पाहिजेत. म्हणजे जी स्त्री मजनूला सौंदर्याची प्रतिमा वाटली ती दुसऱ्याला तशी दिसत नव्हती. कारण त्यांनी प्रेमाचा चष्मा घातला नव्हता. तो प्रेमवेडा झाला होता म्हणून ती त्याला तितकी सुंदर दिसत होती. म्हणून सौंदर्याचा उगम विषयासक्तींतून झाला असं विधान निघू शकतं. कारण मनुष्याच्या इतर गुणांचा विकास होण्यापूर्वी इतक्या उत्कटतेने हवीशी वाटणारी व्यक्ती स्त्रीखेरीज दुसरी कोणती वाटणार!

पुढं ते प्रेम त्या विषयासक्तीतच गुंतून पडलं नाही. उत्क्रांतीबरोबर त्याचाही विकास होत गेला आहे.

मातेला आपलं मूल, मग ते जगाला कितीही गलिच्छ व कुरूप दिसो, सुंदरच वाटतं.

ज्या स्त्रीवर आपलं प्रेम बसेल ती स्त्रीच आपल्याला सुंदर दिसते असं नाही. तिची वस्त्रे सुंदर दिसतात, तिच्या जवळच्या वस्तू सुंदर दिसतात, तिचा

आवाज गोड वाटतो, तिचे हावभाव मोहक वाटतात, जी भूमी तिच्या पदतलाने भूषित झाली ती पूज्य वाटते - हाच त्या वैषयिक प्रेमांतून उत्पन्न झालेल्या सौंदर्याचा विकास होय -

म्हणून प्रेम हे सौंदर्याचे अपत्य नसून,

प्रेम ही सौंदर्याची जननी होय-

याच प्रेमातून जगाला थक्क करून सोडणारे सौंदर्य शहाजहाननं जमना-तटाकी उभे केलं ! दृश्यसौंदर्य आणि गानसौंदर्य मूर्तस्वरूपात जगापुढे उभे केलं.

याच प्रेमाला ईश्वराच्या भक्तीचं वळण मिळताच देवादिकांची चित्रे, देवालये - अजंठा लेण्यातील चित्रकला - बुद्धाची मंदिरे - युरोपांतील सुप्रसिद्ध प्रार्थनामंदिरे वगैरे चित्रकला, शिल्पकला (आर्किटेक्चर), स्थापत्यशास्त्र या कला वाढल्या - त्याचा सत्ताधिशांना खूश करण्याकरिता उपयोग झालाच आहे. प्रचाराकरिता झाला आहे.

जी वस्तू पाहिजे ती मिळवण्याकरिता या साधनांचा जरी उपयोग झाला असला तरी,

प्रेमामुळे सौंदर्याची वृद्धी झाली आहे.

जगाला सुंदर बनवणारी - देह, मन, अंत:करण - तसंच बाह्य जगाला सौंदर्याचे स्वरूप देणारी प्रेम हीच यक्षिणीची कांडी आहे. हा परीस ज्याला सापडला आहे तो दरिद्री असला तरी परम-आनंद भोगू शकेल.

ज्याच्या आत्म्याला प्रेमाचा उजाळा मिळाला आहे, त्याच्या दिव्यदृष्टीला विश्व प्रेममय दिसू लागतं. झाडाझुडपांत, पशुपक्षात, चराचर सृष्टीत सौंदर्य उमाळून आल्याचा अनुभव येतो व तो पण प्रेमाच्या प्रभावानं सर्व सृष्टी जिंकू शकतो.

आनंदस्वरूपी होतो, आनंदब्रह्मांत विलीन होतो. हीच ती मानवी विकासाची परमोच्च स्थिती. हाच तो मोक्ष. हीच ती खरी सौंदर्यसृष्टी.

("When we are enjoying it, conflict between the different parts of our nature is temporarily stilled. We are all of a piece with reason, spirit and desire fused in a single power.... it produces a temporary harmony of all impulses."

*- JOAD)*

*(कला आणि कलावंत)*

# काही कथा

## जागृत देव

तालुक्याचे ठिकाण फार लांब नव्हते, चार पांच मैल. खेड्यातल्या माणसांना एवढे अंतर म्हणजे काहीच नाही, दिवसांतून सहज दोन खेपा व्हायच्या. नेहमी जाणेयेणे असल्यामुळे तालुक्याच्या शहरांत पाटलांच्या पुष्कळ ओळखी झाल्या होत्या. पाटील दिसले म्हणजे कोणीतरी हांक मारून घरात बोलावणार, पानतंबाखूचा तरी आग्रह करणार. गावचे पाटील असल्यामुळे कचेरीत जाण्याचा नेहमी प्रसंग. शिपायांच्या कारकुनांच्या ओळखी व्हायच्याच.

सहजी शहरातल्या एका पाहुण्याची गाठ घ्यावी आणि जमल्यास कारकुनालाही कामाचे विचारावे म्हणून पाटलांची स्वारी आज गावाबाहेर पडली होती. चालता चालता वाटेत त्यांच्या पायतणाचे बंद तुटले, त्यामुळे त्यांना पायतण घालून मुळीच पाय पुढे टाकता येईना. इकडे तिकडे बघून पाटलांनी आपल्या पटक्याच्या शेंबल्याचे टोक जरासे फाडले आणि त्याने पायताण पायाशी बांधून टाकले. पटक्याचे कापड कितीवेळ टिकणार ? कसेबसे गावच्या नजीक आले. आता यापुढे असे फरफटत जाणे, आणि तेही बांधलेल्या चिंधुकल्यासकट, ओळखीचे लोक चेष्टा केल्याखेरीज राहणार नाहीत, म्हणून त्यांनी ते काढून टाकले. त्यापेक्षा अनवाणी चालणेच बरे, अन् गावात काय काटाकुटा लागणार होता थोडाच ?

पायताण काढून रस्त्याच्या बाजूला एका झाडाच्या बुंध्याखाली टाकले. एखाद्या वेळी परत जाताना लागलेच तर घ्यावे म्हणून तेथेच पडलेला एक दगड त्याच्यावर टाकला आणि ती जागा सापडावी म्हणून पटक्याच्या फाटलेल्या शेंबल्यात एक काठी घातली आणि ती जवळ दिली रोवून.

गावात पाहुण्याच्या गाठी घेतल्या, पण कारकुनाने नेहमीच्या रिवाजाप्रमाणे कामाचे लगेच काही उत्तर दिले नाही. त्यामुळे त्यांचा त्या दिवशी तेथेच मुक्काम पडला. दुसरे दिवशी होता बाजार. हिंडता हिंडता त्यांना एक

पायतणाचा जोड स्वस्तात दिसल्याबरोबर त्यांनी लगेच खरेदी केला. नवा जोड मिळाल्यावर मग जुन्या पायतणाची काय जरूर? त्याची त्यांना आठवणही राहिली नाही.

पाटलाचे गावांत एक मोठे देवभक्त दोस्त होते, त्यांचे नांव ज्ञानबा. ते माळकरीच होते, आणि बहुतेक वेळ भजनांत घालवीत. जाल त्यावेळी त्यांच्या हातांत टाळ हा दिसायचाच. सर्व काही होत आहे ते देवाच्या इच्छेने होत आहे ही त्यांची ठाम समजूत; कर्ता करविता सर्व काही तो आहे. पण निमित्तमात्र आहोत, असे ते नेहमी बोलत. कोठे जायचे झाले, काही करायचे झाले, कोणी आजारी पडले, की ज्ञानबांनी आपला देव गाठायचा. कारण झाडाचे पानसुद्धा त्यांच्या आज्ञेशिवाय हालत नाही, त्याचाच हुकूम चहुंकडे चालणार, चांगले करणारा तो, वाईट करणारा तोच. त्याला शांत केला म्हणजे माणसाला काय भीती? काळ सुद्धा त्याला भिऊन पळणार!

या त्यांच्या भाविकपणामुळे त्यांच्यापासून भटाभिक्षुकांना, जोश्यांना, गुरवांना, देवाचे नाव घेणाऱ्या सर्वांना, थोडातरी फायदा व्हायचाच. त्या लोकांनी येऊन यांच्यापुढे देवाच्या चमत्कारांच्या, दृष्टांतांच्या गोष्टी सांगायच्या आणि यानी मान डुलवीत ऐकायच्या. पाटीलही ज्ञानबाकडे जाऊन बसायचे. ते इतके देवभक्त नसले तरी देवाला मानायचेच, अन् खेड्यांत देवाला मानीत नाही असा असणार तरी कोण? देवाला न मानणारा माणूस म्हणजे सैतान, खेड्यातले लोक त्याला जिता जाळतील. अगदी जिवंत पुरतील आणि ते पुण्य समजतील!

आमचे ज्ञानबा नेहमी देवांच्या शोधात. देव चांगला कोणचा, वाईट कोणचा, जागृत देवता कोणती, थंड कोणती, नवसाला लवकर कोण पावतो, याची ते नेहमी माहिती काढीत. आसपासच्या सगळ्या दऱ्याखोऱ्यांतले, अगदी आडवळचणीचे, अशा झाडून सगळ्या देवांचे ठावठिकाण ज्ञानबांना अचूक माहीत असायचे. त्यांची देवभक्ती शहरातल्या सगळ्या भटांना, जोश्यांना, देवांच्या सगळ्या खास वारसदारांना माहीत झाली होती- कारण अडचण आली की ज्ञानबा सगळ्या दलालांची घरे धुंडणार!

पाटील एकाएकी तापाने आजारी पडले आणि तापाची कमान रोज चढतच चालली- पाटील म्हणजे ज्ञानबांचे अगदी जिगर दोस्त, त्यांच्यासाठी ज्ञाबना भटांची घरे धुंडू लागले. त्यातल्या एका भटाने त्यांना एका नवीन देवाचा चमत्कार सांगितला. प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट, आणि त्या गोष्टीला फार दिवसही झाले नव्हते. ज्यांना अनुभव आला ती मंडळी आज त्या गावातच होती. एका मोठ्या सावकाराचा खटला चालला होता, तीसचाळीस हजारांचा दावा होता. त्याला काय बुद्धी झाली कोण जाणे, त्यांनी एका अप्रसिद्ध देवाला नवस

केला. आश्चर्याची गोष्ट, त्यांना वाटले नव्हते की असल्या आडवळणी, लोकांच्या अगदी दृष्टिआड अशी जागृत देवता असेल! पण ती त्यांच्या नवसाला पावली. तिच्या कृपेने खटल्याचा निकाल त्यांच्यासारखा झाला.

त्यांनी हे उपकार जाणून त्या देवासाठी पाच हजार रुपये खर्च केले. महिनाभर रोज ब्राह्मणभोजन द्यायचे ठरले. आणि सावकार स्वत: रोज देवदर्शनाला येत. तुम्हीही त्याच देवाला नवस मागून घ्या, असा भटजींनी ज्ञानबाला सल्ला दिला.

ज्ञानबा जाताना देवाला गेले, तो वाटेतच होता. देवासमोर एक तात्पुरता मंडप उभा केला होता. सभोवतालची जागा साफसूफ करून कोपऱ्यांत एक दिवा लावला होता. देवाच्या अगदी जवळ एक लकडकोट उभा केला होता. बाजूला तीर्थ देण्याकरिता एक ब्राह्मण बसला होता आणि ब्राह्मणसुद्धा स्नान केल्याखेरीज जायचे नाही. लकडकोटाच्या आत ब्राह्मणाखेरीज कोणी जायचा नाही. दक्षिणेचा हक्क ब्राह्मणाचाच असतो, परंतु सावकार ब्राह्मणेतर असल्यामुळे व त्याच्याच पैशाने देऊळ उभारणार असल्यामुळे शूद्रांना कठड्यापर्यंत जाण्याचा हक्क ब्राह्मणांनी स्वखुषीने दिला होता. देवाचे महात्म्य गावभर पसरल्यामुळे सकाळ-संध्याकाळ बायकापुरुषांची दाटी व्हायची.

पाटलांना बरे वाटल्यावर ब्राह्मणांना मोठे भोजन देऊ व देवळासाठी भर म्हणून पंचवीस रुपये देऊ असे ज्ञानबाने कबूल केले. त्याचवेळी भटाच्या हातावर एक रुपया दक्षिणा ठेवली आणि भक्तिभावाने देवाला साष्टांग नमस्कार करून ज्ञानबा आपल्या वाटेला लागले. त्यांनी पाटलांना सर्व हकिकत सांगितली आणि आधार दिला. 'तुम्ही आता काही काळजी करू नका. सगळ्या भटांनी या देवाची खात्री दिली आहे, तसा अनुभवच आला आहे.'

पाटलांचा ताप हळूहळू उतरू लागला. वीस दिवसांनी तो साफ उतरला. पाटलालाही वाटले, ज्ञानबाचा देव खराच पावला. ज्ञानबाचे डोंगराएवढे उपकार झाले. चालता आल्याबरोबर त्यांनी प्रथम जाऊन देवाचा नवस फेडावयाचे ठरविले. ज्ञानबांची गाठ पडल्यावर ते पाटलाला म्हणाले, ' का, आहे की नाही देवाचे महात्म्य?' खोटे व्हावयाचे नाही. भटांनी काही उगीच खात्री दिली नव्हती!' आषाढी आली म्हणून ज्ञानबा पंढरीला गेले. जाताना पाटलाला देवाचा ठावठिकाणा बरोबर सांगितला.

बरे वाटतांच पाटील देवदर्शनाला निघाले. ज्ञानबांनी सांगितलेल्या

ठिकाणावर देव सापडायला त्यांना वेळ लागला नाही. अगदी दुपारीच तेथे पोचल्यामुळे गावची माणसे तेथे नव्हती. चारपाच ब्राह्मण मात्र होते. मंडप कच्चाच पण ऐसपैस होता. देऊळ बांधण्यासाठी दगड येऊन पडले होते. काहींचे रंगकाम सुरूही झाले होते. मुहूर्त पाहून पायाचा दगड बसविण्याचा समारंभ व्हायचा होता. पाटील मंडपात गेले, आत देवाजवळ, कठड्याच्या आत जायची बंदी होती, पण ते तेथूनच निरखून पाहू लागले. तेथे मूर्ती वगैरे काही नव्हते. एक वाटोळा दगड होता, अन् त्याच्यावर काठीला लावलेले एक तांबडे निशाण होते. ते पाहताच त्यांना झटकन एका गोष्टीची आठवण झाली आणि ते मोठमोठ्याने हसू लागले.

ते तांबडे निशाण म्हणजे त्यांच्याच पटक्याची चिंधी फाडून त्यांनी उभे केलेले निशाण होते, आणि तो देव म्हणजे त्यांनीच आपले तुटके पायताण झाकून ठेवण्याकरिता त्यावर उचलून ठेवलेला दगड. ते चिंधीचे निशाण पाहून सावकार त्या दगडाला देव समजून पाया पडला असावा, हे त्यांनी लगेच ताडले आणि ते सारखे हसू लागले. काही केल्या थांबेनात.

तेव्हा पुजारी त्यांच्यावर संतापून म्हणाले, 'तुम्ही देवाची चेष्टा करता काय, तुम्हाला पश्चात्ताप होईल ! ही इतरांसारखी देवता नाही बरे, महा उग्र आहे !' 'अहो भटजी महाराज, तुम्ही नका मला ही भीती दाखवू. ही देवता माझ्या चांगल्या ओळखीची आहे. महाराज, तुम्ही माझ्याच पायतणाची लागला पूजा करायला ! तो दगड मीच उचलून माझ्या पायतणावर ठेवला, तो उचला म्हणजे खाली माझे पायताण सापडेल. त्याला तुम्ही देव करून टाकला आहे की !'

हे ऐकून भटांच्या तोंडचे पाणी पळाले. त्यांनी पाटलांचे पाय धरून विनवणी केली, 'पाटीलबाबा, आता तुम्ही या गोष्टीचा बभ्रा करून आमच्या पोटावर पाय आणू नका. आमच्यावर दया करा. हे घ्या पन्नास रुपये आणि जा कसे मुकाट्याने ! भटांच्या पोटावर कशाला पाय द्यावा, म्हणून ते पन्नास रुपये घेऊन निघून गेले. ज्ञानबा पंढरीहून परत आल्याबरोबर त्यांनी ती रक्कम ज्ञानबाच्या हातावर ठेवून, हा घ्या तुमच्या देवाचा प्रसाद म्हणून सर्व हकीकत त्यांना सांगितली. ज्ञानबाही पोट धरधरून हसू लागले. ते पंढरीहून बडव्यांच्या लाथा खाऊन आलेच होते. ते म्हणाले, "पाटील मला तर आता वाटते, जेथे तेथे असाच प्रकार असेल बघा. पंढरीला सुद्धा हेच. देव पुढे करून बडव्यांनी पैसे

उकळायचे, आणि त्यासाठीच ज्या त्या देवाचे महात्म्य वाढवायचे. खरा देव दगडांत नाही म्हणतात, ते खरे नाही तर काय !'

*(जिव्हाळा)*

## सुलूचा हात

हेम शिल्पकलेचे शिक्षण घेत होता.

त्या विद्यालयात तो अत्यंत हुषार असा विद्यार्थी होता. प्रिन्सिपॉलचं त्याच्यावर फार प्रेम. त्याला स्कॉलरशिप मिळत होती. तो हुषार असल्यामुळे आपल्या कामातल्या चुका दुरुस्त करून घेण्याकरता, बहुतेक विद्यार्थी त्याची मदत घेत.

शिल्पकला व चित्रकला यात दृष्टीचा अचूकपणा ही जरी एक मुख्य बाब असली, तरी त्या दोन्ही कलेत अंतर आहे. चित्रकार एका ठराविक ठिकाणी बसून, तेथून न हलता, त्याच्या दृष्टिकोनात जो देखावा दिसत असेल तोच फक्त चित्रित करण्याचा तो प्रयत्न करीत असतो.

वस्तू असतील तशा नव्हे, तर दिसतील तशा काढण हे काम चित्रकाराचे, त्याला वस्तूचा आभास निर्माण करावयाचा असतो. मनुष्याला दोन कान असतात, पण चेहेऱ्याची एक बाजू पाहिली म्हणजे एकच कान दिसतो म्हणून असते ते न काढता दिसते तेच चित्रकाराला काढावे लागते.

शिल्पकाराची गोष्ट तशी नसते. पुतळा तयार करायचा असल्यास त्याला सर्व बाजू नीट पहाव्या लागतात. त्या वस्तूचा कठीणपणा किंवा मार्दव याचे प्रत्यक्ष स्पर्शजन्यज्ञान त्याला झाल्यास त्या कलेला ते ज्ञान सहाय्यक ठरते. स्पर्शज्ञान फुकट जात नाही. चक्षुज्ञान व स्पर्शज्ञान या दोन्ही ज्ञानाचा त्याला फायदा घेता येतो.

म्हणून शिल्पकारात स्पर्शभावना चित्रकाराहून जास्त आढळते. तिचा विशेष विकास झालेला असतो.

चित्रकार विशेषत: रंगलोलूप असतो.

सुंदर गुलाबाच्या फुलाने, सौंदर्यसंपन्न तरुणीच्या गालावरील लालीने, तसेच आकाशात उधळलेल्या रत्नभांडाराने तो वेडा होऊ शकतो. पण एखाद्या तरुणीच्या सौंदर्याकडे तो वेड्यासारखा पाहू लागला म्हणजे साधारण मनुष्याला

तो नीतिभ्रष्ट वाटतो.

चित्रकार रंगलोलुप तसा शिल्पकार स्पर्शलोलुप असतो.

★ ★ ★

हेमचंद्र आपल्या कामात सदा चूर असे.

वर्गात अभ्यासाकरिता म्हणून जी वस्तू ठेवली असेल, किंवा जी व्यक्ती समोर असेल तिला लांबून जवळून बारकाईने निरखून पहाण्यात, त्या वस्तूची रेखा, आकार, ठेवण, तिचा कल, मांसल ओघ पाहण्यात व शक्य तेथे त्या भागाचा चढउतार, खाचाखोचा हाताने अजमावण्यात तो गुंग असे. लाकडाची हत्यारे,.मातीवर वापरण्यापेक्षा शक्य तितके तो आपल्या बोटाचाच उपयोग करी. स्पर्शभावना हत्यारापेक्षा हाताच्या बोटांनीच अधिक प्रकट करता येत होती. नाग वासात किंवा गाण्यात गुंगून जातो तसा तो कामात अगदी गुंगून जाई. तो कामात चूर असला म्हणजे ते पाहण्यात इतर विद्यार्थ्यांना मोठी मजा वाटे. तो त्या कामात इतका गुंगून जाई की केव्हा केव्हा काम करीत असताना मातीत भरलेल्या हातांनीच चुकून तोंड पुसे व सर्व तोंड चिखलाने भरवून घेई. मग वर्गात हशाच हशा उडून जाई.

पण त्याच्या या कलानिष्ठेमुळे सुलूला त्याच्याबद्दल आदर वाटे. ती त्या वर्गात नुकतीच आली होती. तिची ओळख करून घेण्यासाठी जो तो धडपडत होता. तरुणांच्या या धडपडीचं कारण काही सांगायला नको.

सौंदर्य आणि अंगसौष्ठव ! व्हीनसच्या पुतळ्याप्रमाणे तिचे प्रत्येक अवयव प्रमाणबद्ध होते. चेहरा तर आकर्षक होताच; पण देहयष्टी हजारात उठून दिसणारी होती. अगदी बांधेसूद. त्यामुळे तिच्या अवयवाच्या प्रत्येक चाळ्यात जिवंत काव्य दिसायचं !

★ ★ ★

हेमने कलेला वरलेलं.

स्त्रीच्या मोहात पडल्यास आपण कलेस अंतरू, ही त्याला पूर्ण जाणीव होती. म्हणून कलेला त्यानं दुसरी सवत निर्माण केली नव्हती. त्याचा एकपत्निव्रताचा बाणा होता. त्याचमुळे सुलूशी ओळख करण्याचा, तिच्याशी बोलण्याचा किंवा तिच्या कामातील चुका दाखवण्याचा आगंतुकपणा त्याने केव्हाही केला नाही.

असे झाले तरी, सुलूचे अंगसौष्ठव त्याला दृष्टिआड करता आले नाही.

स्त्रीचं वेड त्याला केव्हाच नव्हतं. पण सुन्दर आकृतीचं वेड त्याला मारता येईना. चेहऱ्याकडे पाहण्याचं तो टाळीत असे, पण तिच्या अंगयष्टीवर व तिच्या मोहक हातावर त्याची दृष्टी खिळून राही.

तिचा हात निर्दोष आकृतीचा अप्रतिम असा एक नमुना होता !

नजरेला नजर भिडण्याचा प्रसंग न आल्यामुळे त्याची नजर आपल्या हाताच्या सौंदर्यावर खिळली आहे हे सुलूला बरेच दिवस समजून आलं नाही. मात्र आपल्या जवळच्या कसल्यातरी पदार्थांकडे तो पाहतो याची तिला जाणीव होऊ लागली. पण ते गूढ तिला उकलेना. पण त्याच्या सतत दृष्टीमुळे तिची चौकसबुद्धी मात्र जागी झाली.

आपल्या चेहऱ्याकडे तर तो खास पहात नाही. कारण ती गोष्ट कशी झाकली जाणार ! चोरटी नजर तर प्रणयी जनांना अचूक कळते. सरळदृष्टी अर्थशून्य असते. तिरप्या लाजाळू नजरेने जे संदेश पोचू शकतात ते सताड उघड्या डोळ्यांना पोचवता येत नाहीत. प्रेमसाम्राज्यातल्या या रीतीभाती नेहमीच्या व्यवहारापासून फार निराळ्या असतात !

हेमनं तर तिच्या गोंडस कलापूर्ण हाताचा इतका काही अभ्यास केला होता की तो हात दृष्टिआड झाला तरी त्यातल्या अगदी बारीकसारीक खाचाखोचाही त्याच्या डोळ्यापुढे दिसत. अगदी चाफेकळीसारखी लांबसडक बोटे, निमुळत्या नखावरची ती लाली, त्या लालीवरची चमक, हाताचा तो बांधेसूद रेखीव मांसलपणा, लाटांच्या मंद हेलकाव्याप्रमाणे हाताची होणारी ती गोड हालचाल, आपल्या स्मृतिभांडारात सर्व काही साठवून ठेवलं होतं त्यानं.

सुलूला आपल्या हाताच्या मृदुल सौंदर्याची, व आकर्षक शक्तीची जराही कल्पना नसेल.

त्या हाताची मृत्तिकाकृती आपण तयार करावी, साचाही तयार करावा, दृष्टिसुखाबरोबर स्पर्शसुखही घ्यावे अशी उत्कट भावना त्याच्या ठिकाणी उत्पन्न झाली होती.

पण हे विचार बोलून दाखवायचे कसे !

बोलता आले नाही तरी हाताचे चाळे कसे राहतील ? त्याने आपल्या समोर असलेल्या कामाच्या बोर्डावर तिच्या हाताची आकृती काढली.

इतर विद्यार्थ्यांना त्याचे विशेष असे काही वाटले नाही. किंवा हेमने तिच्या हाताचे हे स्केच केले असेल असे वाटले नाही. हातापायाची वगैरे

आकृती काढणे हा नेहमीचाच एक प्रकार होता.

हेम स्वत: कोणीकडे जात नसे, पण त्याचे काम नेहमीच प्रेक्षणीय व अनुकरणीय होत असल्यामुळे विद्यार्थीच काय पण शिक्षकही क्षणभर येऊन त्याच्या कामासमोर उभे रहात. शिक्षक किंवा प्रिन्सिपॉलही त्यात काही सुधारणा करण्याला धजत नसत, इतके निर्दोष असे ते. हा फार मोठा माणूस होणार याची सर्वांना खात्री पटली होती ! जातिवंत शिल्पकार होता तो. पद्धतीतही त्याचं स्वत:चं वैशिष्ट्य दिसे !

सुलूही येऊन पहात रहावयाची. पाहून आश्चर्य वाटायचं, त्याच्या कौशल्याचं. त्याच वेळी तिची नजर सहजगत्याच त्या बोर्डावर माकलेल्या त्या हाताच्या आकृतीकडे गेली.

एका गोंडस हाताची आकृती त्याने काढली होती. त्याच्या मोकळ्या हाताचा हा फुरसतीचा चाळा असेल, त्याच्या बुद्धीतून निर्माण झालेली ही आकृती असेल, असं प्रथम तिला वाटलं पण पुढे पुढे तिच्या हातावर रोखलेली त्याची नजर व नंतर त्यात होणारा बदल जसजसा तिच्या दृष्टीस पडू लागला तसतसा तिचा संशय दृढ होत चालला.

हेम आपल्याच हाताची आकृती काढीत आहे व आपल्याच हाताकडे टक लावून पहात आहे हे तिला समजून आलं.

काही दिवस गेल्यावर तिने आपणहूनच बोलण्यास सुरुवात केली. तो उभा होता त्या जागेजवळ ती आली व थोडा वेळ त्याचं
काम पाहून झाल्यावर त्याला म्हणाली.
'हेम, माझं काम जरा येऊन पहाता का ?'

विनंती केलेली त्याला मोडता कशी येणार? तो लगेच तिच्या जागेवर गेला व समोर बसलेलं मॉडेल पाहून त्याने त्याला वाटणाऱ्या चुका भीत भीत सांगितल्या. त्याला वाटले, आपण बेतानेच सांगितले पाहिजे. नाहीतर तिला वाईट वाटेल. ती म्हणाली,

'तुम्ही दाखवा ना दुरुस्त करून.'

काम करू लागल्याबरोबर तो त्यात गुंगून गेला. ते काम दुसऱ्याचे आहे याचा त्याला विसर पडला. वेळ झाल्याची घंटा झाल्यावर त्याला समजले की आपण दुसऱ्याच्या कामावर आहोत.

त्याने घेतलेल्या या मेहनतीबद्दल सुलूला त्याचे उपकार वाटू लागले.

पण त्याने मात्र उपकारबुद्धीने ते काम केले होते असे नाही. दुरुस्त करता करता तो स्वत:च त्यात रंगून गेला होता.

या प्रसंगानतंर सुलूने त्याच्याशी आपणहून बोलण्याची, काही प्रश्न विचारण्याची सुरुवात केली. तो काम करीत असता तासन्तास ते पहात ती उभी राहू लागली.

मैत्री नसली तरी सलगी उत्पन्न झाली.

त्याचा आपल्याला फायदा मिळावा, आपल्या चुका वेळोवेळी दुरुस्त करून घेता याव्यात, त्याच्या काम करण्याच्या पद्धतीचा अभ्यास करता यावा, म्हणून ती आपले स्टूल, बोर्ड व आझल घेऊन त्याच्या शेजारी येऊन बसू लागली.

दिवसातील बहुतेक वेळ जवळ काढू लागल्यानतंर कोणीही असो, त्याच्यात साहजिकच आपलेपणा उत्पन्न होतो. भीड मोडते. जिव्हाळा उत्पन्न होतो.

पण ती जवळ आल्यापासून त्याचा एक मोठा तोटा झाला. तिच्या हाताकडे पाहणे व त्या आकृती काढणे अशक्य होऊन बसले. तथापि त्याचा डोळ्यावरती ताबा रहायचा नाही. दिवसातून हजार वेळा त्याची चोरटी नजर तिकडे वळायचीच.

सुलूला कळून चुकले की हे आपल्या हातावर आषक आहेत. अर्थात कलावंत म्हणून. कारण विषयाचे रंग त्याच्या डोळ्यात कधीच चमकायचे नाहीत. म्हणून तिच्यातही तो तसला संकोच उत्पन्न झाला नव्हता.

सुलूचा परिचय थोडे मोकळ्या मनाने बोलण्याइतका वाढला होता. त्याच्या कामाजवळ थोडा वेळ उभी राहिल्यानंतर तिने आपल्याला खरे काही माहीत असल्याचे न दाखवता सहजगत्या विचारले, 'हेम, कोणाच्या हाताची आकृती काढली आहे तुम्ही ही ?'

त्याला वाटलं आपली गुप्त गोष्ट उघडकीला आली व आता ही गोष्ट प्रिन्सिपॉलपर्यंत जाऊन आपली कानउघडणी होणार. म्हणून त्याने काहीच उत्तर दिले नाही. तो खजिल होऊन खाली मान घालून स्वस्थ बसला..

तिनेच पुन: सुरुवात केली.

'या हाताच्या ठेवणीमध्ये विशेष असे काही आहे काय ?'

'हो, पुष्कळच वैशिष्ट्य आहे यात. या हातामुळे मला ग्रीसमधील उत्कृष्ट पुतळ्यांच्या हाताची आठवण होते.'

'मग याची मूळ प्रत कुठे आहे ? आपल्या शाळेत आहे का हा पुतळा?'

त्याने थोडे धाडस केले व तो म्हणाला,

'जवळच आहे, आपण रागावणार नाही तर सांगतो.'

'यात रागवायचा काय संबंध?'

'हा हात तुमचाच आहे. अन् तुमचा हात पाहूनच तसा काढण्याचा मी प्रयत्न केला आहे. आपल्या परवानगीशिवाय हे धाडस केल्याबद्दल आपली मी क्षमा मागतो.'

'इतका का तो आवडतो तुम्हाला?'

'हो, इतका मोहक हात मी माझ्या आयुष्यात अजून पाहिला नाही.'

'मग इतकं चोरचोरून काढायला काय झालं. मला विचारलं असतं तर मी काय नको म्हणाले असते?'

'मला भीती वाटली, आपण रागवाल व त्याचा एखादे वेळी भलताच अर्थ कराल म्हणून-,

'तुमच्या कलेला मदत होत असेल तर त्याचा घ्या ना तुम्ही उपयोग करून. माझी मुळीच ना नाही. माझं असं काय नुकसान आहे त्यात? उलट तुमची कलाकृती मला पुन: पहायला मिळेल.'

मी तुमचा फार फार आभारी आहे. उद्याच त्याचा एक प्लास्टरचा साचा काढून घेतो व त्यानंतर हाताने मातीची आकृती तयार करतो.

त्या वर्गाच्या शिक्षकानेही काही हरकत घेतली नाही. शाळेतही एक प्रत ठेवता येईल म्हणून आणखी उत्तेजन दिले.

★ ★ ★

त्याने दुसरे दिवशी प्लास्टरचे सामान तयार करून ठेवले. हाताला प्लास्टर भाजू नये व चिकटू नये म्हणून तेल व साबणाचे दाट रोगण लावावे लागते. ते रोगण त्याने तयार केले व तिचा हात आपल्या डाव्या हाताने धरून दुसऱ्या हाताने ते रोगण लावायला सुरुवात केली.

ज्या हातानं त्याला वेड लावलं होतं तोच हात होता तो. सजीव हात होता. रंभेला लाजविणारा कोमलांगीचा होता. गुलाबाच्या पाकळ्यांचा नाजुकपणा होता त्यांत. केतकीवर उषेची लाली चढली होती जणूं!

त्या हातावर तो आपला तळहात फिरवू लागला. त्या तिच्या हातातून व धमन्यांतून अमृताचे झरे वहात होते. त्यावर त्याचा हात पडताच विद्युतप्रवाह खुळावेत त्याप्रमाणे त्याच्या देहांतही या प्रवाहाच्या लाटा खेळू लागल्या, सर्व

देहभर कसल्या तरी मधुर लहरी उठू लागल्या. हात कापू लागला. हृदयाचे ठोके जलदी पडू लागले. अंगावर रोमांच उठू लागले. निराळ्याच लोकी वावरत असल्याचा भास झाला !

या उन्मादावस्थेत दोघांची नजर भिडली.

तिलाही त्याचा अर्थ समजला. तिची नजर खाली आली. पण गालावर प्रणयाची प्रभात दिसू लागली. फुललेल्या गुलाब ताटव्यातून जात असल्याचा भास झाला. सुगंधी अत्तरांचे फवारे हृदयात उडू लागले. वसंतऋतूची ग्वाही देणारी कोकिळा तेथे गाऊ लागली.

कलेला सवत निर्माण करू देणार नाही ही त्याची प्रतिज्ञा डळमळू लागली. विचारात क्रांती घडून आली. सर्व जग नवे दिसू लागले ! सर्व दिशा उजळू लागल्या !

★ ★ ★

त्याने प्लास्टरचा साचा तयार केल्यानंतर आपल्या हाताने मृत्तिकाकृती तयार करण्यास सुरुवात केली. त्यासाठी ती बसू लागली. त्याची भीड चेपली होती.

हृदयाची ओळख झाली होती !

त्याला आपले चुकते आहे असे वाटल्यावर तो चिखलाने माखलेला आपला हात धुऊन हाताने मोजमाप घेई. रेषेचा ओघ समजण्याकरता त्याला स्पर्श करी.

केव्हा केव्हा त्या स्पर्शाचा मोह त्याला अनावर होई व तो आपला हात क्षणभर तसाच तिच्या हातावर ठेवी. तीही त्याचा हिरमोड करीत नसे. तीही पण भावनाशून्य नव्हती.

परीक्षेची वेळ आली !

मॉडेल म्हणून एक बाई विवस्त्र बसवली होती. त्या विषयाला पुरे करण्याकरता आठ दिवस दिले होते.

हेमने आपले काम चार दिवसाच्या आतच आटोपत आणले. सुलूचे काम रेंगाळू लागले ! तिला तो मातीचा पुतळा आवरेना. बोजड काम झेपेना, ती अगदी रडकुंडीला आली. पासाची आशा टाकून निघाली.

हेमने तिला धीर दिला. तू स्वस्थ रहा, मी सर्व आवरून घेतो म्हणून तिला ठेवून घेतले.

प्रणयात लबाडी क्षम्य असते.

परीक्षकाची नजर चुकवून हेमने झाकून ठेवलेल्या कामाची अदलाबदल केली. आपले तयार काम तिला दिले व तिचे आपण घेतले व ते आपले समजून ते आवरून घेऊ लागला.

इतर विद्यार्थ्यांची कामे पुरी होऊन ते निघून गेले. वर्गात दोघेच मागे राहिले. तो व सुपरवायझर. या परीक्षेत उत्तराची कॉपी करणे वगैरे प्रकार नसल्यामुळे, सुपरवायझरना डोळ्यात तेल घालून बसण्याचे कारण नव्हते. ते चहा प्यायला बाहेर निघून गेले होते.

वर्गात फक्त हेम व सुलू.

वडीलही विश्रांतीसाठी बाहेर गेले होते. विवस्त्र मॉडेलवर काम करण्याचे असल्याने इतरांना मज्जाव होता. सुलूच्या कामात म्हणजे आता त्याच्या स्वत:च्या कामात तो अगदी गढून गेला होता. उष्मा असल्यामुळे सर्व अंग चिप भिजून गेले होते. कपाळावरून गालावर घामाच्या धारा वाहू लागल्या होत्या. तो नुसती मान हलवून घाम झाडीत होता. कारण त्याचे दोन्ही हात चिखलात होते.

सुलूनं सुपरवायझर नाहीत असे पाहिले. आपल्याजवळचा रुमाल घेतला आणि चटकन् पुढे होऊन तिनं आपल्या रुमालानं हेमच्या तोंडावरचा घाम पुसला.

तिचा हात हेमच्या ओठाला लागला. झणकन् हृदयातल्या सर्व तारा छेडल्या गेल्या !

आपल्या आयुष्यातील सुखाची परमावधी झाली असं हेमला वाटलं. श्रमाचा व उपकाराचा हजारो पटीने परत मोबदला मिळाला. कष्टाचा मोबदला आपल्या सहस्त्र करांनी परमेश्वर देतो म्हणतात ! हेमची प्रणय देवता प्रसन्न झाली होती. तिनं पण त्याला जन्माचं ऋणी करून टाकलं. त्या मातीतून त्याला कमलप्राप्ती झाली होती !

कमलपुष्पाहूनही कोमल अशा करस्पर्शाचे अमृत त्याने चाखले होते !

स्वर्गीय आनंदात त्याने ते काम पुरे केले.

परीक्षेचा अखेरचा दिवस होता तो. सुट्टी संपून परत आपल्या निराळ्या आयुष्याला सुरुवात होणार, या मनोराज्यात तो आपल्या गावी निघून गेला !

★ ★ ★

तो आपल्या घरी गेला.

सुलूला पत्रं पाठवावीत, पत्राने भेटी घ्याव्यात, पत्रातून मनातले सगळे विचार कळवावेत असे वाटे. पण घरच्या मंडळींच्या स्वभावाची त्याला काहीच माहिती नसल्यामुळे त्याने ते धाडस केले नाही.

सुलूच्या हाताचा प्लास्टरचा नमुना मात्र त्याने आपल्याबरोबर घेतला होता.

भाविक जितक्या भक्तिभावाने मूर्तीपूजा करील, तितक्या प्रेम व भक्तिभावाने तो त्या आकृतीकडे पहात असे.

टर्म संपून तो परत वर्गात आला.

सुलू आली नव्हती ! ! !

किती आतुरतेने जीव मुठीत धरून आला होता तो ! केव्हा पाहीन केव्हा बोलीन, तो हात आपल्या हातात धरून कुरवाळत बसेन. या उत्कंठेने आला होता !

त्याची निराशा झाली.

दुसरे दिवशी येईल, इतकं निराश होण्याचं कारण काय म्हणून त्यानेच आपली समजूत घातली.

दुसरे दिवशीही आली नाही !

आठवडा गेला ! काही समजलं नाही. आता ती येत नाही, पुनः आपल्याला दिसत नाही, अशी त्याची खात्री झाली.

त्याच्या आठवणीतून तो तिचा करस्पर्श जाईना.

कलेला निर्माण होणारी नवी सवत आपणहून सोडून गेली. तो स्त्रीसुखाचा केव्हाच वेडा नव्हता. वैषयिक भावनेच्या आहारी तो कधीच गेला नव्हता. तो जातिवंत शिल्पकार होता.

पुनः आपल्या कलेच्या सेवेला लागला.

काम सुरू असलं की त्याला जगाचा विसर पडे. थकवा त्याला माहीत नव्हता. पोटाची काळजी नसे.

अन्नाशिवाय हात उचलता येत नाहीत. म्हणूनच कलावंतांना अन्नाची गरज ! खऱ्या ध्येयवादाला आपल्या ध्येयाखेरीज काही दिसत नाही. तिच्या सेवेतच तो निमग्न असतो. तीच त्याची विश्रांती.

हेमच्या कामाला प्रदर्शनात सोन्याची पदके मिळाली, प्रिन्सिपॉलने उत्तेजन देऊन त्याला काही मोठी कामे मिळवून दिली.

पुतळ्याचे एक काम मिळाले तर जन्माचे दारिद्र्य नाहीसे होते. तीस

चाळीस हजारापासून ते लाख सव्वा लाखापर्यंत एक एक काम !

शिक्षण संपताच त्याला मोठा स्टुडिओ काढता आला. वर्षाच्या आत त्याच्या मालकीची टोलेजंग इमारत उठली, त्याला काम आवरेना.

कलारत असल्यामुळे त्याचे आयुष्य भर भर निघून गेले ! सुलूच्या गोड स्पर्शाची त्याला आठवण होई. पण कामात तो त्याचा विसर पाडी. त्या विचाराला तो फुरसत देत नसे.

पण दहापंधरा वर्षाच्या सतत श्रमामुळे त्याला पुढेपुढे थकवा येऊ लागला. पूर्वीसारखे उत्साहाने काम करता येईना.

संपत्ती गडगंज साठली होती. पण ती संपत्ती तिच्यामागे लागून मिळवलेली नव्हती. कलेच्या सेवेत ती त्याला सहजगत प्राप्त झाली होती. त्याला संपत्तीचा मोह वाटत नसे.

आपली कामे व आपल्या हातून घडलेल्या कृती हीच खरी संपत्ती असे त्याला वाटत होते. स्वत:ची हौस म्हणून केलेलं काम कितीही मोठं गिऱ्हाईक आलं तरी तो विकीत नसे. संपत्तीच्या किंवा स्त्रीच्या मोहात तो पडला नव्हता.

त्याच्या वयाचा उतार सुरू झाला होता. कामात रत असल्यामुळे विवाहाचा विचारच त्याच्या मनात आला नाही.

त्याच्या मनाची जी काही चलबिचल झाली होती ती तिच्या करस्पर्शानि. तिच्या मोहक हाताने. त्या आठवणी मात्र त्याच्या स्मृतीतून जात नसत. आता तर कामाचा बोजा कमी झाल्याने तो पूर्वीचा प्रसंग - तो स्पर्श आठवू लागला.

सुलूला शोधून काढावी, तो स्पर्श पुन: अनुभवावा अशी आच लागे. तिचा शोध करायचा, तिला भेटायचं असा त्याने अखेर निश्चय केला.

पुष्कळ प्रयासानं त्याला सुलूचा शोध लागला. मध्यप्रांतातील एका तालुक्याच्या शहरात ती रहात होती. इन्फ्लुएंझाच्या साथीत सापडून तिची व तिच्या नवऱ्याची ताटातूट झाली होती. घरची गरिबी होती. दहा बारा वर्षाचा मुलगा होता. शिक्षकीणीचा धंदा करून ती आपला चरितार्थ चालवत होती. एका मुलांच्या शाळेत ड्रॉईंग शिकवीत होती.

सगळी माहिती बरोबर मिळवल्यानंतर एके दिवशी आपल्या मोटारीतून तो तिच्या घरी आकस्मिक जाऊन उभा राहिला.

त्या पूर्व स्मृती तिला गेल्या जन्मीच्या आठवणींसारख्याच झाल्या होत्या ! सगळा प्रकार स्वप्नवतच वाटला. तिला हेम आपल्या आयुष्यातून गेला

असं धरूनच चालली होती ती. तिला आश्चर्य वाटलं !

'हेम, कसा आलास तूं ? तुला माझा पत्ता कसा कळला ? अद्याप माझी आठवण विसरला नाहीस म्हणायचा.'

'एखादे वेळी तुझी आठवण विसरलो असतो, पण त्या गोड हाताची, वेड लावणाऱ्या हाताची विसरणं या जन्मी तरी शक्य नव्हते. सुलू, पुन: तसा हात मला दिसला नाही. त्याच तुझ्या हाताच्या त्या आठवणींनं आणि क्षणिक भोगलेल्या स्पर्शसुखानं मला इथं आणलं. त्या हाताच्या पाकळ्या अद्याप मी पूजीत असतो बरं ! पण काही झालं तरी त्या कृत्रिमच. ते फूल दुसऱ्याने पळवलं होतं !

'त्या हातावर आता कायदेशीर मालकी सांगण्याकरिता मी आलो आहे. देशील ना तो माझ्या हातात ?'

'पण हेम माझा बारा वर्षाचा मुलगा आहे.'

'माहीत आहे मला. त्यालाच मी माझ्या इस्टेटीचा मालक करणार आहे, या हाताची मालकी मात्र माझी राहील.'

तिनं आपला हात हेमच्या हातात दिला !

*(कला आणि कलावंत)*

## चित्र १७ वे (एकीव गोष्ट)

*जसा भाव तसा देव म्हणतात !*

*भक्तांची इच्छा अशी होती !*

प्राचीनचे देवालय! दिवसा, भर बारा वाजता अमावास्येचा काळोख तिथं पहावा. पण त्यांच्या मिणमिण उजेडात तर तो अधिकच गाढ वाटणार ! भक्तगणाबरोबर त्यात पाकोळ्यांनीही जागा केल्या होत्या ! ज्ञानवानांनी अंधार म्हणजे अज्ञान म्हटलं, तरी धर्माने त्याला पावित्र्य आणलेलं होतं.

धर्मजागृतीसाठी आणि देवाचं अस्तित्व लोकांच्या कानीकपाळी सारखे गाजत ठेवण्यासाठी-त्या देवालयात घंटानाद सारखा चालू असे.

काकड आरती, धुपारती, व शेजारती अशा या आरत्यांचा कधी भंग पडला नव्हता.

मुख्य देवालयाचा गाभारा फार मोठा होता. आत अगदी काळोख.

मिणमिण प्रकाशामुळे प्रदक्षिणेला कितीतरी वेळ लागे. अंधारात लोक ठेचकळत म्हणून सरकारने आता विजेच्या दिव्यांची सोय केली होती; पण या यांत्रिक सुधारणेचा बट्टा पुरातन देवालयाला लागू नये म्हणून ब्रह्मवृंदांनी फार मोठी हाकाटी केली. पण आपल्या धर्मभावनेबद्दल तितका आदर नसलेल्या परकीय सरकारने तिथे नवा प्रकाश पाडला. त्यामुळे देवालयाचे गांभीर्य कमी झाले, असे भक्तांचे म्हणणे आहे.

देवाला नवसंस्कृतीची नावड म्हणूनच की काय, विजेच्या दिव्याची तेथे फारच खराबी होई. गाभाऱ्यातील विजेचा सांधा तर नेहमी बिघडत असे.

गाभाऱ्यांत हक्कदार पुजाऱ्यांखेरीज कुणाला जाता येत नसे; अन् तो पुजारीही शूचिर्भूत होऊनच जाई असे म्हणतात. पुजारी उंबऱ्या शेजारीच बसे. दर्शनाला आलेले तिथेच नारळ, पेढे, बत्तासे वगैरे ठेवीत. कितीही मोठा माणूस असो, आंत पाय टाकायला अगदी सक्त मनाई होती.

दक्षिणेचा पैसा ठेवायला गाभाऱ्यांतच एक तिजोरी होती. ज्याची पाळी असेल तो पुजारी आंतील खोलींत झोपत असे-

विठू माळकऱ्याची इच्छा फार की, आपल्या मुलाला तिथे रखवालदाराची नोकरी मिळवून द्यावी म्हणून. विठू म्हणजे फार भाविक. नेहमी रामनाम तोंडात असायचे. माणसाबरोबरचे बोलणे थांबले की देवाबरोबरचे बोलणे सुरू. कसेबसे पोट चालण्यापुरती इनामी होती. त्यामुळे रामनामाला अडचण यायची नाही. कष्ट न करतां मिळणारी भाकर ईश्वरकृपेने मिळते असे त्याला वाटल्यास काय नवल !

तुकारामाच्या बापाने देवस्थानच्या अधिकाऱ्याकडे पुष्कळ खेटे घालून एकदाची देवळातल्या रखवालदाराची नोकरी मिळवली. विठूची इच्छा की, देवाच्या सहवासात मुलाचे आयुष्य जावे, कानावर देवाचा शब्द पडावा, पोराच्या जन्माचे सार्थक व्हावे.

तुकाराम कामावर रुजू झाला.

देवळाची साफसूफ करून घेणे, चोहोकडे देखरेख ठेवणे वगैरे कामे त्याच्यावर सोपवलेली होती.

क्षेत्राचे ठिकाण. मोठमोठे श्रीमंत लोक येणार, घरंदाज बायका येणार, दागदागिने घालून मुले येणार, लक्ष पाहिजेच की चहूंकडे.

बारा तास तुकाराम तिथेच पडून असायचा. पुजारीही स्वभावाने प्रेमळ

होते. त्याला स्वत:च्या घरी जेवायला जाण्याचा प्रसंग क्वचितच येई. सणावाराला त्याला घरी ताट भरून मिळे. केव्हा इनामही मिळे.

पुजाऱ्यात आणि त्याच्यात केव्हाच वितुष्ट आले नाही. त्याला कामही फारसे पडत नसे.

गाभाऱ्यातील विजेची बत्ती मात्र सारखी बिघडत असे. केव्हा सांधा तुटे तर केव्हा.. काचेचा गोळा फुटे, अशी काही ना काही रोज तक्रार ही असायचीच. तथापि ही तक्रार आली तरी त्रयस्थांकडूनच येणार. पुजारी याही बाबतीत त्याला तसदी देत नसत. ते तिकडे कानाडोळाच करीत. पण पुजाऱ्याच्या चांगुलपणाचा तरी किती फायदा घ्यायचा? या वात्रटपणाची त्यालाही चीड आली होती. गावांतली थोरथोर मंडळी येणार; असे दुर्लक्ष करून कसे चालेल?

क्षुल्लक कामासाठी घराबाहेर पाऊल न टाकणाऱ्या बायका; बाजारहाटासाठी बाहेर न फिरणाऱ्या सुखवस्तू; तशाच कापडाच्या बोगद्यातून चालणाऱ्या गोषांतील सुंदर स्त्रिया-सर्व प्रकारच्या व दर्जाच्या बायका-देवदर्शनाला नेहमी येत.

सहजासहजी गाठ न पडणाऱ्या माणसांची भेट तिथे होत असे. तुकारामाच्या नोकरीला आता एकदोन वर्षे उलटून गेली होती. नेहमी न चुकता येणाऱ्या भाविकांची व त्याची तोंडओळख झाली होती. येणाऱ्याजाणाऱ्यांबद्दल त्याच्या कानावर हरतऱ्हेच्या गोष्टी येत असल्यामुळे काही लोकांच्या हेतूबद्दल त्याला शंका येऊ लागली होती.

काही स्त्री-पुरुष एका घरचे नसूनही पुष्कळ प्रसंगी ठराविक वेळी येत असल्याचे दिसून येई. एका घरची माणसे आली तर मिळून येणार, राजरोस बोलणार, पण ही माणसे एका वेळी आली तरी बोलताना दिसत नसत. यामुळे शंका उत्पन्न होऊ लागली. त्यांची येण्याची वेळ एकच असे हे विशेष अशी येणारी माणसे काही श्रीमंत घराण्यातली असल्याचे स्पष्ट दिसून येई. या अशा नित्य प्रसंगांमुळे तुकारामाला त्यांच्याविषयी निराळा संशय येऊ लागला होता; आणि याच सुमाराला दिवे बिघडत. यांच्या जाण्यायेण्याचा व दिवे जाण्याचा काही संबंध असावा, असा तुकारामाला संशय येऊ लागला.

दिवे गेले तरी चारपाच सेकंदच जात व पुन्हा लागत. गाभाऱ्यातल्या दिव्याची कळ पुजाऱ्याच्या स्वाधीन असल्यामुळे तुटलेला सांधा लगेच जोडला जात असे.

दिव्याच्या घोटाळ्याचा काय प्रकार आहे, हे पाहण्याकरिता तुकारामाने दुसऱ्या कोणाला आपला संशय येऊ नये म्हणून आपल्या एका स्नेह्याला सर्व हकीकत कळवून त्याला संशयित जोडप्यावर पाळत ठेवायला सांगितले.

एका संशयित जोडप्याने देवळात पाऊल टाकतांच तुकारामाने आपल्या स्नेह्याला खूण केली.

बाई दिसायला चांगल्या पोक्त होत्या. अंगाने स्थूल होत्या. नाकात नथ होती. अंगावर बरेच दागिने होते. हातात चांदीचे ताम्हन असून त्यात कुंकवाचा करंडा होता. चेहऱ्यावर छछोरपणाचा लवलेशही नव्हता.

ते जोडपे गाभाऱ्याजवळ पुजाऱ्याशेजारी गेले असेल नसेल, इतक्यांत दिवे गेले ! पण क्षणभरच. लगेच पुन्हा लखलखाट झाला !

हे काय गौडबंगाल आहे, त्याला समजून येईना ! तुकारामाने त्याला खूप खिजविले, 'काय म्हणतोस पाहिले नाही म्हणून ? तू आत आणि हे माझ्या देखत केव्हाच बाहेर पडून निघून गेले. आता यांच्या मागे लागू नकोस. ते हुषार झाले आहेत. दुसरे एखादे जोडपे आले म्हणजे जा; आणि जाताना बरोबर बॅटरी घेऊन जा म्हणजे फसणार नाहीस.

दुसऱ्या वेळी फसायचे नाही, असा निश्चय करून तो तयारीला लागला.

दुसरे जोडपे आले. तो मोठ्या हुशारीने त्यांच्या मागोमाग गेला. गाभाऱ्यातील उंबरठयाशेजारी येताच जणू ठरल्याप्रमाणे पुन्हा दिवे गेले. दिवे चारपाच सेकंदच गेले असतील, पण तेवढ्यात ते जोडपे एकदम अदृश्य झाले. त्याने प्रदक्षिणेच्या आवारात त्यांना पाहण्यासाठी धावपळ केली; पण ते कुठेच दिसले नाहीत.

त्याला आता खात्रीचाच संशय आला. काय होईल ते होवो, असे मनाशी ठरवून त्याने देवालयाच्या गाभाऱ्यात एकदम उडी मारली. आत पाय पडताच बॅटरीचा उजेड पाडला. गाभाऱ्यातला अंध:कार नाहीसा झाला. आतील कृष्णकृत्यावर एकदम प्रकाश पडला. गाभाऱ्याच्या एका कोपऱ्यात पुजाऱ्याच्या झोपण्याच्या खोलीत ते जोडपे अचानक सापडले. त्यांची भयंकर तारांबळ उडाली ! पुजारी घाबरून गेला. त्याने झटकन् पुढे होऊन त्याच्या हातातली बॅटरी जोराने हिसडा मारून हिसकून घेतली; आणि चोरचोर म्हणून मोठ्याने बोंब मारली. तेवढ्या अवकाशात त्या माणसाने पोबारा केला. बाईला पळता आले नाही, म्हणून ती तेथेच अडकून राहिली. पण ती वस्ताद. तिने लगेच प्रसंगावधान

बाळगून सगळे पारडे फिरवून टाकले. ती रडून कांगावा करू लागली, 'मेल्याला लाज नाही वाटली? देवालयासारख्या पवित्र ठिकाणी कुलीन बायकांच्या अंगावर हात टाकणाऱ्याचे हात झडल्याखेरीज नाहीं राहणार! चांडाळा! बुद्धी तरी कशी झाली?'

पुजाऱ्यांनी पुढे होऊन बाईचे सांत्वन केले आणि म्हणाले, 'बाई, काळजी करू नका. ईश्वर जगातून अद्याप नाहीसा झाला नाही. तुम्ही स्वस्थ बसा. त्याला तो शासन केल्याखेरीज राहणार नाही.'

तुकारामाच्या स्नेह्याला पुजाऱ्याने धरून ठेवलेच होते. त्यांना तुकारामाचे अंग माहीत नव्हते. त्यांनी त्याला बोलावून गुन्हेगाराला ताब्यात दिले.

पण तुकारामाला हा सर्व प्रकार पूर्वीच माहीत होता. तो पुजाऱ्यावरच उलटला आणि म्हणाला, 'कोण गुन्हेगार ते मला माहीत आहे. देवाच्या आसऱ्याखाली कुंटीणखाना चालवणाऱ्या हरामखोरांनाच आता पोलिसांच्या ताब्यात देतो. तुम्ही काय समजलात? आणि करून पुन्हा उलटी बोंब? चोर सोडून संन्याशाला फाशी! तरी बरे, मला ही गोष्ट पूर्वीपासून माहीत होती म्हणून, नाही तर लोकांना काय, तुम्ही म्हणाल ते खरंच वाटणार!'

तुकाराम उलटलेला पाहून पुजाऱ्यांनी लगेच अंमलदाराकडे धाव मारली आणि सर्वांच्या इभ्रतीला काळेपणा आणणारा तुकाराम आणि त्याचा स्नेही यांनी कुलीन स्त्रीवर केलेल्या अत्याचाराचे पूर्ण खोटे वर्णन करून अंमलदाराचे मन आपल्या बाजूस वळवून घेतले.

'क्षेत्राच्या पावित्र्याचा प्रश्न आहे, स्त्रियांच्या अब्रूचा प्रश्न आहे, या गोष्टींमुळे आम्हा सर्वांना काळीमा लागण्याची वेळ आली आहे, आपण गय करता कामा नये' अशा प्रकारे सर्व पुजाऱ्यांनी मिळून तुकाराम आणि त्याच्या स्नेह्यावर कुभांड रचले. त्या बाईनेही चांगलेच नाटक रंगवले होते!

अंमलदारांनी तुकाराम व त्याच्या स्नेह्याला लगेच अटक करण्याचा हुकूम सोडला.

साक्षीदार प्रत्यक्ष पाहणारे (!) पुजाऱ्यांपैकी तयार होतेच. पुराव्याला कमतरता पडली नाही. त्यांना पैसे न देताच वकील मिळाला. धर्मरक्षणाचाच प्रश्न तो!

कोर्टाने अशा लोकांना चांगली जरब बसावी म्हणून कायद्यात सांगितलेली भरपूर शिक्षा दिली. दया मुळीच दाखविली नाही.

पुजाऱ्यांनी अंमलदाराच्या सहाय्याने अखेर देवालयाच्या चालत आलेल्या पावित्र्याचे मोठ्या चिकाटीने संरक्षण केले.

(जुलुम)

## प्रसंग ५ वा

दिवाळीचा सण ! जवळ जवळ महिनाभर हा सण त्या संस्थानच्या राजवाड्यात थाटामाटानं चालवला जात होता. रोज नव्या नव्या पक्वान्नांची ताटे पडत. हजारो रुपये उधळले जात. संस्थान छोटं ! पण खर्च मोठा ! अशी छोटी छोटी बरीच संस्थाने एका रेसिडेंटच्या हाती असत. या सर्व राज्यांच्या मध्यवर्ती जागी रेसिडेंट रहात. रेल्वेचे जाळे इतर संस्थानात अद्याप पोचलेले नव्हते. जेथे रेसिडेंट रहात तेथूनच दुसरीकडे रेल्वेचे फाटे फुटत.

या संस्थानातल्या राजधानीतला दिवाळसण टाकून नगरशेट रेसिडेंटच्या मुख्य ठाण्याकडे निघाले होते. महाराजांना हे समजताच त्यांना फारच वाईट वाटलं. ते अगदी बेचैन झाले ! त्यांनी आपली प्रवासाची बगी लगेच जोडायचा हुकूम सोडला. संरक्षक स्वार लगेच तयार झाले. जरुरीच्या सामानाची पोती उंटावर चढवली, आणि हा सर्व लवाजमा स्टेशनकडे चालू लागला. त्यावेळी मोटारी नव्हत्या. तार ऑफिसीस नव्हती. आगगाडीचे जाळे आजच्यासारखे पसरलेले नव्हते. संस्थानच्या राजधानीपासून स्टेशन ७५ मैलाहून जास्त दूरवर होते. त्या संस्थान हद्दीत रेल्वेने अद्याप पाय टाकला नव्हता. तो काही एका दिवसाचा प्रवास नव्हता ! पण होणारा त्रास, श्रम, जाणारा वेळ याचा विचार न करता नगरशेटला परत बोलावून आणण्याकरिता स्वत:च महाराज निघाले होते. ही कामगिरी त्यांनी दुसऱ्या कोणावर सोपवली नव्हती.

नगरशेट ही त्या संस्थानातली मोठी असामी होती. कोट्याधीश होते. राजाला हेवा वाटावा अशा संपत्तीचे ते मालक होते. रेसिडेंटसुद्धा त्यांना मानत होता. त्याचा व्यापार मोठा होता. पुष्कळ कारखाने होते. दुकाने होती. विलायतचा माल आणून खपवत होते. परदेशी कापडाची दुकाने अनेक ठिकाणी होती. त्यामुळे रेसिडेंट त्यांच्याकडे साहजिकच आपुलकीने पहात होता. रेसिडेंटची सत्ता फार मोठी होती. ते कोणाही राजाला पदच्युत करीत होते. गादीवर बसवू शकत होते. वारसा मान्य करणं, रद्द करणं ही त्यांच्या हातातली गोष्ट होती.

तथापि राजा प्रजेवर पूर्ण स्वामित्व गाजवीत असे. त्यांच्या नीति-अनीतीकडे रेसिडेंट क्वचितच लक्ष देई. सामान्य प्रजेला कधीच न्याय मिळत नसे. रेसिडेंटचे राहणे राजधानीपासून फारच दूर असल्यामुळे राजाच्या सत्तेला विरोध करण्याची कोणाची ताकद नव्हती. राजाविरुद्ध तक्रार नेणं कोणालाच होत नसे. कोणाचं चित्त, जीवित आणि अब्रू सुरक्षित नव्हती. पण राजाचा साचा सर्वत्र सारखाच होता असंही नाही. काही सद्‌गुणी, सच्छील व प्रजादक्षही होते.

काय असेल ते असो, दिवाळसणात नगरशेट राजधानी सोडून जात आहेत हे पाहून राजेसाहेबांना फार वाईट वाटलं. व ते त्यांना परत आणण्याकरीता निघाले. कोट्याधीश होते नगरशेट !

महाराज धावपळ करीत स्टेशनवर पोचले.

त्यांच्या अगोदर नगरशेट स्टेशनवर येऊन थडकले होते. गाडीला यायला अद्याप चार तास होते, त्यावेळी गाड्या आजच्याप्रमाणे वेळच्या वेळी सुटत नसत. राजेसाहेबांच्यासाठी त्या थांबवल्या जात. त्यासाठी लोकांना तिष्ठत बसावे लागे.

नगरशेट दिसताच राजेसाहेबांनी राजेपण टाकून त्यांना हात जोडून नमस्कार केला व आपण दिवाळसणाला आमची राजधानी सोडून जाता कामा नये असा आग्रह धरला.

महाराजांची ही नम्रता, अगत्य व एका नागरिकाविषयी आत्मीयता पाहून तेथे हजर असलेले सर्व लोक थक्क झाले. एवढा मोठा राजा आपल्या संस्थानच्या एका नागरिकाबरोबर इतक्या अदबीने बोलतो ही काही सामान्य गोष्ट नव्हती. स्टेशनवरचे सारे उतारू आश्चर्यचकित झाले.

नागरिकांवर आपल्या कुटुंबियांप्रमाणे प्रेम करणारा राजा, हा लोकांना एक महान चमत्कारच वाटला. जो तो त्यांची स्तुती करू लागला.

या लोकमताचा व महाराजांच्या वागणुकीचा नगरशेटवर साहजिकच परिणाम झाला. महाराजांचा शब्द त्याला मोडवेना. सारेच त्याला उन्मत्त, गर्विष्ठ व चढेल म्हणू लागले असते.

तो जो अगदी निश्चयाने, निग्रहाने व धांदलीने आपली संस्थानहद्द सोडून बाहेर पडला होता, तो महाराजांच्याबरोबर महाराजांच्याच गाडीतून परतला. त्यांनी नगरशेटला अगदी आपल्याजवळ बसवून घेतले.

'आपल्या हातून अजाणता घडलेल्या चुकीबद्दल आपण रागावू नका. क्षमा करा,' म्हणून एखाद्या अपराध्याप्रमाणे त्यांनी नगरशेटची क्षमायाचना केली.

राजवाड्याच्या चौकात आल्यावर त्यांनी आपला हात देऊन नगरशेटला गाडीतून खाली उतरून घेतले. दरबारी दिवाणखान्यात आपल्या शेजारी आपल्या कोचावर बसवले. आणि दरबारची अनेक मंडळी बसली असताना, कोचमनला घोड्याचा चाबूक घेऊन यायला सांगितले.

तो चाबूक कोचमनकडून घेऊन त्यांनी तो नगरशेटच्या हातात दिला व नगरशेटला म्हणाले,

'मला केव्हा केव्हा वेडाचे झटके येतात. माझ्या मनावरचा माझा ताबा रहात नाही. मी काय करतो ते मला समजत नाही. अशा अवस्थेत माझ्याकडून फार मोठा गुन्हा झाला असं मला समजून आलं! नोकरांनीच ते माझ्या ध्यानात आणलं. व्हायला नको ती गोष्ट माझ्या हातनं घडली. त्याबद्दल मला क्षमा करा. त्याचं प्रायश्चित्त मी भोगलंच पाहिजे.'

असं म्हणून त्यांनी आपल्या अंगावरचे कपडे काढले! अंगरखा काढला! आतला सदराही काढला. पाठ उघडी केली! आणि तो कोचमनचा चाबूक नगरशेठच्या हाती देऊन त्यांना महाराज म्हणाले,

'नगरशेट, माझ्या पापापासून मला मुक्त करण्याकरीता झाल्या गुन्ह्याचं प्रायश्चित्त म्हणून या चाबकाने माझी पाठ फोडून काढा.'

नगरशेट आणि महाराजांचे हे शब्द ऐकणारे सारे लोक सर्द झाले! त्या शब्दावर कोणाचा विश्वास बसेना! असं कोणी ऐकलं आहे काय? असं कोणी पाहिलं आहे काय? महाराजांच्या अंगावर कोणी नागरिक हात टाकू शकेल काय?

आपल्यावर झालेला सर्व अन्याय विसरून नगरशेटनी महाराजांचे पाय धरले व हात जोडून समोर उभे राहिले.

'महाराज, आपण असे बोलू नये, काही झालं तरी आम्ही आपले प्रजाजन. आपल्या अंगावर आमचे हात! प्राण गेला तरी आमच्या हातून अशी गोष्ट होणार नाही. आमच्या सर्वस्वाचे आपण मालक, आपण असे बोलू नये.'

समोरचे नागरिक व अधिकारी म्हणू लागले,

'आपल्या हातून ज्या गोष्टी झाल्या त्याबद्दल आपल्याला कोणीही जबाबदार धरणार नाही. रोगी मनुष्याच्या हातून झालेल्या प्रमादाला, त्याला कोण

जबाबदार धरील? आपण भानावर नसताना ज्या गोष्टी झाल्या त्याबद्दल आपल्यावर नगरशेट कसे रागावतील?

आम्हा सर्वांची नगरशेटना विनंती आहे की त्यांनी राज्य सरकारच्या शहरी गेल्यानंतर कोणा तरी नामांकित डॉक्टरला घेऊन यावं.'

राजेसाहेब म्हणाले, 'तुम्ही माझ्या पापक्षालनाला मदत करीत नाही. निव्वळ क्षमा मागून माझं समाधान होणार नाही. मी प्रायश्चित्त हे घेतलंच पाहिजे.'

असं म्हणून तो चाबूक त्यांनी आपल्या हाती घेतला आणि सर्वांसमक्ष त्या चाबकाने आपली पाठ महाराजांनी आपणच झोडपून घेतली!

अधिकारी पुढे धावून गेले. त्यांच्या पायावर पडले. 'महाराज, महाराज ! असं करू नकात, आमचा प्राण घ्या वाटलं तर पण आपण आपल्याला अशी शिक्षा करून घेऊ नका.'

नगरशेट तर भयानं थर थर कापू लागले! त्यांच्या डोळ्यावर त्यांचा विश्वास बसेना!

★ ★ ★

'- काय? खरोखरीच महाराजांनी माझ्या अंगावर हात टाकला तो वेडाच्या लहरीत टाकला असेल; मग हे तरी कृत्य पश्चात्तापाचं की वेडाचं!'

ते अगदी बुचकळ्यात पडले! हे सारे नाटक तरी नसेल? पण नाटक तरी कसं म्हणायचं! महाराजांनी पाठीवर वळ उठेपर्यंत स्वत:ची पाठ स्वत:च्या हातांनी फोडून घेतली होती!!

पण याच महाराजांनी मला रक्तबंबाळ होईपर्यंत चाबकाने फोडून काढले होते! आर्जवाने बोलावून पैशाची मागणी केली होती. ती मी पुरी केली नाही म्हणून बेशुद्ध होईपर्यंत मला मार दिला होता! तेच महाराज मला परत आणण्याकरता स्टेशनपर्यंत येतात, सर्वांसमक्ष चुकलो असल्यास माफ करा म्हणतात, दिवाळसणासाठी आपले पाहुणे म्हणून राहण्याचा आग्रह करतात आणि प्रायश्चित्त म्हणून आपल्याच हातांनी फटके मारून घेतात!!!

साराच चमत्कार -

या सर्व प्रकाराचा नगरशेटना काहीच उलगडा होईना. जगजाहीरपणे सर्वांसमक्ष माफी मागणाऱ्या आणि स्वत:ला शासन करून घेणाऱ्या व्यक्तींविरुद्ध तो आता कसली तक्रार करणार! लोकांची सहानुभूती याला कशी मिळणार?

तो दिग्मूढ झाला!!

खरोखरीच महाराजांना वेडाची लहर येत असेल काय?

मग वेडाचा प्रकार तो, का हा?

एवढं खरं की त्याला महाराजांच्याच वाड्यात पाहुणा म्हणून रहावं लागलं.

महाराजांनी आग्रह करून नगरशेटना महिनाभर वाड्यातच ठेवून घेतलं. महिन्याभरात नगरशेटच्या पाठीवरचे सर्व वळ नाहीसे झाले. कोणी मारलं असं म्हटलं तर ते कोणालाही खरं वाटलं नसतं.

दिवाळसण झाल्यानंतर महाराजांनीच त्याला स्टेशनवर नेऊन पोहोचवलं.

★ ★ ★

नगरशेट निघून गेल्यावर महाराजांचा खास विश्वासातला शरीरसंरक्षक त्यांना म्हणाला,

'महाराज, काय म्हणून तुम्ही स्वत:चे इतके हाल करून घेतलेत? तो नगरशेट तुमचं असं काय वाकडं करणार होता?'

त्यावर महाराज म्हणाले,

'अरे बाबा, हे सारं नाटक मी केलं नसतं तर तो ती रक्तबंबाळ पाठ घेऊन रेसिडेंटसमोर उभा राहिला असता, त्याचं खोटं त्यांना वाटलं नसतं. माझी कंबक्ती झाली असती आणि मला पदच्युत करणं सोपं गेलं असतं!

आता काय करणार तो माझं!

आता जाऊ दे, ओरडू दे, पाठ दाखवू दे ! एक वणही दिसणार नाही.

सरकारच्या दरबारात त्याचं वजन नसतं तर मला एवढं नाटक करण्याची जरूरी नव्हती.

*(अशी होती संस्थानी राजवट)*

## प्रसंग ६ वा

सरकारना मुजरा करीत नाही म्हणजे काय? केवढा गुन्हा हा? पण अडचण मोठी! कायद्यानं हा गुन्हा ठरवला नव्हता! हे कृत्य कुठल्याही कलमात बसत नव्हतं! पण मानाजीची खोड तर मोडायला पाहिजे.

कळ उकरून काढून चार थपडा माराव्यात तर मानाजी दहा माणसांना भारी होता! श्रीमंतांनी त्याच्यावर उगाच हात टाकला असता तर मानाजीने त्यांचा हात सरळ ठेवला नसता. तितका बेदरकार होताच तो. तालमीतील सारी

पोरे त्याच्या बाजूची होती. तेव्हा उघडपणे त्याला शासन करणं ही गोष्ट सोपी नव्हती. तो प्रकार त्यांच्यावरच उलटला असता. जुनी पिढी बाबासाहेबांना वचकून होती. नवी पिढी मानाजीकडे होती. नवा जोम सहजासहजी वाकत नव्हता.

पैशासाठी गोंडा घोळणारे बाबासाहेबांच्या भोवती होतेच. त्यांनी सुचवलं, 'कायद्याच्या पकडीत धरल्याखेरीज हा काटा गावातून काढता येणार नाही. कायद्याचीच आपण मदत घेतली पाहिजे. पैशाचा जोर असला की कायदा आपलाच! कोर्ट आपलं! पोलीस आपले! कारकून आपले! साक्षीदार आपले! मानाजीचे डावपेच कुस्त्यांच्या मैदानात. पण पैशाच्या पेचातून तो काय सुटतो!

वकिलाच्या सल्ल्यानेच केसचा आराखडा आखला गेला. साक्षीपुरावा अगोदरच पढवून तयार केला. चोरीचा मुद्देमाल आणि पाहणारे साक्षीदार तयार केले. आरोप घालण्यापूर्वी फौजदाराला वर्दी दिली. आणि चोरीच्या आरोपावरून मानाजीला पकडण्यात आले.

आरोपांतून सुटका होऊ नये अशी पूर्ण खबरदारी अगाऊच घेतली होती.

ज्यांच्यापुढे केस चालायची त्यांची तरतूद अगोदरच करून ठेवण्यात आली होती. शिक्षा ठरवून घेतली होती. खालपासून वरपर्यंतचे नोकर-कारकून आणि अंमलदार खूश करून ठेवले होते-

केस कोर्टात दाखल होण्याचा अवकाश. कोर्टाने तडकाफडकी निकाल देऊन टाकला! मानाजीला वर्षभराची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली !

आपण निर्दोषी! आपल्याला कशाची भीती! म्हणून मानाजी पूर्ण बेफिकीर होता! पण त्या बिचाऱ्याला काय माहित, कायदा खरं खोटं पहात नाही. तो साक्षीपुरावा पाहतो. आणि सारी यंत्रे पैशाने फिरत असतात!

मानाजीला इतर कैद्यांबरोबर खडी फोडावी लागली! चोरी न करता चोर-दरोडखोरांचे कपडे अंगावर चढले! पायात दीडदोन मणाच्या बेड्या फुलवल्या गेल्या! सक्तमजुरीची कामे सुरू झाली. तुरुंगाच्या ठराविक चक्रात तो पडला! मानाजीचा स्वाभिमानी ताठरपणा त्याला पदोपदी नडू लागला. पदोपदी अपमान होऊ लागला. कैदी म्हणजे सरकारचा शत्रू! सूड उगविण्यासाठीच जणू तुरुंगात घातलेला! राजसंस्थेला मातापित्यांच्या ठिकाणी मानलं जातं. पण आपला मुलगा सुधारावा, पुन्हा सन्मार्गाला लागावा ही भावना राजसंस्थेत नाही. शिक्षा म्हणजे सूड! तिथ स्वाभिमानाला जागा नाही. पुढं स्वाभिमानानं आणि

प्रामाणिकपणानं जगता यावं हा हेतू नाही ! पुन: माणूसपणात आणण्याचा प्रयत्न नाही ! मातापिता ज्या भावनेनं आपल्या मुलाला शिक्षा करतात ती भावना त्या मागे नाही.

जेलरच्या शिव्या, वॉर्डरच्या शिव्या, लाथाबुक्क्या, पोलिसांचे दंडुके, आत जनावरांची शिस्त, यामुळे शिक्षेने गुन्हेगारांची सुधारणा होण्याऐवजी तो समाजातून कायमचा उठला जातो. समाजाचा शत्रू बनतो.

मानाजीला कामाचे काहीच वाटत नव्हते. आणखी चारांचे काम तो लीलेने करू शकता. बेड्याही त्याला जड वाटत नव्हत्या. पण तिथली वागणूक त्याला सहन होईना. देहाचे हाल तो सहन करू शकत होता पण होणारा अपमान असह्य होत होता !

खाण फोडायचं काम चालूं होत ! काम दांडग होत. मोठ्या काळ्या फत्तराचा थर फोडायचं चाललं होतं. पहार काही घुसत नव्हती. घाव घालून मानाजी थकला होता. पहार लावून ओणवा झाला होता. लगेच सरळ होऊन पुन: पहार मारायची, पण तटणी लावणारा माणूस जवळ नव्हता म्हणून त्याने ती पहार तशीच लावली होती व तो ओणवाच होता. वॉर्डरला वाटलं तो स्वस्थ बसला आहे. त्याने मानाजीच्या ढुंगणावर लाथ मारली ! गलिच्छ शिवी हासडून कुळी उद्धरली.

जन्मात जे सहन केलं नाही ते मानाजी कसं सहन करणार? त्याला असा अपमान सोसण्याची सवय नव्हती. आतापर्यंत त्याने कोणाचे बोलून घेतले नव्हते. मानाजी आपल्या नावाप्रमाणे खरोखरीच मानी होता. गावचा इनामदारही त्याला वचकून होता. त्याचा अपमान करण्याची त्यालासुद्धा कधी छाती झाली नाही. आता तर वॉर्डर झालेल्या एका कैद्याने त्याला लाथ मारली होती. आईबाप काढले होते. अशी गोष्ट गावात घडली असती तर त्याच घटकेला त्या माणसाची कंबर मोडली असती.

पण आज तो बंदिवान होता ! पण मन बंदिवान झालं नव्हतं. अपमानासरशी त्याच रक्त उसळलं. मुठी वळू लागल्या, दात करकरू लागले. कपाळावरच्या शिरा फुगू लागल्या. ओठ दातात सापडल्यामुळे त्यातून रक्त वाहू लागले. छाती वीरासारखी फुगू लागली. मान ताठ करून तो वार्डरच्या पुढे उभा राहिला. विस्तवाच्या ठिणगीप्रमाणे तोंडातून शब्द बाहेर पडू लागले..

'कोण समजतोस तू मला? एका वार्डरचे दहा वॉडर करीन

समजलास ! माझ्याशी गाठ आहे लक्षात ठेव ! फार जीभ उचलू नकोस. वॉर्डर झालास म्हणून मोठा झालास काय ? जांगाड्यातून मांडी निखळून काढीन समजलास, जीभ पुन्हा उचल म्हणजे ती हसडून बाहेर काढतो बघ, हात उचलून, हात उपसून काढतो.'

वॉर्डर थिजल्यासारखा गप्प बसला. हा आता आपला जीव घेणार असं वाटून, त्या गार वाऱ्यातही त्याला घाम सुटला, त्याची बोबडी वळली !

पण इतर वॉर्डर आणि पोलीस त्याच्या हाकेच्या टप्प्यात दिसताच त्याने बोंब मारली. दहावीस जण धावून आले. वॉर्डरने झाली हकीगत सांगताच त्यांनी त्याच्यावर लाथाबुक्क्यांचा वर्षाव केला. अंगावर चाबूक फोडले. सर्वांनी पकडून त्याच्या हातात बेड्या घातल्या.

इतर कैदी सारा प्रकार मुकाट्याने पहात होते. प्रत्येकाला संतापाची उसळी येत होती. पण पुढे होऊन मध्ये पडण्याची किंवा मानाजीची कड घेऊन भांडण्याची कोणाची छाती नव्हती. प्रत्येकाला असा प्रमाद केव्हा ना केव्हा मिळालाच होता. होईल तो अपमान व मार मुकाट्याने सहन केला नाही तर त्याची पुनरावृत्ती चालू व्हायची. हा अनुभव सर्वांना आल्यामुळे त्यांना आपला राग, चीड, त्वेष आवरण्याची सवय झाली होती.

मानाजी नवखा होता. अपमान गिळून बसण्याची त्याला सवय झाली नव्हती.

कामावरून परत तुरुंगात आल्यानंतर वॉर्डरने मानाजीला जेलरसमोर उभा केले. सारी घडलेली हकीकत कानावर घातली.

त्यांनी मानाजीला पुन: समज देण्याची आज्ञा फर्मावली.

वॉर्डरनी व पोलिसांनी पुन: बेदम मार दिला. लाथाबुक्क्यांचा व लाठीचा वर्षाव झाला ! पाठ निळीकाळी झाली.

संध्याकाळी मानाजीला त्याच्या कोठडीत कोंडून घातलं. तो खाली मान घालून बसला होता. तो त्याने वर मान काही केली नाही. तो कोणाबरोबर चकार शब्द बोलला नाही. त्याची कीव येऊन कोठडीतील एक कैदी म्हणाला, 'बाबा असं करून चालत नाही. इथं रहायचं म्हणजे मान-अपमान, लाज-लज्जा सगळी टाकावी लागते. इथं मेलं तरी कोणी दाद घेणार नाही. फाशी मैदानात कैकांना मरेपर्यंत मार दिला आहे या लोकांनी शिक्षा पुरी होईपर्यंत घट्ट मन करून दिवस काढले पाहिजेत. असं खुळ्यासारखं करू नकोस बाबा. अजून नवखा

आहेस तू !'

'तात्या, मला कामाचं काही वाटत नाही रे, आणखी चार जणांचं काम देऊ दे. पण लाथाबुक्क्या म्हणजे काय? शिव्यांना तर काही सीमाच नाही! गावात कुणा समोर मान वाकवली नाही. अन् यांच्या लाथा खाऊ होय? यापेक्षा मेलेलं काय वाईट. याचा पूर्ण बदला घेतल्याशिवाय मी राहणार नाही. गुन्हा केला नसताना तुरुंगात घातलं आणि आत घातल्यावर पुन: हे! एवीतेवी शिक्षा भोगायचीच, चार दिवस आणखी भोगायला येईल ! पण असलं रोज मरण आता नाही भोगणार ! ह्यो कुठला आणखी नवा कायदा जेलरने हातात घेतलाय !-

-'काय न्यायाची रीत म्हणायची! कोणाच्या एकात ना दोन्हीत. गावच्या इनामदारासमोर मान वाकवली नाही म्हणून बालंट रचून खोटी केस घातली. खोटा पुरावा तयार करुन तुरुंगात डांबलं आणि इथं जेलरसमोर मान वाकवली नाही तर दुसरा गुन्हा इथं काम करुनच्या करून आणखी हे वर ! गुन्हा खरोखरच केला असता तर गोष्ट निराळी.'

'नाहीतर गुन्ह्यासाठी इथं किती जणांना शिक्षा झाली आहे असं वाटतंय तुला? बहुतेक सारे तुझ्या सारखेच. ह्यो तुरुंग म्हणजे श्रीमंतांनी गरीबावर सूड उगवण्यासाठी केलेला कोंडवाडा हाय'

'आमचा दिवस नाही का कधी येणार?-'

'काही खटले गुन्ह्याचा तपास लागला हे दाखविण्याकरिता पोलिसांनी रचायचे. कोणाला तरी धरून आरोपी म्हणून आणायचं आणि तुरुंगात ढकलायचं. मग यांना बढती मिळते. काही खटले सावकारांनी व इनामदारांनी काटा काढून टाकण्याकरिता घालायचे! खऱ्या गुन्हेगाराचा पत्ता नसायचा! लागलाच तर पैसा चारून मोकळा होणार. उलट पोलीसच त्याला सामील. गुन्हा करायचा एकानं, शिक्षा भोगायची दुसऱ्यानं ! आणि पुन: इथं हे !-

गरिबांचे सगळे शत्रू. जणू गरिबी हाच गुन्हा. गरिबाला मान नाही, गरिबाला अब्रू नाही. श्रीमंतांना सारे गुन्हे माफ! आणि तोरा मोठा! खोटे कागद, खोटे दस्तऐवज, खोटे अंगठे उठवून कागद बनावट करणारे आणि गरीबांच्या मुंड्या मुरगळणारी ही मोठी माणसं ! खेकटेखोर चोरांचा साथीदार असणारा गावचा इनामदार, याचा दर्जा मोठा ! अंमलदार यांचे दोस्त, राजे यांचे पाहुणे. मग यांनी नंगा नाच घातला तर विचारणार कोण? सगळ्यांनी सूड घ्यायचा तो आमच्यासारख्या गरिबावर.-'

'न्याय देणारे जर न्याय-अन्यायाची पर्वा करीत नाहीत तर आपण तरी का करा? चांगुलपणाला मान नाही तर चांगुलपणा राखायचा कसा? वाटतं बाहेर पडलो की, चळवळीत शिरावं आणि साऱ्यांचा सूड उगवावा.'

'सुटल्यानंतर पाहू म्हणे पुढं काय करायचं ते. आम्ही असं बोलतो हे समजलं म्हणजे उद्याचं मरण आज यायचं.'

'भित्या पाठीमागं ब्रह्मराक्षस म्हणतात ना? जेवढ भ्यावं तेवढे हे वरचढ होतात. उलट जास्तच त्रास देतात. मी तर ठरवलंय. मेलो तरी हरकत नाही पण उगाच केलेला अपमान आता सहन करणार नाही. माझ्यासाठी नव्हे पण तुम्हा साऱ्यांसाठीच बोलतो हे. आता मुकाट्यानं हे सहन करून घेता कामा नये. निदान पुढं येणाऱ्या कैद्यांना तरी सुख लागेल.

'बाहेरची जनता आता लढ्याला तयार झाली आहे. त्यांची धरपकड चालली आहे. काही मेले आहेत. मग आपण तरी जिवाची एवढी फिकीर का करा? आपण तरी अन्याय का सहन करायचा! आपले कैवारी बाहेर मरताहेत, आपण आत मरु माझं तरी ठरलं. मी आता हा अन्याय सहन करणार नाही, बेहत्तर मेलो तरी!'

मानाजीच्या बोलण्याचा इतर सर्व कैद्यांवर परिणाम झाला. या बोलण्यानं त्यांना विचार करायला लावलं. त्यांच्यातील स्वाभिमानाची ज्योत पेटवली. सर्वांच्या डोक्यात स्वातंत्र्याचा प्रवाह वाहू लागला. कृतीचे विचार मनात येऊ लागले. मानाजीमागे त्यांचं मन धावू लागले. त्यांच्याविषयी आदर उत्पन्न झाला. नकळतच मानाजी त्यांचा पुढारी झाला!

त्या दिवसापासून मानाजीच्या वागण्यात बदल दिसू लागला. त्यानं तुरुंगाच्या कायद्यांची माहिती करून घेतली व ते नियम काटेकोर पाळण्याचं त्यानं ठरवलं. इतर कैद्यांनाही त्या कायद्याची माहिती करून दिली.

जेलरसमोर उभा राहिला! मानाजी तसाच ताठ राहिला! जेलरने प्रश्न विचारले. त्याने त्याची उत्तरे सरळ दिली. पण आज त्यात नम्रता नव्हती. शिरस्त्याचा मुजरा नव्हता. अदबीची भाषा नव्हती.

जेलरच्या वातावरणात ही मोठी क्रांतिकारकच घटना! असा उन्मत्तपणा यापूर्वी कोणाही जेलरने आणि वॉर्डरने पाहिला नव्हता! सारे कैदी मानाजीकडे अचंब्याने पाहू लागले! त्याच्या या कृत्याने त्यांचा अभिमान फुलवला. तसंच काही घडलं तर आपण मानाजीमागं उभं राहिलं पाहिजे अशी

प्रेरणा त्यांच्या मनात उत्पन्न होऊ लागली. त्यांच्यातील दडलेली शक्ती जागी होत चालली.

मुजरा न करणं ही गोष्ट कायद्याच्या कक्षेत बसत नसल्यामुळे मानाजीची मान जबरदस्तीनं वाकवण्याची छाती जेलरची झाली नाही. वॉर्डरला तसा हुकूम करता आला नाही. रागाने मात्र जेलर धुमसत होता. पण त्याक्षणी त्याला काही हालचाल करता आली नाही.

याचा परिणाम सर्व कैद्यांवर झाला. हा एक राजकीय हक्क मिळाल्यासारखं त्यांना वाटू लागलं. मानाजीचं अनुकरण करण्याची प्रवृत्ती त्यांच्यामध्ये डोकावू लागली. रात्रभर त्यांच्या डोक्यात तेच विचार चालू होते. मानाजीने जी गोष्ट केली, जे प्रथम धैर्य एकट्याने दाखविले ते आम्हाला का दाखवतां येऊ नये ? दुसरे दिवशी त्या विचाराला मूर्त स्वरूप आलं ! जेलरला कोणीच मुजरा केला नाही.

जणू नव्या युगाला सुरुवात झाली. गुलामगिरीतली प्रजा जागी झाली होती. बाहेर राजशाही विरुद्ध लढा चालू झाला होता. आत जेलरविरुद्ध कैदी उभे ठाकले होते. बाहेर कायदेभंगाला नुकतीच सुरुवात झाली होती. यामुळे तुरुंगात येणारी वर्तमानपत्रे कायदेभंगाच्या बातम्या कापून पाठवली जाऊ लागली. पण काही पोलीस-दोस्ताकरवी ती कैद्यांना वाचायला मिळत. एकाला वाचायला मिळाली की ती बातमी सर्वांना पोहोचे. अर्थात त्याला थोडा मीठमसाला लावला जाई. त्यामुळे त्यांच्यात रोज रोज उत्साह वाढत होता. जणू काय बाहेरचे लोक आपल्यासाठीच लढत आहेत. कायदेभंगाच्या, सत्याग्रहाच्या, बातम्या ऐकून त्यांना स्फुरण चढे !

जेलर सूडासाठी धडपडत होता. पण उघडउघड सूड घेण्याची छाती, आता त्याला होईना. मानाजीमागे सर्व कैद्यांची एकजूट उभी आहे असं त्याला वाटू लागलं ! ती मानाजीने प्रयत्नाने उभी केली नव्हती. त्याच्या बेडरपणामुळे ते त्याच्याकडे ओढले गेले होते. स्वयंस्फूर्त संघटना बनत चालली होती.

जेलरने वॉर्डरकरवी मानाजीची खोड मोडण्याचा बेत केला. जेलरला खूश केल्याने आपल्याला अधिक मार्क मिळतील, आपली सुटका लवकर होईल म्हणून वॉर्डर नेहमीच जेलरला अनुकूल असत. पोलीस आत बाहेर नेहमी जात असल्यामुळे व पोलिसांच्या पगारांचा प्रश्नही चळवळ्या लोकांनी हाती घेतल्यामुळे ते जेलरला विशेष असं मानत नव्हते. कैद्यांना पळू न देणे एवढंच

त्यांचं काम. त्यामुळे जेलर त्यांना तसं विश्वासात घेऊ शकला नाही. वॉर्डर मात्र सर्वस्वी त्यांच्या अधिकारातला व विश्वासातला होता. त्यालाही जेलरला खूश करण्याचीही विशेष संधी लाभली होती. पण त्याला अक्कल कमी होती. मानाजीची शक्ती आता त्या प्रसंगानंतर वाढली आहे याची जाणीव त्याला झाली नाही.

नेहमीप्रमाणे कैदी तुरुंगाबाहेरच्या कामावर आले होते. खाण फोडायचं काम अद्याप चालू होतं ! वॉर्डरनं एक-दोन दिवस जाऊ दिले. आणि मानाजीला काही तरी निमित्त काढून डिवचले. त्याला मागचा पुढचा पोच राहिला नाही. तो नेहमीच्या मस्तीत मानाजीला बोलला.

'बेट्या, तुला घमेंडी आली होय ! पेकाट मोडून काढीन समजलास ! जेलरला मुजरा करीत नाही होय, मान मोडून ठेवीन मग आठवल !'

'छाती असंल तर ये पुढ ! खांडोळी करून टाकीन इथं ! एका वॉर्डरचे दोन वॉर्डर करीन !'

मानाजीनं एकदम भयंकर स्वरूप धारण केल्यामुळे वॉर्डर एकदम चरकला. त्याचा हात लुळा पडला !

तथापि भ्यालो आहे अस समजू नये म्हणून तो म्हणाला, 'काय ते दाखवतो चल तुरुंगात, जेलरच्या समोर उभा करतो मग काय ते समजंल. खाली बघून मुकाट्यानं काम कर.'

'हे बघ फेकून दिली ही कुदळ आणि ही पाटी. काम करणार नाही. माझी माफी मागितल्याखेरीज काम करणार नाही. कायरे यार, हा काय माझा एकट्याचा अपमान आहे. जी माझ्यावर पाळी ती तुमच्यावर ! सर्वांची माफी मागेपर्यंत काम करायचं नाही. काय करतोय ह्यो. आणि त्यो जेलर. काय करणार हाय ते बि बघू या. ही मस्ती जिरवल्याशिवाय आपण स्वस्थ बसायचं नाही. माफी मागेपर्यंत अन्नाला शिवायचं नाही. याची कड एकदा लागलीच पाहिजे. बाहेरचे लोक आपल्या हक्कासाठी मरताहेत, आम्ही आमच्यासाठी का मरू नये ! शिक्षा झाल्यानंतरही पुन्हा यांच्या शिव्या आणि लाथा !'

सर्व ओरडले, "मानाजी, आम्ही तुझ्या मागं आहो. तू काही काळजी करू नकोस. काय व्हायचं ते साऱ्याचं होईल. सर्व कैद्यांनी काम बंद ठेवलं. जेवण बंद केलं !

साराच प्रकार आपल्यावर उलटला हे पाहून जेलर गडबडला !

वॉर्डरच्या तोंडचे पाणी पळालं !

पोलिसांनी आतल्या बातम्या बाहेर पोचवल्या ! वर्तमानपत्रांत मोठ-मोठ्या मथळ्यात त्या झळकू लागल्या. बाहेरचे लोक चौकशीची मागणी करू लागले. बाहेरच्या चळवळीनेही सरकार गडगडलं होतं. त्यांनीही हक्कदानाची घोषणा केली होती. लोकाना शांत करण्याकरता तुरुंगातील प्रकाराची चौकशी करण्याचं त्यांनी मान्य केलं. त्या चौकशीत लोक पुढाऱ्यांचाही समावेश करावा लागला ! एवढा आधार मिळाल्यानंतर मग काय ?

जेलरची सारी कृष्णकृत्ये कैद्यांनी चौकशी कमेटी समोर उघडी केली. अनेक प्रकरणे उघडकीस आली.

वॉर्डरने माफी मागितल्याशिवाय व जेलरला कमी केल्याशिवाय आम्ही जेवण घेणार नाही, काम करणार नाही म्हणून सर्व कैद्यांनी निक्षून सांगितले. लोकपुढाऱ्यांनी कैद्याच्या निश्चयाचं कौतुक केलं. कमिटीचा रिपोर्ट जेलरच्या उलट गेला.

वॉर्डरला शिक्षा झाली. जेलरला कमी करण्यात आलं ! व त्याच्यावर रीतसर केस घालण्यात आली.

मानाजीला फार दिवस तुरुंगांत रहावं लागलं नाही. लोकांच्या हाती राजसत्ता लवकरच आली. त्या आनंदाप्रीत्यर्थ अनेक कैदी सोडण्यात आले. त्यात मानाजीचं नाव पहिलं होतं !

मानाजी सुटल्याची बातमी कानावर येताच लोक त्याला नेण्यास आले होते. मोठ्या मिरवणुकीने त्याला गावात नेले. गांव आता पूर्वीचं राहिलं नव्हतं. स्वातंत्र्याचं वारं गावालाही भिडलं होतं. मानाजीच्या सवंगड्यांनी बाबासाहेब इनामदाराची कृष्णकृत्ये पुराव्यानिशी बाहेर आणली होती. कैद्यांच्या जागृतीमुळे जेलर तुरुंगात पडला. खेडुतांच्या जागृतीमुळे इनामदार तुरुंगात पडला. लोकजागृतीमुळे राजेशाही नष्ट झाली.

*(अशी होती संस्थानी राजवट)*

## प्रसंग १७ वा

असे क्षण प्रत्येक देशाच्या इतिहासात केव्हा तरी येत असतात. व्यक्तीत, प्रसंगात आणि स्थळात बदल झाला तरी असा क्रांतिकारक क्षण केव्हा

तरी येतच असतो.

राजा हा विष्णूचा अवतार ही कल्पना हिंदुस्थानात या वेळपर्यंत होती ! तो वाईट नसतो, अधिकारीच वाईट असतात, हीच बहुसंख्य जनतेची समजूत.

पण पोटाची आग, ही समजूत आवरून कशी धरणार ? रास्त मागणी झिडकारून कशी देणार ? राजा हा तर पित्याच्या ठिकाणी ! किती तरी चांगल्या कल्पना त्याच्या माथी लादलेल्या ! राजनिष्ठा हा तर प्रजेचा धर्म ! राजद्रोह म्हणजे पाप !

राजाच नको, ही त्या वेळच्या समाजाला पचण्याजोगी कल्पना नव्हती !

म्हणूनच पोटाच्या मागणीसाठी लोकांनी राजाची भेट घ्यायचे ठरविले. पोटाच्या प्रश्नावर गरिबांची संघटना जशी होईल तशी इतर कोणत्याही प्रश्नावर होऊ शकत नाही; आणि टिकूही शकत नाही. भावना ओसरली की संघटना मोडून जाते. पोटाचा चिमटा हा निराळा आहे. तो शांत होईपर्यंत, मनाची तळमळही शांत होत नाही.

डोईजड फाळा कमी करा ही मागणी.

राजा प्रजेचा मालक, पालक, पिता. तो ही मागणी कशी धुडकावून देईल, बाप मुलाला उपाशी कसा ठेवील ?

राजाचे अधिकारी वाईट ! राजा स्वत: चांगला. त्याचे सल्लागार वाईट. आमची परिस्थितीच समजू देत नाहीत. लोकांच्या भेटी घालू देत नाहीत.

प्रचारकांनी कितीही सांगितल की, 'बाबांनो, हा तुमचा नुसता भ्रम आहे. या कल्पना सोडून द्या. राजा काही आकाशातून उतरत नाही. तो तुमच्या आमच्यासारखाच माणूस आहे. माणसाला देव करू नका.'

शेकडो वर्षांच्या समजुतीला या उपदेशाने काही धक्का बसला नाही. 'ते काही असो. राजाकडे गेलं तरी पाहिजे. भेट घेत नाही असं तरी होणार नाही.'

लोकांनी भेट घेण्याचा आणि आपली गाऱ्हाणी पुढे मांडण्याचा निश्चय केला. लोकांचा हा निश्चय सर्व खेड्यांना समजला. खेड्या-पाड्यांचे पुढारी एकत्र जमून त्यांनी राजधानीत जाण्याचा दिवस ठरवला. काही पायी चालले. काही बैलगाडीने निघाले. काही मोटारीने निघाले, काही आगगाडीने निघाले. राजधानी सारी खेड्यांच्या पाहुण्यांनी फुलून गेली. राजधानीतल्या लोकांनी स्वखुशीने पुढे होऊन पाण्याची-जेवण्याची सोय केली.

-सर्वत्र आशादायक वातावरण दिसू लागले.

सर्व खेडूत एकत्र जमून राजवाड्यावर मोर्चा निघू लागला. राजाच्याच नावाचा जयघोष चालला होता. राजवाडा चार पांच मैल राहिला असेल. लोकांच्या भावनेला एकदम धक्का बसला! लॉऱ्या भरभरून पोलीस एकाएकी उतरले. लाठीवालेही काही होते. बंदुकवाले होते. थोड्याच वेळात घोडदळ आले!

लोकांना अचंबा वाटला!

लोकांजवळ तर साध्या काठयाहि नव्हत्या. दंगा करण्याचं त्यांच्या ध्यानीमनीही नव्हतं. राजाविरूद्ध त्यांची कसलीही तक्रार नव्हती. तो तर त्यांना आधार वाटत होता. राजावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. त्यांची तक्रार होती अधिकाऱ्याविरुद्ध. ते आपली व राजाची गाठ पडू देत नाहीत अशी त्यांची खात्री होती.

लाठीवाल्या पोलिसांनी त्यांना अडवलं!

का अडवलं? कशासाठी अडवलं? राजा आमचा, राजा-प्रजेच्या भेटीआड हे लोक का येतात? यांना कोणी पाठवलं? यांचं आम्ही का ऐकावं? असे अनेक प्रश्न त्यांच्या मनात उभे राहिले. असं अडवलं जाईल याची त्यांना कल्पनाही शिवली नाही. तथापि, त्यांनी आपला जायचा बेत रहित केला नाही.

ते थांबले नाहीत. हजारो लोकांचा जमाव. त्या जमावामुळं त्यांच्या मनात एक प्रकारचं धैर्य उत्पन्न झालं होतं. अंगाला अंग चिकटून चालले होते. त्यामुळे प्रत्येक देह जणू जमावाइतका मोठा झाला होता. त्या प्रत्येकाची शक्ती सहस्त्रपटीने वाढली होती. त्यांना विराट स्वरूप प्राप्त झालं होतं.

त्यातला एक पुढे होऊन म्हणाला, 'आम्ही राजाची भेट घ्यायला आलो आहोत, ते काही परत जाण्यासाठी नव्हे. राजाच्या व आमच्या भेटीआड तुम्ही कोण येणार?'

पोलीस फौजदार पुढे झाला. तो म्हणाला, 'तुम्ही निष्कारण हुज्जत घालत बसू नका. तुम्हाला काय सांगायचं असेल ते मला सांगा. मी काय ते राजेसाहेबांच्या कानावर घालतो. काय अर्ज आणला असेल तर तो त्यांना पोचवतो, पण राजेसाहेबांची व तुमची गाठ पडायची नाही.'

हे बघा फौजदारसाहेब, आम्ही काही तुमच्या भेटीसाठी आलो नाही. आम्ही अर्ज करून दमलो. आमचे अर्ज राजापर्यंत पोचत नाहीत, अशी आमची खात्री होऊन बसली आहे. आम्ही राजाचीच भेट घेणार! कोणत्या कायद्याच्या

आधारानं तुम्ही आम्हाला अडवता ? आम्ही आमची पोटाची गाऱ्हाणी राजापुढे मांडायची नाहीत तर कोणापुढे मांडायची ?'

'मी तुम्हाला पुन: सांगतो, तुम्ही आल्या वाटेने परत जा. राजेसाहेब परगावी गेले आहेत. आज त्यांची गाठ पडणार नाही. ते परत आल्यावर गाठ घ्या.'

'शक्य नाही. ते कसे जातील ? पंधरा दिवस आगाऊ जाहीर करून आम्ही आलोय. आमचा तुमच्या शब्दावर विश्वास नाही.'

'शब्दावर विश्वास नाही, तर लाठीवर बसेल !'

'लाठी ? का अन् कशापायी ? काय गुन्हा केलाय आम्ही ? आम्ही जाणार नाही'

लोकांचा राजवाड्यावर जाण्याचा निश्चय बदलेना ! फौजदाराच्या शब्दावर विश्वास बसेना. शेतकाम टाकून चार दिवस वाट चालून आलेले लोक सहजी परत कसे जातील ? ते पुढे चालू लागले. त्याबरोबर जमावाच्या कानाला शिट्टी ऐकू आली. पोलीस शिस्तीने उभे राहिले. आज्ञा होताच लोकांवर लाठीमार सुरू झाला.

लोकांची कसलीच तयारी नव्हती. दंगा करण्यासाठी ते आले नव्हते. तशी मार खाण्याचीही त्यांची तयारी नव्हती. त्या हल्ल्यामुळे ते गोंधळून गेले. काय करावं हे त्यांना समजेना अन् सुचेना. इतक्यात त्यांच्यापैकी एक पुढे आला व म्हणाला,

'बसा रे बाबांनो. राहू दे पुढे जायचं. इथेच बसून राहू आपण. आपलं गाऱ्हाणं ऐकीपर्यंत बसून राहू इथंच. इतके मैल चालून आलोय ते काय परत जायला ? राहू या इथंच उपाशी. राजाला नाही का दया येणार ? बसा ! सारेजण खाली बसा. दंगा केला, म्हणायला नको कोणी !'

यामुळे पोलीसही घोटाळले ! बसलेल्या जमावावर लाठीमार करायला कचरू लागले. वाड्यावर जाऊ द्यायचं नाही एवढीच त्यांना ऑर्डर होती. यामुळे तेही हात आवरून उभे राहिले.

पण त्यांच्या लाठीमारानं काहींना बराच मार बसला होता. काहींच्या खोका फुटल्या होत्या. ठार कोणी झालं नसलं तरी पडलेल्या खोकातून रक्त वहात होतं. त्या रक्तानंही ते बांधले गेले होते.

तोच तरूण त्या पोलिसांकडे वळून म्हणाला,

'कशासाठी रे मारतासा तुम्ही ? तुम्हाला आईबाप पोरंबाळं काय

नाहीत होय ? आमच्यातलंच नव्हं कारे तुम्ही ? का विलायतेसनं आलायसा ? तुमच्या बि जमिनी हाईत नव्हं ? तुमच्या जमिनीच्या फाळ्याला काय सूट मिळतिया व्हय ! तुमचं मागणं नाही हे ? मग आम्हालाच मारता व्हय ? तुमचं काय वाईट केलं रे आम्ही ?'

ज्यांच्या ज्यांच्या कानावर त्या तरूणाची वाक्यं पडली, ते पोलीसही खजिल झाले ! त्यांच्या माना खाली झाल्या ! चेहरे उतरले !

त्यातला एक पोलीस जवळच्यांना हलकेच म्हणाला, 'तुम्ही म्हणता ते सारं खरं ! आम्हाला काय कळत नाही व्हय हे ! पण सांगता कुणाला? हुकूम होईल तसं वागायला नको ? नाहीतर नोकरी सोडून द्यायला पाहिजे. पोटाला मिळालं असतं तर गांव सोडून कशाला इथं आलो असतो.'

त्या बहुतेक पोलिसांचे विचार दुसरे काय असणार ? तो तोंडाने बोलला, बाकीचे बोलले नाहीत एवढंच !

काही वेळ गेला. कोणाच्याकडून काही हालचाल झाली नाही. फौजदार दिसला नाही, पण तासाभराने तो पुनः आला आणि म्हणाला,

'तुम्ही उगाच हट्टाला पेटू नका. मी सरळ सांगतो. तुम्ही आपापल्या गावी परत जा. राजेसाहेब परगावी गेले आहेत. एक दोन दिवसात परत येतील- मग या वाटलं तर.'

'काही ही हरकत नाही- आम्ही एक दोन दिवस इथंच पडून राहूं. चार दिवसांच्या भाकऱ्या बांधूनच आलो आहोत आम्ही.'

या उत्तरामुळे फौजदार पुनः बुचकळ्यात पडला. लोक बसून राहिल्यामुळे राजधानीच्या लोकातही खळबळ उडाली. त्यांच्यात सहानुभूती उत्पन्न झाली. अन्नधान्याचा पुरवठा करण्याबाबत काही लोक स्वखुशीने प्रयत्न करु लागले.

राजाधानीतले लोक बोलू लागले, 'महाराज कुठे गेलेले नाहीत. ही सारी थापेबाजी आहे. लोकांना चुकवायसाठी सोंग आहे हे.'

ही बातमी खेडूतात पसरली. त्यांनाही तशी शंका येत होतीच. राजधानीतल्या लोकांचा त्याला दुजोरा मिळाला ! त्यामुळे त्यांचा निश्चय अधिक पक्का झाला. त्यांनी हलायचे नाही असे ठरवले.

या थापेबाजीमुळे महाराजांविषयीच्या त्यांच्या आदराला धक्का बसला. पूर्वीची पूज्यबुद्धी कमी झाली.

'असला कसला रे राजा?'

असे उद्‌गार बाहेर पडू लागले. कोणी म्हणाले, 'काय तो निकाल लावूनच जायचं येथून.'

बरेच तास निघून गेले! लोक काही केल्या परत जात नाहीत असे दिसून येताच फौजदार दुसऱ्या एका अंमलदाराला बरोबर घेऊन आला.

माणूस बदलला तरी बोलणं तेच!

'तुम्हाला काय सांगायचं असेल ते मला सांगा, मी महाराजांच्या कानावर काय घालायचं ते घालतो.'

लोकांनी पूर्वीचाच जाब दिला.

'आम्ही महाराजांची भेट घेतल्याशिवाय परत जाणार नाही.'

'ठीक, तुम्हाला जावं लागेल. नीट विचार करा.'

'हललं नाहीतर काय आमचा जीव घेणार तुम्ही?'

'ते मी काय सांगणार? पण तुम्हाला परतावं लागेल,'

'नाही. आम्ही परतणार नाही.'

'ठीक.'

पुनः शिट्टया वाजल्या, पोलीस हुकुमाची वाट पहात 'अटेन्शन्' मध्ये राहिले. थोड्याच वेळात घोडदळ आलं! पण लोक काही जागेवरून उठले नाहीत, हलले नाहीत.

लाठीमाराचा हुकूम आला. पण पोलिसांची लाठी आता पूर्वीप्रमाणे चालेना! मारताना त्यांचे हात कापू लागले. लाठीचा मार जोराने बसेना! डोळे डोळ्याला भिडेनात!

फौजदारालाही शंका आली. त्याबरोबर त्याने घोडदळाला इशारा दिला! आपल्यावरचे संकट चुकले म्हणून पोलिसांना हलके वाटले असावे . ते आपोआपच बाजूला झाले.

घोडी काय, त्यांना कसल्या भावना! टाचेचा मार बसताच, ती जमावावर जाऊ लागली! कित्येक लोकांच्या अंगावर, डोक्यावर, पाठीवर टापांचा मार बसला! हातात काठ्या असत्या तर घोड्यांना चुकविता आले असते, पण ते काय मारामारी किंवा हल्ला करायला आले नव्हते. मात्र या प्रकारामुळे आपणही तयारीने आलो असतो तर बरे झाले असते असे त्यांना वाटू लागले. काहीच्या तोंडून शब्द निघूनही गेले.

'माझ्या हातात काय तरी असतं तर दोन चार जणांना तरी मी लोळवलं असतं.'

पण ते नि:शस्त्र होते ! सत्ताधीशांनी मात्र त्यांच्यावर हिंसक हल्ले केले. त्यांनीच शस्त्र वापरलं ! सरळ न्याय गाऱ्हाणी मांडण्याकरीता गेलेल्यांना, लाठीहल्ल्याचा व घोड्यांच्या टापांचा जाब मिळाला.

या अनुभवाने त्यांच्या विचारात केवढी क्रांती घडून आली. राजाबद्दलचा आणि राजशाहीबद्दलचा आदर नाहीसा झाला. भक्तीची, प्रेमाची अन् आदराची जागा राग, चीड, सूड यांनी घेतली.

शेकडो वर्षे झोपी गेलेला समाज जागा झाला !

राजा हा ईश्वराचा अवतार ही कल्पना नाहीशी झाली. हजारो व्याख्यानांनी झाले नसते ते लाठीहल्ल्याने व घोड्यांच्या टापांनी झाले !

त्यांच्यावर पद्धतशीरपणे लादलेल्या संस्कारांना एकदम धक्का बसला. राजा आपला नव्हे. हे अधिकारी आपले नव्हेत. आपण गुलाम आहोत. ही जाणीव त्यांना अस्वस्थ करू लागली.

त्यांच्यातला माणूस जागा झाला.

विचाराला आणखी गती मिळाली. ते नाईलाजाने गावी परतले पण पोचतात न पोचतात तोच त्यांच्या पुढाऱ्याला सरकारने अटक केल्याची बातमी त्यांच्या कानावर आली !

दाद घ्यायची तर राहिलीच. भेटही नाही. उलट पुढाऱ्याला अटक. आतापर्यंत लोकांनी आवरून धरलेला राग अनावर झाला !

पुढाऱ्यांना सोडवून घेण्याकरता पुन: राजधानीत जाण्याचं शेतकऱ्यांनी ठरवलं. कार्यकर्त्यांची बैठक भरली. पूर्वीच्या मागणीचं स्वरूप आता त्यांनी बदलून टाकलं. सारा कमी करा ही मागणी आता त्यांना भिकेच्या स्वरूपाची वाटली. राजा आपला हितकर्ता नव्हे ही त्यांना अनुभवाने खात्री पटली होती. त्याचा ईश्वरी अंश नाहीसा झाला होता. ती एक जुलमी बेजबाबदार व्यक्ती त्यांना दिसू लागली.

पुढारी सोडा व जबाबदार राज्यपद्धती अंमलात आणा असं त्या घोषणेला स्वरूप आलं व त्याचसाठी त्यांनी पुन्हा मोर्चा काढण्याचं ठरवलं. मागणीला आता चढाऊ अन् लढाऊ स्वरूप आलं होतं.

आपल्यावर पुन: हल्ला होईल या कल्पनेनं त्यानीही आता आपली

तयारी केली होती. आता तर त्यांनी राज्यसत्तेचीच मागणी केली होती अन् ती मिळविण्याचा निश्चय केला होता.

हा मोर्चा आखताना त्यांनी फार व्यवस्थेशीर आखला, मोर्चाचे स्वरूप पूर्वीहून फार मोठे होते. त्याची संघटना पद्धतशीर बांधली गेली होती. काही कार्यकर्ते राजधानीत अगोदरच येऊन राहिले होते. त्यांनी आपल्याला पाहिजे ती माहिती आगाऊ मिळवून ठेवली होती. काही मोर्चात सामील झाले. काही गट बाजूस राहिले. ते विशेष कणखर होते. मोर्चा फार व्यवस्थितपणे चालू लागला. सरकारची तयारीही विशेष दिसली. तालुक्याचे पोलीस राजधानीत आणून ठेवले होते, पण हे सारे पोलीस मूळचे खेड्यातलेच. त्या मोर्चात त्यांच्या गणगोतांनीही भाग घेतला होता. काके, मामे, भाऊ आणि पोटची थोरवट पोरे त्यात सामील झाली होती.

मोर्चा राजाड्याच्या मार्गाला लागला. राजधानीचे हजारो लोक स्वखुशीने त्यात सामील झाले. त्यात विद्यार्थ्यांचाही भरणा मोठा होता. गिरणी-मजूरही सामील झाले होते. सामान्य जनता सामील झाली होती. धान्य दुकानदारांनी धान्य जमवून शिजवायला सुरुवात केली. जमावाला पाणी-पुरवठा करण्याकरता स्वयंसेवक आपोआप तयार झाले.

राजा, अधिकारी, पोलीस व त्यांचे मूठभर हस्तक एकीकडे व सर्वसाधारण जनता, शेतकरी, मजूर, मध्यमवर्ग, छोटे दुकानदार, विद्यार्थी दुसरीकडे-असा स्वच्छ भेद पडलेला राजधानीत दिसू लागला. आतापर्यंत दबून राहिलेल्या ज्वालामुखीने पेट घेतला. असंतोषाला वाचा फुटली. त्या असंतोषाने विराट स्वरूप धारण केले !

'विनाशाय च दुष्कृताम्'. परमेश्वराचे विराट स्वरूप प्रकट झाले होते !

पण हे समजून जनतेशी वागण्याचा शहाणपणा मदांध सत्तेत नव्हता. राजाला सदैव खुशमस्कऱ्यांनी घेरलेलं ! त्याच्या शक्तीविषयी भलतीच कल्पना करून दिलेली. 'लोकांचे एकदा ऐकले की ते डोक्यावर बसतील, शेफारतील. मग आपला बोज राहणार नाही.' अशा प्रकारचा सल्ला राजाला मिळाला होता. राजाची व समाजाची ओळख नाही. लोकांत मिसळणे, गरिबाशी बोलणे नाही. त्यांना भेटणे म्हणजे कमीपणा ! खुशमस्कऱ्यांनी त्याला मनाचा व देहाचा कैदी बनवलेले ! लोक हे आपले ताबेदार ! आपण त्यांचे मालक ! या भावनेने तो पिंड भारलेला ! वाड्याबाहेरच्या जगाची माहिती नाही. बाहेच्या जगाची व

बदललेल्या वातावरणाची कल्पना नाही. अधिकाराच्या कल्पनेचा मद चढलेला ! अफाट समाजापुढे आपण दुर्बल आहोत याची जाणीव कधीच न आलेली !

राजाने गोळीबाराचा हुकूम देऊन ठेवला ! !

तोच फौजदार व तोच अंमलदार पुन: मोर्चापुढे आले. तुमचे काय म्हणणे असेल ते लेखी द्या, आम्ही महाराजांचे समोर ठेवू असे म्हणू लागले !

महाराज लोकांपुढे गेल्यास ते अपमान करतील, काहीतरी दगाफटका होईल, तरी महाराजांनी समोर जाऊ नये असा सल्ला त्यांना देण्यात आला होता. म्हणून ते लोकांसमोर जायला भीत होते.

गेल्या खेपेस लोकांनी ऐकले, पण त्याचा मोबदला पुढाऱ्याच्या अटकेत झाला ! राजा असून राजा नाही म्हणून सांगण्यात आले. मागणीचाही विचार झाला नाही. आता जमाव राजाची गाठ घेतल्याशिवाय परत जाण्यास तयार नव्हता. तो तयारीत आला होता. काय तो सोक्षमोक्ष लावून घ्यायची त्याची तयारी झाली होती.

संस्थानाबाहेर जनतेने भलताच उठाव केला होता. 'चले जाव' ची घोषणा केली होती. त्यामुळेही लोकांच्यात नवे वारे शिरले होते. निर्भयता निर्माण झाली होती.

अंमलदारीच्या दटावणीला ते आता भ्याले नाहीत. ते पुढे चालू लागले. पोलिसांना पूर्ववत् लाठीमाराचा आदेश देण्यात आला. लाठीवाल्यामागे सशस्त्र पोलीस होते. घोडदळ तयार होते.

पण या खेपेस सर्वच वातावरण बदललं होतं. आश्चर्याची गोष्ट म्हणजे हुकुमाची अंमलबजावणी होईना. ते जमावात घुसले खरे, पण लाठी कोणाचीच चालेना ! गेल्या खेपेच्या अनुभवाने त्यांच्या मनात पालट झाला होता. मोर्चा काढण्यापूर्वी खेड्यावरच्या नातलगांनी त्यांच्या गाठी घेऊन आपल्या लोकांवर लाठ्या बंदुका चालवायच्या नाहीत, नोकरी गेली तरी बेहत्तर म्हणून ताकीद दिली होती. कार्यकर्त्यांनी चळवळीचा हेतु पटवून दिला होता. मन वळवले होते. गोळीबाराचा हुकूम झाला !

त्यातला एक निर्भय तत्त्वनिष्ठ पोलीस पुढे झाला. आपला डगला पट्टा काढून फौजदाराच्या पुढे ठेवला. म्हणाला,

'आम्ही नि:शस्त्र जमावावर गोळीबार करणार नाही.' म्हणून त्याने बंदूक खाली ठेवली. याचा परिणाम आश्चर्यकारक झाला. सर्वांची भीती गेली. तो

म्हणाला,

'ते महाराजांना निव्वळ भेटायला मागतात हा काय गुन्हा झाला? आम्ही यासाठी यांच्यावर गोळी चालवणार नाही. ते काही महाराजांच्या अंगावर चालून आलेले नाहीत'.

अंमलदार संतापला. आपणच पुढे झाल्याशिवाय पोलीस ऐकणार नाहीत, म्हणून त्यानेच जमावाला दमदाटी द्यायला सुरुवात केली. राजाच्या खास रिसाल्याला ऑर्डर दिली. त्याने अधिकाराच्या मस्तीत जमावाला भीती दाखविण्याकरीता जमावावर गोळी झाडली. गोळीबारात दोन प्राणास मुकले. दोन जखमी झाले !

जमाव भडकायला एवढी ठिणगी पुरे झाली !

असंतोषाचे पेव भरलंच होतं. घोडी अंगावर घातली, पण या वेळी जमाव पूर्वीसारखा नि:शस्त्र नव्हता. त्यांनी मिळतील ती साधने बरोबर आणली होती. काठ्यांचा मारा घोड्यांना बसताच घोडी उलटली. सर्वत्र गोंधळ माजला.

मोर्चा राजवाड्याकडे निघाला ! पोलीस मोर्चात सामील झाले ! त्यांच्या बंदुका लोकांच्या बाजूला झाल्या. राजाच्या व अधिकाऱ्यांच्या संरक्षणाला कोणीच धावून आले नाहीत.

त्याच दिवशी तालुक्याच्या शेतकऱ्यांनी तालुका कचेऱ्यांचा ताबा घेतला. पंचायती स्थापन केल्या. सत्ता आपल्या हाती घेतली.

राजवाड्याकडे निघालेल्या मोर्चाला मानवी सागराचे स्वरूप आले होते. या प्रचंड शक्तीला थोपवून धरण्याची शक्ती, राजसत्तेच्या अंगी नव्हती. लोकांनी राजवाड्यावर राष्ट्रीय झेंडा फडकावला व लोकराज्याची ग्वाही दिली.

*(अशी होती संस्थानी राजवट)*

## मोत्याचा कंठा

वर्तमानपत्रांतून रोज एखाद्या नव्या चोरीची बातमी छापून येत होती. यामुळे पोलिसांवर वर्तमानपत्रे व लोकही टीका करू लागले होते.

पोलीसही हा लोकापवाद टाळण्याकरिता मोठ्या बारकाईने सर्वत्र टेहळणी करू लागले होते. मनुष्य एकदा का शंकेखोर झाला की त्याला शंकेच्या जागा वाटेल तेथे दिसू शकतात. अनोळखी माणसाचा तर हटकून संशय यायचा.

निर्दोषी असो वा दोषी असो, एकदा शिक्षा झालेल्याची स्थिती तर फारच शोचनीय ! शिक्षेच्या डागाने त्याची कायमची बदनामी झालेली असते. सर्वच त्याच्याकडे संशयित दृष्टीने पाहतात. जणू काही त्याच्या चरित्रात चांगली गोष्ट घडायचीच नाही किंवा सुधारणा होणेच शक्य नाही.

पोलीस व डिटेक्टीव्ह यांची नजर, लोक-समाज जमण्याच्या ठिकाणी विशेष.

शनिवारचा दिवस ! तोही मुंबईचा ! संध्याकाळी शाळा, कॉलेजे व ऑफिसचे लोक बहुतेक मोकळे. रविवारहूनही हा दिवस विशेष आवडीचा. या दिवशी वाटेल तितके जाग्रण करावे आणि वाटेल तितक्या उशीरा झोपावे. ऑफीस गाठण्याची घाई रविवारी नसतेच. या दिवशी प्रत्येक सिनेमा थिएटरमध्ये चित्रपट बदललेले.

रतनही आज सिनेमा पहाण्यासाठी बाहेर पडली होती. ती होती कॉलेजमध्ये. एकटे बाहेर पडण्यास तिला प्रतिबंध नव्हता. नाहीतर तरुण मुलीला आजीबाईच्या संगतीशिवाय घराबाहेर पाऊल टाकायला येईल कसे !

तरुण मुली म्हणजे समाजाच्या जणू गुन्हेगार !

शिक्षेचा छाप पडलेला मनुष्य. तो दोषी असो निर्दोषी असो, त्याच्यामागे पोलिसांचा ससेमिरा असायचाच. तरुण मुलींचीही पण स्थिती हीच. तिच्या मागे घरचे पोलीस असायचे. दोघांचीही जात जणू एकच !

पण रतन या गोष्टीला अपवाद होती, सुशिक्षित घराण्यांतली आणि कॉलेजमध्ये शिकत असलेली, यामुळे तिच्यावर तसा सक्त पहारा नव्हता.

पहिला साडेतीनचा शो सुरू होता. दुसऱ्या शोची मंडळी दारावर घोळका करून उभी होती. जो तो पुढे सरकण्याचा प्रयत्न करीत होता.

मुंबईच्या बायका त्या तसल्या गर्दीत पुरुषांना धक्के देत वाट काढायला कमी करीत नव्हत्या. त्यांची अरेरावी पाहून पुरुषही शिष्टाचार पाळीत नव्हते. जगाचाच नियम आहे हा मान द्यावा, मान घ्यावा. तथापि जगात अपवाद हे असायचेच !

उंची पोषाख केलेला एक सुंदर तरुण रतनच्या पुढे होता. त्याने रतनला पुढे जायचे आहे हे पाहताच बाजूला होऊन वाट दिली, आणि आसपासच्यांनाही बाजूस केले व मर्यादेने बाजूस राहिला.

या त्याच्या वागणुकीमुळे रतनचे त्या मनुष्याबद्दल साहजिकच चांगले

मत झाले. त्यात तो दिसायलाही सभ्य, सुशिक्षित आणि सुंदर. मात्र त्या सुंदर चेहऱ्यावर विषण्णतेची छाया स्पष्ट दिसून येत होती. त्या दु:खी चेहऱ्याची छाप सहानुभूतीच्या हृदयावर सहज पडे.

रतनला तर त्याच्याबद्दल सहानुभूती उत्पन्न झालीच.

मनुष्याच्या अंत:करणावर सौंदर्याची छाप पडते, तशीच दु:खाचीही पडते. दोन्हीही हृदय जिंकू शकतील.

रतन काही हृदयशून्य नव्हती! तो तिच्या मागच्याच रांगेला बसला होता. मान जरा वळली की दृष्टादृष्ट व्हावी. त्याच्या नजरेत स्त्री सौंदर्यावर लुब्ध होण्याची ती पुरुषांची दृष्टी मुळीच नव्हती. यामुळेच की काय त्याच्याकडे पाहताना रतनला संकोच वाटत नव्हता.

पाठ फिरवली की सावली मागे लागते म्हणतात, त्यापैकीच हा प्रकार नसेल कशावरून?

मधल्या इंटरव्हलमध्ये, इतरांबरोबर तोही बाहेर निघाला. जाताना त्याच्या कपड्याचा स्पर्श ओझरता तिच्या अंगाला लागला. तो स्पर्श हेतूपुरस्पर होता असे कसे म्हणता येईल? त्या स्पर्शाचा तिला तिटकारा आला नाही खास! रोमांच उभे राहिले नसतील, कदाचित असलेच राहिले तर बंधुभावाचे!

शो संपला, माणसे जागेवरून उठून चालू लागली, रतनचा हात सहजी तिच्या मानेवर गेला. त्याबरोबर 'कंठा-कंठा' म्हणून तिच्या तोंडून चारचौधांला ऐकू जातील इतक्या मोठ्याने शब्द बाहेर पडले.

पोलीस व हेर झटकन पुढे झाले आणि तिची हकीकत पुरी ऐकण्यापूर्वीच त्यांनी त्या माणसाला पकडले. एका पोलीस जमादाराने त्याच्या दंडास धरले.

ज्याच्याबद्दल तिच्या मनांत आदर उत्पन्न झाला होता, त्यालाच पोलिसांनी गिरफदार केलेले पाहताच ती अगदी गोंधळून गेली. तिला कसेसेच झाले. जणू आपल्याच निकटच्या कोणावर तरी हा प्रसंग आला आहे!

एक क्षणभरच तिने मनाशी विचार केला. त्याची दृष्टी पण याच वेळी तिच्याकडे वळली होती. जणू काय तो डोळ्यांनीच बोलत होता.

'काय तुम्हालाही खरं वाटतं हे? मी कंठा चोरला म्हणून? तिला हे समजलं जरी नसेल तरी नेत्राची भाषा सहानुभूतीच्या जीवाला समजते म्हणतात. त्या डोळ्यामागे दडलेले हृदय तिला जणू स्पष्ट दिसू लागले. त्याच्या जिवाची

तळमळ तिला स्वत:लाच झोंबू लागली. जणू साक्षीपुराव्यावाचून त्याची इत्यंभूत परिस्थिती तिला आकलन करता आली व त्याच आत्मविश्वासाने ती चटकन पुढे झाली. तिने पोलीसला थांबविले आणि म्हणाली.

'द्या सोडून त्यांना. माझीच चूक झाली ती. माझा कंठाच मुळी गेला नाही. मी तो घातला असं मला वाटलं होतं; पण आता मला पक्क आठवतं की, कंठा मी घातलाच नव्हता मुळी. द्या सोडून त्यांना. निरपराधी मनुष्यावर असा प्रसंग आणल्याबद्दल मला फार वाईट वाटतं.'

रतनचे हे शब्द कानी पडताच त्या युवकाच्या डोळ्यातून मोत्याचे सर वाहू लागले !

पोलीसाने त्याला सोडून दिलंच होतं !

रतन चालू लागली होती.

तो घाईधाईने तिच्याजवळ गेला आणि मोठ्या कृतज्ञतेने खाली मान घालून म्हणाला.

'देवी ! आपल्याला खरोखरीच का माझी शंका येत नाही ? का केवळ दया म्हणून आपण मला वाचवलंत ?'

'नाही बरं, मला तुमची मुळीच शंका येत नाही.'

एकच वाक्य पण या एका वाक्याने त्याच्या आयुष्यात केवढी क्रांती घडवून आणली. त्या एका वाक्याने त्याच्या चारित्र्याची उलटापालट झाली. संताच्या प्रवचनांनी किंवा सत्तधिकाऱ्यांच्या दंडकांनी जे करता आले नाही ते एका शब्दात करता आले.

रतनच्या शब्दांनी त्याला गहिंवरून आले. त्या शब्दांनी त्याच्या चेहऱ्यावर विषण्णतेची अधिकच छटा पसरली.

प्रत्यक्ष तुरुंगवाससुद्धा त्याच्या हृदयाला तिच्या शब्दाइतका झोंबला नसता !

रतन घरी गेली. त्याला सोडवल्याचे तिला समाधान वाटले ! पण तिचे हे समाधान फार काळ टिकू शकले नाही.

दुसरेच दिवशी तिने सोडवलेल्या युवकाचा फोटो दैनिकांत छापून आला होता. मोठ्या मथळ्याखाली त्याच्याविषयीची माहिति आली होती.

बऱ्याच चोऱ्या केल्याचा त्याचेवर आरोप होता. पोलीसही त्याच्यामागे बरेच दिवस होते. बायकोखेरीज त्याचे जवळचे असे कोणी नव्हते.

त्याला धरले होते खरे, पण मुद्देमाल काही सापडला नव्हता. त्यामुळे पोलीसला अवघड झाले होते.

पोलिसांनी आपल्या नवऱ्याला पकडून ठेवल्याची बातमी त्याच्या बायकोच्या कानावर गेलीच होती. तिलाही 'र ट प' करता येत होतं.

नवऱ्याला भेटण्याकरिता साहजिकच ती पोलीस स्टेशनावर गेली. सहानुभूतीमुळे की का कोण जाणे, पोलिसांनी त्यांना बोलायला एकांत करून दिला.

तथापि पोलीस आपले भाषण कोठून तरी ऐकल्याशिवाय राहणार नाहीत, ही त्याला खात्री होतीच.

त्याला पहाताच ती रडूं लागली. तो तिला आधार देण्याकरताच बोलत होता. 'कसेतरी करून दोन वर्ष काढ; तोपर्यंत मोलमजुरी कर; नाहींच नोकरी मिळाली तर अंगावरचे दागिने मोड आणि हे बधं जमलं तर ही माझी चंची भरून कोणाकडून तरी ती पोचती कर.'

जिवावर बेतले तरी चंची पाहिजे. हे पाहून तिला नवऱ्याच्या शोकाचे आश्चर्य वाटले !

नवऱ्याचा निरोप घेऊन ती दु:खी अंत:करणाने घरी गेली. नवऱ्याची इच्छा तिला पुरी करणे भागच होते आणि त्यात असं अवघडही काही नव्हतं. शिकस्तीने तीन-चार आण्याचा प्रश्न होता.

चंची साफसूफ करून पुन: सगळी भरून देण्याकरता तिने ती झाडायला सुरुवात केली. झाडता झाडता एका कप्प्यातून कागदाची चिठ्ठी बाहेर पडली-

कुतूहलानं तिनं ती उघडली. त्यात मजकूर होता. तिनं ती वाचली. वाचताच नवऱ्याच्या चंचीच्या शोकाचा अर्थ तिला चटकन् कळून आला.

चिठ्ठी कसली ? आपण लवकरच तुरूंगात जाणार अशी त्याने अटकळ केलीच होती म्हणूनच त्याने ती चिठ्ठी लिहून ठेवी असावी.

त्या चिठ्ठीत आतापर्यंत चोरून नेऊन ठेवलेल्या जिनसांची यादी आणि त्या जागा लिहून

ठेवल्या होत्या. पण त्या पुढचा मजकूर वाचून मात्र तिला आश्चर्य, आनंद व नवऱ्याबद्दल आदर उत्पन्न झाला. त्याचे मतपरिवर्तन झालेले पाहून तिला समाधान झाले.

रतनबाईला ती धन्यवाद देऊ लागली.

चिठ्ठीतील मजकूर असा होता. 'ज्या रतनबाईने कंठा गेला असतानाही

- मला वाचविण्याकरीता 'कंठा गेलाच नाही' असं म्हणून मला सोडवून घेतलं, त्यांच्या स्वाधीन सर्व जिनसा कर, व ज्यांच्या त्यांच्या पोचत्या करायला सांग. त्यांचा कंठा-त्यांच्या पायावर डोकं ठेवून त्यांना परत कर आणि त्यांना सांग की आता माझ्या नवऱ्यानं हा धंदा सोडून दिला आहे म्हणून.'

नवऱ्याच्या पत्राप्रमाणे सर्व जिनसा शोधून आणून तिने रतनबाईपुढे ठेवल्या व तिचा कंठा आणि नवऱ्याने लिहिलेली चिठ्ठी पुढे ठेवून तिने रतनबाईच्या पायावर डोकं ठेवलं.

एकंदर प्रकार पाहून रतनबाईचा कंठ दाटून आला. तिने तो कंठा पुनः मोठ्या प्रेमाने तिच्या गळ्यांत घातला !

कंठा गळ्यांत पडतांच तिचा कंठ भरून आला. तिच्या नेत्रातून गळणारे मोत्याचे सर रतनच्या पायावर पडू लागले.

*(संसार)*

# २ कांही लेख

## मानवतावादाचा स्वीकार करा

मी याच शब्दात सर्व मानवजातीला आवाहन करीन, नको देव, नको धर्म, केवळ माणुसकीचा स्वीकार करा.

देव मानला, की परावलंबी झाला!

देव मानला, की समता गेली!

लोकशाही गेली, स्वतंत्र वृत्ती गेली!

धर्म स्वीकारला, की भांडणे आली!

माझा धर्म श्रेष्ठ! तुझा कनिष्ठ!

मी उच्च! तू नीच!

प्रत्येक धर्माचे संप्रदाय निराळे! संस्कार निराळे, नियम निराळे! धर्मग्रंथ निराळे! तेथे ऐक्य कसे साधणार?

हिंदू धर्म, इस्लाम धर्म, अन् ख्रिश्चन धर्म या मानवी विकासाच्या चढत्या पायऱ्या आहेत, असं नाही.

नदी, नाले, नद, ओहळ एकाच सागराला मिळतात, तसे सर्व धर्म एकच तत्त्व प्रतिपादन करतात. राम रहीम एकाच देवाची नावे आहेत, या म्हणण्यास काही अर्थ नाही. 'बोलाचीच कढी, बोलाचाच भात' असा प्रकार आहे हा. संतांनी तसा उद्घोष केला, तरी धर्माने केलेली विभागणी कमी झाली नाही. उलट घट्टच झाली. संत महात्म्याचे प्रयत्न व्यर्थ गेले! फार काय प्रत्येक धर्म, त्या त्या धर्मियांच्या विकासाच्या आडच आला! प्रत्येक धर्माने त्यातील विशिष्ट अल्पसंख्य वर्गाचाच स्वार्थ साधला. एकाच धर्मातील मानवांची विभागणी केली. तेथे दुसऱ्या धर्मियात, प्रेमाची वाढ कशी होणार? जिव्हाळा कसा निर्माण होणार?

प्रत्येक धर्मानि व धर्मसंस्थापकाने आपल्या पुरतं कुंपण तयार केलं व मानवी समाजाची शकले पाडली !

ते ते धर्म संस्थापक, नीतितत्त्वे सांगून, जनतेच्या हिताचा मार्ग दाखवून, बाजूस राहिले असते, तर लोकांनी निवडानिवड करून आपापला मार्ग चोखाळला असता. विवेचक बुद्धीचा उपयोग केला असता व ती तत्त्वे मानवी विकासास सहाय्यभूत झाली असती. पण प्रत्येक धर्मसंस्थापकाने, माझाच धर्म स्वीकारा अशी सक्ती केली. तो स्वीकारला तरच तुम्हाला सद्गती लाभेल, असा दंडक घालून दिला ! ती आज्ञा ऐकावी म्हणून स्वत:लाच ईश्वर, प्रेषित व देवाचा पुत्र म्हणवून घेतलं व आपल्या ग्रंथाला ईश्वरप्रणीत करून टाकलं ! देवाच्या भीतीनं दंडुक्याचं काम केलं ! ती भीती म्हणजेच अफू होय. अपवाद फक्त एका बुद्धाचा !

प्रत्येक मानव उपजताच स्वतंत्र विचारांचा, स्वतंत्र बुद्धीचा. पण ती स्वतंत्र बुद्धीच धर्मानि मारून टाकली ! धर्मानि माणसाला गुलाम बनवलं व त्याला धार्मिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय गुलामगिरीत आवळून टाकलं !

प्रत्येक धर्मात, धर्मगुरुंनी राजाला आपला हुकमी साथीदार बनवलं. व दोघांनी हातात हात घालून बहुजन समाजाला बौद्धिक, शारीरिक व आर्थिक बंधनात जखडून टाकलं. श्रमजीवींना गुलाम बनवलं.

हिंदुधर्माची, मनुस्मृतिकारांची अन् गीतेची, त्या श्रीकृष्ण परमात्म्याची, कोणी कितीही स्तुती केली व गीतेचा अर्थ कसाही, कितीही व्यापक व उदात्त असा लावला तरी धर्माचे अनिष्ट परिणाम कोणालाही बदलता आले नाहीत. गांधीजींनी वर्णाश्रमाचे गोडवे गायले ! त्याचा अर्थ त्यांना अनुकूल असा लावला. तरी वर्णाश्रम धर्मातून निर्माण झालेल्या सहस्र जाती जिवंत आहेतच. श्रीकृष्णाने राजाला विष्णू बनवला. तो यावेळेपर्यंत जनतेच्या डोक्यावर नाचला. व इंदिराजींनाही नडला ! गांधीजींनी अस्पृश्यांना हरिजन नाव देऊन गोंजारले. पण हिंदुधर्मानि, त्या हरीलाच अस्पृश्य बनवले ! श्रीकृष्णहा हुकूमशाहीचा आद्य प्रवर्तक ठरला. कोल्हापूरचे एक पुस्तकी पंडित म्हणतात 'श्रीकृष्णाने कुत्र्या मांजरातही ईश्वराचा अंश आहे' असे मानले. पण याच हिंदुधर्मानि अस्पृश्यांना कुत्र्या-मांजराहून हीन लेखले ! असा हा हिंदुधर्म गचाळातला गचाळ आहे. त्याज्य आहे. तिरस्करणीय आहे. त्यात समतेला जागा नाही. माणुसकीला थारा नाही. ज्या उपटसुंभ्यांचे, गोसावड्यांचे व प्रेषित म्हणून जगाला फसवणाऱ्यांचे

कल्याण साधते, ते त्याची गोडवी गाणारच.

'हिंदुधर्म हा एक धर्म नाही. तो अनेक हीनोच्च धर्मांचा संग्रह आहे. हिंदुधर्माच्या जातिसंस्था व वर्णसंस्था या अनुदारतेच्या मूर्ती आहेत. या हिंदुधर्माला जगवण्याचे कार्य ब्राह्मण पुरोहितांनी दीर्घ कालापर्यंत केले आहे. या हीन धर्मावर जगणारा पुरोहितवर्गच या जातिसंस्थेस जबाबदार आहे. मुहूर्त, ज्योतिष ग्रह नक्षत्रे, पूजाव्रते, तीर्थ, उद्यापने इत्यादिकांना ब्राह्मणांनी महत्त्व देऊन स्वतःच्या उपजीविकेकरता सामान्य समाजातील अज्ञान व दैववाद याचे पोषण केले.

अगतिकतेचे तत्त्वज्ञान म्हणजे शंकराचार्यांचा मायावाद व संन्यासवाद. वस्तुविषयक सगळ्या विचारांची अगतिकता ही मायावादाची मायभूमी, मायावाद हे कुंठित विचारसरणीचे, अगतिकतेच्या भोवऱ्यात सापडलेल्या बौद्धिक चिकित्सेचे फलित होय.

बुद्धीने आत्मा व पुनर्जन्म याचा निर्णय होऊ शकत नाही. विकसित होणाऱ्या भारतीय बुद्धीवादास व तत्त्ववादास शब्दप्रामाण्याच्या शीला तलाखाखाली पूर्णपणे जिवंत समाधी दिली.

गीतेच्या मुळाशी पुनर्जन्मवाद व कर्मविपाक म्हणजे दैववाद व ईश्वरवाद आहे. ज्यास बुद्धिवादाने चालावयाचे आहे व ज्यास बुद्धिवादी धर्म पाहिजेत, त्यांना गीतेतील अनेक अध्यात्मविषयक व देवताविषयक प्रश्न बुद्धीने सिद्ध करण्यास मार्कंडेयाचे आयुष्यही पुरणार नाही.

परंपरागत रूढीने चालत आलेली अमुक कार्ये अयोग्य होत, हे बौद्धिक पद्धतीनेच ठरले पाहिजे. या कामी सामाजिक शास्त्रेच उपयोगी पडतील. गीता नव्हे, गीतेची मांडणी पौराणिक पद्धतीची आहे. त्यात स्वाभाविक तर्कशुद्धता नाही. प्रमाणबद्धता नाही. पूर्ण बुद्धिप्रामाण्य आले की धर्म वस्तू शिल्लकच राहणार नाही. बुद्धिवादावर आधारलेली व गरज संपताच बदलता येणारी ध्येये व मूल्ये यापुढे पाहिजेत. धर्म मूल्यास रजा दिली पाहिजे. धर्माने लोकांवर नेहमी वजन कसे पाडावे एवढ्यांचीच फार काळजी घेतली आहे. सत्याची त्याला फारशी गरज नाही. ज्या प्रश्नांची उत्तरे मिळवणे असंभवनीय आहे, त्या प्रश्नाची काल्पनिक उत्तरे देऊन धर्म आत्मवंचना करतो. हीन स्थितीतल्या दीन जनतेला, चालू गुलामगिरीत आणि पतित स्थितीत डांबून ठेवण्याकरता कर्म विपाकाच्या सिद्धांताचा उपयोग आजपर्यंत वरिष्ठ वर्ग करीत आले आहेत. दुःस्थिती

अत्यंत गूढ अशा कारणांनी घडविली आहे. त्याच्या स्वत:च्याच पूर्वजन्मीच्या कर्माने ती परिस्थिती निर्माण झाली आहे, असा भ्रम दृढमूल करण्याचे कार्य हा आत्मवाद कर्मविपाकवाद आणि पुनर्जन्मवाद करतो. त्याचा परिणाम असा होतो की त्याच्या दु:स्थितीस जबाबदार असलेली सामाजिक रचना व त्याचा अध:पात करणारे, यांच्याविरुद्ध प्रतिकार करण्याची भावनाच त्यांच्यामध्ये उत्पन्न होऊ शकत नाही! पारलौकिक कल्पनांनी व या कार्य सिद्धांतरूपी दैववादाने प्रतिकार भावनेची बीजेच दग्ध केली आहेत. स्मृतीच्या दृष्टीने अस्पृश्यता निवारण करणारे लोक पातकाचे धनी होतात व मरणोत्तर स्थितीत नरकावस्था भोगतात. जातिसंस्थेचे नियम मोडणाऱ्यास स्मृतीच्या नियमाप्रमाणे मरणोत्तर अधोगतीलाच जावे लागते. परलोक आत्मा आणि ईश्वराच्या अस्तित्वावर श्रद्धा या सर्व गोष्टी चुकीच्या, अज्ञानाच्या आणि खोट्या आहेत. या दृढमूल झाल्यामुळे धूर्त बुद्धिवानांना व धनिकांना, श्रमजीवी अज्ञानी माणसाची क्रूरता आली व गुलामगिरी लादता आली. समाजात विषमता व अन्यायाची राखण करता आली. शूद्र व दलित जाती यांनी आपल्या दास्यातच समाधान मानले पाहिजे कारण ते प्रारब्धकर्माचे फळ आहे. व वर्णांनी आपले स्वामित्व गाजवलेच पाहिजे कारण ते त्यांना पूर्वपुण्याईने लाभले आहे असे धर्मशास्त्र सांगते.

*(तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी-हिंदुधर्माची समीक्षा)*

**आजचा हिंदुधर्म हा सैतानी धर्म आहे :** "मनुष्याच्या उफलत्या उत्क्रांत आकांक्षाशी विरोध करणारा धर्म हा धर्म नसून अधर्मच होय.

निव्वळ जन्माच्या अपघातावरून उच्चनीचतेची, स्पृश्यास्पृश्यतेची खेकटी माजविणारा धर्म हा गुलामांचा धर्म होय. सामाजिक संघशक्तीला आग लागली असताना डोळे मिटून स्वस्थ बसणारा धर्म हा पशूंचा धर्म होय. हिंदुलोकांचा धर्म म्हणजे मसाल्याचा चिवडा. फक्की मारताच प्राणाशी गाठ! याला चिवडा म्हणण्यापेक्षा भिक्षुकी पिठ्यातला बेवडा म्हटले तर जास्त शोभेल.

स्मृति पुराणोक्त सैतानशाहीने आपल्या निर्भेळ वर्चस्वासाठी हिंदुसमाजात बेकीचा एवढा भुई सुरुंग पेरून ठेवला आहे, की धर्म, धर्मप्रेम आणि धर्माभिमानी यांच्या कल्पना स्वप्नातही कोणाला दिसू नयेत.

महाराष्ट्रातील भिक्षुकशाही पार जमीनदोस्त नामोहरम होईपर्यंत येथे कसलाच विवेकवाद जीव धरणार नाही. किंवा बहुजनहितवादाचे कसलेच

व्यापक कार्य यशस्वी होणार नाही.

आजच्या हिंदुसमाजाचे खरेखुरे चित्र हे असे आहे.

एक मोठा थोरला हाडाचा सापळा अस्ताव्यस्त पडला आहे. त्याचे मांस ठिकठिकाणी हाडाच्या आधाराने कसेबसे चिकटून आहे. सर्वांगावर जातिभेदाची पिकलेली गळवे असून, त्यातून जातिद्वेषाची भिकार द्वैताची लस व पू व रक्त थबथब गळत आहे. पोटातील आतडी कुजून प्राणवायूच्या आभावाने सुकी बनली आहेत. हृदयात अस्पृश्यतेचे करट माजल्यामुळे त्याची क्रिया चटकन् केव्हा बंद पडेल याचा नेम नाही. काळजाला मुर्दाड भिक्षुकशाही जळवा झोंबल्याने, त्यांच्या दंशाने न्युमोनिया दिवसेंदिवस बळावत आहे. मस्तकात पापपुण्याच्या कल्पनांचे भले मोठे छिद्र पडल्यामुळे मेंदूत यमपुरीतील बाहुल्यांचा थयथयाट सुरू आहे. डोळ्यांच्या भगदाडात वेदोक्त पुराणोक्त ऊर्फ ब्राह्मणांच्या जन्मप्राप्त श्रेष्ठतेच्या व ब्राह्मणेतरांच्या जन्मप्राप्त नीचतेच्या भरीव शिसवी खुंट्या जाम ठोकून बसवल्या आहेत''

*(केशवराव ठाकरे, प्रस्तावना 'आर्य समाजाचा संदेश' लेखक तुंगार).*

'साऱ्या संस्कृत जगाच्या दृष्टीने हिंदू हा एक तिटकाऱ्याचा विषय होऊन बसला आहे'

*(बॅरिस्टर मुकर्जी).*

'सामाजिक सुधारणेच्या प्रत्येक चळवळीला ब्राह्मण वर्गाने कसून विरोध केला आहे. ब्राह्मण हा समाज क्रांतिकारक होऊ शकत नाही.'

*(जयप्रकाश नारायण)*

''**हे भीषण, बीभत्स अमंगल हिंदुधर्मा** : तुझ्या आज्ञेने आज शेकडो वर्षे स्मशानभूमीत आम्ही जी क्षौरे केली, डोळ्यातून पाणी गळत असता कणकीचे गोळे करून जे प्रेताच्या अनेक भागावर ठेवले, क्रव्यादाग्नीच्या भयाण ज्वालाभोवती मातीच्या गळत्या घागरी डोक्यावर घेऊन ज्या प्रदक्षिणा घातल्या व उत्तरीने गळ्यात दगड बांधून घेऊन व तोंडाला हात लावून तुझ्या नावाने काढू नये तसले जे ध्वनी काढले, त्या सर्वांबद्दल तू आम्हास काय दिलेस ?

निर्दय वंचका ! जबरदस्त पंचाक्षऱ्याप्रमाणे आम्हा साऱ्या अज्ञ लोकांस त्वा मारून टाकून केवळ गुलाम केले असल्यामुळे आज कित्येक युगे अगदी अशक्य गोष्टी शक्य मानीत आलो. व अत्यंत निंद्य कृत्ये वंद्य मानून तुझ्या संतोषाकरता ती बेलाशक करीत आलो ! पण ध्यानात ठेव, तुझ्या अश्लाघ्य

निर्घृण वर्चस्वाचा अंत होण्याचा काल अगदी समीप येऊन ठेपला आहे. आजपर्यंत त्वा आम्हास ज्या असह्य यातना भोगण्यास लावले आहेस व जी अनन्वित कर्मे आम्हाकडून करवून घेतली आहेस, त्या सर्वाबद्दल तुझी पाळेमुळे खणून काढून विचारकुंडात पेटलेल्या प्रचंड अग्नीच्या कल्होळात तुझी आहुती देणाऱ्या नवीन ऋत्विग्वर्गाचा अवतार नुकताच झाला आहे. आमच्या सर्व शरीरभर कांचत असलेले तुझे पाश काढून घे' नाहीतर भरतखंडात तुझे नाव देखील राहणार नाही. पाच हजार वर्षापूर्वी या हिंदुधर्माने तेहतीस कोटी देव जन्माला घातले. आकाशाच्या पलीकडे स्वर्ग नरकाच्या वसाहती स्थापल्या. पाप पुण्याच्या हजारो भ्रामक कल्पना प्रसृत केल्या - अस्तित्वात नसलेल्या परलोकांवर दृष्टी ठेवून इह लोकीचे जीवन माणसाने जगावे असल्या खोट्या तत्त्वज्ञानाची निर्मिती करून या धर्माने खऱ्याखुऱ्या जीवन मूल्यांचा सामान्य मनुष्याला फारसा विचारच करू दिला नाही."

*(आगरकर : व्यक्ती आणि विचार ले. वि. स. खांडेकर)*

**'सर्व असमानतेचे मूळ चातुर्वर्ण्य आहे'** : हिंदुधर्माने कोणाचे कल्याण केले असेल तर ते आहेरेंचे ! देवांच्या दलालांचे ! हिंदुधर्माचा पायाच मुळी असमानतेवर आधारलेला आहे. जात हे हिंदूंच्या हानीचे मूळ कारण आहे. ब्राह्मणी धर्माचा आत्माच विषमतेचा आहे. अस्पृश्यता सांगणारा धर्म जगात दुसरा मिळणार नाही. हिंदूंची दर एक जातीमध्ये चिरेबंदी भिंती घालून विभागणी करण्यात आली आहे. हिंदुधर्मात शांती नाही. एकी नाही. घंटा वाजवणे, पूजा करणे आणि भटाला दक्षिणा देणे एवढेच या धर्माचे कार्य. जणू काय भटाच्या बापाचे ऋण फेडणे होय. हिंदुधर्मात देव, आत्मा याला जागा आहे. पण मनुष्याच्या जीवनाला नाही. जोपर्यंत हिंदुधर्म आहे. तोपर्यंत महारवाडा, मांगवाडा हे राहणारच.

कृष्णाने गीतेत काय सांगितले आहे ?

'मारा हत्या करा.' गरीबांच्या उद्धाराकरता काय सांगितलं आहे ?

'महाजनी येत गतः सपन्थः.'

ही परप्रत्ययनेची बुद्धी सोडून विवेकाने जो मार्ग आपणास योग्य वाटेल त्याच मार्गाने जा.'

हिंदुधर्म सुधारला जाईल हा एक भ्रम आहे. जो पर्यंत तो पाळला जात आहे तो पर्यंत या देशातून सामाजिक विषमतेचे उच्चाटन होणार नाही.

हिंदुधर्माने बौद्धिक पातळीवरून कितीही उदात्त तत्त्वाचा घोष केला तरी त्याचा आचार हा वर्ण, जातपात, स्पृश्यास्पृश्यता असल्या विषमतेचाच असतो.

*(डॉ. बाबासाहेब आंबेडकर)*

श्रीकृष्णाने गीता सांगितली. पण श्रीकृष्ण हा राजघराण्यातला होता हे विसरून चालता येणार नाही. ज्या वर्गातला तो होता त्या वर्गाच हित त्यानं पाहिलंच आहे. त्याने वर्णाश्रम धर्माला मान्यता दिली. स्वत:ला देव बनवलं. गीता ईश्वरप्रणीत करून टाकली. म्हणजे त्यातील आज्ञेबद्दल कोणी शंका घेता कामा नये. मग आपल्याला हवे ते डोस पाजले. ईश्वरी सत्तेचं इंजेक्शन देऊन, त्याची बुद्धी मारली. राजा व धर्मगुरू यांनी गट्टी करून श्रमजीवी अज्ञानी समाजाला सामाजिक, धार्मिक, आर्थिक पाशात कायमचे अडकवून या ईश्वराच्या अंशानीच मनुस्मृतीकारांचे कायदे अंमलात आणले.

श्रीकृष्ण हा हुकूमशहाच होता. हिंसक प्राण्यांना त्यानं देव बनवलं. हाणामारीला प्रवृत्त केलं.

गीता, रामायण, महाभारत आणि मनुस्मृती हे आमचे धर्मग्रंथ! रामायण-महाभारतातील भाकड कथांनी व असंभाव्य गोष्टींनी लोकांवर भुरळ पाडली. चमत्कारांनी लोकांना चकवले.

ज्या यांनी नीतीला फाटा दिला ते आमचे आदर्श पुरुष! काहीही, कसेही वागले तरी हे पूज्य. तेच नव्हे तर अनीतीचं आचरण करणारे त्याचे गोडवे गाणारेही पूज्य!

**श्रीकृष्ण परमात्मा!** : बालपणापासून चोरीची वृत्ती! दही, दूध, लोणी चोरताना थोर थोर चित्रकारांनी काढलेली चित्रे आमची व लहान मुलांची मार्गदर्शक! नीतीचं प्रात्यक्षिक! ती आमच्या देव्हाऱ्यावर!

लग्नाची बायको रुक्मिणी असताना राधेशी रममाण होणारा, लग्नाच्या बायकांनी पूजा करण्यासाठी समोर ठेवायचा व त्याला आदर्श मानून पतिराजांनी व्यभिचार करायचा! अन् 'राधाकृष्ण', 'राधाकृष्ण' म्हणून भावभक्तीच्या धुंदीत नाचायचे! ती राधा अपुरी म्हणून सहस्त्रनारींशी बिनदिक्कत क्रीडा करायची! याच्या पावलावर पाऊल टाकून आधुनिक साधु महाराजांनी व अवतारांनी अनेक राधांचा मेळावा जमवून शाक्तपंथी सात्विक क्रीडा करायची! आणि आमच्यासारख्या महामूर्खांनी सहस्त्रनारी भोगून विरक्त असलेल्या महाराजांच्या चरणी भक्तिभावे मस्तक ठेवायचे!

नदीस स्नानास गेलेल्या गोपींचे वस्त्रहरण करून कदंबाच्या वृक्षावर बसून गोपींचे नग्न सौंदर्य पाहणारा श्रीकृष्ण भगवान आमचं पूज्य दैवत ! ते तसे नव्हे म्हणून त्याचा निराळा अर्थ काढणारी अध्यात्मवादी, समोर ठेवलेली चित्रे खोटी म्हणून सिद्ध करायला व नवीन गीतार्थ ग्रंथ तयार करायला बुद्धी खर्चतातच !

जे डोळ्यांपुढं दिसतं त्यावर टीका केली, तर भाविकांचा बेअकली तांडा, काय हे असं लिहावं या लेखकांनी ? म्हणून 'आमच्या भावना दुखावल्या म्हणून, पांचजन्य करायला तयार आहेतच !

कृष्णाने म्हणे गोवर्धन पर्वत नुसत्या करांगुलीवर उचलून धरला ! आश्चर्यचकित होऊन या अचाट कृत्याबद्दल घाला लोटांगण त्या रंगीत चित्रासमोर ! शंका काढाल तर पुढच्या जन्मी नरकात जाल. म्हणून गीतेचा उपदेश आहे, 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्'. धर्मग्रंथात, पुराणांत जे सांगितलं आहे ते ते खरं म्हणून मुकाट्यानं मान डोलवा !

माणसाची उपजत असलेली अक्कल शिल्लक ठेवली आहे काय या पुराणांनी आणि देवांनी ! दगडाच्या रूपात असलेल्या या देवांनी जिवंत माणसाचा दगड बनवला आहे.

या कृष्णाची राजनीती !

किती वर्णन करावं याच्या हुषारीचं. म्हणजे कुटिल कारस्थानाचं ! मायकेव्हेलीनं तोंडात बोट घालावं व हरलो म्हणून शरणचिठी द्यावी !

हे गृहस्थ कौरव-पांडवाच्या भांडणात स्वस्थ बसले असते अन् आगलावेपणाचा धंदा केला नसता, यादवीला प्रोत्साहन दिलं नसतं तर भारतीय युद्ध टळलं असतं. पण 'काके माम्यांची हत्या नको, ते राज्य नको, तो राज्योपभोग नको' म्हणून हत्येपासून परावृत्त होणाऱ्या सत्प्रवृत्त अर्जुनाला, या स्वारीनं युद्धाला प्रवृत्त केलं व सहस्रावधी लोकांचा यांच्यातील भाऊबंदकीसाठी बळी घेतला.

'नरो वा कुंजरोवा' असं धर्मराजाला बोलायला लावून अश्वत्थाम्याचा बळी घेतला !

एकलव्याचा आंगठा कापून द्रोणाचार्यांनी वन्य समाजातील शूर नेत्याला दुर्बल करून अर्जुनाला कुटिल नीतीने सहाय्य केले.

हे श्रीकृष्ण गीतेचे निर्माते ! आहेरे वर्गाचे प्रवक्ते ! आत्म्याचे अमरत्व प्रतिपादून जिवंत माणसाला मरायला व मारायला प्रवृत्त करणारे ! जगत् शांतीचे पुरस्कर्ते ॥

**अन् श्रीराम :** सर्वांसमक्ष सीतेला मांडीवर घेऊन बसणाऱ्या रामपंचायतन प्रतिमेची आम्ही भक्तिभावे पूजा करायची? या परमेशाचं अनुकरण तुम्ही जाहीरपणे केलं तर पोरं दगड मारायला लागतील तुम्हाला-

एका परिटाने सीतेच्या पावित्र्याची शंका घेतली म्हणून शंका घेणाऱ्याचं समाधान करण्याकरता खऱ्याखोट्याची चौकशी न करता स्वारीनं आपल्या गर्भवती सहधर्मचारिणीचा त्याग केला. म्हणून नैराश्याने तिने जमिनीत गाडून घेतले ! हे रामाचे पत्नीप्रेम !

राम, सीता व लक्ष्मण वनवासात रहात असताना त्याने रावणाच्या बहिणीचे नाक कापले ! ही युद्धनीती, हे स्त्रीदाक्षिण्य !

शूद्राने धर्मग्रंथ वाचला ही ब्राह्मणाची तक्रार ऐकून या ब्राह्मणधार्जिण्या रामाने त्या ब्राह्मणाला खूश करण्याकरता शूद्राला ठार मारले ! तो हा काय ब्राह्मणेतरांचा पाठीराखा !

वाली आणि सुग्रीव यापैकी एकाची बायको दुसऱ्याला देऊन त्याचा बाणाने घात करणारा काय एक पत्नीव्रती ! अन् हेच काय गांधीजींच्या स्वप्नातलं रामराज्य ! राम, राम, हरे राम !

*भिल्लीणीच्या मागे लागलेला शंकर हे आमचं दैवत !*
*ती ही आमची पुराणे ! व हे पूजनीय देव बापे !*

★ ★ ★

"पुराणे हे बाष्कळ ग्रंथ आहेत, समाजनेता व धर्मनेता जो ब्राह्मणवर्ग त्याच्या विद्या, समाजप्रगतीला विरोधी आहेत. परंपरागत धर्माचे वेड माजून आम्हा भारतीयांचा अध:पात झाला आहे. नीति, सदाचार, धर्म, आणि भक्ती यांजवर माती टाकून स्थलांचे नद्यांचे व महिम्यांचे कथन करून सदाचरणावरील सद्बुद्धी आणि त्याचे महत्त्व अगदी उडवून दिले. मनास येईल ते लिहिले. कावेरी महात्म्य, करवीर महात्म्य, अग्निपुराण, गणपतिपुराण वगैरे लिहून ब्राह्मणास पैसे मिळवण्याची तजवीज केली. साधू बैरागी महंत यांचे प्रस्थ वाढवले. जिवंत लोकास सुखी करण्याचे सोडून यात्रा जत्रा याचे महत्त्व वाढवले. *(लोकहितवादी)*.

'जोपर्यंत जनता ही या पुरोहितशाहीच्या वर्चस्वाखाली आहे तोपर्यंत या देशात लोकशाहीची वाढ होणार नाही' (स्वामी धर्मतीर्थ)

ऋषींनी वेनराजाला ठार मारला आणि त्या जागी त्याचा मुलगा पृथु याला गादीवर बसवला आणि त्याने 'ब्राह्मणांना शिक्षा करायची नाही आणि मिश्रविवाह करू द्यायचे नाहीत' असे वचन घेतले. ही पुरोहितवर्गाची लोकशाही !

● 'हिंदूंची समाजरचना हजारो वर्षे विषमतेवर स्थिर झाली. तिच्यात क्रांती करण्याचे सामर्थ्य हिंदू संस्कृतीत निर्माण झाले नाही. चातुर्वर्ण्याची आणि वेद प्रामाण्याची चौकट कोणासही मोडता आली नाही. याचा परिणाम असा झाला की संस्कृतीचा विकास थांबला. परकीय संस्कृतीचा प्रतिकार करण्यास अथवा त्यांना आत्मसात करून त्यात स्वत:ची भर घालण्याची तेजस्विता नष्ट झाली.'

*(आचार्य शंकरराव जावडेकर)*

**आणि आमचे संत रामदास व ज्ञानेश्वर** : उच्च वर्णियातील विद्वत्तेचे शिरोमणी - रामदास तर पक्के जातिवादी, चातुर्वर्ण्याचे कट्टे पुरस्कर्ते व संरक्षक ! अस्पृश्यांचे वैरी. हे काय म्हणतात ?

● 'अंतरात्मा सगळ्यांचा एक असला तरी महारांना बरोबर घेऊ नये' असे स्पष्ट सांगतात. जातिभेद व अस्पृश्यता ह्यांना ते कसे मान देतात ह्या विषयीची त्यांची विसंगती अतर्क्य आहे ! शंकराचार्यात हीच विसंगती आहे... चातुर्वर्ण्य परत येणे अशक्य आहे. दुसरी समाजव्यवस्था आणली पाहिजे. हा विचार मात्र रामदासांच्या अथवा वैदिक धर्माभिमान्यांच्या लक्षात गेल्या हजार बाराशे वर्षात कधी आलाच नाही ।।

रामदास म्हणतात-

'अंतरे येक तो खरे, परी सांगाती घेऊ नयेत म्हारे'

*(आचार्य भागवत)*

ते रामदास संत ! ! पूज्य ! त्यांना त्यांच्या अभिमान्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांचा गुरू केलं ! जणू त्यांच्या उपदेशाने व मार्गदर्शनाने महाराष्ट्र राज्याची स्थापना केली !

शिवाजी महाराजांना लौकिक प्रतिष्ठा सहन होईना. म्हणून ज्या वर्गाने

त्यांच्या राज्याभिषेकाला विरोध केला त्यांची पुढे कपोलकल्पित 'गोब्राह्मण प्रति पालक' हे विश्लेषण शिवछत्रपतींना चिकटवून पुन: त्यांच्या जिवावर आपलं महत्त्व वाढवलं व टिकवलं. सर्व धर्मियांना सारखं लेखणाऱ्या छत्रपतींना मुसलमान द्वेष्टे अशी कथानके रंगवून त्यांना हिंदू धर्माचे खास पक्षपाती बनवले !

**'शिवाजीचं राज्य निधर्मीच होतं'** : या मुंबई युनिव्हर्सिटीपुढे नोव्हेंबर १९७१ मध्ये वाचलेल्या निबंधात शिवाजी युनिव्हर्सिटीचे कुलगुरू डॉ. आप्पासाहेब पवार यांनी खालील एका पत्राचा उतारा वाचून दाखवला. त्यात छ. शिवाजी महाराज औरंगजेबाला पाठवलेल्या पत्रात म्हणतात,

'ईश्वराने सर्व जग निर्माण केलं. आणि त्यात राहणाऱ्या छोट्या मोठ्या कोणाला, अकबर व जहांगीर यांनी त्यांच्या धर्माचा व धर्ममताचा विचार करून छळलं नाही. ईश्वरासमोर हिंदू व मुसलमान सारखेच आहेत. म्हणून धर्माभिमान टाकून तुमच्या नोकरीतील सर्वांना प्रेमाने वागवा.'

असं पत्र लिहिणारा मुसलमानाचा द्वेष्टा अगर केवळ हिंदुधर्माचा अभिमानी कसा राहू शकेल? सुरुवातीला तर त्याला आपल्या जातीविरुद्ध लढावे लागले. तसंच.

'गोब्राह्मण प्रतिपालक' हे विशेषण त्याने स्वत: मागे केव्हाही लावून घेतले नव्हते. तसा उल्लेख कुठेही मिळत नाही.

*(डॉ. पवार)*

शिवाजी महाराज मुसलमान पीरांस भजत. दर्ग्यास मानीत. स्वारीच्या वेळी त्यांनी पाटगावच्या मौनी महाराजांचा आशीर्वाद घेतला, तसा कोकणातील स्वारीमुळे केळशी जवळील 'बाबा याकूब' या अवलियाचाही घेतला. शिवाजी महाराज यांचे वडील शहाजी महाराज व चुलते शरीफजी हे एका अवलिया पीराच्या प्रसादाने झाले, या समजुतीने त्यांची नावे मुसलमानी ठेवली. तेच संस्कार शिवाजी महाराजांवर झाले होते. ते मुसलमान द्वेष्टे नव्हते.

ते छत्रपतींचे बनवलेले गुरू इतर समाजाला कसे लेखतात ते पाहून घेण्याजोगे आहे. म्हणजे हे रामदास कोणाचे गुरू ते स्पष्ट होईल. आपल्या ब्राह्मण जातीची महती गाण्यात या संताला मनाची किंवा जनाची जराही लाज वाटली नाही ! हे संत (?) म्हणतात.

*'गुरू तो सकळाशी ब्राह्मण। जरी तो झाला क्रियाहीन।*
*तरी तयासीच शरण। अनन्यभावे असावे॥*
*ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत।*
*पूर्ण होती मनोरथ। विप्र वाक्ये करूनी॥*
*असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथे मानव बापुडे किती॥*
*जरी ब्राह्मण मूढमति। तरी तो जगद्वंद्य॥*
*अत्यंजे शब्द ज्ञाता बरवा। परि तो नेऊन करावा।*
*ब्राह्मणा संन्निध पुजावा। हे तो न घडे कधी॥*

आपल्या पवित्र उक्तीला रामदासांनी, कोणी शंका काढील, विरोध करील म्हणून ईश्वराचं सँक्शन घेऊन टाकलं ! सर्व मानव ब्राह्मणाचे गुलाम अन् देवही ताबेदार ! कारण यांनीच निर्माण केलेलं बाहुलं ते ! वाटेल तसं नाचवावं! रामदास ईश्वराचे बोल बोलतात.

'भेद ईश्वर करोनि गेला। तो त्या वाचेनि नव्हेच मोडला। मुखामध्ये घास घातला। तो आपानी घालावा ?'

*(रामदास)*

अत्यंजाबद्दलचे हे प्रेम (?) असह्य झालं म्हणूनच पुण्यस्मरण बाबासाहेब आंबेडकरांनी हिंदुधर्माचा त्याग केला.

हीच उक्ती गिरीच्या शंकराचार्यांच्या (अपानद्वारे नव्हे) मुखाद्वारे बाहेर पडली. जनसंघाच्या गोळवलकर गुरुजींनी ती उचलून धरली !

● "रामदासांनी विषमता व जातीय दुरभिमान शिकवला. सडून चाललेल्या समाजाला प्रगतीचा मार्ग रामदास अथवा कोणीही संत दाखवू शकला नाही.

ज्ञानेश्वर हा जातिविरोधी होता असे सांगितले जाते पण तेही खरे नव्हते. ब्राह्मणाने घरी महारा जेवणे अयोग्य होय अशा अर्थाचे त्यांचे वचन आहे."

*(आचार्य भागवत)*

हा अनुभव आल्यामुळेच स्वामी विवेकानंद म्हणतात-

● 'ज्या ज्यावेळी ब्राह्मणांनी काही लिहिलं त्यावेळी त्यांनी इतरांच्या

हक्कास विरोधच केला आहे. व्यासाने तर वेदाच्या अर्थाला कलाटणी देऊन शूद्रांना ठकवण्याचाच प्रयत्न केला आहे.

(स्वामी विवेकानंद)

तुकारामांनाही त्याचा जातिवाद चांगलाच भोवला होता. म्हणून उच्चवर्णियांना त्यांनी चांगलीच थप्पड मारली आहे. ते म्हणतात -

*'महारासी शिवे। कोपे ब्राह्मण तो नव्हे।।*
*तया प्रायश्चित काही। देह त्याग करता नाही।।*
*तुम्ही नका करू गर्व। उंच जाती मिळूनी सर्व।।*
*शुक्र शोणिताच्या खाणी। तुम्हा आम्हा एकच योनी।।*

*महाराष्ट्राचे एकमेव नेते व राज्यकर्ते* **यशवंतरावजी चव्हाण** *याच जाणिवेतून म्हणतात-*

● *'हिंदुस्थानमध्ये जातीच्या व धर्माच्या ज्या जुन्या परंपरा आहेत त्यांनी सामाजिक क्रांतीला पराभूत केलं आहे म्हणून हिंदुस्थान दुबळा झाला आहे.'*

*मी हिंदुधर्माविरुद्ध इतकी शाई खर्चली आहे याचा अर्थ, इतर धर्मावर माझं प्रेम आहे असे नव्हे. (एक बुद्ध धर्म वगळता.) पण सर्व धर्माहून हिंदुधर्म काळाकुट्ट आहे. त्याज्य आहे. गचाळातला गचाळ आहे. त्या धर्माची मला लाज वाटते. त्यात राहणं मला पाप वाटतं. ज्या धर्माने वर्णाश्रमाच्या नावाखाली हजारो जाती पाडून ब्राह्मणाला श्रेष्ठत्व दिलं! माणसासारख्या हिंदुधर्मातल्याच माणसाला, अस्पृश्य लेखून जनावराहून हीन दर्जा दिला. अन् माणुसकीला काळोखी लावली. जगात हिंदुस्थानची नाचक्की केली. इतका हीन धर्म जगात दुसरा आढळणार नाही.* ***म्हणून मी हिंदू धर्म टाकून दिला. आणि तेवढ्यापुरतं त्या पापातून मुक्त झालो.***

*हिंदू हा एक आहे काय? तू कोण म्हणून विचारलं तर मी हिंदू म्हणून चालत नाही; मी ब्राह्मण, मी मराठा, मी अस्पृश्य! पुन: अस्पृश्य एक नव्हे, अस्पृश्य पण कोण? महार, मांग, चांभार, ढोर, भंगी. ब्राह्मणातही कऱ्हाडे, देशस्थ वगैरे, तो हा हिंदू कधीतरी संघटित होईल काय? इतर धर्मात अशा जाती, पोट जाती नाहीत; तथापी हिंदू धर्मामुळे त्यांच्यातही जातिभेदाची लागण झाली आहे. जैन लिंगायत हिंदुधर्मातील जातिभेद काढून टाकण्याकरता निर्माण झाले. तेही जातिवादी झाले आहेत. हिंदुधर्माचा सहवाससुद्धा विषारी आहे.*

# अहिंसा परमो धर्मः

**"Thou Shalt not kill." :** ".... Attempts to abolish violence by violence neither have in the past nor evidently can in the future emanicipate people from violence."

*- Tolstoy*

कोणत्याही पापाचा प्रतिकार, अन्यायाचा सूड, मग तो व्यक्तीचा असो, समाजाचा असो, किंवा देशाचा असो; तो हिंसेच्या उपायाने उगवल्यास त्याचे फल अपेक्षेप्रमाणे मुळीच पदरात पडत नाही. उलट त्या यशात अपयशच पदरात पडते. अनुभव हीच साक्ष पटवतो.

**हिंसेचा अनुभव :** दंतकथेकडे पहा, इतिहासाकडे पहा, किंवा अगदी चालू परिस्थितीकडे पहा, हाच पडताळा घडोघडी पटतो ! रोजच्या किरकोळ व्यवहाराकडे पहा, हाच अनुभव मिळतो.

याकरिता काळीकुट्ट अशी ठळक उदाहरणेच घेऊ.

रामायणातील गोष्टीकडे पहा. रावणाने सीतेला पळवली. या त्याच्या कृत्याबद्दल त्याला पारिपत्य करणे योग्यच होते. पण त्याची खोड काढण्याकरिता वानरसेना तयार केली. रामाच्या बाजूने वीर पुढे सरसावले. रावणाचा पाडाव झाला. पण लाखो निरुपद्रवी अज्ञान वानरे प्राणास मुकली ! दोन्हीकडचे शूर योद्धे धारातीर्थी (?) पडले ! कित्येक सैनिक मेले ! हनुमानाने लंका जाळून, पोळून उद्ध्वस्त केली ! घरभेदीपणा करावा लागला !!

राम-रावणाच्या व्यक्तिविषयक वैराचा विचार टाकून, अखिल मानवजातीचा विचार करू लागलो तर किती नाहक संहार झाला हा ! पापाचे प्रायश्चित्त रावणाला मिळाले खरे; पण किती निरुपद्रवी प्राण्यास जिवे मुकावे लागले !!

भारतीय संग्रामात तोच प्रकार झाला. भाऊबंदकीच्या भांडणाने केवढे विराट स्वरूप धारण केले. पांडवांची बाजू पूर्ण सत्याची असेल. कौरव अगदी नीचवृत्तीचे असतील. पण युद्धाच्या उपायाने त्यांचे पारिपत्य झाले काय ? पांडवाना खरोखरीच जय मिळाला काय ? दोन्हीकडचे मिळून अठरा अक्षौहणी सैन्य गारद झाले ! सत्यासाठी म्हणून काकेमामे, आप्तेष्ट, गुरुजन यांना ठार मारावे लागले. एका पापासाठी दुसऱ्या पापांचा ढीग रचला. ही लढाईनंतरची स्थिती जेत्यांना तरी आनंददायक वाटली असेल काय ? हिंसामार्गाचे प्रायश्चित्त त्यांना तेथेच भोगावे लागले.

पानपतसोनपत युद्ध झाले. मराठेशाहीने अभूतपूर्व पराक्रम केला.

इतिहासात अजरामर नाव करून ठेवले. पण त्याच वेळी किती बांगड्या फुटल्या ? किती वृद्ध मातापितरांचा आधार तुटला ? किती घरे ओस पडली ? किती खुर्दा रंगभूमीवर विस्कटला ? याची मोजदाद केली तर जीव चर्र होतो.

जर्मन युद्धात कुणाच्या खुनाचा सूड कुणावर उगवला कोण जाणे ? एक खुनासाठी करोडो खून पडले. देश उद्ध्वस्त झाले. राष्ट्राचे धन दारूत उडून गेले. सर्व जगाचे आर्थिक तसेच नैतिक दिवाळे निघाले. त्यातून अद्याप वर डोके निघत नाही. तो संहार भरून येत नाही. बुडलेले धंदे अद्याप वर येत नाहीत. बेचिराख झालेल्या देशांची अद्याप सावरासावर होत नाही. कर्जातून सुटका होत नाही. शत्रू त्यावेळी नामोहरम झाला, पण वैर गेले नाही. तात्पुरती वरकरणी शांतता स्थापन झाली; पण द्वेष आत खोलपर्यंत मुरला गेला. सर्व गोष्टींचा मनात विचार आला म्हणजे नको ते युद्ध, नको ते वैर, नको तो संहार, नको ती जयाची पापी माळ असे वाटू लागते.

व्यक्तीची गोष्ट घेतली तरी पण तोच अनुभव येतो. व्यक्तीचा वाकुडपणा व भावांची भाऊबंदकी दोघांना पुरी भोवल्याशिवाय राहात नाही. हिंसेच्या उपायाने कोणाचाही फायदा झालेला नाही.

**जशास तसे** : शब्दाने शब्द वाढतो, 'अरे तर कारे' जबाब मिळतो. बाचाबाचीने लठ्ठालठ्ठी, धक्काबुक्कीने डोकेफोडी, आणि अखेर खून ! खुनाची परतफेड दुसऱ्या खुनात आणि नंतर सर्व घरादाराचे वाटोळे कज्जेदलालीत ! केस जिंकली; पण जिदगी गेली. केसच्या निकालाबरोबर जमीनजुमल्याचा , पै पैक्याचा निकाल लागला ! सूड उगवला पण पोरे देशोधडीस लागली. वकील व सरकारची धन झाली. घराचे वाटोळे, घराण्याची अब्रू, पैशाचे दिवाळे निघून, भांडणारे लोकांच्या उपहासास पात्र झाले. वाकुडपणाने, धमकीने, बळाच्या उपायाने भांडणे केव्हाही मिटलेली नाहीत. उलट ती वाढत गेली आहेत.

"Do unto others that which you wish others to do, unto you"

वाकूडपणा नको, भांडणे नकोत, युद्ध नको, तर या गोष्टी स्वतः करण्याच्या टाकून द्या. शत्रूला जिंकण्याचा हाच एक मार्ग आहे. विस्तवाने आग शांत होत नाही. त्यावर थंड पाणीच टाकले पाहिजे.

"Love your enemies and your will have none."

शत्रूवर प्रेम करू लागा, म्हणजे शत्रू नाहीसे होतील.

या इतक्या कटु अनुभवानंतर तरी जगाने आपली चूक सुधारायला नको काय ? आलेल्या अनुभवावरून 'एका थोबाडीत मारली तर दुसरा गाल पुढे कर'

हाच उपदेश पूर्ण व्यवहारी ठरत नाही काय? या उपदेशाची थट्टा केली, तो अव्यवहारी ठरवला म्हणूनच ना हा आत्मनाश झाला !

**महान् योद्धा. :** "The greatest conqueror does not wage war."

*Laotze.*

खरा जेता युद्धाशिवायच जिंकत असतो. शत्रू हा तरवारीने केव्हाच जिंकला जात नाही. प्रेमाने मात्र तो गुलाम होऊ शकतो. अपकारास उपकार हे शत्रू निर्दालन करण्याचे अमोघ अस्त्र आहे. प्रेमाच्या अस्त्रापुढे कुणाचा टिकाव लागू शकत नाही. हे अस्त्र अजिंक्य आहे. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात-

"क्षमा शस्त्र जया नराचिये हाती।
दुष्ट तयाप्रति काय करी॥

प्रेमाने माणसांना तर जिंकता येईलच; पण पशुपक्षीसुद्धा प्रेमाने गुलाम बनतात. आपला जातिस्वभाव विसरून जातात; दगडासारखे कठीण लाकूड पोखरणारा भुंगा कमलाच्या पाकळ्यात अडकून पडतो; त्या कोमल पाकळ्या तोडण्याचे धारिष्ट त्याला होत नाही. आपल्या तीक्ष्ण पात्याने हजारो शिरे उडवणारी तरवार, पोलादी आघाताने न फुटणारी कणखर फत्तरांची खाण, पाण्याच्या प्रेमळ ओघापुढे दुभंगते; तरवारीचे तीक्ष्ण पाते बोथट होते. वाऱ्याने हलणाऱ्या पाण्यात एवढी ताकत कुठली आली ?

दरीकपाटी दडलेल्या श्वापदांना आपल्या गगनभेदी गर्जनेने सैरावैरा पळवणारा वनराज, मुरलीच्या प्रेमळ हाकेला वेडावून आपल्या सावजाचा सेवक होतो. त्याचे पाय चाटीत त्याला आपल्या शेपटीने कुरवाळतो. भयंकर विषारी नागसाप आनंदाने डुलू लागतो. पशुपक्षी वनचरे मनुष्याशी बंधुभावाने वागू लागतात. भूतमात्रे एकजीव होतात ! प्रेमाच्या जादूचा कोण हा दिव्य प्रभाव !

'भूतकृपा मोडी द्वेषकंद्। शत्रुमित्र पुत्र सम करी बंधु॥'

प्रेमाचे अस्त्रच असे अजिंक्य आहे. ते पशूंनाही माणुसकी देते, मग शत्रूला मित्र केल्यास नवल काय? प्रेम कुणाला जिंकणार नाही ! जगाला कर्दनकाळ वाटणारा रणगाजी प्रेमाच्या एका कटाक्षाने का जिंकला जावा ! दुथडी बेफाम वाहणाऱ्या गंगेचा ओघ, बेदरकार काटून जाणाऱ्या धाडशाला, आपल्या प्रियकरणीच्या नेत्रातून वाहणाऱ्या प्रेमगंगेस का ओलांडता येऊ नये ?

प्रेम ही काही जगातली और चीज आहे. ही ज्याला सापडली, तो जगाचा राजा झाला. त्याने जग निर्वैर केले. त्याला विरोध येऊच शकत नाही. कारण त्याची सत्ता प्रेमाची असते.

"... Not all the armies of all the Empires of earth can crush the Spirit of one true man, that one man will prevail."

- *Macswincy*.

तो दुष्टांना प्रेमाने सहज जिंकू शकतो.

म्हणून ख्रिस्त प्रभू म्हणतात 'जो खरा सेवक होतो, तोच सेनापती होऊ शकतो.'

तो दुष्टाचे शासन जीव घेऊन करीत नाही. जीव देऊन करतो. मारून सूड उगवत नाही. आत्मबलिदानाने त्यांना नवी दृष्टी देतो. हत्या न करता, रक्ताचा थेंबही न पाडता, शत्रूला जिंकतो. पाशवी सत्तेशिवाय हुकमत चालवतो.

**नंगा फकीर पण बलाढ्य :** हा वीर बाहेर दिसायला 'नंगा फकीर' असा दिसला तरी जगाला अंकित करण्याची अद्भुत शक्ती त्या निर्जीव दिसणाऱ्या देहात तो बाळगत असतो. बंदिगृहात असला तरी महा बलवान् असतो. कारण त्याची सत्ताच मुळी झाकलेली असते ! त्याच्या अस्त्राचा मारा अंगाला ओरखडत नाही; पण हृदयच काबीज करतो.

ख्रिस्त प्रभूंनाही हा ठेवा सापडला म्हणून त्यांनी जगावर राज्य केले. मानवतेच्या प्रेमासाठी केलेल्या आत्मयज्ञाने त्यांनी जगाला अंकित केले म्हणूनच आजही त्यांच्या नावाचा उच्चार होताच दुनियेची मान भक्तिभावाने खाली होते.

आपल्या देशबांधवांच्या प्रेमासाठी आत्मबलिदान करणाऱ्या 'वीर मॅकस्विनीने' आयर्लंडच्या मागणीकडे जगाचे डोळे लावले. मनुष्य एकच ! क्रांतीकारकांच्या शेकडो खुनांनी जे काम केले नसते, ते एका सत्याग्रहीने करून दाखवले. या अहिंसामय सत्याच्या आग्रहात जगाचे बळ साठवले आहे.

**अहिंसेचा शिपाई :** अहिंसेचा शिपाई हा धैर्याचा मूर्तिमंत पुतळा असतो. प्रतापासारखा निधड्या छातीचा, धर्मासारखा पापभीरू, कर्णासारखा उदार, प्रल्हादासारखा सत्यनिष्ठ, भीमासारखा बलवान् असतो. धाव घेण्यास सज्ज असतो. मान देण्यास तयार असतो. नि:शस्त्र शिस्तीने ठाण मांडून उभा राहिलेला वीर जगाला भारी असतो.

याने शत्रूला भिऊन आपले शस्त्र खाली ठेवलेले नसते. तो बलवान पण अप्रतिकारी, शांत व धीरोदात्त असतो. त्याच्या शस्त्रागारात मानवतेच्या अत्युच्च गुणांचा साठा भरलेला असतो. तत्त्वासाठी नि:शस्त्र होऊन मरण्यास तयार झालेल्या देशास, निव्वळ पाशवी शक्तीवर जिंकणे ही साधी गोष्ट नाही. देशभक्तीच्या पवित्र भावनेने लढाईस उद्युक्त केलेला शिपाई, नि:शस्त्र पलटणींना कापून आपल्या मानवतेचा खून करण्यास कचरल्याखेरीज राहणार नाही. या पवित्र रक्तसिंचनाने

शत्रूच्या दडलेल्या पवित्र बंधुभावनांना प्रेमाचा उमाळा आल्याखेरीज राहणार नाही. नि:शस्त्र सैन्याच्या कत्तलीने साऱ्या जागत्या दुनियेच्या अंगावर या अमानुष हत्येचे शहारे येऊन जेत्यांची मान लज्जेने खाली होईल. आत्मयज्ञाने पावन झालेल्या त्या भूमीवर त्यांना पाय टाकण्याचे धारिष्ट होणार नाही. असे प्रसंग आले आहेत. आपण नि:शस्त्र लोकांवर गोळी झाडीत नाही, म्हणून सैनिकांनी संगिनी फेकून दिल्या ओहत - देव दानवांच्या युद्धात देवांचाच जय झाला आहे.

अहिंसा हे दैवी अस्त्र आहे. ही भ्याडाची पळवाट नव्हे. पळपुट्याचा आसरा नव्हे. 'शेंदाड शिपायाचा नथीतला तीर' नव्हे. ही सुळावरची पोळी आहे. आपल्या देहाची स्वखुषीची होळी आहे. वीरवृत्तीचे सार आहे. उच्च गुणाची अखेर आहे. हे येरा गबाळाचे काम नव्हे.

"अहिंसा हे प्रचंड शस्त्र आहे. तीत परम पुरुषार्थ आहे. ती भीरूपासून दूरदूर धावून जाते. ती वीरपुरुषाची शोभा आहे. त्याचे ती सर्वस्व आहे. नीरस किंवा जड पदार्थाप्रमाणे ती नाही. ती चैतन्यमय आहे. ही आत्म्याची विशेष गुण प्रगट करणारी आहे. म्हणूनच 'परमधर्म' म्हणून तिचे वर्णन करण्यात येत आहे. अहिंसेची वृत्ती म्हणजे नित्य नूतन स्फुरणारे व वृद्धिंगत होणारे शुद्धतर प्रेमच होय. या प्रेमापुढे वैरभाव टिकू शकत नाही; अहिंसारूपी प्रेम सूर्यासारखे असून वैरभाव घोर अंध:कारासारखा आहे" म. गांधी - स्वराज्य.

**अहिंसाविरोधी :** पण अहिंसाविरोधी म्हणतात :-

जोपर्यंत शत्रूचे मन बदलत नाही, तोपर्यंत हे उपाय व्यर्थ आहेत. तुम्ही नि:शस्त्र व अप्रतिकारी झाल्यास शत्रू तुमचा फायदाच घेईल. परधर्मीय व परदेशचे लोक जोपर्यंत तुमच्याबरोबर विश्वासाने वागत नाहीत, जोपर्यंत ते शस्त्रास्त्रे टाकत नाहीत, चढाईचे धोरण टाकीत नाहीत, तोपर्यंत आपल्याला शस्त्रे टाकता येत नाहीत. तसे करणे आत्मघातकीपणाचे आहे. जगातील राष्ट्रे नि:शस्त्रीकरणाला उलट आहेत ती याचमुळे.

वरील विधान पुढे करताना आपण नि:शस्त्रांच्या बलाचा विचार करीत नाही. तसेच शत्रू म्हणून समजलेला, हाही आपल्यासारखाच मनुष्य आहे, त्यालाही अंत:करण आहे, हे विसरतो.

आपणच हातात तरवार घेतली आहे, आणि प्रतिपक्ष मरण्याकरिता एकामागून एक पुढे होत आहे, अशा स्थितीत तुम्ही तुमच्यासारख्या माणसांचे एकामागून एक गळे कापत सुटणार काय? तुमच्या हृदयाला केव्हाच का पाझर फुटणार नाही? आपल्या हृदयातच तेवढा उच्च मनोवृत्तीचा उदय होऊ शकतो व शत्रू म्हटला की त्याचे अंगी सर्व पशुतुल्यच गुण असायचे असे आहे काय? तीही

माणसेच आहेत. आपल्यावरून दुसऱ्या मनुष्याची पारख करावी; सर्वथा चांगला किंवा सर्वथा वाईट असा कोणीच नसतो.

शत्रूची मनोवृत्ती बदलल्याखेरीज, त्याच्या वागणुकीत बदल झाल्याखेरीज त्याच्यावर प्रेम कसे करता येईल असे म्हणणारे पुष्कळ आहेत. पण दोघे एकमेकांचे शत्रू असताना मित्रत्वाचा हात त्यापैकी कुणी तरी पुढे करायलाच पाहिजे. प्रत्येकाने दुसऱ्याची वाट पहात बसल्यास सख्य कसे घडून येईल? कोणीतरी आरंभ करायलाच पाहिजे.

**नि:शस्त्राचे बल :** बरे, नि:शस्त्र व अप्रतिकारी यांच्या बलाचा आपण विचारच करीत नाही. एका ठिकाणी मनुष्याचा जमाव जमला आहे. त्या समाजासमक्ष एका दांडग्या मनुष्याने एका निरुपद्रवी नि:शस्त्र मनुष्यावर हल्ला केला. तो बिचारा सर्व मुकाट्याने सहन करीत आहे. कसलाच उलट प्रतिकार करीत नाही. त्याला शिवी देत नाही. किंवा त्यांचा उगारलेला हातही पण धरत नाही. जीव जाण्याची वेळ आली तरी शांतता ढळत नाहीच. अशा गोष्टी समोर चालल्या असताना तो समाज स्वस्थ बसेल काय? तो साहजिकच त्या माणसाच्या अत्याचारास प्रतिबंध करील. नि:शस्त्रपणे आघात सहन करणाऱ्याकडे समाजाची सहानुभूती जाऊन, त्याचे बल आपोआपच वाढेल. आणि मग या शक्तीपुढे त्या दांडग्या मनुष्यास हार खावी लागेल. तो आपल्या कृत्याबद्दल खजिल होईल.

जी गोष्ट व्यक्तीची तीच राष्ट्राची. नि:शस्त्रपणे आघात सहन करणाऱ्या राष्ट्राचा नैतिक दर्जा वाढतो. त्याला जगातील राष्ट्राची सहानुभूती मिळते. उगाच हिंसा करणारे राष्ट्र आपली जगात नाचक्की होत आहे व इतर राष्ट्रे आपल्यावर उलटण्याचा संभव आहे, हे पाहून हात आखडता घेते.

भीतीसाठी पळ काढणे निराळे व तत्त्वासाठी मरणे निराळे. आसुरी शक्तीच्या व दैवी शक्तीच्या युद्धात अखेर असुराचाच पराभव होत असतो.

समोर संगीन रोखली आहे, बंदुकीचा घोडा चढवला आहे, तरवार पुढे तळपती आहे; अशा स्थितीत, हृदयाचा ठोका बदलत नाही; नाडीत फरक नाही; पापणी लवत नाही; देह हलत नाही; असा मेरू पर्वताचा धैर्यवान पुतळा, जातिवंत जीव, शूरत्वाचा कळस नव्हे काय? नि:शस्त्र, निष्पाप, स्वाभिमानी पण नम्र, बलवान पण अप्रतिकारी अशा अवतारी पुरुषावर उगारलेला हत्येचा हात खाली पडतो, शस्त्र गळून पडते. आणि शत्रूच्या अंतर्यामी असलेल्या आत्मीयत्वाची जाणीव होऊन बंधुभावाची ओळख पटते. अहिंसा व्रताचा हा हेतू आहे.

माणसाला माणुसकीची आठवण देऊन माणुसकीचे आचरण करू लागल्यास निश्चयाचा अहिंसामय सत्याग्रह हाच उपाय आहे.

**हिंसा व अहिंसा :** शस्त्राचे युद्ध व सत्याग्रहाचे युद्ध यात महदंतर आहे. हिंसा मार्गाने मनुष्य पशुकोटीत जातो. रक्तपाताने भूमी दूषित होते. मानवी संहाराने हात दूषित होतात. नीति-अनीतीला गुंडाळून शत्रूसंहार करण्याच्या शिकवणीने बुद्धीचा दुरुपयोग केला जातो. मनाची थोर वृत्ती नाहीशी होते. लूट, चोरी, व्यभिचार वगैरे वृत्तीवर कसलाच निर्बंध घालता येत नसल्यामुळे देहाची, मनाची व बुद्धीची अधोगती होते. उच्च भावना नष्ट होतात. संपत्ती संततीचे व सत्वगुणाचे, घरादाराचे जमीनजुमल्याचे, पिकाचे, व्यापाराचे, धंद्याचे किती नुकसान होते, याचे मोजमाप करता येणार नाही. शत्रूत्व जात नाही.

अहिंसेच्या उपायाने व सत्याच्या आग्रहाने मनुष्य मानवी उन्नतीच्या शिखरास पोहोचतो. भूमी एका रक्ताच्या थेंबानेही विटळत नाही. या युद्धात लपंडाव नसतो. गनिमी कावा नसतो. दगाबाजी नसते. चोरट राग नसतो. युद्धाचे डावपेच नसतात. हा पूर्ण सत्याचा डाव असल्यामुळे प्रत्येक पवित्रा पावित्र्याच्या पायावर दुसऱ्या बाजूस अगोदर जाहीर करून, सगळा डाव त्याचेसमोर मांडून खेळला जातो. हिंसावृत्ती नाही, सूडाची भावना नाही, हे प्रीतीचे सुदर्शन हाती घेतल्याने त्या आघातासरशी आपली व शत्रूची उन्नती होते. शत्रुत्व कायमचे नष्ट होते. कसलीच हानी होत नाही. मन व बुद्धीचा विकास होतो. देह पवित्र होतो. व्यक्तीची, समाजाची व देशाची उन्नती होऊन बंधुत्वाची वाढ होते.

आपले ध्येय अत्यंत उदात्त व पवित्र असले आणि ते साध्य करण्याकरता 'हिंसेचा' उपाय अंमलात आणला की, आपले मानसिक तसेच शारीरिक अध:पतन होते. करिता साध्य व साधन हे अत्यंत पवित्र ठेवले पाहिजे. त्याला हिंसेचा डाग लागता कामा नये.

आपली बाजू दुसऱ्याच्या मनाला पटवून देण्याचे सामर्थ्य अहिंसेत आहे. पण खरे कारण माझ्या अंगी बल आहे. हा हिंसा पद्धतीचा मार्ग आहे. मतपरिवर्तनावर अहिंसेची मदार आहे. अहिंसा उच्चमनोवृत्तींना हलवू शकते. हिंसा पाशवी वृत्तींना जागे करते. अहिंसेला सत्याचा आधार असतो. तिच्या आक्षेपांना उत्तर देण्याची, चुकी असल्यास ती प्रांजलपणे कबूल करण्याची उदारता असते. शत्रूपासूनही शहाणपणा घेऊ शकते.

**समता व अहिंसा :** समता हे ध्येय अहिंसेनेच गाठणे शक्य आहे. आणि तसे गाठलेले तेच टिकाऊ आहे. कारण समतेसाठी हिंसेचा उपाय स्वीकारल्याबरोबर त्या घडीच्या विषमतेला सुरुवात होते. विषमता उत्पन्न झाली की, बुंधभाव नष्ट झाला म्हणजे विश्वबंधुत्व अशक्य झाले.

समतेशिवाय स्वातंत्र्याचा लाभ मिळत नाही. अहिंसेशिवाय समता नाही.

स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुता हे ध्येय गांठायचे तर अहिंसा हाच त्याचा राजमार्ग आहे. अहिंसेच्या मार्गात पहिल्या पावलापासून ते परिणामापर्यंत यशाचेच पाऊल पडत असते. त्याला अपयश माहीत नाही.

अनासक्ती ही गीतेची शिकवण अहिंसेत पूर्णाशाने समाविष्ट झालेली आहे.

ही एकाच व्यक्तीने व्यवहारात आणल्याबरोबर, जगाला निराळी दिशा लागली आहे.

एका देशाने जर ती अंत:करणापासून स्वीकारली तर भांडवलशाहीच्या ओघाबरोबर कड्यावरून कोसळणारी संस्कृती आपल्यास खास आवरता येईल. ही अहिंसावृत्ती आपल्यास अगदीच नवी अशी नाही. वाट चुकल्यास सावरणारे जगद्‌गुरू आपल्यास लाभले आहेत.

निव्वळ स्वातंत्र्यप्राप्ती हे हिंदुस्थानचे अंतिम ध्येय नव्हे. अहिंसेच्या उपायाने जगतात समता स्थापन करणे ही हिंदुस्थानची महत्त्वाकांक्षा आहे. हिंदी संस्कृतीची जगाला ती मोठ्यातली मोठी देणगी आहे.

**आत्म्याचे संदेश :** एका मनुष्याच्या अंगी अहिंसेमुळे एवढी शक्ती वाढवता येते की, त्याने जगाला धक्के बसू लागतात.

बिनतारेचा संदेश एका मुख्य ठिकाणावरून, जगाला जेथे जेथे ती यंत्रे आहेत, तेथे पोहोचू शकतो. हा चालू यांत्रिक युगाचा एक अजब शोध आहे.

योगी मनुष्य आपल्या तपस्येच्या जोरावर सर्व जगाला अंकित करू शकतो; ही पुराणांतरी असलेली कल्पना आज तरी खरी होऊ पहात आहे. खरी झाली आहे.

हिंदुस्थानात ही एक अद्‌भुत शक्ती आपल्या संस्कृतीतून आज निर्माण झाली आहे. या शक्तीने हिंदुस्थानच्या निद्रिस्त आकांक्षेला जागे केले आहे. धक्का दिल्याप्रमाणे हिंदुस्थान खडबडला आहे. हे बिनतारी संदेश त्याच्या कोनाकोपऱ्यात पोहोचू लागले आहेत.

ज्याला स्वत:चे असे काही उरले नाही, जो जगाशी तन्मय झाला, त्याचा शब्द जग झेलू लागते. शत्रूही माना डोलवू लागतो. अशा या व्यक्तीने आत्मबलाची तोफ डागल्याबरोबर हिंदी मनाचे गुलामवृत्तीचे पडदे फाटून गेले. वृद्ध तरुण बनले. मुले बेभान झाली. अबला वीरबाला बनल्या. पवित्र वातावरणाने सर्व जग भारून गेले. अहिंसाव्रताची केवढी प्रचंड शक्ती ही ! ! !

'धर्मसंस्थापनेसाठी' हे अजिंक्य अस्त्र आजच्या अवतारी महात्म्याने हिंदभूस अर्पण केले आहे. हे अस्त्र जर आपण सदैव बाळगले, कायावाचामने त्याचा स्वीकार केला, तर पाश्चिमात्त्य राष्ट्रांना आपण सहज जिंकू ! कारण त्यात

स्वार्थाचा लवलेश नाही. या जिंकण्यात जित राष्ट्राची मानहानी नाही.

अहिंसामय ध्येयाने सर्व जगावर स्वामित्व चालवणारे भरतराष्ट्र श्रेष्ठ की पाशवी शक्तीच्या जोरावर साम्राज्य भोगणारे युरोप श्रेष्ठ ?

भावी काल कुणाला मोठेपणा देईल ?

त्यागानेच मनुष्य महात्मा झाला आहे. ख्रिस्त, महंमद, बुद्ध वगैरे त्यागानेच नराचे नारायण झाले ! मानवतेसाठी मरणाऱ्यांनाच अमरत्व प्राप्त झाले आहे. व्यक्तीला किंवा राष्ट्राला मोठेपणा येतो तो मानवसंस्कृतीत भर घातल्याने; हिंसेने नव्हे, तर आत्मसमर्पणाने.

## गोळवलकरी राज्य आलं तर

'राष्ट्रीय एकात्मता' हे आजचं घोषवाक्य आहे. देशाची ती आजची गरज आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर याच एका गोष्टीला आज महत्त्व प्राप्त झालं आहे. स्वातंत्र्य टिकायचं तर एकात्मतेवरच अवलंबून आहे.

स्वातंत्र्य हे अंतिम ध्येय नव्हे, स्वातंत्र्य तसं एकात्मता ही दोन्हीही देशाच्या प्रगतीची साधने होत. एकात्मता ही सहकार्यावर अवलंबून. सहकार्य हे परस्पर प्रेमावर व विश्वासावर अवलंबून विषमता आहे, तेथे सहकार्य नाही. विषमता आहे तेथे प्रेम नाही.

स्वातंत्र्याचा दुरुपयोग होऊ लागला ! त्या तत्त्वाचा व शब्दाचा विपर्यास झाला ! त्यातून भांडवलशाहीची वाढ झाली. श्रमजीवींची ससेहोलपट झाली श्रमजीवींचे अमानुष हाल झाले ! यांत्रिक युगात त्या हालाची परमावधी झाली. या अनुभवातून मार्क्सवादाचा जन्म झाला. पण चीड व द्वेष यामुळे हिंसावादी हुकुमशाहीचा उद्‌भव झाला ! त्या हुकुमशाहीच्या अन्यायातून लोकशाही समाजवादावर विचारवंत येऊन ठेपले. त्याचा अंगिकार भारताने आज केला आहे. आजपर्यंतच्या जगाच्या अनुभवाचा तो परिपाक आहे, सामाजिक, धार्मिक, राजकीय समता अस्तित्वात आल्याखेरीज, देशातील सर्वांना विकासाची संधी मिळणार नाही.

**विवेचक बुद्धीची कास धरा :** गेल्या युगातील धर्मसंस्थापकांचा, संतांचा, तत्त्ववेत्त्यांचा आधार दाखवून आता मागे जाता येणार नाही.

म्हणून व्यक्ती कितीही मोठी असो, त्याचे विचार लोकशाही समाजवादाच्या साणेवर घासूनच पाहिले पाहिजेत.

'You should never care for authority nothing for the

names, customs, or creeds, nothing for anything that your reason does not say is true' Engersol.

हे मनूने म्हटलं, हे श्रीकृष्णाने म्हटलं, संतानी म्हटलं, ख्रिस्तानं म्हटलं, मनू, कृष्ण, ख्रिस्त अगर हे प्रत्यक्ष परमेश्वर होते असे म्हणून, आमची विवेचक बुद्धी मारण्याचा प्रयत्न केला ! रुढी व परंपरेची भीती दाखविली तरी ती मानता कामा नये. देव ही निव्वळ थापेबाजी होय.

आपली एकात्मता जी भंग पावली, अखंड भारत जे खंडित झालं, ते देवा-धर्माच्या अभिमानानं ! हा पगडा केवळ भारतावरच होता असं नाही, सर्व जगावर होता. प्रत्येक धर्माने, धर्मगुरुंनी, संतांनी व पूर्वीच्या तत्त्ववेत्त्यांनीही, गुलामगिरीचे समर्थनच केले आहे ! या जन्मीचे दु:ख पुढच्या जन्मी निवारले जाईल, असा निर्वाळा दिला आहे. !

हे सारे दुष्ट बुद्धीचे होते असा त्यांच्यावर आरोप करता येणार नाही. बहुतेक भोळे व अंधश्रद्धाळू तर काही धूर्त व दुष्ट बुद्धीचे असे होते.

सॉक्रिटीस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, हे थोर विचारवंत दुष्ट होते असे कसे म्हणता येईल ! त्या कालाचे परिस्थितीचे, व विचार प्रवाहाचे त्यांच्यावर परिणाम -झाले होते असेच म्हणावे लागेल. त्यावेळच्या सत्यासाठी विषप्राशन करणारा सॉक्रिटीस हा दुष्ट प्रवृत्तीचा असं कसं म्हणता येईल. पण त्याने गुलामगिरीचं समर्थन केलं आहे. प्लेटो हा तत्त्ववेत्ता, त्याचे विचार सद्‌हेतूचे असले तरी आज अव्यवहारी होत. लोकशाहीत बसणारे नव्हेत. तत्त्ववेत्त्याची निवड करायची कोणी व कशी ?

ॲरिस्टॉटलने गुलामगिरीवरच समाजव्यवस्था आखली. रोमची भरभराट गुलामगिरीवरच झाली. पण अंतही अखेर त्यामुळेच झाला !

लॉकिने राजाला देवपणापासून खाली ओढला.

मिलने स्वातंत्र्याच्या कल्पनेला धार आणली.

फ्रेंच क्रांतीने स्वातंत्र्य, समता व बंधुतेची घोषणा करून जगाला हादरा दिला.

स्वातंत्र्याचा व्यक्तिस्वार्थासाठी दुरुपयोग करून भांडवलशाहीचे भयानक स्वरूप प्रगट केले.

या अनुभवातून शहाणा होऊन मार्क्सने एकांगी स्वातंत्र्यावर हल्ला केला व सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय स्वातंत्र्याचा मार्ग दाखविणारा श्रमजीवींचा वेद निर्माण केला. पण भांडवलशाहीने केलेल्या अन्यायातून, जुलमातून जी चीड निर्माण झाली त्यातून सूडाची हुकुमशाही व हिंसा निर्माण झाली ! ती काढून भारताने लोकशाही समाजवाद स्वीकारला आहे त्या

विचाराच्या निकषावर इतर विचार व व्यक्तींचे आचरण घासून पाहिले पाहिजे. व सदसद्‌विवेकबुद्धीला पटेल तेच लिहिलं व बोललं, तर स्वत:ची तशी जगाची प्रगती होईल. जेथे न्यायबुद्धी नाही, निर्भयता नाही, तेथे स्वातंत्र्य नाही.

परदास्याच्या श्रृंखला तोडून टाकणं, आपल्याला शक्य झालं. त्या प्रश्नावर एकजूट करता आली. पण अंधश्रद्धेच्या श्रृंखला तोडणं फार अवघड होऊन बसलं आहे. कोणी तयार झालाच तर त्याला समाजच शत्रू समजतो. लोकांच्या अंधश्रद्धेचा फायदा घेणारा पुढारी बनतो.

आज आपल्या देशात दुही माजली आहे. ती मुख्यत: धर्मभेद व जातिभेदामुळे. माणसासारखी माणसं आम्ही धर्मभेदामुळे एकमेकांचे शत्रू बनतो. इतर भेद आहेत, पण ते गौण आहेत. अंधश्रद्धा मात्र बहुसंख्यांच्या हाडीमासी मुरली आहे ! ही जात नाही तोपर्यंत आम्ही दुजाभाव टाकून, एकमेकांजवळ येणार नाही.

धर्मांनी भेद पाडले. संतांनी निवृत्ती मार्गाची शिकवण देऊन देशाची भौतिक प्रगती खुंटून टाकली.

**लहान मुले :** लहान मुले किती निर्मळ - त्यांच्यात जातिभेद नाही, धर्मभेद नाही. देवा- धर्माचं खूळ नाही. जात पात काही समजत नाही. पण तीच जरा मोठी होऊ लागली की वडील माणसं त्यांच्यात विषाची पेरणी करतात ! तथापि त्यांच्यातील अंधश्रद्धा काढणं अवघड जात नाही. थोर माणसं मात्र काढू गेलं की मारायला उठतात ! अति शहाणे शत्रू मानतात ! अन्‌ धूर्त मनातून नास्तिक असले तरी स्वार्थासाठी दुसऱ्यावर देवा-धर्माची मोहिनी टाकतात.

मी खेड्यावर प्रचार दौऱ्यावर गेल्यावर, व्याख्यानाला, मुले सर्वांपुढे बसलेली असत. जमावात अडाणी तसे अतिशहाणेही असत. मुलांच्यावर चटकन्‌ परिणाम होई. खेडूत शेतकऱ्यावर होई पण पांढरपेशे मात्र नाके मुरडत !

**देव :** मी मुलांना विचारी - रस्त्यावर दगड टाकतात, ते कुठले माहीत आहे ?

'हो, दगडाच्या खाणीतले' 'त्या दगडांना पाया पडता का ?'

'नाही' 'त्या दगडाची पायरी केली तर पाया पडाल ?' 'नाही.'

'त्या दगडाची भिंत केली तर त्या भिंतीला पडाल ?' 'नाही'

'तो दगड गटाराला घातला तर पाया पडाल ?' 'नाही.'

'त्याच खाणीतल्या दगडाला भोके पाडली, कुत्र्यासारखे नाक डोळे पाय शेपूट काढली, दगडाचं कुत्रं बनवलं तर पाया पडाल ? 'नाही' त्या दगडाचा माणूस बनवला. गळ्यात फुलांचा हार घातला, कपाळाला गंध लावलं आणि त्या दगडाला देवळात ठेवला. त्याचे पुढे पळी पंचपात्र ठेवून भट बसवला, तर त्याला पाया

पडाल ?'

मुले हसाय लागली. अडाणी गप बसले, पांढरपेशे वाईट तोंड करू लागले. एका दोघांना तिथं बसवलं नाही. उठून गेले.

मात्र मुलांच्यातून ही श्रद्धा लगेच काढता आली.

**जात व धर्माबद्दलची हीच गोष्ट :** मी विचारत असे 'तू कोणच्या जातीचा, तू कोणच्या जातीचा ?' ब्राह्मण, मराठा, मुसलमान, जैन, महार, मांग अशी उत्तरे येत.

'मग ही जात कोणी केली रे' 'देवाने.'

'झाडाच्या जाती तुम्हाला ओळखता येतात ? घ्या बरं नांव ?'

घेतली. आंबा, शेवगा, नारळीचे, पिंपरीचे !

'आंब्याचं झाड ओळखता येतं ?' 'हो' नारळीचं, पिंपरीचं ओळखता येतं !' 'हो' जनावराच्या तसं पक्षांच्या जाती ओळखता येतात की नाही ? 'हो'.

'आता हे पहा या जमखान्यावर, अगदी लहान लहान मुले नागडी उघडी तुमच्यासमोर टाकली. ओळखीची नव्हे हं. अन् तुम्हाला विचारलं, यातलं मुसलमान कोण ? ब्राह्मण कोण ? मराठा कोण ? तर सांगाल कोण ते ?' 'नाही' मग आता या सर्व मुलांची जात कोणती' 'माणसाची.'

मग या अंधश्रद्धेला, जातिभेद धर्मभेदाचं शिक्षण द्यायला आम्हीच जबाबदार नव्हे काय ?

पण देवाधर्माविरूद्ध बोलणं म्हणजे शहाण्यांना महाभयंकर गोष्ट वाटते. म्हणजे वयस्कच मूर्ख, हट्टी व दुराग्रही, व मुले निर्मळ व शिकू इच्छिणारी असंच नाही का म्हणावं लागणार ?

मग असंच नाही का ? की देव हा भीतीतून निर्माण झाला. अज्ञानातून निर्माण झाला, किंवा धूर्त सज्ञानांनी स्वत:च्या स्वार्थासाठी निर्माण केला ? पण त्या विचारांची पकड सर्वांवर बसली. आणि ती घालवण्याची खटपट केली तरी जात नाही. साम्यवादी रशियातही अद्याप आहे म्हणे ! याचा अर्थ असा नाही की ती सरकारला संमत आहे. घटनेनं काही सारा देश एकदम त्या विचाराला येत नाही. याचा अर्थ राज्यकर्त्यांनी किंवा जाणत्यांनी त्यात सहभागी व्हावं असं नव्हे.

**देव हा हुकमी एक्का :** जाती, स्वार्थासाठी त्यांनीच पाडल्या पण त्या लोक मानणार नाहीत व याच्या वर्चस्वाला मान्यता देणार नाहीत म्हणून त्या देवाने पाडल्या अशी भावना निर्माण केली. त्यासाठी ग्रंथ लिहिले, त्यातले नियम मुकाट्याने लोकांनी ऐकावेत म्हणून तेही देवाने लिहिले, अशी लोणकढी थाप ठोकून दिली ! तो म्हणे धर्मग्रंथ !

हा इतर वर्णांना, उच्चवर्णियांच्या हाताखाली राबवणारा धर्मग्रंथ म्हणजे मनुस्मृति. त्या ग्रंथाच्या आधारे आम्हाला गुलामगिरीत टाकलं !

जगप्रसिद्ध विचारवंत व विद्वान - सी. ई. एम जोड म्हणतो 'धूर्त बलवानांना पुष्ट करण्याकरता देव हे सोंग निर्माण केलं आहे. पुनर्जन्माची आशा दाखवून या जन्माच्या आकांक्षा मारून टाकल्या आहेत ! मजुरी न देता राबवून घेण्याकरता देव-धर्म उपयोगात आणला आहे.'

याची प्रचीती, मनुस्मृतीतील श्लोक वाचून पटेल. त्याच आधारावर गोळवलकर गुरुजी म्हणतात.

**पूर्वजन्म व पुनर्जन्म :** जन्माने प्राप्त होणाऱ्या चातुर्वर्ण्य व्यवस्थेत गैर काही नाही. जन्मावर आधारलेली चातुर्वर्ण्य व्यवस्था उचितच आहे. कर्म फल त्यागावर आधारलेली चातुर्वर्ण्य व्यवस्था आवश्यकच आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्था ही रुढी नसून धर्म आहे. श्रुति स्मृति ईश्वर निर्मित आहे. त्यात जरी मोडतोड झाली तरी जी ईश्वर निर्मित योजना आहे ती पुन: प्रस्थापित होणारच ! गुण म्हणजे पात्रता व कर्म म्हणजे आवडीनुसार स्वीकारलेले कर्म हा अर्थ चुकीचा आहे. कर्म म्हणजे पूर्वजन्मात केलेले कर्म. पूर्वजन्मीच्या कर्मानुसार पुढील जन्मी वर्ण मिळतो. **'पूर्वजन्म व कर्मानुसार पुनर्जन्म हा हिंदू धर्मातील पायाभूत सिद्धांत होय.'**

तेव्हा यांच्या गुलामगिरीतून मुक्त व्हायचं असेल तर 'देव-धर्म-अवतार चमत्कार व पूर्वजन्म आणि पुनर्जन्म या वैचारिक सापळ्यातून बाहेर पडायला पाहिजे.

श्रमजीवी बहुजन समाजाला पकडून ठेवण्यासाठी बांधलेले तुरुंग म्हणजे देवालये ! ती पडली तर बहुजन समाज स्वत: अडचणीत असतानासुद्धा पोटावर मारून पैसा गोळा करतो व स्वखुषीने त्या तुरुंगात जातो व थाटामाटाने त्याचे उद्‌घाटन करतो व सरकारही त्याला प्रोत्साहन देते व सहभागी होते. पुन: तेथे भट-दलालाची स्थापना केली जाते. मग तो भट ब्राह्मण असेल किंवा मराठा असेल-

**सर्वांची जात एकच :** मग गोळवलकर, शंकराचार्य अगर कोल्हापुरातील त्यांचा हस्तक, मराठा मठाधिपती दत्ता बाळसारखा कोणी आमच्या डोक्यावर का बसू नये !

गोळवलकर काय, गिरीचे शंकराचार्य काय अगर तेच विचार इंग्रजी भाषेत मांडणारे कोल्हापूरचे मठाधिपती दत्ता बाळ काय सर्वांची जात एकच !

ब्राह्मणावर हल्ले करायला चढाओढ लागते. पण तेच विचार मांडणारा मराठा आम्हाला शत्रू वाटत नाही ! उलट त्याचे गोडवे गातो. हा मराठा असल्यामुळे मनूचे काम अधिक सफाईने करू शकतो. ही बोवाबाजी काय एकाच धर्मात आहे असं नाही.

I am unaware of any religion in the world which in the past forbade slavery.

-*Bradlaw.*

'जगातल्या कोणत्याही धर्माने गुलामगिरीला विरोध केल्याचे मला माहीत नाही, ब्रॅड लॉ. म्हणून देवाचं बुजगावणं हे प्रत्येक धर्मातील गुरुंनी जिवंत ठेवण्याची शिकस्त केली आहे.

**संतही परिस्थितीचे गुलाम :**आमचे संत दुष्ट होते असं मी म्हणणार नाही. पण ते त्या परिस्थितीत अडकलेच होते. काहींचा मूर्तिपूजेवरचा विश्वास कमी झाला. तो त्यांनी स्पष्ट बोलून दाखविला आहे.

गाडगे बोवा हे एक प्रामाणिक संत होते. जे पटले ते बोलले; ते म्हणतात :-

*शेंदूर फासोनिया धोंडा। पाया पडती पोरे रांडा।*
*देव दगडाचा केला। गवंडी त्याचा बाप झाला।*
*देव सोन्याचा घडविला। सोनार त्याचा बाप झाला।*
*सोडोनिया खऱ्या देवा। करी म्हसोबाची सेवा।*

**कबीर :-** *जग भये उफराटे। झूटेकू साहेब कैसा भेटे*
*फत्तर उप्पर शेंदूर डारे। मूरख कहे ये देव मोठे।*

**तुकाराम :-** *सजीव तुळस तोडावी। निर्जीव पाषाणासी वहावी।*

या संतांचा दगडी देव सुटला तरी देवाच्या कल्पनेतून, देवाच्या गुलामगिरीतून कोणी सुटला नाही.

**देव काही सुटत नाही :-**

साकार गेला तेथे निराकार आणला !

आकार तितका नसे ! निराकार विठ्ठले दिसे म्हणजे विठ्ठलापासून काही सुटका करून घेतली नाही.

पण ही पोकळी हाताला सापडत नाही. घशाच्या शिरा ताण ताणून ओरडलं तर शिरा तुटतील, पण त्याचा उपयोग काही होत नाही की तो देव नवसाला पावत नाही.

तेव्हा अज्ञ समाज आपल्या पकडीतून सुटता कामा नये. म्हणून पंचमहाभूताला देव बनवलं ! आणि त्यातील शक्ती म्हणजे देव अशी भावना निर्माण केली. कारण त्यातील शक्ती कोणाला नाकारता येणं शक्य नव्हतं.

पण ती शक्ती काही तुमच्या पाप-पुण्याचा निवाडा करीत बसत नाही. न्यायाधीशाप्रमाणे हातात तराजू घेऊन बसलेली नाही.

अग्नीत शक्ती आहे. त्या विस्तवात हात घातला तर पोळतो. चुलीत

घातला तर अन्न पकवतो. धबधब्याच्या प्रवाहात सापडला तर तुमचा चक्काचूर होतो. तो प्रवाह बुद्धीने वापरला तर वीज निर्माण होते. त्यावर गिरण्या चालू होतात. खेडी विजेने प्रकाशित करता येतात. म्हणजे मनुष्यच पंचमहाभूतावर मात करू शकतो.

'मानव हाच स्वत:च्या विश्वाचा शिल्पकार आहे.'

*(मानवेंद्र राय)*

तरी पण देव ही कल्पना सतत जिवंत ठेवायचीच!

लोकांचा विश्वास मूर्तिपूजेवरून उडतो आहे, निराकारावरून उडतो आहे. पंचमहाभूताच्या शक्तीवरूनही उडतो आहे. म्हणून जिवंत प्राण्यांना देव बनवलं आहे.

**देव बनवलं तरी ती माणसेच :** श्रीकृष्ण असो, ख्रिस्त असो, पैगंबर असो. ही सारी माणसे होती, तीही त्यावेळच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक व्यवस्थेने बांधली गेली होती. त्यावेळच्या विचारप्रवाहाची छाप त्यांच्यावर पडलीच होती. तो धर्मगुरू अगर संस्थापक ज्या वर्गाचा होता त्या वर्गाचं हित पाहणं हे साहजिकच होतं. पण गीतेतले सर्व श्लोक ईश्वरप्रणीत समजून मान्य केल्यास, खालच्या वर्गाची, गुलामगिरीतून सुटका कधीच होणार नाही!

श्रीकृष्णांनी ईश्वराचा अंश बलिष्ठांच्यातच आहे असे प्रतिपादन केले आहे. बलिष्ठानाला महत्त्व देण्याची फॅसिस्ट वृत्ती गीतेच्या काही श्लोकांतून स्पष्ट दिसून येते.

त्याने पक्षांमध्ये ईश्वराचा अंश आहे, असे म्हटले आहे. दुर्बल चिमण्यात नाही. जलचरात, छोट्या छोट्या चिंगळ्यात अगर मासळीत नाही, तर 'मगरात' आहे. व जनावरात शेळ्या बकरीत नाही. तर सिंहात आहे. नरात नराधिपात, म्हणजे राजात आहे. कृष्णही, राजा, राज घराण्यातला. त्याने राजाला देव बनवला. तो राजा म्हणे प्रत्यक्ष विष्णूचा अवतार! त्याची आज्ञा म्हणजे ईश्वराची आज्ञा! ईश्वर म्हटल्यावर ती सर्वांनी ऐकलीच पाहिजे; त्याची शक्ती म्हणजे सैन्यबल. ते वाढवायचं तर त्यांची मरणाची भीती काढून टाकायला पाहिजे. व जगाचा व संसाराचा मोह त्याला पडू नये म्हणून जग हे माया आहे. हे सर्व खोटं आहे. देह ही माया आहे. तू म्हणजे आत्मा, तू मरत नाहीस. तुला कोणी जाळत नाही. कापत नाही. या शिकवणीमुळे सैनिकाला लढायला तयार केलं. आणि मेलास तर काळजी करायचं कारण नाही. स्वर्गाचं राज्य त्याला देऊन टाकलं! जे मागे राहतील ते यशाचा वाटा मागतील म्हणून 'कर्म करणं एवढंच तुझं काम, तू फलाची आशा धरता कामा नये, हा उपदेश केला!

हा उपदेश फायद्यात पडला त्यांच्या! धनिकाच्या व गब्बर, झालेल्यांच्या

गरिबांना स्वर्गातल्या सुखाची आशा दाखवून श्रमजीवींची बंडखोरी मारून टाकली.

ख्रिश्चन धर्मगुरुंनीही राजाचं प्रस्थ असंच वाढवलं आहे. राजे व धर्मगुरू यांची सदैव गट्टी झाली आहे. एकानं कंबर मोडायची तर दुसऱ्याने डोक्यातला विचार करणारा मेंदू काढून घ्यायचा ! कृष्णाने राजाला जसा विष्णूचा अवतार बनविला तसा पोपनीही बनवला आहे.

'The homilies of the church of England declare that even the wicked rulers have their power and authority from God, and that such subjects as are disobedient or reblious against their princses disobey God.'

'राजा दुष्ट असला तरी त्याला ईश्वराकडूनच अधिकार प्राप्त झालेला असतो. आणि जी प्रजा त्याची आज्ञा अवमानील तो देवाचीच आज्ञा मोडील असे मानावे.'

कृष्ण व पोप यांची भाषा एकच नाही का ?

ज्या प्रजेनं पोपची आज्ञा अवमानली त्या धर्मगुरुंनी आपल्या धर्मसंघटनेच्या द्वारे अशांना जाळले, ठार मारले. हजारोंची कत्तल केली. आणि हे कोणाच्या नावावर तर धर्मांच्या व धर्मसंस्थापकांच्या !

**निवृत्तीचा मार्ग देशविघातकी :** या खालच्या श्रमजीवींनी, आपली स्थिती सुधारणेच्या व संपत्ती संग्रहाच्या व सत्ता संपादनाच्या नादाला लागू नये म्हणून निवृत्तीचा मार्ग दाखवला व 'आहे रे ची' म्हणजे सत्ता, संपत्ती व ऐश्वर्य भोगणाऱ्यांची भीती काढून टाकली ! त्यांना निर्धास्त केलं ! ज्ञानेश्वरांनीही तेच केलं.

'आहे रे' ना म्हणजे गब्बर आहेत त्यांना, स्वास्थ्य मिळवून दिले ! भोळ्या लोकांची सुख भोगण्याची आशा मारून टाकली.

डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे म्हणतात :-

'संसाराबद्दल कोणालाही कसलाही उत्साह वाटू नये त्याची किळस यावी, उबग यावी अशी त्यांनी व्यवस्था करून ठेवली आहे. संतांची संसाराची वर्णने वाचून एखाद्याला त्याच्याबद्दल उत्साह शिल्लक राहिला तर त्या नराची बहादुरीच समजली पाहिजे.'

ज्ञानेश्वर म्हणतात 'संसार हा मळ आहे, ही घाण आहे, ही ओकारी आहे, विषाचे कांदे आहेत, इंगळाचे अंथरुण आहे....

या उपदेशाने शहाण्या, धूर्तांनी काही धनलालसा टाकली नाही. खालच्या वर्गाने मात्र श्रीमंतीचा हेवा टाकून दिला.

गांधीजींच्या ट्रस्टीशिपच्या कल्पनेस अनुसरून मिळालेली संपत्ती लोकांचे स्वाधीन किती जणांनी केली आहे ?

त्यागाचा उपदेश हा नेहमी गरिबांनाच करावयाचा ! ! व ते अज्ञानी असल्यामुळे तो परिणामकारक होतो. श्रीमंत देवपूजा करतील पण संपत्तीची पूजा कधीही टाकणार नाहीत. गांधीजींनी सुद्धा गरिबीलाच मोठं केलं ! पण त्यांच्या उपदेशाने भांडवलवाल्यांनी संपत्ती टाकली नाही. हा उपदेश जाणून बुजून केलेला असो की भोळ्या भावाने केलेला असो. यामुळे बहुजन समाजाची स्थिती सुधारली नाही. गरिबांनी राबायचं व सुखाचा वाटा श्रीमंतांनी घ्यायचा ! खालच्यांनी शिकवण मानली. धूर्तांनी त्याचा फायदा घेतला. आर्थिक विषमतेवर कोणाही संताने हल्ला केला नाही.

**गुलामगिरीची शिकवण :** 'Religion teaches those who toil in poverty all their lives to be resigned and be patient in this world and console them with the hope of reward in heaven'- Lenin.

'धर्म हा आयुष्यभर जे दारिद्र्यात रखडतात त्यांना पुढच्या जन्मावर आशा ठेवून समाधानी राहण्याचीच शिकवण देतो.' लेनिन-बायबलने सामुदायिक प्रार्थनेत हीच शिकवण दिली आहे.

'Do your duty in that state of life into which God has pleased to call you.'

'देवाने ज्या स्थितीत टाकले असेल त्यात आपले कर्तव्य करीत रहा' मनुस्मृतिकारही हाच उपदेश करतात. त्याला संत सहाय्यभूत होतात. तुकाराम म्हणतात.

अशाश्वत संग्रह कोण करी ! कोण करी घर सोपे माड्या झोपडि हेच बरी !

कोणी पालखीतनं हिंडतील, कोण पायी हिंडतील. तू त्यांचा हेवा करू नकोस. तर तू काय कर-

*चिरगूट चिंध्या जोडूनि कंथा। गोधडी हेच बरी :*
*नित्य नवे जे देईल माधव। भक्ष तेच खरी।*

हा अभंग वर्णाश्रम धर्माला पोषकच नाही काय ?

ही निष्क्रियतेची व मुकाट्याने गुलामगिरी पत्करण्याची शिकवण नव्हे काय ?

'असेल माझा हरी, तर देईल खाटल्यावरी !' इथं माणसाचं कर्तृत्व संपलं !

या देवावरच्या परावलंबी वृत्तीमुळे आम्हाला पराधीन व गुलाम बनवलं !

म्हणून देवाच्या पकडीतून ज्यावेळी तो मुक्त होईल, त्यावेळीच तो खरा स्वतंत्र होईल.-

**विवेकानंद म्हणतात :** 'आता या दगडी देवाचे पूजन राहू द्या. जिवंत

देवाचे पूजन करण्याचा उपदेश करीत सर्वत्र फिरा. या उच्चनीच भेद रक्षण करणाऱ्या भिक्षुकी फलटणीने व भेद मूलक देवालयांनी पवित्र धर्माची घाण केली आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अस्पृश्य या सर्वांना या वृत्तीचे गुलाम केले आहे. या वृत्तीला व मतभेदाला उपटून काढावयाचे तर ही संस्थाच नामशेष केली पाहिजे ?

**भिक्षुकी फलटणी म्हणजे धर्म संघटना :** या भिक्षुकी फलटणी म्हणजे, जगातील निरनिराळ्या धर्माच्या संघटना होय. या धर्मसंघटनांनीच रक्ताचे पाट वाहिले आहेत.

अहिंसा धर्माची शिकवण देणाऱ्या व त्यासाठी सुळावर चढणाऱ्या, ख्रिस्ताच्या अनुयायांनी म्हणजे ख्रिस्त धर्मियांनी, धर्म प्रचारासाठी युरोपची भूमी रक्ताने न्हाऊन काढली !

विश्वबंधुत्वाची शिकवण देणाऱ्या पैगंबरच्या अनुयायांनी, एका हातात कुराण व दुसऱ्या हातात तलवार धरून, इस्लाम धर्माची वाढ करण्याकरता, राक्षसी कत्तली केल्या !

त्याच धर्माभिमानींच्या रक्त पातातून पाकिस्तान निर्माण झाले! सर्व धर्मियाना म्हणे सामावून घेणाऱ्या, हिंदु धर्मातील धर्मगुरुनी चार वर्ण पाडले! त्यातून शेकडो जाती निर्माण झाल्या! व अवतार-भगवान मनूने पशुतुल्य वृत्तीने माणसाचे पशू तयार केले ! बुद्ध धर्मियांचा छळ केला !

**मनूचे वारसदार :-**

तेच मनूचे वारसदार गिरीचे शंकराचार्य, त्याच दलित वर्गाला १९६९ साली कुत्री, मांजरे म्हणून अपमान करीत आहेत व गोळवलकर वर्णाश्रम धर्म स्थापू पहात आहेत !

याला आधार देव-धर्म, चमत्कार अवतार व पुनर्जन्माचा ! आणि या विचाराला कोल्हापूरात पार्श्वभूमी तयार करून दिली ती दत्ता बाळ या गृहस्थाने.

मराठा जातीतील हे, गोळवलकरचे साथीदार होत. या गृहस्थानींही मोठ्या धूर्तपणाने स्वत:ला अवतार बनवून घेतलं ! त्यासाठी आपल्या हस्तकाकरवी चमत्काराच्या कथा पसरवल्या. आपल्या अंगी दैवी सामर्थ्य आहे असा समाजात भास निर्माण केला. त्यांच्या भक्तांनी प्रेषित, अवतार, ही विशेषणे चिकटवली ! वर्तमानपत्रांनी ही विशेषणे फडकवली. शाहू, फुले यांचे गुणवर्णन करणारी पत्रे, यांच्याही गुणवर्णनाने व चमत्काराच्या कथांनी आपल्या पत्रांचे रकाने भरू लागली.

**चमत्काराबद्दल केदारनाथजी :** केदारनाथजी हे खरोखरचे सत् पुरुष. ते लिहितात,

साधुत्वावरील श्रद्धेमुळे भ्रम कसे निर्माण होतात ते मला माहीत आहे. मी एकांतात राहू लागल्यावर माझ्याविषयी केवळ मोठ्या लोकांतच नव्हे तर विद्वान लोकांतही श्रद्धा उत्पन्न होऊ लागली. त्यापेक्षाही आश्चर्य म्हणजे माझा द्वेष करणाऱ्या कोणा कोणा व्यक्तीतही मजविषयी एक प्रकारचे भय व त्यामागून श्रद्धेचा उद्‌भव होऊ लागला. त्या योगे कित्येकांना स्वप्नात माझे दर्शन होऊ लागले. कोणाला माझ्याकडून स्वप्नात उपदेश मिळू लागला. कोणाचे संकट निवारण झाले. कोणाचा रोग नाहीसा झाला. कोणी मरता मरता माझ्या कृपेने वाचला. कोणी मला नवस करू लागले. त्यांच्या नवसास मी पावू लागलो. अशा रीतीने भाविक व कामनिक लोकांत माझ्याविषयी प्रसिद्धी होऊ लागली. चमत्काराच्या अनेक कथा माझ्या नावावर चालू लागल्या. श्रद्धावान् लोकांना त्या योगे आनंद वाटू लागला. त्यांची श्रद्धा अनेक पटीने वाढली. परंतु ज्या माझ्या दिव्य शक्तीचा अनुभव व साक्षात्कार लोकांना होत होता व ज्या गोष्टीचे कर्तृत्व 'ते माझ्याकडे लावीत होते, त्यापैकी कशाचाही माझा संबंध नव्हता, हे मी जाणत होतो. त्यामुळे व लोकांत अशा प्रकारची खोटी मान्यता व श्रद्धा निर्माण होण्यात आपले व जनतेचे अकल्याण आहे अशी माझी ठाम समजूत असल्यामुळे, मी त्या चमत्काराचे कर्तृत्व नाकारले. व अशा रीतीची श्रद्धा तुमचे व माझे अहित करणारी आहे, असे त्यास सांगितले. भाविकांची दुःखे इतर कोणत्याही कारणाने नाहीशी झाली असली तरी ती साधूंच्या दिव्य सामर्थ्यानेच नाहीशी झालेली आहेत, असे भाविक मनुष्य समजतो व त्याचे श्रेय त्या साधुलाच देतो ! या प्रमाणे अद्‌भुत शक्ती व दिव्य सामर्थ्याच्या भ्रमावर साधूचे महात्म्य वाढू लागते.

असं वाढवून मग हे लोक, ज्ञानाचे नव्हे, अज्ञानाचे डोस पाजतात ! मनूही भगवानच झाले ! अवतार झाले. तेव्हा कोल्हापुरात आम्ही एका मराठ्याला अवतार बनवला ! आणि त्याने पुनर्जन्मावर विश्वास निर्माण करून मनूची सेवा केली ! !

**मराठ्याकरवी ब्राह्मणाचा प्रवेश :** कोल्हापूर हा सत्यशोधकाचा महाराष्ट्रातील बालेकिल्ला. डाव्या पक्षाचा आधार. अंधश्रद्धेने भारला गेला ! ज्या ब्राह्मणाला कोल्हापूरने सळो की पळो करून सोडले होते तेथे दत्ता बाळ करवीच ब्राह्मणाचा शिरकाव झाला ! याच गृहस्थाने महाराष्ट्रभर दौरे काढून गोळवलकरांच्याच विचाराचा प्रचार केला. तेच देव धर्म प्रार्थना चमत्कार पुनर्जन्माचे विचार इंग्रजी शब्दांनी खुलवून लोकांसमोर मांडले. आपलाच माणूस म्हणून बहुजन समाजाने उलट त्यांचं कौतुक केलं ! त्यामुळे गोळवलकरांना विचार मांडायला सोपं झालं ! म्हणून हे गोळवलकरचे हस्तक होत.

**आमच्यातील ढिलाई :** देव-धर्माच्या अंधश्रद्धेतून आपल्या समाजाला वर काढण्याचा पोच आमच्या मंत्र्यांना व आमदारांनाही राहिला नाही व ही आपत्ती ओढवून घेतली ! सरकार व अधिकारी जागरूक राहिले नाहीत ! प्राचार्य व आचार्य अंधश्रद्धा वाढवण्यात सहभागी झाले ! ज्या शेतकरी-कामगार पक्षाने महाराष्ट्रातून ब्राह्मणाचं उच्चाटन केले तो जागरूक राहिला नाही. म्हणून सत्यशोधकांना, समाजवाद्यांना व शेतकरी-कामगार पक्षाच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांना मी विवेकानंदाच्याच शब्दात विनंती करतो.

'Come be men ! Kick out the priests who are always against progress, because they would never mend their hearts, would never become bigger they are the off-spring of centuries of superstetion and tyranny ! Root out priest craft.'

'उठा माणूस व्हा ! प्रगतीला विरोध करणाऱ्या भटशाहीला ठोकरून द्या ! ते कधी बदलणार नाहीत. त्यांच्या मनाचा विकास होणार नाही. शेकडो वर्षाच्या धार्मिक गुलामगिरीचे व अन्यायाचे ते फल होय ?

**आजचं कोल्हापूर :** फुल्यांनी, शाहू महाराजांनी व त्यानंतर इतर सत्यशोधकांनी या अंधश्रद्धेला खूपच धक्का दिला होता. मार्क्सची विचारदृष्टी शंकरराव मोऱ्यांनी स्वीकारली होती. केशवराव विचारे हे हाडाचे सत्यशोधक' त्यांनी फुल्यांचे मार्गदर्शनाप्रमाणे पुढे पाऊल टाकले. ते पुरोगामी कोल्हापूर आज नाही.

'शिवछत्रपतींनी महाराष्ट्राला स्वातंत्र्याची शिकवण दिली, पण ज्यांनी स्वातंत्र्य लढ्याला विरोध केला त्यांनी गादी भक्तीचेच स्तोम माजवलं !! शिवाजीला देवावतार ठरवून आम्ही त्याला माणसातून उठवलं ! तो आम्हाला मुकला. आम्ही त्याला मुकलो ! शिवरायाबद्दल आम्हाला जो आदर वाटत असतो, त्याचे रूप निष्कलंक पहायचे तर कडव्या सत्यशोधकी वृत्तीतूनच पाहिले पाहिजे' केशवराव ठाकरे. ते त्यावेळी धर्मश्रद्धा टाकू शकले नाहीत. म्हणून आपण तिलाच चिकटून राहिलो ! ही अंधश्रद्धाच होय.

शाहू छत्रपतींनी प्रगतीचा मार्ग दाखवला. एक श्रृंखला तोडून टाकली. ब्राह्मणी वर्चस्व फेकून दिलं. शंकराचार्यांचं महत्त्व कमी केलं. पण ज्या गोष्टी अपुऱ्या राहिल्या त्यालाच आपण चिकटून राहिलो. त्यांनी अंधश्रद्धेचा पाया समूळ खणून काढला नाही. शाहू महाराजांनी मूर्तिपूजा टाकली नाही. ते उदाहरण दाखवून मूर्तिपूजेचं समर्थन करणारे महाभाग आहेत. त्यांनी स्वत: पुढे होऊन शहाण्णव कुळीची श्रेष्ठता झुगारून दिली तर मराठ्यातले शिकलेले धनिक व सत्तेवर आरुढ झालेले, त्या कुळीच्या मोहात गुरफटून घेत आहेत. ती जातिश्रेष्ठत्वाची कल्पना मराठ्यातून, शिकलेल्या मराठ्यातून तरी गेली आहे काय ?

'महात्मा फुल्यांनी धर्मग्रंथ हे ईश्वरप्रणीत किंवा ईश्वरी प्रेरणेने निर्माण केले आहेत असे म्हणणाऱ्या धर्मसंस्थांना विरोध केला. धर्मात जे जे काही सांगितले असते ते सत्य होय ही अंधश्रद्धा नाहीशी झाली पाहिजे असा ते वारंवार इशारा देत. जगातील सर्व धर्म हे गैरसमज व अंधश्रद्धेवर उभारले आहेत. त्यांच्यामध्ये जे जे काही आहे ते सत्य आहे असे आपण म्हणता कामा नये असे म. फुले म्हणतात. हिंदुधर्मातील मूर्तिपूजा हे ब्राह्मणांनी पोट भरण्याकरता काढलेले थोतांड आहे, तीर्थयात्रा... लुबाडूपणाचा धंदा आहे. असा फुल्यांनी इशारा दिला असताना विद्यापीठात अनेक सुशिक्षितांना... विशेषत: मराठी प्राध्यापकांना त्यांच्यापासून मिळणारा इशारा अजूनही लक्षात आलेला नाही' हे जें तर्कतीर्थांनी लिहिले आहे, त्यांचे अनुभव कोल्हापुरात रोज येत आहेत. स्वत: फुल्यांचे अनुयायी म्हणवून घ्यायचं व इंग्लंड रिटर्न्ड प्राचार्यांनी मूर्तिपूजेत दंग व्हायचं. सत्यशोधक म्हणवून घेणाऱ्या ब्राह्मण जातीवर उखडणाऱ्या पत्रांनी देव, धर्म, चमत्कार, पुनर्जन्म याचा प्रचार करणाऱ्या दत्ता बाळचा उदो उदो करायचा ! लोकात धार्मिक भावना जागी करायची. मंत्र्यांनी मूर्तिपूजेचं समर्थन करायचे. जत्रेत भाग घ्यायचा ! देवालयांची उद्घाटने करायची व पुन: फुले भक्त म्हणवून घ्यायचे ! ! कोण वैचारिक विसंगती ही-

मग वर्णाश्रमधर्म स्थापण्याची गोळवलकर व शंकराचार्य यांना का आशा निर्माण होऊ नये ? मुळात हात न घालता वरवरच्या टीकेने या वृत्तीचा नाश होणार नाही.

गोळवलकरी राज्य आलं तर श्रमजीवी बहुजन समाजाची स्थिती काय होईल याचा विचार करा. व झोप झाडून जागे व्हा, माझे हे लिखाण माझ्या जवळच्या अनेकांना दुखवणार आहे याची मला जाणीव आहे. पण त्या सर्वांपेक्षा बहुजन समाज मला जवळचा आहे. त्यालाच मी ईश्वर मानतो.

गोळवलकरी राज्य आलं तर ! !

**गोळवलकर गुरुजी म्हणतात**

*'चातुर्वर्ण्य ही रुढी नसून, तो धर्म आहे !*

*श्रुति स्मृति ईश्वर निर्मित आहे व*

त्यात सांगितलेली चातुर्वर्ण्य व्यवस्था ईश्वर निर्मित आहे. ईश्वर आणि धर्म ही नावे घेतली की झाली सर्वांची तोंडे बंद !

पण ही मनुस्मृती वाचल्यानंतर व देवपूजेने माणूस कसा निर्बुद्ध होतो हे समजून आल्यावर, पुण्यस्मरण बाबासाहेब आंबेडकरांनी ती मनुस्मृती फाडली, तुडवली व जाळली. ती का ? तर मनुस्मृतीने - व गिरीच्या शंकराचार्यांनी आम्हाला

कुत्रे मांजर म्हटलं तसं मनुस्मृतीकारांच्या आधाराने पेशव्यांनी हरिजनांना वागवले !

**अस्पृश्यांचे हाल :** मनुस्मृति काय म्हणते ते वाचा. डोळे फाडून वाचा -

'चांडाळांनी (म्हणजे अस्पृश्यांनी) गावात राहता कामा नये. त्यांनी गावाच्या बाहेर घरे करून रहावे. त्या ज्यांनी पात्रात काही खाल्ले असेल त्यास अग्नीचा संस्कार करूनही ब्राह्मणांनी घेऊ नये. कुत्रे व गाढव हे चांडाळाचे धन. त्यांनी मेलेल्या माणसाची वस्त्रे वापरावीत. मातीच्या फुटक्या भांड्यात भोजन करावे ! लोखंडाची काकणे वापरावीत. लोखंडाचेच दागिने घालावेत. यांस अन्न प्रत्यक्ष देऊ नये. रात्री गावात फिरू नये.'

राष्ट्रीय एकात्मता तर राहू देच पण हिंदू धर्मात तरी अशा सामाजिक व्यवस्थेने, सूड, मत्सर व कलह या शिवाय काय राहील !

ब्राह्मणांच्या हाती राजसत्ता आल्यानंतर पेशवाईत हीच मनुस्मृतीची समाज व्यवस्था, हाच कायदा कठोरतेने पाळण्यात आला व ही वर्णव्यवस्था आज कमी झाली अगर अमान्य झाली, तरी ती पुन: प्रस्थापित झाल्याशिवाय राहणार नाही असं गोळवलकर म्हणतात.

पेशवाईचा काल हा गोळवलकर मान्य मनुस्मृति कालच होता. त्या कालात 'महार मांगांना गळ्यात मडके बांधून त्यातच थुंकावे लावीत. रस्त्यावर जनावरांनी घाण केली तर चालते पण हरिजनांनी थुंकायचं नाही. रस्त्यावर जनावरांना फिरायला बंदी करता येणे शक्य नव्हते पण अस्पृश्याची पावले उठू नयेत म्हणून त्यांच्या कंबरेला झाडाची फांदी बांधायची ! त्यामुळे ते पुढे चालू लागले म्हणजे उमटलेले पाऊल पुसले जावे !

आज यावेळी सुद्धा ज्या जिल्ह्यात मनुस्मृतीची छाप आहे, ब्राह्मण्य प्रभावी आहे, त्या जिल्ह्यात अस्पृश्यांनी मिशाला पीळ दिल्यास त्यांना माराची भीती व धमकी देण्यात येते ! काही अस्पृश्य सायकलवरून हिंडले म्हणून त्यांना झोडपून काढले !

कुठे त्यांना जाळले, ठार मारले, इमारतीच्या पायाखाली पुरल्यास इमारतीला धोका पोचत नाही म्हणून गाडले !

आणि हे सारं चालतं देवाधर्माच्या नावावर ! ! खुद्द शाहूमहाराजांच्या कोल्हापूर जिल्ह्यात अशी गावे मिळतील आणि मी ती पाहिली आहेत की त्या गावी विहिरीवर अस्पृश्यांना बंदी होती.

**शूद्रांना वागणूक :** यानंतर आम्हा शूद्रांचा दर्जा व वागणूक कशी दिली जात होती व त्यांना वागणुकीचे नियम मनुस्मृतीत कसे घालून दिले होते पहा - शूद्र म्हणजे शेतकरी व बहुजन समाज-

● हा आपल्या वागणुकीला चिडून प्रतिकार करील, शूद्र ब्राह्मणाच्या अंगावर हात उगारील किंवा पाय उगारील तर तो कापून टाकावा.

*(मनु अ. ८ श्लोक २७९)*

● शूद्र ब्राह्मणाच्या बैठकीवर बसेल तर त्याचे कुल्ले कापावे !

*(मनु. अ. ८ श्लोक २७९)*

● शूद्रांकडून ब्राह्मणांनी आपली सेवा करून घ्यावी. मग ब्राह्मण त्या शूद्रांना मजुरी देवोत अगर न देवोत.

*(श्लोक २८१)*

● ब्राह्मणांनी शूद्राचे धन खुशाल लुटावे. या विषयी कोणत्याही प्रकारचा विचार करून नये का की शूद्राची कोणत्याही वस्तूवर मालकी नाही. म्हणून तो धन रहित आहे. शूद्र जे धन संपादन करील, त्याचा मालक ब्राह्मण आहे.

*(मनु. अ १० श्लोक १२८)*

● धन संपादन करण्यास जरी शूद्र समर्थ असला तथापि त्याने धन संग्रह करू नये. कारण शूद्राला धन प्राप्त झाले तर तो उन्मत्त होऊन ब्राह्मणास पीडा करील.

*(अध्यय १० श्लो. १२९)*

● ब्राह्मणांनी शूद्रास साक्षात फल देणारी युक्ती सांगू नये. कोणताही धर्मोपदेश करू नये. शूद्रास धर्म सांगतो तो गहन नरकात पडतो.

*(अध्याय ४ - पान ९२)*

● शूद्राकडून दास्य करवून घ्यावे, कारण शूद्र हा ब्राह्मणांच्या दास्याकरताच निर्माण केलेला आहे. दास्याच्या स्वामीने शूद्रास जरी आपल्या दास्यातून मुक्त केले तरी तो ब्राह्मणाच्या दास्यातून मुक्त होत नाही. कारण दास्य हे शूद्राचे - जन्माबरोबर त्याचे माथी बसलेले सहज कर्म आहे. यास्तव त्याच्या शूद्रत्व जाती प्रमाणेच त्या कर्माचा कोण लोप करणार?

*(अध्याय ८ पान २३७)*

● ब्राह्मणास पीडा देणाऱ्या शूद्राचे राजाने हात तोडावे -

*(अध्याय ९ पा. २७२)*

● ब्राह्मणास शिवी देईल तर त्याची जिव्हा कापावी.

*(अध्याय ८ - २१९)*

आता शूद्राने शेती करीत असता, किडा, मुंगी तरू तुटणार. भूमी खणली जाणार, ते पाप लागणार, त्या पापातून मुक्त होण्याकरता धान्याचा बराच हिस्सा ब्राह्मणाला द्यावा.'

आणि यांनी देवाची धमकी देऊन विनाश्रम खुशाल जगावे.

'वृक्षं छित्वा, महीम् भित्वा।
हत्वाच कृमिकीटकान। कर्षक:खलयज्ञेन सर्व पापै: प्रमुच्यते।।

- यज्ञाची अंगे असंपूर्ण असल्यास शूद्राच्या गृहातून बलात्काराने किंवा चोरी करून नि:शंकपणे आणावी.

शेतकऱ्याबरोबरची ही वागणूक पेशवाईत याहूनही कठोरतेने अंमलात आणली होती.

'पेशव्यांचे अधिकाऱ्यांनी मागितलेली रक्कम शेतकऱ्याने दिली नाही तर त्याच्या मुलांच्या अंगावर उकळत्या कढईतील तेल ओतीत! तवे तापवून शेतकऱ्यांना त्यावर उभे करीत! पाठीवर मोठमोठे दगड ठेवीत. ओणवे करून त्यांच्या नाकाखाली मिरचीचा धूर देण्यात येई. कानात व बेंबीत बंदुकीची दारू घालून उडवीत. ही मनुच्या कायद्याची प्रगती होय?

**राजाचा दर्जा :**

बरे राजाला देव बनवला असला तरी त्यांचा दर्जा त्यांच्या खालचाच! त्याने धर्मगुरुंची हुकमत ऐकायची. त्यांनी घालून दिलेले कायदे लोकांकडून पाळायला लावायचे! योग्यतेचे मानाने :-

'दहा वर्षाचा ब्राह्मण व शंभर वर्षाचा क्षत्रिय हे पिता पुत्रासारखे आहेत असे समजावे. त्यातील ब्राह्मण हा पिता होय.

*(अध्याय २ श्लोक ३५)*

बरे, खालच्या वर्गाने स्वत:च्या डोक्याने विचार करू नये म्हणून त्याला अज्ञानात ठेवण्याची क्लृप्ती काढलीच होती. हा धूर्तपणा वसिष्ठ-विश्वामित्र संवादांत दिसून येईल.

**अज्ञानात ठेवण्याची क्लुप्ती :** वसिष्ठ विश्वामित्राला म्हणतो.

'लोकांना ज्ञान देण्याचा नाद तू सोडून दे. एक वेळ लोक ज्ञानाच्या मार्गाला लागले म्हणजे ते आटोक्यात राहणार नाहीत. आपला बोजा नाहीसा होईल आणि बसलेली घडी विस्कटेल.'

विश्वामित्र - आपण लोकांना ज्ञान देण्याचे टाळलं तरी ते रात्रीचे आकाशातील तारे ग्रह वगैरे पाहून स्वतंत्र विचार करावयास लागणारच. त्यामुळे ते ज्ञानी होणे शक्य आहे. त्यापेक्षा आपण मिळवलेले ज्ञान त्यांना देऊन ज्ञानाचा मार्ग सर्वांना मोकळे करणेच इष्ट वाटते.

वसिष्ट - तू आकाशातील ताऱ्यांचा बाऊ करू नकोस. मी त्याचा विचार केला आहे. त्या प्रत्येक ताऱ्याला एक एका देवताचे नाव देऊन त्याचे स्तोत्र रचून त्यांचे पूजेत अर्चेत गुंतवले म्हणजे लोक त्यातच गुंगून राहतील अशी माझी खात्री आहे.

१८३० साली ख्रिश्चन रॉयल गॅझेटने असेच आज्ञापत्र काढले होते.

आम्ही गुलामांना शिक्षण देऊन त्यांच्यात जागृती करू देणार नाही. गुलाम हे आमच्या इस्टेटीचा भाग आहेत.

या विरुद्ध ज्यांनी धडपड केली त्यांना तुरुंगात टाकलं, जाळलं व कत्तल केली. जी वृत्ती वसिष्ठाची तीच पोपची !

याच धोरणाने पेशव्यांनी खालच्या समाजाला शिक्षण न मिळेल अशी व्यवस्था करून ठेवली या विरुद्ध उठाव फुल्यांनी केला म्हणून त्यांचे हाल हाल केले. त्यांच्या पत्नीची विटंबना करण्यात आली. फुल्यांचा खून करण्याचाही प्रयत्न झाला. इंग्रजी अमदानी आल्यावरही शिक्षणासाठी झगडावे लागले.

या ब्राह्मणी कुटिल नीतीचे अंतरंग ज्योतिबांनी पूर्ण जाणले होते. म्हणूनच त्यांनी शिक्षणावर मुख्य जोर दिला. महाराष्ट्राचे राज्य बहुजन समाजाच्या हातात येताच ना. यशवंतराव चव्हाणांच्या प्रोत्साहनाने ना. बाळासाहेब देसाई यांनी मोफत सार्वत्रिक शिक्षण करून मोठी ऐतिहासिक कामगिरी केली. फुल्याचं उद्दिष्ट पुरं केलं व ज्ञानाची वाट खालच्या समाजाला मोकळी करून दिली !

ब्राह्मणी राज्यात ब्राह्मण आपणांस राज्यकर्ता वर्ग समजत, सरकारी सारा आकारणीत ब्राह्मणाला भरभराट सूट मिळे. ब्राह्मण गुन्हेगारांना निर्बंधाप्रमाणे जी शिक्षा होईल ती त्यांना देण्यात येत नसे. ब्राह्मणांच्या जेवणासाठी लाखो रुपयांचा चुराडा होत असे -

**आमची ढिलाई :** हा चुराडा थांबवण्याची छाती आजच्या सरकारला अद्याप होत नाही. कारण बहुतेक मंत्री अद्याप अंधश्रद्धेत गुरफटलेलेच आहेत ! व ते धार्मिकतेचं प्रदर्शनही करतात. ही मोठी दु:खाचीच नव्हे तर धोक्याची गोष्ट आहे. कारण ते मंत्रिपदावर असल्यामुळे त्या देव धर्म अंधश्रद्धेला सरकारी मान्यता मिळाल्याचा भास होतो.

देवालयाचे उद्‌घाटन करणे, जत्रेत भाग घेणे याने धर्म भोळ्यांच्यात लोकप्रियता मिळते पण तेवढा मोठा समाज पुन: देवाधर्माच्या सापळ्यात अडकवला जातो ! तो त्यात अडकून पडलेलाच आहे. त्याला आणखी खाली ढकलतो. आचार्य व प्राचार्य भावी पिढीला धार्मिकतेचे डोस पाजतात वर्तमानपत्रे तात्कालिक खपाचा विचार करून, धर्मभोळेपणाचं वातावरण निर्माण करतात.

तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशी म्हणतात,

'आपले लोकशाहीचे प्रतिनिधी सुद्धा परंपरागत मांत्रिक संस्कृतीचे बळी आहेत. जे अजून जादुगार साधूंच्या सार्वजनिक पूजा बांधत आहेत ! परंतु त्याचे हाती तर आपल्या शिक्षण संस्थांची मार्गदर्शक तत्त्वे ठरविण्याचे अधिकार आहेत !

हे मार्गदर्शक अजाणपणे आपल्या परंपरागत अंधश्रद्धेच्या पाशात सापडलेले दिसतात ! यामुळे आपल्या वैज्ञानिक प्रगतीचे भवितव्य कठीण आहे.

कोल्हापुरात तर काही प्राचार्य आपण मूर्तिपूजक आहोत असे म्हणण्यात मोठेपणा मानतात.

मग गोळवलकर व गिरीच्या शंकराचार्यांना आता रान, आपले विचार पेरायला भुसभुशीत झालं आहे असं कां वाटू नये.

**नवे राज्य, जुनी विचारसरणी :** राज्य कॉंग्रेसचं आलं. घटनेने लोकशाही समाजवाद स्वीकारलेला असला तरी ती विचारसरणी खालपर्यंत पोचली नाही. निधर्मी राज्य म्हणजे प्रत्येक धर्मियांनी वाटेल तसा धुमाकूळ घालणे असा झाला आहे. राज्यातील, निरनिराळ्या धर्मांच्या मंत्र्यांनी आपआपल्या धर्मियातील धर्मभावना पोसल्यास निधर्मी राज्य हे स्वप्न राहील ! बहुतेक आमदार व मंत्र्यांपुढे निवडणुका असल्यामुळे बहुसंख्य समाजाच्या अंधश्रद्धेला दुखवून त्यांना मते गमावण्याचा त्याग कसा होणार ?

**पेशवाई गेली नाही :** आता खालील गोष्ट ऐकल्यानंतर पेशवाई गेली असं कसं म्हणता येईल !

'गुजराथमधील सिरोट येथे ५० लाख रुपयाची धूळदाण करून लक्षचंडी महायज्ञ करण्यात आला म्हणतात ! पुन: याच धर्म मार्तंडांनी दुसरा कोटिचंड यज्ञाचा संकल्प सोडला. त्या यज्ञात म्हणे सव्वा लाख ब्राह्मण जेवून तृप्त होणार ! या यज्ञात ३।। लाख मण तीळ: १ लाख मण तांदूळ, ५० हजार मण जव, २५ हजार मण तूप वगैरे लागणार आणि या मूर्खपणास १२ कोटी रुपये खर्च येणार !

याच आमच्या समाजवादी राज्यात देवालयांचे उत्पन्नाचे आकडे पहा ! हे अधिकृत कमिटीचे आहेत.

बिहारमधील देवालयाचे वार्षिक उत्पन्न ११ लक्ष ७० हजार - गुजरात २७ लक्ष: केरळ २५ लक्ष: मद्रास १ कोटी ८२ लक्ष: महाराष्ट्र २९ लक्ष: म्हैसूर ३३ लक्ष: ओरीसा ३२ लक्ष: उत्तर प्रदेश ११ लक्ष ६० हजार: तिरुपति मंदिराची स्थावर मालमत्ता ७ कोटी बत्तीस लक्षावर: जड जवाहीर १ कोटी ४५ लक्षावर देवळाचे उत्पन्न १ कोट ४६ लक्ष -

अस्पृश्यावरील भयंकर अन्यायाची आपण कितीही वर्णने ऐकली तरी आपण या सर्व अन्यायाच्या मूळावर का घाव घालतो का ? आपण भयानक रुढी टाकली पाहिजे म्हणतो. पण या रुढीला आधार काय ? धर्माचा !

वर्णाश्रमातूनच जातींचा जन्म झाला ! त्या जातींना व वर्णाश्रमाला धर्माचा आधार ! आणि या धर्मांना देवाची मान्यता !

त्याच देवा-धर्माला आम्ही उचलून धरतो. आणि देवा-धर्माविरुद्ध बोललो की आकांड तांडव करतो ! नुसता रुढीवर हल्ला करायचा. परंपरेवर टीका करायची पण सर्व अन्यायाचं माहेरघर जे देव त्याला फेकून द्यायचा नाही. मूळ राखायचं आणि फांद्या तोडायच्या ! यामुळे त्याची वाढ अधिक होते. तोच अनुभव सारखा येत आहे.

जे जे अन्याय होतात त्याच्या मागे देव उभा असतो. त्यांना ते धार्मिक कृत्यच वाटतं. त्या राक्षसी अत्याचाराला, ती माणसे जबाबदार नव्हेत. देव-धर्म या भावना जबाबदार होत. याचा विचार डोक्यात येत नाही.

खालील बातमी ता. २६-१-६९ च्या मराठ्याच्या अग्रलेखात वाचली-

ज्या लोकांनी खालील राक्षसी अत्याचार केले ते काही राक्षस होते असं कसं म्हणता येईल ! देव धर्मानंच त्यांना राक्षस नाही कां बनवलं !

सरकारने सामाजिक समतेचं ध्येय अमलांत आणायचं तर सर्वांनीच हातभार लावायला नको काय ? मंत्र्याची कृती अंधश्रद्धेला पोषक असल्यास - आणि ती आहे असं असता नुसता अन्यायावर हल्ला करून काय उपयोग- अन्याय कशामुळे केला जातो याचा विचार करायला नको काय ?

ही मी 'मराठ्यातील'च गोष्ट उद्धृत करीत आहे.

'उत्तर प्रदेशच्या बांदा जिल्ह्यात बेहरू नावाचे एक खेडे आहे. तेथील अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जातीतील जनतेला गावच्या सार्वजनिक विहिरीवर पाणी भरण्याचा हक्क नाही. त्या जातीतल्या माणसांनी पैसे दिले तरी त्याचे केस कापण्याची बंदी तेथील नापितावर आणि त्या माणसाचे कपडे धुण्याची बंदी तेथील धोब्यावर तेथील ठाकूर जमातीच्या राजपूत जमीनदारांनी आणि इतर प्रतिष्ठित जातीतल्या सधन आणि वजनदार गावकऱ्यांनी घातलेली आहे. या विरुद्ध तेथील दलित जातीच्या जनतेने आवाज उठवला. लगेच त्या दलित जनतेमधल्या एका अमुखाविरुद्ध खोटी तक्रार नोंदवण्यात आली. त्याला पोलिसांनी चौकशीसाठी पोलीस ठाण्यावर नेले. त्याच्या पाठोपाठ बेहरू येथील ठाकूर जमीनदारही आपल्या सशस्त्र गुंडांच्या टोळक्यासहित गेले. त्यांनी पोलीस ठाण्यात घुसून त्या कार्यकर्त्याला धरले, खाली पाडून त्याच्या डोळ्यामध्ये त्या पाषाण हृदयी गुंडांनी बोटे खुपसली आणि त्याचे दोन्ही डोळे अक्षरश: उपसून बाहेर काढले आणि त्या भयंकर वेदनांनी तळमळत असताना ते नराधम खदखदा हसत होते. अखेर त्याला बंदुकीची गोळी घालून त्याचा त्यांनी पोलीसांसमक्ष खून केला.'

दुसरी हकीकत तशीच भयानक आहे.

'किलवेनमणी येथील एका हरिजन दुकानदाराला तेथील काही उच्च

वर्णीय इसमांनी धरून बांधून नेल्यामुळे त्या गावातले सर्व पक्षाचे हरिजन त्या दुकानदाराच्या सुटकेची मागणी करायला गेले. पण त्यांच्यावर हल्ला चढवल्यामुळे झालेल्या चकमकीत एक उच्च जातीचा इसम मारला गेला. त्याचा सूड घेण्यासाठी उच्च जातीच्या हत्यारबंद गुंडांनी त्या झोपडीचे दार बाहेरून बंद करून ती झोपडी पेटवून दिली. त्यामुळे आतील ते सर्व अभागी जीव होरपळून प्राणास मुकले !

या राक्षसी कृत्याला जबाबदार मनुस्मृतिकार नव्हेत काय ? त्यांनीच अशा वागणुकीला सँक्शन दिलं होतं. त्या मनुस्मृतीस ईश्वरप्रणित धर्म बनवला होता. पेशव्यांनी त्याची अंमलबजावणी केली होती. तीच परंपरा आता टिकवली गेली आहे ! या कृत्याला आधार देवाचाच घेतला होता. तेव्हा देव ठेवून या अंधश्रद्धा जाणार कशा ?

हे सर्व निर्धोकपणे चालते असे वाटल्यानंतर गोळवलकरांना पुन: पेशवाई राजवट आणावी असं का वाटू नये ? अंधश्रद्धा तर मंत्री पोसतात !

वृत्तपत्रे तर अंधश्रद्धेला पोसतात. एकाच वेळी गोळवलकरांचा निषेध व त्याचवेळी त्यांच्या विचारांचा उदो उदो !

ते विचार 'देव धर्म पुनर्जन्म चमत्कार' इंग्रजी भाषेत दत्ता बाळ ही व्यक्ती मांडते व हे गृहस्थ केवळ मराठा जातीतले आहेत म्हणून यांच्या विचारावर टीका केली जात नाही ! ! कौतुक केलं जातं.

शिवछत्रपतींनी स्वातंत्र्याआड येणाऱ्या रक्तसंबंधालाही बाजूस टाकलं. आपण गोळवलकरांना अनुकूल वातावरण करून देणाऱ्याचा अवतार बनवतो. व त्याच्या प्रतिगामी विचाराचं समर्थन करतो व बहुजन समाजाला गोळवलकरांच्या दावणीस देतो ! जे हाडाचे सत्यशोधक आहेत त्यांनी तरी विचार करावा.

मी गोळवलकरांना शत्रू मानत नाही तसं दत्ता बाळला मानत नाही. पण त्यांच्या विचाराचा पक्का द्वेष्टा आहे. दोघेही बहुजन समाजाला अंधश्रद्धेच्या साखळीत अडकवून वर्णाश्रम धर्माची जणू पुनर्स्थापना करीत आहेत.

म्हणून व्यक्तींना शत्रू न मानता त्यांच्या प्रचाराविरुद्ध मोहीम उघडली पाहिजे.

**देव म्हणजे विषमतेचं मूळ !** : देव मानला की विषमतेला सुरुवात झाली ! देवाला मोठं केलं की आपण क्षुद्र बनतो ! देव मानला की हुकुमशाहीचा स्वीकार केला !

**प्रार्थना म्हणजे सामुदायिक भीक** : देव मानला की तुम्ही परावलंबी झाला ! तुमच्यातलं कर्तृत्व नष्ट झालं ! कर्ता करविता तो ! त्याच्या कृपेवर सारं जीवित्व अवलंबून !

'असेल माझा हरि तर देईल खाटल्यावरी' ही आमची भूमिका !

मग करा प्रार्थना, मागा भीक, द्या लाच. अन् या प्रार्थनेची महती ज्यांच्या पदरात दक्षणा पडते, ऐश्वर्य भोगता येते, त्यांनी वाढवायची !

बेकारांना व असंतुष्टांना शांत करण्याकरता ते आपल्या अंगावर येऊ नयेत म्हणून पुनर्जन्म आहे अशी खात्री पटवून त्यांची बंडाळी थोपवून धरायची !

हे काम मनूने केले आहे. त्याच विचाराला गोळवलकरांनी उचलून धरले आहे. त्याच विचाराला दत्ता बाळनी इंग्रजी पॉलिश देऊन लोकांना चकवायला सुरुवात केली आहे. म्हणून मी इशारा देतो-

आंबेडकरांच्या अभिमान्यांनो हुश्शार ! सत्यशोधकांनो हुश्शार !

समाज़वाद्यांनो हुश्शार !

शेतकरी - कामगार पक्षाच्या अभिमान्यांनो हुश्शार ! धोक्याचा काल येत आहे हुश्शार !

मंत्र्यांनो, तुम्हाला देशाचं स्वातंत्र्य व राष्ट्रीय एकात्मता टिकवायची असेल, लोकशाही समाजवादी ध्येय राखायचं असेल तर, जागे रहा व स्वत: अंधश्रद्धा टाका.

*(गोळवलकरी राज्य आलं तर)*

# कांही व्यक्तिचित्रे

## आचार्य जावडेकर

आज आचार्य नाहीत !!!

पण अशा थोर विभूतीचं प्रेम, सहवास, सहकार्य आणि संकटकाळी आधार आणि पाठिंबा मला मिळू शकला हे लिहिण्यास मला किती अभिमान वाटतो. वयाने मोठे नव्हेत पण त्यांच्या विद्वत्तेचा विचार केला म्हणजे त्यांच्या पायाजवळही बसण्याचा मला अधिकार नाही.

पण तो अधिकार मला त्यांनी दिला.

आपल्या मोठेपणाची जाणीव त्यांनी - त्यांच्या माझ्या सहवासात मला कधीही भासू दिली नाही.

बरोबरीच्या नात्याने वागवले, बोलले, हातात हात घालून सहकार्य केले. माझ्या जीवनात त्यांच्या सत्संगतीची केवढी मोलाची भर पडली. ती कोण काढून घेणार !

गेले ! पण बहुमोल असा वैचारिक ठेवा स्वाधीन करून गेले. केवढी अक्षय संपत्ती बहाल करून गेले. !

'आध्यात्मिक आदर्शवाद आणि राजकीय वास्तववाद यांचा समन्वय साधल्यावाचून शुद्ध लोकशाही किंवा म. गांधी जिला अहिंसाधिष्ठित लोकशाही असे नाव देतात ती निर्माण होणार नाही.' या वाक्यात ती संपत्ती गोठलेली आहे.

आचार्य जावडेकरांचे व माझे संबंध १९३० सालापासूनचे. प्रथम एकमेकांत वैचारिक आकर्षण निर्माण झाले. आणि लोहचुंबकाने ओढून घ्यावे त्याप्रमाणे त्यांनी मला ओढून घेतले. त्यांनीचं तशी इच्छा प्रकट केली याला कारण झाले, मी १९३१ साली लिहिलेले - 'नव्या पिढीचे राजकारण' जे समाजवादी विचारसरणीचे महाराष्ट्रातील मराठी भाषेतील हे पहिलेच पुस्तक. हे पुस्तक शंकररावजी जावडेकर व शंकरराव देव या दोघांनाही फार आवडले व तशी त्यांची मला पत्रे पण आली.

आचार्य शंकरराव जावडेकर लिहितात - "या पुस्तकातील विचार सत्यशोधक समाज, ब्राह्मणेतर जनता व एकंदर महाराष्ट्र याने ग्रहण केल्यास महाराष्ट्राच्या कर्तृत्त्वास योग्य दिशा लागून त्यांच्या चालू इतिहासास नवे वळण लागेल. विशेषत: गांधींचा अहिंसावाद व कम्युनिझम् याची जी जोड या पुस्तकात दृष्टीस पडते, ती माझ्या मते फार महत्त्वाची आहे."

आणि त्याचबरोबर त्यांचे परमस्नेही सहकारी व महाराष्ट्राचे गांधीवादी पुढारी शंकरराव देव यांचेही पत्र आले. ते लिहितात :

"आपण प्रकट केलेले उदात्त, सात्त्विक व खोल विचार यांनी आम्हां सर्वांना आपण फार निकट बनवले आहे. हे विचार आचारात उतरविण्यासाठी काही संघटनात्मक कार्य महाराष्ट्रात व्हावे अशी आम्हां सर्वांची मनापासूनची इच्छा आहे."

शंकरराव जावडेकर व देव यांची मैत्री अत्यंत दृढ अशी होती. परस्परांत कमालीचा जिव्हाळा होता. तो आचार्यांच्या अंतापर्यंत टिकला.

आचार्य जावडेकरांनी मला 'आपण शक्य झाल्यास मजकडे येत जा. आपल्याला विचार करता येईल', संघटनात्मक कार्याचाही विचार करता येईल, असे सांगावे पाठवले. ज्यांना एस्. एम. जोशी, नानासाहेब गोरे, रावसाहेब व अच्युतराव पटवर्धन गुरू मानतात, त्यांचा सहवास मिळणे म्हणजे केवढी भाग्याची गोष्ट ! मी इस्लामपूरला त्यांच्या राहत्या घरी जाऊ लागलो. तेथे राहू लागलो, त्यांच्या लोभाचाही वाटा मिळू लागला. विश्वविद्यालयीन शिक्षणाहूनही उच्च आणि माझ्या ध्येयाला व विचाराला अनुकूल असे शिक्षण आणि मार्गदर्शन, मला मिळू लागले. त्यांची बसण्याची, लिहिण्याची व वाचन करण्याची जागा एकच होती. खोलीत बिछान्याशेजारी रॅक्सवर मराठी, इंग्रजी व संस्कृत राज्यशास्त्राची पुस्तके खच्चून भरलेली असत. रात्री लागलेच एखादे, तर चटकन हाताला लागावे. दम्याच्या आजारामुळे त्यांना फिरणे वगैरे होत नसे. घरीच पडून रहावे लागे. त्यामुळे वाचन व लेखन हाच व्यवसाय, हीच विश्रांती व हीच त्यांना एकमेव करमणूक होती. त्यांच्या सुशील सेवारत पत्नीने प्रेमाने व अगत्याने पुढे ठेवलेले अन्न, मला सेवन करता आले ही माझी पुण्याई.

वादविवादात अगर घरगुती बाबतीत म्हणा, त्यांचा स्वभाव आग्रही नव्हता. दुसऱ्याचे विचार शांतपणे ऐकून घेऊन त्यातले काही घेता आले तर ते घेण्यास, त्यांना कधीही कमीपणा वाटला नाही.

शंकरराव जावडेकर, हे शांत सागरासारखे ! आतून वहाणाऱ्या शांत जलप्रवाहाप्रमाणे, आपले विचार मांडणार ! त्यांची भाषा म्हणजे, वाऱ्याच्या शीतल

झुळकेबरोबर खाली पडणारी पारिजात पुष्पांची वृष्टीच जणू. चेहऱ्यावर राग, चीड या भावना जराही दिसणार नाहीत. दुसऱ्याची मते खोडून काढण्याचा अट्टाहास न धरता, आपले विचार जेवढे सुस्पष्ट करता येतील; तेवढे करण्याचा प्रयत्न करणार. पक्षीय पुढाऱ्याप्रमाणे, त्यांच्या भाषणात चढेलपणा जराही दिसून येणार नाही. विरोधी मताबद्दलही आदर बाळगून बोलणार. यामुळे जावडेकरांनी आपल्या आयुष्यात एकही शत्रू निर्माण केला नाही. समन्वय साधण्याचा सतत प्रयत्न केला आहे. ते समन्वयी होते. टिळक व आगरकर या दोघांनाही ते पूज्य मानत. जावडेकरांच्यात दोघांच्या विचारांचा समन्वय झाला होता- एकांगी हेकेखोरपणा नव्हता. टिळकांचा प्राचीन संस्कृतीचा अभिमान व कडवा राष्ट्राभिमान, आगरकर आणि फुल्यांची सर्वांगीण सुधारणेची तळमळ व पाश्चात्त्यांच्या ज्ञानाचे अभ्यासू रसग्रहण, आचार्यांच्या विचारात, लिखाणात व आचारात आढळून येते.

कोरगावकर ट्रस्टच्या संमेलनात ते बोलू लागले म्हणजे त्यांचा प्रत्येक शब्द ऐकून घेण्याकरता श्रोत्यांची हालचाल, कुजबूज एकदम बंद होणार !

अरेरे, ते दिवस आता कुठले यायला ! ! !

आचार्यांचे भाषण म्हणजे अमृताच्या धारा ! त्यांतून गांधीवादाचा निर्मळ आणि सात्त्विक प्रवाह वहात असे. गांधीजी, अहिंसावाद बोलून गेले. तो राजकारणात आणण्याची त्यांनी जीवेभावे खटपट केली. त्या गांधीवादाला शास्त्रीय स्वरूप देण्याची महनीय कामगिरी केवळ आचार्य जावडेकरांनी केली. 'आधुनिक-भारतासारखा,' भारताचे अहिंसा तत्त्वज्ञानानुसार मार्गदर्शन करणारा, सर्व जगाला उपकारक असा हा ग्रंथ लिहून शंकरराव अमर झाले आहेत.

गीता रहस्यानंतर त्याच तोलाचा, त्यात पुन: अनुभवाची भर पडलेला, हा ग्रंथ ठरेल.

'मानवी समाजाची पूर्णतेची स्वप्ने कधीकाळी यशस्वी व्हायची असतील तर अहिंसेच्या साधनाचा विकास होत गेला पाहिजे.'

असे त्यांचे मत होते.

'सत्याग्रही भारतच जगाला वरील मूल्यांचा लाभ करून घेण्याचा मार्ग दाखवू शकेल.'

अशी थोर व्यक्ती मला मित्र म्हणून लाभावी हे केवढे भाग्य माझे ! जावडेकरांच्या मैत्रीचा, सहवासाचा व विचाराचा लाभ भरपूर करून घेता आला.

प्रजापरिषदेच्या सुरुवातीपासून, त्यांच्या विचारांचा व मार्गदर्शनाचा फायदा होत गेला. प्रजापरिषदेच्या संघटनेचा उपयोग मी अहिंसावादी-समाजवादाचा प्रचार करण्यात करून घेतला. प्रजापरिषदेचे ध्येय

जरी 'राजाच्या अधिपत्याखाली जबाबदार राज्यपद्धती' हे असले तरी माझी व्याख्याने असायची समाजवादी विचारसरणीची. यामुळे कोल्हापूरच्या राजकीय चळवळीला, सातारच्याप्रमाणे घातपाती चळवळीचे स्वरूप आले नाही. जे काही प्रकार झाले ते अनधिकृत होते. अन् त्यावेळी मी तुरुंगात होतो. तेथूनही मी या प्रकाराला माझी मान्यता दिली नाही. महात्माजींना ही चळवळ मान्य असणे शक्य नाही असे पत्रही धाडले होते. तुरुंगातून सुटल्यानंतर माझाच कयास खरा ठरला व गांधीजींनी या घातपाती चळवळीला आपली मान्यता नसल्याचे जाहीर केले.

कोल्हापूरला मी 'अखंड-भारत' म्हणून प्रभाकरपंत कोरगांवकर यांच्या सहाय्याने जे साप्ताहिक काढले त्यात आचार्य जावडेकर आपले लेख देऊ लागले. पुढे दुय्यम संपादकत्वही पत्करले. त्यांचे ते लेख एकत्रित करून माझ्या प्रेसमध्ये ते पुस्तक रूपाने प्रसिद्ध केले. त्याला प्रस्तावनाही जावडेकरांनीच लिहिली- ते लिहितात :

'क्रांतिकारक अहिंसावाद' ही लेखमाला प्रथम अखंड भारतात प्रसिद्ध करून व नंतर पुस्तकरूपाने प्रसिद्ध करून भाई बागल यांनी माझ्यावर उपकार केले आहेत. पुढे केव्हा तरी या विषयावर अधिक विस्तृत लिहिण्याचा माझा विचार आहे. तूर्त विचारी वाचकांपुढे मी एका विषयाचा केवळ उपन्यास सादर करीत आहे.'

*इस्लामपूर (जि. सातारा)* *-शं. द. जावडेकर*

प्रत्यक्ष कृतीनेही मी मजवर झालेल्या खुनी हल्ल्याला, अहिंसेनेच तोंड दिल्याचे पाहून तर जावडेकरांचा माझ्यावर फारच लोभ जडला. त्यांनी मला अनेक पुस्तकांच्या भेटी दिल्या. त्यातल्या काही नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे मागून नेलेल्यांपैकी परत आल्या नाहीत ! तरी काही आज माझ्या संग्रही आहेत. त्यांची मी अनेकवेळा पारायणे करून तांबड्या खुणांनी त्यातली पानें भरली आहेत. त्यांच्या पुस्तकाची यादी बरीच मोठी होईल. पण मजकडे आहेत ती:

(१) आधुनिक भारत (२) राजनीतिशास्त्र परिचय (३) समाजवाद आणि सर्वोदय (४) आधुनिक राज्यमीमांसा- भाग पहिला व दुसरा (५) लोकशाही (६) हिंदु-मुसलमान ऐक्य (७) गांधीवाद (८) महायुद्ध आणि राष्ट्रसभा (९) शास्त्रीय समाजवाद (१०) क्रांतिकारक अहिंसावाद.

अशा रीतीने सहवासामुळे 'अखंड-भारत' साप्ताहिकास दिलेल्या सहकार्यामुळे आणि विचारधनाचा मला वाटेकरी केल्यामुळे ते अधिकाधिक जवळ येत गेले.

यानंतर मजवर गुदरलेल्या - म्हणण्यापेक्षा ओढवून घेतलेल्या प्रसंगामुळे, ते फार अस्वस्थ झाले. तो प्रसंग मी केलेल्या नऊ दिवसाच्या अन्न सत्याग्रहाचा.

कोल्हापूर दरबारच्या नोकर लोकांनी पगारवाढीसाठी संप जाहीर केला होता. ... या संपाने फार मोठी मजल गाठली होती. हिंदुस्थानच्या इतिहासात नामनिर्देश करण्याजोगा हा संप होता. संपामुळे राज्याच्या कारभाराला खीळ पडली होती. मोठमोठ्या ऑफिसेसना टाळे पडले होते. जेथून ऑर्डर्स सुटायच्या त्या ऑफिसमध्ये ऑर्डर लिहायला आणि ती पोचवायला कोणी नव्हते. दरबारची स्थिती केविलवाणी झाली होती.

संपवाले व नागरिक या दोन्हीसाठी म्हणून मी मध्यस्थाची भूमिका घेतली होती. मागण्या बऱ्याच वाटाघाटीनंतर मान्य झाल्या. मि. आस्टिन हे पंतप्रधान होते. दरबारने मागण्या केल्या या समजुतीने लोक कामावर गेले. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून संप मागे घेण्यात आला. पण लोक कामावर गेल्यानंतर मंत्र्यांनी शाब्दिक कसरत करून आमचा विश्वासघात केला. म्हणून मी ६.२.४७ पासून उपवास जाहीर केला. यावेळी मला पाठिंबा देण्याकरिता आचार्य जावडेकरांनी मुद्दाम एक खास पत्रक काढले.

"कोल्हापुरात भाई माधवराव बागल यांनी दरबारच्या वचनभंगाविरूद्ध प्रायोपवेशन सुरू केले आहे. कोल्हापूर हे महाराष्ट्रातील महत्त्वाचे स्थान आहे. शिवछत्रपतींच्या स्मृतीशी कोल्हापूरचे नाव निगडित झालेले आहे. ब्राह्मणेतरांच्या सत्यशोधक चळवळीचे आश्रयस्थान कोल्हापूर होते. सातारा जिल्ह्यातील शेतकरी वर्गाच्या जागृतीत कोल्हापूर संस्थानचा फार मोठा संबंध आहे".

"कोल्हापूरच्या प्रजापरिषदेला सत्याग्रही दीक्षा देण्यात भाई माधवराव बागल यांनी महत्त्वाचे कार्य केलेले आहे. खरा सत्यशोधक हा सत्याग्रही असला पाहिजे, या निष्ठेने भाई बागल यांनी कोल्हापुरात एक नवजीवन निर्माण केले..... १९४२ च्या लढ्यात भाई माधवराव बागल आणि प्रजापरिषद यांनी धडाडीने भाग घेतला, आणि कोल्हापुरात प्रचंड क्रांतीची लाट उठली. अशा कोल्हापूरच्या नेत्याने आज कोल्हापूरच्या अधिकाऱ्यावर म्हणजे मंत्रिमंडळावर वचनभंगाचा उघड आरोप केला असून, प्रजापरिषदेच्या या नेत्याशी समेट करण्याची बुद्धी दरबारला झाली नाही तर, कोल्हापूर संस्थानचा राज्यकारभार भंग पावून तेथील अनियंत्रित सत्तेचा पूर्ण अंत झाल्यावाचून राहणार नाही."

आचार्यांचा हा शाप खरा ठरला.

अशा रीतीने ते माझ्यामुळे कोल्हापूरच्या राजकारणाशीही निगडित झाले होते. त्यांच्या अंताने महाराष्ट्राचा वैचारिक झरा नाहीसा झालाच, पण मला सतत मिळणारा प्रेमाचा आणि ज्ञानाचा लाभ पण नाहीसा झाला.

शंकररावजी माझ्याहून तसे मोठे नव्हते. समवयस्क म्हटले तरी चालेल.

त्यांचा जन्म १८९४ त झाला. माझा १९९६त झाला. पण ज्ञानाने त्यांनी 'एव्हरेस्ट' शिखर गाठले होते तर मी अद्याप पायथ्यापाशीच उभा आहे !

ते नुसते 'ईझिचेअर पोलिटीशियन' अगर वाचिवीर नव्हते.

असहकार युगात त्यांनी मुंबई विद्यापीठाला रामराम ठोकला व राजकारणात उडी घेतली. एम्. ए. चा अभ्यास करून परीक्षेच्या तयारीत असताना व फीही भरली असताना ते सर्व सोडून त्यांनी राष्ट्राच्या हाकेस ओ दिली.

कॉलेज सोडल्यानंतर इस्लामपूर जवळच्या पेठ या गावी 'महात्मा' नावाचे अस्पृश्यांकरता छात्रालय काढले. फुले आणि गांधी या दोघांचाही त्या नावात समावेश व्हावा.

ते स्वत: सत्तेच्या राजकारणात केव्हाही पडले नाहीत. पण पुढाऱ्यांना तत्त्वज्ञानाचा पुरवठा केला.

बी. ए. ला तत्त्वज्ञान, एम्. ए. ला राजकारण व अर्थशास्त्र हे विषय घेतले होते. शंकरराव देवांना त्यांच्या विचाराचा व सल्लामसलतीचा नेहमी फायदा व्हावयाचा. मार्क्सचा त्यानी स्वतंत्र बुद्धीने विचार करून तो निव्वळ जडवादी नाही हे त्यांनी सिद्ध केले.

१९३० च्या सत्याग्रहात तुरुंगात असताना त्यांची मुलगी वारली.

१९३२ ला पुन: तुरुंगवास पत्करला. त्यावेळी नाशिकच्या तुरुंगात असताना त्यांना पुष्कळ वाचन मनन चिंतन करता आले व आपल्या विचाराला निश्चित स्वरूप देता आले.

त्यांची ग्रंथनिष्पत्ती पुष्कळच आहे. पण निव्वळ करमणुकीसाठी त्यांनी काहीही लिहिले नाही. तो त्यांचा पिंडच नव्हता. काव्याची आवड होती. वाचन होते, पण काव्य लिहिलेले नाही. लघुकथा, कादंबऱ्या या प्रांतात ते कधीच शिरले नाहीत.

'आधुनिक-भारत' हा त्यांचा ग्रंथराज !

आचार्य भागवत या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात :

'या ग्रंथात आजपर्यंत स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करीत असलेल्या सर्व पक्षातील वेचक सद्गुण समाविष्ट करण्यात आले आहेत. सशस्त्र क्रांतिकारकांचा त्याग व शौर्य प्रागतिकांची विधायकवृत्ती समाजसुधारकांनी प्रतिपादलेल्या समता, स्त्री-स्वातंत्र्य इत्यादी गोष्टी आणि धर्मसुधारकांनी प्रतिपादलेली सत्य, अहिंसा, शुचिता इत्यादी तत्त्वे या सर्व विषयांचा सुंदर समन्वय साधलेला आहे."

त्यांच्या शांतियुगाची कल्पना खालील चार वाक्यांनीसुद्धा करता येईल.

'सत्याग्रही कर्मयोगी अहिंसक असल्याने यात शोकाला व पश्चात्तापाला

स्थान नाही. हा कर्मयोग जनतेने आत्मसात केला आणि जुलुमशाही संघटित असहकार करून न्यायासाठी स्वेच्छेने आत्मक्लेश सहन करण्याचे तपोबल जागृत केले तर साम्राज्यवादी युद्धे चालूच राहणार नाहीत.

ग्रंथनिष्पत्तीच करून ते राहिले नाहीत. वर्तमानपत्राचे साधनही त्यांनी हाताळले. आपल्या मताचा प्रचार केला. टिळक-आगरकरांच्या नंतर ध्येयनिष्ठेसाठी लिखाण करणारे जावडेकर हेच ठरतील. त्यांनी धंदा म्हणून तो हाती घेतला नाही.

१९३४ ला मुंबईच्या 'नवशक्ती' दैनिकाचे संपादक झाले. त्यानंतर पुण्याचे काँग्रेसचे 'लोकशक्ती' दैनिक चालवले. हे सुटल्यानंतर माझ्या 'अखंड-भारत' साप्ताहिकात नियमाने लिहू लागले. व नंतर संपादकत्वही स्वीकारले.

पुढे काही कालाने शंकरराव देव यांच्या प्रयत्नाने निघालेल्या 'नवभारत' या भारदस्त मासिकाचे जावडेकर व आचार्य भागवत या जोडीने संपादकत्व स्वीकारले. 'साधना' साप्ताहिकाला लेख पुरवता पुरवता त्याचेही संपादकत्व त्यांच्या गळ्यात पडले.

सत्याग्रही म्हणून, ग्रंथकार म्हणून, तत्त्वचिंतक म्हणून व तुरुंगवासही भोगलेल्या या थोर व्यक्तीचे आर्थिक जीवन सुखाचे नव्हते. त्यांना तो त्रास होऊ लागला. पण ते तो मुकाट्याने सहन करीत आपले कार्य करीत राहिले.

प्रभाकरपंत कोरगावकर यांना याची कल्पना येताच त्यांनी आपल्या ट्रस्ट तर्फे मानधन सुरू केले. पण त्यातील आवश्यक तेवढीच रक्कम स्वीकारून बाकीची ट्रस्टला परत केली. गरजेपेक्षा जास्त धनसंग्रह करायचा नाही हे तत्त्व प्रत्यक्षात आणले.

अशी माणसे पैशाने माणसाचे मोजमाप करणाऱ्या व्यवहारी जगात दिसणार नाहीत.

तथापि अशा गरीब ध्येयनिष्ठ आचार्यांच्या सारख्यांचेच जीवन समाजाला उपकारक आणि आदर्श ठरलेले आहे. आणि निव्वळ आर्थिकदृष्ट्या यशस्वी ठरलेले कालाच्या ओघात नाहीसे होऊन क्षुद्र ठरले आहेत.

त्यांचे विचार खऱ्या जड रत्नाहून मोलाचे आहेत. आचार्य म्हणतात-

'बुद्धिवाद ही एक जीवननिष्ठा आहे. आणि ती जीवननिष्ठा ज्यांना पाळावयाची असेल त्यांना सत्यनिष्ठेचे तपोबल ह्याची फार आवश्यकता आहे. सत्याचे संशोधन, सत्याचा प्रचार आणि सत्याची संस्थापना यासाठी क्लेश सहन करावे लागतात. आपली बुद्धी व भावना या दोहोंनाही शुद्ध ठेवण्यासाठी आत्मनिष्ठेला म्हणजेच सत्यनिष्ठेला जीवनात आद्य स्थान मिळाले पाहिजे.'

आचार्यांनी पण आपल्या जीवनात या सत्यनिष्ठेला स्थान देऊन आपले जीवन सफल केले. आचार विचारात सुसंगती राखली. त्यागाच्या वेळी मागे राहिले नाहीत.

खऱ्या वीराप्रमाणे मरणाचे शांतपणे व निर्विकारपणे स्वागत केले !

*(माझा परिवार)*

## केशवराव भोसले

केशवराव भोसले हे अशा गृहस्थांपैकी एक होते की पाहिल्याबरोबरच वाटावे हा माणूस सभ्य आहे. त्याच्यावर बेलाशक विश्वास टाकावा. वागणुकीत अगत्य, प्रेमळपणा, जणू आपल्याच सुखदु:खाचा वाटेकरी. सौजन्य पण त्याचबरोबर स्वाभिमान चेहऱ्यावरून ओळखावा.

**तोच खरा मित्र :** मला कोणी विचारले, 'असे कोणते कार्य पाहिले आहे तुम्ही केशवरावांचे म्हणून तुम्हाला लिहावेसे वाटले !' मला काही उत्तर देता येणार नाही. कारण हे लिहिताना मी त्याचा विचारच केला नाही. मी चित्रकार आहे आणि म्हणून माझी समजूत आहे की कोणाही माणसाचा पोट्रेट जर बरोबर काढता आला तर त्यावरून त्याच्या स्वभावाची, मनाची, अंतरंगाची कल्पना देता येते. त्यासाठी ती व्यक्ती प्रसिद्ध असावी लागतेच असं नाही.

केशवरावांची व माझी कशी ओळख झाली, केव्हा झाली हे मला काही आठवत नाही. कोणामुळे झाली हेही आठवत नाही. पण ओळख झाली आणि ते माझ्याकडे नेहमी येऊ लागले !

माझी मित्राची व्याख्या ही आहे. जो तुमच्याकडे कारणाशिवाय येतो, कसल्याही इच्छेने येत नाही, केवळ भेटावं याच एका हेतूने येतो, तोच खरा मित्र होय.

**आगगाडीतील प्रवासी :** आयुष्यात आलेल्या अनुभवानेच माझं हे मत बनले आहे. कितीतरी लोकांशी माझे संबंध आले. पण मुख्यत: ते आले केव्हा ? माझ्याकडून काही स्वार्थ साधण्याजोगा होता तेव्हा ! तो पुन: साधत नाही असे वाटताच ते आले तसे गेले ! जणू आगगाडीतील प्रवासी. पण ते काही स्वार्थासाठी येत नसतात, ते येतात तसे जातात. त्यांच्याबद्दल दु:ख होत नाही.

पण मनुष्य स्वभावात कसकसा बदल होत जातो हे डोके वापरल्याशिवायच कळून आले. त्यामुळे सत्ता आणि संपत्तीचा तिटकारा येऊ लागला. पैशाची माणसाला जरूर आहे. पण तो जरुरीपेक्षा अधिक साठू लागला किंवा साठवू लागला की, त्या माणसाची माणुसकी नष्ट होते. तीच गोष्ट सत्तेची.

मिळेल त्यात समाधान होत नाही. अधिक सत्तेची हव्यास लागते. त्या आड कोणी येईल त्याचा काटा काढण्याकरता वाटेल ते कृत्य तो करतो. मित्राचा गळा कापण्यासही कचरत नाही. औरंगजेबाने बापास तुरुंगात टाकलेच होते. अशी शेकडो उदाहरणे इतिहासात भरून आहेत.

**मोठी माणसे छोटी होतात :** सत्ता माणसाला भ्रष्ट करते. सत्तेबरोबर अहंभाव व गर्वाचा ताठा चढू लागतो. पूर्वी गरिबी असल्यास तिचा विसर पडतो. कृतज्ञताबुद्धी समूळ नष्ट होते अन् अशी मोठी दिसणारी माणसेच अतिशय छोटी होतात.

या आलेल्या अनुभवामुळे केशवराव लहान असूनही मला मोठे वाटतात.

**गोड अपघात :** केशवराव माझ्या जीवनात आले हा एक गोड अपघात म्हणावा लागेल. पण हा अपघात लांबला आणि त्यांचे येणे जाणे नेहमीचे झाले. ज्यावेळी माझ्याकडून त्यांचा कसलाच स्वार्थ साधण्याजोगा नव्हता त्यावेळी मला त्यांचे प्रेम मिळाले. म्हणून त्यांच्या भेटीत मी सात्त्विक आनंद उपभोगू शकतो व साहजिकच एक शिकवण मिळते,

'माधवराव, तूही जगाबरोबर असाच वाग.'

'निर्हेतुक प्रेम करायला शिक.'

जी शिकवण वाचून किंवा ऐकून मनात बिंबली नसती ती केशवरावांच्या सहवासातून बिंबली.

**अजातशत्रू :** केशवराव ही एक अजातशत्रू अशी व्यक्ती आहे. त्यांच्याबद्दल कोणी कधी वाईट बोललेले मी ऐकले नाही. काहींना सवय असते. ते कोणाबद्दलही बोलले तरी शिवी हासडल्याशिवाय बोलणार नाहीत आणि त्यामुळे आपण मोठे ठरतो अशी ते आपली समजूत करून घेतात !

केशवराव या दृष्टीने कितीतरी संयमी. ओळख झाली की, केशवराव हरएक तऱ्हेने त्याच्या उपयोगी पडणार ! करता येईल ती सेवा करणार. मदत करणार. पण हे सर्व अगदी निर्हेतुकपणे. म्हणून मी म्हणेन केशवराव मोठा माणूस.

केशवराव सत्तावान व धनवान यांची लाळ घोटत बसणार नाहीत. पण मित्रासाठी कष्ट पडले तर त्यांना ते कष्ट वाटणार नाहीत.

कोणताही सार्वजनिक समारंभ असो, केशवराव न बोलावता जाणार पण खुर्ची अडवण्याकरता नव्हे. तर काम करण्याकरता.... ! काम करणार पण मागं राहणार.

**वृत्तीत भरलेला सेवाभाव :** पण एखाद्या समारंभात आपल्या मित्राने शिष्टाचार सोडून वागणूक केल्यास ते तेथून निघून जाणार. पण तेथे त्याला उघड

विरोध करणार नाहीत.

अनेक संस्थेत जीव तोडून काम केले. पण त्यात सत्तेसाठी अगर कसल्या अधिकारासाठी धडपडणार नाहीत.

कोणी आजारी पडले तर घरच्या माणसाप्रमाणे त्याच्या उपयोगी पडणार. सेवाभावाने त्यांनी अनेक माणसे जोडली आहेत. त्यापैकी मी एक आहे.

हक्काने काही काम सांगावे आणि मानापमानाची भावना टाकून ते उरकावे. यामुळे ते पूर्वी कोण होते, त्यांनी काय काम केले, कोणती जबाबदारीची कामे केली... याचा शोध करण्याचे मला मुळीच कारण पडले नाही. मला जो अनुभव आला, जे मला पाहता आले तेवढे पुरे आहे.

*(माझा परिवार)*

## भालजी पेंढारकर

पाहिल्याबरोबर वाटावं हा कोणी तरी स्वयंसेवक आहे. सामान्य कार्यकर्ता आहे. अंगात सदरा, हात छाटलेला सदरा - मुंड म्हणा ना. खाली स्वयंसेवकाची चड्डी. आणि डोकं ! जवळ जवळ चमन् गोटा ! कॉंग्रेसचा सर्वोदयीपंथी कार्यकर्ता जणु.

पण हा भ्रम ही स्वारी जवळ आल्यानंतर टिकत नाही. लांबून दिसणारा गांधीछाप पेहेराव जवळ येताच नष्ट होतो. तिथं गिरणीचं शुभ्र कापड दिसू लागतं. चांगल्यापैकी हरक.

या सामान्य थर्डक्लास वाटणाऱ्या स्वयंसेवकाची, मालकीची मोटर मागे उभी होती. तीत त्यांचा ड्रायव्हर होता. आदराने बोलणारा घोळका सभोवार होता. म्हणजे हा काही पुछाट माणूस नव्हता हे कोणालाही, म्हणजे आंधळा नसलेल्याला सहज कळून येईल.

या व्यक्तीचं नाव भालजी पेंढारकर. कोल्हापुरातच नव्हे तर महाराष्ट्राच्या ओळखीची प्रसिद्ध व्यक्ती. साऱ्या चित्रपटसृष्टीच्या माहितीची व मान्यतेची. तसेच हिंदुसभा व हिंदुसंघटनेचे मान्यवर कार्यकर्ते.

हाडाचे कलावंत.

पण असला भिकार सौंदर्यहीन पेहेराव घालून का हिंडत असतील ते तेच जाणे ! मी म्हणेन स्वभावातला हा एक चक्रमपणा !

कारण तसं त्यांचं जीवन काही साधे नाही. त्यांना सौंदर्याची भरपूर आवड आहे. घरची राहणी उच्च दर्जाची आहे. त्यातही सौंदर्याची आवड व निवड दिसून

येते. ती नसती तर चित्रपट यशस्वी व आकर्षक झालेच नसते. सौंदर्याची आवड पारख आणि निवड करता आली नसती, तर सुंदर नटींची अन् पात्रांची निवड करता आली नसती. जवळचा आश्रय देता आला नसता. चित्रपटात त्यांना मनाप्रमाणे तयार करता आलं नसतं. कलावान हा त्या सौंदर्याशी चिकटून राहू शकत नाही. तो एखाद्याच कमलपुष्पात बसत नाही. तो फुलपाखरासारखा सृष्टीत भरून राहिलेल्या फुलांचा रस चाखत, विहार करीत असतो. मोठमोठ्या कलावंतांचं जीवन हे असंच असतं. भालजी हे महाराष्ट्रातले एक थोर कलावंत आहेत.

भालजी मैत्रीला चांगले आहेत. उदार आहेत. खर्चिक आहेत. बोलण्यात मनमोकळेपणा आहे. विनोद आहे. खोचकपणा आहे. फटकळपणा आहे. अश्लीलता सलगीत कधीच डोकावत नाही असं मी म्हणणार नाही ! पण ती हास्य उधळणारी आहे. फटकळपणा असला तरी माणूस तोडणारा नाही.

मी तरी भालजींना माझ्या परिवारातले समजतो. त्यांची मते व माझी मते कधी कळण्याजोगी नाहीत. ते हिंदुसभावाले आहेत. धर्माभिमानी आहेत. देवपूजक आहेत. मी कोणच्याच धर्माचा अभिमानी नाही. देव मानत नाही. राजभक्ती माझ्या अंगी नाही. तरी मी त्यांना मित्र मानतो. माणूस म्हणून जे गुण त्यांच्या अंगी मला आढळले त्या माणुसकीचा मी पूजक आहे. धर्म अजिबात मानत नाही असंही नाही. मी मानवताधर्म मानतो. ती मानवता भालजींच्यात आहे. त्याचा मला अनेक वेळा अनुभव आला आहे. खूप प्रसिद्धीस आलेल्या माणसात मानवता असतेच असं नाही. तो मनाने क्षुद्र असतो. मग त्याने हजारो रूपयाच्या देणग्या दिलेल्या का असेनात. अगदी क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टीत व वागणुकीत त्याचा स्वभाव उघडा होतो. 'बुंदसे गयी तो हौदसे नहीं आती' अशी काहीतरी म्हण मला आठवते.

एका मित्राने जिव्हाळ्याने दिलेले सँडविचीसचे डबे मला आठवतात. एका कैद्याने आपल्या वाटणीचा दिलेला आंबा मला दस लाखाचा वाटतो. त्याचा कधीच विसर पडत नाही. वर्षातून कधी तरी, सणावाराला दिले जाणाऱ्या मेजवानीतले ते दोन आंबे होते. त्या दातृत्वात खरे औदार्य, खरी माणुसकी होती. मानवता होती. ती कोट्याधिशातही आढळत नाही.

मित्र म्हणून जे अगत्य व निरपेक्ष प्रेम मला भालजींकडून एके काळी मिळालं ते मला बहुमोल वाटतं. ती वागणूक मी विसरणार नाही.

ते छत्रपती-अभिमानी, पण मी ज्या वेळी छत्रपतीशी लढा देत होतो. त्या वेळी मी तुरुंगात असताना भालजी मला भेटायला येत. फराळाचं व जेवणाचं चांगलं चांगलं करून घेऊन येत. त्यावेळी एकाकी पडलेल्या माझ्या घराला भेट

देत. आणि हेही ते गादीभक्त असून.

त्यावेळी माझ्या आप्तांपैकी रक्तसंबंधीही माझ्याकडं कोणी येत नसत. फिरकत नसत. जातवाले येत नसत. सर्वांनी वाळीत टाकलेल्या वेळी त्यांनी मला कुटुंबिय मानलं. एकाकी पडलेल्या माझ्या पत्नीला बंधुत्वाचा आधार दिला. पन्हाळगडावर मी स्थानबद्ध असताना माझ्या कुटुंबियांना आपल्या गाडीतून घेऊन मला भेटायला आणीत. माझ्या पत्नीला भाऊबीजेची ओवाळणी त्यांनी घातली आहे. आमच्या करमणुकीसाठी, आम्हाला तो घेणं परवडणार नाही हे जाणून रेडियो घेऊन दिला. या मजवर दाखविलेल्या प्रेमामुळे ते स्वत: संकटात येणार होते. ते राजकोपात पडण्याची शक्यता होती. धंद्यावर परिणाम झाला असता. म्हणून या छोट्या गोष्टीला मी फार महत्त्व देतो.

आणखी अशीच गोष्ट. त्यांनी माझ्याप्रमाणे काही राजाविरुद्ध लढा सुरू केला नव्हता. त्यांचा धंदा राजाच्या सहानुभूतीवर पुष्कळ अवलंबून होता. अशा वेळी त्यांच्या एका मित्रावर राजाची अवकृपा झाली. त्याला राजवाड्यातील आवारातील बंगला एकदम खाली करण्याची आज्ञा झाली. राजा फिरला की संस्थांनी जग सारं फिरतं. नातीगोती विसरली जातात. ज्या मंत्र्यांच्या स्तुतिपाठाने वर्तमानपत्रांचे रकाने भरले जात ते लगेच उलटले ! त्यांच्या टीकेने भरलेले जादा अंक काढले. पण भालजी मैत्रीस जागले व माझा बंगला तुमचा आहे असं समजा म्हणून त्या मंत्र्याला मदतीचा हात पुढे केला. तशीच वागणूक माझ्याशी केली आणि हे सारं वैचारिक दृष्ट्या आम्ही परस्परांपासून अगदी दूर असताना. म्हणून खाजगी जीवनात मी वैचारिक एकतेपेक्षा या प्रेमाला, जिव्हाळ्याला व अशा माणुसकीला महत्त्व देतो. पक्षैक्यापेक्षा ही माणुसकीच आत्मविकासाला पोषक ठरते. आणि पक्षांधता उलट मारक ठरते !

म्हणून अलिकडे त्यांची माझी फारशी भेट पडत नसूनही ते मला परके वाटत नाहीत. जवळचे परके झाले.

आणखी त्यांना व मला बांधणारा व कधी न तुटणारा दुवा म्हणजे शिवभक्ती. अशी शिवभक्ती मला कुठेच आढळली नाही. ते ढोंग नव्हे. बहुजन समाज व मराठ्यांना केवळ चकवण्यासाठी नव्हे. गादीविषयी व छत्रपतीपदाविषयी वाटणाऱ्या त्यांच्या श्रद्धेला मी अंधश्रद्धा म्हणेन. पण त्यांची शिवभक्ती पूर्ण डोळस आहे. ती त्यांच्या हाडीमासी मुरली आहे. शिवबांचे सारे जीवन, त्यांच्या सहस्रगुणातील सहस्रकप्पे त्यांनी संशोधकाच्या दृष्टीने न्याहाळले आहेत, अभ्यासले आहेत व त्यांनी आपलं प्रेम ओतून रक्ताच्या कुंचल्यानं रंगवले आहेत. मला वाटतं दुसऱ्या कुठल्या देवाची ते इतक्या भक्तिभावाने पूजा करीत नसतील.

ध्यानी-मनी-शयनी त्यांना शिवमूर्ती दिसते. शिवचरित्र आठवतं. मारुतीच्या हृदयात, म्हणतात जसा राम, तसं भालजींच्या हृदयात शिवबा! तो समाजाला भुलवण्यासाठी, चकवण्यासाठी, व त्याच्या नावाचा फायदा घेऊन बहुजनसमाजाचं पुढारीपण मिळवण्यासाठी नाही. आज शिव-शाहूंची नावे समाजाला अंधश्रद्धेत टाकण्यासाठीच वापरली जातात व त्या अंधश्रद्धेतून हे पुढारी बनतात व टाळ्या मिळवतात! त्या ढोंगी शिवभक्तीची तशीच शाहू-भक्तीची व म. फुले भक्तीची मला चीड येते. प्रामाणिक मूर्तिपूजकांचा अन् देवभक्तांचाही मी द्वेष करू शकत नाही. पण स्वार्थसाधू ढोंगी संतांचा मी द्वेष करतो. म्हणून न जुळणारे मतभेद असूनही भालजींच्याबद्दल मला आदर वाटतो.

भालजींच्या घरी जावं.

घरात आसनासमोर शिवमूर्ती, कपडे, गालिचे पडदे सारे भगवे. पूजास्थानी शिवमूर्ती. जीवनाच्या चित्रपटात आणि व्यासंगी बोलपटात त्यांनी शिवबांना चालतं बोलतं करून डोळे असलेल्या अडाण्यांनाही शिवबांची, त्यांच्या जीवनाची व कार्याची ओळख करून दिली आहे. अखेर शिवनामाचा गजर करीतच ते या जगाचा निरोप घेतील.

माझ्या म्हणण्याची प्रचीती 'अजिंक्यतारा' नाटकाच्या अर्पणपत्रिकेत वाचकांना पटून येईल. ते लिहितात

'श्रीशिवराय -

प्रात:कालच्या प्रार्थनेतही मी आपले नाव विसरलो नाही, देव, देश, आणि धर्म याकरिता आमरण झगडून अमर राहिलेले 'क्रांतिकारकांचे देव' म्हणून मी आपणाकडे भक्तिभावाने पाहतो. गुलामगिरी गाडणाऱ्या आपल्या पवित्र चरणी माझी ओबडधोबड लिहिणारी मराठी लेखणी अर्पण असो.'

येथे भालजींच्या वैचारिक निष्ठेबद्दल मला अत्यंत आदर आहे. या भक्तीत ध्येयनिष्ठा आहे.

यात अंधमूर्तिपूजा नाही. ती डोळस आहे. पण छत्रपतिपदाबद्दल व गादीबद्दल वाटणारी निष्ठा ही माझ्या मते आंधळी निष्ठा आहे. ती तात्त्विक निष्ठा नव्हे. गादीवर बसणारे राजे त्या ध्येयाला काळोखी लावणारे व स्वार्थासाठी गुलामगिरी पत्करणारे, देशाच्या व स्वातंत्र्याच्या शत्रूंची पूजा करणारे असल्यास ? - म्हणून येथे न मिटणारे मतभेद आहेत. असे असूनही भालजींचा मी द्वेष करू शकत नाही. कारण त्यामागे व्यक्तिस्वार्थ लपलेला नाही.

त्यांच्या खऱ्या शिवभक्तीमुळे ते मला आपले वाटतात.

शिवबांच्याकडे त्यांची पाहण्याची दृष्टी व माझी एक नाही तरी आम्हां

दोघांचे ते पूजास्थान आहे.

मी देशभक्ती मानतो, तिला मी देवाच्या ठिकाणी लेखतो व त्या भक्तीपायी मी मरायला तयार झालो आहे. सर्वस्वाचा होम करायला तयार झालो आहे.

आमचे हे संबंध असे आहेत.

ता. २-६-४४ ची गोष्ट.

एका हिंदुसभावाल्याने, रात्रौ माझी सभा आटोपल्यानंतर घरी जात असता दिव्याच्या खालील अंधारात मजवर लाठीहल्ला केला. डोक्यावर आघात केला. मारामुळे ती काठी चिंबली. ती प्रजापरिषदेचीच प्रचार सभा होती. हा प्रकार पाहताच जमावाने त्याला पकडले व त्याला बेदम मारणार, तोच मी पुढे होऊन त्याची सोडवणूक केली.

भालजींना हा प्रकार समजताच त्यांनी पत्रक काढून त्या व्यक्तीचा व कृत्याचा कडक शब्दात निषेध केला. ते लिहितात :

'करवीर प्रजापरिषदेचे पुढारी श्री. माधवराव बागल यांना येथील हिंदुत्त्वनिष्ठ तरुण श्री. मराठे यांनी लाठीने मारले. प्रजापरिषद व हिंदुसभा यांच्या पुढाऱ्यात अगर विचारात असले दुष्ट भेद नाहीत. असली गुंडगिरी कोठेही आणि केव्हाही त्याज्यच ! आमचे हे स्पष्ट मत असून हिंदुसभा केव्हाही असल्या गोष्टी करीत नाही व करणार नाही, असे आम्ही स्पष्ट जाहीर करतो. सदर मराठे यांचे सभासदत्त्व रद्द करण्यात आले असून त्याचा हिंदुसभेशी काहीही संबंध नाही.'

यानंतर बरीच वर्षे गेली. गांधीवधानंतर बेहोष झालेल्या जमावाने हिंदुसभावाले व ब्राह्मणांची घरे जाळण्याचा सपाटा चालवला. त्यावेळी प्रजापरिषदेचं मंत्रिमंडळ अस्तित्वात होतं. मी नेता होतो. व अहिंसावादी होतो. यंग इंडियाने माझी वैचारिक घडण बनवली होती. १९४२ च्या चळवळीत प्रजापरिषदेतील व काँग्रेसमधील काही पुढाऱ्यांनी सॅबोटेज चळवळीला प्रोत्साहन दिले होते. मी त्या वेळी पन्हाळगडावर स्थानबद्ध होतो पण बाहेरील कार्यकर्त्यांनी चोरट्या मार्गाने पत्र पाठवून सॅबोटेज चळवळीला कार्याध्यक्ष नात्याने माझी संमती मागितली. त्या वेळी मी त्यांना कळवले की गांधीवादाचा मी अभ्यास केला आहे. सॅबोटेज चळवळ कधीही गांधीवादात बसणार नाही. म्हणून मी मान्यता देऊ शकणार नाही. मी स्थानबद्धतेतून सुटल्यानंतर गांधीजींचंही सॅबोटेज् चळवळीविरुद्ध पत्रक निघालं. म्हणून जाळपोळीला सुरुवात होताच मी मोटारीच्या बॉनेटवर बसून लोकांना या मार्गापासून परावृत्त करण्याकरिता जिथं जिथं आग लागली होती व जमाव जात होता तिथं जाऊन त्यांना थांबवण्याचा प्रयत्न करीत होतो. पण लोक 'भाईजी, जावा, आम्ही काही करीत नाही' असं म्हणणार आणि

गेल्यावर आपलं काम सुरू करणार !तोच हा जमाव भालजींच्या स्टुडिओकडे गेला आहे असे कळतांच मी तिकडे गाडी नेली. त्यांनी पेटवायला सुरुवात केली होती तेव्हा मी 'हा प्रकार थांबवला नाही तर मीच आगीत उडी घेतो' म्हणून जाऊ लागलो. तो शाहू मिलच्या कामगारांनी मला मिठी मारून पकडले व मोटारीवर बसवले. लोकांनी 'जावा, आम्ही आग विझवतो.' म्हणाले पण मी गेल्यावर त्यांनी पुन: आपले काम चालवले. माझा फारसा उपयोग झाला नाही.

अशा प्रकारे भालजींच्या व माझ्या संबंधाला एक ऐतिहासिक स्वरूप प्राप्त झाले आहे.

या जाळपोळीनंतर गैरसमजाला ऊत आला व त्यात मीही सापडलो गेलो. तरी पण भालजींचे व माझे संबंधात कसलाही बिघाड आला नाही.

भालजींनी आपल्या चित्रपटसृष्टीतील नैपुण्यामुळे कोल्हापुरचाच नव्हे तर महाराष्ट्राचा लौकिक वाढवला आहे. भारतीय कलासृष्टीत मानाचं स्थान मिळवलं आहे.

'साधी माणसं' या चित्रपटाला पारितोषिक देऊन महाराष्ट्र सरकारने खास गौरव केला आहे. 'मराठा तितुका मेळवावा', 'पावनखिंड', 'छत्रपति शिवाजी' , 'थोरातांची कमळा', 'मोहित्यांची मंजुळा', वगैरे चित्रपट तयार करून त्यांनी मराठा इतिहासाला व मराठा स्वाभिमानाला उजाळा दिला आहे. त्यांचे संवाद हे त्यांचे खास वैशिष्ट्य अहे. ते इतरांना साधणार नाही. 'मीठभाकर', 'महारथी कर्ण' वगैरे चित्रपटांनी समाजापुढे एक उच्च आदर्श ठेवला आहे. लोकांच्या हीन अभिरुचीचा फायदा घेऊन पैसा मिळवण्याचा त्यांनी कधी प्रयत्न केलेला नाही.

ते उत्कृष्ट दिग्दर्शक आहेत. चित्रपट निर्माते आहेत. नाटककार आहेत. बोलपटातील संवाद हे त्यांचे खास वैशिष्ट्य आहे. मराठमोळी भाषा, मर्मभेदी विनोद हे कधी आठवणींतून जाणार नाहीत. चित्रपटातील भाषणात अश्लीलता येणार नाही. आर्थिक दृष्ट्या त्यांनी दांडगी कमाई केली नसली तरी नामवंत दिग्दर्शकांनाही मार्गदर्शन केलं आहे.

कोल्हापूरच्या मध्यभागी उभारलेला शिवछत्रपतींचा उभा पुतळा हा भालजींच्या शिवभक्तीची साक्ष देत उभा आहे. पण हा बसवताना भालजींच्या समोर खूप अडचणी उभ्या राहिल्या. समारंभाची तारीख जाहीर झाली. पण त्याचं कास्टिंग वेळेवर होईल असं दिसेना. समारंभाची तारीख तर तीन दिवसांवर येऊन ठेपली. सर्वांना आमंत्रणे गेली होती. भालजी भयंकर अस्वस्थ झाले. त्यांनी शुगर मिलचे मॅनेजर लोहिया यांची गाठ घेतली व या संकटातून काढण्यासाठी गहिवरल्या अंत:करणाने विनंती केली. ते म्हणाले, 'मालक रुईया, यांच्या परवानगीशिवाय

ही जबाबदारी मी कशी घेऊ !'

'परवानगी येईपर्यंत वाट पाहू नका -माझ्यासाठी काय करता येईल ते बोला. पण आम्हांला या संकटातून बाहेर काढा.' लोहियांनी रात्रंदिवस लोक कामाला लावून आपल्या देखरेखीखाली ब्रॉंझ कास्टिंग उत्कृष्टरीत्या पार पाडून अगदी वेळेवर सभेत पुतळा आणला. लोक वाट पहात बसले होते. म्हणून याचं श्रेय लोहियांनाही द्यावं लागेल. पण या प्रसंगाने भालजींची शिवभक्ती अंतर्बाह्य किती सचोटीची आहे ते प्रत्ययाला आले.

पुतळा तंत्रदृष्ट्या उत्कृष्ट आहे. पण !!!

*(माझा परिवार)*

## तपस्वी आबालाल रहिमान

एका मनुष्याला हातपाय ताणून काही पडतां येणार नाही अशी खोली ! खोलीत आसन मांडी पुरी बसणार नाही अशी एक गादी. बरीच वर्षे बंदीवासात राहिल्यामुळें जिणें असह्य होऊन गादींतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत असलेले पिंजराचे दाबून घट्ट झालेले गोळे मालकाच्या करड्या नजरेमुळे पुन्हा आत जाऊन बसत !

सुदामजीच्या ऐश्वर्याला शोभेशी खोली. आतील वस्तू निसटून जातील म्हणून की काय कोष्ट्यांच्या जाळीने तेथील प्रत्येक वस्तूला आपल्या ताब्यात घेतले होते. !

भिंतीवर तीन चार उत्कृष्ट चित्रे आपल्याला कोणी चाहते नाहीत म्हणून हिरमुसली झाली होती. एकाची काच फुटली होती, तर दुसऱ्याची फ्रेम मोडली होती. एक तर दोन्ही बंधनातून मुक्त होऊन एका मोळयाच्या आधारावर जीव कंठीत होते.

जमिनीवर काही पुस्तके, पेले, वाट्या व ब्रश पडले होते. स्वच्छता म्हणजे नखरा असे समजून त्यांनी मुद्दाम तिकडे दुर्लक्ष केले होते.

ही जागा म्हणजे त्याच्या करवीर येथील विख्यात गृहसाम्राज्यांतील राजधानी होय !

पण या राजधानीचे मालक तिथे दिसत नव्हते !

वाचकहो, आपण या राजेसाहेबांच्या भेटीला आतां जाणार आहोत. पण हे काम सोपे नाही.

या व्यक्तीला शोधायचे म्हणजे आपल्याला कुठल्या तरी शेतवाडीत किंवा

गाई म्हशींच्या खिल्लारात, किंवा देवालयाच्या समोरील पारावर किंवा दगडाच्या ढिगावर किंवा तळ्याजवळच्या दलदलीत जावे लागेल. !

ती पहा, तीच ती व्यक्ती पंचगंगेच्या घाटावर एका देवळाच्या आड बसली आहे.

कोण महात्मा तरी नसेल ?

वेष बावळटच होता. दाढी वाढलेली होती. कपडे दरवेशाचे होते, कफनी काही, नव्हती पण होते ते फाटके तुटकेच होते आणि मळकट !

स्वारी कामात गुंग होती !

मागे पोरांचा घोळका जमला होता. पण त्याचे त्यांना भानही नव्हते. साधूमहाराज तल्लीन झाले होते. तल्लीन पण डोळे मिटले नव्हते. डोळे उघडेच होते. पण पाहण्यांत व विचारांत गुंग !

डोळे उघडे, पण ध्यानस्थ !

सृष्टीशी तादात्म्य झाले होते. समोरचा देखावा आणि हाताखालचा कागद, एवढ्यात त्यांची सृष्टी एकवटली होती.

डोळे आणि हात एवढींच जणू त्या व्यक्तीची अवयवे !

समोरचे पहावे आणि खाली कागदावर उतरावे. कोण घाई ! कोण जिवाची धडपड ! आकाशात जरा बदल झाला की हातचे पारध सुटल्यासारखे वाटावे !

हातात कागद तरी केवढा ? तीन इंच रुंद, पांच इंच लांब असेल फार तर ! पण त्या विश्वकर्म्याने पुढील दिसणारी सर्व सृष्टी त्या तेवढ्या कागदावर कशी खेचून आणली होती !

चित्र पुरे होत चालले होते.

त्या चित्राकडे मागे राहून पाहणारी गुराख्याची पोरे आनंदाने उड्या मारू लागली.

खरी उत्कृष्ट चित्रकला सुशिक्षितांना तशीच अशिक्षितांना आनंद देऊ शकते. ती केवळ चार शेलक्या लोकांसाठी नाही हेच खरे.

स्वारीने आपले काम मानेला इकडे तिकडे बरेच वळसे देऊन न्याहाळून पाहिले. खूश होऊन ते माना डोलवू लागले. जणू लाखाची कमाईच झाली.

इतक्यात काय उणेपणा दिसला कोण जाणे ! झटकन् त्यातल्या एका गुराख्याच्या पोराला पकडून त्याला ते म्हणाले,

'देखो, बेटा उधर जरा खडा रहो." आपल्यापासून थोड्याशा अंतरावर त्याला उभे करून त्यांनी पुन: ब्रश हाती घेतला.

पंधराच एक मिनिटात त्या गुराख्याची मूर्ती त्या कागदावर दिसू लागली.

ते चित्र पुरे होत आहे, इतक्यात घाटावर एक भली मोठी मोटार येऊन उभी राहिली. एक श्रीमंत हवा खाण्यास आले होते.

पोरांचा घोळका का जमला आहे म्हणून पाहण्यासाठी ते सहजी पुढे गेले. पाहतात तो त्या बैरागी वेषाच्या माणसाने पुढील सुंदर देखावा त्या तेवढ्याशा कागदावर अगदी हुबेहूब रेखाटला होता ! श्रीमंत पाहून थक्क झाले.

ते चित्र घेण्याची त्यांना अनावर इच्छा झाली. या विचित्र वेषधारी माणसाच्या नावाची ख्याती त्यांच्या कानावर गेलेली होतीच.

श्रीमंत पुढे झाले आणि म्हणाले,

'मास्तरसाब, द्या ते आम्हाला चित्र. तुमची असेल ती किंमत आम्ही देतो.'

'छे छे साब, पैसा घेऊन मला काय करायचा ! खुदानं मला काय कमी केलं आहे !'

श्रीमंत म्हणाले,

'नाही, पण हे घ्याच तुम्ही !'

असे म्हणून त्यांनी आपल्या खिशांतून दहा नोटा काढल्या आणि त्या त्यांच्यापुढे केल्या.

त्यांना काय माहीत की खऱ्या कलावंताला पैशाचा मोह कधीच नसतो ! लागलाच पैसा तर पोट चालावे म्हणून लागतो. कलेला वाहिलेल्या जीविताला पैशाची काय मातब्बरी ? पैसा नसला म्हणजे हात बंद पडतात म्हणून त्याला पैसा हवा. उत्कृष्ट काव्य, उत्कृष्ट चित्र यांची पैशाने किंमत कशी करता येणार ? त्याला ते लाखाच्या मोलाचे असते !

मास्तर जातीचे कलावंत; त्यांना साजेसेच त्यांनी उत्तर दिले.

मनात स्वारी गरमच झाली होती. पण त्यांनी राग दिसू दिला नाही. ते म्हणाले,

'मला फकीराला पैसा घेऊन काय करायचा ?'

असे म्हणून त्यांनी रंगाची पेटी आवरली, बसायचे स्टूल मिटले आणि श्रीमंतांशी काही न बोलतां घरची वाट सुधारली.

वाचकहो, पण या विचित्र व्यक्तीचे नाव मी तुम्हाला सांगितलेच नाही. आहे माहीत तुम्हाला ? गावांत खुळा ठरलेला वेडापीर हाच तो आबालाल रहिमान.

ज्यांनी ध्येयापुढे संपत्तीला क:पदार्थ मानले, जगाने आपली पंचाईत करू नये म्हणून ज्यांनी फकीराचा वेष पत्करला, जिच्या प्रेमात कधीही अंतर पडू नये म्हणून एकपत्नीव्रत स्वीकारले व कलेशी जन्माची गाठ बांधून घेतली, तिलाच सहधर्मचारिणी बनविली तेच हे महाराष्ट्रातील कलावंतांचे सद्‌गुरू आबालाल रहिमान !!

ज्यांनी गरिबी स्वखुषीने पत्करली, त्यांची दरिद्री म्हणून कींव करणे मूर्खपणाचे नव्हे काय ?

त्यांना पैसाच मिळवायचा असता तर त्यांना मोटरी सहज उडविता आल्या असत्या. त्यांचे काम मिळविण्यासाठी काही शोकी कुबेर त्यांच्या घरी खेटे घालतच होते. त्या वेळचे कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट.... त्यांच्या कामाचे भुकेले होते. शाहू महाराजांनी हा पैशाचा लोभी नाही हे जाणून त्यांच्या पोटापुरती कायमची तरतूद करून टाकली होती. पण तो पगार घ्यायलाही स्वारी जात नसे, मग घरी आणून पोचता करीत.

याला दरिद्री कोण म्हणेल ?

त्यांना पैशाची खातर नव्हती. दुसऱ्याचा ताबेदार बनून त्यांनी आपली कला कोणाची रखेली बनवली नाही.

श्रीमंतांच्या लहरीप्रमाणे त्यांनी तिला नाचवली नाही.

पैशासाठी ते श्रीमंतांच्या कधी दारात गेले नाहीत.

कलाराधन हेच एक त्यांनी आयुष्याचे सर्वस्व ठरवून टाकले होते. कलेमुळे ते जगत नव्हते, कलेसाठी ते जगले होते. पैसा मिळवलाच तर तिच्यासाठीच मिळवायचा, चरितार्थाचे साधन म्हणून नव्हे तर तिची सेवा करण्यास अंगांत ताकद यावी म्हणून.

जगाला ते वेडे वाटले ! असे सर्व महात्मे, अज्ञानी जगाला वेडेच वाटतात.

कोणत्याही वेळेला जा, मास्तरांच्या हाती पेन्सील किंवा कुंचला नाही असे व्हावयाचे नाही. मग ते घरी असोत, बाहेर असोत.

हुशारीसाठी म्हणून चहा आणून ठेवावा, आणि कामाच्या नादात त्या चहात त्यांनी ब्रश बुडवून काढावेत !

प्रेमाची पाखर घालवून करवीरांतील अनेक लोकांनी त्यांची रंगरत्ने बिनमोल खरेदी केली; पण पैसा देऊन त्यांच्यापासून अमके एक काम मिळेलच असे मात्र कुणाला म्हणता आले नाही.

मास्तर हे खरे विद्यार्थी होते. ते आमरण विद्यार्थीच राहिले. लहानापासून सुद्धा जर काही मिळण्याजोगे असे त्यांना दिसले तर ते घेत. त्यांच्या एकंदर चित्रकलेकडे दृष्टी टाकली म्हणजे हेच दिसून येईल की, त्यांची पिपासा अखेरपर्यंत अतृप्त राहिली. निसर्गाकडे ते नेहमी संशोधकाप्रमाणेच पाहीत. त्यांच्या Landscape मध्ये style दिसत नसे. हरतऱ्हा करून दिलेला तो effect आणण्याचा ते प्रयत्न करीत. त्यांची ठराविक पद्धती अशी दिसून येत नसे. नाही तर पुष्कळ चित्रकारांची चित्रे ठराविक साचातून निघाल्यासारखी असतात. ब्रशिंग

ठराविक, रंग ठराविक, करण्याची पद्धती ठराविक; त्यामुळे त्या चित्रकाराचे एक चित्र पाहणे आणि दहा चित्रे पाहणे त्यात नावीन्य आढळून यायचे नाही. हा प्रकार आबालालच्या Landscape मध्ये आढळून येत नसे. प्रत्येकात काही तरी नवी तऱ्हा करून पहाणार. यामुळे नव्या जुन्या पद्धती त्यांच्या रंगपद्धतीत आढळून येत. तसेच निगर्वी. लहानापासून असो, थोरापासून असो मिळण्याजोगे असेल ते मिळवणार. आऊटलाईनमध्ये तर त्यांचा हात धरणारा क्वचितच सापडेल.

झालेलीच गोष्ट -

लेखक हाही एक कलाव्यासंगी आहे, त्यालाही सृष्टिसौंदर्याची फार आवड. त्यांच्या पायाशी बसून चार धडे घ्यावेत म्हणून केव्हा केव्हा मी जाई.

एकदा माझी कामे मी त्यांना दाखविण्यासाठी घेऊन गेलो होतो.

मास्तरांनी माझी सर्व कामे काळजीने पाहिली. त्यातील दोन बाजूस काढून मास्तर मला म्हणाले, 'बागलसाहेब, आपणाला काही विचारू काय ?'

मास्तर अशी कोणची महत्त्वाची गोष्ट विचारणार म्हणून मी उत्सुक होतोच; म्हणून म्हणालो,

'काय पाहिजे, मास्तर ? जरूर विचारा. त्यात एवढी 'भीड' ती कसली ?'

मास्तरांचे बोलणे ऐकून मी खजीलच झालो. मास्तर म्हणाले, 'ही कामे माझ्याकडे असू देत. मी त्यांची कॉपी करावी म्हणतो. फार सुंदर आहेत कामे ही !'

मला ही चेष्टाच वाटली असती; पण त्यांचा स्वभाव चेष्टेखोर नव्हता म्हणून मी घोटाळ्यात पडलो. काय बोलावे समजेना.

'मास्तर, वाटलं तर सर्वच कामे राहू द्यात आपल्याकडे' असे मी म्हणालो.

किती थोर मनुष्य ! खरे विद्यार्थी ! असे विद्यार्थी हिंदुस्थानात किती असतील ?

मी त्यांना नातू शोभलो असतो. त्यांचे त्या कलेत आयुष्य गेलेले. पण माझ्या कामांतही त्यांना शिकण्याजोगे दिसावे ! कोण नम्रता आणि अभ्यासाची तळमळ ही ! तिथे खोटा दुराभिमान आढळला नाही ! त्यांच्याबद्दलचा माझा आदर दुणावला. माझी आढ्यता लयाला गेली. फलभारानं आंबराई लवते, तसेच खरे थोर ज्ञानामुळे नम्र होतात, याची प्रचीती पटली.

मास्तरांचे देहावसन होण्यापूर्वीच एक दिवस मी घरी गेलो होतो. बारीक तापाने अगदी थकले होते. बसण्याची ताकद नव्हती. पण एका पेटीला टेकून बसले होते. समोर कापड मारलेली एक चौकट होती आणि त्या कापडावर चारकोलने स्वारी आऊटलाईन काढीत होती. मी आत गेल्याबरोबर त्यांनी उठण्याचा प्रयत्न केला; पण कल जाऊन ते पेटीवर आपटले, 'मास्तर, भलत्या वेळी कसला

शिष्टाचार?' म्हणून मी त्यांना बोललो. यासाठी नाही, त्यासाठी नाही असे म्हणून त्यांनी वेळ मारून नेली.

मास्तर बसले होते. बसण्याची ताकद नसूनही चारकोलने कागदावर काही काढणे चाललेच होते. आऊटलाईन चालली होती. मी सहजीच म्हणालो, मास्तर, यावाचून काय नडलं आहे? बरे तरी व्हा. तुमच्या हातात ब्रश धरायचीही ताकद नाही आणि हे काय? आपण आता विसावा घेतला पाहिजे, मास्तर म्हणाले,

'छे, छे तसा विशेष काही मी थकलो नाही. अलिकडे तर माझ्या डोळ्याला फार चांगलं दिसू लागलं आहे. फिरता आलं की मी बाहेरच कामाला जावं म्हणतो.'

मास्तर बोलल्यानंतर दुसऱ्याच दिवशी त्यांच्या घरचा मुलगा घाबऱ्याने आला आणि त्याने सांगितले, 'मास्तर गेले' म्हणून!

२८।६।३२ रोजी सकाळी ६ च्या सुमारास करवीरच्याच नव्हे तर महाराष्ट्राच्या चित्रकलेचे बहुमोल रत्न हरपले!

राजा रविवर्मा यांच्या जोडीतील, त्यांच्याच तोडींतील हे रत्न रानावनांत सौन्दर्याला वेडावून अखेर जगाच्या दृष्टीआडच सुकून गेले. मरणाच्या द्वारी जाईपर्यंत हा निसर्गाचा वेडा पीर हातात कुंचला घेऊन सृष्टीला जिंकू पहात होता.

अलेक्झांडरप्रमाणे याला सृष्टी जिंकता आली नाही म्हणून वाईट वाटे! पण वाईट वाटल्याची कारणे मात्र भिन्न. एक सृष्टीच्या रूपरंगावर लुब्ध झाला होता तर दुसरा तीच दृष्टी मानवी रक्ताने रंगविण्याकरिता वेडा झाला होता.

दोघेही वेडेच! दोघेही असंतुष्ट! पण आबालाल अद्याप कला हस्तगत करतां आली नाही म्हणून असंतुष्ट!

पण त्यांना अपुरी वाटणारी कला हस्तगत करण्यास कलावंतांना एका जन्मीची तपश्चर्याही खास अपुरी पडेल!

*(कला आणि कलावंत)*

# परिशिष्ट १

## माधवराव बागलांचे वक्तृत्व

**१) गांधी सप्ताहात ८-८-१९३१ रोजी पुणे येथे पुणे युवक संघाच्य वतीने झालेले भाषण :-**

पुणे युवक संघाच्या वतीने गांधी सप्ताहाच्या शेवटच्या दिवशी रे कार्मेटच्या पटांगणत डॉ. पळसुले यांच्या अध्यक्षतेखाली श्री. माधवराव बागल यांचे व्याख्यान झाले. (दिनकरराव जवळकर हेही बोलणार असे जाहीर झाले होते.)

**श्री. माधवराव बागल यांचे भाषण :**मी स्वत:ला सत्यशोधक म्हणवितो. तुम्ही सर्व ब्राह्मण, मुसलमान, पारशी, ख्रिश्चन सत्यशोधकच आहात असे मी मानतो. सत्य कोणाला नको आहे ?

आज मी कोणत्याही पक्षाचा सभासद म्हणून बोलत नाही. मी कोणत्याही पक्षाचा सभासद नाही. तेव्हा मला डिमेंबर होण्याची भीती नाही. मी स्वतंत्र मनुष्य आहे.

हिंदुस्थानात आज फार लाथाळी सुरू आहे. हिंदू म्हटलं तर मुसलमान चिडतात. ब्राह्मण म्हटलं तर ब्राह्मणेतर डोळे फाडतात. आर्यसमाजी म्हटलं तर सनातनी गुरगुरतात.

आज ही सर्व लाथाळी गुंडाळून ठेवून आपणा सर्वांवर एकसमयावच्छेदेद करून आलेल्या संकटास तोंड देण्यास तयार होणे हे आजचे पहिले कर्तव्य आहे. आजचे आपणा सर्वांचे ध्येय एकच आहे.

स्वातंत्र्य-

देशाला आग लागली असता आपल्या पोळीवर तूप ओढण्यास नादी लागून सर्वनाश ओढवून घेऊ नका.

ब्राह्मणेतरांनी स्वराज्यास भिण्याचे मुळीच कारण नाही. आमच्याच खटपटीने स्वराज्य मिळाल्यानंतर ब्राह्मण म्हणजे कोणा झाडाचा पाला.

ब्राह्मण अंमल गाजवतील ही गोष्ट सोडा जे अनत्याचाराने इंग्रजांना

स्वराज्य द्यावयास लावतील त्यांना ब्राह्मण जड आहेत काय ?

एका फुंकीसरशी उडवून लावू. तेव्हा आपण मिळविलेले स्वराज्य ब्राह्मण घेतील ही भीतीच सोडा.

आता हे भेदभाव विसरून जा.

ज्याला जी देशसेवा शक्य होईल ती त्याने करावी. हिंदुस्थान आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र झाला पाहिजे हे ध्येय सर्वांच्या डोळ्यापुढे असलेच पाहिजे.

पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र या प्रत्येकाच्या अत्यंत जरुरीच्या गोष्टी आहेत. तेवढ्या मिळवण्यापुरते तरी एक व्हा.

महात्माजी खरे सत्यशोधक आहेत. ते खरे हिंदी आहेत. मी हिंदी आहे एवढा तरी नुसता अभिमान मनात बाळगा.

मी हिंदी आहे. हिंद देश माझा आहे. एवढे म्हणत म्हणत प्राण गेला तरी धन्यता वाटली पाहिजे.

हा देश माझा आहे. त्या करिताच मी जगणार एवढे जरी तुम्ही म्हणालात तरी पुष्कळ आहे.

(नंतर हिंदुस्थानच्या पूर्व परंपरेचे व संपन्नतेचे रसभरीत वर्णन केले. ते म्हणाले-)

ज्यावेळी आमची संस्कृती ऐश्वर्याच्या कळसास पोचलेली होती त्यावेळी युरोपियन संस्कृती पाळण्यात खेळत होती. ते लोक रानावनात भटकत होते. अन् त्यावेळी आमची साम्राज्ये स्थापली जात होती. अशी ही त्यावेळची पोरे आम्ही आज स्वराज्याला लायक नाही म्हणून मोठ्या दिमाखाने आम्हास सांगत आहेत याचे काय ? आपल्या हाती आर्थिक बळ नाही हेच याचे कारण.

मोगल राजवटीत जुलूम झाला असेल पण त्यावेळी आमचे धंदे मारले गेले नव्हते.

आमचा पैसा आमच्या जवळ रहात होता. कामकऱ्यांना पोटभर अन्न मिळत होते. ती परिस्थिती आज राहिलेली नाही. डाक्याची मलमल तर जगप्रसिद्ध आहे. इटली, इंग्लंड या देशांना येथून कापड पुरवले जात असे तेव्हा त्यांना प्रतिबंधक कायदे पास करावे लागले. हिंदी सुताचा हातरुमाल वापरल्याबद्दल एका इंग्रज बाईस त्यावेळी २०० पौंड दंड झाला होता.

आज आमची इतकी हीनावस्था झाली आहे. आमच्या प्रेतावर घालण्यासाठीसुद्धा विलायती मांजरपाटच (मँचेस्टर कापड) आणावा लागतो.

आता यावर तोड म्हणजे महात्माजींनी काढलेला सोपा उपाय - स्वदेशी व खादी.

गिरणीचे कापडाने गिरणी मालकच श्रीमंत होतो. मजूर उपाशी मरतो.

खादीने रुपयाचा प्रत्येक भाग निव्वळ देशातच नव्हे तर आपल्या गावात अन् आपल्या घरात राहतो. राजकीय सत्ता येण्याची त्याला आवश्यकता नाही. कायद्याची आवश्यकता नाही.

केवळ आपल्या हातची गोष्ट. सरकार याला आड येऊ शकत नाही. स्वातंत्र्याची वाट पहात बसावे लागत नाही.

हिंदुस्थानात १० कोटी लोकांना तीन महिने काम मिळत नाही. म्हणजे अडीच कोटी लोकांना वर्षभर उपासमार सोसावी लागते. ही उपासमार टाळण्यासाठी महात्माजींनी चरख्याचा उपाय सांगितला आहे. त्यांना चरख्यामुळे रोज दोन अडीच आण्याची मिळकत होईल व वर्षाकाठी २५ कोटी आपल्या देशातच राहतील पण हे सर्व तुम्ही खादी वापराल तर.

**विधवा व चरखा** : विधवांना तर चरखा हा परमेश्वरच होय.

विधवांवर ईश्वर कोपतो, त्याबरोबर आमचा समाजही कोपतो. त्यांना चरखा ही समाधानाची जागा ठरेल. चरखा चालविल्याने त्यांना आपल्या दु:खाचा विसर पडेल. त्यात त्या तन्मय झाल्या की त्यांना जगाचाही विसर पडेल. वर्डस्वर्थ व गटे या थोर कविद्वयांनी आपल्या अमर काव्यातून चरख्याची महती वर्णिली आहे. दरिद्री अस्पृश्य समाजाला चरखा जिवाचा आधार वाटेल.

**परदेशी कपडा** : तुमच्याजवळ परदेशी कपडे असतील ते फाटण्याची वाट पाहू नका. ते जाळायला झाले नाही तर घड्या पेटीच्या तळाशी ठेवा व स्वराज्य मिळाल्यानंतर बाहेर काढा.

यानंतर श्री. काशिनाथबुवा पाषाणकर यांचे भाषण होऊन त्यांनी बागलांचे अभिनंदन केले.

## २) द्विभाषिक विरोधी परिषद, मुंबई (ता. ७-८-१९५६)

**उद्‌घाटक - भाई माधवराव बागल यांचे भाषण.**

आपण माझी निवड करून बहुजन समाजातील सर्वसामान्य माणसालाच महत्त्व दिलं आहे. हे सर्वसामान्य माणसाचंच आहे. आजच्या राजकारणातही वरपांगी का असेना, त्यालाच स्थान देण्यात येत आहे. पुढाऱ्यांचा मोठेपणा, त्यांचं स्थान त्यांच्यावरच अवलंबून आहे. तो समाज जाणता झाला तर राज्याचं वळण देण्याचं सामर्थ्य त्यांच्यातच आहे. सुदैवाने हा जाणतेपणा संयुक्त महाराष्ट्र प्रश्नामुळे त्यांच्यात येऊ लागला आहे. जनता आता पुढारीपणा आपल्याकडं घेऊ

लागली आहे. "संयुक्त महाराष्ट्र समिती" हेच जनतेच्या पुढारीपणाचं मूर्त स्वरूप आहे.

सं. महाराष्ट्र समिती म्हणजे सामुदायिक नेतृत्व, त्याच तिच्या हाकेला ओ देऊन आपण सर्व आला आहात. त्या संयुक्त महाराष्ट्र परिषदेचा मी एक देवडीवरचा शिपाई म्हणून, केवळ पडदा उघडण्यासाठी म्हणून येथे आलो आहे. तुम्हा सर्वांचं स्वागत करण्याचं काम माझं. भक्तिभावाने मी सर्वांना हाक मारतो. या सारे या, तुम्ही कोणत्याही धर्माचे असा, कोणत्याही जातीचे असा, कोणत्याही मताचे असा, कोणत्याही पक्षाचे असा. तुम्ही महाराष्ट्राचे अभिमानी असलात म्हणजे पुरे. सं. महाराष्ट्र परिषद, सर्वांची

आपला लढा सात्त्विक आहे. आपल्या मागणीप्रमाणे कसलीही द्वेषबुद्धी, संकुचित वृत्ती नाही. कॉंग्रेसने ती इंग्रजी राजवटीपासून पुढे केली आहे. टिळक, गांधी, नेहरू यांनी तिचा पुरस्कार केला आहे. इंग्रजी राज्यापासून तो यावेळेपर्यंत गेल्या १०० ते १५० वर्षात बहुभाषिक राज्याचा आम्हाला अत्यंत कटू अनुभव आला आहे. आपलं राज्य झाल्यानंतर ही अडचण दूर होईल. या विश्वासाने महाराष्ट्र कॉंग्रेसकडे पहात होती, पण ती कॉंग्रेस व तिचे पुढारीच आमच्यावर उलट गेले. भाषिक राज्य हा सर्वसामान्य जनतेच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे.

प्रांतिक राज्यकारभार मायबोलीतून चालल्याखेरीज, लोकशाहीची खरीखुरी वाढ होऊ शकत नाही. आपला नागरिक, सांस्कृतिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रात, विकास मायबोलीच्या आधारे करतां येतो. जनतेच्या मायबोलीखेरीज सोयीची जात नाही. संघटना बांधता येत नाही. विचारांची देवघेव करता येत नाही. आपल्या कृतीचा मेळ घालता येत नाही. यामुळे राष्ट्रीय योजना अपेक्षेप्रमाणे पार पाडता येणार नाहीत. राष्ट्राची शक्ती बळकट होणार नाही. संरक्षणाच्या दृष्टीने देश कमकुवत ठरेल.

या सक्तीच्या एकजुटीने महाराष्ट्राचे अपरंपार नुकसान होणार आहे.

पूर्वीही द्विभाषिकने आपले कल्याण झाले नाही. महाराष्ट्राचे रक्तशोषण भरपूर झाले आहे. महाराष्ट्राच्या श्रमाचा व संपत्तीचा महाराष्ट्राला उपयोग झाला नाही. सत्तेचाही अपहार भांडवलवाल्या धार्जिण्या मंत्र्यांनी आपल्या विभागासाठी करून घेतला. महाराष्ट्र सत्तेनं व संपत्तीनं कमकुवतच राहिला.

आम्हाला वर डोकं काढू दिलं नाही याचा कटू अनुभव आल्यामुळे द्विभाषिकाच्या निर्णयाविरुद्ध आम्हाला झगडावे लागत आहे. हे ध्येय साध्य झाल्याखेरीज हा लढा कधीही थांबणार नाही. ही मुंबईच्या केवळ गुजराथी भांडवलवाल्यांसाठी केलेली कारवाई आम्ही उलथून पाडल्याखेरीज राहणार नाही.

नेहरू आणि ही काँग्रेस आम्हाला सक्तीने गुजराथी भांडवलवाल्यांच्या राजकीय व आर्थिक वर्चस्वाखाली जबरीने घालत आहेत. लोकांना चकवण्याकरता आता हे लोकांची दिशाभूल करीत आहेत.

ज्यांची भाषा एक नाही. ज्यांचा पेहराव एक नाही. ज्यांचे खाणे एक नाही. राहणी सारखी नाही. एक राष्ट्रदैवत नाही. त्या दैवताबद्दल अभिमान नाही. उलट द्वेषच केला जातो. अशांनी कौटुंबिक भावनेनं रहा म्हणणं हा कोणता शहाणपणा? आमची भाषिक विभागणी राज्यसत्ता आमच्या हाती असल्याखेरीज आमचा सर्वांगीण विकास होणे शक्य नाही. समाजवाद आणता येणार नाही व समजणार नाही. आम्हाला शांतता, सहकार्य व स्नेहभाव शेजाऱ्याशी राखावयाचा आहे. त्यासाठी आम्हाला आमच्या पायावर उभं राहता आलं पाहिजे. हे सक्तीचे कलम कधीही वाटणार नाही. आम्हाला काही मुलुखगिरी करावयाची नाही. बहुसंख्येच्या जोरावर दुसऱ्यावर हुकमत चालवावयाची नाही. आम्हाला केवळ आमची उन्नती करून घेऊन देशाची शक्ती वाढवावयाची आहे.

एकूण जगाची परिस्थिती बदलली आहे. भांडवलशाही राष्ट्रातही सामान्य जनता समाजवादाडे झुकू लागली आहे. खुद्द भांडवलशाही राष्ट्रेही समाजवादी तत्त्वे अमान्य करू शकत नाहीत.

हिंसा, अत्याचार, दंगा या मार्गाला विरोध करून शांततेच्या, अहिंसेच्या, लोकशाहीच्या मार्गाने आपले ध्येय साध्य करावे. यशापयशाचा विचार न करता सत्यासाठी सतत झगडावे हे कर्तव्य. सर्व शक्ती एकवटूया. शिवराय आपल्याला मार्गदर्शक आहेत. ते आम्हाला सतत प्रेरणा देत राहतील.

# परिशिष्ट २

## माधवराव बागल यांची ग्रंथसंपदा

### (१) आत्मचरित्रकार माधवराव बागल :

जीवनप्रवाह भाग १ व २ : (१९५४) एकत्र प्रसिद्ध. १९५१ पत्नी रमाबाईस अर्पण. जन्म, बालपण, शिक्षण, कलाशिक्षण, वडिलांच्या 'हंटर' पत्रात काम, हद्दपारी, समाजिक, धार्मिक, कामगार चळवळ, साहित्य क्षेत्रातील मुशाफिरी. कला, राजकारण इ. वर लिखाण ३ लघुकथासंग्रह प्रसिद्ध. पहिल्या भागात माधवरावांचे 'सुरवातीचे चार शब्द', आत्मचरित्र का लिहिले? याचा खुलासा. पहिल्या भागाला तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची प्रस्तावना आहे.

दुसऱ्या भागाला प्रबोधनकार ठाकरे यांची 'मला काय वाटले' ही प्रस्तावना व वि. स. खांडेकर यांचे 'दोन शब्द' हे मूल्यमापन आहे.

**जीवनप्रवाह भाग ३ :** यात १९५४ ते ५७ पर्यंतच्या राजकीय घडामोडींचा विशेषत: संयुक्त महाराष्ट्र चळवळीचा उल्लेख आहे. हा भाग वालचंद कोठारी यांना अर्पण केला असून वि. स. खांडेकर यांनी माधवरावांच्या एकसष्ठीनिमित्त किर्लोस्कर मासिकात १९५६ साली लिहिलेला लेखही सुरवातीलाच दिला आहे. यांत जीवनप्रवाहाच्या पहिल्या दोन भागांच्या एकत्र प्रकाशन व अडचणी व प्रकाशन समारंभाचा उल्लेख आहे. समारंभ तर्कथीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली आचार्य भागवत, रा. क. खाडीलकर, वि. स. खांडेकर, एस. एम. जोशी यांच्या उपस्थितीत पार पडला. या भागात राज्यपुर्नरचना समितीचा व त्यानंतरचा उद्रेक, संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, सत्याग्रह इत्यादी घडामोडींबरोबर काही घरगुती घटनांचा, मुलाचे लग्न, स्वत:चा आजार, एकसष्ठी समारंभ, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा 'मौज' मधला लेख दिलेला आहे. १९५४ च्या निवडणुकीत समितीच्या उमेदवारासाठी केलेला प्रचार, सभा, दौरे, प्रतापगडावरील पंडित नेहरुंविरुध्द निदर्शने वगैरे घटनांचा उल्लेख आहे.

**जीवनप्रवाहाचा ४ था भाग :** 'सत्याग्रहातून सहकार्याकडे' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाला. यांत १९५६ पासून संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती व सीमा प्रश्न व त्यासाठी कोल्हापूर जिल्ह्यात आखलेला प्रदीर्घ सत्याग्रह, बेळगांवचा सत्याग्रह व माधवरावाना कर्नाटक सरकारने केलेली अटक, मंगळूर तुरुंगातील अनुभव, तुरुंगातून सुटका, ६५ व्या वाढदिवसाची यशवंतराव चव्हाण यांचे अध्यक्षतेखाली खासबाग येथील सभा इ भाग आहे. या भागात माधवराव यशवंतराव यांचे प्रभावाखाली येऊन काँग्रेसकडे झुकलेले दिसतात. हा भाग यशवंतराव, बाळासाहेब देसाई व भाऊसाहेब हिरे यांना अर्पण केलेला आहे. याच भागात १९६२ साली होऊ घातलेल्या शिवाजी विद्यापीठासंबंधी माधवरावानी आपले विचार व्यक्त केलेले आहेत. यांत १९६२ पर्यंतच्या घटना आहेत.

**जीवनप्रवाहाचा ५ वा भाग : 'संघर्ष व सन्मान'** : या शिर्षकाखाली १९७३ साली प्रसिद्ध झाला. यात १९६२ ते १९७२ या कालातील घटनांचा उल्लेख आहे. याला ना. ग. गोरे यांची प्रस्तावना व माधवरावांचे 'निवेदन' व वीर उत्तमराव मोहिते यांची 'समीक्षा' दिलेली आहे. या ७४ पानांच्या चरित्रग्रंथात १५ प्रकरणे आहेत. यांत माधवरावानी लेखणी व वाणीने केलेला वैचारिक संघर्षाच्या घटनांचा उल्लेख आहे. कोल्हापुरचे दत्तक प्रकरण, माधवरावांचा वैचारिक भूमिकेतून विरोध, ग. र. भिडे यांचे 'कोल्हापूर दर्शन' व त्यातील शाहू द्वेश,

शिवाजी विद्यापीठातील कामगार संघटना, बाळासाहेब देसाई यांचा मंत्रिपदाचा राजीनामा व माधवरावांच्या प्रतिक्रिया, दत्ता बाळ प्रकरण व हिंदुत्वनिष्ठांच्या माधवरावाना खुनाच्या धमक्या, कलाकार जी. कांबळे यांचे शिवाजी महाराजांचे चित्र व बागलांची प्रतिक्रिया इत्यादी संघर्षाच्या घटना यात आहेत.

माधवरावांना मिळालेले सन्मान व मानपत्रे यांचा यांत उललेख आहे. करवीर नगरपालिकेचे मानपत्र, कामगार संघटनांनी दिलेले मानपत्र, माधवरावांचे सार्वजनिक वाढदिवस, मुंबई साहित्य संघातर्फे सन्मान, पद्मभूषण सन्मानपत्र वगैरे गोष्टींचा यात उल्लेख आहे.

या ५ भागातील आत्मचरित्रांखेरीज माधवरावांनी आठवणींच्या स्वरुपात आत्मचरित्रात्मक लिखाण केलेले आहे. यात ''बधनाम'' हे १९३८ साली प्रसिद्ध केलेले व काकासाहेब लिमये यांना अर्पण केलेले १२० पानांचे पुस्तक. १९७० साली प्रसिद्ध केलेले 'जीवन संग्राम' अगर 'सिंहावलोकन' हे ७५ व्या वर्षी लिहिलेले पुस्तक. ''माझ्या जीवनाच्या प्रेरणा' हे ४२ पानांचे उपसंहार म्हणून व. द. पिटके यांच्या 'पड़साद' या माधवरावांच्या जीवनकार्यावर नियतकालिकेत आलेले मूल्यमापन संग्राहित करण्याच्या पुस्तकात दिलेले आहे.

या आठवणी व लिखापतीत माधवरावांच्या खाजगी जीवनावर अधिक प्रकाश पडतो. 'जीवन प्रवाह' हा मुख्यत्वेकरून राजकीय जीवनाचा वृत्तांत आहे.

## (२) व्यक्तिचित्रकार माधवराव बागल

माधवरावांनी त्यांच्या सहवासात आलेल्या असंख्य लहानथोर व्यक्तिंची चित्रे रेखाटली आहेत. या व्यक्तिचित्रांचे स्वरूप, सुंदर आठवणी व ज्यांची आहेत ती स्वतंत्र अशी अलिप्त राहून लिहिलेली व्यक्तिचित्रे नाहीत. माधवरावांच्या लिखाणांत 'मी' हा नेहमी ठळकपणे जाणवतो.

**'माझ्या आवडत्या पांच व्यक्ती'** हे १९६४ साली प्रसिद्ध झाले. यांत (१) माधवरावांचे पिताजी खंडेराव बागल (२) यशवंतराव चव्हाण (३) बाळासाहेब देसाई (४) प्रभाकरपंत कोरगांवकर (५) मदनमोहन लोहिया यांची चित्रे आहेत.

'माझी सहधर्मचारिणी' हे माधवरावांची पत्नी रमाबाई हिचे व्यक्तिचित्र आहे. **'बहुजन समाजाचे शिल्पकार'** हे १९६६ साली प्रसिद्ध झाले. ही व्यक्तीचित्रे प्रथम 'सत्यवादी' या नियतकालिकात क्रमशः प्रसिद्ध झाली. पुस्तकाला पा. वा. गाडगीळ यांची प्रस्तावना आहे. यांत एकूण २१ व्यक्तिचित्रे असून त्यातून म. फुले

यांच्यापासून जेधे, जवळकर यांच्या कालपर्यंतच्या बहुजन समाजाच्या चळवळीचा इतिहास स्पष्ट होतो. याला परिशिष्टाच्या रुपाने 'सत्यवादी'कार बाळासाहेब पाटील यांनी रेखाटलेले माधवराव बागल यांचेही चित्र समाविष्ट केलेले आहे.

**'माझा परिवार'** हा व्यक्तिचित्रांचा संग्रह दोन पुष्पात १९६६ व १९६७ सालात प्रसिद्ध झाला. पहिल्या पुष्पात आचार्य जावडेकर ते आचार्य अत्रे अशी १३ रेखाचित्रे व दुसऱ्या पुष्पात यशवंतराव चव्हाण ते रत्नाप्पा कुंभार अशी १६ व्यक्तीचित्रे आहेत. दुसऱ्या पुष्पाला ना. ग. गोरे यांची प्रस्तावना आहे. या रेखाचित्रांवरून माधवरावांचा परिवार किती मोठा व विविधता असलेला होता ते कळते.

'माझा परिवार' या देन पुष्पमालेतून सुटलेली अनेक लहानथोर माणसे भाईजींच्या जीवनात आली. त्यांना विसरणे शक्य नव्हते. म्हणून भाईंनी आणखी सुमारे ४० छोटी छोटी रेखाचित्रे **'सहवासातून'** या अर्थपूर्ण नावांने १९७१ साली ७५ व्या वर्षाची भेट म्हणून प्रसिद्ध केली. यांत बहुजन समाजाचे राहिलेले शिल्पकार, राजकारणी, चित्रकार, भाईजींचे कांही निकटवर्ती इत्यादींचा समावेश आहे.

**'माझे यशवंतराव'** हे एक भाईजींनी उतारवयात लिहिलेले वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक आहे. हे सर्जेराव पाटील यांनी शाहू छत्रपती शिक्षण संस्थेसाठी 'समाज प्रकाशन' या मालेत प्रस्तावनेसहीत प्रसिद्ध केले आहे. 'माझ्या आवडत्या या पांच व्यक्ती' व 'माझा परिवार' यांत यशवंतरावांची रेखाचित्रे आहेत. पण या पुस्तकात सर्व संघर्ष संपल्यानंतर यशवंतराव भाईजींचे एक आराध्य दैवत कसे झाले याचा साद्यंत इतिहास आहे. भक्तिभावाने वाहिलेली ही आदरांजली आहे.

## (३) विचारवंत माधवराव बागल

माधवराव बागल यांनी वडिलांच्या साप्ताहिकात लोकांच्या प्रश्नावर स्फुटे लिहून आपल्या वैचारिक लेखनास सुरवात केली. त्यांचे वाचन अफाट होते व चिंतन मूलगामी होते. त्यांनी छोटी छोटी असंख्य पुस्तके अतिशय सोप्या भाषेत लिहिली. विषय अर्थात राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक होते.

**'सत्यशोधकांना इषारा :'** अथवा नव्या पिढीचे राजकारण. कदाचित माधवरावांचे हे पहिले वैचारिक लिखाणाचे पुस्तक १९३१ साली प्रसिद्ध झाले. याला कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांची प्रस्तावना असून ते माधवरावांचे वडील खंडेराव बागल यांना अर्पण केलेले आहे. हे लेख क्रमश: 'विजयी मराठा'त प्रथम

प्रसिद्ध झाले. या सर्व लेखात सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्यांना आपली कार्यमर्यादा व्यापक ठेवण्याचा सल्ला माधवरावानी दिला आहे. यात युरोपातील धार्मिक चळवळीचे रुपांतर, जमिनींचे प्रश्न, आर्थिक समस्या, समाजसत्तावाद्यांचे राजकारण इत्यादी नवीन विषय मांडून सत्यशोधकांनी या सर्व विषयांत सत्यशोधन करावे असा सल्ला दिला आहे.

**बेकारी व तीवर उपाय** : हे १९३३ साली प्रसिद्ध झालेले पुस्तक दोन भागात आहे. याला कृष्णराव अर्जुन केळूसकर यांची प्रस्तावना असून भास्करराव जाधव यांचा अभिप्राय आहे. यांत शेतकरी व मजूर यांच्या दु:खाची कहाणी बऱ्याच विस्ताराने माधवराव मांडतात. सामाजिक, धार्मिक, जातीय, जागतिक वर्गकलहाचे मूळ अर्थकारणात सापडते. जमीनदारांचा जुलूम, सावकाराने केलेली कुळांची पिळवणूक, भांडवलदार व मजूर यांतील संघर्ष, साम्राज्यवाद, भाऊबंदकी, कोर्ट खटल्याच्या मारामाऱ्या या सर्व मानवांच्या दुर्गुणाचे मूळ अर्थकारणात सापडते असे माधवराव मानतात. दारिद्र्य म्हणजेच गुलामगिरी. राजकीय स्वातंत्र्य मिळाले तरी बहुसंख्य वर्ग गुलामगिरीतच राहणार असेल तर त्या स्वातंत्र्याचा काय उपयोग असा प्रश्न माधवराव उपस्थित करतात.

**संस्थानिक, संस्थानी प्रजा व फेडरेशन** : या छोट्याशा पुस्तकात खालसा व संस्थानी मुलखातील राजकीय चळवळीतील फरक स्पष्ट करून संस्थानी मुलखात कशी दडपशाही चालते व संस्थानी प्रजेला कोणीच वाली नसतो असे माधवराव म्हणतात. प्रजेला प्रतिनिधीत्व नसलेले संस्थानाचे फेडरेशन संस्थानिकांची जुलूमशाही वाढवील म्हणून माधवरावांचा फेडरेशनला विरोध आहे.

**महात्माजींची कामधेनू** : हे छोटेसे पुस्तक १९३५ साली ज्ञानप्रकाशमधून प्रथम प्रसिद्ध झाले व ते संपादक के. ग. लिमये यांनाच अर्पण केलेले आहे. यात स्वदेशी चळवळीचे महत्त्व, खादीचा प्रसार, प्राचीन भारतीय वैभवात खादीचे स्थान, चरख्याचे महत्त्व इत्यादीवर पौर्वात्य व पश्चिमात्य संयुक्तिक दाखल्यांसह पटवून दिलेले आहे.

**खेड्यावरचा प्रचारक** हे विद्यार्थी व कार्यकर्त्यासाठी १९५४ साली प्रसिद्ध केलेले पुस्तक 'सकाळचे' संपादक ना. भि. परुळेकर यांना अर्पण केलेले आहे. खेड्यात काम करू इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांना या पुस्तकात मार्गदर्शन केलेले आहे.

**समाजसत्ता की भांडवलशाही** : शंकरराव देव यांना त्यांनी केशवराव जेधे यांचे नांव प्रांतिक कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठी सुचविल्याबद्दल अर्पण केलेल्या या पुस्तकात भांडवलशाही ही व्यक्तिस्वार्थाची कल्पना असून समाजसत्तेचे ध्येय

साऱ्या समाजाचा विकास हवे असे माधवरावांनी अनेक दाखल्यांसह स्पष्ट केले आहे.

**पंचायत संस्था** या अत्यंत छोट्या लेखात ग्रामपंचायतीचे नवीन समाज व्यवस्थेतील स्थान किती महत्त्वाचे आहे हे दाखविले आहे.

**सुलभ समाजवाद** हे १९५१ चे दोन भागात प्रसिद्ध छोटे पुस्तक समाजवादाची संकल्पना अतिशय सोप्या भाषेत माधवराव समजावून सांगतात.

**लोकशाही समाजवाद व निधर्मी राज्य** या उत्तमराव मोहिते, बाबा आढाव, ना. ग. गोरे व हमीद दलवाई याना अर्पण केलेल्या त्यांच्या उतारवयात लिहिलेल्या १९७५ च्या सुमारास पुस्तकात धर्मनिरपेक्षतेशिवाय लोकशाही समाजवाद कसा निष्फळ ठरतो हे सांगण्याचा प्रयत्न आहे.

**शिव-शाहू** : फुले आंबेडकर तसेच विठ्ठल रामजी व भाऊराव हेच आमचे मार्गदर्शक

१९७४ साली प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकात बहुजन समाजाचे समाजसुधारक आज भारतीयाना कसे मार्गदर्शक ठरतात हे सविस्तरपणे पटवून देण्याचा प्रयत्न आहे. हे सर्व जातीयता न मानणारे व त्याप्रमाणे कृती करणारे पुरोगामी विचारवंत होते.

**गोळवलकरी राज्य आले तर** हे सत्यशोधकाना, लोकशाही समाजवाद्याना व अस्पृश्य बंधूना अर्पण केलेले पुस्तक १९६९ साली प्रसिद्ध झाले. यात हिंदुत्ववाद्यांच्या ईश्वरविषयी वर्णव्यवस्थेच्या कल्पनांवर व मनुस्मृतीवर कडाडून हल्ला केलेला आहे.

**मानवतावादाचा स्वीकार करा** : यात उच्चनितेवर आधारीत वर्ण व्यवस्थेपेक्षा मानवता धर्म कसा श्रेष्ठ आहे हे अनेक भारतीय व पाश्चात्य विचारवंताचे दाखले देऊन प्रसिद्ध केले आहे.

**बुद्धं शरणं गच्छामी** यांत बौद्ध धर्माची श्रेष्ठता सिद्ध करण्याचा प्रयत्न आहे.

**लग्नबंधन की तुरुंगवास** शिकत असतानाच स्त्रियांच्या प्रश्नाकडे माधवरावांचे लक्ष होते हे १९५४ साली लिहिलेल्या या छोट्याशा पुस्तकावरून दिसते.

**बुद्धिझम व कम्युनिझम** या १९७९ साली प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात लोकशाहीचा खरा अर्थ, स्वातंत्र्य म्हणजे काय? अंधश्रद्धा, मूर्तीपूजा इत्यादीवर आधारे विवेचन करुन, अंधश्रध्देतून मुक्त होण्यासाठी साम्यवाद स्वीकारणे हा एकच उपाय आहे असे मत प्रतिपादिले आहे. भारतीय संतांनी, म. गांधी, विवेकानंद, विष्णुबुवा ब्रह्मचारी, म. फुले, राजर्षी शाहू यांनी व्यक्त केलेले समाजिक विचार व कम्युनिझचे विचार यांतील विलक्षण साम्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. कम्युनिझमवरील आक्षेपांनाही संयुक्तिक उत्तरे दिली आहेत.

शेवटी बुद्ध व मार्क्स यांचे ध्येय एकच होते, समता प्रस्थापिणे असे सांगून भारतात बुद्धिझम व कम्युनिझम यांचा समन्वय होणे अगत्याचे आहे असे मत व्यक्त केले आहे

**असे हे धर्म** या १९७७ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात हिंदू धर्म, ख्रिश्चन धर्म, मुस्लीम धर्म, बुद्धधम्म यांची चिकित्सक तुलना केली असून या पत्रासंबंधी इतर विचारवंताचीही मते दिली आहेत. सर्व धर्मांनी गरीब कष्टकऱ्यांवर बंधने लादून पिळवणूक केली आहे. याला अपवाद फक्त बुद्धधम्माचा आहे असे मत व्यक्त केले आहे.

**आधुनिक बोवाबाजी म्हणजे दत्ता बाळ व त्यांचे टोळके** या १९७० साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात दत्ता बाळ यांची आध्यात्मिक बुवाबाजी, प्रार्थनेचे नाटक, त्यांचे ऐषा आरामी जीवन यावर टीका करून माधवराव बागल यांच्यावर या टीकेमुळे कांही गुंडाकरवी झालेले हल्ले यांचा उल्लेख आहे.

**आजही आपले मार्गदर्शक म. फुलेच हे** प्रथम १९५० साली प्रसिद्ध झाले. या पहिल्या आवृत्तीस भास्करराव जाधव यांची प्रस्तावना आहे. फुल्यांचे विचार शाश्वत आहेत. आज त्यांच्या विचाराने व कृतीने चालण्याची गरज आहे. सत्यशोधक समाजाची पुन: परिषद बोलावून त्या संस्थेस चालना दिली पाहिजे असे आवाहन सत्यशोधक कार्यकर्त्यांना माधवरावांनी केले आहे.

या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९८१ साली प्रसिद्ध झाली. त्याला त्र्यं. सि. कारखानीस यांची प्रस्तावना आहे.

**कोल्हापुरचे दत्तक प्रकरण** : यात दत्तक प्रकरण ही जनतेची चळवळ होऊ शकत नाही. हा शाहू महाराजांचा वैयक्तिक प्रश्न आहे. अशी भूमिका माधवरावांनी घेतली. हा छोटा लेख अनेक वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाला होता.

**हंटरकार खंडेराव बागल यांचे निडक लेख** :हे संपादित पुस्तक १९७४ ला यशवंतराव चव्हाण यांच्या वाढदिवसानिमित्त प्रसिद्ध केले. यांत खंडेराव बागल यांचे १९२५ ते १९२९ पर्यंतच्या काळातील 'हंटर' मधील निवडक लेख व माधवरावांचे छोटेसे निवेदन आहे.

**मी, प्रजापरिषद व कार्यकर्त्यांची ओळख** : १९४६ साली प्रसिद्ध केलेल्या या आत्मकथनपर पुस्तकात १९२५ ते १९४५ पर्यंत कोल्हापूर संस्थानात जी राजकीय आंदोलने झाली त्यांचा समावेश आहे. हा एकाअर्थी कोल्हापूरच्या राजकीय चळवळीचा इतिहास आहे असे खुद्द माधवराव 'पुस्तकाबद्दल थोडेसे' लिहीताना म्हणतात. हे २२२ पानांचे पुस्तक ५६ पानी

कार्यकर्त्यांच्या ओळखीसह प्रसिद्ध झाले आहे.

व्यक्तिविषयक झगड्यातून प्रजापरिषदेचा जन्म झाला असल्याने या इतिहासात माधवरावांच्या आयुष्यातील अनेक प्रसंग, अनेक अनुभव येणे अपरिहार्य होते असे माधवराव म्हणतात. (प्रस्तावना) यातील बराचसा मजकूर पन्हाळ्याला स्थानबद्ध असताना (१४.५.४२ ते ३१.४.४३) लिहिला गेला. शक्य तितकी त्रयस्थ वृत्ती ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि आत्मचरित्रात अजाणता आत्मसमर्थनाची वृत्ती डोकावू लागल्यास या सर्वसाधारण मानवी स्वभावातील दोषाकडे वाचक क्षमाशीलतेने पाहतील अशी मी अपेक्षा करतो. पत्रात (कोणत्या?) जागा मिळेल तशी ही लेखमाला चालू करण्याचा विचार आहे. 'राजद्रोहाचा आरोप' या पहिल्या लेखात प्रजापरिषदेच्या जन्मापूर्वीच्या शेतकऱ्यांचा मोर्चा, साराबंदी, मंदिर प्रवेश, माधवरावांचे दौरे, शेतकरी परिषदा, माधवरावांची मिरवणूक इत्यादी घटनांचा इतिहास आहे. प्रजापरिषदेचा जन्म (६.२.१९३९) याचा जयसिंगपूर येथील श्रीरामचंद्र ऑईल मिलमधील ६ फेब्रुवारी १९३९ रोजी रात्री ९.३० चे सुमारास माधवरावांच्या अध्यक्षतेखाली सभेस सुरुवात. सुमारे २ हजार शेलके कार्यकर्ते हजर. गिरणीत उकाडा होत होता म्हणून सर्व बाहेरच्या मोकळ्या जागेत आले. सभेला सुरवात होणार इतक्यात वॉरंट घेऊन सब इन्स्पेक्टर हजर. माधवरावांना अटक; पण सभा चालूच राहिली. राजद्रोहाखाली दोन वर्षे सक्तमजूरी व १ हजार रु. दंड कैदी आणि पोलीस व तुरुंगातील व्यवस्था, यांत तुरुंगातील कैद्यांचे जीवन यावर प्रकाश टाकला आहे. १८ डिसेंबर १९४० ला माधवरावांची सुटका झाली. त्याचदिवशी गंगावेश मैदानात महाराजांच्या दु:खवट्यानिमित्त सभा झाली. सुमारे १० हजार लोक जमले असतील. यानंतर दि. ब. लठ्ठे यांच्याकडे मागण्याचे निवेदन दिले.

स्थानिक स्वराज्याचा संस्मरणीय लढा या प्रजापरिषदेने नगरपालिका काबीज करण्यासाठी केलेल्या लढ्याचे वर्णन आहे. प्रजापरिषदेच्या कार्यकर्त्यांचे दुसरे संमेलन कोरगांवकरांच्या गिरणीत खुल्या जागेत झाले. २९ डिसेंबर १९४१ ला भोर संस्थान प्रजापरिषदेचे अधिवेशन, १० जाने. १९४२ला मिरज संस्थान प्रजापरिषदेचे, कराड तालुका शेतकरी परिषदेचे अध्यक्ष. कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाचा वृत्तांत १२.८.४२ च्या कार्यकारी मंडळाच्या सभेत जबाबदार राज्य माहितीची मागणी ३ आठवड्यात पूर्ण न केल्यास संस्थानात अहिंसात्मक लढा सुरू करावा असे ठरले. कोल्हापुरातील भाषणाबद्दल माधवरावांना अटक व पन्हाळ्यास स्थानबद्ध. ३१ एप्रिल १९४३ ला

स्थानबद्धतेतून आठ दिवसासाठी बिनशर्त सुटका.

**कार्यकर्त्यांचा परिचय :**

(१) रत्नाप्पा कुंभार, (२) वीर माने (३) वीर हवीरे (४) करवीरच्या स्वामी, (५) शंकरराव इंगळे (६) नारायण वारके (७) चिखलीचा हरीबा बेनाडे, (८) भूपाल पंडीत (९) महादेव गायकवाड (१०) गोविंदराव उपळेकर (११) माधवराव भोसले, (१२) अनंतराव वडगांवकर, (१३) तुकाराम (१४) निजाम काझी (१५) परशुराम साळुंखे (१६) दत्तोबा तांबट

**लेनिन व स्टॅलिन** हे अतिछोटे १८ पानी पुस्तक १९५९ साली प्रसिद्ध झाले. यांस लेनिनच्या समाजसत्तावादी राज्याची स्थापना रशियात करणारा स्टॅलिन यांचे गुणगान आहे.

मार्क्सवाद<br>सोशियालिझम<br>मानवी संहार बंद कर } उपलब्ध नाहीत

**भाई बागलांचा विचार प्रवाह :** १९४७ साली प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकात माधवरावांची भाषणे व कांही इतर लेख आहेत. पुस्तक रत्नाप्पा कुंभार यांना अर्पण केलेले असून त्यामागील भूमिका बागल यांनी स्पष्ट केली आहे. प्रजापरिषदेच्या दोन नेत्यातील दुरावलेले संबंध पुन: जोडले जावेत हा उद्देश. बागल आणि रत्नाप्पा यांचे हे मीलन २० वर्षानंतरचे. गांधी तत्त्वज्ञनाचा हा विजय असे माधवराव मानतात. त्यांचे संबध कसे बिघडत गेले याचा इतिहासही येथे दिला आहे. यात सुरवातीला माधवरावांचे जवळचे मित्र जनार्दन कवाळे यांनी रेखाटलेले शब्दचित्रही दिले आहे. माधवरावांनी निरनिराळ्या प्रसंगी केलेल्या भाषणांचा हा संग्रह आहे. शेतकरी परिषदा, प्रजापरिषदांच्या वार्षिक बैठका, चित्रकार संमेलन, साहित्य संमेलन, वसंत व्याख्यानमाला पुष्पे, द्विभाषिकविरोधी सभा, इत्यादी व्यासपीठावरुन दिलेली २६ भाषणे व दोन लेख यांत संग्रहित आहेत. कांही भाषणे प्रदीर्घ आहेत तर कांही भाषणांचे वर्तमानपत्रात आलेले छोटेसे वृत्तांत आहेत. माधवराव एक प्रभावी वक्ते होते. १९३१ पासून १९६६ या कालातील भाषणे येथे आहेत.

## (४) साहित्यिक माधवराव बागल :

जनसेवेकरीता कला या लेनिनच्या उक्तिप्रमाणे साहित्यसेवा करणारे विरळा साहित्यिक म्हणजे माधवराव बागल. त्यांनी वाचकांच्या हृदयाचा ठाव

घेणारे आत्मचरित्र लिहिले, परिणामकारक व्यक्तिचित्रे लिहिली. वैचारिक निबंध लिहिले त्या बरोबरच हृदयद्रावक कथाही लिहिल्या. त्यांनी हजारो कथा लिहिल्या. त्यापैकी निवडक कथांचे चार संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

**जुलूम :** हिंदू समाजातील दिवसाढवळ्या चाललेल्या जुलूमांचा जणू चित्रपटच या संग्रहात दिसतो.

**संसार :** समाजातील अगणित दलितांच्या व पीडितांच्या असीम दु:खाच्या कहाण्या कोणालाही समजेल अशा अत्यंत सोप्या भाषेत मांडल्या आहेत.

**जिव्हाळा :**सहानुभूती, जिव्हाळा हा बागलांच्या या कथांचा प्राण. अन्याय जुलूम मग तो कर्माचा असो वा पैशाचा, कामविषयक वा ढोंगीपणाचा असो, माधवरावांनी तो चव्हाट्यावर आणण्याचा यात प्रयत्न केला आहे. समाजसत्तावाद्यांची दाट छाया या कथांवर पडली असली तरी त्या प्रथम कथा आहेत. यात तत्त्वज्ञानाची चर्चा नाही.

**अशी होती संस्थानी राजवट :** -हे १९५४ साली प्रसिद्ध केलेले पुस्तक वीर माने यांना अर्पण केले असून त्यास आचार्य भागवत यांचे 'पार्श्वभूमी' नामक मूल्यमापन आहे. प्रस्तावनेत माधवराव सांगतात की प्रजापरिषदेच्या लढ्याच्या काळात या कथा लिहिल्या गेल्या. त्यापैकी बहुतेक सकाळ, किर्लोस्कर, सह्याद्रीत प्रसिद्ध झाल्या होत्या.

**शाहू महाराजांच्या आठवणी :-** याही लघुतम कथाच आहेत. यात १५० चे वर प्रसंग असून प्रत्येक प्रसंग शाहू महाराजांशी ज्यांचा संबंध होता अशा अनेक माणसांना प्रत्यक्ष भेटून पूर्ण शहानिशा करुनच त्या स्वीकारलेल्या आहेत, अशी ग्वाही माधवराव आठवणींच्या सत्यासत्यतेबद्दल देतात. या आठवणींमुळे महाराजांची विविध क्षेत्रातील कामगिरी, विचारसरणी आणि संबंध कळून येतात व महाराजांच्या व्यक्तिमत्वावर प्रकाश पडतो असे प्रस्तावनेत माधवराव म्हणतात. विचार व भावना यांना चालना देणाऱ्या अनेक आठवणी यांत आहेत.

## (५) कलाकार माधवराव बागल:

**कला आणि कलावंत :**-दोन भागात प्रसिद्ध झालेल्या या पुस्तकात चित्रकलेची चिकित्सा आहे. चित्रकलेच्या चिकित्सेची पुस्तके मराठीत दुर्मिळ आहेत. निसर्ग रंगवावा कसा या भागात माधवरावांनी स्वत:चे अनुभव दिले असून ते चित्रकलेच्या विद्यार्थ्यांस उपयुक्त ठरतील. लेखन व चित्रकला या दोन्ही गुणांचा सुंदर मिलाप या पुस्तकात झाला आहे.

**कोल्हापुरचे कलावंत :** - डॉ. अप्पासाहेब पवार यांची प्रस्तावना असलेल्या या पुस्तकात कोल्हापुरच्या कांही कलाकारांचा परिचय व त्यांच्या कार्याचे मूल्यमापन आहे. यांत पोर्ट्रेट पेंटींग, शिल्पकला, लँडस्केप आणि कंपोझिशन यातील वैशिष्ट्ये मोठया मार्मिकतेने सांगितलेली आहेत.

**कला विहार :** या पुस्तकात कलेसंबंधीच्या अनेक बाबींवर, कांही शिल्पांवर, चित्रकारांवर, सिनेमा निर्मात्यांवर, राष्ट्रीय कलेवर, मॉर्डर्न आर्टवर, अश्लील चित्रांवर, चिनी चित्रकलेवर, इजिप्तच्या शिल्पकलेवर व इतर अनेक बाबींवर निबंध आहेत.

# परिशिष्ट ३

## माधवराव खंडेराव बागल यांचे कार्य व जीवनपट

## (जन्म २८ मे १८९६)

**कला :** १९१४ जे. जे. स्कूल ऑफ आर्ट, मुंबई : पेंटिंग कोर्स ४ वर्षे. सतत पहिली स्कॉलरशिप : मॉडेलिंग कोर्स ४ वर्षाचा २ वर्षात, स्कॉलर, म्यूरल डेकोरेशन १ वर्ष : बॉम्बे गव्हर्मेंट हाऊसवर भिंतीवरची ३ मोठी पॅनेल्स जॉर्ज लॉईड गव्हर्नरच्यावेळी : वॉटर कलर अलबम् लेडी आयर्विन याना छ. राजाराम महाराजांच्या हस्ते : व्हा. प्रेसिडेंट, छ. राजाराम आर्ट सोसायटी. अध्यक्ष, महाराष्ट्र चित्रकार संमेलन, पुणे १९३९, स्वागताध्यक्ष, महाराष्ट्र चित्रकार संमेलन, कोल्हापूर : स्वत: तयार केले. शाहू महाराजांचा बस्ट देणगी करवीर नगरपालिकेस, ब्रॉंझ कॉपी गंगावेस शाहू उद्यानात : सर्व लँड्स्केप्सचा संग्रह तारांगणी विद्यापीठास देणगी : त्या बागल आर्ट गॅलरीचे उद्‌घाटन सरसेनापती करिअप्पा यांचे हस्ते : महाराष्ट्र सरकारच्या आर्ट एज्युकेशनच्या सल्लागार समितीवर व सेंट्रल कमिटी, स्टेट आर्ट एक्झिबिशन कमिटीवर निवड ६-१०-६१.

**धार्मिक-चळवळ :** १९३२ अस्पृश्यांसमवेत जगदंबा मंदिर प्रवेश : वाडी नृसिंह अस्पृश्यासमवेत पादुका स्पर्श व घाटावर सहभोजन : दुतोंडी मारुती देवालय ब्रह्मपुरी नेतृत्वाखाली खुले : अध्यक्षतेखाली मिश्र विवाह, लिंगायत हवींरे व महार वधू, मराठा इनामदार डिग्रजकर व वन्यजमात वधू : आत्माराम पाटील मराठा व वधू ब्राह्मण यांचा रामाचे पारावर जाहीर गौरव : अनेक सहभोजने : गंगावेस सत्यसमाज मंदिरात व अनेक महार, चांभार, मांग वाड्यात : घरी महार मुलगा वाघमारे ठेवला, वाढवला, शिकवला : सिव्हिल बोर्डचा प्रथम अध्यक्ष नात्याने नगराध्यक्षाचे जगेवर सोनवणे या थोर गृहस्थाची निवड. अध्यक्ष मुंबई इलाखा

हरिजन परिषद :

**मजूर-चळवळ :** १९४१ : स्थापना व अध्यक्ष-खालील संघाचा-शाहू मिलमजूर, सिने थिएटर कामगार, शिंपी, औषध नोकर, प्रेस कामगार, व्यापारी खंडेकर, शाहूपुरी हमाल, राष्ट्रीय विडी कामगार, मेकॅनिक्स, म्युनिसिपल कामगार, मेडिकल मिनियल स्टाफ : यानतंर या सर्व संस्थाचे कोल्हापूर संस्थान राष्ट्रीय कामगार संघ या नांवाखाली एकीकरण करण्यात आले. संस्थानाबाहेर : उगार शुगर मिल, मिरज विडी कामगार, माधवनगर गिरणी मजूर या संघाची स्थापना. **अध्यक्ष, दक्षिणी संस्थान कामगार समिती कोल्हापूर संस्थान लोकशाही चळवळ :** १९२५ भाषणस्वातंत्र्यापासून जबाबदार राज्यपद्धतीपर्यंत : १९२५ ते ३५ हंटर साप्ताहिक, वडील संपादक मी दुय्यम. पत्राकडून ५ हजाराची जामिनकी मागितली. पत्र बंद. नंतर हद्दपारी. करवीर इलाखा खादी संघाची स्थापना. १९३१ करवीर इलाखा कॉंग्रेस कमेटीची स्थापना. १९३२ अध्यक्ष, करवीर व्याख्यानमाला, १९३२ राजद्रोहाची नोटिस १८-८-१९३८, शेतकऱ्यांचा पहिला मोर्चा व अटक २५-१२-३८ कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेची अध्यक्षतेखाली स्थापना व अटक ६-२-१९३९ शिक्षा दोन वर्षे सक्तमजुरी बेड्यासकट व २ हजार रुपये दंड : पेरी मंत्रिमंडळावेळी स्थानबद्ध ८ महिने पन्हाळगडावर - १९४३ : स्थानिक स्वराज्य संघाचा असताना नगरपालिका, निवडणुकीने सरकारच्या ताब्यातून घेतली. राष्ट्रसेवादलाची स्थापना : बागवे मंत्रिमंडळावेळी अटक : चळवळीला यश व मुख्यमंत्रिपदावर निवड व त्याग : कार्याध्यक्ष नात्याने लोकमंत्र्यांची निवड : ॲडमिनिस्ट्रेटर नंजापाकडून स्थानबद्ध. बाम कलेक्टर वेळी धान्यभाव वाढीविरोधी सत्याग्रहाबद्दल शिक्षा.

**इतर संस्थानी चळवळी :** संस्थान प्रजापरिषदाचे अध्यक्षपद-भोर १९४१, मिरज १९४२ सांगली १९४४, सांगली पार्लमेंटरी बोर्ड नात्याने मंत्रिमंडळाची निवड. सावंतवाडी १९४५, जत १९४६, अक्कलकोट १९४६; उद्घाटक कुरुंदवाड सं. प्र. परिषद १९५६.

अध्यक्ष, दक्षिण संस्थानें महाराष्ट्र व कर्नाटक विभाग ८-९-१९४६.

**इतर परिषदा :** स्वागताध्यक्ष : ग्रंथ प्रदर्शन शाखा, महाराष्ट्र साहित्य संमेलन, कोल्हापूर १९३२ - अध्यक्ष : दक्षिणी संस्थान कॉंग्रेसनिष्ठ युवक परिषद १९४१, सोलापूर जि. विद्यार्थी परिषद १९४४, अहमदनगर जिल्हा कॉंग्रेसनिष्ठ युवक परिषद उद्घाटक, खटाव तालुका कॉंग्रेस युवक परिषद १९४५ : प्राथमिक शिक्षण परिषद जि. पुणे १९४६, अध्यक्ष, आझाद, हिंद रिलीफ कमेटी १९४६: उद्घाटक, कोल्हापूर संस्थान क्लार्क्स ॲन्ड लोअर ग्रेड सर्व्हंट्स युनियन

अध्यक्ष, करवीर नगरपालिका शताब्दी ग्रंथ प्रकाशन १९५४ : अध्यक्ष, शेतकरी परिषद, वाळवे ता. १९४१ : कराड, इंदोली १९४२ : भगूर, नाशिक १९४५ : धामणगांव सोलापूर १९४५ : लोणी, जि. पुणे १९४६ : घामोड, राधानगरी जि. कोल्हापूर : कासेगांव ता. वाळवे तासगांव जि. सातारा : जावळी, महाबळेश्वर वगैरे.

**संयुक्त महाराष्ट्र चळवळ :** अध्यक्ष, मध्य प्रदेश, संयुक्त महाराष्ट्र परिषद, अमरावती १९५१ : अध्यक्ष व स्थापना संयुक्त महाराष्ट्र एकीकरण परिषद बेळगांव १९-१२-५५ : अध्यक्ष, कोल्हापूर जिल्हा सं. म. परिषद, ६-२-५६ : उद्घाटक द्विभाषिक विरोधी पीरषद, मुंबई २९-९-१९५६ : बिंदू चौकांत ७-२-५६ च्या भाषणाबद्दल खटला, दोषमुक्त १२-८-५७ : अध्यक्षतेखाली प्रतापगड मोर्चाचा ठराव ५-११-५७ : सीमा लढ्याचा सेनानी : पहिला सत्याग्रही बेळगांव १ नोव्हेंबर १९५८ व अटक २४-१-५९ ला शिक्षा ५ महिनेची - मंगळूर जेल म्हैसूर स्टेटला रवानगी.

**काँग्रेस अनुकूल भूमिका :** काँग्रेस प्रवेशाचे आवाहन पत्रक

★ ६५ वा वाढदिवस मुख्यमंत्री यशवंतरावजींच्या अध्यक्षतेखाली १८-६-६१

★ महाराष्ट्र सरकारच्या तिसऱ्या पंचवार्षिक सल्लागार समितीवर, महाराष्ट्र सरकार आर्ट एज्युकेशनच्या सल्लागार समितीवर व सेंट्रल म्युनिसिपल कमिटी स्टेट एक्झिबिशनवर ११-७-१९६०.

## स्मारके

पैसे जमवून :- १) गांधी स्मारक, वरुणतीर्थ पायाभरणी, २) म. फुले, ३) आंबेडकर पुतळे स्वत: तयार केलेला, ४) छ. शाहू पुतळा गंगावेस उद्यान, ५) अध्यक्षतेखाली प्रजापरिषद, हुतात्मा स्तंभ बिंदुचौक - उद्घाटक मुख्यमंत्री चव्हाण.

## साहित्य

(१) बेकारी व तीवर उपाय, (२) नव्या पिढीचे राजकारणे, (३) समाजसत्ता की भांडवलशाही, (४) स्वराज्याचा शत्रू, (५) लग्नबंधन की तुरुंगवास (६) खेड्यावरचा प्रचारक, (७) संस्थानिक, सं. प्रजा व फेडरेशन, (८) महात्माजींची कामधेनू, (९) मार्क्सवाद, (१०) सोशियालिझम व कम्युनिझम, (११) मानवी संहार बंद करा, (१२) लेनिन स्टॅलिन, (१३) सुलभ समाजवाद (भाग - १), (१४) सुलभ समाजवाद (भाग २), (१५) महात्मा फुले, (१६) शाहूमहाराजांच्या आठवणी, (१७) कला आणि कलावंत (भाग १) (१८) कला आणि कलावंत (भाग २), (१९) कथासंग्रह - जिव्हाळा, (२०) संसार, (२१) जुलूम, (२२) बंधनात, (२३) मी व प्रजापरिषद, (२४) जीवन प्रवाह (१, २), (२५) जीवन प्रवाह (भाग ३), (२६) सत्याग्रहाकडून सहकार्याकडे

(जीवन प्रवाह भाग ४), (२७) कोल्हापुरचे कलावंत, (२८) कला विहार (२९) माझ्या आवडत्या पांच व्यक्ती, (३०) अशी होती संस्थानी राजवट,
संपादक साप्ताहिक हंटर १९२५ : अखंड भारत १९३०.
संपादक - सत्यशोधक हीरक महोत्सव ग्रंथ.
(३१) माधवराव बागलांचे विषयीचे लेख उतारे- त्याची व इतरांची पत्रे.
पडसाद-संपादक - व. ह. पिटके :